# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक ४ थें.] आगष्ट, सप्टेंबर, आक्टोबर १९११. [अंक १।२।३.

## विषयानुक्रम.





मुंबई येथें
तुकाराम जावजी ह्यांनीं
'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

---

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु.
फुटकळ अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

## प्राकृत ग्रंथ विक्रीस तयार.

# श्रीएकनाथीभागवत.

### (पुस्तकरूपानें.)

भक्तिरसाची केवळ मूर्ती असें जें श्रीमद्भागवत त्यांतील केवळ ज्ञानाचा गाभा एकादशस्कंध आहे. श्रीएकनाथ महाराजांनीं आबालवृद्धांस ज्ञान प्राप्त व्हावें, ह्या हेतूनें एकादशस्कंधावर अत्यंत रसभरित सुबोध प्राकृत ओंवीबद्ध टीका केली आहे. सदर पुस्तकांतील कठीण शब्दांवर रा० रा० **लक्ष्मण रामचंद्र पांगारकर** बी. ए. यांनीं भरपूर टीपा दिल्या आहेत.

**किंमत ४॥ रुपये, ट. ख. ८ आणे.**

---

# ज्ञानेश्वरी.

### ( आवृत्ती चौथी. )

प्रत्येक पृष्ठावर परिभाषार्थक विपुल टीपा दिलेली. कै० डा० **अण्णा मोरेश्वर कुंटे** यांनीं आमच्या विनंतीवरून या ग्रंथावरील कठीण शब्दांवर टीपा देऊन तो करवेल तितका सुलभ केला आहे.

कापडी बाइंडिंगची किं. १॥ रु. ट. ।· रेशमी बाइंडिंगची किं. १॥। रु. ट. ।·

**अमृतानुभव**—ज्ञानदेवकृत व त्यावरील श्रीशिवकल्याणकृत अमृतानुभवविवरण आणि नित्यानंदैक्यदीपिका टीका इत्यादि. ३॥ ‍ ८≡॥

**अमृतानुभव**—ज्ञानदेवकृत... ... ... ... ... ... ।· ८–

**स्वात्मानुभव**—श्रीज्ञानेश्वरकृत. ... ... ... ... ८= ८॥

**गीता-पंचरत्न**—प्राकृत ओंवीबद्ध साधी बाइंडिंग. ... ... ।· ८॥

**गीता-पंचरत्न**—प्राकृत ओंवीबद्ध, रेशमी पुठ्ठा बाइंडिंग. ... ।= ८–

**गीतासार**—(ओंवीबद्ध प्राकृत टीकेसहित.) ... ... ८≡ ८॥

---

# सार्थ परमामृत.

### ( आवृत्ती तिसरी. )

ह्यांत आदिकवि श्रीमुकुंदराज यांनीं केलेल्या मूळ ओंवीबद्ध ग्रंथांतील एक एक ओंवी घेऊन त्यासमोर तिचा अर्थ दिला आहे. योग्य गुरुमुखाशिवाय खरा अर्थ न समजण्यासारखे जे कित्येक मराठी पुराणग्रंथ आहेत अशांपैकींच हा एक ग्रंथ असल्यामुळें या सार्थ परमामृत ग्रंथाच्या योगानें भाविक लोकांची बरीच अडचण दूर होईल अशी आशा आहे. किं. ।= आणे, ट.ख. ८–



दुसरा शहाअलम बादशाहा.

# १०. विसाजी कृष्ण बिनीवाले.

मराठ्यांच्या इतिहासामध्यें जे रणशूर व पराक्रमी ब्राह्मण सरदार प्रसिद्ध होऊन गेले, त्यांमध्यें विसाजी कृष्ण बिनीवाले हे प्रमुख होत. हे जातीचे कऱ्हाडे ब्राह्मण असून, ते पेशव्यांच्या फौजेमध्यें प्रथम लहानसे कारकून होते. तेथून ते आपल्या अंगच्या शौर्यसाहसादि गुणांच्या योगानें वाढत जाऊन, एक मोठे लष्करी सरदार बनले. ह्यांच्या लहानपणची माहिती उपलब्ध नाहीं. तथापि, श्रीमंत बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे ह्यांच्या कारकीर्दींत, त्यांची मर्दुमकी आणि तलवारबहादरी श्रीमंतांच्या नजरेस येऊन, त्यांनीं त्यांस इ. स. १७५० पासून नेमणूक करून दिली, असा दाखला सांपडतो. विसाजी कृष्ण हे प्रथमतः पेशव्यांच्या पागेचे अधिकारी बाळाजी खंडेराव ह्यांच्या हाताखालीं एक लहानसे कारकून होते. नंतर त्यांस श्रीमंतांनीं स्वतंत्र पागा दिली, व पुढें त्यांस बिनीवाले हा हुद्दा मिळाला. मराठ्यांच्या सैन्याच्या अघाडीस जी फौज असे, तीस 'बिनी' असें ह्मणत असत. या फौजेमध्यें शत्रूंशीं तोंड देऊन निकरानें लढणारे असे निवडक शूर लोक ठेवीत असत. विसाजी कृष्ण ह्यांनीं आपली तरवार सदैव फौजेच्या अघाडीस चालवून, आपली हिंमत आणि धैर्य हीं अनेक वेळां प्रदर्शित केल्यामुळें, श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे यांची मर्जी सुप्रसन्न होऊन त्यांनीं त्यांची योजना 'बिनी'मध्यें केली. तेथून ते पुढें फार प्रसिद्धीस आले व बिनीच्या फौजेचे मुख्य अधिपति झाले. ह्मणून त्यांस 'बिनीवाले' असें नामाभिधान मिळालें.

विसाजी कृष्ण बिनीवाले यांच्या शौर्याची विशेष प्रख्याति मराठ्यांच्या कर्नाटकांतील मोहिमेमध्यें इ. स. १७५७ सालीं झाली. ह्या वर्षी मराठ्यांचें साठ हजार सैन्य श्रीरंगपट्टणावर चालून गेलें होतें. तेथें त्यांस चांगलें यश येऊन ह्मैसूरच्या राजाकडून ३२ लाख रुपये खंडणी आणि शिरें प्रांत मिळाला. तदनंतर पेशव्यांनीं बळवंतराव मेहेंदळे यांकडे कर्नाटकांतील संस्थानें पादाक्रांत करण्याचें काम सोंपविलें. कर्नाटकामध्यें कडप्याचा नवाब हा अतिशय प्रबल असून मराठ्यांच्या सत्तेस विशेष प्रतिरोध करीत होता; ह्मणून त्यांनीं त्यावर स्वारी करून त्यास नतीजा देण्याचा प्रयत्न केला. या स्वारीमध्यें बळवंतराव मेहेंदळे ह्यांच्या हाताखालीं विसाजी कृष्ण ह्या तरुण सरदाराची योजना झाली. बळवंतराव मेहेंदळे व विसाजी कृष्ण ह्यांनीं मोठ्या शौर्यानें कडप्यावर चढाई करून, ता. २४ सपटेंबर इ. स. १७५७ रोजीं तेथील नवाबाशीं मोठें निकराचें युद्ध केलें; आणि त्यामध्यें आपल्या तरवारीचें कौशल्य

दाखवून नवाबास धारातीर्थी पाठविलें. त्यामुळें मराठ्यांस मोठें यश येऊन, बळवंतराव मेहेंदळे व विसाजी कृष्ण ह्यांच्या शौर्याची फार तारीफ झाली. विसाजी कृष्ण ह्यांचा उदय कडप्याच्या युद्धापासून झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

कडप्याच्या स्वारीपासून विसाजी कृष्ण यांची बढती होत जाऊन, त्यांच्याकडे पागेचें एक स्वतंत्र पथक पेशवेसरकाराकडून देण्यांत आलें, व त्याकरितां सरंजामी महालांची नेमणूक झाली. इ. स. १७५९ मध्यें त्यांजकडे अकरा हजारांचे गांव होते. नंतर पुढें जसजसा त्यांचा दर्जा वाढत चालला, तसतशी त्यांची तैनात व सरंजाम हीं वाढत गेलीं. विसाजी कृष्ण ह्यांची नेमणूक बहुतकरून कर्नाटक प्रांतांत असून, त्यांनीं तिकडील राजकारणें सांभाळिलीं होतीं. त्यांनीं अर्काट प्रांतावर स्वाऱ्या करून खंडणी वसूल केल्याचा दाखला सांपडतो. त्याचप्रमाणें इ. स. १७६० मध्यें त्यांनीं फुलचरीकर फ्रेंच लोकांशीं कारस्थानें करून त्यांच्याकडून जी मतलबाची याद तयार करून घेतली होती, ती उपलब्ध झाली आहे. त्यावरून कर्नाटकांतील राजकारणांत हे सरदार अग्रणी होते, असें मानण्यास हरकत नाहीं.

इ. स. १७६१ मध्यें पानिपत येथें मराठ्यांचें व गिलच्यांचें मोठें रणकंदन झालें व त्यामध्यें मराठ्यांचा अगदीं पराभव झाला. त्यांचे थोर थोर नामांकित सरदार युद्धामध्यें कामास आले. या वेळीं विसाजी कृष्ण, रामचंद्र गणेश, वगैरे कित्येक तरुण सरदार, जी थोडीबहुत फौज महाराष्ट्रांत राहिली होती, तिचा बंदोबस्त करण्यासाठीं, देशींच राहिले होते. त्यांना पानिपतच्या अपयशाचें हृदयद्रावक वर्तमान समजतांच अतिशय दुःख झालें, व मराठ्यांची पानिपत येथें नष्ट झालेली विजयश्री पुनः प्राप्त करून घेण्याची ईर्षा उत्पन्न झाली. परंतु योग्य संधि येईपर्यंत या नवीन दमाच्या तरुण व जोमदार वीरांची रणोत्सुकता तशीच दबून राहिली.

पानिपतच्या अपयशानें शोकग्रस्त होऊन श्रीमंत बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब पेशवे हे इ. स. १७६१ मध्यें पर्वती येथें मृत्यु पावले, व त्यांच्या गादीवर त्यांचे वडील पुत्र विराजमान झाले. मराठ्यांच्या इतिहासामध्यें स्वाभिमान, प्रजाहिततत्परता, सत्यप्रीति, सदाचारसंपन्नता इत्यादि गुणांमुळे जे पेशवे सर्ववंद्य व सर्वप्रिय झाले, तेच हे थोरले माधवराव होत. ह्या पेशव्यांनीं मराठ्यांचें नष्ट झालेलें वैभव आणि राजसत्ता पुनः प्राप्त करून घेण्यासाठीं अटोकाट प्रयत्न केले; आणि अनेक राजकीय संकटांस दाद न देतां, मोठ्या हिय्यानें, धैर्यानें, आणि युक्तीनें आपला इष्ट मनोरथ सिद्धीस नेला. त्यांनीं, पानिपतच्या रणांत

रोहिल्यांनीं व पठाणांनीं मराठ्यांची जी मानहानि व अपकीर्ति केली, तिचा मोबदला घेण्यासाठीं जे रणोत्सुक नवीन सरदार तिकडे पाठविले, त्यांमध्यें विसाजी कृष्ण बिनीवाले, रामचंद्र गणेश कानडे, महादजी शिंदे, तुकोजी होळकर आदिकरून तरुण वीरांची योजना केली. अर्थात् थोरल्या माधवरावांसारख्या पाणीदार व चतुर मुत्सद्द्यानें असल्या राष्ट्रीय महत्त्वाच्या कामगिरीवर ज्यांची नेमणूक केली, ते वीर लोकोत्तर शौर्याचे आणि अलौकिक कर्तृत्वाचे असले पाहिजेत, हें उघड आहे.

थोरले माधवराव पेशवे यांनीं विसाजी कृष्ण बिनीवाले आणि रामचंद्र गणेश कानडे यांच्याबरोबर वीस हजार निवडक घोडेस्वार, शिवाय पायदळ फौज देऊन, ता. १९ आक्टोबर इ. स. १७६८ रोजीं उत्तरहिंदुस्थानच्या मोहिमेवर रवाना केलें. त्यांस महादजी शिंदे आणि तुकोजी होळकर हे प्रत्येकीं पंधरा हजार स्वारांनिशीं येऊन माळव्यांत सामील झाले. इ. स. १७६९ मध्यें विसाजी कृष्ण नर्मदा नदी ओलांडून माळव्यांत गेले. तेथें त्यांच्या व शिंद्यांच्या फौजेचा मिलाफ होऊन एकंदर सैन्याची संख्या ५० हजारांवर जाऊन पोंचली. पानिपतच्या लढाईनंतर मराठ्यांचें हिंदुस्थानामध्यें एवढें प्रचंड सैन्य याच वेळीं प्रथम जमलें होतें. विसाजी कृष्ण, शिंदे व होळकर यांनीं या सैन्याचे वेगवेगळे भाग करून, भरतपुरकर जाट, रजपूत राजे, नजीबखान रोहिला आणि सुजाउद्दौला या प्रबल प्रतिपक्षीयांबरोबर समशेरीचे चार हात करून, मराठ्यांचा गनिमी कावा दाखविण्याची मसलत योजिली. ती यशस्वी होऊन मराठ्यांचें वर्चस्व तिकडे पूर्णपणें स्थापित झालें. या सर्व राजकारणांचा सविस्तर वृत्तांत देण्याचें येथें प्रयोजन नाहीं. तथापि, या स्वारीचा वृत्तांत फार महत्त्वाचा व मनोरंजक असून, तो मराठ्यांस अत्यंत भूषणास्पद आहे, असें ह्मटल्यावांचून राहवत नाहीं. विसाजी कृष्ण, महादजी शिंदे आणि तुकोजी होळकर यांनीं, वर निदर्शित केलेल्या आपल्या प्रतिपक्षांबरोबर जीं जीं राजकारणें केलीं, आणि आपल्या शौर्यप्रभावाचें जें जें प्रदर्शन केलें, तें अत्यंत प्रशंसनीय आहे, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं.

विसाजी कृष्ण यांनीं प्रथम भरतपुरच्या जाटांबरोबर युद्ध करून त्यांचा प्रांत उध्वस्त करून सोडिला, आणि त्यांजकडून ६५ लक्ष रुपये खंडणी घेतली. नंतर दीग येथें सैन्याचा तळ देऊन, नजीबउद्दौला आणि अयोध्येचा नवाब ह्यांच्या मनांत मोठी दहशत उत्पन्न केली. नजीबउद्दौल्याचें दिल्लीच्या शहाअलम बादशहाजवळ विशेष वजन असून, बादशाहीचीं सर्व सूत्रें त्याच्या तंत्रानें

चालत असत. तथापि, पानिपतच्या लढाईत त्यानें मराठ्यांशीं कपटबुद्धीचें वर्तन करून त्यांचा विशेष घात केल्यामुळें, मराठ्यांचें व त्याचें अगदीं हाडवैर आलें होतें. त्यामुळें मराठे, आपल्या कृतकर्माबद्दल चांगलेंच प्रायश्चित्त देतील असें समजून, तो अतिशय घाबरून गेला होता. ह्मणून त्यानें विसाजी कृष्णांबरोबर सलोख्याचें बोलणें लावून, तो मराठ्यांच्या अटी मान्य करण्यास तयार झाला. महादजी शिंदे व रामचंद्र गणेश हे नजीबउद्दौला व रोहिले लोक ह्यांचा सूड घेण्यास उत्कंठित झाले होते. अर्थात् त्यांस नजीबखानाशीं ह्या वेळीं सलूख करणें इष्ट वाटलें नाहीं. तथापि, विसाजी कृष्ण यांनीं दूरंदेशी मनांत योजून, इंग्रजांच्या ताब्यांतून शहाअलम बादशाहास सोडविण्यासाठीं व त्यास आपला अंकित करून घेण्यासाठीं, नजीबखानाचें सलोख्याचें बोलणें मान्य केलें. अर्थात् मराठ्यांच्या सेनापतींत मतभेद झाला, व ही गोष्ट पेशव्यांच्या कानापर्यंत गेली. त्यांनींही विसाजी कृष्णांच्या राजकारणांचा पेंच पसंत करून त्यांस पुष्टी दिली. दरम्यान इ. स. १७७० मध्यें नजबखान मृत्यु पावला.

विसाजी कृष्ण ह्यांस पेशव्यांची अशी सूचना होती कीं, दिल्लीच्या बादशाहास आपल्या अंकित करून घेऊन तेथें मराठ्यांचें वर्चस्व स्थापन करावें. या वेळीं इंग्रजांचें प्राबल्य बंगाल्याकडे विशेष वाढून, त्यांनीं बादशाहास आपल्या हस्तगत करून ठेविला होता. त्यांचा हेतु, दिल्लीच्या पातशाहींत आपला प्रवेश करून आपली सत्ता तेथें अधिष्ठित करावी, असा होता. परंतु विसाजी कृष्ण यांनीं हें राजकारस्थान पूर्णपणें ध्यानांत धरून, पेशव्यांच्या आज्ञेप्रमाणें दिल्लीच्या बादशाहास इंग्रजांच्या ताब्यांतून सोडवून, दिल्ली येथें मराठ्यांच्या झेंड्याखालीं आणून, स्वहस्तें तख्तनशीन केलें; आणि मराठ्यांचें कर्तृत्व आणि शौर्यतेज दिल्लीच्या पातशाहीमध्यें पुनः उज्ज्वलित करून दाखविलें. ही असामान्य गोष्ट सिद्धीस नेल्याबद्दल विसाजी कृष्ण यांची फार वाहवा झाली.

थोरले माधवराव साहेब पेशवे यांनीं विसाजी कृष्ण यांस लिहिलेलीं कांहीं अस्सल पत्रें उपलब्ध झालीं आहेत. तीं पाहिलीं असतां या महत्त्वाच्या राजकारणप्रसंगाची चांगली कल्पना करितां येते. दिल्लीच्या बादशाहास इंग्रजांच्या हातून सोडवून त्यास आपलासा करून घेण्याबद्दल पेशव्यांनीं विसाजी कृष्ण यांस पुढील पत्र लिहिलें आहे, तें फार वाचनीय आहे. तें येणेंप्रमाणें:—

श्रीः

"पु॥ राजश्री विसाजी कृष्ण स्वामी गोसावी यांस—

विनंति उपरी इंग्रेज ( चें ) पातशाहाजवळ प्राबल्य. त्यास पातशाहास दिल्लीस

स्थापावें हा ( हेत ) पांच सात वर्षें इंग्रजांनीं केला आहे. ते पातशाहास दिल्लीस आणते, तर त्यांचें सामर्थ्य नव्हतें, ऐसें नाहीं. आणतेच. परंतु ते पाण्यांतील पावप्यादे, इतकी हिंमत त्यांची नाहीं. ह्मणोन पातशाहांस दिल्लीस न जावें ह्मणत होते. परंतु पातशाहांनीं ऐकलें नाहीं. आलेच. या अर्थें पाहतां, पातशाहांनीं इंग्रेजांचा प्रकार तादृश मानिला, तोच वृद्धिंगत करावा. इंग्रेजांचा प्रवेश दिल्लीस होऊं देऊं नये. दिल्लींत प्रवेश जालीया उखळणार नाहीं. टोपीकरांत इंग्रेजांनीं डोई उचलली आहे. बंगाला व कलकत्ता व मछलीबंदर वगैरे बंदरें सुरतपावेतों आपले जप्तींत आणिलीं. कर्नाटक पायनघाट कुल इंग्रेज महंमदअल्लीखानांनीं आटोपिला. सुरत तो मुंबईप्रमाणें इंग्रेजांनीं आपली केली. दिल्लींत प्रवेश त्यांचा जाल्यास पातशाहा जेरदस्त त्यांचा होईल. फार अवघड पडेल. इंग्रज चढी लागला आहे. त्याचें सुख सुजाअतदौला आदिकरून कोण्हास नाहीं. तरी, अमीर सर्व आपले करून, सरदारांची फूट मोडून, एक होऊन, इंग्रेज माघारे जात, तें करावें. इंग्रेजांनीं बंगाला पादशाहापासून लिहून घेतला आहे. तोही तजविजीनें सुटे तें पुढें केल्यास होईल. तूर्त त्यांचा दिल्लींत प्रवेश न होतां, पातशाहास पाहून माघारें जात इतकेंच करावें. पातशाहा आपला एहसानमंद होऊन, पातशाहीचा बंदोबस्त आपले हातून करून घेई, ऐशी कारस्ती जी होईल, ती करावीच करावी. मनसुबेबाजपणाचा प्रकार हरहुन्नरें, एकास बैसवावें, एकास उठा ह्मणावें, आपलें वजन पुरतें त्यावर पाडावें, ऐसा समय आहे. यांत जो फैल मजबुदीनें कर्तव्य तो करणें. जाणिजे, छ. २० रबिलावल बहुत काय लिहिणें हे विनंति."

या पत्रांत लिहिल्याप्रमाणें विसाजी कृष्ण यांनीं मनसुबेबाजपणाची शर्थ करून बादशाहास आपल्या ताब्यांत घेतलें, हें निराळें सांगावयास नकोच.

विसाजी कृष्ण यांनीं दिल्लीपर्यंत मराठ्यांचा अंमल बसवून व शत्रूंस पादाक्रांत करून, ता. ११ फेब्रुवारी इ. स. १७७१ रोजीं दिल्लीच्या किल्ल्यावर मराठ्यांचें निशाण चढविलें, आणि शहाअलम बादशाहास अनुकूल करून घेऊन, त्यास अलहाबादेहून दिल्लीस आणिलें. इ. स. १७७१ च्या पावसाळ्यामध्यें दिल्लीचा बादशाहा फरक्काबादेजवळ नबीगंज येथें राहिला होता. त्याजबरोबर मराठ्यांनीं करार मदार करून, त्यास पूर्णपणें अनुकूल करून आपल्या ताब्यांत घेतलें. बादशाहानें ता. २ सप्टेंबर इ. स. १७७१ रोजीं विसाजी कृष्ण बिनीवाले यांस शिक्केकट्यार देऊन, मराठ्यांस बादशाही वजिराचे सर्व अधिकार व बक्षीगिरीचा फर्मान हीं दिलीं. विसाजी कृष्ण व महादजी शिंदे यांनीं, दिल्ली येथील पठाण व रोहिले यांचा अंमल दूर करून व सर्व शत्रूंस आपल्या बाहुप्रतापानें दिपवून

सोडून, ता. २५ दिसेंबर इ. स. १७७१ रोजीं शहाअलम बादशाहास दिल्लीच्या तक्तावर मोठ्या समारंभानें आरूढ केलें. इ. स. १७६१ मध्यें पानिपतच्या अपयशामुळें ज्या दिल्लीनगरीमध्यें मराठी राजसत्तेचें समूळ उन्मूलन झालें होतें, तेथें इ. स. १७७१ मध्यें मराठ्यांचें वर्चस्व पुनः स्थापित होऊन, दिल्लीपतीस तक्तनशीन करण्याच्या सुप्रसंग मराठ्यांस प्राप्त व्हावा, ही गोष्ट त्यांच्या दृष्टीनें अत्यंत संतोषदायक व गौरवास्पद वाटावी, यांत आश्चर्य नाहीं. या कर्तबगारीमुळें विसाजी कृष्ण बिनीवाले व महादजी शिंदे यांची सर्व हिंदुस्थानांत फार वाहवा झाली; आणि त्या योगानें थोरले माधवरावसाहेब पेशवे यांस फार समाधान वाटलें. या प्रसंगीं त्यांनीं विसाजी कृष्ण यांस जें पत्र लिहिलें आहे, तें फार महत्त्वाचें व वाचनीय असें आहे. तें येणेंप्रमाणेंः—

**श्री.**

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री विसाजी कृष्ण स्वामी गोसावी यांसः– पोष्य माधवराव बल्लाळ प्रधान नमस्कार विनंति उपरी. येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणें. विशेषः– तुह्मीं विनंतिपत्रें दोन छ ३० रमजानचें पाठविलें तें छ० २९ सवालीं पावलें, व दुसरें छ २ सवालचें पाठविलें, तेंही छ २९ सवालीं पावलें. "पातशाहास आणून तख्तावर बसविलें, हे कीर्ति स्वामींची दिगंतरास गेली. इराण, दुराण, बंदकबदक्षापर्यंत खबरा गेल्या. तमाम अमीर व राजेरजवाडे व जमीदार वगैरेकडून पातशाहास नजरा येतात. पातशाहा स्वमुखें हा प्रताप स्वामींचा ह्मणून वारंवार स्वामींचा स्तव करितो." ह्मणोन तपशिलें लिहिलें, तें कळलें. ऐशास पातशाहा शाहाअलम बहुत दिवस भटकत फिरत होते. इंग्रेज व सुजाअतदौलाचा आसरा करून होते. तत्रापि दिल्लीस आणून तख्तावर बसविणें हें त्यांस दुरापास्त होतें. त्यांस हे गोष्ट न जाहली. तुमची व सरदार होळकरांची विमनस्कता असतां, तुह्मीं व राजश्री महादजी शिंदे यांनीं पातशाहाशीं राजकारण करून त्यास प्रयागाहून आणून दिल्लीस स्थापना केलियाचा लौकिक मोठा असाधारण जाहला. कीर्तिस्पद प्रकारांत न्यून नाहीं हें खरें. परंतु पातशाहांनीं तुह्मांशीं पैका व मुलूख द्यावयाचा व कितेक मतालीब करून द्यावयाचा करार केला. त्यास, त्यापैकीं पैका व मुलूख पातशाहांनीं तुह्मांस काय दिल्हा? तीन छावण्या गुजरल्या. चवथी छावणी समीप आली. फौजेची उस्तवारी कशी केली व करणार? यांत पातशाहांचा मतलब, जे गोष्ट कोणास न जाहली, ते गोष्ट हिंमत बांधून तुह्मांजवळून करून घेतली, हे गोष्ट मात्र त्याची सिद्ध जाहली. आपले स्वहिताचा प्रकार कसा? पातशाहा तुह्मांजवळून सलतनतेचा बंदोबस्त करून

घेणार व सलतनतचा बंदोबस्त करावा हे हिंमत तुमची. त्यास वजीर सुजाअतदौल्यांनीं तुह्मांशीं राजकारण एलचखान व अनुपगीर यांजकडून करविलें, कीं आपण येतों. पातशाहांनीं पैका कराराप्रमाणें दिला तर उत्तम; न देत तर आपण देऊं. त्यांस आणावयास तुह्मीं फौजही पाठविली. परंतु ते अद्याप कां न आले? तेथें लिहिलीं येतात कीं, करनेल फिरंगी यांनीं पातशाहास दिल्लीस जाऊं दिल्हें. त्याजवरून मकसुदाबाद कलकत्त्यास मुखत्यार फिरंगी साबीतजंग आहे. त्यांनीं करनेलवर इतराजी केली. बोलावून घेतला. सुजाअतदौलास भेटून पट्टण्यास गेला. तेथें त्यांस कैद केला. तेव्हां करनेल मजकूर पोटकटारी करून मृत्यु पावले. सुजाअतदौलावर फिरंगी गालब आहेत. फिरंग्यांची आज्ञा सुजाअतदौला घेणार. त्यांनीं आज्ञा दिल्लीस जावयास दिल्ही, तर येतील. न देत तर त्यांचें वस्तु येववत नाहीं. ते येत नाहींत. तेव्हां किरकोळ रोहिले पठाण येतील न येत, पाहावें. पातशाहास घेऊन तुह्मी जाबते खानावर जातां. फितूर तो आहे. तथापि जाबतेखानांनीं रुजू आणिली तर मनसुबीयास वजन पडेल. पैका मिळेल. जाबतेखानास बक्षीगिरी सांगितलीया तो पैका देईल. जाबतेखानाचें राजकारण होळकराचेंच. घेऊं त्यास खरें करूं. हें होणें नाहीं हें तुमच्या लिहिण्यांत आहे. तदनरूप तुह्मी कराल. करावें. फार चांगलें असे. होळकर मेळवून घेणें. राहतां वजिरी राहिली. त्यास सुजाअतदौला आले तर उत्तम. न येत त्यापक्षीं गाजुदीखानाचें राजकारण आहे. परंतु हे दो गोष्टींनीं, खालीं फौज नाहीं, पैका नाहीं, पातशाहाशी नाखुषी आहे. ह्या गोष्टी सुधारलेल्या पाहिजेत. असो. सर्वा गोष्टींची गोष्ट, सरकारची फौज खराब झाली, त्याप्रमाणें पैका व मुलूख तों साधलाच पाहिजे. प्रयाग व काशीचे मतलब होऊन यावे. ते तुह्मीं करून घेतलेच असतील. ज्या पक्षीं सलतनतेच्या बंदोबस्ताचा होद्दा तुह्मांकडे लागला, तेव्हां फौजेची उस्तवारी व कर्ज परिहार करणें तुह्मांस अगाध नाहीं. सरकारांत खजीना पाठवून द्याल ऐसें दिसतें; व तुह्मीं या तरतूद साधनीं असालच. कसकसें योजलें आहे, तें लिहून पाठविणें. सारांश, फरोकाबादेहून पातशाहास आणून स्थापना दिल्लीस केली, हें पायाशुद्ध कर्म जाहलें. तुह्मी उभयतांनीं दम धरून चागलें केलें. पुढें कर्तव्याचा प्रकार चित्तांत आणिला असेल तो लिहून पाठविणें. जाणीजे. छ. १६ जिल्काद बहुत काय लिहिणें. हे विनंति."

अशा प्रकारें स्वामीगौरवास पात्र होऊन, मराठी राज्याची अद्वितीय सेवा केल्याबद्दल विसाजी कृष्ण यांस किती धन्य वाटलें असेल, त्याची कल्पना करवत नाहीं.

विसाजी कृष्ण व महादजी शिंदे यांनीं दिल्ली हस्तगत करून बादशाहास तख्तनशीन केल्यामुळें रोहिले व पठाण यांना मराठ्यांचें वर्चस्व असह्य झालें, व त्यांनीं मराठ्यांना उत्तर हिंदुस्थानांतून हांकून देण्याबद्दल आपलें सर्व सामर्थ्य खर्ची घातलें. परंतु विसाजी कृष्ण, तुकोजी होळकर व महादजी शिंदे या कर्तृत्ववान् सरदारांपुढें त्यांचें कांहीं एक न चालून, त्यांनीं पठाण व रोहिले यांस पूर्णपणें पादाक्रांत केलें. दिल्लीच्या बादशाहीचा शिरजोर व सर्वसत्ताधीश वजीर जो नजीबउद्दौला, त्याचा पुत्र जाबिताखान यास, आपली सर्व सत्ता मराठ्यांनीं संपुष्टांत आणिल्यामुळें विषाद वाटून, तो त्यांचा मत्सर व वैमनस्य करूं लागला. तेव्हां मराठ्यांनीं त्यावर चाल करून, त्याची पुरी खोड मोडण्याचा निश्चय केला. त्यांची व रोहिल्यांची शुक्रताल येथें फार निकराची लढाई झाली. मराठ्यांनीं आपल्या शौर्याची शिकस्त करून रोहिल्यांचा अगदीं पराभव केला. नंतर जाबिताखान पथ्थरगडास पळून गेला. तेथेंही मराठ्यांनीं त्याचा पाठलाग करून मोठें यश संपादन केलें. पानिपतच्या युद्धामध्यें मराठ्यांची अगणित संपत्ती लुटून घेऊन, नजीबउद्दौल्यानें या पथ्थरगडामध्यें आणून ठेविली होती. ती सर्व मराठ्यांनीं ह्या वेळीं हस्तगत करून रोहिल्यांची दाणादाण करून सोडिली. रोहिले हताश होऊन सैरावैरा पळत सुटले. याप्रमाणें मराठ्यांनीं रोहिल्यांना अगदीं नेस्तनाबूत करून सोडिलें. त्यामुळें अयोध्येचा वजीर सुजाउद्दौला व कलकत्तेकर इंग्रेज यांना देखील फार चिंता उत्पन्न झाली,* व ते आपला प्रांत सुरक्षित ठेवण्यासाठीं अनेक मनसबे करूं लागले. तो वृत्तांत देण्याचें हें स्थल नाहीं.

---

* मराठ्यांनीं रोहिलखंड पादाक्रांत करून रोहिल्यांची पूर्णपणें वाताहात केल्याचा उल्लेख वॉरन हेस्टिंग्ज ह्यांनीं आपल्या एका पत्रांत येणेंप्रमाणें केला आहेः—

"The Marathas have been making great strides towards the conquest of all India. They have been some time masters of the country of the Jats, and they have possessed themselves of all the Rohilla and Pathan dominions on the West of the Ganges. The only part of the Rohilla territory which remained, was a large tract of land lying to the north of the province of Oudh, and shut in on the West and North by the Ganges, and the woods and mountains of Terai among which the Ganges loses itself. Sekkertaul, the capital of this country, stands on the bank of the river.

"The Marathas have lately crossed the river, attacked and utterly routed the Rohilla army which lay there for the guard of the fort, and taken possession of Sekkertaul. The Rohilla chiefs- planet-struck have run off to their strongholds, and are running off to the hills, so that the whole country lies at their mercy."

नायब असून, कर्नाटकांतील सर्व मुलुकाचें संरक्षण करावयास्तव, त्यांसी शक्ति असावयाजोगें आह्मां अवघ्यांकडून पेशकश ह्मणून घेत होते. ज्या ज्याकडून पेशकस घेताती, त्या त्याचें संरक्षण करावें ह्मणोन मोंगलाईचा न्याय आहे. कुंपनीवाले प्रबल जाहल्यावरी आह्मांसीं व लार्ड पिकटासीं जाहल्या करारनाम्यांत आमचे मुलुकाचें व किल्ल्याचे संरक्षणानिमित्य कुंपणीवाल्यास सालियाना चार लाख होन देतों ह्मणून कबूल केलें आहे. महमदअल्लीखानाची प्राबल्यता राहून बलहीन जाहल्यावरी, आमचे मुलुकाचें संरक्षणानिमित्य त्यांसी पेशकसी देत येणें विहित आहे, असें न्यायप्रकारें प्रकारें आमचे बुद्धीस वाटत नाहीं. एखादे दंडकाप्रमाणें पेशकशी देत यावे ह्मणून ह्मणतील, तऱ्ही सदरहू पेशकशीचा ऐवज आह्मांकडून घेतात, तो आपले मुनीब निजामनमुलूक यांस पोहोंचावीत यावे. याही वेगळे आमचे मुलुकाचे संरक्षणार्थ इंग्रजांस वेगळे, नवाब महमदअल्लीखानास वेगळे, याप्रकारें दोन्हीं बाबतीनें आह्मीं देत येणें न्याय नव्हे. याशिवाय आमचे मुलुकाचे संरक्षणार्थ फौज ठेवावी ह्मणून करारनाम्यांत लिहिलें आहे. सांप्रत मसलतीस प्रारंभ होतांच हमेशा आमचे किल्ल्यांत असावयाची फौज देखील ठेवीना. * * * * * आमची फौज गोळा करून अन्य प्रदेशास पाठविली, त्यावरून आमचे मुलुकांत प्रवेश करावे ह्मणून गनिमानीं इच्छिल्याहीं कोणाकडून अडी नाहीं. एकादे कुंपणीचे मुलुकांत व महमदअल्लीखाचे मुलुकांतही याचप्रकारें आहेसें कोण्ही ह्मणतील, तऱ्ही आमचे मुलुकाचे संरक्षणार्थ कुंपणीची फौज ठेवावी ह्मणून करारनाम्यांत लिहिल्या बाबतीस आह्मी चुकेनासे चालावयाजोगे करितात. त्यांत लिहिल्याप्रमाणें कुंपणीवाले अमलांत आणीत नाहींत. सदरहू करारनामा कुंपणीवाल्यांनीं आपल्या चित्तानुसार करून घेतला असतां व तेणेंप्रमाणें वर्तणूक करीनासें असतां, करारनामा आमचे रजावंदीनें जाहला नसतां, आह्मांकडून कांहीं वेत्यास पडूं नये कीं काय?

८. कितेक सालां अगोदरी महमदअल्लीखानांनीं कालाहस्तीचे जमीदार वेंकट नायडावरी बहुत अन्यायें व जोरावरी करून, फौज पाठवून, हमेशा घ्यावयाचे पेशकशीशिवाय जास्ती चढवून पैके घेतले. हें वर्तमान कुंपणीस दाखल होतांच न्यायावरी दृष्टि देऊन, वेंकटपा नायडाकडून हमेशाचे मामुलप्रमाणें पेशकशी घेत येणें; सांप्रत जास्ती चढविले पैके घ्यावयासी गरज नाहीं; ह्मणून कुंपणीवाल्यानीं फैसला करून येथील गौरनर वगैरेस ताकिद पाठविली आहे. केवळच न्यायावरी दृष्टि देऊन नायडमजकुरावरी दया करून चालविलें कीं. तैसेंच आमचे ठायीं अभिमान ठेऊन चालवणें कुंपणीवाल्यास विहित आहे. कालाहस्तीवाल्याक-

डून कुंपणीचे कार्यास कधींही कांहींच कुमक नाहीं व प्राप्तिही नाहीं. या देशांत इंग्रेजांची प्राबल्यता विशेष नसतां, आमचे संस्थानींतून संकटाचे समयीं आमचे वडिलांचे दिवसापासून आजपावेतों अन्योन्यभावेंकडून आह्मी कुंपणीचे कार्यास सर्वप्रकारें कुमक करीत आहों, तें सर्व प्रपंचास जाहीर आहे. आह्मांकडून अनेक प्रकारें कुमक घडत असतां, कालाहस्तीचे नायडाचे ठायीं कुंपणीवाल्यांनीं निर्व्याजेंकडून इतका उपकार केला. सबब, आह्मांसारिखे पुरातन स्नेहीत व खैरख्वाही करणाराचे ठायीं कुंपणीवाल्यांनीं उपकार करणें विहितच आहे. आह्मांवर उपकार करावा असें कुंपणीवाल्याचे चित्तीं नसलियाही न्यायप्रकारें चालविल्यापुढें ह्मणावयाची अपेक्षा आमची आहे.

९. सदरहू लिहिल्या बाबतीवरून स्पष्ट व्हावयाचें काय ह्मणाल, तर फलाणे फलाणे बाबतीस्तव व आह्मीं अमकें पैकें देत यावें ह्मणोन करार असेपावेतों, येथील गौरनर वगैरे आमचे कार्यांत प्रवेश करून नानाविधेंकडून उपद्रव द्यावयास आस्पद होत आहेत. त्याकरितां आह्मांस बहुत उपद्रव आहे. ऐशा कार्यामुळें आह्मांस व कुंपणीवाल्यास प्राप्त व्हावयाचे विरुद्धावरून कुंपणीवाल्यास हिनष्टी, आह्मांसही असमाधान, व प्रजेसही सौख्य नाहींसें, बहुत उपद्रव प्राप्त होत आहे. यास्तव फलाणे फलाणे बाबतीकरितां आमके पैके ह्मणोन आह्मांकडून घेईनासें तमाम बाबतीं मिळून आह्मांकडून दरसालास चार लाख पन्नास हजार अथवा चारी लाख ऐंशी हजार होन दरसाल कुंपणीवाल्यास आह्मी पावते करावयास सिद्ध आहों. या प्रकारें वारावारी जाहल्यास आह्मी धाराळेंकडून कुंपणीचे जरूरीस पैके पावते करीत येऊं. ये मामुलाप्रमाणें मोकरार आहे ते पेशकशी मात्र कालाहस्तीवाल्याकडून घेत यावें ह्मणोन वारून, त्यासीही येथील गौरनर वगैरे जामीन जाहल्याकरितां नायडमजकुरांनीं मामूलप्रमाणें दाहा हजार चुंगडी होन पेशकश देत यावें ह्मणोन करार जाहला आहे. त्या न्याय प्रकार पाहिल्यास आह्मांकडूनही मामूलप्रमाणें मोकरर आहे ते पेशकशीबदल चार लाख रुपये मात्र घेत यावे.

१०. आमचे किल्याचे व मुलुकाचे संरक्षणार्थ पाहिजे ते फौज आमचे किल्यांत ठेऊन, कोणी मातबर फिरंगी किलेदार योग्यसा ठेऊन, आमचे सर्व कार्यास पाहिजे ते कुमक करीत असेलसें करावें. त्या किलेदार फिरंग्याशिवाय रेजीडेंड हो, अथवा दुसरा फिरंगी हो, आमचे किल्यांत व मुलुकांत ठेवायाची गरज नाहींसें वारून द्यावें.

११. आमचे मुलुकाचे कार्यांत व गृहकृत्यांत, कोणी फिरंगी अथवा दुभाषी प्रवेश करून फंदफितूर बहुत प्रकारें करितात. त्यामुळें आमचे मातबरीस फार

उणीव आहे. ऐसियासी कोण्ही फिरंगी व दुभाषी आमचे राज्यतंत्राचे व गृहकृत्याचे कार्यांतही प्रविष्ट न होतीलसी जबर ताकीद होऊन करारनाम्यांतही ल्याहावें. एखादे कोणी कांहीं कृत्रिम करितील, तरी शिक्षाही व्हावी. महमदअल्लीखानाचे राज्यतंत्रांत व गृहकृत्यांत कोणी फिरंगी वगैरे प्रवेश करीत नसून मर्यादेकडून चालवितात. याप्रमाणें आह्मांवरीही अभिमान ठेऊन मर्यादेनें चालत येतीलसें करावें.

१२. गौरनर केमलाचे दिवसांत आह्मांकडून जोरावारीनें काररनामे करून घेतले. ते रद्द करून, सांप्रत श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचे मार्फतीनें फैसला होऊन त्याप्रमाणें नूतन करारनामे आह्मांस व इंग्रेजांस होईलसें करावें.

१३. आह्मीं पुणेंस कागदपत्र वगैरे कांहीं पाठवावें व कोणी मातबरास पाठवावें ह्मटलें, तर इंग्रेजांचें मनास आयास वाटत आहे. इतःपर हमेशा कागदपत्रें व मातबर गृहस्थ कोणी जावयासी व यावयासी इंग्रेजांकडून दिक्कत पडेनासें करावें.

१४. अरणीची जहागीर राजश्री श्रीनिवासरावजीस सांप्रत कुंपणींतून दिल्ही आहे. पूर्वापूर्वींपासून अरणीचे जहागीरदार आमचे इलाकेचे ह्मणोन सर्व प्रपंचास जाहीर असतां, कुंपणीवाल्यांनीं आह्मांस व त्यांस संबंध नाहींसें करून कुंपणींतून आपणच जहागीर बहाल केली आहे. ऐसीयासी पूर्वापूर्वींपासून चालत आल्या दंडकाप्रमाणें अरणीचे जहागिरदार आमचे इलाकेंत असतीलसें करावें.



१४

येणेंप्रमाणें सर्व बाबतीविषयीं पकड धरून, मजबुतीनें इंग्रेजांसीं जबाबस्वाल करून फैसल होईलसें करावें. यामुळें सर्व संस्थानची स्थापना पूर्ववत् केल्याची कीर्ति सहजेंत प्राप्त होईल. आह्मांस युक्त वाटल्याप्रमाणें लिहिलें आहे. चित्तास मानिल्याप्रमाणें करावें."

ह्याप्रमाणें तंजावरचे राजे अमरसिंह ह्यांनीं पेशव्याकडे राजकारस्थानें चालवून, त्यांचे मार्फत इंग्रजांकडे मध्यस्थी करून, इ. स. १७८७ च्या तहानें तंजावर संस्थानावर बसलेल्या जबर खंडणीचा व इतर कडक अटींचा निर्बंध कमी व्हावा असा प्रयत्न केला. त्याचा पुढें लवकरच चांगला उपयोग झाला, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

इकडे टिपू व इंग्रज ह्यांची लढाई ह्याच सुमारास जुंपून टिपूनें कर्नाटकावर, व विशेषतः इंग्रजाचा दोस्त जो तंजावरचा राजा त्यावर, मोहीम करून त्यास पुष्कळ उपद्रव दिला. इंग्रजांनीं तंजावरच्या राजाचें संरक्षण करण्याची हमी

इ. स १७८७ च्या तहाप्रमाणें आपल्या शिरावर घेतली होती. त्याप्रमाणें त्यांनीं इ. स. १७९०–९१ मधील टिपूच्या स्वाऱ्यांचा प्रतिकार करण्याचा प्रयत्न केला, आणि त्या मुदतींत तंजावरच्या राज्याचा वसूलही त्यांनीं आपल्या मुखत्यारीनें करून घेतला. त्यामुळें राजास अर्थातच विषम वाटून, त्यानें पेशव्यांकडे पत्रव्यवहार चालवून आपला दुःखभार हलका करण्याची खटपट केली. ह्याच समयीं टिपूची फौज तंजावरच्या राजावर चालून आली होती. ती त्यानें ठासून राखिली ह्मणून त्याचा उपराळा करण्याबद्दल महादजी शिंदे ह्यांचे मार्फत इंग्रजांनींही पेशव्यांकडे कुमक पाठविण्याबद्दल शिफारस केल्याचा दाखला सांपडतो. ह्यावरून तंजावरचे संस्थानाबद्दल मराठ्यांस पूर्ण सहानुभूति व अभिमान असून त्यांनीं तंजावरकरांस ह्या वेळीं साहाय्य करण्याची बरीच खटपट केली असावी, हें उघड होत आहे. ता. १६ फेब्रुआरी इ. स. १७९० रोजीं महादजी शिंदे ह्यांनीं आपले सरदार रामजी पाटील जाधव ह्यांस, पुणें दरबारांतील मुत्सद्दी व मुख्य सूत्रचालक नाना फडणवीस ह्यांसीं, ह्या संबंधांत बोलणें करण्यासाठीं जें पत्र लिहिलें आहे, तें वाचनीय आहे.

**श्री.** १६ फेब्रुवारी इ. स. १७९०.

"राजश्री रामजी पाटील जाधव गोसावी यांसीः–

विनंति उपरी, चंदीचंदावरकर भोंसले राजे आहेत. त्यांजवर टिपूची फौज गेली होती. परस्परें लढाई जाली. भोंसले यांनीं टिपूचे फौजेस ठासून राखिली. मदराजेस इंग्रजांची जमीयत आहे. त्यास भोंसले यांनीं लिहून पाठविलें. त्यावरून इंग्रजांनीं कुमकेस पलटणें पाठऊन कुमक केली. टिपूची फौज आणखी तिकडे जाणार, तेव्हां इंग्रजांसही आणखी कुमक करणें प्राप्त. मदराजवाल्याचीं पत्रें कलकत्यास गौरनर साहेबास आलीं. त्यावरून गौरनर यानें मदराजेकडे जाण्याची तयारी करून, इकडे पामरसाहेबास कलकत्त्याहून पाठविलें कीं, चंदावरचे भोंसले यांचें संस्थान सरकार तालुक्यांतील, सरकारची आमची दोस्ती जाणून त्यासीं टिपूनें खलष केल्यामुळें मदराजवाल्यांनीं कुमक केली; याकरितां टिपूचा आमचा कलह वाहडला. त्यापक्षीं तिकडे भारी जमाव करून त्याचें पारपत्य करणें प्राप्तच आहे. सरकारांतूनही फौजा पाठऊन चंदावरकर भोंसले यांचा उपराळा करावा. आह्मी कलकत्त्याहून कूच करून मदराजेस जातों. मुंबई वगैरे जमाव झाडून तिकडेच आणविला आहे. तुह्मीं पाटीलबावांसीं बोलून, त्यांचीं पत्रें पुण्यास पाठऊन फौजाची रवानगी तिकडे व्हावी. ह्मणजे टिपू कलहास प्रवर्तला, त्याचें पारपत्य होईल. ह्मणोन पामर साहेब येऊन या प्रों बोलला. त्यावरून लिों असे.

तरी तुह्मीं लिहिल्याप्रमाणें राजश्री बाळाजीपंत नानांसीं बोलून, काय उत्तर करितात तें लिहून पाठवणें. चंदावरकर राजे यांजकडून तेथें वर्तमान कांहीं आलें किंवा नाहीं हेंही मनास आणून लिहिणें. चंदावरकराचे संस्थानास टिपूनें उपद्रव केला असतां सरकारांतून उपराळा न जाला. इंग्रजांनींच त्याचा उपराळा करून तें संस्थान राखिल्यास त्याच्या पेव्यांत गेलें असें होतें. दोन तीन वर्षें मदराज व मुंबई वगैरे जागां इंग्रजाकडील जमावाची तर्तूद होत आहे. आपले जागां मजबुदी करून गौरनर खासाच कलकत्त्याहून मदराजेकडे जात आहे. तेव्हां पक्केपणें टिपूचा उपमर्द करावा असे यांचे बोलण्यांतील भाव दिसतात. इंग्रज व आपण एक होऊन टिपूचे पारपत्याचा विचार करावा, असा विचार तेथील पक्केपणें असल्यास तसेंच लिहून पाठवावें. त्याप्रों उत्तर इंग्रजास सांगावयासी येईल. पूर्वीं टिपूवर मसलत इंग्रज व आपण मिळोन करावी, पुण्याहून फौज रवाना जाली ह्मणजे त्यासमागमें मुंबईचा जमाव इंग्रजांनीं द्यावा, असें बोलण्यांत आलें असतां पुण्याहून फौजेची रवानगी जाली. तुह्मांकडून जमाव निघाला नाहीं. त्यामुळें फौजखर्चाचा पेंच बसला, ह्मणून त्यास शब्द लाविला. त्यावरून हाल्लीं यांचें बोलणें कीं आह्मीं आपला जमाव भारी केला आहे. तुह्मांस इतबार नसला, तरी मुंबईचा जमाव तुमचे फौजेसमागमें देऊं. फौज व आह्मांकडील पलटणें समागमेंच इकडून जावीं. तिकडून आह्मांकडील जमाव आहेच. दोहीकडून ताण बसऊन पुर्तेपणें पारपत्य करावें. असा इंग्रजाकडील विचार दिसोन येतो. त्यावरून लिों असे. तुह्मीं सविस्तर बोलून उत्तर जलद लिहून पाठवणें. रा छ १ जाा खर सुाा तिसैन मया व अलफ. बहुत काय लिहिणें हे विनंति."

ह्या पत्रावरून पेशवे व महादजी शिंदे वगैरे मराठ्यांस तंजावर संस्थानाबद्दल अभिमान व आपलेपणा किती वाटत होता तें इंग्रजांसही पूर्ण ज्ञात होतें, असें दिसून येतें. तंजावरच्या राजकारणासंबंधानें शिंदे व नाना फडणवीस ह्यांचीं अस्सल पत्रें फारशीं उपलब्ध होत नाहींत, ही दुर्दैवाची गोष्ट आहे. हीं पत्रें जर समग्र उपलब्ध झालीं, तर इतिहासावर कितीतरी नवीन प्रकाश पडेल. अस्तु.

अमरसिंहराजे ह्यांनीं कलकत्त्यास गव्हर्नर-जनरलपर्यंत पत्रव्यवहार करून व नाना फडणवीस, महादजी शिंदे ह्यांच्या सारख्या मुत्सद्यांकडून शिफारसी करवून इ. स. १७८७ चा तह अखेर रद्द करविला, आणि ता. ११ जून इ. स. १७९२ रोजीं नवीन तह ठरावांत आणिला. ह्या तहामध्यें मद्रास येथील गव्हर्नर ऑनरेबल सर चार्लस ओकले ह्यांनीं असें कबूल केलें कीं, इ. स. १७८७ च्या तहाप्रमाणें खंडणीचा व इतर पैसा देण्याची तंजावर संस्थानास ऐपत नसून, त्यास केलेल्या

मागण्या फारच जबर आहेत. सबब ह्या नवीन तहाप्रमाणें खंडणीच्या रकमेंत फेरफार करावाः—

१– पहिलीं तीन वर्षेंपर्यंत सालाबादची शांततेच्या काळांतील खंडणी, साडेतीन लक्ष होनप्रमाणें द्यावी.

२– पेशकशीच्या मागील बाकीबद्दल पन्नास हजार होन द्यावेत, आणि खाजगी खर्चाबद्दल साठ हजार होन द्यावेत. ह्मणजे पूर्वींच्या तहाप्रमाणें जेथें २४,५०,२१२ रुपयांची रक्कम ठरली होती, तेथें ४,६०,००० होन ह्मणजे १६,००,००० रुपये दरसाल राजानें इंग्रजांस द्यावेत.

पहिलीं तीन वर्षें संपल्यानंतर मग चालू पेशकशीबद्दल १,१४,२८५ होन अधिक घ्यावेत असें ठरलें. खंडणीचा हप्ता वेळेवर दिला गेला नाहीं, तर ईस्ट इंडिया कंपनीनें तंजावरच्या चार सुभ्यांची व्यवस्था आपल्या हातीं घेऊन खंडणी वसूल करून घ्यावी, असेंही एक कलम ह्या तहांत गोविलें होतें. त्याचप्रमाणें अमरसिंह राजानें माजी तुळाजी राजाच्या विधवा राण्याकरितां तीन हजार होन आणि त्यांचा दत्तकपुत्र सरफोजी ह्याच्या खर्चासाठीं अकरा हजार होन दरसाल कंपनीस देत जावे, असेंही दुसरें एक कलम होतें.

अमरसिंह राजे ह्यांनीं आपल्या खंडणीची रक्कम इंग्रज सरकाराकडून कमी करून घेण्याचा भगीरथ प्रयत्न केला. ह्या बाबतींत त्यांनीं मराठे व कलकत्तेकर इंग्रज ह्यांच्याशीं मुद्देसूद पत्रव्यवहार करून, आपल्या ह्मणण्याचें समर्थन सयुक्तिक रीतीनें व चातुर्यानें केलें होतें, असें त्यांच्या पत्रव्यवहारावरून दिसून येतें. इ. स. १७९२ मध्यें दुसरा तह झाला, त्या वेळीं कलकत्तेकर इंग्रजांस राजे अमरसिंह ह्यांनीं आपलें ह्मणणें कसें समर्पक रीतीनें सिद्ध करून दाखविलें, तें पुढील मराठी यादीवरून चांगलें दिसून येईल. ही यादी येणेंप्रमाणें:—

श्री.

"यादी चंदावरकरांस कलकत्तेकरांनीं पत्र लिहिलें, त्याचें उत्तर चंदावरकरांनीं जनरालास लिहिलें त्याची नक्कल. सन सल्लास तिसैन.

१ सर आर्चिबाल्ड केमल याणें तहनामा केला. तो जलाल ह्मणोन तुह्मीं दुसरा तहनामा केला. त्यानें संतोष जाहला. अलीकडे दोन वर्षें हंगामा नाहीं. प्रांतांत मामलेदार तुमचे जमा केले आहेत. त्यापक्षीं जीवन पाहून करार करून द्यावयास योग्य आहां.

१ तुह्मांसी किस्तबंदी केल्यांत अंतर नाहीं, असें असल्यास हंगामा असो, अगर सुरळीत असो, मुलुकजप्तीचें प्रयोजन नाहीं. अंतर पडल्यास मुलुक जप्त करितां येईल. सुरळीत चालत असतां, आमचा अंमल काढून कंपनीचा केल्यास प्रजेस अविश्वास होऊन पैक्याची कमती होईल.

१ मुलुकाचे वसुलाचे आधारावरून पैक्याची बेरीज एकदांच ठरावांत आणावी. लाट कार्नवालिस यांचे विद्यमानें करार ठरेल, तो बहुत दिवस राहील. यास्तव आह्मांवर अधिक ओझें घालून प्रजेस पीडा होय, असें न व्हावें. नबाब महमद अल्लीखान यांनीं पेशकशीचा अखत्यार कुंपणीवाल्यावर दिल्हा, त्या अर्थी पेशकशी वेगळी न व्हावी. सांप्रतचे करारांत तीन वर्षेंपावेतों च्यार लक्ष साठ हजार होन देत जावे, ह्मणोन आपण लिहिलें. त्यास पहिले लॉट पिकट यांणीं चार लाख होन सालीना द्यावे, याप्रमाणें करार केला होता. त्याजवर अलीकडे हंगामे बहुत जाहले. मुलूख खराब जाहला. जमा कमती जाहाली. या वेगळें नागूर बंदराबाबत पन्नास हजार होन व कारेकोलचें चार महालांबद्दल चाळीस हजार होन याप्रमाणें आमचे मुलकांतून वेगळे घेतले. लॉट पिकटांचे कारकीर्दींत याप्रमाणें नव्हतें. सांप्रत अधिक मागणें न्याय दिसत नाहीं.

१ नबाब महमदअल्लीखान यांचे सरकारांत तुमचें कर्ज सत्तर लाखपावेतों आहे. त्यास दरसाल सहा लक्ष होनप्रमाणें द्यावे, असा करार केला आहे. आह्मांवर दोन लक्ष बावन्न हजार नऊशें सात होन कर्ज आहे. त्याऐवजीं दरसाल तेवीस हजार होन नबाबाचे दामाशाईप्रमाणें होतात, त्याप्रमाणें घेत जावे. अधिक ओझें घालूं नये.

१ आमचा बंदोबस्त लौकर करून द्यावा. बंदोबस्त न जाहला, दुसरा कोणी जनराल आला, तर तो आणखी तऱ्हेनें करूं लागेल. त्याणें आमची रयत वगैरे सावकार आह्मांजवळ रुजू राहणार नाहीं. यास्तव याचा बंदोबस्त जीवन पाहून लौकर व्हावा.

१ साहावें बाबतीचें उत्तरः—पेशजी लॉट पिकट याणें वीस हजार होन दरमाहा द्यावे याप्रमाणें पीक पाहून ठरविलें होतें. हल्लीं तीस हजार होन आपण महिन्याचे द्यावे ह्मणोन लिहिलें आहे. त्यास याप्रमाणें निभणार नाहीं. पेशजींप्रमाणें घ्यावें व पहिल्या करारांची बाकी द्यावी ह्मणोन लिहिलें, त्यास पहिला करार जाला ह्मणोन दुसरा केला; तेव्हां मागील बाकी मागूं नये.

१ सातवे बाबतीचें उत्तर, ऐवज पावता करण्याविसीं जामीन द्यावा ह्मणोन

लिहिलें, त्यास पेशजी किस्तबंदीप्रमाणें ऐवज पावता केला. पुढेंही किस्तबंदीप्रमाणें पावता होईल. आमचा बेभरवंसा धरून जामीन मागूं नये.

१ जप्तीचे प्रसंगांत दुसरे मतलबास उत्तरः—कुंपणीचे कर्जास दरसदें आठ होनप्रमाणें व्याज असावें, ह्मणोन लिहिलें आहे. त्यास आजपावेतों कुंपणीचे व आमचे हिशेबांत व्याजाचा जाबसाल नाहीं. सांप्रत व्याज द्यावें असें आपण ह्मटल्यास काय ह्मणावें ?

१ किस्त पन्नास हजार होनांची आहे. त्यास किस्तीचे मुदतीस पंधरा दिवस जास्ती जाहले, किस्त पावली नाहीं, तर दीडलक्ष होनांचा मुलूक जप्त करावा, ह्मणोन लिहिलें. त्यास पन्नास हजारांचे करितां दीड लक्षाचा तालुका जप्त करावयास पहातां? मुलूक एकंदर कुंपणीचे हाताखालीं घालावा असें दिसतें. त्यास ही गोष्ट पुरातन स्नेही, त्यांचे ठाई न करावी.

१ शरफोजी वगैरे यांचे खर्चास द्यावयास आह्मी तकरार करीत नाहीं. त्यास आमचे गृहकृत्याचा मजकूर तहनाम्यांत ल्याहावयाचें कारण नाहीं.

१ हल्लीं दोन तीन वर्षें जाहल्यावर द्यावें ह्मणोन लिहिलें तेः—

३,५०,००० फौजेचे खर्चास.
५०,००० बाकीबाबद.
१,१४,२८५ पेशकशी.
६०,००० कर्जाबद्दल.
२०,००० शरफोजी वगैरे.
५,९४,२८५

याप्रमाणें लिहिले आहेत. त्यास पहिला करारनामा जलेल पडला, त्याकरितां हल्लीं रयातीनें केला ह्मणोन लिहिलें. परंतु त्यापेक्षां एक लाख होन मात्र हालींच्यास कमी आहे. व जप्ती तुह्मीं केली त्याचा वसूल ५,५७,४०४ जाहला, व दुसरे सालीं वसूल जाहला, त्याचा हिशेब समजला नाहीं. अजमासें सात लक्षपर्यंत जाहला असेल असें वाटतें. त्यास याप्रमाणें तुह्मांस ऐवज द्यावा, तरी आह्मीं खाजगी वगैरे सरदारीचा खर्च कशानें चालावा ? याकरितां जीवनमाफक द्यावें.

जनरल केमल याणें पेशजीं मुलुकांची बेरीज दहा लक्ष होन दुसऱ्यांचे सांगितल्यावरून ठराविली. त्यापैकीं आह्मांपासून सातलक्ष होन अजमासें द्यावे, असें ठरविलें होतें. परंतु आकार सा लक्ष होन दरसाल तुमचेच अमलदारांनीं केला आहे, त्यावरून ध्यानांत आहे. त्यास दहा लक्ष होन ठरविलें, तेव्हां सात लक्ष द्यावयाचे केले होते, तें जालें. हालीं सा लक्ष आकार, याकरितां त्या दामाशाईप्रमाणें बेरीज उणी करावी.

१ नबाब महमद अल्लीखान यांजकडे पेशजीं एकवीस लक्ष होन करार होता. त्यापैकीं लाट कार्नवालीस यांणीं रयात सा लक्ष होन केली आहे. त्या अन्वयें आह्मांसही करावी. एक लक्ष होन आह्मांवर रयात केलियानें निभाव होत नाहीं. अधिक रयात करावी.

१ नबाबाचे मुलुकाचा वसूल तेवीस लक्ष होन, त्यांपैकीं पंधरा लक्ष होन कुंपनीकडे देतात. त्याप्रमाणें आमचें केल्यास आंमचे मुलकांचा वसूल साडे सा लाख, पैकीं चार लक्ष तीस हजार होन तुह्मीं द्यावे, याप्रमाणें होतें तसें करावें.

१ हल्लीं तुह्मीं करार करून पाठविला, त्याप्रमाणें ऐवज आह्मी देऊं लागल्यास चार वर्षेंपावेतों ऐवज पावेल. पुढें मुलूक खराब होईल. ऐवज कांहींच मिळणार नाहीं. याकरितां असें न करावें. निदान साडे चार लक्ष होन तुह्मांस आह्मीं द्यावे. याप्रमाणें करार केल्यास निभावणी होईल. नाहींतर निभावणी आमच्यानें होणार नाहीं.

१ वरकड पाळेगार यांचें जीवन पाहून पेशकशी घेतां. त्याप्रमाणें आह्मांपासून घ्यावें. पहिल्यापासून कुंपणीचा व आमचे वडिलांचा स्नेह, त्याजवर दृष्ट देऊन अधिक ममता असावी. मुलकाचे वसुलाचे बेरजेचा अजमास पाहून रयातीनें पैका घ्यावा.

१ येथें कुंपणीची फौज आहे, त्यास खर्चास दरमाहा पंधरा हजार होन द्यावे लागतात. त्यास वसुलाचे हंगामांत ऐवज वसूल तो देतो. ज्या महिन्यांत वसूल होत नाहीं, तो दरमहा सावकारांपासून कर्ज काढून द्यावा लागतो. त्यास व्याज पडतें. यामुळें तोटा आह्मांस पडतो. यास्तव वसुलाचे हंगामाचे महिन्यांत दरमहा नेमाप्रमाणें देत जाऊं. ज्या महिन्यांत वसूल होत नाहीं, त्या महिन्याचा ऐवज कुंपणीचे खजान्यापैकीं देत जावा. ह्मणजे आह्मांस व्याजाचा तोटा पडणार नाहीं. याचा मुबदला ऐवज वसुलाचे हंगामांत कुंपणीचे खजिन्यांत दाखल करीत जाऊं.

१ आपण तहनामा पाठविला, त्यास येविसींचा तपसीलवार मजकूर आह्मीं लिहिला आहे. तो पाहून, कृपा करून, जीवन पाहून, ठराव करून देऊन, आमच्यानें निभावणी होईल तें करावें.”

याप्रमाणें अमरसिंह राजे यांनीं कलकत्तेकरांशीं पत्रव्यवहार करून, इ. स. १७९२ च्या तहामध्यें जीं कलमें ठरलीं होतीं, त्यांत भासत असलेल्या अडचणी स्पष्टपणानें व्यक्त करून दाखविल्या. कलकत्तेकरांस लिहिलेल्या पत्राची नक्कल त्यांनीं नाना फडणवीस यांस पाठविली; आणि त्यांच्या मार्फत महादजी शिंदे यांच्या-

कडे संधान लाऊन, कलकत्तेकराकडून आणखी सवलती मिळविण्याचा प्रयत्न केला. परंतु या प्रयत्नाचा पुढें कांहीं उपयोग झाला असावा असें दिसत नाहीं.*

राजे अमरसिंह यांचा, तंजावर संस्थानाची खंडणी कमी करून संस्थानास चांगली स्थिति प्राप्त करून देण्याचा प्रयत्न चालू असतां, त्यांच्यावर दुसरें संकट उत्पन्न होऊन, त्यांस लौकरच तंजावरच्या गादीवरून पदच्युत होण्याचा प्रसंग आला. ही हकीकत येणेंप्रमाणेः–

अमरसिंहांचे थोरले बंधु तुळाजी राजे यांनीं मृत्युसमयीं (इ. स. १७८७ सालीं) सरफोजी या नांवाचा एक मुलगा दत्तक घेऊन, त्यास तंजावरचे डेनिश मिशनरी मि० स्वार्ट्झ ह्यांच्या हातीं सोपविलें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. सरफोजीचें दत्तविधान त्या वेळीं मद्राससरकारानें मंजूर न करितां, अमरसिंह राजे ह्यांची तंजावरच्या गादीवर स्थापना केली; आणि सरफोजीस अमरसिंह राजांच्या संरक्षणाखालीं ठेविलें. त्याचें वय त्या वेळीं नऊ वर्षांचें होतें. सरफोजीस व त्याच्या मातोश्रीस अमरसिंह राजांनीं चांगल्या रीतीनें वागविलें नाहीं, अशी तक्रार मि० स्वार्ट्झ ह्यांनीं मद्राससरकारचे कानावर घालून इ. स. १७९३ मध्यें सरफोजी व त्याची आई ह्यांस मद्रासेस नेऊन ठेविलें. तेथें सरफोजीच्या शिक्षणासाठीं रे० जेरिक या नांवाच्या एका पाद्री गृहस्थाची योजना केली. मद्रास येथें गेल्या-

---

* अमरसिंह राजे यांनीं कलकत्तेकर इंग्रजांकडे व चिनापट्टणचे जनरलाकडे पत्रव्यवहार करून तंजावरची खंडणी कमी करण्याचा प्रयत्न केला होता, हें निश्चित आहे. पेशव्यांनीं मध्यस्थी करून आणखी दोन लक्ष खंडणी कमी करावी म्हणून राजे अमरसिंह ह्यांची खटपट चालू होती, असें खालील पत्रावरूनही दिसून येतें.

"सेवेसीं बापूजी धोंडदेव पेठ्ये विज्ञापना जे, फुलचरीहून राजश्री गोपाळराव बल्लाळ यांचें पत्र आलें, त्यांत मजकूर कीं:—चंदावरकर राजा याजला इंग्रजानें जरब देऊन साडे सात लक्ष होन नजर ठराविली. त्यापैकीं तीन लक्ष होनांचा भरणा केला; पुढें भरणा होत नाहीं. याजकरितां इंग्रजांचे मुख्यस्थानीं राजांनीं पत्रें लिहिलीं. त्यांचें उत्तर चिनापट्टणचे जनरालास व बंगाल्यास आलें कीं, साडेसात लक्ष नजर ठराविली हें ठीक नाहीं; त्यांच्यानें भरणा होणार नाहीं. याजकरितां अडीच लक्ष होन कमी करून बाकी पांच लक्ष घ्यावे. त्यांत तिहींचा भरणा जाहला. बाकीं दोन लक्ष राहिले. याजविसीं तेथील जनरालास पत्र लिहून, पुढें दोहों लक्षांचा तगादा न होय असें जाहल्यास, कांहीं सरकारांत नजर व दरबारखर्चही देईल. स्वामींनीं कृपा केल्यास सर्व गोष्टी घडतीलशा दिसतात. येविसीं गोपाळराव यांणीं पत्र लिहिलें आहे. त्यावरून विदित होईल. राजावर कृपा करून त्याचा बचाव करणार स्वामी आहेत. श्रुत होय हे विज्ञापना."

नंतर, सरफोजीच्या आईनें, तंजावरच्या गादीवर आपल्या मुलाचा हक्क आहे ह्मणून कलकत्त्याचे गव्हर्नरजनरल लॉर्ड कॉर्नवालिस यांच्याकडे यादी पाठविली. सरफोजी व त्याची आई यांस मि० स्वार्त्झ याचें चांगलें पाठबळ मिळाल्यामुळें त्यांचा पक्ष सबळ होऊन, तो उत्कृष्ट रीतीनें मद्राससरकार व हिंदुस्थानसरकार यांच्या पुढें मांडण्यांत आला. मि० स्वार्त्झ यांनीं अमरसिंह राजे यांच्या वर्तनांतील व राज्यकारभारांतील सर्व दोषांचें आविष्करण करून, ते गादीस अगदीं अपात्र आहेत असें मद्रासचे गव्हर्नर सर चार्लस ओकले यांच्या पूर्णपणें निदर्शनास आणून दिलें. एवढेंच नव्हे तर, त्यांनीं हिंदुस्थानचे गव्हर्नरजनरल लॉर्ड कॉर्नवालिस यांच्याशीं पत्रव्यवहार करून सरफोजीस तंजावरचे गादीवर बसवावें असाही प्रयत्न केला. मि० स्वार्त्झ यांनीं, सरफोजीचें दत्तविधान सशास्त्र जालें असून, अमरसिंह राजे यांनीं तंजावरच्या पंडितांस लांच देऊन त्यांच्याकडून विरुद्ध अभिप्राय लिहून घेतला, व त्या वेळचे (१७८७) गव्हर्नर सर आर्चिबाल्ड कँबेल यांचा गैरसमज केला, असा पुरावा त्याच पंडितांकडून गोळा केला; आणि लॉर्ड कॉर्नवालिस यांस या प्रकरणाची योग्य चवकशी करून सरफोजीस तंजावरच्या गादीचा मालक ठरवावें अशी विनंति केली. याच वेळीं तंजावरचा राजे अमरसिंह यांजकडील खंडणीची बाकी थकली व राज्यकारभारामध्यें पुष्कळ अव्यवस्था झाली, असा बोभाटा मद्राससरकारचे कानावर गेला. त्यामुळें त्याजविषयीं त्यांचा प्रतिकूल ग्रह झाला. अशा परिस्थितींत अमरसिंह राजास लवकरच तंजावरच्या गादीस विन्मुख होण्याचा प्रसंग यावा, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. मि० स्वार्त्झ यांच्या पत्रव्यवहाराचा वरिष्ठ सरकारावर तत्काल परिणाम होऊन त्यांनीं या प्रकरणाची चांगली चवकशी केली; आणि सरफोजीच्या दत्तविधानाच्या शास्त्रार्थाबद्दल काशींतील व बंगाल्यांतील विद्वान् पंडितांचे अभिप्राय मागवून आपली शहानिशा करून घेतली. त्यांनीं बंगाल्यांतील त्या वेळचे सुप्रसिद्ध संस्कृत पंडित सर उइल्यम जोन्स यांची या कामीं मदत घेऊन सर्व शास्त्रार्थाचें भाषांतर करविलें, आणि या प्रकरणाचा यथायोग्य विचार करून तारीख ३० दिसेंबर १७९६ रोजीं आपला स्वतंत्र ठराव (minute) प्रसिद्ध केला. या ठरावामध्यें सरफोजीचें दत्तविधान सशास्त्र ठरवून अमरसिंह राजे हे तंजावरच्या गादीस लायख नाहींत, असें हिंदुस्थानचे गव्हर्नर-जनरल सर जॉन शोअर यांनीं आपलें मत दिलें.

मद्रासचे गव्हरनर लॉर्ड होबर्ट यांनीं वरिष्ठ सरकारच्या ह्मणण्यास पुष्टि देऊन, हें प्रकरण कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स यांच्या मंजुरीसाठीं विलायतेस पाठविलें. कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स यांनीं इ. स. १७९८ मध्यें या वादग्रस्त व

महत्त्वाच्या प्रश्नाचा सरफोजीच्या वतीनें निकाल करून, अमरसिंह राजे यांस तंजावरचे गादीवरून दूर करावें व त्यांच्या जागीं सरफोजीची स्थापना करावी असें फर्माविलें. त्याप्रमाणें मद्राससरकारनें अमरसिंह राजांस पदच्युत करून, त्यांस तंजावरापासून २९ मैलांवर मध्यार्जुन ह्मणून एक ठिकाण आहे, तेथें नेऊन ठेविलें, आणि कोणत्याही प्रकारें तंजावर येथें दंगाधोपा न होऊं देतां तंजावर येथील मराठ्यांचे गादीवर सरफोजीची स्थापना केली.

पदच्युत झालेले अमरसिंह राजे हे मध्यार्जुन येथें दरसाल पाऊण लाख रुपये नेमणूक घेऊन पुढें बरींच वर्षें राहिले होते. ते इ. स. १८०२ मध्यें मृत्यु पावले. त्यांस प्रतापसिंह या नांवाचा एक मुलगा होता. तो इ. स. १८४९ मध्यें मेला. त्यास औरस संतती नसल्यामुळें त्यानें एकोजी नांवाचा एक पुत्र दत्तक घेतला. त्यास ब्रिटिशसरकाराकडून दरमहा एक हजार रुपयांची नेमणूक मिळत असे. तो इ. स. १८८३ पर्यंत विद्यमान होता.

अमरसिंह राजे यांच्या कारकीर्दीचें गुणावगुणवर्णन करण्याचें काम फार नाजूक व कठिण आहे. अमरसिंह राजे यांच्याबद्दल तंजावर व मध्यार्जुन येथें अद्यापपर्यंत जो लौकिक ऐकूं येतो, त्यावरून ते मोठे सात्विक, दयार्द्र बुद्धीचे आणि उदार असे राजे होते, असें दिसून येतें. परंतु रे० स्वार्ट्झ व इतर इंग्रज लेखक यांनीं त्यांच्या विरुद्ध ज्या कागाळ्या लिहिल्या आहेत, त्यांवरून ते अतिशय जुलमी, क्रूर व राज्यकारभार करण्यास अयोग्य असे होते, असें मानणें भाग पडतें. यांच्या कारकीर्दीची समग्र व साधार हकीकत देणारे अस्सल कागदपत्र उपलब्ध झाल्यावांचून ह्याचा योग्य निर्णय होणार नाहीं.*

---

* तंजावरचे इतिहासकार दिवाण बहादूर टी. व्यंकास्वामी राव यांनींही याबद्दल असाच संदिग्ध अभिप्राय दिला आहे. तो येणेंप्रमाणें:—

"The conduct of Amarsing towards his young nephew, as described by some of the English annalists, is wholly inconsistent with the character which local tradition awards to him as a mild, humane and generous King. Being however a weak-minded man, governed by favourites, he probably became the unconscious tool of domestic jealousies, nor is it impossible that his affections were estranged from his nephew by the ill-advised and offensive conduct of the faction which was formed in behalf of the young prince. Whatever the real cause and motive of Amarsing's conduct towards his young nephew may have been, there seems to be little doubt that it was "very suspicious" and Mr. Schwartz, it is said, even thought that, Carabhoji's life was in danger."

—*The Manual of Tanjore District, Page 819.*

# भाग अकरावा.

## सरफोजी राजे यांची कारकीर्द.

( इ. स. १७९८ पासून इ. स. १८३२ पर्यंत. )

सरफोजी राजे यांची संस्थापना तंजावरच्या गादीवर इ. स. १७९८ मध्यें झाली. त्यांस गादीवर बसवितेवेळीं ब्रिटिशसरकारानें त्यांजकडून, १७९२ च्या तहांतील सर्व कलमें पूर्णपणें पाळीन, आणि उभय पक्षांच्या हितासाठीं व सन्मानासाठीं कांहीं नवीन व्यवस्था करणें झाल्यास त्यास मान्यता देईन, असें कबूल करून घेतलें होतें. त्याप्रमाणें सरफोजी गादीवर बसल्यानंतर लवकरच तंजावरच्या राज्यव्यवस्थेंत फेरफार करण्याचा प्रसंग आला. अमरसिंह राजे यांचे कारकीर्दींत तंजावरच्या राज्यव्यवस्थेंत अतिशय अंदाधुंदी व घोटाळे असल्याचा बोभाटा त्याच्या प्रतिपक्षानें विशेष केल्यामुळें तंजावरच्या राज्यव्यवस्थेची चौकशी करण्यासाठीं ब्रिटिशसरकारानें एक कमिशन नेमिलें, आणि एकंदर राज्याची खरी स्थिति काय आहे त्याची इत्थंभूत चौकशी केली. ह्या कमिशननें तंजावरच्या मुलकी राज्यव्यवस्थेवर भरपूर माहिती देऊन, एक विस्तृत रिपोर्ट ता० ३१ जानेवारी इ. स. १७९९ रोजीं मद्राससरकारास सादर केला. त्यामध्यें पूर्वींच्या राज्यव्यवस्थेंतील शिथिलता, लांचलुचपत आणि अंदाधुंदी वगैरे दोष दाखविले होते; परंतु मराठ्यांच्या कारकीर्दींतील प्रजेची स्थिति अतिशय निकृष्ट व जुलमानें त्रस्त झालेली अशी नव्हती, असें स्पष्टपणें नमूद केलें आहे.* तथापि ब्रिटिशसरकारानें, तंजावरच्या राज्याची उत्तम व्यवस्था होऊन तेथें न्यायाचें काम चांगलें चालावें आणि कंपनीची खंडणी नियमितपणानें वसूल व्हावी, ह्मणून सरफोजी राजे यांच्या बरोबर ता० २५ आक्टोबर १७९९ रोजीं पंधरा कलमांचा नवीन तहनामा ठरावांत आणिला. या तहानें, तंजावर संस्थान हें पूर्णपणें ब्रिटिश अमलाखालीं जाऊन, तेथील राजानें फक्त साडेतीन लाख रुपये दरसाल नेमणूक घेऊन तंजावरच्या किल्ल्यामध्यें स्वस्थ रहावें, आणि ब्रिटिशसरकारानें सर्व प्रांताचें संरक्षण करून राज्यकारभार त्याच्या नांवानें चालवावा व राजाचा मानमरातब व इभ्रत कमी होऊं देऊं नये, असें ठरलें. त्यामुळें इ. स. १७९९ मध्यें तंजावर येथील मराठी राजसत्तेचें स्वातंत्र्य संपुष्टांत आलें, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

* तंजावरच्या कमिशनचा इ. स. १७९८ चा रिपोर्ट पहा. हा रिपोर्ट मद्रास रेव्हिन्यू बोर्डच्या ऑफिसमध्यें आहे.

सरफोजी राजे यांची कारकीर्द इ. स. १७९८ पासून इ. स० १८३२ पर्यंत सुमारें चौतीस वर्षांची झाली. या अवधीमध्यें कर्नाटकांतील कंपनीसरकारचे सर्व शत्रू विलय पावून सर्वत्र शांतता झाल्यामुळें राजकारणाचे किंवा युद्धाचे प्रसंग मुळींच आले नाहींत. त्यामुळें सरफोजी राजांस शांतपणानें आपल्या ताब्यांत असलेल्या थोड्याशा मुलखाची व्यवस्था करण्यापलीकडे आणि आपल्या घराण्याचा मानमरातब व इभ्रत राखण्यापलीकडे बिकट राजकारणें खेळवायाचे प्रसंग मुळींच राहिले नाहींत. त्यामुळें त्यांस आपली सर्व कारकीर्द विद्याव्यासंगांत व लोककल्याणांत घालविण्यास चांगली संधी मिळाली, व तिचा त्यांनीं चांगला उपयोग केला, असें त्यांच्या चरित्रावरून दिसून येतें. राजकीय दृष्टीनें पाहिलें असतां, त्यांनीं ब्रिटिश सरकाराशीं प्रेमभावानें वागून, त्यांच्याकडून 'His Excellency' या किताबाऐवजीं 'His Highness' हा अधिक बहुमानाचा किताब, जो त्या वेळीं पेशवे, शिंदे, होळकर, गायकवाड व नागपुरकर भोंसले यांना देत असत, तो आपणास प्राप्त करून घेतला; आणि एकवीस तोफांच्या सलामीचा मानही मिळविला. सरफोजी राजांबद्दल त्या वेळचे रेसिडेंट कॅप्टन् ब्लॅकबर्न वगैरेंनीं फार चांगलें मत दिलें असून, त्यांच्याविषयीं ब्रिटिशसरकारची फार आदरबुद्धि असल्याचें दिसून येतें.

सरफोजी राजे हे गादीवर आले, त्या वेळीं त्यांचें वय अवघें एकवीस वर्षांचें होतें. परंतु त्यांचें बालपण मिशनरी स्वार्त्झ व जेरिक वगैरे विद्वान् युरोपियन लोकांच्या सहवासांत गेल्यामुळें, त्यांना त्यांच्या संसर्गानें पाश्चात्य विद्येचा चांगला संस्कार झाला. रे० स्वार्त्झ यांनीं सरफोजी राजांच्या शिक्षणाबद्दल बरीच काळजी घेतल्यामुळें, त्यांना इंग्रजी भाषा, इतिहास, भूगोल, गणित, इत्यादि विषय चांगले अवगत होऊन, त्यांच्या ठिकाणीं सुशीलता व विद्याचारसंपन्नता हे गुण उत्पन्न झाले. त्यामुळें तंजावरच्या लोकांस त्यांच्याविषयीं आदरबुद्धि व प्रेमभाव वाटूं लागून, ते तंजावरच्या राजमालिकेंतील एक अतिशय लोकप्रिय, रसिक आणि कीर्तिशाली असे राजपुरुष निर्माण झाले. सरफोजी राजे व त्यांचे हितचिंतक गुरु रे० स्वार्त्झ यांचा संबंध, पूर्वकालीन गुरुशिष्यसंबंधाप्रमाणें असून, तो एक तंजावरच्या इतिहासांतील एक महत्त्वाचा भाग होऊन राहिला आहे. रे० स्वार्त्झ हे एक सन्मान्य मिशनरी असून, त्यांची दानत, त्यांची विद्वत्ता, त्यांची परोपकारबुद्धि, आणि त्यांची सत्यप्रीति इत्यादि गुण फार प्रशंसनीय असल्यामुळें, त्यांचें वजन व योग्यता त्या वेळीं कंपनीसरकारांत आणि एतद्देशीय लोकांत फारच अधिक होती. तुळाजी राजे यांनीं आपल्या मृत्यु-

समयीं सरफोजी राजास त्यांच्या स्वाधीन करून, त्यांचे पुत्रवत् पालग्रहण करावें अशी इच्छा दर्शविली होती, हें मागें सांगितलेंच आहे. ह्यावरून रे० स्वार्त्झ यांच्याबद्दल तुळाजी राजे यांची किती पूज्यबुद्धि होती हें चांगलें दिसून येतें. अशा प्रकारच्या विद्वान् न सन्मान्य पुरुषाचा सरफोजी राजांस प्रत्यक्ष समागम घडल्यामुळें तो त्यास हितकारक व्हावा यांत आश्चर्य तें काय ?

सरफोजी राजे व मि. स्वार्त्झ यांच्या मधील स्नेहभाव व वात्सल्यप्रेम हा तंजावरच्या इतिहासांतील एक चिरस्मरणीय व वर्णनीय विषय होऊन राहिला आहे. त्या संबंधानें प्रस्तुत स्थलीं अधिक माहिती देणें शक्य नाहीं. तथापि सरफोजी राजे यांची मि. स्वार्त्झविषयीं किती भक्ति आणि पूज्यबुद्धि होती, हें दाखविण्यासाठीं येथें एका गोष्टीचा उल्लेख करणें अवश्य आहे.* मि. स्वार्त्झ हे सरफोजी राजे तंजावरच्या गादीवर बसण्यापूर्वींच मृत्यु पावले व त्यांना आपल्या सच्छिष्याचा राज्यारोहणसमारंभ स्वनेत्रांनीं अवलोकन करण्याचा प्रसंग आला नाहीं. तथापि सरफोजी राजे यांनीं आपल्या गुरूंची मृत्युपूर्वीं भेट घेऊन त्यांच्या स्मशानविधीस ते स्वतः हजर राहिले होते. एवढेंच नव्हे तर, त्यांनीं आपल्या पूज्य गुरूंच्या प्रेतावर भरजरीची चादर घालून व दुःखाश्रूंची मौक्तिकमाला अर्पण करून आपली लोकोत्तर भक्ति व्यक्त केली होती. सरफोजी राजे यांनीं तंजावर येथें मि. स्वार्त्झ यांचें एक स्मारक बांधिलें असून, तेथें त्यांच्या मरणकालचा देखावा दाखविणारा संगमरवरी पुतळा उभारला आहे. त्यांत सरफोजी राजे आपल्या गुरूचा शेवटचा उपदेश ग्रहण करीत आहेत असें चित्र काढिलें आहे. या पुतळ्याखालीं सरफोजी राजे यांनीं मि. स्वार्त्झ यांच्या गुणानुवादनपर पुढील इंग्रजी कविता लिहिली आहेः—

" Firm wast thou, humble and wise,
Honest, pure, free from disguise,

---

* सरफोजी राजे यांस मि. स्वार्त्झ यांच्याबद्दल किती प्रेम होतें हें पुढील हृदयद्रावक हकिकतीवरून लक्षांत येईल.

" His ( Swartz's ) remains were committed to the earth on the 14th of February, about five in the afternoon, in the chapel out of the fort, erected by him near his habitation, in the garden given to him by the late Tuljah Maha Rajah.

His funeral was a most awful and very affecting sight. It was delayed a little beyoud the appointed time, as Serfojee Rajah wished once more to look at him. The affliction which he suffered at the loss of the best of his friends was very affecting. He shed a flood of tears over his body, and covered it with a gold cloth."

Father of orphans, the widow's support,
Comfort in sorrow of every sort,
To the benighted dispenser of light,
Doing, and pointing to, that which is right,
Blessing to princes, to people, to me;
May I, my father, be worthy of thee!
Wisheth and prayeth thy Sarabojee."

असो. सरफोजी राजे यांस वर सांगितल्याप्रमाणें मि० स्वार्त्झ व दुसरे विद्वान् मिशनरी लोक यांच्या संसर्गानें पाश्चात्य विद्येचा लाभ झाल्यामुळें त्यांचें मन सुसंस्कृत होऊन त्यांस विद्येचें महत्त्व चांगलें कळूं लागलें होतें. त्यामुळें त्यांना आपल्या राज्यांत विद्याप्रसार करण्याची इच्छा उत्पन्न होऊन, त्यांनीं आपली सर्व कारकीर्द, विद्याप्रसार, ग्रंथसंग्रह, आणि विद्वत्समागम यांमध्यें घालविली, असें ह्मटलें तरी चालेल. त्यांनीं तंजावर येथें मोठमोठे विद्वान् पंडित जमवून व त्यांना उत्तेजन देऊन, त्यांच्याकडून कित्येक संस्कृत ग्रंथ व काव्यें व नाटकें तयार करविलीं. तंजावर येथील बृहदीश्वराच्या देवालयामध्यें प्राचीन चोलराजांनीं लिहिलेल्या शिलालेखाप्रमाणें सरफोजी राजे यांनीं आपल्या राजघराण्याचा संपूर्ण इतिहास मराठी शिलालेखामध्यें कोरून तयार केला आहे. तंजावरच्या राजवाड्यांत एक सरस्वती-मंदिर निर्माण करून, तेथें अनेक विषयांवरील प्राचीन ग्रंथ, ताम्रपत्रें, ताडपत्रें, भूर्जपत्रें इत्यादि जमवून, प्रत्यक्ष विद्यादेवीस तेथें सदैव विहार करावयास लाविलें होतें. सरफोजी राजांचा तंजावर येथील ग्रंथसंग्रह पाहून पाश्चात्य विद्वान् थक्क होऊन गेले. डा० बर्नेलसारख्या जर्मन पंडितांनीं वर्षेंच्या वर्षें खर्च करून त्या ग्रंथांच्या नामावली तयार केल्या आहेत. असा अपूर्व ग्रंथसंग्रह करणाराची विद्याभिरुचि अवर्णनीय असली पाहिजे, हें उघड आहे.

सरफोजी राजे यांस नुसता ग्रंथसंग्रहाचा व संस्कृत सारस्वताचाच नाद होता असें नाहीं. त्यांस शिल्पशास्त्र व संगीतशास्त्र ह्यांचीही चांगली अभिरुचि होती. त्यांच्या राजवाड्यांत अनेक प्रख्यात शिल्पकारांनीं तयार केलेले पुतळे व दुसऱ्या कलाकौशल्याच्या वस्तू ह्यांचा संग्रह फार वर्णनीय होता. त्याच-प्रमाणें त्यांस वैद्यशास्त्र, ज्योतिषशास्त्र इत्यादिकांची चांगली गोडी असून, त्यावरील ग्रंथ त्यांनीं आपल्या संग्रहीं ठेविले असून त्यांचें चांगलें परिशीलन केलें होतें. अशा रीतीनें सरफोजी राजे यांस अनेक विषयांचें उत्कृष्ट ज्ञान प्राप्त झाल्या-मुळें त्यांच्या ठिकाणीं बहुश्रुतता व गुणग्राहकता हे गुण चांगल्या तऱ्हेनें वास करीत होते. अर्थात् अशा विद्यासंस्कारामुळें त्यांच्या बुद्धीचा पूर्ण विकास

# ४ श्रीरंगपट्टण.

श्रीरंगपट्टण हें इतिहासप्रसिद्ध नगर ह्मैसुरापासून नऊ मैलांवर कावेरी नदीचे कांठीं आहे. कावेरी नदीच्या दोन शाखा होऊन निसर्गतःच जें एक लहानसें बेट बनलें आहे, तेंच हें श्रीरंगपट्टण होय. या बेटाची पूर्व–पश्चिम लांबी सुमारें तीन मैल असून रुंदी एक मैल आहे. या बेटाच्या पूर्वेस टिपूच्या वेळचें शहर होतें, त्यास 'गंजम पेठ' असें ह्मणतात. एक शतकापूर्वीं श्रीरंगपट्टण येथें राजलक्ष्मी पूर्णपणें नांदत असल्यामुळें, तें अत्यंत गजबजलेलें व वैभवसंपन्न असें नगर होतें. या नगराची मुख्य पेठ किंवा बाजार तीच ही 'गंजम पेठ' होय. इ. स. १७९९ मधील राज्यक्रांतीनें या नगराचें सर्व वैभव नष्ट होऊन, सांप्रत तें एक वैभवशून्य व निर्जन असें लहानसें तालुक्याचें ठिकाण होऊन राहिलें आहे. तथापि ह्या शहरानें व येथील बळकट किल्ल्यानें इतिहासांत आपलें नांव अजरामर केल्यामुळें त्याचें महत्त्व कधींही नष्ट होणार नाहीं.

श्रीरंगपट्टण हें फार प्राचीन स्थल असून, पुराणांतरीं गौतम ऋषीनें येथील रंगनाथ स्वामीच्या देवालयामध्यें येऊन देवाची आराधना केली होती, असें ह्मणतात. ह्या ठिकाणीं श्रीरंगाचें फार प्राचीन देवालय आहे. त्यावरून त्यास 'पश्चिम रंगनाथक्षेत्र' असें नांव पडलें आहे. त्रिचनापल्लीजवळ जें श्रीरंगाचें प्रसिद्ध स्थान आहे, त्यास 'पूर्व रंगनाथक्षेत्र' असें ह्मणतात. येथें कावेरीच्या दोन शाखा निर्माण झाल्या आहेत. त्या स्थलास अद्यापि देखील 'गौतम क्षेत्र' असें नांव आहे.

इ. स. ८९४ मध्यें ह्या प्रांतावर गंग राजांचा अंमल असतांना, कोणीं तिरुमल अय्या नामक एका महात्म्यानें ह्या बेटामध्यें झाडी वगैरे तोडवून दोन देवालयें बांधलीं. एकाचें नांव रंगनाथ व एकाचें नांव तिरुमल देव असें ठेविलें. तेव्हांपासून ह्या स्थलास 'श्रीरंगपूर' किंवा 'श्रीरंगपट्टण' असें नामाभिधान प्राप्त झालें. इ. स. १११७ मध्यें वैष्णवपंथाचे मुख्य संस्थापक रामानुजाचार्य हे, शैवमतानुवादी चोल राजाच्या जुलमास कंटाळून, द्रविड देशांतून येथें पळून आले, व त्यांनीं ह्या स्थलाचा आश्रय केला. येथें येऊन त्यांनीं होयसाल कुलांतील जैनपंथी राजा बिट्टी देव ह्यास आपल्या वैष्णव धर्माची दीक्षा देऊन, त्यास

विष्णुभक्त करून सोडिलें. त्या राजानें जैनधर्माचा त्याग करून वैष्णवधर्म स्वीकारला, आणि आपणास 'विष्णुवर्धन' असें नांव धारण केलें. ह्याची रामानुजाचार्यांच्या ठिकाणीं परम भक्ति बसून, त्यानें त्यांस श्रीरंगपट्टण येथें कावेरीच्या दोन्हीं बाजूंचे आठ गांव इनाम करून दिले. ह्यांस 'अष्टग्राम' अशी संज्ञा अद्यापि आहे. ह्या ग्रामांची व्यवस्था करण्याकरितां त्यानें 'प्रभू' अथवा 'हेबार,' ह्या नांवाचे अधिकारी नेमले. रामानुजाच्या पश्चात् हेच अधिकारी प्रबल होऊन ते स्वतंत्र व स्वसत्ताधारी झाले.

पंधराव्या शतकामध्यें ह्या हेबार अधिकाऱ्यांचा एक तिमण्णा नांवाचा वंशज महाप्रबल असा निर्माण झाला. तो नागमंगलाचा अधिपति असून, विजयनगरच्या सार्वभौम दरबारांत त्याचें चांगलें वजन होतें. त्यानें इ. स. १४५४ मध्यें विजयनगरास जाऊन, या प्रांताचें आधिपत्य संपादन केलें, आणि 'नायक' अशी पदवी मिळवून श्रीरंगपट्टण येथें एक तटबंदी किल्ला बांधण्याची परवानगी घेतली. ह्या राजानें कळसवाडी येथील १०१ जैन देवालयें पाडून श्रीरंगपट्टण येथील श्रीरंगाचें देवालय वाढविलें. त्यास जें भूमिगत द्रव्य सांपडलें, त्याचा विनियोग त्यानें श्रीरंगपट्टणाचा किल्ला बांधण्यांत केला. इ. स. १४९५ पर्यंत श्रीरंगपट्टण येथें त्यानें व त्याच्या वंशजांनीं राज्य केलें. पुढें श्रीरंगपट्टणचें राज्य विजयनगरच्या प्रत्यक्ष राजसत्तेखालीं गेलें. शिलालेखावरून असें दिसतें कीं, ह्या वेळीं विजयनगरच्या दुसऱ्या वंशाचा संस्थापक राजा नरसिंह ह्यानें, कावेरीस महापूर आला असतां तिला पूल बांधून व ती ओलांडून शत्रूचा पराभव केला, व शत्रूस हस्तगत करून श्रीरंगपट्टण ह्या प्राचीन स्थलावर आपली राजसत्ता संस्थापित केली. येथें पुढें विजयनगरच्या राजाचा प्रतिनिधि येऊन तो राज्यकारभार चालवीत असे. त्याचें नांव 'श्रीरंग रायलू' असें होतें. श्रीरंग रायलू ह्या शब्दावरून श्रीरंगाचा राजा असा अर्थ व्यक्त होतो. कर्नाटकी भाषेंत 'राव'='राय' ह्या शब्दा ऐवजीं 'रायलू' असें ह्मणतात. श्रीरंग रायलू व त्याचे वंशज ह्यांनीं श्रीरंगपट्टण येथें सुमारें एक शतकपर्यंत विजयनगरच्या सार्वभौमत्वाखालीं आपली राजसत्ता चालविली.

इसवी सनाच्या सतराव्या शतकाच्या प्रारंभीं विजयनगरची साम्राज्यसत्ता समूळ नष्ट होऊन, ह्मैसूर प्रांतामध्यें राज वाडेयार ह्या पुरुषानें आपलें वर्चस्व संस्थापित केलें. त्याच्या प्राबल्यापुढें आपला निभाव लागणार नाहीं असें पाहून, श्रीरंगपट्टणचा शेवटचा रायलू तिरमलराज ह्यानें आपल्या वार्धक्यास कंटाळून

श्रीरंगपट्टणची सर्व राजसत्ता इ. स. १६१० मध्यें राज वाडेयार ह्याच्या स्वाधीन केली. तेव्हांपासून श्रीरंगपट्टण हें ह्मैसूरच्या राजांच्या राजधानीचें मुख्य ठिकाण होऊन, दीडशें वर्षेपर्यंत तेथें राजलक्ष्मी स्वतंत्रपणें नांदत होती.

तदनंतर ह्मणजे इ. स. १७६१ च्या सुमारास, ह्मैसूरच्या हिंदु राजांचें स्वातंत्र्य नष्ट होऊन, हैदर व त्याचा पुत्र टिपू ह्या दोन मुसलमान भाग्यशाली पुरुषांनीं ह्मैसूरच्या राजलक्ष्मीचा ४० वर्षें उपभोग घेतला. हैदरानें आपली राजधानी ह्मैसूर व श्रीरंगपट्टण ह्या दोनी ठिकाणीं ठेविली होती. परंतु टिपूनें श्रीरंगपट्टण हेंच आपल्या राजधानीचें शहर केलें होतें. टिपूचा मुख्य राजवाडा श्रीरंगपट्टण येथेंच असून तेथें त्याचा दरबार भरत असे. त्यामुळें परक्या राष्ट्रांचें वकील श्रीरंगपट्टण येथेंच राहत असून, त्यास मोठें महत्त्व प्राप्त झालें होतें. श्रीरंगपट्टण येथें टिपूच्या कारकीर्दींत मराठ्यांचे वकील महिपतराव कृष्ण हे होते. टिपूनें गर्वांध व मदोन्मत्त होऊन ह्मैसूरच्या मूळच्या हिंदुराजांचा छल केला व हिंदुलोकांस फार ताप दिला; आणि फ्रेंच वगैरे परराष्ट्रीय लोकांशीं राजकारस्थानें करून इंग्रजांशीं वैर आरंभिलें. त्यामुळें इंग्रजांचें व टिपूचें युद्ध सुरू होऊन, श्रीरंगपट्टण येथें मोठ्या निकराच्या लढाया झाल्या. इंग्रज सेनापती जनरल हॅरिस, जनरल वेलस्ली व जनरल बेअर्ड ह्यांनीं श्रीरंगपट्टणास वेढा देऊन टिपूच्या सैन्याची अगदी वाताहत केली, आणि श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यावर तोफांचे मारे करून आंत जाण्यासाठीं एक बुरुजाजवळ रस्ता केला. तेथून जनरल बेअर्ड हे मोठ्या वीर्यस्फूर्तीनें चढून गेले व त्यांनीं श्रीरंगपट्टण येथें विजयध्वज रोविला. येणेंप्रमाणें इ. स. १७९९ मध्यें ब्रिटिश सरकारानें श्रीरंगपट्टणावर स्वारी करून टिपूची सत्ता रसातळास पाठविली, आणि ह्मैसूरच्या गादीवर जुन्या हिंदु राजघराण्यांतील एका पुरुषास संस्थापित केलें. याच्या वंशजाकडेच सांप्रत ह्मैसूर संस्थान चालत असून श्रीरंगपट्टण हें त्यांच्याच ताब्यांत आहे.

श्रीरंगपट्टण हें निसर्गतः शत्रूस अजिंक्य असें ठिकाण असल्यामुळें व येथील किल्ला प्राचीन कालापासून दुर्भेद्य करण्याबद्दल येथील राजपुरुषांनीं अतोनात द्रव्य खर्च केल्यामुळें, ह्या शहराचें महत्त्व प्राचीन कालापासून वाढत आलें होतें. ह्या ठिकाणावर अनेक वेळां परशत्रूंनीं हल्ले केले होते. परंतु त्या सर्व हल्ल्यांस दाद न देतां, श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यानें आपलें महत्त्व व प्राबल्य रक्षण केलें होतें. आणि त्या प्रत्येक हल्ल्यामध्यें शत्रूंच्या तोफांचे व बंदुकांचे प्रखर वर्षाव सहन करून या किल्ल्यास एक प्रकारचें अजिंक्यत्व प्राप्त झालें होतें. अनेक आघात सोसून मनुष्य जसा निर्ढावून जातो, त्याप्रमाणें हा किल्ला अनेक मारे सहन करून

अगदीं दुर्गम व दुर्भेद्य झाला होता. त्यामुळें त्याचें ऐतिहासिक महत्त्व लष्करी लोक अद्यापि मान्य करितात.*



## ५. टिपूचे बंदीखाने.

श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यामध्यें, इतिहासदृष्ट्या महत्त्वाचीं परंतु एकसमयावच्छेदेंकरून मनांत दुःखोद्वेग व खिन्नता उत्पन्न करणारीं जीं स्थळें आहेत, त्यांमध्यें टिपूनें इंग्रज कैद्याकरितां तयार केलेले बंदीखाने हे प्रमुख होत. टिपूच्या कारकीर्दींतील त्याच्या अमानुष व दुष्ट कृत्यांचें विस्मरण व्हावें ह्मणून कालानें ह्या बंदीखान्यांवर मातीची भर घालून, त्यांचा मागमूसही नाहींसा करण्याचा प्रयत्न केला. परंतु सत्य इतिहास –मग तो सत्कृतींनीं भरलेला असो किंवा दुष्कृतींनीं परिपूर्ण असो– तो कालास भिऊन कधींतरी लपून राहील काय? तो नेहमीं मनुष्याचा अहंकार व गर्व परिहार करण्याकरितां व त्यास सद्बोध देण्याकरितां, जुन्या कागदांच्या फाटक्या चिटोऱ्यांतून, मातीच्या ढिगांतून,

* श्रीरंगपट्टणच्या किल्ल्याचें ऐतिहासिक महत्त्व युद्धकलाविशारद इंग्रज लोक मोठ्या कौतुकानें मान्य करितात, एवढेंच नव्हे तर ज्या इंग्रज सेनापतीनें बादशाहा नेपोलियन यास रसातळास पाठविलें, त्याच्या शौर्याच्या प्रारंभाचें मुख्य ठिकाण श्रीरंगपट्टण हें आहे असें मानून, ह्या स्थळास ते विशेष मान देतात. सुप्रसिद्ध इतिहासकार कर्नल म्यालेसन ह्यानें एके ठिकाणीं ह्मटलें आहे:—

"True, though it doubtless is, as M. Viollet-Le-Duc has shown to the world, that "Vaubari's fortresses have had their day," the great results they have accomplished in their time will not the less continue to be regarded with reverence and admiration by the descendents of those, who defended or stormed them. Especially will this be the case, when, as with Seringapatam, the breach has remained unrepaired, the position of the besieging army can still easily be traced, and the traveller, viewing the difficulties so daringly conquered, can understand, as by a touch of the Magician's wand, how it was that the great soldier, who made his first successful debut as a stormer at the head of the supports a Seringapatam, was able subsequenty to make of the materials similar to those he then commanded, an army which beat the soldiers of Napolean, and of which he could proudly affirm that with it "he could go anywhere and do everything." If that result was the goal of the great military career of the Duke of Wellington, the real starting point was Seringapatam."

—*Seringpatam by Col. Malleson.*

पडक्या इमारतींतून, विनाश पावलेल्या राजवाड्यांच्या निर्जन व भीतिप्रद तळघरांतून, आपला शांत व विकारशून्य चेहरा व्यक्त केल्यावांचून राहत नाहीं. ह्याचा प्रत्यक्ष अनुभव प्रेक्षकास श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यांत चांगला येतो. टिपू समरांगणांत पतन पावून शंभर वर्षें लोटलीं, व त्याच्या बऱ्या वाईट कृती कालाच्या आभरणाखालीं बुजून गेल्या, तथापि श्रीरंगपट्टणचा पुरातन किल्ला व तेथील जुनीं ऐतिहासिक स्थळें पाहिलीं ह्मणजे इतिहास पुनः सजीव होऊन प्रेक्षकांच्या पुढें मूर्तिमंत उभा राहतो, व दिग्विजयी हैदर व गर्विष्ठ टिपू ह्यांच्या चरित्रकथा सांगूं लागतो. ह्या सर्व स्थलांमध्यें मनुष्याच्या हृदयास दयेचे पाझर फोडणारें आणि त्याच्या मनांत अनुकंपा उत्पन्न करणारें मुख्य स्थळ म्हटलें ह्मणजे टिपूचे बंदीखाने होत.

हे बंदीखाने किल्ल्यामध्यें पुष्कळ होते. परंतु त्यापैकीं कांहीं बुजून गेले आहेत. तथापि, किल्ल्याच्या उत्तरेकडील भागांत त्यापैकीं कांहीं अद्यापिही दृष्टीस पडतात, व कांहीं वायव्येच्या कोंपऱ्यांत अस्तित्वांत आहेत. हे किल्ल्याच्या तटबंदीच्या मध्यभागीं पक्क्या दगडांनीं चुन्यांत बांधले असून, त्यामध्यें लढाईंत जिंकून आणिलेल्या इंग्रज कैद्यांची योजना केलेली होती. इ. स. १७८० पासून इ. स. १७८४ पर्यंत इंग्रजांच्या व हैदर टिपू ह्यांच्या ज्या लढाया झाल्या, त्यांमध्यें इंग्रजांचा पराभव झाला व पुष्कळ नामांकित सेनापतींस शत्रूच्या हस्तगत व्हावें लागलें. ता. १० सपटंबर इ. स. १७८० रोजीं टिपूनें कांजीवरम् येथें कर्नल बेलीच्या सैन्याची वाताहत करून त्यास कैद केलें. ता. १८ फेब्रुवारी इ. स. १७८२ रोजीं तंजावरजवळ कर्नल ब्रेथवेट ह्याच्या सैन्याची तीच अवस्था झाली; व ता. ३० एप्रिल इ. स. १७८२ मध्यें जनरल मॅथ्यूज ह्यांस बेदनूर येथें शत्रूच्या हस्तगत व्हावें लागलें. अर्थात् ह्या मुख्य तीन लढायांमध्यें तीन मोठे ब्रिटिश सेनापती व त्यांच्या हाताखालचे दुसरे अंमलदार शत्रूच्या स्वाधीन झाल्यामुळें श्रीरंगपट्टणच्या किल्ल्यांतील बंदीखान्यांत कैद्यांची गर्दी होऊन गेली. कर्नल बेली बरोबर कॅप्टन बेअर्ड ह्यास कैद करण्यांत आलें होतें. त्यानें तीन वर्षेंपर्यंत या कैदखान्यामध्यें कालक्रमण केलें. तटबंदीजवळील बंदीखान्यामध्यें ह्याची योजना न करितां दुसऱ्या एका घरामध्यें त्यास ठेविलें होतें; आणि कांहीं दिवसपर्यंत बंगलोरच्या किल्ल्यांतील अंधारकोठडीही त्याच्या नशीबीं आली होती. कर्नल बेलीच्या सैन्यांतील अंमलदारानें आपल्या बंदिवासाचें हृदयद्रावक वर्णन लिहिलें आहे. त्यांत त्यानें इंग्रज कैद्यांच्या दिनचर्येच्या पुष्कळ गोष्टी दिल्या आहेत. त्यावरून टिपूनें इंग्रज कैद्यांना किती

निर्दयपणानें वागविलें, तें दिसून येतें. ह्या सर्व कैद्यांना मोठमोठ्या लोखंडी बेड्या घातल्या होत्या, व त्यांना लोखंडी साखळ्यांनीं अंधारकोठडीमध्यें बांधून ठेविलें होतें. त्यांना व्यायाम व मोकळी हवा मुळींच मिळत नसे. फक्त खाण्यापुरतें थोडेसें अन्न मात्र मिळत असे. त्यांची निंदा व निर्भर्त्सना पदोपदीं होत असे. ह्या युरोपिअन कैद्यांमध्यें जीं तरुण मुलें होतीं, त्यांची सुंता करून, टिपूनें त्यांना मुसलमानी वेश दिले होते व त्यांना गाणें बजावणें शिकविलें होतें. त्यांना हें स्थित्यंतर इष्ट न वाटून, तीं ह्या स्थितींतून मुक्त होण्याकरितां अतिशय उत्सुक झालीं होतीं. टिपूनें ह्या इंग्रज कैद्यांचे जे अनन्वित हाल केले, ते वर्णन करण्यास लेखणी चालत नाहीं. त्यांचीं वर्णनें इंग्रजी ग्रंथांत नमूद आहेत. त्याच्या क्रूरपणाच्या व अमानुष वर्तनाच्या योगानें त्रस्त होऊन कर्नल बेली वगैरे कित्येक लोक मरून गेले. जनरल मॅथ्यूज ह्यांस त्यानें विष घालून मारून टाकिलें. आणि कित्येकांच्या त्यानें जबरदस्तीनें सुंता केल्या. त्याच्या लहरीची एक अशी चमत्कारिक गोष्ट सांगतात कीं, त्यानें एकदां कर्नाटकांतून पुष्कळ मुली आणिल्या, आणि त्यांच्या बरोबर ह्या युरोपिअन कैद्यांचीं लग्नें लावण्याचा प्रयत्न केला. जेम्स स्करी नामक एका इसमाचें त्यांपैकीं एका मुलीशीं लग्न लाविलें, व तिजपासून त्याला संततीही झाली. कर्मधर्मसंयोगानें पुढें त्याची सुटका होतांच, तो ह्या आपल्या प्रियपत्नीस सोडून निघून गेला; आणि ती गरीब स्त्री त्यास 'शुमशूखान' ह्या नांवानें हांका मारीत शोक करीत राहिली!

ह्या बंदीखान्याचे कांहीं भाग अद्यापि अस्तित्वांत आहेत व ते पूर्वींच्या दुःखद कथांचें स्मरण देतात. ह्या बंदीखान्याच्या कोठड्यांमध्यें अद्यापि साखळदंड बांधण्याचीं भोकें दृष्टीस पडतात व त्यांच्या उदास व केविलवाण्या स्वरूपावरून तेथील शोकप्रद प्रसंगाचें स्मरण झाल्यावांचून राहत नाहीं. ह्या कोठड्या समूळ नष्ट करून टाकल्या असतां निदान पूर्वींच्या दुःखद इतिहासाचें तरी विस्मरण होईल, ह्मणूनच कीं काय न कळे, एक मोठी तोफ किल्ल्याच्या तटावरून ह्या बंदीखान्याच्या मध्यभागीं पडून, तिनें ह्या बंदीखान्यांचा बराच भाग बुजविण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु तिच्यानें देखील ह्या अंधारकोठड्यांचा संपूर्ण नाश झाला नाहीं. ह्या सर्व अंधारकोठड्या किल्ल्याच्या तटबंदीस लागून प्रत्येक बुरुजाच्या जवळ बांधल्या आहेत. त्या बाहेरून येणाऱ्या प्रेक्षकास एकदम दिसून येत नाहींत. किल्ल्याच्या तटावर चढून मध्यंतरीं खालीं आलें, ह्मणजे ह्या तळघराच्या नमुन्याच्या अंधारकोठड्या दृष्टीस पडतात. सांप्रत ह्या कोठड्यांत जाण्याकरितां वेगवेगळे रस्ते केलेले आहेत. परंतु पूर्वीं हे रस्ते नसत.

फक्त लांकडाच्या शिड्या असत. एकदां कैद्यांना ह्या यमपुरीमध्यें घातलें ह्मणजे पुनः त्यांना वर येतां येत नसे. अशा संकटावस्थेमध्यें राहून व त्यांतल्या त्यांत आपल्या धैर्याची, सहनशीलतेची आणि सहानुभूतीची सीमा करून, जनरल बेअर्डसारखे आंग्लसेनापति ह्या बंदीखान्यांतून मुक्त झाले; व त्यांनीं पुनः सैन्याचें आधिपत्य स्वीकारून इ. स. १७९९ मध्यें श्रीरंगपट्टण जिंकून घेतलें; आणि आपल्या औदार्यानें, उपकारबुद्धीनें आणि सदयतेनें, जिंकलेल्या शत्रूबरोबर वर्तन करून, सर्व जगास आपलें खरें थोरपण व्यक्त केलें. त्यामुळें या किल्ल्यामध्यें मनुष्याचें राक्षसी स्वरूप दाखविणाऱ्या ह्या अंधारकोठड्या, व उदारपणाचें उच्च स्वरूप दाखविणाऱ्या दर्यादौलत व हैदरटिपूच्या कबरी इत्यादि इमारती आप-आपल्या परीनें प्रेक्षकांस ज्ञानामृत पाजल्यावांचून राहात नाहींत. ह्या इमारती पाहिल्या ह्मणजे पूर्वींच्या इतिहासाकडे सहजच दृष्टि जाते, आणि त्यावेळच्या औदार्यशाली आंग्लपुरुषांच्या सौजन्याचें व थोरपणाचें फार कौतुक वाटतें.



## ६ श्रीरंगनाथ स्वामीचें देवालय.

श्रीरंगपट्टण येथें प्रत्येक हिंदु मनुष्यास दर्शनयोग्य असें पुराणें व पवित्र स्थान ह्मटलें ह्मणजे तेथील श्रीरंगनाथ स्वामीचें प्राचीन देवालय होय. हें देवालय तिरुमल अय्या नामक एका इसमानें इ. स. ८९४ मध्यें प्रथमतः बांधिलें. नंतर इ. स. १४५४ मध्यें तिमण्णा नामक एका हेबर ह्मणजे प्रांताधिपतीनें ह्याचे प्राकार वगैरे वाढवून, ह्यास विशेष शोभा आणिली. गौतम ऋषीसारख्यांच्या वास्तव्यानें श्रीरंगपट्टण पुनीत झाल्यामुळें व रामानुजाचार्यांसारख्या वैष्णव भक्तांच्या वासानें ह्या देवालयाचें महत्त्व विशेष वाढल्यामुळें, श्रीरंगनाथ स्वामीचें स्थान प्रत्येक हिंदुमात्रास परम वंद्य होऊन राहिलें आहे. ह्या देवालयाची रचना दक्षिण हिंदुस्थानांतील देवालयांप्रमाणें विस्तीर्ण असून, ह्याच्या सभोंवतीं भक्कम दगडी कोट आहे. चारी बाजूनें खुलीं पटांगणें असून, मुख्य द्वारावर उच्च गोपूर आहे. त्यावरून ह्या देवालयाचें प्राचीनत्व सिद्ध होतें. ह्या देवालयाचा अनेक वेळां ह्मैसूरच्या राजांनीं जीर्णोद्धार केला असून, त्याच्या गोपुरावर कांहीं वर्षांपूर्वीं महाराज चामराजेंद्र वाडियार ह्यांनीं सुवर्णाचें पाणी देऊन त्याची सुवर्णप्रभा अद्यापि चमकत ठेविली आहे.

दक्षिण हिंदुस्थानांतील पद्धतीप्रमाणें मुख्य देवालय आंत अंधारांत असून, येथें दीपप्रकाशावांचून जातां येत नाहीं. पूर्वींपासून यवनांच्या भीतीमुळें देवाची मुख्य मूर्ति सुरक्षितपणें अंतर्भागामध्यें ठेवण्याची चाल इकडे पडली आहे. कोणत्याही देवाचें इकडे सन्मुख व सहज दर्शन केव्हांही होत नाहीं. प्रत्यहीं सकाळीं, माध्यान्हकाळीं व सायंकाळीं जेव्हां देवाचे पुजारी येतील, तेव्हां देवाच्या महाद्वाराचें कुलूप निघून मग देवदर्शन होतें. श्रीरंगपट्टण येथील श्रीरंगनाथाची मुख्य मूर्ति, काळ्या दगडाची शेषावर निजलेली अशी श्रीविष्णूची आहे. ही फार प्राचीन असून दर्शनीय आहे. श्रीशेषशाई भगवान् निद्रा घेत शांतपणानें येथें निवास करीत आहेत, असें वाटतें. ह्या देवालयानें श्रीरंगपट्टण येथील अनेक राजक्रान्त्या व युद्धें पाहिलीं आहेत. टिपूच्या कारकीर्दींत ह्या देवालयांतील मूल्यवान् जडजवाहीर नष्ट झालें, परंतु या देवालयास त्यानें बिलकूल त्रास दिला नाहीं. टिपू हा औरंगजेबाप्रमाणें यवनी धर्माचा फाजील अभिमानी होता व त्या धर्माचा प्रसार करण्याची त्यास अत्यंत महत्त्वाकांक्षा होती. परंतु त्यास कांहीं विशेष साक्षात्कार झाल्यामुळें त्यानें ह्या श्रीरंगनाथस्वामीच्या देवालयास बिलकूल हात लाविला नाहीं. नाहींतर, टिपूच्या खास राजधानींत हें हिंदु देवालय जिवंत राहाणें अशक्यच होतें. आणि श्रीरंगपट्टण, बंगलूर वगैरे ठिकाणच्या राजवाड्यानजीकचीं हीं देवालयें, यवनधर्माचा नित्य जयघोष करणाऱ्या उच्च मनोऱ्यांच्या मशिदी शेजारीं, आपले सोनेरी कळस चमकवीत व हिंदुधर्माचें सहनशीलत्व प्रकट करीत कधींच राहिलीं नसतीं ! असो.

ह्या देवालयामध्यें प्रतिवर्षीं मोठा रथोत्सव होत असतो व येथें पुष्कळ यात्रा जमते. येथील प्राचीन रथ अद्यापि अस्तित्वांत आहे. श्रीरंगपट्टणच्या वेढ्यामध्यें ह्या रथास किंवा देवालयास इंग्रज सैन्यानें बिलकूल हात लाविला नाहीं. ह्या देवालयास म्हैसूर सरकाराकडून दरसाल ७९२३ रुपयांची नेमणूक मिळत असते. ह्या देवालयाचें उच्च गोपूर व येथील शेषशाई भगवान् श्रीरंगनाथस्वामी ह्यांनीं कालचक्राच्या घडलेल्या सर्व लीला पाहिल्या आहेत. त्यांच्या नेत्रांसमोर श्रीरंगपट्टण येथें ज्या राजक्रांत्या घडून आल्या, त्यांचा सर्व देखावा त्यांनीं अवलोकन केला आहे. त्यांनीं जर आपलें मूकव्रत सोडून दिलें आणि श्रीरंगपट्टणचा सर्व 'चक्षुर्वैसत्यम्' इतिहास कथन केला, तर केवढी बहार होईल ?

# होळकराची कैफियत.



## ( अप्रसिद्ध भाग. )



[ "होळकराची कैफियत" ही महत्त्वाची ऐतिहासिक बखर 'काव्येतिहाससंग्रहा'मध्यें पुष्कळ वर्षांपूर्वी प्रसिद्ध झाली आहे. तिच्या मध्यें श्री. अहल्याबाई होळकर ह्यांच्या कारकीर्दीमधील बराच भाग, मधलीं पृष्ठें हरवल्यामुळें अप्रसिद्ध राहिला होता. सदहू भाग सांप्रत उपलब्ध झाला आहे. तो फार महत्त्वाचा आहे असें वाटल्यावरून येथें सादर केला आहे. ]

* * * *

* * * *

" मुकाबल्यास तुकोजी होळकर सुभेदार यांनीं हल्ला केला. मागाहून पेंढारी यांची लांडगेतोड बरीच झाली. दुतर्फा शह पाडून रोहिले कुल बरबाद केले. हें वर्तमान शिंदे, रामचंद्र गणेश यांस समजतांच, कूच करून, गंगा उतरून सुभेदारास सामील झाले. त्रिवर्ग एकत्र होऊन पथरगडास येऊन मोर्चे लाऊन किल्ल्यावर हल्ला केला. बायकापोरें धरून दरोबस्त लुटलीं. मलकाजमानीचे अन्वयें पेंढारी यांनीं बायकांस उपद्रव केले. दौलत बहुत निघाली. पुनः माघारी फिरले. दिल्लीवरून जाटावर यावयाचा हेत. या मसलतीस अग्रेसर तुकोजीराव होळकर. शिंदे व विसाजीपंत यांचे संकोचार्थ सामील खरे; परंतु मनांतील धर्म, कोणेही मसलतींत होळकरास तोंडघशीं पाडून, आपलें वर्चस्व होऊन, श्रीमंत माधवरावसाहेब यांस समजावें हा इरादा. गंगापारीहून पथरगडचे मसलतीचा समारोप करून, दिल्ली डावी सोडून, अरण्यांतून शेखावटींत आले. तेथोन पुढें जाटावर चाल करावी येविषयीं आग्रह. निकड होळकराची. उभयतां बाह्यात्कारें सामेल. झुकवीत झुकवीत हिंडोन बयाणामधें मुक्काम केला. तेथोन भरतपूर बारा कोस, दीग १८ कोस. सुभेदारच्या बोलण्यास रुकार मात्र, परंतु कूच करण्यास अनेक पर्याय दाखवूं लागले. तेव्हां एके दिवशीं रात्रीं सुभेदार रात्रौ भोजन करून गादीवर हुक्का ओढीत होते. चित्तांत बहुत उदासी आली कीं, जाटाचा रुवाब भारी. हे मोकाबल्यास आले जाणून जाट नवलसिंग ८०००० स्वार,

१२०० तोफा चालू, लाख पायदळ, शिवाय समरूचीं पलटणें ४, या सरंजामानिशीं दीग पाठीमागें ३ कोस टाकून, पुढें यांचे फौजेवर रुख दिला. सोबत्याचे मनांतील धर्म उघडाच दिसतो. आपलें जातीचें अंगठाण पाहतां, जमेतीचा अजमास पाहतां, पंधरा हजार इतलाखी शिलेदार, पांच हजार सरंजामी व पांच हजार पागा व पंचवीस हजार पेंढारी एकोण पन्नास हजारांची जड. ईश्वर मार्तंड प्रांत कसा लावील असी मनांत व्यावृत्ती. तितक्यांत कांहीं डोळाही लागला. इतक्यांत साक्षात् मार्तंड, निळा घोडा, पांढरा पोषाख, खांद्यावर भाला, गळ्यांत गाठाळा, पाठीं भंडार, समोर येऊन बोलला कीं, "धनगरा, ऊठ. आठ अक्षरी मंत्राचा जप कां करतोस? मी पुढें चाललों. तूं मागें कूच करून जलद ये." इतकीं अक्षरें श्रवण करून जागे होतात, (तोंच) स्वार हा गेला असा भास झाला. तों इतक्यांत नगारखान्याचा जमादार येऊन विनंति केली कीं, "चौघडा अखेर होऊन दोन घटका झाल्या. मी माणसासुद्धां सामसूम निजलों. पहारेवाला बसला होता. तीन डंके नौबदीवर गैबी झाले. कानावर घालावयास आलों." हें श्रवण करून शरिरांत हिंमत येऊन, उपाध्यायास बोलाऊन नौबदीची पूजा करून, कोणास न पुसतां कूच केला. दीडा प्रहराचे आंत जाटांचा यांचा मुकाबला चौ कोसांचा राहिला. यांनीं मुक्काम जमवून, गोविंदराव बुळे यांचें पथक छबिन्यास उभें करून, सुभेदार स्थळ करून भोजन करून पलंगावर आंग टाकिलें. तों छबिन्यांतून सांडणीस्वार आला कीं, जाट येऊन पोंचला. आमची व त्याची गोळागोळी होती. तों सुभेदारांनीं नारो गणेश यांजला सांगून पाठविलें कीं, फौज तयार करून मुकाबल्यास जाणें. हुकूम येतांच नानांनीं फौजेस ताकीद करून घोड्यावर बसून ढालेपाशीं गेले. फौजही कट्टी होती. मानाजी फांकडे व भगवंतराम कदम, खंडोजी भोयटे व यशवंतराव चव्हाण, दोन महिने अगोदर तलब चुकऊन घेवून, शिंद्याचे जवळ चाकरीस राहिले होते. हे कूच करून पुढें आले. तेव्हां तेही यांचे बरोबर कूच करून आले. ४०० स्वारांचें पथक. धनगर उद्यां ह्मणेल, पैका खाऊन समयास * * दाखविली. याकरितां विना बोलावण्यावांचून सामील झाले. शिलेदार घेऊन नाना पुढें चालले. तों छबिन्यांतून सांडणीस्वार दुसरा आला कीं, स्वारी लवकर यावी. आमचे पाय टिकत नाहींत. तेव्हां सुभेदार उठून, शौचाहून जाऊन येऊन, हत्तीवर बसून ढालेपाशीं गेले. रखमाबाईसाहेब बरोबर होती. त्यांनीं विनोदार्थ भाषण केलें कीं, "मी शेणगोळा करून ठेवितें." सुभेदार स्वार होऊन पुढें झाले. भिवाजी रणसोड, राहूरकर, पागनीस हे पांच चार हजार

हुजरात तयार करून हत्तीपाशीं आले. सुभेदारांनीं हत्ती बसवून आपल्या भंडारींतील भंडार भिवाजीपंत नाना यांच्या कपाळीं लाविला, आणि बोलले कीं, "झाल्या गोष्टीची उजळणी आज करून दाखवावी." हे उत्तर न करितां पुढें चालले. सुभेदारांच्या बोलण्यांतील तात्पर्य, नारो गणेशाशीं व राहूरकराशीं कांहीं चुरसाचुरस झाली होती. त्या प्रसंगीं भगवंतराव कदम व मानाजी फांकडे यांनीं राहूरकराचा पक्ष करून वर्चस्व ठेविलें. असले किरकोळ किस्त्यांचा बयाण फार होतो. श्रवण करणार चित्त पुरवून पुसल्यास सांगावयास येतील. त्या दिवसापासून उभयतां सरदार व राहूरकर यांचा संकेत होता कीं, जाटाचे लढाईचे प्रसंगीं दोन्ही गोषावर तुह्मीं उभयतांनीं असावें. मध्यवर्ती हुजरात. हुजरातीचें निशाण उठलें ह्मणजे तुह्मीं बेलाशक उठावें. त्यावरं उभयतां सरदार गोषावर होतेच. हुजरात जाऊन मधीं उभी राहिली. जाटाकडील तोफखान्याचा मार अनिवार. फौज थिजून गेली. तेव्हां नारो गणेश यांनीं सांडणीस्वारसमागमें चिटी भिवबा नानाकडे पाठविली कीं, "दिवस चार घटका राहिला. या समयीं व्यर्थ मार खाऊन घोडें माणूस जाया करावें, हें ठीक नाहीं. या वेळेस टाळा द्यावा. सकाळीं पाहून घेऊं." तेव्हां नानांनीं उत्तर केलें. जबानीं सांगितलें कीं, "आह्मांस फार दिवस वांचावयाचें नाहीं. आपण यजमानापाशीं उभें राहून तमाशा पहावा." असें सांगून पाठवून सांडणीस्वारानें तोंड फिरवतांच हुजरातीचें निशाण उठलें. हें कदम फांकडे यांनीं पाहून, हजार हजार स्वारांचे सरदार त्यांनींही घोड्यांच्या अनिनी उचलल्या. ते समयीं, गोलंदाज तोफ भरूं लागले नाहींत, तों बासडे सही केले. तोफा मागें टाकून पायदळ कडब्यासह कापलें गेलें. हुजरात व कदम फांकडे यांचें हत्यार लागू झाल्यावर तमाम फौज उठली. पायदळाचें बीबूड करून स्वारांत शिरले. तों रांगडे स्वार घोड्याचें वेठण कमी, यामुळें बाजूनें पेंढारी व समोर फौज जाटांची, स्वार सरंजाम जमूं न शकतां प्रायशः मारले फार गेले. कांहीं जीव घेऊन पळालेही असतील. याप्रमाणें जाटाची तारांबळ करून, जाट जातीनें विवस्त्र होऊन, गोपीनाथ घुले मथुरेकर महाराष्ट्र भिक्षुक उभयतां घोड्याचे रथांत होते. ते पेंढाऱ्यांनीं विवस्त्र करून, खास जाट हा हें त्यांस न समजल्यामुळें शेंडी उडत डिगेंत शिरले. लढाई फत्ते झाली. ४ पलटणें समरूचीं ते लढाईचे अवलपासून तुट्टून किल्ला बांधून होती. त्यावर कोणी जाटाचा माणूस गेलाही नाहीं. पेंढारी याचे स्वार गेले आले. त्याजवर गोळा टाकून जवळ फरकूं न दिले. किल्ला बांधून शाबुतीनें आपले ठिकाणास गेले. बाकी सरंजाम तरबितर करून, चारी प्रहर रात्र बेटांत उभे राहून सूर्योदयीं मुक्कामास आले. लढाई लागली हें वर्तमान वि-

साजीपंत व शिंदे यांस कळतांच, येऊन सामील झाले. होळकराची फौज मरीमाऱ्यांत शिंद्यांनीं लूट मनस्वी केली. श्रीमंतांकडील विसाजीपंताचे फौजेपैकीं जंबुऱ्यांचा मार कांहीं उपयोगीं पडला. एवंच दोन्ही फौजेनीं लूट केली. लढाई होळकरांनीं मारली. दुसरे दिवशीं सुभेदार तुकोजी होळकर यांनीं शिंदे, विसाजीपंत व आपले फौजेंत रुरयात न ठेवितां, तिन्ही लष्करची लूट जबरदस्तीनें एकत्र करून बरहुकूम हिस्सा वांटून दिली.

इकडे देशीं माधवरावसाहेब याजला राजयक्ष्म्याचा उपद्रव होऊन काल झाला. हें वर्तमान समजतांच, फौज माघारा फिरोन, जाटापासून चार हजार रुपये घेऊन पूर्व स्नेह कायम करून सुभेदार इंदुरास आले. शिंदे उज्जनीस, विसाजी कृष्ण देशीं गेले. शिंदे, होळकर यांनीं फौजेची समजावीस करण्यास आरंभ केला. राडा बहुत पडला. गंगाधरतात्यांची हतोटी थोडक्यांत माणसाची समजूत ठेऊन माणूस हमराहा ठेवावें. हें करणें नारो गणेश यांजपाशीं कमी. याकरितां राडा पडोन राणाजी शिंदे चोंडीकर, बाईसाहेबांचे भाचे, पांचशें स्वारांचें पथक शूरत्वानें व कांहीं मातुश्रीसाहेबांचे हिमायतीनें, नारोपंत नानाची अपेक्षा फार करून तोंडाचा मागितला रुपया घेऊन, सुभेदारास रामराम करून, बाईसाहेब इंदुरास समजाविशीचे बंदोबस्ताकरितां आली होती, त्यांजलाही रामराम करावयास गेले. तों बाईसाहेबांनीं सांगून पाठविलें कीं, "असा मळईखोर आहेस, तर मला तोंड दाखवूं नको." तेव्हां राणूजी शिंदे यांनीं विनंति सांगून पाठविली कीं, "धनगराचेच घरावर ईश्वर सुवर्णाचा पाऊस पाडतो, आणि इतर सरदार मेले असें नाहीं. तुझे आशीर्वादेंकरून चाकरी मिळवितों कीं, तें पहावें. ध्यानास येईल." असें बोलून, जबाब देऊन, नागपूर, प्रांत वऱ्हाड भोंसल्यांचे घरीं चाकरीस राहिले. सदतीस वर्षें चाकरी केली. इकडे कोणाचें तोंड पाहिलें नाहीं. पांच चार वर्षांनीं काळ होईल तेव्हां बाईसाहेबांनीं पत्रें पाठऊन बोलाऊन आणिलें. निंबहेडा महालपैकीं निमे जागा राणीपुरा जहागीर देऊन जहागीरदार केलें. इकडे माधवरावसाहेबांचा काळ झाल्यावर नारायणरावसाहेब गादीवर बसले. दादासाहेब कैदेंत होते. सखारामबापू व मोरोबा फडणीस, थोडेबहुत आनंदीबाई यांचा विचार एक होऊन, नारायणराव यांचा आठवे महिन्यांत प्राण घेतला. हें वर्तमान समजतांच शिंदे, होळकर कांहीं फौज पागा सरंजाम घेऊन पुण्यास दाखल जाले. दादासाहेब यांनीं कर्मांतर करून साताऱ्यास जाऊन राजाचीं वस्त्रें घेतलीं. तों नारायणरावसाहेब यांचें कुटुंब पुरंदरास होतें. दो महिन्यांचा गर्भ. असें कारभाऱ्यांस समजल्यावर, अग्रेसर बाळाजीपंत नाना फडणीस,

बराय मसलत बाह्यात्कारें सखारामबापू, मोरोबादादा यांस घेऊन मसलत केली कीं, साहेबास पुण्यास येऊं न देतां विनंति करावी कीं, राजाचे शिरपाव झाले, ते पक्षीं जेजुरी पंढरी देवदर्शन करून मग यावें. त्यांचेही मनास येऊन पुण्याकडे न येतां जेजुरीस गेले. फौजेंत मुखत्यार त्रिंबकरावमामा पेठे व लिहिण्याचे कामावर हरिपंत तात्या. फौजेंत हुकूम उभयतांचा. जातीचा सरंजाम साहेबांचा हजार बाराशें. जेजुरीहून पंढरीस आले. पंढरीस आल्यावर दादासाहेबांस फितुर समजला. मग आपल्या सरंजामानिशीं सावध राहूं लागले. एके दिवशीं देवदर्शनास मामा व दादासाहेब बरोबर गेले. तेथें मार्गांत हुकमें चुरसाचुरस होऊन तरवार चालविली. त्रिंबकरावमामा कामास आले. साहेब आपले सरंजामानिशीं वेगळे पडून, सरकारफौजेंत हरिपंततात्यांनीं बंदोबस्त करून, पुणें मुक्कामीं नानांस पत्रें लिहिलीं कीं, "येथें आपसांत तरवार चालून त्रिंबकरावमामा कामास आले. श्रीमंत आपल्या सरंजामानिशीं वेगळे राहिले. आह्मी सरकारी फौजेचा बंदोबस्त करून मुकाबला करून आहोंत. खर्चाची मदत लवकर करावी." ऐसीं पत्रें रवाना केलीं. जों जों ही मसलत उघडी होत चालली, तों तों बापू, मोरोबा फडणीस हे मनसब्यांतून गाळीत चालले. हरिपंततात्यांचें पत्र आल्यावर बापूस चिटी नानांनीं लिहिली कीं, पंढरपुरीं प्रसंग असा गुजरला. पुढें कैसें करावें ? तो अभिप्राय प्रायः ध्यानास आणून उत्तर सांगून पाठविलें. फौजेचा बंदोबस्त हरिपंततात्यांनीं केला आहे. खर्चाची मदत तुह्मीं करावी. हें श्रवण करून नाना प्रसन्न झाले कीं, भूतभविष्यवेत्ते हीं माणसें खरीं. मग हरिपंततात्यांचे खर्चाची मदत केली. यावर हरिपंततात्या दादांचे मागें लागले. दादासाहेबांचा विचार महेश्वरास जाऊन होळकरास आपलेंसें करावें. अशा बेतानें कसरावदेवर आले. तों बाईसाहेबांनीं कृष्णाजी मुरार यांजबराबर फौज देऊन दादासाहेबांचे मुकाबल्यास पाठविले. "या प्रसंगीं आपलें येणें अप्रशस्त. आपण धनी. आपल्यास प्रतिकूल कोण आहे ? पण प्राप्त प्रसंगाची हवा पाहिली असतां, आह्मी मारले जाऊं. यास्तव आपणास नर्मदा उतरणेस सल्ला नाहीं." तेव्हां अलीमोहनचे राज्यांतून महीचे सुमारें गेले.

इकडे शिंदे, होळकर पुणें मुक्कामीं आल्यावर येथें फळी होतीच. शिंदे व नाना फडणीस यांचा मेळ पडून, होळकर, सखारामबापू व मोरोबादादा यांचा मेळ पहिल्यापासून होताच. तशांत तोतया भाऊसाहेब उभा राहून, डोंगरकठाडीचे किल्ले दरोबस्त घेऊन सिंहगडास येऊं लागला. तेव्हां शिंदे होळकर यांस आज्ञा झाली कीं, तुह्मीं यासी धरून आणावें. हुकूम होतांच शिंदे कूच

करून गेले. होळकरास जाण्यास अनुषंगावरोधेंकरून अवकाश लागला. तितक्यांत शिंद्यांनीं धरून आणिला. त्याचें पारपत्य केलें. किल्ले, जागा घेतल्या होत्या, त्या खाली करून घेतल्या. रामचंद्रनाईक परांजपे, तोतया याचा पक्ष धरून खरें असें ह्मणत होते, ते सरकार चोर झाले. यामुळें ते आपले ठिकाणीं साशंकित. यास्तव सरकार आप्त, मातबर माणूस. याचा आब घेतला असतां सरकार उपयोग व लौकिक तादृश. दौलतींतील माणूस. मात्र जाया होईल. असें जाणून, पुरंदरास कोणास पाठऊन त्याची दिलजमाई करून किल्याखालीं आणून पूर्ववत् व्यवसाय करून असावें असें केलें. शिंदे व नाना फडणिसांचा पेट्या एक. यांनीं मसलत करून बापू व मोरोबा व नारो गणेश, होळकराचे कारभारी, तिघांस जरब द्यावी असा व्यूह सिद्ध केला. हें वर्तमान इकडे समजल्यावर मोरोबा फडणीस, नारो गणेश उभयतांची मसलत होऊन बापूस इतला केला. बापूंनीं या मनसब्यास दूषणें लाविलीं कीं, "श्रीमंतांचे राज्यांत फळी बांधून, धनी माथ्यावर नसतां अपस्वार्थाकरितां बखेडा करावा ही नेकसल्ला नाहीं. असेंच करणें असतें तर कंपेष वर्षाचा आरसा होता. यांत यावें तर दिल्लीपावतर पुणेंपावतर वंश केला असता. परंतु हें कृत्य करून हरामखोरीच्या मरातब्यास येऊन आपलें इहपरत्र कां बुडवावें? सांप्रत आपल्यास कैद करून प्राण घेतील. यांत आपली क्रिया राहून परत्र साधन घडेल. वांचणें किती दिवस? कोणीही अग्रेसर होऊन श्रीमंतांचे दौलतीची पैरवी बांधावी ही नेकसल्ला." असा भावी इतला करून योजिला घाट मोडून टाकिला. पुढें मोरोबा फडणीस याला कैद करून नगरचे किल्यावर पाठविलें. सखारामबापू यांजला कैद करून कोंकणकठाडीचे किल्यावर ठेविलें. जातेसमयीं आक्षेप घेतला कीं, नानांशीं आह्मी दोन गोष्टी बोलूं, मग जाऊं. तेव्हां नानांस गांठ घालणें प्राप्त आलें. गांठ घालून बोलणें झालें कीं, "तुह्मीं हें कृत्य केलें फार चांगलें. उगाच प्राकृत संसार करण्यांत चार हुकूम असल्यास पुरी पडत नाहीं. तेव्हां ही तर दौलत. त्यांत धनी नाहीं. चार हुकूम ह्मणजे दौलतीचा नाश आहे. परंतु या दौलतीचे रफीक पूर्वींपासून होळकराचें घर. सांप्रत तुह्मीं सिंदीबन वाढविलें आहे. यापासूनच तुह्मांस अपाय होईल. हें खचित मनांत वागवून फार जपावें. बाकी तुह्मी विचक्षण, रजाचा गज करून दौलत नमुदास आणाल, हा मज भरवंसा. सांगितल्या गोष्टीस फार जपावें." इतकें सांगून पालखींत बसून किल्यावर गेले. पुढें नारो गणेश यांसी कैद करून पुरंदरावर ठेविलें, आणि होळकराची दिवाणगिरी दादाजी गंगाधर यांस सांगितली. या गोष्टीस संमत कांहीं बाईसाहबांचेंही खरें. परंतु तुकोजी

होळकर सुभेदार यांचा व दादाजी गंगाधर यांचा मेळ न पडतां सुभेदारांनीं दुखणें काढलें. कचेरी झालीच नाहीं. इकडे नारो गणेश यांनीं शिंद्यांचें साधन करून लाख रुपये देऊन सुटका केली. नानांस समजाविलें कीं, तुकोजी होळकर याचें मनोधारण तोडून आपला अर्थ तो काय ? नारो गणेश कंपेश करतील. याचा जिंमा आमचा. ऐसी खात्री करून, नारो गणेश यांजला सोडवून आणून पुनः दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. दादाजीचा कारभार सहा महिने राहिला. सहा महिने सुभेदार यांनीं कचेरी व स्मश्रू सोडून पलंग धरला होता. नारो गणेश कचेरींत आल्यावर स्मश्रू व स्नान करून शिरे दरबार झाला. त्या समयीं शिंदे यांनीं १५ लाख रुपये नजर कबूल करून विनंति करून घेतली. तेव्हां कोणीं कोणीं सुभेदारासही सूचना केली. आपणही विनंति करून घ्यावी. त्यांनीं उत्तर केलें कीं, "रुपये द्या, विनंति करून घ्या. यांत विशेष तें काय आहे ? आह्मांस श्रीमंत धनी आणि ब्राह्मण यांचा आशीर्वादच चांगला." विनंतीची खटपट केली नाहीं.

इकडे हरिपंततात्यांस मसलत तोलेना. सबब शिंदे, होळकर यांजला मदतीस पाठविलें. शिंदे व नाना फडणीस यांचा भीतरपेठा मेळ. कांहीं कारणांगभूत शिंद्याचे जाण्यास दिनावधी लागली. होळकर दरकूच पोंहचून कोंडाईबारी गुजराथचा काकड. तेथें हरिपंततात्या, होळकर मिळोन दादासाहेबांशीं लढाई मातबर झाली. मानाजी फांकडे वगैरे पांच चार सरदार जखमी पाडाव करून होळकरांनीं आणिले. तसाच पाठलाग केला. दादासाहेब भडोचेस दाखल झाले. तेथें कांहीं उपद्रव करावा, इंग्रजांशीं वैर करून आज शहास गुंतून पडावयाचें कारण नाहीं, ऐसी मसलत हरिपंततात्यांनीं करून माघारी फिरले. सुभेदार इंदुरास गेले. हरिपंततात्या, फौज खानदेशांत पुणें मार्गाकडे रवाना करून, सडे, अहिल्याबाई पुण्यवान् व कारस्थानी दोन्हीं अंगें एकसारखीं, तेव्हां दर्शन घेऊन जावें या भावीं, महेश्वरास आले. बाईसाहेबांची भेट झाली. शिष्टाचार आदर-सत्कार बहुत उत्तम झाला. तात्यांचे मनांत बाईसाहेबांसारखें मनुष्य, यांचें आपलें कांहीं प्रामाण्य असावें असें मनांत येऊन, कृष्णाजी मुरार यांशीं बोलण्याचा व्यूह काढला. त्यांनीं स्पष्ट उत्तर दिलें कीं, "अशा गोष्टी बाईसाहेबांशीं आह्मीं कोणीही बोलाव्या, इतकें कोणाचेंही पुण्य नाहीं. येथें त्यांचे मुखावाटें आज्ञा होईल तितका व्यवहार करून आहों. अगोदर पुत्रशोक, त्यांत राज्य दुसऱ्याचे स्वाधीन केलें. त्यांत मनस्वी किलाफ. मातुश्रीच्या स्वभावांत पीळ. सूर्योदयापासून पुनः सूर्योदयापर्यंत सदाचरणाच्या घटका नेमलेल्या. त्यांत अवकाश करून हांक मारली

असतां जाऊन प्रश्न करतील, तितकी विनंति करावी. अधिक बोललें असतां मर्जी कोणे कलास जाईल ही भीति. उदास ह्मणोन गवताची पेंडी अथवा पावशेर तेल आज्ञेशिवाय कोणास प्राप्त होईल, इतकी मुखत्यारी कोणाकडे नाहीं. हा विषय आपण समक्ष बोलले असतां, रुकार अथवा अन्य विचार उत्तरांत काय निष्पन्न होईल तो खरा." हें त्यांचे गळीं उतरून, तिसरे दिवशीं रात्रौ फराळास बोलाविलें होतें. पांचशें खाशांचा बेत. त्याचा समारंभ उत्तम प्रकारचा सिद्ध होऊन, हरिपंततात्या मंडळीसह आले. मंडळी कचेरींत बसवून जातीनें आंगरखा पागोटें काढून बाईसाहेबांचे स्नानसंध्येचे बंगल्यांत आले. तों मातुश्रीसाहेबांची स्नानसंध्या संपून देवघरांतून बाहेर आली. तात्यांस पाहिल्यावर गालीच्या मखमली बसावयास टाकून, हरिपंततात्यांनीं दादाजीस हांक मारली. त्यास बोलण्याचा ओघ दादाजीकडून अगोदर समजलाच होता. दादाजी आल्यावर बंदी करून, तात्यांनीं बोलण्याचा व्यूह काढला. तेव्हां मातुश्रीसाहेबांनीं उत्तर केलें कीं, "आपलें बोलणें मुत्सद्दी काव्याचें. आमचा विषय पाहतां गैरसमजुतीबद्दल आमच्या उपमा अन्यत्रास देतात. ते आह्मी प्रत्यक्ष, त्यांत बायका माणसें. आमची समजूत ती काय ? आह्मांस जें बोलणें तें उघडें बोलावें. त्याचें उत्तर करूं." तेव्हां तात्यांनीं कांहीं स्पष्टही बोलून दाखविलें. त्याचें उत्तर "तात्या, ईश्वरइच्छेकडून मजवर सर्वोपरी गहजब. अशांत म्यां दौलत दुसऱ्याचे स्वाधीन करून राहिलें. आयुष्य तें परत्रेचे विचारांत काढावें, अशा भावीं नर्मदातीरीं क्षेत्र पाहून दिवस लोटतें. तथापि आमचा हा विचार कैलासवासी मल्हारजी होळकर यानें श्रीमंतांचे गादीशीं केला. त्यांत अवघे आह्मी बांधले आहों. जागजागां असे विचार घडूं लागले असतां, आमचे बुद्धीनें बेल ह्मणजे भाजीपाला त्याचें साधन असें आहे ! आपण श्रीमंतांचे दौलतीचे खैरख्वाह आहां. आपण वेगळें बोलणें बोलतां हेंच अप्रशस्त." अशा भावीं सडेतोड उत्तरें केलीं. यांत हरिपंततात्यांचे मनांत वैषम्य तर आलेंच, परंतु तात्यांची साधकता विशेष, यामुळें तो बोलण्याचा संबंध सोडून अन्यत्र गोष्टी बोलण्यांत, पोटांत कळ निघाली ह्मणोन पाव घटका तेथेंच निद्रा करून बोलले कीं, "उपद्रव विशेष होत चालला. आज्ञा होईल तरी मी डेऱ्यास जाईन." "बहुत उत्तम आहे" असें बोलून त्यांस बिदा केलें. ते मंडळीसह गोटांत गेले. पांचशें पात्रांचा समारंभ. पात्रें वाढून सिद्धता झाली होती. मंडळी गेल्यावर आपले पदरची मंडळी मुत्सद्दी, भिक्षुक, पागे वगैरे बोलावून फराळास घातले. त्यांजकडेसही दहीपोहे, लोणचीं, पापड, वडे ऐशा बहंग्या भरून शागिर्दाहातीं पाठवून दिल्या. त्याजवर तिसरे

दिवशीं कृष्णाजी मुरार यांसी समाचारास पाठविलें. ते जाऊन बोलणीं झालीं. कृष्णाजी मुरार यांनीं विनंति केली कीं, "येविषयींचे मनोधर्म सुचविलेच होते. मालरावबाबा कैलासवासी झाल्यापासून स्वभाव कोणाचेही हातीं नाहीं. पुण्यवान्, धैर्यवान् यामुळें दिवस भ्रमानें निघतात. त्यांत आपलें येणें या ठिकाणीं कशास? तो योग झाला असतां त्यांत मज ओळखीचें कारण काय? आपले सारखे मिठास व दुसऱ्याचें मनोधारण हें श्रीमंतांचे राज्यांत धुंडाळल्यानें मिळावयाचे नाहींत. ते पक्षीं रंगाच्या मोटा बांधून कूच करावें हे नेकसल्ला." तेव्हां तात्यांनीं उत्तर केलें, "आपण बोलतां तसेंच घडेल." दादाजी प्रकृति पुसून आले. दुसरे दिवशीं हरिपंततात्या वाड्यांत आले. एकांतीं बाईसाहेबांशीं कित्येक प्रकारचीं बोलणीं होऊन बिदा मागितली. वस्त्रें अलंकार देऊन बिदा केलें. ते पुण्यास आले. महादजी शिंदे गुजराथेंत न जातां मागें राहिले होते, ते मागून उज्जनीस आले. तुकोजी होळकर गुजराथची स्वारी करून खानदेशांत होते. त्यांजकडे महेश्वराकडे जाणें वांकडें. कारण सहा महिने दिवाणगिरी दादाजी गंगाधर यांणीं केली. ते बाईसाहेबांचे इतल्यानें जावें. पुनः नारो गणेश यांची मुक्तता व कारभार सुरू झाला. याचा इतला सगळा मातुश्री बाईसाहेबांस नाहीं. यामुळें बाईसाहेबांचे अंतःकरणीं संशयाचे पर्वत. तेव्हां महेश्वरीं जाऊन सफाई होणें इतकें पुण्य कोणाचेंही नाहीं. तथापि शमरुडाचे घाटें परभारें इंदुरास आले. मग महादजी शिंदे यांस इंदुरास बोलावून त्यांशीं बोलणें केलें कीं, "तुम्ही आमचे बंधू, ते पक्षीं मातुश्रीसाहेबांकडे जाऊन, आपसांतली सफाई करावी." तेव्हां पाटिलबावांनीं उत्तर केलें कीं, "श्रीमंत, मोंगल, भोंसले, या प्रकरणीं अधिकउणे जाब असल्यास त्यांतील व्यवस्था आपले मनोगतानुरूप घडून येईल. पण बाईसाहेबांपाशीं जाऊन यश यावें असें मनोत्साहास वाटत नाहीं. परंतु घरचें काम, ते पक्षीं जातों. घडेल तें खरें." असें बोलोन एक पालखी व चौघे खिजमतगार व दोन घोडे कोतवाल इतक्यांनिशीं महेश्वरास आले. बाईसाहेबांस समजतांच मुकुंदराव हरी दिवाण यांस सामोरे पाठवून बहुत समारंभानें किल्ल्यावर आणोन वाड्यांतच राहावयाची सोय केली. दुसरे दिवसापासून संपूर्ण कारभार, द्यावें, देणें, सुद्धां सोपला. जामदारखानेवाल्यास लाख रुपयेपावेतों परवानगी कीं, पाटिलबावांनीं लाख रुपये कोणास देवविले असतां द्यावे. आमचे परवानगीचा आक्षेप घेऊं नये. असा बंदोबस्त करून, त्रिकाल भोजन मुतपाकांत, त्यांत दोनप्रहरां पंक्तीस, प्रातःकाल सायंकाळ मावशीबाईस आणून नाना प्रकारचीं खाणीं त्यांचीं व ब्राह्मणाचे पदार्थ करवून आपण जवळ बसून भोजनास

घालावें. हा क्रम तीन महिने एकरूप चालला. पाटिलबावा बहुत प्रसन्न करून, अशा मावलीचे पोटीं जन्म घ्यावा अशा भावी बोलण्यांत, परंतु ज्या कामाकरितां आले त्या बोलण्याचा प्रारंभ केला असतां पाटिलबावांची रुरयात कांहींएक न ठेवितां, कायम करून समेटाचें पर्यवसानास येऊं दिलें नाहीं. शेवटीं पाटिलबावाही दिक होऊन बोलले कीं, "बाईसाहेब आपण इतकीं अंगवणाचीं बोलणीं बोलतां, परंतु आह्मी पुरुष आहोंत. आपले ढंगावर आलों असतां आपण काय कराल ?" याचें उत्तर, "जसें तुह्मीं आपल्या बाया सुपारीच्या खांडासारख्या तोंडांत टाकून गिळून गेलां, तोच बोध तुकोजी होळकरास करून उभयतां फौजबंदीनें येण्याचें करावें. इंदुरींहून तुमचें कूच, त्याच दिवशीं हत्तीचे पायांत अंडीं घालून तुमची खात्री करीन, तरच मल्हारजी होळकराची सून. तुमचे मनांत गुबार होता तो तुह्मीं बाहेर काढला. या गोष्टीस चुकाल तर तुह्मांस मार्तंडाची शपथ." मग पाटिलबावांनीं हंसल्यावर गोष्ट नेऊन मातुश्रीचें शांतवन केलें. तार ध्यानास आणिला. यश यावें ऐसें पाऊल दिसण्यांत येईना. सबब आज्ञा घेऊन इंदुरास आले. झालें वर्तमान सांगितलें. नारो गणेश यांनीं पाटिलबावांशीं वेगळे वाटें बोलले कीं, उभयतां सरदारांचें संमत घडेल तर आठां दिवसांत बंदोबस्त करितों. हें बोलणें पांच विश्वे महादाजीबावांसही रुचलें. मग सुभेदार यांचें मानस महादाजीबावांनीं पाहिलें. तेथें सुभेदारांचें उत्तर एकच पडलें कीं, "बाईसाहेबांचे पायापाशीं हरामखोरी मजकडून एकरूप व्हावयाची नाहीं. कदाचित् ढंग दोषेंकरून तिचे मनांत मजविषयींही पाप आल्यास मी हात बांधून रुबरू जाईन. मग ती प्राण घेवो व कैदेंत ठेवो. तें मजला कबूल आहे. परंतु हरामखोरी माझे प्राणांत प्राण आहे तोंपर्यंत होणार नाहीं. याकरितां दौलत उद्यां जात असेल तर आज जावो. मी जोडा संभाळून उभा राहीन. परंतु माझे वस्तूं ही गोष्ट सुतराम होणार नाहीं." असा खंबीर सुभेदाराचा पाहून पाटिलबुवा नारो गणेशांशीं बोलोन उज्जनीस गेले. नंतर सुभेदार कूच करून आल्या वाटेनें पुण्यास गेले.

नाना फडणिसांचे मनांत पूर्वदंश होताच. यामुळें वाफगांवीं राहणें पडून सरदारी गळाठ्यांत आली. तों इकडे दादासाहेब यांनीं अंग्रेजांशीं बोलणें केलें कीं, "आमची दौलत चोरापोरी लुटली जात आहे, ते पक्षीं सहा आणे घेऊन आमची मदत करून आह्मांस राज्यावर बसवावें." ही गोष्ट अंग्रेजांचे मनांत भरून पांच पलटणें व पापडसाहेब व इस्टुर फांकडा दोघेही बरोबर देऊन बोरघाटाखालीं आले. तेव्हां पुण्यांत हलकल्लोळ होऊन, पुणें जाळून बाहेर

पडावें असा विचार झाला. मग सुभेदारास पुण्यास बोलावून मसलतीचा प्रश्न केला कीं, "साहेबांनीं अरिष्ट आणिलें, ते पक्षीं आपणही पुणें जाळून मोंगलास सामील करून यांचे मागें लागावें असा बेत केला आहे." तेव्हां सुभेदारांनीं उत्तर केलें कीं, "धनीपणाची मुखत्यारी आपणांकडे. आह्मी ताबेदार. सांगाल तैसें करूं. परंतु आमचे मनास वाटतें कीं, आपण एक लक्ष धरून गर्भवासी श्रीमंतांची आज्ञा या क्रमावर दौलत नमुदास आणिली, ते पक्षीं मुरगीस बिसमिल्ला तो कशास? आपली फौज जमा करून बोरघाट धरावा. घाट चढून वरती होतील तेव्हां घडणें तें घडो. आपले हातें आज आपलें घर जाळावें असें तुह्मांस संकट तें काय?" ही गोष्ट नाना फडणीस यांनीं श्रवण करून बहुत संतोषातें पावले. मनांत विचार केला कीं, सरदार गळाठ्यांत असून समयास मसलतीची पैरवी उत्तम प्रकारची सांगितली. तेच समयीं सुभेदारांस फौज ठेवावयाची आज्ञा होऊन, वरकड सरंजामी जमा करून कांहीं इतलाखीचाही भरणा केला. तमाम फौज सुभेदारांचे हुकमांत चालावी ऐसी ताकीद होऊन बमय फौज सुभेदार घाटाचे तोंडीं आले. तों फिरंग्यांनीं एक पलटण ५०० माणूस, जय्यत चार तोफा, घाटावर चढवून लढाईचा मुकाबला घातला. त्या पलटणानें घाटावरून चौ तोफानें असा मार दिला कीं, पांच स्वार एके ठिकाणीं उभे राहूं दिले नाहींत. अशी दररोज लढाई चार महिने सतत झाली. ऐशी हजार फौजेचा मेळ असतां उमष खाऊं दिला नाहीं. यामुळें नानाही फार दिक झाले. मग श्रीमंतांनीं स्वदस्तूर चिटी सुभेदारांस लिहिली कीं, "आपण जातीनें ऐशी हजार फौज असतां, एका पलटणाचें पारपत्य न होतां फौज हवा खाऊन राहिली. तेव्हां आह्मांस जातीनें येणें लागेल कीं काय? आपलें उत्तर आलें ह्मणजे तसाच बेत करावयास येईल." असी चिटी घेऊन सांडणीस्वार सुभेदार घोड्यावर होते तेथें आला. चार घटका दिवस होता. गाशा टाकून चिटीचें वृत्त श्रवण करितात, इतक्यांत पांच माणसें एकत्र पाहून तोफेचा गोळा आला. चार महिने श्रमाची दगदग आणि चिटीच्या मजकुराच्या फांसण्या येणेंकरून चित्त विमनस्क होऊन डेऱ्यास आले. नंतर काशीराव होळकर, बापू होळकर, भिकाजी होळकर, मल्हारराव होळकर, चौघे पुत्र. त्यांत मल्हारराव होळकर याचें वय आठां वर्षांचें. तिघेजण बराबरीचे, काम करण्याजोगे. चौघांसही बोलावून आई, माई, जोरू, बेटी कांहीं एक विचार दुर्भाषणें बोलून, "श्रीमंतांचा मजला ओळंबा आला, ते पक्षीं उदईक मजला मरावयाचें. मग तुह्मांस उमजेल. कोणेही गोष्टीची बाकी ठेविली नाहीं." तेव्हां मल्हारजी होळकर लेंकरूं, काशीराव होळकर

एकांगहीन, भिकाजी होळकर ते होळकरच राहिले. बापू होळकराचे काळजास भोंक पडून, त्या प्रसंगीं कांहींएक उत्तर न करितां तेथोन बाहेर आल्यावर पागे बारगीर व शिलेदार सरदार यांस, प्रसंगास उपयोगी तितक्यांच्या घरोघर पालोपाल हिंडून, पदर पसरून पायावर डोकें ठेवून, मागणें मागितलें कीं, "सुभेदारांचा वृद्धापकाल, त्यांनीं श्रमसाहस या दौलतींत केलें, तें आपण कानांनीं ऐकिलें नाहीं, मग पाहणें तर दूरच ! हे सर्व गांवखुर्द होऊन या प्रसंगीं वृद्धापकाळीं त्यांस श्रीमंतांचा ओळंबा आला. तेव्हां त्यांनीं तर मरणाचा संकल्प केला. पण त्यांनीं मरावें व आपण वांचावें, या वांचण्यास धिक्कार असो ! आमचे मरणाचे सोबती व्हावयाचें असल्यास चौघडा आखर झाल्यावर अमुक जागा घोडें न घेतां पादचारी ढालतरवारेनिशीं त्या ठिकाणीं हजर व्हावें. वडिलांचे पुण्येंकरून कामकाज होऊन आल्यास दौलत तुमची आहे. वांटून खाऊं." या भावीं बोलणीं अस्तमानापासून दोन प्रहर रात्रपर्यंत एकेक माणसाशीं बोलून, आनंदानें रुकार दिला त्याचें नांव यादीवर लिहिलें. ज्यानें रडाच्या गोष्टी सांगितल्या, त्यास रामराम केला. ऐसी आसामी यादीवर १८०० आले. इतके सिद्ध करून डेऱ्यास जाऊन, घुटीची प्रार्थना यथास्थित करून, स्नान करून देवावर भंडार टाकून, सुभेदारांचें नांव घेऊन कंबर बांधली. संकेतस्थानीं आले. तेथें यादीबरहुकूम जमाव झालाच होता. कोणकोण यावयाचे तेही आले. एकत्र होऊन चाल केली. हें वृत्त कोणासही ठाऊक नाहीं. घाटाचे तोंडीं गेले. तोंपर्यंत पलटणवाल्यांसी ही खबर नाहीं. आठ कोसांचा छटा राहिला. त्यानें बिघडून जागा बिकट केली होती. जोंपावेतों पलटणवाल्यास समजलें नाहीं, तोंवर मुकाट्याच गेले. गडबड केली नाहीं. तोफेपासून गोळीच्या पल्ल्यावर बिकट पाहरे होते. त्यांनीं ऐकतांच, झडपून पाहरे कापून टाकिले ! तेथोन हजार बाराशें बंदुकींचा एकदांच ताशेरा दिला. दुसऱ्यानें मेण्यांतून काढून हल्ला केला. त्यांनींही छरे मारण्यांत कमी केली नाहीं. आठराशांत मेळ होईपावेतों ६०० राहिले. सहाशांनीं तरवार करून, पलटण दरोबस्त बुडवून, चारी तोफा अडीचशें माणूस परतून आले. यांत चोवीस पालखीनवीस व तेरा हत्तीनवीस कामास आले. याशिवाय पागे बारगीर यांची संख्या नाहीं.

हें वर्तमान सुभेदारांस समजलें. मर्जी प्रसन्न झाली. मेले, गेले, राहिले, इतक्यांचे घरोघर जातीनें सुभेदार हिंडोन, सर्वांची दिलजमाई करून, श्रीमंतांस पत्रें लिहिलीं कीं, "आज्ञेप्रमाणें पलटण कापून काढलें व इतक्यांत अंग्रेजांकडून सुभेदारापाशीं प्रेष आला कीं, तुमची दोस्ती आह्मांस तोडावयाची नाहीं. दादा-

साहेबांस तुमचे तुह्मीं आटोपून बंदोबस्त करावा. तुमची आमची दोस्ती पूर्वा-पार आहे, ती कायम करावी.'' असें बोलणें आलीयावर नानाकडे प्रेष पाठविला. त्यांनींही सुभेदारांवर ओझें ठेवून उत्तर लिहिलें कीं, आपण प्रसंगीं आहां. कळेल त्याप्रमाणें ठरावांत आणून साहेब हस्तगत करून घ्यावे. मग सुभेदारांनीं अंग्रेजांशीं बोलणें करून, दादासाहेब व सहा आणीचा लेख व कांहीं मसलतखर्च व दादासाहेबांचा ''जवाहीरखाना मुंबईस आहे तो आणून द्यावा. त्यांनीं उत्तर केलें कीं, जवाहीर व सहा आणीचा लेख हें कलकत्त्यास आहे. आह्मी चकती देतों. कोणास पाठवावें. घेऊन येईल. गुंता पडणार नाहीं.'' ऐसें बोलणें झाल्यावर मसलतखर्च व दादासाहेब व चकती आणोन हजर केली. मग सुभेदार पुण्यास आले. श्रीमंत जातीनें तीन कोस सुभेदारांस सामोरे आले होते. भेटीचे समयीं श्रीमंतांकडील व सुभेदारांकडील तोफखाना सुरू झाला. शनवारचे वाड्यांत आले. नाना फडणीस यांनीं शिरे दरबार सुभेदारांचें चार घटका स्तुतिस्तोत्र केलें. सुभेदारांनीं एकच उत्तर केलें कीं, चाकरी चाकरांनीं केली न केली, त्याचा इतका बडिवार कशास पाहिजे? इतकें बोलून विडे घेऊन मुजरा करून मुक्कामास आले. दुसरे दिवशीं बापू होळकरास भेटीस पाठवावें ह्मणोन निरोप आला. यांनीं बापूस बोलावून सांगितलें कीं, भेटीस जाणें. बापूंनीं उत्तर केलें कीं, ''मला श्रीमंतांशीं काम काय? आपण चलाल तेव्हां बराबरच चालेन.'' सुभेदारांनीं शिव्या दिल्या. हें वृत्त निरोप आणणारानें अवघें डोळ्यानें पाहिलें. मग सुभेदारांनीं त्या गृहस्थाशीं बोलले कीं, ''कारटा हट्टीखोर आहे. मी येईन ते दिवशीं बराबर घेऊन येईन.'' मग चौ दिवसांनीं सुभेदार गेले. तेव्हां त्यांचे बराबर बापूही गेले. सुभेदारांचे पाठीमागें दोघे खिजमतगार त्यांत आपण उभे राहिले. नानांनीं सुभेदारास विचारिलें कीं, ''बापू कोठें?'' तेव्हां बापूनें हात जोडून विनंति केली कीं, ''मी हजर आहें.'' नानांनीं पराक्रम तो ऐकिला. आचार हा पाहिला. येणेंकडून बहुत प्रसन्न होऊन, रावेर व कोंच महाल त्या दिवशीं जागीर करून दिली.

नंतर दादासाहेबांस झांशीचे किल्ल्यांत ठेवावें असा विचार. श्रीमंतांकडून हरी बावाजी व होळकराकडून जीवनराव पागनीस अवसरकर या उभयतांस बराबर घेऊन, साहेब कुटुंबसुद्धां झांशीस रवाना केले. मार्गांत हरी बावाजीचा जाच फार होऊं लागला. तेव्हां सौभाग्यवती आनंदीबाईनीं अमृतरावसाहेब यांजला सांगून ओंकारेश्वराचे अलीकडे तीन कोस मुक्काम, तेथून कूच करून पुढें जावें. तयारी झाली. घोड्यावर बसल्यावर अमृतरावसाहेबांनीं हरी बावाजी याचे गोटांत

येऊन मशारनिल्हे आंगरखा घालून घोड्यावर बसावें. इतक्यांत रावसाहेब कां आले ह्मणून यांचे समोर आले. तोंपर्यंत रावसाहेबांनीं हासडा मारून पाडले, आणि घोडा उडवून आपले सरंजामांत जाऊन तयारी होतीच. झांशीचा रस्ता सुधरून गुजराथचा रस्ता धरून पुनः अंग्रेजांकडे गेले. होळकराकडील व श्रीमंतांकडील सरंजाम राहिला. ते कूच करून देशीं गेले.

नंतर मल्हारराव होळकर, सुभेदारांचे द्वितीय कुटुंबाचे चिरंजीव, यांचें लग्न फार मोठें झालें. लांभाते यांची सोयरीक झाली. लग्नसमारंभ फार मातबर झाला. लग्नांत विघ्न, कचेरीचा मांडव जळाला ! लाखों रुपयांचें नुकसान झालें ! कांहीं माणसेंही जाया झालीं. श्रीमंत व नाना फडणीस लग्नास आले होते. नंतर श्रीमंतांचें लग्न झालें. नंतर टिपूनें खंडणीचा ऐवज द्यावयास लबाडी करून फौजबंदीनें काकडावर मुक्काम केला. तेव्हां मसलत प्राप्त होऊन हरिपंत-तात्याबरोबर फौज देऊन भोंसले, मोंगल सामील करून, हरिपंततात्या व सुभेदार व मोंगलाकडील फौज व भोंसल्याकडील फौज मिळून लाख फौजेचा जमाव करून टिपूचे मुलुखांत शिरले. सावनूर बंकापुरावर लढाई मातबर होऊन टिपू उधळून आपले मुलखांत गेला. मागें हेही दरकूच चालले. टिपूचा कागदपत्र येणें तो सुभेदारांकडे यावा. इतराशीं त्यानें गरज ठेविलीच नाहीं. नादीं लाऊन श्रीमंतांचे फौजेवर छापा टाकावा, हा मनसबा करून तयारी केली. हें वर्तमान सुभेदारांस समजतांच, अवघे सरदारांस इतला करून, बुणगे पिछाडी डोंगर याचे आश्रयानें अलीकडे ठेवून, सडे भारी घोडा राऊत असा सर्वांस इतला केला. कोणीं ऐकून घेतलें. मोंगल भोंसले यांनीं थट्टा केली कीं, सुभेदारांस ह्मातारपणीं फार दिवस वांचावें हा अभिलाष उत्पन्न झाला आहे, अशा भावीं बोलले. तें सुभेदारांचे कानावरही आलें. तथापि क्षमा करून, आपले बुणगे दामदस्त राहुटी पाल पडदे बेल बाधी या कांहींएक न ठेवितां, एक बिचोवा पलंग मात्र ठेविला. बाकी आपला गोट सडा जगरा केला. तों मागील प्रहर रात्र राहतां गोळा चालला. मोंगल भोंसले यांचे येथें रामजानीचा तमाशा होत होता. ते जेथील तेथें राहून प्राण घेऊन निघावयास मुष्कील पडली ! त्या काळीं अवघ्यांस वाटलें कीं, सुभेदार सांगत असतां आपण हयगय केल्याचें फळ पावलों. मग टिपू-सुलतानानें फौज लुटून नेऊन वेगळाली उभी केली. त्यांत सुभेदारांकडील एक ह्मातारीचा बैल, जातें व पाळ ! तेव्हां त्यास आश्चर्य वाटलें. ज्यांनीं हिंदुस्थान काबीज केलें, तेथें अशा सावधानीनेंच राहिले ह्मणून गुजारा झाला. नंतर टिपूसुलतान यानें लूट सुतळीच्या तोड्यासुधां ज्याची त्यास पावती केली. सुभेदारांकडील ह्मातारी तिजला साडी चोळी देऊन, एक बैल मातबर देऊन

बिदा केली. पुढें दो चौ महिन्यांनीं सुभेदारांचे विद्यमानें खंडणीचा ठराव ठरून, पैका चुकवून देऊन, तमाम फौजा मुलुखांतून काढून दिल्या. पुणें मुक्कामीं आल्यावर सुभेदार वाफगांवास आले.

इकडे हिंदुस्थानांत महादजी शिंदे उज्जनीस होते. गोहदकर जाट यांचा इरादा, ग्वालेर द्यावी, हें कायवाङ्मनःपूर्वक. परंतु जातीचें अंगवण थोडें. तथापि उद्योग करीतच होता. तों ग्वालेर श्रीमंतांनीं शिंद्यांस दिली. त्याच्या सोडचिटी घेऊन अंबोजी इंगळे ग्वालेरीस आले होते. अशा संधींत जाटानें कानपूर छावणींत फिरंग्याशीं पैगाम लावला. "पांच लक्ष रुपये आह्मीं तुह्मांस देतों. तुह्मीं ग्वालेरीचा किल्ला घेऊन आह्मांस द्यावा." त्यांनीं कबूल करून, चार पलटणें रवाना केलीं. त्यांनीं येऊन किल्ल्याची बदली होती असी संधी पाहून, उरवाईचे माजी किल्लेदाराकडील जमादार होता, त्याजला पंचवीस हजार रुपये देऊन, फितुरांत आणून त्या मार्गी किल्यावर चढून आले. हें वर्तमान माजी किल्लेदार गोविंद शामराज यांजला समजतांच त्यांनीं तरवार धरली. ते सावध, हे बेसावध. तथापि निमक खाण्याची शर्त करून जुवामर्दीनें देहअवसान जाहलें ! लौकिक त्यांचा जाहला. ग्वालेरसारखा किल्ला एकाएकीं हातीं आल्यावर अंग्रेज हमराहा होऊन शिरोंजेकडे चाल केली. अंबोजी इंगळे फिके पडून उज्जनीस आले. तेव्हां अंबोजीबरोबर महादजी शिंदे यांनीं दहा हजार फौज देऊन, फिरंग्याचे मुकाबल्यास रवाना करून, श्रीमंतांस पत्र लिहिलें कीं, "ग्वालेरप्रांतीं फिरंग्याची पलटण येऊन ग्वालेर घेऊन पुढें चाल करून शिरोंज घेतली. आह्मींही त्यांचे मुकाबल्यास अंबोजी इंगळे दहा हजार फौज देऊन रवाना केले. सांज सकाळ आह्मीही कूच करून जातों. फौजेची खर्चाची मदत झाली पाहिजे." असें लिहून आपणही अंबोजीचे मागें चार मजलीचे अंतरानें राहत गेले. अंबोजी इंगळे यांचा व पलटणांचा मुकाबला लागला. समोर मुकाबला करून लढाई करावी, तर पुरें पडणें हें तर कठीणच. परंतु खांद्यावर भाला टाकून, भोंवताले हिंडून, रसद चारा पाणी यांजवांचून जेर केलें. मागें महादजीबावा हा दबाव, सबब पुढें चालावयाची हांव सोडून, मागें ग्वालेरीचे मैदानांत आले. तेथें अंबोजी इंगळे व महादजी शिंदे एकत्र होऊन घेराघेरी आरंभिली. ऐसा क्रम ८ महिने चालला. कज्याखीचें आंग महादजी शिंदे यांजला हीन अंगामुळें कमी; सबब बेजार झाले. मग मातुश्री बाईसाहेबांस पत्रें पाठविलीं कीं, फौजेची मदत करावी. त्यावरून बाईसाहेबांनीं बाळुजी इंगळे सरदार व राजाराम रणसोड बराबर देऊन, दहा हजार फौजेनिशीं शिंदे यांस सामील झाले. क्रम तोच घेराघेरीचा प्रसंग. त्यांत

पलटणवाल्यांनीं महादजी शिंदे मागें असतां असी बातमी ठेऊन, चार तोफा, एक पलटण शिरोंजचे सुमारें जाऊन, तिकडून उलटून महादजीबावांवर छापा टाकला. पाटिलबावांस जिवंत धरावें असा समय प्राप्त झाला होता. होळकरांकडील फौज बाजूस होती. त्यांस समजल्यावर, सरदार धरला जातो जाणोन, मागील चार घटका रात्रीचे संधींत घोडें घातलें. पलटणें कापून चारी तोफा घेतल्या. फत्ते झाली. व पुढें अघाडीस अंबोजी इंगळे यांनींही एक पलटण झामडलें. नक्ष जमला असतां महादजी शिंदे यांनीं हैबत खाल्ली. छापा खाल्ल्यावर तिसरे दिवशीं, मागील चार घटका रात्र आहे तों, बाळाराव दिवाण व राघो मल्हार पोतनीस यांनीं मसलत केली. फौज कमी. तेही खर्चाचे अडचणीमुळें तन देईना. तेव्हां जातीनें उज्जनीस जाऊन खर्चाची सरबरा व देशीं लिहून आणखी फौज आणून मुकाबल्यास यावें असा मनसबा सिद्ध करून, राजाराम रणसोड होळकरांकडील यांजला बोलावून बराय मसलत विचारली कीं, "आह्मीं असा विचार काढला आहे, ही गोष्ट कसी ?" मग राजाराम रणसोड यांनीं बहुत निषेध केला कीं, "उज्जनीस जाऊन मसलतीचा सजल पाडणार, तोंपर्यंत समोरचा हरीफ तुमची येण्याची वाट पाहील कीं काय ? उज्जनीस येऊन गोळे करणें त्यास अवघड तें काय ? यास्तव मसलतीचा सजल येथील येथेंच करणें ती करावी. पुण्याहून फौज व खर्चाची सरबरा होऊन त्या भरंवशावर यांसी पुरें पाडणें हें घडत नाहीं. तुह्मांस न तोले तर नजीबखान दिल्लीचा वजीर याजपाशीं लाख स्वार व तीन लाख पायदळ व बारांशें तोफा चालू आहेत. त्याजकडे वकील पाठवून पुढें मुलूख सोडविला जाईल. त्याची सहा आणी त्याजला कबूल करून त्याची फौज आणवावी ह्मणजे सहजच इभ्रत पडेल." ही गोष्ट पाटिलबावांचे मनास रुचून, अत्याजी तुमचा त्याचा विशेष मेळ आहेच. तुह्मीं हें काम करावें. मग याचे सरदार त्रिंबकजी इंगळे पैक्याचें झाड. फौज खर्चाचें तोंड. सबब इंगळे यांनीं आपलें अंग काढून सरदारी राजाराम रणसोडदास याचे गळां घातली. नित्य गांड घोडें खर्चाची अनुपत्य जाणोन, येथें राहण्यांत आपली पुरें पडत नाहीं. महेश्वरास उठून जावें तर नाकाबली येती. तेव्हां ही मसलत कबूल करून, पंचवीस हजार रुपये पाटिलबावांपासून घेऊन दरकूच जयपुरास आले. जयपुरीं हिंमतबहादर गोसावी मशारनिल्हेस भेटले. त्यास त्यांनीं मसलतीचा ओघ सांगितला. त्यांनीं उत्तर केलें कीं, "तुमचा आमचा भाईचारा, ऐकाल तर नेकसल्ला सांगूं." पंत मशारनिल्हे यांनीं उत्तर केलें कीं, "या विदेशांत आह्मांस तुमच्यासारखा रफिक कोण ? सरकारची फौज कायम राहून गुजरा चालेल ऐसें कांहीं सांगावें." मग गोसावी

बोलले की, "नजीबखान तुह्मीं पाहिला, तो आतां राहिला नाहीं. दिल्लींत आल्यावर नेकबंद, खरीच चाल, एक भाषण, तें कांहींच राहिलें नाहीं. आह्मी रात्रंदिवस जवळचे राहणार, त्यास सहा सहा महिने वर्ष वर्ष आमचें दर्शन नाहीं. तेव्हां तुह्मी जाऊन तुमची भेट होयास वर्ष सा महिने पाहिजेत. इतक्यांत तुह्मी खर्चाचे कोचवणींत येऊन डेऱ्याचे दांडे होतीलना! शिंद्यावर उपकार व धन्याची चाकरी. यास्तव आमचे मतें तुह्मीं याच जिल्ह्यांत काळ काढावा हें चांगलें." कोणे रीतीनें काळ काढावा? तेव्हां हिंमतबहादर बोलले कीं, "आह्मी नवाबापाशीं त्रासून येथें आलों. राजास शपथ केले. त्याचें ह्मणणें भाईभेट यांनीं आह्मांशीं फेरबदलीच्या गोष्टी करतात. यांत एकादोघांचें पारिपत्य केलें असतां जरब पडून बंदोबस्त होईल. तुह्मीं ही गोष्ट करावी. त्यास आह्मांस या जिल्ह्यांत काळ काढणें. सर्वांशीं भाईचारा. वाईट कोणाशीं व्हावें? यास्तव तुह्मी विदेशीं. तुह्मांपासून ही गोष्ट घडावयाजोगी तुमचा व राजाचा मेळ करून देतों." यांनीं उत्तर केलें कीं, "टोंक, रामपुरा हे आमचे महाल. हे अंकलेश सोडून देऊन बाईसाहेबांशीं सफाई करावी ह्मणजे आह्मांस राहण्यास प्रशस्त. पोटापाण्याचा बंदोबस्त करावा. सांगाल तरी चाकरी करूं." त्यांनीं कबूल करून राजाशीं बोलणें केलें. त्यांनीं ही गोष्ट कबूल करून यांच्या त्यांच्या भेटी झाल्या. त्यांनीं टोंक, रामपुरा, अंकलेश सोडून, विसा लक्षांची जायदाद फौजेस लाऊन देऊन, कामकाज सागण्याचें तें सांगितलें. बाईसाहेबांचें संमत आणून तेथें राहिले.

इकडे फिरंग्यांचे पलटणास घेराघेरी चाललीच होती. तों काशीचा राजा चेतसिंग यानें जमीयत करून फिरंग्याचीं पांच पलटणें कापून काढलीं. काशीचे राज्यांत टोपी पाहिली असतां कंठस्नान घालावें हा क्रम चालला. तेव्हां पलटणास पायबंद पुरकस बसला. मग त्यांनीं पाटिलबावाशीं सलूख करून निघोन गेले. जाट गोहदवाला फिका पडला. मग पाटिलबावांनीं ग्वालेरचा किल्ला घेऊन तमाम अंमल फैल केला. शेवटीं गोहदही घेतली. जाटास धरून कैद केलें. तों इकडे नजीबखानाचा काळ दिल्लीस झाला. तेव्हां सुनें रान पाहून, चमडावती उतरून आग्र्याचा किल्ला घेतला. त्या समयीं लाला नौबतराय कोणी कायस्थ पाटिलबावांचे तोंडीं लागला होता. त्याजला फौजेची कंपूची बक्षिगिरी सांगून, जिवबादादा, बाळोबा तात्या वगैरे शेणवई यांचें कांहींएक न चालतां, लाला नौबतराय सांगेल ती पूर्वदिशा. आग्रा येथील किल्ल्यांत अंमल फैल करून जयपुरचे मुलखांत स्वारी आली. जैपुरवाल्यांनीं, जोतपुरवाले व अमदानी, नजीबखानाकडील सुभा व आपली जमीयत एकत्र करून, लालसोडचे मुक्कामीं मुकाबला केला. अमदानी

यानें हवा पाहून, लाला नौबतराय याजला तीन लक्ष रुपये देऊन फितूर केला. लढाईचा मोहरा यांचा त्यांचा लागला. एक दिवस तर फितूर समजण्यांत आला नाहीं. दुसरे दिवशीं निकराची लढाई, पलटणें कंपू मुकाबल्यास उभा. एक ताशिरा खालीं चालवून लाला नौबतरायसुद्धां पलटणें उठून गेलीं. राठोडांनीं हल्ला केला. पाटिलबावांस जिवंत धरून द्यावा हा इरादा. तो ईश्वरी कृत्य. अमदानीस हत्तीवर गोळी लागून कामास आला. त्याची फौज बेबाद होऊन गेली. जैपुरवाले लबाडच, तेही तारगोवारगी राहिले. राठोडांनीं निःसीम चालवून घेतलें. महादजीबावांस धरून द्यावें. तों विंचूरकर यांनीं आडवें घोडें घालून राठोड थोपवून कटा केला. यामुळें पाटिलबावांस सवड पाऊन ग्वालेरीस आले. पागोटें टाकून फेटा बांधला. जुने मुत्सद्दी यांचे गळां हात घातले. केल्या कर्माचें फळ पावलें. आतां संभाळावयाचें असल्यास संभाळावें. तेव्हा सर्वांनीं विचार करून मराठे फौज हमराहा केली. आग्र्याचे किल्ल्यास बादशाही संरजामपैकीं नजीबकुलीखान यानें आग्र्यास मोर्चे लाविले. किल्ल्यांत लखोबा अंतरीवाला होता. यानें खूप किल्ला लढवून ग्वालेरीस पत्रें पाठविलीं कीं, कुमक आल्यास उत्तम आहे. आतां आमची पराकाष्ठा झाली. तेव्हां फाळके वगैरे पथकें थोरल्या लखबाच्याबराबर देऊन आग्र्यास किल्ल्याचे मदतीस पाठविले. यांनीं जाऊन, नजीब कुलीखान आग्र्याचे किल्ल्यास लागला होता, त्याशीं लढाई करून मोर्चे उठविले. मथुरा वगैरे ठाणीं कायम केलीं. इकडे रजवाडे मात्र लहान मोठे एकत्र होऊन विचार केला कीं, दक्षण्यांचा अंमल ज्याच्या जिल्ह्यांत, त्यानें उठवून द्यावा. ऐसीं पत्रें रामपुरा व सावेर व इंदूरपर्यंत आलीं. या मसलतीस रुकार बुंदी कोटेवाले यांचा मात्र पांच विश्वे. तुमचा अवघ्यांचा नमूद सिद्ध झाल्यावर आह्मांसही करणें अवघड तें काय? असा लपेटवार रुकार देऊन, तरतें बुडतें पहावें या बेतांत. बाकी चंद्रावतांनीं रामपुरा घेतला. उदेपुरची दहा हजार फौज येऊन निंबहेडा, जावद वगैरे ठाणीं उठविलीं. सावेरचे जमीदार देखील बाहेर पडले होते. राणाजीची फौज येऊन निंबहेडा, जावद वगैरे ठाणीं उठविलीं. तेव्हां बाईसाहेबांनीं आंबाजीपंत, राघो रणसोड पागनीस यांचे मावसबंधू, यांचेबराबर हुजरात सरंजाम दीड हजार व कांहीं शिलेदार ऐसी तीन हजारांची भीडभाड त्याचे मुकाबल्यास पाठविलीच. चकरडा प्रांत मेवाड येथील मुक्कामीं राणाजीचे फौजेनें दोनप्रहरां छापा घातला. अंबाजीपंत मारले गेले. फौज रणभरी होऊन जावदेस जमा झाली. हें वर्तमान महेश्वरीं मातुश्रीसाहेबांस समजतांच, आबाजी रणसोड पागनीस यांचे डेरे बाहेर करून, शरीफभाई निसबत पागा हुजरात याजला

पाठवून, करवंदीप्रमाणें थालनेर येथें पेंढारी पडले होते ते दरोबस्त आणून, जमादारांस मेजवानी करून वस्त्रें दिलीं. आणि ताकीद केली कीं, "मेले हो, तोंड दाखवावयास आलां, तर मेकसू घालून मारून टाकीन. मेवाड होतें कीं नव्हतें असें करून टाका." पेंढारी व आबाजी रणसोड व शरीफभाई रवाना झाले. शिलेदारांची तार बांधवून दिली. परंतु चकरड्याची लढाई मारल्यावर मेवाड हमराहा होऊन चंद्रावतांकडून रामपुरा घेवविला. तेव्हां उज्जनीस शिंद्यांकडील कुटुंबें होतीं. त्यांचें धैर्य हत होऊन, महेश्वरास पत्रें बाईसाहेबांस आलीं कीं, "आह्मी आपलेजवळ येतों." त्यास उत्तर बाईसाहेबांनीं लिहिलें कीं, "आल्यास तुमचें घर आहे. परंतु नक्षास बाध पडतो. तसाच प्रसंग पडल्यास तीन प्रहरांत तुमचेपाशीं दाखल होईन; घाबरूं नये." असें उत्तर लिहून खाजगत डेरा बाहेर दिला. तेथें रोज फौजेची हजरी. शंभर स्वार आले ते रवाना केले. पन्नास आले ते रवाना केले. पांचशें आले ते रवाना केले. आबाजी रणसोड व शरीफभाई तिसरे दिवशीं रामपुऱ्यास गेले. जातां जातांच मोर्चे लागले. हें वर्तमान मेवाड्यांस समजतांच कूच करून दोन मजला चळद उतरून आले. हें वर्तमान आबाजी रणसोड व शरीफभाई यांस समजतांच रामपुरीयाचा शह सोडून संजीतीस मुक्काम केला. त्याचा यांचा छटा सा कोसांचा राहिला. तेव्हां रांगड्यांस खबर जातांच, दबाव पडून चळद उतरून गेले. सडा स्वार उतरून गेला. बुणगे चळद उतरत होते. इतक्यांत पेंढारी पोंचून बुणगें लुटून आणिलें. दोनशें उंट व दीडशें घोडें शिवाय बैलबधीया घेऊन आले. शरीफभाईंनीं आबाजी यांजला सांगितलें कीं, तुह्मी कूच करून चला, खडेदम लुटून घेतों. परंतु उभयतांनीं ऐकिलें नाहीं. मग मकाजी गिते शिलेदार यांचे तैनातीस होते. त्यांजला दम देऊन अर्ध रात्रीं कूच करून पेंढारी घेऊन गेले. आबाजी शरीफभाई यांजला न पुसतां यशाचा अभिलाष सर्वत्रास मुकाबलयास गेले. तेथें रांगड्यांनीं बुणगे काढून सडा स्वार उभे होते. अंधाराचा मामला. यांच्या मतें कालच्या सारखे बुणगेच आहेत. पेंढारी यांनीं तोंड लाविलें. तोंड लावतांच रांगड्यांनीं सडकले. तों पांच चार पेंढारी जाया होतांच यांनीं पळ काढला. दामदस्त पेंढारी नाहींसा झाला. इकडे लष्करांत खबरही नाहीं. मागील सा घटका रात्र राहतां फौजेचें कूच होऊन दिवस उगवतांच चळदचे कांठीं मुक्काम झाला. कोणी खोगीर उतरलें, कोणी उतरतो, कोणी घोड्यावरच, तों नदीचे पार फौजेचा धुराळा उठून राहिला. पेंढारी दोन दोन कोसांवर तुंगचे तुंग उभे. तों रांगड्यांनीं मकाजी गिते यांस जिवंत धरावें अशा भावीं गराडा घातला. मकाजीपाशीं पागेचे स्वार मात्र दहा बारा. मकाजी गिता

जुवामर्द, जातीनें शिपाई. हासड्याचे बळें रांगडा जवळ फटकूं दिला नाहीं. तशांत गांडीखालील घोडा पडला. तेव्हां पायउतारा मरणोन्मुख होऊन हातांत भाला, स्वार जवळ येऊं दिला नाहीं. इतक्यांत मशारनिल्हेच्या पागेचा कारकून नारो सिद्धेश्वर व चोपदार बोंब मारीत आले. त्या रांगड्यांची सरशी ऐकून पेंढाऱ्याचे बुणगे कांठाशीं होते, त्यांनीं आवळाआवळ करून मल्हारगड पाहिला. मग आबाजींनीं केशवराव फणसे तीनशें स्वाराचें पथक रवाना करून पार उतरून दिलें. त्यानें जाऊन मकाजी गिते यांजला शाबुतीनें काढून आणिलें. तों रांगडे हमराहा होऊन, पन्नास राऊत उठून फणसे यांचे मागें लागले. हे त्या स्वारांशीं खेळत खेळत येत आहेत. रांगडे गालभ, ते आबाजी व शरीफभाई डोळ्यानें पाहतात. दरम्यान नदी मात्र. तों आबाजीपाशीं शंभर राऊत हुजरातीचा. भरंवशाचीं माणसें. हे घेऊन, नदीचे कांठीं येऊन, ठासण करून गोळ्या मारूं लागले. त्यांत ईश्वरी कृत्यानुसार रांगड्यांचे पन्नास स्वारांत अग्रगण्य पंजू जमादार सिद्धी व मालजी मेहता व चतरसिंग चेचाणी व बहादरसिंग सादुडीवाला आणखी एक दोन यांला गोळ्या लागून कामास आले. बाकी राहिले ते गलबलले. तों शरीफभाई यांचे हातास रामपुऱ्यावर गोळी लागली होती. रांगड्यांचे स्वार गलबलले पाहून, नदींत घोडा घालून पार झाला. तों मागाहून निराजी शामराज हुजरातचे स्वार घेऊन तोही उतरला. रांगड्याचे राहिले स्वार तेथेंच कापून टाकले. पुढें घोडे उचलले. तेही हें चिन्ह पेंढारी जवळपास होतेच त्यांनींही उठावणी केली. तों मारीत मारीत एकलिंगजीपर्यंत गेले. कंपेश घोडे पांच हजार लुटीचे आले. त्यांत हजार बाराशें मेहनतीचे श्रमानें मेले. बाकी लूट कायम आली असेल, ती पेंढारीचे पेंढारी जाणेत. सादडीवाला राजे सुलतानसिंग धरला आला. दुसरे दिवशीं कूच करून जावद, निंबहेडा, राणीपुरा वगैरे किरकोळ महालांत ठाणीं बसवून रामपुऱ्याकडे आले. रामपुराही साताविसा दिवशीं अंमल झाला. चंद्रावत पळून अमदेस गेले. अमदेस मोर्चे लागले. जवाळा(?) तोफ रामपुऱ्यास होती ती आणली. मोर्चे जमवून जवाळा जाया होती. निमे बार भरून एक गोळा मारला. इकडील अलंग फोडून, भवानीसिंग चंद्रावत निजला होता त्याचे वरील खपरेल उडून पलीकडील सफेल फोडून गोळा पार झाला. त्यांतच त्याचे टाके ढिले झाले. दुसरे दिवशीं हल्ला करावा असा आबाजी रणसोड, शरीफभाई यांचा विचार ठरल्यावर हें वर्तमान चंद्रावतास समजलें. त्यांनीं मार्गांत दारू बिछावून दिली कीं, हल्ला येतांच बत्ती द्यावी, ह्मणजे माणसें उडून जातील. अशा भावीं दगा केला. इकडे मार्तंड साध्य. हल्ला आला नाहीं तों अगोदर, भवानीसिंगाचे बंधू

सोभागसिंग किल्याबाहेर जागजागां माणसें बसविण्यास आले. त्यांतून तोड्याचा गूल पडून दारूचा भपका उडाला. तों पन्नास माणूस जळून जातीनें सोभागसिंग चंद्रावत फार जळाला. इतक्यांत हल्ला जाऊन पोंचला. त्याजला उचलून नेण्याचें किल्लेवाल्यास न बनतां किल्यांत सांपडला. परंतु किल्लेवाल्यांनीं हल्ला मारून काढला. सोभागसिंगास घेऊन आले. त्यानें रदबदल फार केली. परंतु न ऐकतां सोभागसिंग चंद्रावत यास तोफेच्या तोंडीं देऊन उडवून दिला. चंद्रावतांत शूरत्वाचा व कर्तृत्वाचा तोही खर्चीं पडला. तेव्हां भवानीसिंगाची हिंमत न पुरतां तीनशें स्वारांनिशीं रात्रौ पळून गेला. चहूंकडून जलुष वाढून पूर्ववत् बंदोबस्त राजास राज्य, प्रजास चैन. पुण्यास खबरा गेल्या. नाना फडणीस यांस वर्तमान समजून तोफा सोडून शिरे दरबार बाईसाहेबांचें स्तुतिस्तोत्र सहा घटिकांपर्यंत गेलें. शापादपि शरादपि असे बायकांत अहिल्याबाई दिसण्यांत आली. आजपावेतों स्नानसंध्या धर्माची प्रवृत्ती ऐकण्यांत येत होती. आज पराक्रमाची गोष्टही मोठीच केली. पुण्याचा दरवाजा ह्मणजे माहीष्मती नर्मदातीरचे आह्मांस आज समजलें. संपूर्ण मानकरी सरदार यांनीं माना डोलविल्या.

पाटिलबावा ग्वालेरीस, फौजेची कमती, खर्चाची अडचण, बदनक्षीचा बुरखा यामुळें रात्रंदिवस चैन नाहीं. तेव्हां शेणवाई माणसें मोठीं. सदाशिव भाऊ व जिवबादादा व बाळोबातात्या आदिकरून यांनीं आपसांत छाती चालवून पंचवीस लक्षांची तजवीज करून, देशीं जांबगांवीं बाळाजी जनार्दन होते त्यांजकडे कांहीं ऐवाजाचा भरणा करून, दहा हजार फौज नवी कलमजारी करून आणविली. त्यांनीं फौज ठेवून, बापूजी जनार्दन कनिष्ठ बंधूसमागमें देऊन फौज रवाना केली. तेही अमद मुक्कामीं येऊन पावले. त्या काळीं ग्वालेरीहून शिंदे यांचीं पत्रें दिवसांतून दोन तीन आबाजी रणसोड, शरीफभाई यांस येत होतीं. यांचेही मनांत मदतीस जावें. तों देशीहून सुभेदार, शिंदे सोबती अडचणींत यास्तव नाना फडणीस याजशीं बोलणें केलें कीं, "सोबती अडचणींत. आह्मांस आज्ञा द्यावी. आह्मी मदतीस जाऊं." त्यांनींही विचार करून उत्तम आहे ह्मणून शिरस्त्यान्वयें बिदा केलें. पुण्याहून वस्त्रें घेऊन माहीष्मतीस आले. अगोदरचे दंश, त्याची सफाई पांच वर्षें संशयाची निवृत्ती तुकोजी होळकर सुभेदार यांचे लक्षांतील निदर्शनें परभारें झालीं. यामुळें श्रीमंत दयाळ, कागदीपत्रीं सफाई झालीच होती. आज्ञा घेऊन हिंदुस्थानांत जाण्याचें संमत, अगोदर बाईसाहेबांचें आणून, मग नानाशीं बोलण्याचा उपयोग. श्रीमंतांकडून बिदा होऊन महेश्वरीं आले. भागाबाई, काशीराव होळकराची कन्या, हिचें लग्न करून कालगावडे मोत्याजी

बावाचे पुत्रास देऊन, अंबोजी इंगळे शिंदे यांजकडून आले. ते सालशी दाखवावयास गेले. स्वार सरंजाम उज्जनीस ठेवून, एक पालखी, एक घोडा, पांच चार शागीर्दपेशाचीं माणसें असीं जांबेपर्यंत येऊन, तेथें शागीर्दपेशा अवघे टाकून, एक घोडा दोन माणसें घेऊन शहरांत आले. घोडा माणूस शहरांत सोडून, एक माणूस आपण रोजची प्रवृत्तीसारखे जाऊं लागले. ते किल्ल्याचे दरवाजांत जाऊन बंगल्यांत शिरून रामराम मातुश्रीस करून बसावयास लागले. मातुश्रीसाहेबांनीं ओळखून डोळे फाडून बोलली कीं, "मेले हो, सोदे हो, चार सोदे मिळून शिंदे यांचे दौलतीस धक्का दिला. तसी बयमानी करून येथेंही छद्म करूं पाहतां. परंतु मेखसू घालून डोकसें फोडून टाकीन." ऐसें बोलून शिरेदरबार उठवून दिलें. करावयास गेले साधकपणा, त्यास श्रीमंतीचे समजण्यांत आलें कीं, लबाडी करून चवकशीस बट्टा काढला. हे समजुतीस येऊन जरब दिली. तो साधला. गोविंदपंतदादा खाजगीवाले यांजकडे जाऊन, लाख रुपये नजर देऊन, त्याच दिवशीं मर्जी संपादून लौकिकीं व्यंग दिसूं दिलें नाहीं. पुढें सुभेदार कूच करून चालले. तेव्हां पुढें काशीराव होळकर यांचे बरोबर फौज व पांडुरंग शंकर मुखत्यार करून देऊन, पुढें रवाना करून, मागाहून खासा स्वारीचे डेरे बाहेर होऊन पंधरा दिवसांत कूच झालें. मेवाड येईतोंपावेतों इंगळे बराबर होते. भिलाड्याचे मुक्कामीं आलीयावर आपला प्रसर होत नाहीं असें पाहून, युक्तीनें आज्ञा घेऊन ग्वालेरप्रांतीं गेले. भिलाड्यास मुक्काम फार झाले. तळ सडक चार कोस. मागें पुढें होण्यांत बमण्याची गढी चौबुर्जी त्या गढीवरून रव पडली. ठाकूर पांच सात दहा माणसें पारावर बसलीं. सरकारस्वारी निघून गेली. भेटी केल्या. सर्वांशीं रामरामी झाली. रवेचा तमाशा पाहत बसले होते. तों जिवबाआणा सबनीस यांचे बंधू यांस कांहीं गैरआराम सबब पालखींत होते. यास बिगारी पाहिजे होता ह्मणून गांवकऱ्याकडे जासूद पाठवून बिगारी आणविला. ठाकरानें उत्तर केलें कीं, आह्मी भले माणूस शिपाई बसलों आहोंत. गांवांत माणूस असल्यास बेगारी आणून देऊं. असें माणसानें येऊन सांगितलें. यांनीं तोराखालीं सांगितलें कीं, त्यांतून एक ओढून आणावा. तेव्हां जासूद पुनः जाऊन एकास ओढलें. तों गांवचा ठाकूर ओढून आणला. त्यानें बहुता प्रकारीं सांगितलें कीं, मी ठाकूर गांवचा आहें. क्षण दम धरा. बिगारी आणून देतों. असें नरम बोलतांच, सबनीस यांनीं शिवी दिली. शिवी ऐकतांच तरवार मेणांतून ओढून सबनिसावर हात टाकिला. तों पिंजणी नव्हती. दाढी तोडून गर्दन एका हातानें वेगळी केली. आणखी दोघे चौघे जरबाऊन गांवांत गेले. सबनिसाचें वर्तमान सुभेदाराला समजतांच स्वारी माघारी

आली. येतांच गराडा घालून हल्ला केला. रांगड्यांनीं तीन मारून काढले. मग शेवटीं सुभेदारांनीं बापू होळकर यांजला शिव्या दिल्या. तुह्मीं एकीकडे व्हावें. आह्मी हल्ला करतों. मग बापूसाहेब पायउतारा होऊन कुदून पडले. गढीच्या चारी अलंगा मजबूत, चढावयाचा लाग नाहीं. मग सयदूभाई यानें गोळे–माणसाचे डोकीवर हातावर गोळा, त्यांत हात घालून वर चढावें असे हातावर गोळा, अशा तऱ्हेनें हल्ला चढला. त्यांत रजपुतांनीं गोळ्या मारल्या. तेल कढवून टाकिलें. दगड जात्याच्या तळ्या त्याही वर टाकिल्या. यांत माणूस जाया फार झालें. नक्षावर नजर. बापू होळकर जातीनें आंत कुदून दरोबस्त कापून टाकिले. एक बायको होती, ती मात्र मारली नाहीं. जिवंत धरून आणली. गढींत अर्थ पाहतां एक्या मडक्यांत पावशेर दारू, त्याशिवाय धान्य अथवा कांहींएक नाहीं. त्या बायकोस लुगडेंचोळी देऊन सोडून दिलें. माणूस जखमी अतोनात झालें. ऐशी हजार रुपये जखमीना लागला. त्याशिवाय बक्षिसा. नक्षामुळें इतकें करणें प्राप्त. शिवाजी बल्लाळ प्रस्तुत हुजूर आहेत. त्यांचे घरचे पुरुष या दौलतींत याजसुद्धां तरवारीखालीं आठरा कामास आले.

तेथोन अल्लीबहादरासुद्धां कूच करून मथुरेसुमारें महादजी शिंदे यांच्या भेटीचा इरादा धरला. तेव्हां नारो गणेश यांचें कर्तृत्व पाटिलबावा यांचे ध्यानांत. आजपावेतों डोंगरी मोर नाचविले; आतां अवघड पडलें. ऐसें जाणून आबा चिटणीस यांजला सामदामादि भेदार्थ पुढें सामोरें पाठविलें. ते साता मजलींचे तफावतीनें येऊन भेटले. नारो गणेश असतांना चढवीत होते. त्यांचें शांतवन एक रात्रींत करून, प्रातःकालीं नारो गणेश यांजला बराबर पाटिलबावांकडे घेऊन जावें असें ठरावून, आबाजी चिटणीस व नारो गणेश उभयतां गेले. तों महादजीबावा जातीनें तीन मजला सामोरे आले. नारो गणेश यांची व पाटिलबावांची भेट झाली. नारो गणेश यांची जरब बाळगून पाटिलबावा होते. त्यांतील कंपेषी आबा चिटणीस यांची भेट झाली होती. खाशांची भेट होऊन भविष्यानरूप बुद्धीचें ( वाटोळें ) होऊन रंगांत रंग मिळविला. पुढें सुभेदार व अल्लीबहादर यांच्या व पाटिलबावांच्या भेटी झाल्या. तोफखाने सुरू होऊन पूर्वरंग उत्तम झाला. मथुरेस आल्यावर मुलूख सुटला, त्याच्या वांटणीचा प्रसंग पडला. त्यांत नारो गणेश यांच्या बोलण्यांतील आशय, भेटीचे पूर्वीं इरादा दिसत होता, त्यांतील समारोप होऊन बोलणें मिश्र पडूं लागलें. तेव्हां मिलाफाचें बीजारोपण होऊन सुभेदारांचे मनांत विकल्प आला. पुढें महादाजी शिंदे गंगास्नानास चालले. त्यांचे समागमें नारो गणेशही गेले. पुढें जाते समयीं शिलेदारी खर्चाची याद होऊन

मोघम ऐवज राजश्री पाराजीपंतबावा यांजकडून देण्याविषयीं आत्माराम शिवराम तांबोळी, वाकड्याचे गुमास्ते, याजला सांगून गेले. गंगेस गेलीयावर, गंगेच्या साक्षभूत काय बोलणें झालें असेल तें त्यांचें ते जाणोत. सुभेदारांकडे मुलखाचे वांटणीबद्दल नव लक्षांचा मुलूख खुरजा, गडमुक्तेश्वर वगैरे महाल लाऊन दिले. अल्लीबहादाराचें बोलणें खर्चास घेऊन स्वस्थ असावें. हे भाव बोलण्यांत आणून महालच्या सोडचिठ्या घेऊन माघारी आले. सुभेदारांस सर्वार्थ समजाविला. त्यांत बोलणें मागील कांहींएक ओळख दिसल्यांत न येतां सोबत्याकडील कड धरून बोलणें पडलें. त्या बैठकींत मन ओळखीचा प्रसर होण्यास आरंभ झाला. हे कारभारी सरदार. यांचे मनओळखींत तथा राहिली नाहीं. ते दिवसापासून दिवाणाचे चालीचे पर्याय, मातुश्रीसाहेबांस व श्रीमंतांकडे नानांस, कच्चे व्यवहार ज्यांत अल्ली-बहादरसहित प्रतिकूलता पै दरपै दर्शविण्यास आरंभ होऊन, जुने माणूस शिवाजी गोपाळ पारनेरकर यांजला नानांचे संमतें बाईसाहेबांनीं महेश्वरीं आणिलें. मग कैद करण्याविशीं दोहीकडील हालवंत रजा आणविल्याच होत्या. तों पाराजीपंत-बावांस नानांनीं विचारलें कीं, शिलेदाराची वांटणी कसी केली? त्यांनीं उत्तर केलें कीं, फडणिसाचे कागदांत पाहून घ्यावें. मग खंडोपंतबावास विचारलें कीं, शिले-दाराच्या वांटणीच्या यादी दाखवा. त्यांनीं काढून दाखविल्या. त्यांत सांगितल्या-खेरीज शिलेदार कारकून यांचे नांवें आठ दहा हजार रुपये जास्ती पडले. तें पाहून नारोपंतनानास अति क्रोध येऊन, खंडोपंतास अनिर्वाच्य शब्द शिरेकचे-रींत बोलूं नये, ते बोलले. तथापि खंडोपंत याजकडे कारकुनीचा पेशा, सबब खामोष करून उत्तर केलें कीं, हा राग आह्मांवर काढून अर्थ काय? देण्या-घेण्याची मुखत्यारी आह्मांकडे नाहींच. सुभेदारांचे परवानगीनें पाराजीपंतबावा-कडून देववून आह्मांकडून लिहविलें, तें आह्मीं लिहिलें. असें बोलल्यावर कलमदान उचलून मारावें. मारलें मात्र नाहीं. परंतु सुभेदार व पाराजीपंत या उभयतांचा उद्धार ज्ञानाचा व उत्पन्न कसें होतें याचा उच्चार करण्यांत सेव्य-सवकत्व राहिलें नाहीं. नंतर खंडोपंत यांणीं रुमाल आटोपून घरांत आले. अंतः-करणास बहुत खेद केला कीं, रावजीपंतबावाचे संस्थानाशीं आजपावेतों अशीं भाषणें कधीं झालीं नव्हतीं. आह्मीं त्याचे सेवकांत असे कुलदीपक उत्पन्न होऊन, या अधिकारास प्राप्त झालों. मग अर्धरात्रींचे समयीं यजमानांचे चिरंजीव चिमणाबापू हे रुमाल व कलमदान घेऊन सुभेदारांकडे गेले. रुमाल, कलमदान व बापू सुभेदारापुढें ठेवून नमस्कार केला कीं, "या दौलतींत थोरले सुभेदारापासून रावजी-पंतबावाचे घरचा अपमान कधींही झाला नाहीं. तो मी कूलदीपक कारकून उत्पन्न

खातरजमा करून खेमेदाखल करविलेच असेल. शीख वगैरे सर्वांची खातर-तसली होऊन जमाव जालाच असेल. कदाचित् नसलियास सरदार फौजेसह येण्याविषयीं व इंग्रेजांसीं सलूख न करण्याविशीं पक्की खातरजमा करून, लौकर खेमेदाखल होऊन, तंबीचे मसलतीस नमूद होत, तें करवावें. पातशाहा व नवाब नजबखान यांचे अहदपैमान व नानकुरान इंग्रेजांचे तंबीचे मसलती-विषयीं घेऊन पाठवावे. त्या बमोजीब इकडूनही पाठविण्यांत येतील. सारांश, बरसात जाली, आतां दिवसगत लागों नये." ह्मणून लिहिलें. त्यास आज्ञेप्रमाणें पातशाहांस व नजबखानास पत्रें दाखविलीं. त्यांनीं वाचून बोलिले कीं, "आमची फौज शिखांकडे अटकली आहे. हे श्रीकृपेनें थोडक्याच दिवसांत शिखांचे मसलतीचा समारोप करून सत्वरच स्वारीस निघतों, व इमान पूर्वीं लिहून दिधलें आहे, त्यांत अंतर नाहीं." ह्मणून बोलिले. आह्मीं तक्रार इंग्रेजांसीं बिघाडाची केली. तेव्हां बोलिले कीं, "आह्मांस इंग्रेजांसीं एकोपा राखणें असता, तर श्रीमंतांस व निजामअलीखानांस व भोंसल्यांस श्रीमंतांचे अनुमतें इंग्रेजांचे पारपत्यास लागणें ह्मणून पत्रें कशास लिहितों ? व श्रीमंतांस व आपणांस वरचेवर इकडे फौज, सरदार मातबर पाठवावयास किंनिमित्य लिहितों ?" याप्रमाणें बोलिल्यावर आह्मीं अर्ज केला कीं, "श्रीमंतांस कौल इमान दिधला, त्यांत इंग्रेजांचा मजकूर नाहीं." तेव्हां बोलिले, "शत्रु तुमचा तो आमचा, लिहून शपथ लिहिली आहे; त्यांत अंतर नाहीं." ह्मणोन निश्चय करून बोलिल्यावर, आह्मीं ह्मटलें कीं, "ज्याप्रमाणें श्रीमंतांस लिहून दिधलें आहे, त्याप्रमाणेंच लिहावें. परंतु, इंग्रेजांचे पारपत्याचें लिहून राजश्री महादजी शिंदे यांचेच नांवें इमानप्रमाण लिहून देणें." त्यावरून इमानप्रमाण लिहून देतों ह्मणून करार केला आहे. पुढें अंमलांत येईल तें लिहूं. कृपा केली पाहिजे हे विनंति."



## लेखांक ३१.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८१.

"विनंति कीं, महबूब अलीखान नामें खोजे यांजला जैपूरप्रांतीं नजबखानांनीं पाठविलें. प्रांत हस्तगत केल्यावर यांची सरदारी मोडून, अनुपगीर गोसावी यांस ते प्रांतीं पाठविलें. यास्तव ते अर्जुदा होऊन मक्कयास गेले. पांच सात लाख रुपये आपले पदरचे खर्चून फौज जमा केली. प्रांत हस्तगत केलेला गेला! पुढें यांजपासून नाउमेद होऊन ते प्रांतीं आले आहेत. नजबखानांनीं बहुत मिन्नत केली, परंतु न मानिलें. येथून चालते समयीं स्वामींस विनंति लिहाव-

यास सांगून पत्रें दिधलीं, ते पाठवलीं आहेत. मर्जीस आल्यास उत्तरीं सनाथ करावें. व वजिराकडील प्रांतास वाकीफगार व शिपाई व सरदारीचा ठसा त्यांचा कडेकुरे प्रांतीं चांगलाच आहे. यास्तव ममतेंत घेऊन स्वामींचे कृपेचे उमेद-वार केलें, व त्यांसीं करार केला आहे कीं, मक्क्याहून स्वामींपासीं जाणें. तुमचे योग्यतेप्रमाणें मातबर सरदार तुह्मांस पुढें पाठवून घेऊन जातील, व कांहीं फौजेची सरदारी देऊन अंतरवेदीचे अथवा हरएक जुंजाचे कामास तुह्मांस पुढें करितील. याप्रमाणें बोलून रवाना केलें. ते कदाचित् आपलेपासीं आले, तर ममतापूर्वक आदरसत्कार करून संग्रहीं ठेवावे. या प्रांतीं त्यांचे सलुकानें शत्रूचे मातबर फुटून सरकारचे अंकित होतील. पत्रोत्तरें पाठवावीं. त्यांचे बंधू येथें आहेत, ते त्यांचेपासीं पावतीं करितील; ह्मणजे खातरजमेनें सेवेसीं येतील. श्रुत होय. या दिवसांत यशवंतराव बाबळे यांनीं जैपूर प्रांतीं येऊन, प्रांतांत दंगा केला. तेव्हां महाराजे जैपूरकरांनीं फौज पाठवून जुंजांत धरून घेतलें. त्यांचा पुत्र ठार जाला. दोन तीनशें घोडीं लूट राजे यांचे घरीं पावलीं. अंबरचे किल्ल्यांत राजे खुशमूराम कैद आहे, तेथेंच त्यांसही ठेविलें आहे. छ २ साबानीं, कुंवरसेन नामें खतरी पूर्वींपासून पुण्यांत आहे, त्याचीं पत्रें नजबखान वगैरेस आलीं, तें बजिन्नस धरून पाठविलीं आहेत. तेथें रहात असतां इंग्रे-जांची वरिष्ठता लिहितो ! याकरितां पूर्वींही पत्रें धरून घेऊन सेवेसीं पाठविलीं व हल्लींही पाठविलीं आहेत. नजबखानास अर्जी लिहिली आहे, त्यावरून वृत्त व्यंग लिहिलें तें श्रुत होईल. वरकडांचीं पत्रें आहेत, त्याचा विस्तार त्यांचेच पत्रांवरून विदित होईल. गरीब पोटार्थी आहे, यास्तव हरकोठें पांच सात रुपये दरमहा करून तेथून दूर ठेवावें. तेथें राहिल्यास स्वामींचें राज्य श्रीमहा-देवाचें आहे. उणें अधिक लोपत नाहीं. गुप्त गोष्टही प्रगट होतें. यास्तव लिहिलें असें. श्रुत होय. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. छ १२ साबानीं वर्तमान आलें कीं, राजश्री महादजी शिंदे यांनीं इंग्रेजांची फौज मारून ताराज केली. हजार बाराशें माणूस राहिले, ते दो ठिकाणीं कोंडिले आहेत. वरकड गोहदकर व भदावरकर वगैरे त्यांचे लोक गस करून गेले, तेव्हां सेवेस पावलेंच असेल. ईश्वर स्वामींचा प्रताप अधिकोत्तर करो. दर्शन-लाभ होय तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक ३२.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८३.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ५ माहे जमादिलाखर मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लिहिला पाहिजे. विशेष:– छ० १५ रविलावलचीं पत्रें सरकारचे जोडीसमागमें पाठविलीं, ते छ ५ माहे मजकुरीं पावलीं. त्यास इकडील वर्तमान पै दर पै विनंतिपत्रें हजूर पाठविलीं, ते पावून वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी:– पातशाहा व नवाब नजबखान दिल्लींतच आहेत, व राजश्री महादजी शिंदे सिप्रीकोलारास. इंग्रेजांचीं सा पलटणें ग्वाल्हेरीचे व सिप्रीचे दरम्यान मुक्काम करून आहेत. इंग्रेजांचे व यांचे लष्करांत महागाई आहे. पाटीलबावांपाशीं इकडील रांगडी व देशची फौज भारी आहे. पुढें होईल ते विनंति लिहूं. वरकड वृत्त पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. नवाब नजबखान यांनीं स्वामींस पत्र लिहिलें आहे, व पातशाहाचा शुका सेवेसीं पाठविला आहे. त्यावरून वृत्त कळेल. उत्तरीं कृपा करून लिहावयास आज्ञा करावी कीं, लिहिलेप्रमाणें सत्वर अमलांत आणावें. ह्मणजे लिहिल्याचें व सेवकाकडून वारंवार फौजेचा बोज लिहिविल्याचें सार्थक होईल. विशेष मर्जीस येईल तें लिहावें. सेवाश्रम केलीयाचें सार्थक होईल, तो ईश्वरकृपेनें सुदिन. विलायती अनारें या दिवसांत तेथवर गर्मीमुळें न पावतील. यास्तव रस काढून रुह करून पाठविला असे. हे विनंति."

---

## लेखांक ३३.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंतिपत्रीं आज्ञा कीं, 'नवाब नजबखान यांचें जाणें शिंद्याकडे न होय, तर कोणी उमदा सरदार त्याजबरोबर फौज पोख्त सामान देऊन जरूर रवाना करावा, ह्मणिजे शिंदे व तिकडील फौज मिळोन दुहेरी शहानें इंग्रेजी पलटणें शिकस्त होतील.' ह्मणून लिहिलें. त्यास, याअन्वयें लिहिल्याप्रमाणेंच बोलून, महमदबेग हमदानी ढवळपुरीं आहे त्यास पत्र, व अनुपगीर गोसावी जैपुरीं नजबखानाकडून मामल्याचे ऐवजास वसूल करावयास गेला आहे त्यास पत्रें, नजबखानाचीं कीं, तुह्मीं आपले फौजेनसीं सरंजामसुद्धां जाऊन राजश्री पाटीलबावांस सामील होणें; व पाटीलबावांचे नांवें पत्र कीं, तूर्त दोन्हीं पथकें तुह्मांकडे रवाना केलींच आहेत;

ते येऊन सामील होतील. बादबरसात शिखांकडील फौज रिकामी जाली, ह्मणजे आह्मीही पातशाहासहित बाहिर निघतों. याप्रमाणें तीन पत्रें तयार केलीं. इतक्यांत कलकत्त्याहून हाल साहेब इंग्रेज आला होता; त्याजकरितां तीं पत्रें आह्मांपासीं न देतां आपले पासींच ठेवून घेतलीं. आतां तो गेलीयावर फिरून हटकिलें. त्यावरून पुन्हां पत्रें द्यावींसें ठराविलें आहे. पत्रें हातास आलीयावर पाटीलबावांकडे रवाना करितों. परंतु हे इंग्रेजांस भितात. फार खुलून खेळत नाहींत. पुढें अमलांत येईल, तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. भेट होय तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक ३४.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति:– पत्रीं आज्ञा कीं, 'हैदरअल्लीखान बहादूर यांजकडील मजकूर पेशजीं लिहिण्यांत आलाच आहे. इंग्रेजांस जक त्यांनीं फार दिल्ही. हुल्लीगुल्लूर देवणापट्टण ह्मणोन बंदरकिनारा जागा अडचणीची आहे, तेथें जमीयत सुद्धां कर्नेल कोट आहे. हैदरखान यांनीं सभोंवता महासरा दिला आहे. बंदी केली. फरारीसही सरंजाम पोख्त जलद येणार. फरासीसांचें राजकारण खानाशीं पक्कें जालें आहे. सरकारांतही फरासीसांचा सिलसिला अव्वलीपासून आहे. याप्रमाणें तिकडील वर्तमान आहे. तुह्मीं हजुरांत अर्ज करावा व नजबखान यांसही सांगावें. त्यांचेंही परभारें अकबारेवरून वर्तमान येतच असेल.' ह्मणून लिहिलें. त्यास आज्ञेप्रमाणें पातशाहांस व नजबखानास हें वृत्त श्रवण केलें. ऐकून बोलिले कीं, 'या दिवसांत हैदरअल्लीखान यांजपाशीं फौजेचा व पैक्याचा सरंजाम पोख्त आहे; त्यावरून सर्व गोष्टी अमलांत येतात.' आह्मी बोलिलों कीं, 'सर्व गोष्टी मेहेनतीच्या व जुरतीच्या आहेत. पूर्वींपासून जो कोणी जुरत मेहेनत करीत आला आहे, त्यास मुलुखास व खजान्यास व फौजेस कमी नाहीं.' ह्मणून बोलिलों. त्याचें उत्तर हेंच केलें कीं, 'सत्य आहे.' याप्रमाणें हरएक समयीं उत्तेजन देतों. आतां बादबरसात पातशाहासुद्धां बाहेर निघतों, ह्मणून आह्मांसीं करार करितात, व तोफखाना वगैरे सरंजामही तयार करितात, व कुंजपुरीयाकडील फौजही रिकामी करावयाची तर्तूद केली आहे. परंतु अमलांत येऊन सरकारचे मसलतीस उपयोगीं पडत, याच्या विचारांत रात्रंदिवस आहोंत. अनुभवास येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होईल तो सुदिन. हे विनंति."

---



दिल्ली येथील दिवान-इ-खास.

## लेखांक ३५.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'इंग्रेजांसीं बिघाड करून मसलत करणें, तेव्हां शिखांशीं बिघाड करावयाचा नव्हता. जाला ! असो. हल्लीं दरवजेनें शिखांस शामील करून घ्यावें, हे मसलत फार चांगली. जरूर लिहिल्याप्रमाणें अमलांत यावें. इंग्रेजांचें पारिपत्य केल्याखेरीज पातशाहींत कोणास चैन पडणार नाहीं, हें पुर्तें समजावें. याप्रमाणें बोलावें.' ह्मणून लिहिलें. त्यास, आपले आज्ञेप्रमाणें यांसीं भाषणें केलीं व खचित केलें. यांनींही पूर्वीं गजपतसिंग जाट यास, मिर्जा सफीखान याची फौज कुंजपुरीयाकडे आहे, तेथें धरून कैद केलें होतें. याचा तपशील पूर्वींच विनंतिपत्रें पाठविलीं होतीं. त्यास, हल्लीं नजबखान यांनीं गजपतसिंगास दिल्लीस बोलावून आणून, साहा लक्षांचा मामला फडशा करून घेऊन, त्यांस वस्त्रें व शिरपेंच व झालरदार पालखी याप्रमाणें बहुत सन्मान करून, पुत्रास व कारभारी यांस व भावाबंदांस यथायोग्य वस्त्रें देऊन बोलण्यांत आणिलें कीं, शिखांचा मुलुख आहे, तो शिखांकडे असावा. आणि त्यांनीं व तुह्मीं आपले फौजेनिशीं आमचे शामील असावें. ह्मणून पक्केपणें बोलून, त्यास छ० १५ रजबीं रुकसत करून कुंजपुरीयाकडे मार्गस्थ केलें, व यापूर्वीं जाबतेखानासही छ० ५ माहे मजकुरीं याच कार्यानिमित्त रुकसत केलें, ते गोसगडास गेले आहेत. त्यास जाबतेखान व गजपतसिंग एकत्र होऊन, शिखांसीं सलूख करून, तिकडील फौज मिर्जा सफीखान सुद्धां रिकामी करून, अंतर्वेदींत मेरट प्रांतीं छावणी करावी, हा विचार ठरविला आहे; व तोफखान्याचीही तयारी आहे. वादबरसात पातशाहासुद्धां बाहीर निघतो, ह्मणून आह्मांसीं बोलतात. परंतु काबूची रंग पाहून आहेत. अमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होईल तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक ३६.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'राजश्री महादजी शिंदे यांचे नांवें इमानप्रमाण लिहून देतों, ह्मणून नजबखान बोलिले. त्यास त्यांसीं दोन चार वेळां बोलून, बोलल्याप्रमाणें पत्रें लेहून घेऊन सत्वर पाठवावीं. यास आलस्य करूं नये.

व सरकारांतही पाठवावीं, ह्मणजे मसलतीस पक्कें जालेंसें होईल.' ह्मणून लिहिलें. त्यास सिपरीकोलारस येथें लढाईस दिसगत लागली. हा रंग पाहून, यांनीं प्रथम राजश्री महादजीबावा यांचें नांवें कौलकरार लिहून देणें करार केलें होतें. चाल ढाल करून, त्याजकडून कौलकरार लिहून आणवा, ह्मणून मसोदा करून आह्मांपासीं दिधला. त्याची नक्कल पेशजीं हजूर पाठविलीच आहे. त्याप्रमाणेंच त्यांत कांहीं तपसील उणा करून हलींही दुसरा मसोदा करून दिल्हा. त्याचीही नक्कल राजश्री महादजी शिंदे यांजकडे पाठविली व साहेबांकडेही पाठविली आहे. त्यावरून कळं येईल. त्यास हा मसोदा पाहून, आह्मीं यांसी स्वच्छ उत्तर दिधलें कीं, 'आपण मसोदा करून दिधला आहे, यांत 'सब खेती हमारी' याप्रमाणें लिहिलें आहे. तेव्हां आमचे फौजेनें काय खाऊन बंगाल्यापावेतों पातशाहासांगातें चाकरी करावी ? प्रथम तुह्मीं श्रीमंतांचें नांवें कौलकरार करून लिहून दिधला आहे, त्याप्रमाणेंच राजश्री महादजी शिंदे यांचे नांवें लिहून द्यावा व त्यांजकडूनही त्याप्रमाणेंच लिहून येईल, आणि आतां आपण याप्रमाणें इच्छितां, तेव्हां श्रीमंत तुह्मांस काबूची ह्मणतील.' याप्रमाणें बोलून कायल केलें, आणि आह्मी कौलनाम्याची याद त्यांजकडे पाठवीत नाहीं ह्मणून बोलून, प्रथम कौल केला आहे त्याजवरच कायम रहावें. त्याप्रमाणेंही अंमलांत आल्यास तुह्मांस फार नफे आहेत. कसें ह्मणाल तर साडे बावीस सुबे पातशाहीचे, त्यांत निमेनिम तुमचे हातास आल्यास फारच नफा आहे. हे वृथा दिक्कत काढून, आपण क्षणभंगुर श्रीमंतांपासीं व्हाल तें न करावें. याप्रमाणें कितीक यथामतीनें बोलून, मेळवून घेऊन ठेविलें आहे. हे रंग पाहतात. पाटीलबावांनीं ग्वालेरीपासीं लढाई मारून पुढें अंतरवेदींत इटाव्यास आले, ह्मणजे हे पातशाहासहित सामीलही होतील, आणि पूर्वीप्रमाणें कौलनामाही लिहून देतील. पुढें अमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक ३७.

**श्रीवरद.** ३१ मे इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'इंग्रेजांचा सहवास नजबखानास बहुत. पातशाहींत त्यांचा कदम न शिरावा हें आहेच. श्रीमंत राव पंतप्रधान हजूरचे फिदवी, यांची फत्ते असावी हें रात्रंदिवस चित्तांत आहेच, यांत संशय नाहीं. टोपीकरांचे

वकिलास रुकसत दिली, हें फार नेकसलाह केली. तुह्मीं लिहिल्यावरून व मूळची हजूरची इनायत याजवरून इकडील खातरजमा आहेच. सरकारचे सरदार आजपावेतों येऊन पोंचले असते; गुंता नव्हता. परंतु दरमियान इंग्रेजी पलटणें आलीं; तो शह पडला. ह्मणून दिक्कत पडलियाची तरतूद अलाहिदा लिहिली. त्याप्रमाणें अमलांत यावें ह्मणजे सर्व गोष्टी उभयपक्षीं खातरखा होऊन, योजिली मसलत सिद्ध जाली, ऐसें आहे. गाडर कोंकणांतून घाट चढून आला होता. त्यास सरकारचे सरदारांनीं शिकस्त दिल्ही. त्याचा तपशील अलाहिदा लिहिला आहे, त्यावरून कळेल.' ह्मणून लिहिलें. त्यास, आज्ञेप्रमाणें हा मजकूर सविस्तर नजबखानांस समजावून, प्रसंग पाहून संतोषातें पाविलें. तेव्हां बहुत ममतेनें पूर्वीं वचनें दिधलीं आहेत, ते दुहराऊन बोलून, त्यांनीं उत्तर दिधलें कीं, 'श्रीकृपेनें बादबरसात काय घडून येतें तें प्रत्ययास येईल. इंग्रेजांची व आमची बरोबरीची लढाई आहे. त्यास आमचा तोफखाना व पलटणें सन्मुख व तुह्मांकडील फौज करोलीस उपराळ्यास असलिया, सा महिनीयांचें काम आठा दिवसांत फडशा करूं. इंग्रेज काय वस्तु आहेत?' याप्रमाणें बोलून आपल्यास व श्रीमंत स्वामींस खलितापत्रें दिधलीं आहेत. त्यावरून ध्यानारूढ होईल. पुढें अमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३८.

**श्रीवरद.** ता. ३१ मे इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'गाडर वसईहून मगरुरीनें दाहाबारा पलटणें कवायती, हजार गोरा, वीस पत्तीस तोफा या सरंजामानिसीं घाट चढून वर आला. त्याचे मुकाबिल्यास राजश्री हरीपंत, व तुकोजी होळकर, व परशरामपंत वगैरे फौज व सरंजामानिसीं होते. त्यास इंग्रेजांस मैदानांत काढून सजा करावी, ही तजवीज होती. परंतु सरकारी फौजेनें लढाईच्या मुकाबिल्यामुळें मैदानांत यावयाची जुरत न करितां, घाटमाथा अडचणीची जागा पाहून राहिला. तेव्हां राजश्री परशरामपंत यांस फौजसुद्धां घाटाखाले इंग्रेजांची रसद बंद करून माहासरा द्यावा याकरितां पाठविलें. त्यास, परशरामपंत यांणीं इंग्रेजी रसद येत होती त्यास माहासिरा करून, सात आठ हजार बैल गल्ह्याचे कुल लुटून आणिले, व कित्तेक इंग्रेजी लोक यांस तंबी करून गारत केलें. याजउपरी पनवेलीहून पांच सहा

पलटणें, आठ दहा तोफा ऐसे सरंजामसुद्धां, घाटरूखें गाडर यांचे कुमकेस येतात ही बातमी सरकारची आली. त्यावरून राजश्री हरीपंत यांस बमय हुजुरात फौज, तोफा, व गाडदी घाटावर गाडराचे मुकाबिल्यास ठेवून, तुकोजी होळकर यांस बमय फौज सरंजाम घाटाखाले पाठविलें. त्यास, तुकोजी होळकर, व परशरामपंत यांनीं पनवेलीहून पलटणें येत होतीं, त्यांस माहासिरा देऊन लढाई दिल्ही. होळकर यांनीं सुतरनालाची व करोलाची मार बरी दिली, व लढाई चांगली जाहाली. इंग्रेजांकडील कवायती लोक व गोरे पांच सहाशें ठार, शिवाय जखमी जाहाले. सरकारचे लोकही फार कामास आले. शेवटीं पलटणें झाडीचा आश्रय करून, बहुत मुष्किलीनें गाडर याजपासीं जाऊन पोंहचलीं. त्या दोहों दिवसांत हरीपंत यांनींही घाटावरून निकड करून गाडरासीं मुकाबिला केला. दुतर्फा लढाईची निकड बहुत जाली. रसद बिलकूल पोंहचेना. तेव्हां बेताब होऊन, छ २३ रविलाखरीं रात्रौ घाट उतरून पळोन गेला. त्याचे ताकुबावर हरीपंत फौजसुद्धां घाटाखाले गेले. एकीकडून हरीपंत, व एकी-कडून होळकर व परशरामपंत, याप्रमाणें इंग्रेजांस दुतर्फा घेरून, दोन तीन लढाया निकडीच्या जाहाल्या. तोफा व बाणांची मारगिरी जाली. लोकांनींही घोडे घालून लगट फार केली. याजमुळें इंग्रेज बहुत घाबरा जाहाला. एक तोफ, व बंदुखा, व दारू गोळ्याचे संदूक व छकडे व रथ वगैरे सरंजाम बेसुमार पाडाव आला. मिस्तर पारकल नामें, गाडर याचे बरोबरीचा सरदार, लढाई व तरदूदकार होता, तो गोळीची जखम लागून जाया जाला. गोरे व कवायती लोक मिळून सात आठशें पडले. शिवाय जखमीही बहुताद आहेत. सरकारचींही घोडीं व लोक बहुत कामास आले. शेवटीं गाडर जान बचावून पळाला. थोडका सबब पनवेली दऱ्याचे असरीयास जाऊन पोंहचला. सरकारच्या फौजाही पनवेलीजवळ मुक्काम करून आहेत. तुह्मांस कळावें ह्मणोन लिहिलें असे. बादशाहा व नवाब नजबखान यांसही कळवावें. इंग्रेजांची शिकस्त श्रीमंतांचे प्रतापेंकरून मोठी जाली, व त्यांचा नाशही फार जाला.' ह्मणून लिहिलें. त्यास, आज्ञेप्रमाणें या पत्राची पारसी करून, पातशाहास व नवाब नजबखानास सविस्तर मजकूर समजाविला. वाचून बहुत संतोष पावून उत्तर केलें कीं, 'ईश्वर हमेशा याप्रमाणें श्रीमंतांची फत्ते करो व इंग्रेजांचा कदम पातशाहींतून निघून लयातें पावो!' ह्मणून आशीर्वाद ममतापूर्वक देऊन, नजबखानांस आज्ञा केली, कीं तुह्मीही कांहीं उद्योग कराल किंवा नाहीं? नजबखान यांनीं अर्ज केला कीं, 'तोफखाना वगैरे सर्व तयारी आहे. कुंजपुरीया-कडील फौज रिकामी जाली ह्मणजे सर्व गोष्टी मर्जीनुरूप घडण्यांत येतील.



दिल्ली येथील दिवान. इ. खास. [नं. २.]

याप्रमाणें बोलिलें. पुढें अंमलांत येईल तें मागाहून विनंति लिहिण्यांत येईल. ...........तदबीर नवाब नजबखान बहादूर विशेषच सांगतात. परंतु स्वामींचे प्रत्ययास येऊन, आह्मांकडून लिहिविलें व यांनीं सेवेसीं लिहिलें तें खरें होय तो सुदिन. कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३९.

श्रीवरद. ३१ मे इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति कीं, इंग्रेजांकडील वकील पेशजीं आला होता, व हल्लीं इंग्रेज एक आला होता, व हमेशा पत्रें चकत्या त्यांजकडील येतात. त्यांचें परिमार्जन करून, आपले सरकारचा स्नेह व ममता पातशाहांसीं व नवाब नजबखानांसीं दृढता आजपावेतों ठेविली, व पुढेंही स्नेहाचे वृद्धीची पैबंदी करीतच आहों. हें वृत्त इंग्रेजांनीं लखनऊस श्रवण करून, लतापत अल्लीखान खोजा चौ पलटणानसीं पातशाहांचे तैनातीस वजिराकडून येथें आहे, त्यास सांगून पाठविलें कीं, 'फलाणे वकील दिल्लींत श्रीमंतांकडून आहेत. ते पातशाहांची व नवाब नजबखानांची मर्जी इंग्रेजांकडे ठीक राहूं देत नाहींत. या अर्थीं हरयेक बहाणा करून त्यांचें पारपत्य करणें.' ह्मणून खोजास पत्र आलें. त्यावरून माणसांमाणसीं ज्येष्ठ मासीं खटखट करून आह्मांवर हात घातला. हें वृत्त लखनऊस आपले सरकारचे परमस्नेही व त्यांचे मुख्य साहेब आहेत, त्यांनीं लिहिलें. त्यावरून श्रुत व्हाव-यास लिहिलें आहे. त्याचा तपसील पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. तात्पर्य, ...........जीव घ्यावयास देखील चुकले नाहींत. परंतु आयुष्य होतें, व स्वामींचे प्रतापेंच वांचलों, व पुढेंही रक्षणार स्वामींचेंच पुण्य समर्थ! कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति."

## लेखांक ४०.

श्रीवरद. ३१ मे इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं—

विनंति. आमचें वर्तमान तर ज्येष्ठ शुद्ध १० दशमीस यमुनास्नानास निगम-बोधास गेलों होतों. त्यास, यमुनातीरीं माणसांमाणसीं लतापत अल्लीखान ह्मणून खोजा वजिराकडील चौ पलटणांनिसीं पातशाहाचे तैनातीस आहे, त्यासीं परस्परें कजीया माणसांमाणसीं जाला. त्याकडील जमाव भारी. दोन माणसें

मारलीं गेलीं. आह्मांकडील एक खिजमतगार मारला गेला, व प्यादा एक जखमी जाला; व हत्तीस सात जखमा आल्या, व आह्मांस चार जखमा जाल्या. भवईवर एक, व हातावर एक, व पोटावर एक, व पाठीवर एक, ऐशा चार जखमा आल्या. त्यांत पोटावरील जखम भारी होती. परंतु, आपले प्रतापें व पुण्येंकडून वांचलों. जखमा बऱ्या जाल्या. एक महिना मानसीं स्नान जालें. आतां स्नान करीत असतों. तात्पर्य, आज आठदहा वर्षें जालीं, सरकारची फौज इकडे आली नाहीं; आणि नजबखान बळावला. याजकरितां, व इंग्रेज पलटणें पुण्यासमीप आलीं त्यांचें पारपत्य खातरखा न जालें; व ग्वालेरीपासीं पलटणें आहेत त्यांचें पारपत्य अद्यापि खातरखा होत नाहीं; हा रंग रांगडे पाहून, आपलाले ठिकाणीं बदमस्त जाले आहेत. कोणास खातेरस आणीत नाहींत, व आह्मांपासीं जमाव तो तैनाती बाळाजी गोविंदाकडील सरकारांतून देविला, तो त्यांनीं न दिधला. जुजबी माणसें व दक्षणी कोण कोठें आहेत, हाही मजकूर कोणाचे ध्यानांत राहिला नाहीं. परंतु या काळांत आपले प्रतापेंकडून पूर्वील फरपटीवर श्रम व सर्वांसीं स्नेह आहे, त्यावर जीव अब्रू आहे. कपर्दिकेची प्राप्त यांजकडून नाहीं. इतकेंही असोन सरकारकामास्तव जडाव राखून, आपली अब्रू रक्षून, स्वामींचें नांव यशाप्रमाणें आजपावेतों श्रीनें रक्षिलें. पुढें पोख्त सरंजाम देऊन शत्रूचें पारपत्य सेवकाचे हातें करविणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक ४१.

**श्रीवरद.** ता. १५ आगष्ट इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ २३ माहे साबान मुक्काम दिल्ली जाणून स्वकीय लेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः— आपण पत्र छ १७ जमादिलावलचें पाठविलें, तें छ १ रज्जबीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, 'इस्तकबीलपासून कित्येक तदबीरा व मनसबे लिहिण्यांत आले व तिकडूनही स्नेहाचीं उत्तरें आलीं, त्याप्रमाणें कांहीं तरतूद होऊन नमुदास यावी. याची पैरवी मुत्सद्यांपासीं तुह्मी करीतच असाल, व करावी.' ह्मणून आज्ञा त्यास, आजपावेतों आपली व यांची स्नेहाची वृद्धि ठेऊन, इंग्रेजांकडील जो कोणी आला त्यास लागूं दिधलें नाहीं; व पुढें यांनीं पातशाहासहित इंग्रेजांचें पारपत्यास निघावें, हाच मजकूर बोलतों. त्यास, या दिवसांत हाल साहेब नामें इंग्रेज यांज-

कडील कलकत्त्याहून आला होता. त्यानें यांसीं सवाल केला कीं, 'कांहीं पलटणें व तोफखाना आह्मांस द्याल तर लढाईंत चाकरी करून दाखवूं.' हा बहाणा करून फौजेस सरंजाम मुलूख लाऊन घेऊन, आपला कबजा करून, यांचे सरकारांत माहीत व्हावें ह्मणून, इंग्रेजांनीं कवायद करून पाठविला होता. त्यास ते गोष्ट यांस समजून, यांस त्यांचा पातेज न पडे ह्मणून छ ५ रज्जबीं पांच वस्त्रें व शिरपेंच जवाहीर दागिना एक देऊन मार्गस्थ केलें. तो लखनऊस गेला. तात्पर्य, इंग्रेज आपलें साम दाम कपट भेद करणें तो उपाय हरएक तऱ्हेनें करितात. परंतु आजपावेतों नजबखानांपासीं व पातशाहापांसीं अंतर्गत एकोपा जाला नाहीं, व पुढेंही होणार नाहीं, या तरतुदींत रात्रंदिवस आहोंत. पुढें होईल तें मागाहून विनंति लिहूं. आतांच वर्तमान आलें कीं, कलकत्तेकर इंग्रेज इष्टीन श्रीकाशीस यावयास तेथून रवाना जाला. पुढें आलियावर होईल तें वृत्त लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक ४[illegible]. 

**श्रीवरद.** ता. १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'नवाब नजबखान बहादूर यांचा खलिता, व पातशाही शुके, नवाब निजाम अलीखान बहादूर व खंडोजी भोंसले यांचे नांवें पाठविले, ते पावले. नवाब मोसूफ यांचे खलित्याचा जबाब, व सरकारांतून खातरजमेची अर्जी पातशाहाचे हजुरांत व नवाब नजबखान बहादूर यांस वजिराप्रमाणें अलकाब तुमचे लिहिल्याप्रमाणें वाढवून खातरजमेचीं पत्रें मुजरद कासीदजोडीबरोबर तुह्मांकडे रवाना केलीं, तें पावलेच असतील. त्यांचीं उत्तरें पातशाहाकडून व नवाब मोसूफ यांजकडून सरकारची खातरजमा होयेसीं घेऊन पाठवावीं.' ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें पेशजींच पत्रांचीं उत्तरें, खलिता व शुका पातशाही घेऊन पाठविलीं आहेत. ते हजुरांत पावून वृत्त श्रुत जालेंच असेल, व राजश्री खंडोजी भोंसले व निजाम अलीखान यांस शुके पातशाहांचे पाठविले, त्याचीं उत्तरें पातशाहास न पाठविलीं, ह्मणून पातशाहा व नवाब नजबखान विस्मय करत होते. त्यास कृपा करून उत्तरें आणऊन पाठवायास आज्ञा करावी. पत्रोत्तरीं आज्ञा कीं, वरचेवर शुके व फरमान भोंसले व निजामअली यांस परभारेंही पाठवणें ह्मणून आज्ञा. त्यास उभयतांपासीं आपले सरकारचे मातबर कोण कोण आहेत त्यांस पत्रें लिहून, येथून शुके, फर्मान जे

हस्तगत होईल ते पाठऊं. राजश्री देवाजीपंत, भोंसल्याकडील दिवाण, राजेश्री खंडोजी भोंसल्यापासीं असले, तर त्यांजपासीं पत्रें फर्मान पाठऊं. पूर्वीं शुके पाठविले, त्यांचीं उत्तरें आणऊन पाठविणार व सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. तात्पर्य, पादशाहांस व नजबखानांस इंग्रेजांशीं मिळूं देत नाहीं. त्यांजकडील पैगाम लालूच दाखवून वरचेवर लिहितात व माणसें येतात. श्रुत होय कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक ४३.

**श्रीवरद.** १५ आगष्ट सन १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति कीं, कुंवरसेन नामें खतरी पुणियांत आहे. त्यास, लटकेंच पूर्वीं मलकाजमानीकडील वकील ह्मणून तेथें गुजराण करून होता. तदोत्तर अबदुलअहदखानाकडे बातमी लिहीत होता. हल्लीं नजबखानास तेथील बातमीचीं पत्रें लिहून पाठविलीं होतीं. तेंच बजिन्नस धरून आपणांकडे पाठविलीं आहेत. त्यावरून ध्यानारूढ होईल. सरकारचीं पत्रें येतात, त्याप्रमाणें आह्मी येथील रंग पाहून, पूर्वींपासून दाबाचा जाबसाल करणें तो करितों. आणि तेथील कच्ची बातमी, पोटार्थी याप्रमाणें लिहितात! याजकरितां जाबसालांत अंतर पडतें. तें बजिन्नस पारसी पत्रें कुंवरसेनाचीं लिहिलेलीं पाठविलीं आहेत. तें मनन करून मर्जीस येईल त्याप्रमाणें शिक्षा करावी. कीं, अतःपर कोणी तेथील घराऊ कच्ची बातमी नजबखानास न लिही, तें करणार आपण आहेत. सरकारचे पदरीं दोन हजार बैल रसदेचे इंग्रेजांकडील वळून आणिले ह्मणून लिहिलें आहे, व कुंवरसेनानें, तीनशें बैल वळून आणिले ह्मणून लिहिलें आहे, व इंग्रेज, श्रीमंतांस जेरबार करितात व जंगलांत गुलजार करून स्वस्थ आहेत, असे कितीक इंश लिहिले आहेत. या गोष्टीनें आमचे बोलण्यांत अंतर पडतें. याचा बंदोबस्त आपण उत्तम जाणतील त्याप्रमाणें करतील. वरकड बारीक मोठें त्याचेंच पत्र वाचल्यानें ध्यानास येईल. याप्रमाणेंच फरुकाबादेस व अयुद्धेस पत्रें व येथें आणीख कितीकांस पत्रें पाठवितों. यास्तव मर्जीस आलें तर, तेथून खानदेशांत अथवा हर कोठें, पांच सात रुपये दरमाहा करून, अन्नास लाऊन, पुणियाहून व आपले लष्करांतून काढावा. याहीवर उत्तम असेल तें करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ४४.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, पूर्वीं यांजपासून कौलनामा लिहून घेतला आहे त्याची नक्कल, व हल्लीं यांनीं याद लिहून काहाडली आहे त्याची नक्कल, ऐशा दोन्ही नकला, हिंदवी करून पाठविल्या आहेत; त्यावरून ध्यानास येईल. तात्पर्य, पहिलें याजपासून लिहून घेतलें आहे त्या कौलनाम्यावरून अंतरवेद सरकारचे पदरीं पूर्ववत्-प्रमाणें पडते. याजकरितां यांचा जीव इच्छित नाहीं कीं, याप्रमाणेंच दुसरा कौलनामा राजश्री महादजी शिंदे यांचे नांवें लिहून द्यावा. प्रथम कौलनामा लिहून दिधला आहे, त्यांत शपथ लिहून दिधली आहे तींस अंतर पडून, बेइमानी पदरीं पडते; याजकरितां इंग्रेजांसीं मिळूं शकत नाहींत. आणि आह्मी नित्यांनीं तगादा करितों कीं, पाटीलबावा समीप आले आहेत, तुह्मींच चालून सामील व्हावें; किंवा आपली फौज त्यांचे सामील पाठवावी. त्यास, ह्या गोष्टी ऐकून टाळाटाळ करितात. याचें कारण हेंच कीं, इंग्रेजांस भितात. खोलून त्यांसीं बिघाड करूं शकत नाहींत. अंतस्थ आह्मांसीं बोलणीं मात्र बोलून आजपावेतों बोलत गेले व सरकारांतही लिहित गेले, त्याप्रमाणेंच आतांही लाऊन ठेविलें आहे. यांचें मानस कीं, इंग्रेजांचीं पलटणें पाटीलबावांनीं मारून अंतरवेदींत उतरले, व सरकारची फौज व सरदार जबरदस्त पडेलसें जाणतील, तेव्हां सामील होतील; आणि पेशजीं कौलनामा लिहून दिधला आहे त्याजवरच कायम रहातील. जोंपावेतों ग्वालेरप्रांतीं इंग्रेज आहेत, त्यांचें पारपत्य जाल्याखेरीज हे दिल्ली बाहेर निघत नाहींतसें दिसतें. पहिलेच वचनीं गुंतले आहेत, याजकरितां इंग्रेजांसही सामील होत नाहींत. दोहींकडे स्नेह ठेवितात. परंतु अंतःकरणपूर्वक इंग्रेजांचें पारपत्य व्हावें ह्मणून कायावाचामनेंकरून यांचें बोलणें शपथपूर्वक आहे. व पूर्वीं कौलनाम्याप्रमाणें अंतरवेदींतील महाल मुलूक दिल्लीसमीपील आहे, तो जातो ह्मणून आतां आशा उत्पन्न जाली आहे, व तूर्त यांची फौज शिखांकडेही अटकिली आहे, याजकरितां दुसरीकडे खलश करूं शकत नाहींत. श्रुत होय. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ४५.

**श्रीवरद.** आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, "पहिला कौलनामा तुह्मीं लिहून घेतला आहे, तो ठीकच आहे. हल्लीं मनस्वीपणें कलमें यादीवर लिहिलीं आहेत, याचें कारण नाहीं. सारांश, इंग्रेजांची पैरवी खुशकींत जाल्यास कोणाचेंही स्वरूप रक्षितील ऐसा अर्थ नाहीं. हे दूरअंदेशी अर्थ त्यांसीं बोलण्यांत आला. ........ पाटीलबावा यांनीं कोलारसानजीक इंग्रेजांस........ताण बसविला आहे. त्यास, पातशाही फौज व पलटणें शामील होऊन, इंग्रेजांचें पारपत्य करून, बंगाल्यापावेतों खरडीत नेऊन, मुलूख सोडवून, पुन्हां खुशकींत त्यांची पैवस्ती न होय, ऐसें जालें असतां सर्वांस चांगलें. यास्तव लिहिल्याप्रमाणें अमलांत येईल तें करावें. इंग्रेजांनीं करोडो रुपयांचा मुलूख कबजांत आणिला आहे. तो सोडविला असतां मोठेच नफे व नक्ष आहे. घरांतीलच वाटावाट करणें हें कांहीं चांगलें नाहीं. श्रीमंतांकडे मुलूख आहे, तर चाकरीही पातशाहांची घडते." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें मजकूर पातशाहांस व नजबखानांस समजावून ह्मटलें कीं, आपण डेरेदाखल व्हावें, यांतच सलतनतीचा दाब आहे. ह्मणून बहुतां प्रकारें यांचा पिच्छा घेतला. तेव्हां दसरियाचे दिवशीं प्रस्थान मात्र केलें आहे. येथून निघोन आगरियास चालतील तेव्हां खरें. अंमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं, व स्वामींकडे कौलनाम्याची नक्कल पाठविली, त्याप्रमाणें सेवकापाशीं नजबखानांचे मोहरेनिशीं कौलनामा शपथपूर्वक आहे. त्यास, आतां इष्टीन मारला गेला, व जिकडे तिकडे हिंदुस्थानांत जागां जागां इंग्रेज होते, ते जेथील तेथेंच गवारांनीं मारून ताराज केले. ह्मडून पथ्थरगडापासून गंगापार व अंतर्वेदीपासून तों कलकत्त्यापर्यंत मुलूख खालीं पडला आहे. गवार गर्दी जाली आहे. याजकरितां नजबखानांस आशा मुलुखाची उत्पन्न होऊन दुसरा कौलनामा करूं इच्छितात. त्यास, आह्मांसीं बोलावें तो आह्मांपाशीं कौलनामा शपथपूर्वक आहे. याजकरितां नेट देऊन आह्मांशीं बोलूं सकत नाहीं. ह्मणून परभारां, अनुपगीर गोसावी याचा व राजश्री महादजी शिंदे यांचा स्नेह आहे, ह्मणून त्यांजकडे सूत्र लावून, दुसरे तऱ्हेचा कौलनामा लिहून आणविला आहे; तो अनुपगीरापाशीं आहे. अनुपगीर जयपूर प्रांतीं आहे. तो मासपक्षानंतर दिल्लीस येणार. त्या कौलनाम्यांत पाटीलसाहेबीं काय लिहून दिधलें आहे हें सेवकास अद्यापि कांहीं समजलें नाहीं. व राजश्री

पाटीलबावांनींही मोघमच आम्हांस लिहिलें कीं, अनुपगीरापाशीं कौलनामा मोहोर करून दिधला आहे; ते तुम्ही एक होऊन जाबसाल करणें. त्यांत काय लिहिलें आहे, तें समजल्यावर मागाहून विनंति लिहूं. इंग्रेजांचे पारिपत्य चहूंकडे जालें. आणि नित्यांनीं....करीतच आहेत. आणि पाटीलसाहेब, ग्वाल्हेर प्रांतीं चार पलटणें इंग्रेजांचीं आहेत, तेथेंच आज सा महिने अटकले आहेत. ह्मणूनही नजबखानाचे मनांतून दहशत उडोन स्वस्थ चित्तें आहेत. लायकसिंग कनोजकर व फरोकाबादकर व मैनपुरीकर वगैरे छोटेखानी पठाण व राजे यांचीं पत्रें सेवकास आलीं आहेत कीं, तुमचे सरकारची फौज अंतर्वेदींत आली, ह्मणजे कालपीपासून दरोबस्त अंतर्वेद आह्मी अवघे शामील होऊन अंमल करून देऊं, ह्मणून बोलतात. त्यांचे पत्रांचीं उत्तरें लिहून पाठविलीं आहेत कीं, पाटीलबावांचे नांवें पत्रें आह्मांस लिहिल्याप्रमाणें पाठवून देणें; ह्मणजे फौजेची रवानगीविषयीं लिहूं. ह्मणून लिहिलें आहे. श्रुत होय कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति.”

---

## लेखांक ४६.

**श्री.** आगष्ट इ. स. १७८१.

“नवाब नजबखान बहादूर याजकडून पूर्वीं कौलनामा लिहून घेतला आहे त्याची नक्कलः—

श्रीमंत पंतप्रधान साहेबांसीं व आह्मांसीं दोस्ती व इरतबात कदीम आहे, त्यांत किमपि अंतर नाहीं. ह्मणून दुहराऊन कौलकरार दीन इमानची शपथपूर्वक लिहितों कीं, तुमचा मित्र तो आमचा मित्र; तुमचा शत्रु तो आमचा शत्रु, व आजपर्यंत जो मुलूख आमचे व आपले कबजांत आहे, त्यांत खलश रतिभार न व्हावा, व कांहीं मवाखजा मध्यें नसावा. पुढें दोन्हीकडील फौज मिळून शिवाय परगनात अंतरवेद जहागीर, श्रीमंत पंतप्रधान साहेब जो मुलूख नवा हस्तगत करूं त्यांत निम्मे हिस्सा वांटून घेऊं; व जरूर जाल्यास परस्परें कुमक करीत जावें. दोन्हींकडून फौजेचे खर्चाचा उपद्रव नसावा. यांत अंतर करूं तर पातशाहाचे पायाची व खुदा वरसुल खुदाची शपथ आहे. दोन्हींकडून दोस्ती व येगानगत रोजबरोज वृद्धींत असावी. छ० १५ जमादिलाखर संवत् १८३५ सन १९ पातशाही.”

---

## लेखांक ४७.

श्री. १५ आगष्ट इ. स. १७८१.

"नवाब नजबखान बहादूर हे हल्लीं याप्रमाणें कौलनामा लिहून देऊं ह्मणतात त्याची नक्कलः—

१ मेरट वगैरे महाल व इटावा वगैरे महाल व कडाकुरा कदीम, पातशाही भोजनखर्च व तोफखाना वगैरेची तनखाह आहे ते बदस्तुर आह्मांकडे असावें.

१ बंगाला वगैरे मुलूख कदीम पातशाही आहे ते दुष्मनाकडून काढून, बदस्तुर आह्मांकडे असावा.

१ सहारंगपूर वगैरे मुलूख बदस्तुर आह्मांकडे असावा.

१ शिफारस जाटाची न करावी.

१ सुभे इलाहाबाद आमचा आहे, तो बदस्तुर आह्मांकडे असावा.

१ नवाब वजिरांनीं मुलूख हल्लीं घेतला आहे व कदीम आहे, तो नवाब वजिराकडे असावा.

१ अहंमदखान बंगश याचा मुलूख वजिरांनीं घेतला आहे. बंगश मजकुराचा पुत्र चाकरीस हजीर जालीयास, पातशाही बंदा आहे. वजिराची खातरदास्त त्याचा प्रांत सोडावा.

१ शिखांकडील मुलूख आमची व तुमची फौजेचे इतफाकानें हस्तगत होईल, त्यांत निम्मे हिस्सा वांटून घेऊं.

१ ग्वाल्हेरचा मुलूख इंग्रेजांनीं घेतला आहे. त्यास ग्वाल्हेर किल्ला पातशाही आहे, तो बदस्तुर पेशकश हुजूरची करावी.

१ राजे जयपूर व राजे मारवाड कदीम बंदे पातशाही आहेत. हल्लीं हुजूरचाकरीस हजीर जालीयास, आपले कदीम मुलुखांवर सरफराज राहतील. जर बागी होतील, तर त्यांची तंबी करूं. जयपूरचा मामला आह्मांकडे असावा, व मारवाडचा मामला आपणांकडे असावा.

१ इंग्रेजांनीं दक्षिणचा मुलूख हल्लीं घेतला आहे व कदीम आहे, त्यांत निमे वांटून घ्यावा. श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबांचे खातरदास्त सुभेदारी श्रीमंत पंतप्रधान साहेबांची असावी.

१ सुभे अजमेर आपणांकडे असावा.

१ जो तुमचा मित्र तो आमचा मित्र. तुमचा शत्रु तो आमचा शत्रु. त्याची तंबी करावयांत अंतर करूं, तर शपथ आहे.

१ राजे गोहदकडील व आणिक तिकडील मुलूख तरवारचे जोरावर हस्तगत होईल. जर तिकडील राजे हजीर जालीयास मामला आह्मांकडे असावा. बागी जालीयास तंबी करून निमे मुलूख वांटून घेऊं.

१ उमराव राजे तिकडील पातशाहांचे बंदगींत हजीर होतील, त्यांसीं न बोलावें. व वसुल हुकमी केलीयास त्याचे तंबीस शामील राहूं.

१ मुलूख कालपी व झांशी आपणाकडे असावे.

१ कोणी आमचा चाकर उठून तुह्मांकडे जाईल, त्यास तुह्मीं चाकर न ठेवावें; व तुमचा चाकर आह्मांकडे येईल तर आह्मी चाकर ठेवणार नाहीं.

१ तूर्त तुह्मांस मोहीम रुबकार आहे, त्यास हुजूरचे फौजांस खर्चास तुह्मीं द्यावें. व पुढें हे करार असे कीं, आमची फौज तुमचे कुमकेस जाईल तर तुह्मीं खर्चास द्यावें. तुमची फौज आमचे कुमकेस आली तर आह्मी खर्चास देऊं.

छ० २१ जमादिलाखर संवत् १८३८ सन २२ पातशाही."

---



## लेखांक ४८.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, "नवाब नजबखान बहादूर यांस तुमचे लिहिल्याप्रमाणें वजीराचा अलकाब ठरावून लिहिलें, तें पत्रें पावलीं असतील. नजबखान सरकारचे दोलतखाई व इकडील दोस्ती ठेवितात. तेव्हां त्यांस ज्यांत भूषण तेंच इकडेही अवश्यक ह्मणून लिहिलें." ऐसीयास स्वामींचे लिहिल्याप्रमाणें मशारनिल्हेस मजकूर समजाविला. श्रवण करून बहुत संतोषी जाले, व दोस्तीवर कायम आहेत. इंग्रेजांकडील पैगाम, मीर खलील याचे विद्यमानें पन्नास लक्ष रुपये देतों, आमचे सामील व्हावें ह्मणून आहे. त्यास आजचे घटकेपर्यंत नित्यांनीं आपले स्नेहाची वृद्धि करून आपलेकडे यांचें लक्ष ठेविलें आहे, व बोलतात कीं, जितकी काळजी श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींस इंग्रेजांचे पारपत्याची नाहीं, तितकी मजला इंग्रेजांचे पारपत्याची व श्रीमंतांचे दौलतीचे रोशनीचें समाधान आहे. याप्रमाणें नित्यांनीं बोलून आमचें समाधान करितात. पुढें अंमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ४९.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'सरकारांतून उमदा सरदार बमय फौज पातशाहांचे हजुरांत येऊन पातशाहांनीं व सरकारचे फौजेनें मिळून अंतरवेद, बंगाल वगैरे मोहिम मातबर करावी ऐसें होतें. परंतु प्रस्तुत बरसात दोन चार महिने राहिली, आणि इंग्रेजी पलटणें जमा होऊन सिपरीवर आलीं; त्यांची तंबी करणें प्राप्त आहे. याजकरितां राजश्री महादजी शिंदे व शिवाजी विठ्ठल मातबर फौजेनें इंग्रेजी पलटणांचे पारपत्यास गेलेच आहेत. या समयांत पातशाहांचे हजूरची फौज दहा बारा हजार, बमय सरंजाम जंगी, व एक सरदार बवकूफ याजप्रमाणें राजश्री महादजी शिंदे यांजकडे येऊन, मशारनिल्हे यांनीं व त्यांनीं मिळून सिपरीवर पलटणें आलीं आहेत त्यांचें पारपत्य करावें. बरसातीस चार महिने अवकाश आहे. याजमध्यें या पलटणांचें पारपत्य करून गारत करावें हे नेकसलाह याजकरितां तुह्मीं पातशाहास व नजबखानांस मसलतीचे मार्गें बोलोन, फौज इंग्रेजांचें पारपत्यास लवकर ये, ऐसें करावें. बरसात जालीयावर मातबर मसलत करावी. तूर्त बरसातीस थोडे दिवस राहिलीयां हें काम करावें. येणेंकरून फार चांगलें आहे'. ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें पातशाहांस व नवाब नजबखानांस समजावून उत्तेजन बहुताप्रकारें दिल्हें कीं, तुह्मी श्रीमंतांस पत्रें लिहित गेलां, व आह्मांकडून लिहवीत गेलां. आतां तुमचे लिहिलेप्रमाणें राजश्री पाटीलबावा आले आहेत; यांचे सामील आपली फौज पाठवावी. यांनीं उत्तर केलें कीं, उगेच आह्मांस कशास लाजवितां? आह्मांपासीं फौज आहे ते शिखांकडे अटकली आहे. तिकडून रिकामी जालीयावर श्रीमंतांचे मनोदयानुरूप अंमलांत येईल ह्मणून बोलतात. अनुभवास येईल तें मागाहून विनंति लिहूं. इंग्रेजांकडील रुपये घेऊन त्यांस सामील न जाले, तें एक पातशाहांचे भयानें व स्वामींचे सेवेंत वचनीं गुंतले आहेत त्या शरमेनें आजवर राखिले आहेत. पुढें सेवकाचा पाय येथें ठरणें कठीण जालें, व यांजला त्यांचें आश्वासन वरचेवर येतच आहे. ते बातनी ठेऊन वारंवार यांस अर्ज करितों कीं, तुमचे नशिबानें जुंज लागलें. नाहींतर आजपावेतों दिल्लींत अम्मल करते. आतां आपला नक्ष राखणें तर राजश्री महादजी शिंदे यांस सामील होणें. नाहींतर आतां लालूच दाखवून पुढें ग्रास करितील तेव्हां पस्तावा कराल, व आमचें बोलणें स्मराल. तें न करणें.

ऐसें प्रातःकाल सायंकाल नित्यांनीं तऱ्हेतऱ्हेची ममता दृढ करून उत्तेजन देत आहों. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. ईश्वर सत्वर शत्रूचा नाश करो व स्वामींचा प्रताप अधिकोत्तर होय ते सुघडी. कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ५०.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'सांप्रत इंग्रेजी दहा पलटणें सिप्री कोलारसावर आलीं. त्यांचे पारिपत्यास राजश्री महादजी शिंदे यांनीं प्रथम फौजेची रवानगी करून, मागाहून आपणही राजश्री शिवाजी विठ्ठल व बळवंतराव धोंडदेव यांसहित व एकदोन राजे रजवाडे शामील करून घेऊन, पंचवीस हजार फौज व तोफखाना वगैरे जंगी सरंजामसुद्धां कुल्हापोशाचे तंबीवर रवाना जहाले. रा० बाळाजी गोविंद दहा हजारा फौजेनशीं शिंदे यांजकडे जलदच जाणार. एकूण तीस पस्तीस हजार फौजेचा जथा जाला. ईश्वरइच्छेनें मुखालीफाची तंबी खातरखांच होईल. ऐशा संधींत नवाब नजबखान बहादूर यांनींही बमय फौज, तोफखाना वगैरे सरंजाम सलतनतसुद्धां कुच करून, सिप्री कोलारसाचे रोखें यावें ह्मणजे पलटणास दुतर्फा शह बसून गारतच होतील. येविशीं तुह्मीं पातशाहांस व नजबखान यांसीं बोलून, लिहिल्याप्रमाणें लवकर नमुदास येईल तें करावें. या पलटणाची तंबी खातरखा जालियावर सरदार पुढील अंतरवेद व बंगाला ताराज करण्याविषयींचे मसलतीस पातशाहांचे हजुरांत येऊन पोहोंचतील. सारांश, सरकारच्या फौजा इंग्रेजांचे पारिपत्यास नमुद आहेत. ऐशा समयास नवाब मौसुफ यांनीं अजम केल्यास पातशाही दाब व बहुत कामें घडून येतील'. ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें वर्तमान पातशाहास व नजबखानांस सांगितलें, व उत्तेजन द्यावयाचें तें वरचेवर देतों. परंतु त्यांनीं एकच उत्तर केलें कीं, शिखांकडून फौज रिकामी जाल्याखेरीज कोणीही गोष्ट अंमलांत येत नाहीं. श्रीकृपेनें शिखांच्या मसलतीचा समारोप करून सत्वरच श्रीमंतांच्या लिहिल्याप्रमाणें अमलांत येईल, ह्मणून भाषणें मात्र करितात. प्रत्यास येईल तें मागाहून विनंति लिहूं. आपण रा० बाळाजी गोविंद दहा हजारा फौजेनशीं येऊन शामील होतील ह्मणून आज्ञा लिहिली. त्यांचें लक्षण व फौज आहे तें सविस्तर राजश्री पाटीलबावांनीं लिहिलेंच असेल. कृपा केली पाहिजे हे विनंति."

# लेखांक ५१.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'भोंसले फौजसुद्धां बंगाल्याचे सरहद्देस छावणी करून होते. बरसातींत इंग्रेजांचा उपसर्ग न व्हावा, कोणेही प्रकारें दिवस घ्यावे ह्मणोन कळलें. तैसे छावणीचे दिवस घालविले. आतां खुलासा जाला. याउपर बंगाला ताख्त ताराज करण्यांत येईल, गुंता नाहीं, ऐसीं त्यांचीं पत्रें आलीं. याउपर फौजा बंगाल्यांत शिरल्या असतील, कीं शिरतील. तिकडेही वर्तमान येतच असेल. नवाब निजामअलीखान बहादूर यांचे सरदार व फौजा जमा जाल्या व होतात. पातशाहा व नजबखान यांनीं सत्वर बाहीर निघावें, दिवसगत न लावावी. हंगामाचे दिवस हेच आहेत. सरदार फौजसुद्धां लौकरच पातशाहांचे हजूर येऊन पोंहचतील'. ह्मणून लिहिलें. त्यास, आज्ञेप्रमाणें नजबखानांस व पातशाहांस पत्रें समजाविलीं, आणि विनंति केली कीं, चहूंकडून इंग्रेजांस तान दिल्हा आहे व इकडील तोंड मात्र मोकळें आहे. त्यास आपण स्वारी बाहीर काहाडून इकडून इंग्रेजांस तान द्यावा, ह्मणजे चहूंकडे इंग्रेजांस तान बसून जे........... .......एकमेकांचे कुमकेस पोंहचणार नाहींत. पातशाईचा बंदोबस्त होऊन लहान थोर सर्व बंदगींत हजर रहात जातील. ह्मणून नजबखान समीप असतां पातशाहांस विनंति केली. त्यावरून त्यांनीं उत्तर केलें कीं, दक्षणी सरदार सत्वर कोणी येऊन पोंहचे, याजकरितां जाबतेखानास कुंजपुऱ्याकडे पाठवून शिखांसीं संमत करून, त्यांस समागमें घेऊन स्वारीस निघावें. इतक्यांत मिरजा-सफीखान यांनीं लेंकूरपण करून शिखांसीं बिघाड केला. आतां त्यांसीं दबून सलूक करावा, तर सलतनतीचा दाब राहत नाहीं; व सलूक न करावा तर आह्मी श्रीमंतांस लिहीत गेलों व वारंवार तुह्मांसीं बोलत गेलों, त्या गोष्टींत अंतर पडतें. या संकटांत आहों. ऐसें साशंकित होऊन बोलिले कीं, थोडक्याच दिवसांत शिखांसीं सलूक करून बाहेर निघतों. इतक्यांत राजश्री महादजी शिंदेही ग्वालेर प्रांतची इंग्रेजांची लढाई मारून पुढें येतील. ते व आह्मी सामील होऊन येथून कलकत्त्यापावेतों दो महिन्यांत जाऊन पोंहचतों. ह्मणून पातशाहांचे रुबरू नजबखान बोलिले. पुढें नित्यांनीं यास उत्तेजन देतच आहों. अंमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे हे विनंति."




निजामुद्दीन अवलियाची कबर.—दिल्ली.

## लेखांक ५१.



**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'राजश्री खंडोजी भोंसले बंगालयाचे सरहद्देस आहेत. त्यांजकडून पत्रें सरकारांत येतात कीं, "इंग्रेजाचे तालुक्यांत शिरोन जलदच तख्त ताराज करितों." या खबरा लौकरच सरकारांत येतील. ऐसीं लिहिलीं येतात. तेव्हां लिहिल्याप्रमाणें बंगालयांत शिरोन खंडोजी भोंसले यांनीं ताख्त ताराजी सुरू केलीच असेल. बातनी आलियावर लिहिण्यांत येईल. हैदरअल्लीखान यांनीं पेशजी चिनापट्टण वगैरे इंग्रेजी पलटणें गारत करून अर्काट वगैरे मकानें तसरुफांत आणिलीं. हें कलकत्तेकरांस समजतांच, करनेल कूट यास दाहा पलटणें समागमें देऊन, चिनापट्टणकरांचे कुमकेस रवाना केलें. कूट मजकूर चिनापट्टणास पाणियांतून येऊन, लढाईचा सरंजाम करून, खानबहादूर यांसीं मुकाबिला करावयाचे इरादियानें चालून आला. इतकियांत हैदरखान यांनीं फरासिसी जमीयत कुमकेस आणविली होती, त्यास कांहीं जाहाजें फरासिसी जंगी सरंजामसुद्धां फुलचरीचे रोखें येऊन पोहोंचलीं. हें वर्तमान कूट मजकूर यास समजतांच बेहिंमत होऊन फुलचरीचे आश्रियास गेला. हैदरअल्लीखान यांहीं फौजेसुद्धां जाऊन त्यास माहासरा दिल्हा आहे'. ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें हें वर्तमान पातशाहांस व नवाब नजबखान यांस सांगितलें. यांजकडे बातनी आली कीं, फुलचरी हैदरअल्लीखान यांनीं घेऊन फरासिसांस दिधली व चिनापट्टणास मोर्चे लाविले आहेत. व खंडोजी भोंसले यांनीं इंग्रेजापासून एक वेळ तीस लक्ष रुपये, व एक वेळ पंधरा लक्ष रुपये, व एक वेळ सात लक्ष रुपये, येणेंप्रमाणें बावन लक्ष रुपये घेऊन त्यांसीं सामदाम करून चिनापट्टणास इंग्रेजी पलटणें कुमकेस जातात त्यांस मार्ग दिल्हा, ह्मणून पातशाहांनीं व नवाब नजबखान यांनीं वर्तमान सांगितलें. भोंसले तेथें रुपाया घेऊन स्वस्थ फौज ताजी करून आहेत ह्मणून बातनी आली. तें सेवेसीं श्रुत व्हावयास लिहिलें असे. पुढें वर्तमान येईल तें मागाहून विनंति लिहूं. निजामअल्लीखान यांस दाहा लक्ष रुपये इंग्रेजांनीं खर्चास पाठविले व करार परस्परें केला कीं, एकवट होऊन सरकारचे अमलासीं बेआदाई करावी. ह्मणून येथें वर्तमान आलें. त्यास तेथें स्वामींचे प्रत्ययास येईल तें लिहावयास आज्ञा केली पाहिजे. दर्शन घडे ते सुघडी. कृपा केली पाहिजे. हे विनंति."

## लेखांक ५३.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:- पातशाहाचे येथें वृत्त आलें कीं, कलकत्त्यास इंग्रेज आहे त्यांनीं भोंसल्यांस बेताळीस लक्ष रुपये देऊन शांतवन केलें; व करार केला कीं, तुमचे खंडणीचा पैका राहिला आहे तो घेणें व आमचीं पलटणें चिनापट्टणाकडे कुमकेस जाऊं देणें. त्यावरून दोन कंपूंस भोंसल्यांनीं मार्ग दिधला. ते सुरक्षित दोन कंपू चिनापट्टणास रवाना जाले. कलकत्ता हैदरनाईकाच्या दबरतीनें भयाभीत होऊन, सारें नांवा भरून माल व सरंजाम व रांडापोरें इंग्रेजाचीं अयोध्येकडे व लखनौकडे आलीं. या दिवसांत असफउद्दौला वजीर यांस इंग्रेजांनीं उत्तर दिधलें कीं, आमच्यानें तुमचा मुलूख राखवत नाहीं. तुह्मीं आपली खबरदारी करून घेणें. त्यावरून वजीराचे येथें फौजेची निगादास्त हिंदुस्थानी लोकांची कंबेश आहे. श्रीकृपेनें राजश्री महादजी शिंदे यांनीं ग्वालेरचे इंग्रजांचें पारिपत्य करून इटाव्याकडे किंवा कालपीकडे अंतर्वेदींत उतरले, तर तमाम अंतर्वेद खाली आहे. नजबखानांचे काबूंत पातशाहा व नजबखान आजपावेतों शपथपूर्वक ह्मणतात कीं, शिखांचे झुंजाचा फैसला जाला ह्मणजे आह्मी राजश्री महादजी शिंदे यांचे शामील होतों. इंग्रेजांशीं झुंजास नमूद होत नाहींत. सरकारची जरब भारी जालीयावर ताबेदारी करितील. इंग्रेजास अतिशय भितात, व पूर्वीं स्वामींस पत्रें लिहिलीं व सेवकाकडून साहेबीं लिहविलें, तैशींच बोलणीं आहेत. अंमलांत येत नाहीं. पुढें होईल तें लिहूं. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ५४.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'भोंसल्यांची फौज बंगाल्याचे हद्देस गेली. तिकडे छावणी जाली. हवा वाईट सबब छावणींत तमाम घोडीं मेलीं. लोकांत बळ राहिला नाहीं. इतक्या फौजेनसीं बंगाल्याची ताख्तताराजी होणार नाहीं. तेव्हां उगेच माघारा फिरोन जावें, तों आब जातो; फौजेचें देणें आंगावर येतें; शत्रु शेर होतो; ऐसें जाणून काबू पुर्ते इंग्रजांसीं बोलणें करून पैका घेतला. मुलूक ताराज केलीयानें आपले हातीं कांहीं लागत नाहीं. पैका घेतल्यानें आपल्या फौजेची हुशारी व शत्रूचा मुलूक मारल्याचें फळ आलें. पैक्यानें शत्रु खालीं

केला; आपलें काम जालें. ऐसें जाणून, पैका घेऊन फौजा माघारा आल्या. आपल्यास कळावें ह्मणून लिहिलें असे. राजश्री मुधोजी भोंसले यांनीं व दिवाकरपंत यांनीं सरकारांत लिहिलें होतें. बंगाल्यांत फौज पाठवावयाची तजवीज होत आहे. फौज तयार जाली ह्मणजे बंगाल्यास चालावयास तयार. ऐसें भोंसल्याचें बोलणें आहे, व सरकारचेही वकील भोंसल्यापासीं आहेत त्यांचे लिहिण्यांत ऐसेंच आहे. नवाब निजामअलीखान यांनीं दहा लक्ष रुपये घेतले नाहींत. घेतले असतील ते आपले मल्ल्यापैकीं घेतले असतील. दुसरें कांहीं नाहीं. हैदरअलीखान यांनीं फुलचरी घेतली नाहीं. जरनेल कुटास लढाईस ताकत नाहीं. सबब पलटणासुद्धां देवणापट्टण ह्मणून जागा आहे; तेथें नवाब बहादर यांची फौज व गाडद बादीस + +' ह्मणून आज्ञा लिहिली. त्यास सदरहू मजकूर पातशाहांस व नवाब नजबखानांस निवेदन केला. तो ऐकून आपले तदबिरीची व सर्वां सरदारांस हुकुमांत ठेवण्याची तारीफ बहुत केली कीं, राजश्री नानांनीं तरतूद इंग्रेजांचे पारपत्याची फारच अपूर्व केली, आणि आह्मांस सांगितलें कीं, तुह्मीं आपलें पत्रीं त्यास ल्याहावें कीं, हैदरअलीखान व निजामअलीखान यांसीं एकवाक्यता ठेवून आपलाले सरहद्देस इंग्रेजांचे पारपत्यास मजबूत राहत. आणि कोणीही सलूखाचा मजकूर मधें न आणीत तें करणें; व भोंसल्यास ताकीद करून बंगाल्यास फिरून फौजा सत्वर जात तें करणें; ह्मणून सेवकास पातशाहांनीं निक्षून ताकीद करून लिहावयास आज्ञा केली. त्यावरून विनंति लिहिली आहे. श्रुत होय कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक ५५.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'नक्षाप्रमाणें हैदरअलीखान बहादूर यांनीं चिनापट्टणाकडे इंग्रेजांस तंग केलें. करनेल मंडोर व बेली फौजसुद्धां चालून आले होते, ते दरोबस्त गारत केले. कांहीं बाकी ठेविली नाहीं. याचा तपशील पेशजीं लिहिलाच होता. त्याउपर अर्काट स्थळ, नामी सुभा, रहावयाचा जागा आणि मजबूत जाणून अर्काटेस माहासरा होता. महमदअलीखान यांचे दिवाण आचण्णापंत पोख्त सरंजामासीं आंत होते, तें स्थळ छ ४ जिलकादीं हैदरखानांनीं हल्ला करून घेतलें. आचण्णापंत धरले. आरणी वगैरे तमाम किल्ले जात हस्तगत केले. राहतांना बाकीस चेनापट्टण व त्रिचनापल्ली व येलूर तीन स्थळें राहिलीं. त्यास

चेनापट्टणास माहासरा करण्यास खानबहादूर जाणार होते. गेले असतील. वरकड रामेश्वरपावेतों इंग्रेजांचा मुलूक हैदरखानांनीं काबीज केला. इंग्रेजांचे लोक बेलीच्या लढाईत व अर्काट मिळून दहा हजार पगडीवाले व दोन हजार टोपीवाले ठार हैदरखानांनीं मारिले. सातशें गोरे व बेली सरदार इंग्रेजांचा पाडाव करून आणिले. ऐसें चहूंकडून जाहाल्यानें इंग्रेजांचें पारपत्य होऊन पातशाहीचा नक्षा होईल'. ह्मणून लिहिलें. त्यास, आज्ञेप्रमाणें या पत्राची पारसी करून पातशाहांस,व नवाब नजबखानांस दाखविलीं. वाचून हैदरअलीखानाचा स्तव केला व बोलिले कीं, श्रीमंतांचें दैव थोर आहे. आह्मीं ह्मटलें कीं, तिकडून हैदरअलीखान यांनीं तान बसविला आहे; याप्रमाणें आपणही स्वारी बाहीर काढून इंग्रेजांस तान बसवावा. ऐसा समय पुढें येणार नाहीं. जर इंग्रेज जबर पडले तर पातशाहीचे दावेदार आहेत, ऐसें स्पष्ट बोलिलों. त्यांनीं उत्तर केलें कीं, मीही त्याच तजविजींत आहे. श्रीकृपेंकरून थोडक्याच दिवसांत अमलांत येईल ह्मणून बोलिले आहेत. परंतु अंमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. हे विनंति."

---

## लेखांक ५६.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'तुह्मीं पातशाहांस व नजबखान बहादूर यांस हरवख्त इतल्ला करून टोपीकरांचे वकिलास रुसकत करविलें, हे गोष्ट चांगलीच केली. इंग्रेज, गुरबत दाखवून काबू साधावयास चुकणार नाहींत. मागें त्यांनीं मकर फेरब करून भुलावा देऊन सुजायतद्दौला याचे रियासतींत व बंगाला वगैरे पातशाही मुलुखांत आपला तसरूफ केला, व चार दिवस रास्ती व दुरुस्तीची चाल दाखवून, अखेर काय काय बदसलुखी अमलांत आणिली हे पातशाहा व नवाब मोसूफ यांस जाहीर व रोशन असतां इंग्रेजांचे वकिलास रुख देणारच नाहींत. त्यांत तुह्मीं हरवख्त सुचवून वकिलास रुकसत करविलें, नेक सलाह दिली. पुढेंही इंग्रेज फंदफरेब करून पातशाहा व नवाब नजबखान यांस भुलावा द्यावयास कसूर करणार नाहीं. सबब त्यांची बातनी पक्की राखून पातशाहा व नवाब नजबखान यांजपाशीं टोपीकरांचा दखल हरगीज न होय तें करावें'. ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यांस आज्ञेप्रमाणें यांचे घरांत, अंतःपुरांत, वगैरे खवासास राजी राखून तेथील बोलण्याची देखील बातमी राखितों. आणि रात्रंदिवस दरबारची मेहनत

करितों. यांचें कारण हेंच कीं, यांनीं बोलल्याप्रमाणें व लिहिल्याप्रमाणें सरकारचे सरदारांचे शामील, फौजसुद्धां व्हावें. ते तो गोष्ट आजपावेतों प्रत्ययास येत नाहीं. पुढेंही याचे साधनांत आहोंत कीं, द्रव्याची लालूच न धरितां इंग्रेजांस न मिळावें, याच तोडजोडांत रात्रंदिवस असतों. स्वामींचे प्रतापेंकरून यांचा व इंग्रेजांचा मेळ होऊं देत नाहीं. यांनीं राजश्री पाटीलबावांस शामील व्हावयास्तव रात्रंदिवस चिंतातुर असों. ईश्वर स्वामींचा प्रताप अधिकोत्तर करो. दर्शन घडे तो सुदिन. कृपा केली पाहिजे. हे विनंति."

---

## लेखांक ५७.

**श्रीवरद.** १५ आगस्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'करनेल गाडर सुरतेजवळ जमावसुद्धां होता. एक दोन पलटणें खानदेशांत नमुद केलीं, तेव्हां बादबरसात हाच रूख धरील, ऐसें समजोन राजश्री गणेशपंत बाहीर त्या तोंडावर ठेविले. फौजेचा जथही तिकडेच घातला. पुढें गाडरानें खानदेशाचे मैदानांत यावें, हे इच्छा. परंतु मैदानांत इंग्रेजांचा परिणाम लागणार नाहीं, ऐसें समजोन तमाम सरंजामसुद्धां कोंकणांत समुद्रकिनाऱ्यानें उतरला. सरकारांतून सरदार राजश्री रामचंद्र गणेश, व चिमाप्पा पानसी, व भवानी शिवराम वगैरे जमावानसीं रवाना जाले. लहान-मोठ्या लढाया एक दोन जाल्या. त्यांत इंग्रेज हटवून घातले. सरकारच्या फौजा संपूर्ण जमा जाल्या नाहींत. आठा चौ रोजांत होतील. थोडेच दिवसांत इंग्रेजांस इकडून तंबी होईल. तें लिहिण्यांत येईल' ह्मणून लिहिलें. त्याप्रमाणें या पत्राची पारसी करून पातशाहांस व नजबखानांस समजाविली. वाचून बहुत संतोष मानून, आपले कार्यकर्तेपणाचें व रुस्तमाचें स्तवन बहुत केलें. धन्य श्रीमंतांची पुण्याई, कीं त्यांचे संग्रहीं ऐसे दौलत आटोपायाजोगतीं माणसें! ह्मणून स्तुत बहुत केली. पुढें अमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. ईश्वर स्वामींस यश देणार समर्थ आहे. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

# लेखांक ५८.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'कलकत्त्याहून थोडा बहुत सरंजाम चेनापट्टणाकडे गेला; त्याजवरून जरनेल कूट हुशारी मानून, अडचण सोसून बाहीर निघाला. त्याची व हैदरनाईकाची लढाई होऊन इंग्रेजांची सिकस्त जाली. तीन हजार माणूस मारिलें, व दोन हजार जखमी जालें. हत्यारबंद धरून आणिले, व तोफा हस्तगत केल्या. हैदरखानाची जरब चांगली बसली, व सरकारचे फौजांनीं गाडर सिकस्त केला, तो ........... मुंबईस गेला. पुढें उमेद धरून खुशकींत चाल केल्यास इकडीलही फौज तयार आहे. श्रीमंतांचे प्रतापें उत्तमच होईल. सुरतेकडील मुलूक ताराज करून शहावर फौजा आहेतच. शिंदे यांची लढाई कुलारसावर नेहमीं होतच आहे. याप्रमाणें इंग्रेजांस चहूंकडून तान बसविला आहे. गाडर बोरघाटावरून सिकस्त खाऊन माघारा चालला. तेव्हां सरकारचे सरदारांनीं दोन तीन लढाया मातबर केल्या. इंग्रेजांचा नाश फार जाला. पळून नजीक दरयाव ह्मणून जहाजांत बसून मुमईस गेला. तेथें गेलीयावर बातमी आली कीं, सोळाशें माणूस ठार जालें. व दोन सरदार थोर, व लहान सरदार बेताळीस याप्रमाणें ठार, व सव्वीसशें माणूस जखमी, याप्रमाणें त्याची खरावी जाली. तुह्मांस कळावें ह्मणून लिहिलें आहे'. ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, या पत्राची पारसी करून पातशाहांस व नवाब नजबखानांस मजकूर समजाविला. वाचून बहुत संतोष पावले; आणि ह्मणाले जे, 'धन्य श्रीमंतांचें पुण्य, कीं धणी सात वर्षांचा, आणि कारभारी यांनीं याप्रमाणें तरतूद करून, सर्वांस ममतेंत घेऊन, चहूंकडून इंग्रेजांस जरब बसविली आहे. आमचे सलतनतींत ऐसा प्रकार असता तर दौलत दुष्मनाचे हवाला करते! याप्रमाणें पातशाहींत माणूस कोणी नाहीं'. ह्मणून पातशाहा व नवाब नजबखान स्वामींची तारीफ दोन घटकांपर्यंत करीत होते. शेवटीं पातशाहांनीं नजबखानास आज्ञा केली कीं, कांहीं तुह्मीं आपली तारीफ पातशाहींत दाखविणें. त्याचें उत्तर नजबखान बोलिले कीं, ईश्वरकृपेनें सत्वरच नमुदांत येईल. याप्रमाणें बोलणीं जालीं. पुढें प्रत्ययास येईल तें लिहूं. श्रुत होय कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति."

## लेखांक ५९.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसींः—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, 'सिपरी कोलारसाकडून पलटणावर राजश्री महादजी शिंदे फौजसुद्धां चालून गेले. तिकडील वर्तमान वरचेवर तुह्मांस कळतच असेल. शिंदे यांणींही तुह्मांस पत्रें लिहिलीं असतील. त्याप्रमाणें तुह्मीं पातशाहांसीं व नजबखानबहादूर यांसीं बोलोन, नजबखान यांनीं सरंजामसुद्धां तयार होऊन इंग्रेजांचे पलटणावर तिकडून यावें. इकडून शिंदे दुहेरी तान बसल्यानें पलटणें गारत होतात. पुढें शिंदे फौजसुद्धां नजबखान मिळून थोरली मसलत होईल. यांत कामें फार निघतात. नेक सलाह आहे. इंग्रेजांवर मोठी गालबता होती. पुढें निर्वैर, कलकत्त्याकडील मसलत करावयास चांगलें. इतकीयांत शिखांसींही सलूख होऊन सामील होतील. नजबखान व शिंदे यांचे विचारें छावणी कोणे ठिकाणीं करावी ह्मणजे बादबरसात नीट पडेल. याप्रमाणें तुह्मीं कारस्थान करून नजबखान यांचे निघण्यास दिरंग लागेसा असलियास फौज सरंजाम पुढें फौज पलटणें इंग्रेजी पलटणांवर रवाना व्हावीं. मागाहून त्यांनीं निघावें. या गोष्टीस दिवसगत न लागावी. लिहिल्याप्रमाणें घडावें. यांत पुढील मनसब्यास फार उपयोग आहेत'. ह्मणून लिहिलें. त्यास आज्ञेप्रमाणें यांसीं हा मजकूर बोलिलों. नजबखानानें उत्तर दिलें कीं, 'आमची फौज हातावर. आमचे पदरीं पैका नाहीं, कीं फौजेस वांटून रवानगी करावी. जे फौज सरंजामी, ते फौज मिर्जासफीखान याजपासी कुंजपुऱ्याकडे अटकिली. त्यास बादबरसात मीच पातशाहासहित फौजसुद्धां बाहीर निघतों. मीं निघाल्याखेरीज वेगळी फौज पुढें पाठविली, तर फौजेची आब राहाणार नाहीं. आह्मांपासीं पैका नाहीं, व राजश्री पाटिलबावापासीं मागावा, तर त्यांपासींही पैका नाहीं. याजकरितां ईश्वरइच्छेनें मीच पातशाहासुद्धां बाहीर निघतों'. ह्मणून बोलतात. प्रत्ययास येईल तें मागाहून विनंती लिहूं. कृपा केली पाहिजे. नजबखानांनीं व शिंदे यांनीं एक होऊन, .... .... .... छावणी एकविचारें करून अंतरवेदींत शिरावें. येविषयींचीं उत्तेजनें तऱ्हतऱ्हेनें दिधलीं. परंतु अमलांत न आलें. यास्तव हलीं सेवकानें निग्रह केला कीं, तुह्मांस पातशाहीची रीत करणें नाहीं, तर आह्मांस आज्ञा देणें. श्रीमंत स्वामींपासीं जाऊं व दुसरी तदबीर त्यांस सुचवूं. आपणाकडील नाउमेद जाली. आमचें तुमचें लिहिण्याची अ (?) चांगली श्रीमंताचें मनांत दृढ जाली. अतःपर उमेदवार करावें व लिहावें व लिहिवावें. यांत सलतनतीस उत्तम नाहीं, व दगा खाल.

याप्रमाणें समर्पक स्नेहवादें लाजविलें. त्याचीं उत्तरें विशेष त्यांनीं केलीं. तात्पर्य, निश्चय ठराविला कीं, वर्षाकालानंतर निघतों. अंतर करणें नाहीं. न निघालों तर आमचें नुकसान भारी. यास्तव शत्रूचें निःपात करणेंच सलाह. सेवेसीं विनंति ल्याहावयास बहुत ममतेनें व इरादियानें शपथा वाहून सांगितलें, तें लिहिलें असे. पुढें अमलांत येईल तें खरें. सेवेसीं श्रुत होय. दर्शन घडे ते सुघडी. हे विनंति."

---

## लेखांक ६०.

**श्रीवरद.** १५ आगष्ट इ. स. १७८१.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं,' पेशजीं कर्नेल गाडर कलकत्त्याहून आला, तो सुरतेस होता. तेथून पाण्याचे मार्गें अडचणींतून आपले जमावानिसीं ममईस आला. ममईकरांसीं व त्यासीं कौशल जाहालें. तेव्हां कोंकणांत वसईवर हंगामा सुरू करतील ऐसें समजोन, वसईंत सरंजाम पहिला होता, आणखीही सरंजाम पोख्त करून मजबुती केली होती; त्यास इंग्रेज येऊन वसईस नमुद जाले. त्याजवरून सरकारांतून रामचंद्र गणेश बमय फौज व सरंजाम किल्याचे कुमकेस पाठविले, कीं एकीकडून किल्याचा मार व दुसरीकडून फौजेचा माहासरा. येणेंकडून मुखालिफ यानें घायास येऊन अंदेशांत यावें. त्याप्रमाणें मशारनिल्हे फौजसुद्धां जाऊन पोहोंचले. इतकीयांत हरामखोरांनीं वसईचा किल्ला इंग्रेजांचे हवालें केला. उपरांत रामचंद्र गणेश यांची व इंग्रेजांची लढाई चांगली जाहाली. ते लढाईंत खासा रामचंद्र गणेश व कांहीं लोक कामास आले, व इंग्रेजांकडील कांहीं लोक व सरदार ठार व जाया जाले. त्यानंतर सरकारचे फौजेंत त्यांचे पुत्र माधवराव रामचंद्र होते. ते फौजसुद्धां इंग्रेजांस माहासरा देऊन राहिले होते. मागाहून राजश्री हरिपंत यांस बमय फौज हुजुरात व तोफखाना व पायदळ बोरघाटाखालें गाडराचे मुकाबिल्यास पाठविले, व राजश्री तुकोजी होळकर इंदुरास होते, त्यांस पत्रें सरकारांतून पाठविलीं होतीं कीं, तुह्मीं आपले फौज सरंजामसुद्धां निघोन खानदेशांत सुलतानपूर नंदुरबार येथें केशवपंत दातार व चंद्रराव पवार, दोन चार हजार फौज व दोन पलटणें इंग्रेजी व तोफा ऐसा जमाव करून हंगामा केला आहे, त्यावर गणेशपंत बेहरे सरकारांतून फौजसुद्धां आहे तेथें तुह्मींही येऊन केशवपंतास तंबी पोहोंचाऊन दरमजल हजूर यावें. त्यावरून होळकर बमय फौज व सरंजाम निघोन नंदुरबारेस येऊन, गणेशपंत बेहरे व आपण मिळोन केशोपंत यांची तंबी करून दोन

पलटणें गारत केलीं. चार तोफा व दोन हत्ती व दोन हजार बंदुका व घोडी वगैरे सरंजाम पाडावा आला व चंद्रराव पवार ठार जाले. केशोपंत एकलाच पळून झाडींत गेला. उपरांत गणेशपंत यांसीं सुरत प्रांतांत ताख्तताराजी करावयास रवाना केलें. तुकोजी होळकर दरमजल हजूर आले. श्रीमंतांची भेट जाहालियावर राजश्री हरीपंत यांजकडे रवाना केले. ते बोरघाटावर जाऊन पोहोंचले. इतक्यांत गाडर वसईहून निघोन बोरघाटाचे रोखें अडचणींतून येऊं लागला. तेव्हां राजश्री हरीपंत व पुढील फौज मिळोन, दोन टोळ्या करून, दुतर्फा माहासरा देऊन तोफांची मार होत होती. परंतु तेथें भैदान नाहीं; अडचणीची जागा; फौजेनें निकड केल्यानें काम होणार नाहीं; सबब मैदानांत आणावयाचे तजविजींत होते. इतक्यांत इंग्रेज मगरुरीनें बोरघाट चढून घाटमाथां आला. नंतर राजश्री परशरामपंत मिरजकर यांस दहा हजार फौजेनसीं कोंकणांत इंग्रेजांचे पछाडीस रसद बंद करून पायबंद द्यावयाकरितां पाठविले आहेत. त्यांनीं दोन हजार बैल गल्याचे व किरानबाबेचे छकडे वगैरे रसद जात होती ते मारून आणिली. घाटावरते इंग्रेजांचे मुकाबिल्यास राजश्री हरीपंत व होळकर तीस हजार फौज व तोफखाना व पंधरा हजार पायदळ समेत आहेत. रोज लढाई सुरू आहे. इंग्रेजांकडील दोन तीन सरदार, कांहीं लोक गोळ्यांनीं व बाणांनीं ठार जाले. त्यांचे लष्करांत रसद पोंचत नाहीं, यामुळें माहागाई फार आहे. दहा अकरा पलटणें व तीस पसतीस तोफा व एक हजार तुरुक स्वार याप्रमाणें त्यांचा सरंजाम आहे. घाटाखालें व घाटावर सरकारी फौजा आहेत. सबब इंग्रेज बहुत फिकिरींत व आंदेशांत आहे. घाटावर ज्या अडचणींत राहिला आहे, तेथेंच आहे. कूच करून पुढें येत नाहीं. राजश्री हरीपंताचे पुस्तगरमीवर आह्मींही दाहा हजार फौजेनसीं आठा दाहा कोसांचे फासल्यानें आहों'. ह्मणोन लिहिलें. तें सविस्तर अक्षरशा पारसी करून पातशाहांस व नवाब नजबखानांस येथें वर्तमान आगाऊ आलें नव्हतें, तें समजाविलें. त्यांनीं हें वर्तमान ऐकून आपली स्तुत तरतुदीची बहुत केली, कीं 'आज आठ वर्षें जालीं. घरच्या धण्याचा फितुर व मुख्य धणी तो लहान नादान, ऐसें असोन, इंग्रेजाचें झुंज आजपावेतों मोडिलें; व पुढेंही लढाईस मुस्तेद आहेत. हें काम दक्षणचेच सरदाराचें कीं इतके दिवस ठरून राहिले. ईश्वरें कारभारी व सरदार मुत्सद्दी दौलतीस द्यावे तर याप्रमाणेंच द्यावे'. ह्मणून बहुत प्रकारें स्तव करून बोलिले, कीं श्रीमंत माधवरायाचे ताले शिकंदर कीं, हैदरनाईकही झुंजास शरीक जाला. राजश्री नानांनीं इतकी मेहनत करून दौलत राखिली आहे. त्याप्रमाणें इंग्रेजांचे फंद फरेबांत येऊन

त्यांसीं सलूख किमपि न करावा. कदाचित् इंग्रेजांनीं दबून सलूख केला, तर पुढें सरंजाम करून घ्यावयास चुकणार नाहींत. याजकरितां सलाह हेंच आहे कीं, इंग्रेजास नेस्तनाबूत करावें. यांतच सर्वांचें रूप व अब्रू आहे. याप्रमाणें बोलून आपले ईश्वराचें नांव घेऊन श्रीमंतांस आशीर्वाद दिधला.......कीं, ईश्वर त्यांस यश दे. .... .... .... .... .... .... ....
याप्रमाणें भाषणें जालीं, व हेही बोलिले कीं, माधवराव जाधवराई कोण आहे, त्यास इंग्रेजांचें बोलाविल्याप्रमाणें सलुकास पाठविलें, त्यास काय ठरलें? तेव्हां आह्मीं उत्तर दिधलें कीं, सलुकास पाठविलें नसेल. त्यांनीं बोलाविलें असेल. तर त्यांचा मनोदय व लांबी रुंदी पाहावयास पाठविलें असेल. हें वृत्त आह्मांस आलें नाहीं. लिहून उत्तर येईल तें अर्ज करूं. ह्मणून बोलून सेवेसीं श्रुत व्हावयास विनंति लिहिली असे. तर कृपा करून जाबसाल काय लागला आहे, तें लिहावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विनंति."

---

## लेखांक ६१.

पै॥ छ १३ सवाल. **श्रीवरद.** ५ सप्टेंबर इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, सेवक पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल ता॥ छ १६ माहे रमजान मु॥ दिल्ली स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः– मिस्तर इष्टीन इंग्रेज कलकत्त्याहून श्रीकाशीस कुटुंब व सरंजामसुद्धां आला होता. त्यास श्रीकाशीचा राजा चेतसिंगासीं त्यांसीं बिघाड होऊन जुंझ जालें. इंग्रेजांची शिकस्त जाली. राजानें फौज मारून ताराज केली. इंग्रेज पळून पट्टणाकडे जात होता, तों राजाच्या फौजेनें पिच्छा करून, बारा कोसांवर मारून डोकें कापून आणिलें, व स्त्री धरून आणिली. फरुकाबादेस व अयुद्धेस व शृंगीरामपुरीं वगैरे जागा जागा फिरंगी होते, ते गव्हारांनीं जेथील तेथेंच मारून लुटून घेतले. स्वामींचे प्रतापें शत्रूचा नाश जाला. वरकड वृत्त तपशिलें राजश्री बाळाजी जनार्दन विनंति करितील त्यावरून श्रुत होईल. कृपा करून हस्ताक्षर पत्रोत्तरीं दर्शनलाभ देणार स्वामी समर्थ आहेत. दर्शन घडे ते सुघडी. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ६२.

**श्रीवरद.** सप्टेंबर इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, ग्वालेरप्रांतीं राजश्री महादजी शिंदे आहेत. तेथें इंग्रेजांचे लोक आहेत, तेही बहुत जेर आहेत. जर श्रीकृपेनें त्यांचें पारपत्य सत्वर विजयादशमीचे अलीकडे होऊन राजश्री पाटीलबावा अंतरवेदींत कुरीयाकडे उतरतील, तर या दिवसांत वजीर व राजा चेतसिंग खर्चासही देतील, व फौजेसहित कलकत्त्यापावेतों चाकरीसही समागमें राहतील. याप्रमाणें समय आहे. श्रीकृपेनें घडेल तें मागाहून विनंति लिहूं. श्रीकाशीहून चेतसिंग राजाचेंही सूत्र सेवकाकडे आलें आहे. परंतु खातरजमा नाहीं. आह्मींही पत्रें पाठविलीं आहेत. खातरजमा जालीयावर हजूर विनंति लिहूं. मोठी खातरजमा, फौजेस खर्चास कबूल करून निशा पाठवितील, तर राजश्री महादजी शिंदे यांजला खातरजमा लिहूं; व सेवक त्यांजपासीं जाऊन येऊन, कांहीं फौज दिल्लीकडील घेऊन, श्रीगंगापारीं, व रोहिले, व अंतरवेदींतील बंगश वगैरे जमा करून, असफद्दौलास सामील करून घेऊन, श्रीकाशीस या मार्गें जावयास राजश्री पाटीलबावा फौज थोडीसी चांगली देतील तर घेऊन, स्वामींचे प्रतापें नक्ष होय तें ईश्वर करो! राजश्री पाटीलबावांनीं यमुनातीरानेंच श्रीकाशीस जावें. राजे चेतसिंग, बलवंतसिंगाचा पुत्र, श्रीगंगा आपले प्रांतांत पूल बांधून अथवा नावांवर उतरून घेईल, हा विचार सेवकानें आपले मनांत नेमून, राजे चेतसिंगास पत्रें पाठविलीं आहेत. खर्चाची सोय जालीयास घडोन येईल, तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. श्रीमंत स्वामींचा प्रताप वृद्धीतें पाविणार, स्वामींचे तखदिरीनें श्रीसांब समर्थ आहे. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ६३.

**श्रीवरद.** २४ आक्टोबर इ. स. १७८१.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य पुरुषोत्तम महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना विनंति. येथील कुशल तागाईत छ० ६ माहे जिल्काद मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंदलेखन करीत असावें. विशेषः– आपण छ० ९ साबानचें पत्र पाठविलें, तें छ० २ सवालीं सरकारजोडीसमागमें पावलें. पत्रीं आज्ञा कीं, 'इंग्रेज यांचें पारपत्य सर्वांनीं करावें. त्यांत पातशाहा खाविंद यास अगत्य. .... ....अनायासें काबू

साधला, ऐसी संधी पुढें करून केल्यास घडावयाची नाहीं. शिखांकडील मसलत करितां फौजा राजश्री माहादजी शिंदे यांजकडे येत्या, तर इतके दिवसांत सिपरीवरील इंग्रेजांचें पारपत्य करून, शिंदेसहित फौजा पुढें इंग्रेजांच्या मुलुकांत जात्या. अद्यापि शिखांकडील समेट होऊन फौजा रिकाम्या व्हाव्या. दसरीयाचे हंगामीं नवाब नजबखानबहादूर यांणीं सरंजामसहित यावें. शिंदे व त्यांनीं मिळोन सिपरीवरील इंग्रेजांचें पारिपत्य करावें. सहजांत होईल. उपरांत बंगाल्यांत अगर गंगापार जाण्याचा मनसबा करावा; यांत पैका मिळतो व लौकिक पातशाहीचा होतो. शत्रूची कमरशिलाणी होते, ऐसें आहे. सर्व मनसबे तुह्मीं पातशाहांसीं व नवाब मोसुफ यांसीं बोलून लिहिल्याप्रमाणें लवकर अमलांत ये तो अर्थ करावा. शिंदे यांजकडील वर्तमान वरचेवर इकडे येतच आहे'. ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें पातशाहांसीं व नजबखानांसीं सविस्तर मजकूर श्रुत केला कीं, इंग्रेजांत कांहींच जीव नाहीं. वरचेवर तुह्मांकडे वर्तमान येत असतां, ईश्वरें मुलूख दिल्हेला असतां, तुह्मी घेत नाहींत. श्रीमंत पातशाही बंदे आहेत. ज्यांत पातशाहांची सरसबजी, ते गोष्ट समयास पातशाहांस व आपल्यास अर्ज करावा, याजकरितां वारंवार आह्मांस आज्ञा लिहितात. त्याजवरून अर्ज करितों. नाहींतरी इंग्रेजांचें पारपत्य दक्षिणेस करणें तें केलें, व ग्वालेर प्रांतीं राजश्री महादजी शिंदे पाठविलेच आहेत. श्रीकृपेनें या इंग्रेजांचें पारपत्य सत्वरच ते करतील, व हैदरनाईक व निजामअलीखान आपलाले सरहद्देस इंग्रेजांचें पारपत्यास गेलेच आहेत. आणि या दिवसांत इष्टीन इंग्रेज .... .... काशीचे चेतसिंग राजानें मारून, तमाम पटण्यापावेतों मुलूख खाली करून घेतला असतां, आणि आपण फौजेसहित घरोघर बसिलें राहावें, हें धणीपणास योग्य नाहीं. आह्मीं तों कदीम पातशाही बंदे आहोंत. या पातशाहीकरितां विलायतचे पातशाहांसीं झुंजून कैलासवासी विश्वासरावसाहेब व भाऊसाहेब व जनकोजी शिंदे व येशवंतराव पवार आदिकरून सरदारांनीं जहांबाजी केली व सर्व दौलत खर्चली. इतकेंही होऊन आतांही आमचा धणी लहान व कारभारी यांणीं तरतूद करून, आज सात वर्षें झुंजत मारीत फिरतात. हे कदर आपण मनांत आणावी कीं सरकार चाकरीवर जाफिशानी करितात, किंवा त्यांचें पोट भरत नाहीं ह्मणून मेहनत करीत फिरतात? ऐशा नानाप्रकारें उत्तेजनाच्या गोष्टी बोलून, दसरियाचे दिवशीं पातशाहांकडून व नजबखानांकडून प्रस्थान ठेविलें आहे. यांचे तोफखान्याची व फौजेची तयारीच आहे. दिपवाळीचे अलीकडे येथून कूच करून आंगरीयास चालतो. तेथें गेलियावर तुह्मांस पुढें राजश्री महादजी शिंदे यांजकडे रवाना करितों. तुह्मीं त्यांस आगरीयापलीकडे दाहा पंधरा कोसांवर

घेऊन या. व त्यांचा आमचा कौल इमान भेटी जालियावर, परस्परेंच सलाहानें जे मसलत उत्तम जाणूं तें करूं. याप्रमाणें बोलणें करारांत आणून प्रस्थान ठेविलें आहे. प्रत्ययास येईल तें मागाहून विनंति लिहूं. यांनीं आपणास पत्र व पातशाही शुका पाठविला आहे, त्यावरून ध्यानास येईल. यांचें लिहिणें व बोलणें स्वामींचे प्रत्ययास येईल तें खरें. जोंवर शत्रू निःशेष होय तोंवर यास ममतेंत लावून घेऊं. करारास अमलांत आणावयाचें सेवक अहर्निश हित उपदेश करीतच आहे. घडोन येईल तें विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ६४.

**श्री.** जून इ. स. १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, "खुशकींतील दौलती आपले कबजेंत आणाव्या, हें मनांत आणून त्यांनीं खुशकींत कदम टाकून दौलती पेंचांत आणिल्या. यांची चाल दुरुस्त नाहीं. पातशाहींत अमर्यादा करूं पाहतात. हें समजोन पारपत्याचा नक्षा ठरविला. त्यापासून तंबीवर फौजा राहून लढाया राहिलेल्याच आहेत; व सिकस्तही पावून दर्या व किनारा आश्रयास जातात. तथापि फौजा मुकाबिल्यावर आहेत. चहूंकडून तंग करून, खुशकींत पुनः पैरवी न करीत, ऐसें केलें असतां, पातशाहींत नक्ष! ऐसें समयांत पातशाहांनीं त्यांचें भय पोटांत धरून मसलत करावयास पर्याय आणून टाळाटाळ करितात. त्यास इंग्रेज जबरदस्त पडल्यावर तख्ताची मर्यादा ठेवितील कीं काय? सर्व सरदार एकदिल होऊन तंबीवर नमूद आहेत. ऐसा वख्त पारपत्यास यावयाचा नाहीं. ऐशा समयांत पातशाहा व नजबखान मसलत करावयाची उपेक्षा करितात. येणेंकरून इंग्रेजांची चाल मनांत दूरआंदेशानें येत नाहीं, ऐसा अर्थ दिसतो. येविसीं वारंवार काय ल्याहावें? ज्या गोष्टींत पातशाहाची अमर्यादा होय, ऐसा विचार त्यांनीं पाहून करणें तें करावें. शिंद्यांनीं सलूक केला ह्मणतात. त्यास, शिंदे सरकारचे पदरचे सरदार. हुकुमाखेरीज सलूख कैसा करतील? सिपरीवरील पलटणें घेऊन दहा महिने पातशाही सरंजामाची प्रतीक्षा करीत राहिले. * * * * * मोहिमीवर न निघाले, आणि इतला * * * * ठीक नाहीं. इंग्रेज मिनत करीत * * *

त्याजपासून पाडाव घेऊन यमुनापार जाऊं द्यावें. आपण पाठीमागून जावें. ह्राही इरादा धरून, पाडाव घेऊन लावून देऊन, पुढील मसलतीवर नमूद आहेत. पातशाहांनीं निघावें; त्यांनीं आपण मिळून मसलत करावी ही प्रतीक्षा करितात. ऐसें असतां त्यांनीं सलूख केला, ही आशंका धरून राहणें ठीक नाहीं. वरकड शिंद्यांचीं पत्रें तुह्मीं खातरजमेचीं आणिविलींच आहेत. आलीं असतील. याउपरी पातशाहा बाहेर निघून, शिंदे व ते एक होऊन, मसलत व इंग्रेजांची तंबी घडे तें करावें; यांत सर्व चांगलें आहे. तुह्मीं उघड्न तेथें बोलण्यांत आणून, पातशाहांसीं व शिंदे यांसीं गांठ घालून मसलतीचा उपयोग जाला ह्मणजे तुह्मीं येणें तरी यावें. पातशाहा व नजबखान यांचे पत्रांचीं उत्तरें पाठविलीं आहेत. त्यांच्या नकला तुमचे पत्रांत घालून पाठविल्या आहेत त्यावरून कळेल. अलीकडे हैदरनाईकाची व इंग्रेजांची लढाई मातबर जाली. हैदरखानांनीं एक टोळी इंग्रेजांची, आठ हजार माणूस, पलटणें व तोफासुद्धां होतीं, ते गारत केली. कर्णेल बास [बेली?] सरदार मुख्य टोळींत होता तो, व एकूणवीस सरदार पालखीनसीन व तीनशें गोरा इंग्रेज व तोफा पाडाव आणिले. बहुत खराबी इंग्रेजांची जाली. व सरकारचे फौजेची व इंग्रेजांची, कोहन मकान सरकारचें आहे तेथें लढाई जाली. सिकस्त होऊन एक सरदार इंग्रेजांचा पालखीनसीन पाडाव आणिला. बंदुखा वगैरे पाडाव आणिलें. इंग्रेज पाणीयाचे आश्रयास गेला. शहावर फौज आहे. बाहेर पडूं पावत नाहीं. पुढें होईल तें लिहून पाठवूं. इंग्रेजांवर सरकारचे फौजेची व हैदरनाईकाचे फौजेची जबरदस्ती पडली ह्मणजे पाण्यांतील जाग्यांत जाऊन राहतात. फिरून कांहीं दिवस बाहीर निघतात. मागतीं नामोहरम जाले ह्मणजे जात, असें जाणून सरकारांतून .... नानांनीं फरासीसांचे पातशाहास पत्रें पाठविलीं. * * * * * व वलंदेज मिळोन साठ जहाजें व माणूस लढणार पाठविलें. सरदारही मातबर आहेत, ते फुलचरीस येऊन दाखल जाले. पत्रें आलीयाउपर इंग्रेजांचें काय होतें तें ऐकाल. विशेष काय ल्याहावें. पगडीवाल्यांच्या जुरतीच गेल्या! लिहून काय व्हावयाचें बरें! पातशाहाची बंदगी जेथवर बजावून आणावयाची ते आणूं! चिंता नाहीं." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास या पत्राचा अन्वय अक्षरशः पातशाहांस समजाविला. व अफराशा * * * तूर्त नजबखानाचे जागा त्याचा चेला * * * * करितो त्यासही समजाविलें. खान * * उत्तर केलें कीं, श्रीमंतांहीं राजश्री पाटीलबावांस ताकीद लिहून पाठवावी कीं, पातशाहापासीं येऊन यांस सामील करून घेऊन पुढें मसलत करावी; आह्मी या गोष्टीस सिद्ध आहोंत. ह्मणून बोलून, आपण

नजबखानांस पत्रें लिहिलीं होतीं, त्यांचीं उत्तरें या अन्वयांनीं आपले नांवें लिहिलीं आहेत. त्यावरून ध्यानास येईल. नजबखानाचे घरांत बघेडा आपसांत जाला आहे. त्याची विनंति अलाहिदा पुरवणीपत्रीं लिहिली आहे. या प्रसंगीं राजश्री पाटीलबावांचें येणें बहुतच उपयोगी. नजबखान मृत्यु पावल्यापासून येण्याविषयीं पत्रें बहुत पाठविलीं. व पातशाहांनीं शुक्के बहुत पाठविले. या प्रसंगीं येथें येणें जाल्यास विपुल द्रव्य हातीं लागेल, व विना लढाई कार्य व्हावें, हा प्रसंग येथील आहे. फोडाफाड लोकांची करून त्यांचींही सूत्रें लिहिलीं, परंतु कोणे प्रकारें येणें होतां दिसत नाहीं. सांप्रत येथील कित्येक सरदारांचीं सूत्रें व पृथ्वीपतीचें अनुमत घेऊन, पत्रें अंतस्त घेऊन, आह्मी आज स्वार होऊन फरीदाबादेस आलों. दरमजल पाटीलबावांपासीं जाऊन सर्व सांगून येथें येणें जाल्यास अल्प आयासें महत्फळ होईलसा समय आहे. येथील सर्व सलतनत हातीं लागल्यास बंगाल्याकडील इरादा जो केला तो सिद्धीस जाईल. इकडील सर्व अनुकूल आहेत. त्यांचें येणें जाल्यास, पातशाहांचा जोड पडून अंतरवेदींत उतरणें होईल. यास्तव पातशाहांची आज्ञा घेऊन चाललों आहों. पाटीलबावांची भेट जालीयावर, होईल तें साकल्य विनंति लिहूं. श्रुत होय. विशेष काय लिहिणें, कृपा केली पाहिजे. हे विनंति.''

---

## लेखांक ६५.

**श्री.** ९ जुलईनंतरचें इ. स. १७८२.

''विज्ञापना ऐसीजेः––आमदानीचें व दिल्लीकडील सरदारांचें विरुद्ध पडलें; यामुळें पातशाहाजाद्यास घेऊन, मिर्जासफी व अफरासियाबखान वगैरे आग्र्यास आले. त्या उभयतांकडील मातबर राजश्री पाटीलबावांकडे आले आहेत. याउपर होईल तें मागाहून लिहून पाठवीन ह्मणोन वर्तमान पूर्वीं येथून विनविलें होतें. त्यावर, आमदानीचें त्यांचें परस्परें तिकडील तिकडेच रहस्य होऊन भेटी जाहाल्यावर अफरासियाबखान कोलजलेश्वराकडे माघारा गेला. आमदानी जयपुराकडे गेला. मिर्जासफी पातशाहाजाद्यासहित भरतपूर तालुक्यांत मासपक्ष होता. अनुपगीर गोसावी त्याजकडून पहिल्यानें पाटीलबावांकडे आला होता. त्यावर मिर्जासफी यांनीं पाटीलबावांकडे गोसाव्याचे हातून बोलणें लाविलें कीं, आमची आपली भेट होऊन स्वच्छता व्हावी. नजबखानाचा आपला भाऊपणा होता; त्याचा काल जाला. त्याचे पाठीमागें आह्मांस आपण वडील आहेत. आमचा

परामर्ष करावा. यांत परस्परें लौकिक आहे. याप्रमाणें बहुत घरोब्याचें बोलणें लावून भेटीचा निश्चय ठरविला. त्यावर पाटीलबावांनीं सांगून पाठविलें कीं, आमदानी जयपुराकडून माघारा आला आहे. त्याची भेट आह्मी घेणार नाहीं. तुह्मीं त्यास समागमें घेऊन येऊं नये. ही गोष्ट त्यांनींही मान्य करून आमदानीस बारा चवदा कोस मागें टाकून, मिर्जासफी पातशाहाजाद्यास व बेगमेस घेऊन दहा बारा हजार फौज, व नऊ दहा पलटणें, ऐशी नव्वद तोफा, याप्रमाणें सरंजामानसीं ढवळपुरचे सुमारें आला. इकडून पाटीलबावा चार पांच हजार फौजेनसीं सडे होऊन गेले. त्याजकडील सरंजाम भारी होता, व यांस संशय बहुतांनीं घातला कीं, तुरुक दिल्लीवाले आहेत, विश्वास धरूं नये. त्यावरून यांणीं त्यांजकडे सांगून पाठविलें कीं, हजार दोन हजार फौजेनसीं पुढें चमेलीनदीवर यावें. त्यावरून त्यांनीं आपली फौज चार कोस मागें टाकून, पातशाहाजादा व नजफखानाची बहीण बेगम यांस घेऊन, हजार दोन हजार फौज व तीन चार पलटणें, दहा पांच तोफा, एवढ्या सरंजामानसीं नदीवर आले. इकडून पाटीलबावा गेले. यांच्या त्यांच्या ज्येष्ठ व॥ चतुर्दसीचे दिवसीं भेटी होऊन, चमेलीचे पैलतीरीं ते राहिले. ऐलतीरीं पाटीलबावा राहिले. चार पांच रोज मुक्काम परस्परें होऊन, पातशाहाजाद्याची मुलाजमत वगैरे सर्वत्रांच्या भेटीचा समारंभ, आगतस्वागत, वस्त्रें, जवाहिर, घोडे, हत्ती, तोफाताफा, सवगात बावांनीं त्यांस दिल्हें. त्यांणीं बावांस दिल्हें. समुदाय बराबर होता. त्यांसही वस्त्रें भूषणें परस्परें दिल्हीं, घेतलीं. दोन तीन वेळ हे त्यांच्या डेऱ्यास गेले. मिर्जासफी, यांच्या डेऱ्यास आले. इंग्रेजांचा वकील एक त्याबराबरही होता. त्यांणीं यांस भेटविला. यांणीं इंद्रसेन मिर्जासफीस भेटविला. याप्रमाणें समारंभ पाटीलबावांचें तेज त्यांजवर गालीब राहून यथास्थित जाहला. गोसावी दरम्यान होता. त्याणें जशी यांची खातरजमा केली होती तसाच प्रसंग बावांचे मर्जीनुरूप चांगला उरकला. जसा नजबखानांचा यांचा भाऊपणा होता, त्याप्रमाणेंच मिर्जासफींनीं पगडीबदल भाऊपणा बावांसीं करून, 'सर्वप्रकारें आह्मी आपले आहों. दिल्लीकडील बंदोबस्त यथास्थित नाहीं, याकरितां आपण तिकडे चलावें. आमचा बंदोबस्त पातशाहीचा करून द्यावा,' याप्रमाणें बोलणें लाविलें. बावांनीं उत्तर केलें जे, 'उत्तम आहे. ग्वालेर गोहदची मसलत उरकली ह्मणजे बादबरसात तिकडे येऊन तुमचा बंदोबस्त यथास्थित करून देतों.' याअन्वयें उभयपक्षीं रहस्य चांगलें होऊन, ते तिकडे कूच करून गेले. पाटीलबावा मागतीं मुक्काममजकुरीं आले. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ६६.

**श्री.** ४ सप्टेंबर इ. स. १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. पत्रीं आज्ञा कीं, "पातशाहाजवळ कारभारी जो होईल, त्याजपासून सरकारचे दौलतीविषयीं इमानें इतबारें चालावें असा दस्ताऐवज लिहून घेऊन पाठऊन देणें कीं, सरकारचे लक्षाप्रमाणें चालूं. यांत अंतर करणार नाहीं." ऐसें शपथपूर्वक लिहून घेण्याविषयीं आज्ञा. त्यास, नजबखान मेल्यापासून दिल्लींत बखेडाच होत गेला, तों सांप्रत बहुतच हवा तेथील बिघडली आहे. एक कारभारी व हिंमतीचा माणूस नमुदास येत नाहींत. अबदुल अहदखान सुटले होते, ते पुनः कैदेंत आले. सांप्रत गर्दी जाली आहे. मासपक्षांत निवळून इतक्यांत जरब होऊन ज्याची चीज होईल त्यासी आज्ञेप्रमाणें माफलात करून, पकाई करून घेऊन सेवेसीं पावतील. सांप्रत गर्दी दिल्लींत जाली आहे. आपसचा कलह तुटून एक पक्कें जालयावर त्यांची पकाई होईल. पत्रें घेऊन सेवेसीं पावतील. विशेष काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ६७.

**श्री.** सप्टेंबर इ. स. १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना. पत्रीं आज्ञा कीं, "पातशाहाजवळ नवा कारभारी होईल त्याजपासून सरकारचे दौलतीविसीं इमानें इतबारें चालावें, ऐसा दस्तऐवज लिहून घेऊन पाठऊन द्यावा. सरकारचे लक्षाप्रमाणें चालायांत अंतर करणार नाहीं, ऐसें शपथपूर्वक लिहून घ्यावें ह्मणून आज्ञा. त्यास, आतां तूर्त परस्परें कलह आहे. दोहींतून एक ठरल्यावर आज्ञेप्रमाणें दस्तऐवजीं कौलनामा शपथपूर्वक घेऊन पाठवितों. इतकियांत विजयादशमी जालियावर कदाचित् राजश्री पाटिलबावा अथवा सरकारांतून हजूरची फौज किंवा होळकर आले, तरी येथील अधिकार सर्व सरकारचाच आहे. सूचनार्थ विज्ञप्ति लिहिली असे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ६८.

श्री. सप्टेंबर इ. स. १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, "मिर्जासफीकडील राजश्री पाटिलबावांकडे बोलणें लागलें आहे, व मागाहून राजे मनीराम यांसही पाटिलबावांकडे पाठविणार होते. ते गेले असतील, व दिल्लीहून आनंदराव नरसीसही पाठविणार. तेही गेले असतील. बोलणीं होऊन ठराव जाला असेल, तो सविस्तर लिहून पाठवावा." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास मिर्जासफीखानासीं व राजश्री पाटिलबावांसीं भेटी जाल्या. त्या गोष्टीस दोन मास जाले. स्वामींस आह्मीं विनंति इतक्याकरितांच लिहिली नाहीं कीं, त्या कारभारांत अनुपगीर गोसावी होता. आणि भेटी चमेल नदीचे कांठीं आटेरीसमीप जाल्या. तेथें आह्मांकडील कोणी नव्हते. ठराव जाला व दार मदार कसा जाला व कौलकरार कैसा ठरला, हें वृत्त कच्चें, राजश्री नारो शिवदेव पाटिलबावांपासीं आहेत त्यांनीं सविस्तर कच्चें वृत्त तेथील ऐकिलें पाहिलें असेल. तें त्यांनीं लिहिलें असेल. ह्मणून सेवकानें ल्याहावयाची सुस्ती केली. परंतु ऐकिल्यांत आलें कीं, परस्परें स्नेह शिष्टाचार, हत्ती, घोडे, वस्त्रें, जवाहीर देऊन, एकोपा होऊन पगडीबदली भाईचारा जाला; आणि कौलकरार जाला कीं, आमचा दुष्मन तो तुमचा दुष्मन. आमचा दोस्त तो तुमचा दोस्त. याप्रमाणें मोघम कौलकरार परस्परें जाला, व बोलण्यांत आलें कीं, ग्वालेरचे व गोहदचे मोहिमेपासून रिकामे जालियावर मग तुमचे आमचे विचारें सलतनतचा बंदोबस्त करावा. तोंपावेतों तुह्मीं पातशाहांची खर्चाची आबाळ होऊं न द्यावी. ह्मणून पाटिलबावांनीं निर्वणूक करून देऊन, ते ग्वालेरीकडे कूच करून गेले. मिर्जासफीखान कूच करून डिगेस आले. तेथें छावणी करून आहेत. पुढें अमलांत येईल तें विनंती लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे. हे विनंति."

---

## लेखांक ६९.

श्री. २५ सप्टेंबर इ. स. १७८२.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ १७ माहे सवाल मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनें-

करून यथास्थित असे. विशेषः- छ. २२ साबानचें आज्ञापत्र सादर जालें. तें छ ५ सवालीं पावलें. शिरसा वंदून सनाथ जालों. पत्रीं आज्ञा कीं, "नवाब अफराशाबखान व हमसिरा बेगम यांस तुह्मीं लिहिल्याअन्वयें पत्रें लेहून खलिते पाठविले आहेत." ह्मणून लिहिलें. त्यास आज्ञेप्रमाणें हमसिरा बेगम यांचे खलिते देऊन उत्तरें घेऊन पाठविलीं आहेत, व नवाब अफराशाबखान यांचा व मिर्जासफीखान यांचा घरकलह. याजकरितां पातशाहापासील कारभार सोडून, त्याचा सरंजामी मुलूख कोळजळेश्वर वगैरे महाल आहेत तेथें गेले. आतां मीरबक्षीगिरी व मुख्त्यारी तूर्त मिर्जासफीखान यांजकडे जाली आहे. यांचे खलिते घेऊन पाठविले आहेत. उत्तरें समाधानपूर्वक स्नेहवृद्धीचीं बेगमेचीं व नवाब मिर्जासफीखान यांचीं ल्याहावयास आज्ञा करावी. वरकड इकडील सविस्तर राजश्री बाळाजी जनार्दन यांचे पत्रीं लिहिलें आहे. ते विनंति करतील त्याजवरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विज्ञापना."

---

## लेखांक ७०.

श्री. सप्टेंबर इ. स. १७८२.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, येथून खलिते व शुके पातशाही पाठविले आहेत. ब तपसीलः—

३ श्रीमंत स्वामींचे नांवें.
- १ मिर्जासफीखान यांचें पत्र.
- १ हमसिराबेगम यांचें पत्र.
- १ शुका पातशाहांचा.
- ३

४ आपले नांवें.
- १ मिर्जासफीखान यांचें पत्र.
- १ हमसिराबेगम यांचें पत्र.
- १ पातशाहांचा शुका.
- १ आपण पातशाहांस अर्जी पाठविली होती, तिचा जाब बहुत ममतापुरस्कर लिहिला आहे. व अंतस्त सांगितलें कीं, 'या समयीं फौज येईल तर उत्तम आहे, व पाटलांसही ताकीद तुमचे हजुरीहून होय कीं, सत्वर हजुरांत येऊन हजर होय

तें करणें.' ह्मणून आह्मांसही विनंति ल्याहावयास सांगितलें व शुक्र्यांतही लिहिलें असे.

४

७

सदरहू सात पत्रें पाठविलीं आहेत. उत्तरीं लोभ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे. हे विनंति."

## लेखांक ७१.

श्री. ता. २५ सप्टंबर सन १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--

विज्ञापना कीं, पेशजीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत. त्यांवरून सविस्तर श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा नजबखानाकडील सरदार फौज दिल्लींत आहेत. शीख हरिद्वारापासून तो दिल्लीपावेतों अंतरवेदींत लुटीत फिरतात. नजबखानाचे सरदार व भाचे व चेले यांची अपसांत परस्परें चित्तशुद्धता नाहीं. त्यास, नजबकुलीखान चेला व अफराशाबखान चेला हे दोघे घरचे एक विचारें. व नजबखानाची बहीण व भाचे जेनुलअबदीखान व मिर्जासफीखान व मिर्जाजाफर ऐसे एकविचारें. ऐशा दोन फळ्या जाल्या आहेत. त्यास नजबकुली व अफराशाबखान यांनीं छ० २ रमजानीं नवाब अबदुल अहदखान यांस कैदेंतून सोडून, पातशाहाकडून हत्ती, घोडा, जवाहीर, जेगा, सिरपेंच व मलहूजखास वस्त्रें देऊन, सर्फराज करून, खालशाची मुख्त्यारी नायब वजीर बदस्तुर केलें. यांनीं एक मास कारभार करून, कांहींसा बंदोबस्त डौलावर आणून, मिर्जासफीखान यांस स्वाल केला कीं, खालशाचे महाल तुह्मांकडे आहेत ते व तोफखाना सरकारांत द्यावा. त्याजवरून करार मदार ठरतां ठरला कीं, मरेट वगैरे आठ महाल व पानिपत वगैरे चार महाल एकूण बारा माहाल सोडावे, व तोफखान्यापैकीं एकूणवीस तोफा द्याव्या, व नख्त तीन लक्ष रुपये. त्यापैकीं तूर्त पाऊणलक्ष, व खरिफावर पाऊण लक्ष, व रबीवर दीड लक्ष, येणेंप्रमाणें झाडा करून द्यावा. आणि छ २५ रमजानीं मिर्जासफीखान यांस मीरबक्षीगिरीचीं वस्त्रें द्यावीं. हा विचार ठरला. इतकियांत अफराशाबखान ह्मणूं लागेल कीं, 'म्यां आजपावेतों पातशाहांचे आज्ञेप्रमाणें वर्तणूक केली. किल्ल्यांत व नजबखानाचे हातचा बंदोबस्त पलटणें होतीं, तीं उठविलीं. किल्ला पातशाहांचे काबूंत करून दिल्हा. व नायब वजीर, अबदुलअहदखान यांस सोडून दिल्हें, व तीन लक्ष रुपये खर्चास दिल्हे.




सफदरजंगाची कबर.—दिल्ली.

इतकी खिजमत केली असतां, नायब वजीर अबदुल अहदखान व मीरबक्षी मिर्जा सफीखान! तेव्हां मी कांहींच न राहिलों? याप्रमाणें जाबसाल करून दिल्लीचे बंदोबस्तास नजबकुलीखानास ठेऊन, आपण, बमय तोफखाना जो त्याजपासीं होता तो व फौजसुद्धां, लताफतअलीखान खोजा-पातशाहांचे तैनातीस वजिराकडून पेशजीं होता, हल्लीं तिकडील चाकरी सुटून अफराशाबखान यांजकडेस चौ पलटणांनसीं चाकर राहिले आहेत त्यासुद्धां-कूच करून कोलजलेश्वरास जाऊं लागले. तेव्हां पातशाहांनीं उत्तर केलें कीं, "आज सा महिने जाले, नजबखान मृत्यु पावले त्या दिवसापासून तुह्मांस मुख्त्यारीचे सात खिलत दिल्हे, व तोफखाना दिल्हा. व पातशाहाजादा समागमें करून दिल्हा. इतकेंही असतां तुमच्यानें बंदोबस्त न जाला. आतां रुसून जातां. हें तुह्मांस काय उचित आहे?" अशीं परस्परें भाषणें होऊन, निदान अफराशाबखान कूच करून कोलेस गेले. मागें छ २ सवालीं, मिर्जासफीखान यांनीं तमाम फौज व तोफखाना तयार करून, किल्यापासून निगमबोधपावेतों व त्रिपुल्यापासून कशमिरी दरवाजापावेतों कूचेबंदी मोर्चे लाऊन अबदुल अहदखान व नजबकुलीखान यासीं झुंज जालें. परस्परें हजार बाराशें माणूस जखमी जालें, व मारलें गेलें. जलालखान, तोफखान्याचा दारोगा, नजबकुलीखानाकडील मातबर माणूस मारला गेला. निदान अबदुल अहदखानास व नजबकुलीखानास व शिवराम दिवाण नजबखानाचा व त्याचा पेशकार नारायणदास येणेंप्रमाणें जीवंत मिर्जासफीखान यांनीं धरून आणून कैद केले आहेत. या गर्दींत नजबकुलीची व अबदुल अहदखानाची दौलत, तोफखाना, हत्ती, घोडे, जामदारखाना, बमय बेगमा व अर्धी दिल्ली लुटली गेली. लाखों रुपयांचे सराफांचीं व वाण्यांचीं नुकसानें शहरचीं जालीं, व या दोघांची तों दौलत सर्व बुडाली! व तमाम यांजकडे मुलूख होता, त्याचे जप्तीस फौजा रवाना केल्या आहेत; व अफराशाबखान यांजवरही फौज सुद्धां जाणार. छ० ४ मिनहूस झेंडे व डेरे यमुनापार गेले आहेत. पुढें काय होईल तें मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ७२.

**श्रीवरद.** १० आक्टोबर इ. स. १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीं:-

विनंति कीं, छ २ जिलकादीं लखनऊहून बातनी पातशाहांचे येथें आली कीं, मवाटीन साहेब इंग्रेजांकडील मुख्तार लखनऊस होता, तो छ २७ सव्वालीं

वजिराचे येथें येऊन, असफउदौलासीं स्वाल केला कीं, 'आह्मांस एक करोड रुपये सरंजाम करून द्या.' यांनीं उत्तर केलें कीं, 'आह्मांपासीं पैका कोठें?' तेव्हां मवाटीन बोलिला कीं, 'तुह्मीं आपले आजीपासून व मातुश्रीपासून पैका घेऊन देणें.' यांनीं उत्तर केलें कीं, 'त्यांजपासीं पैका नाहीं.' हें बोलोन उठोन महालांत चालिला. इतक्यांत मवाटीनानें वजिराचा हात धरून बसवीत होता, तों वजिरानें हात हिसकून महालांत गेला, आणि बोलिला कीं, 'कोणी आहे?' इतक्यांत राजे भवानीसिंग अरजलीवाला समीप होता, तो ह्मणाला कीं मी हजर आहें. त्यास आज्ञा केली कीं, 'काय पहातोस?' त्याजवरून भवानीसिंगासीं व मवाटीनासीं तरवार चालून उभयतांही मारले गेले. हे बातनी आली. दुहराहून तथ्य येईल तें मागाहून लिहूं. * * * * इष्टीन व मवाटीन हे दोघेही सरदार मातबरच मारले गेले. इंग्रेजांचा पडदा मात्र आहे. पुढें लखनऊस वजिराचे येथें काय नक्षा ठरतो, तें वर्तमान पक्कें आलीयावर विनंति लिहूं. चेतसिंग राजा फौजबंदी करीतच आहे. * * * * * * * * * * * काशी प्रांतीं दरोबस्त बंदोबस्त आहे. याप्रमाणें वृत्त पातशाहांचें येथें आलें. मागाहून तथ्य वृत्त आलीयावर विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे. दर्शनलाभ होय तो सुदिन हे विनंति."

---

## लेखांक ७३.

श्री. आक्टोबर अखेर इ. स. १७८२.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजे,—पत्रीं आज्ञा कीं, "पारसी पत्रें पातशाहास एक, व नवाब अफराशाबखान यांचे नांवचीं दोन, व हमसिरा बेगम यांचे नांवें दोन, व अबदुल अहदखान यांचे नांवें दोन, एकूण सात पत्रें पारसीचीं पाठविलीं आहेत. त्यांतील मजकुराच्या हिंदवी नकला तुम्हांकडे पाठविल्या आहेत. त्याजवरून साकल्य पारसी पत्रांतील समजेल. कलकत्त्याहून इंग्रेजांचे वकील दिलीस येणार, म्हणोन वर्तमान कळलें. त्यास, ते हरतऱ्हेनें पातशाहास ममतेंत घ्यावयाचें करतील. * * * * * याकरितां या गोष्टीचा पुरता विचार पातशाहासीं व अधिकारी असतील त्यांसीं बोलून, त्यांचा प्रवेश न होय तें करावें. राजकारण नाजुक आहे. फार जपावें." ह्मणून आज्ञा. त्यास इंग्रजांकडील वकील नवा कोणी अद्याप आला नाहीं. * * * * * * * * * परंतु सांप्रत बखेडा दिलीस जाला, यांत पातशाहा लाचार आहेत. आपले यख्तियारांत

गर्दी मोडून आल्यावर सरकारचें लक्ष तेंच पातशाहाचें आहे. सेवकाडून जी वुती राखावयाची तितकी राखीतच आहे. या प्रसंगीं कांहीं फौज सरकारची दिल्लीकडे मातबर सरदार आल्यास, पातशाहासुद्धां काबूंत येतील. बखेडा मोडेलसा समय आहे. पारसी पत्रांचीं उत्तरें दिल्लीहून सेवेसीं पावतील. छ १७ जिल्हेजीं पत्रें दिल्लीहून रवाना चिरंजीव गोविंदराव पुरुषोत्तम यांचे नांवें लिहून रवानगी केलीं, व पारसी पत्रांचीं उत्तरें पाठविलीं, तीं सेवेसीं पाऊन साकल्य कळलें असेल. सांप्रत छ १० जिलकादचें दिल्लीचे वर्तमानाचीं पत्रें चिरंजिवाचे नांवें आलीं, तीं सेवेसीं रवाना केलीं आहेत. त्यांजवरून सर्व निवेदन होईल. या प्रसंगीं सरकारच्या फौजा पोहोंचून पातशाहासुद्धां काबूंत राहून बहुत उपयोग पडतील. सांप्रत कलकत्त्याहून जान बरूस साहेब, एक पलटण गोरें व सात पलटणें आणीख घेऊन काशीनजीक आले, व खासा इष्टीनही चालणार, ह्मणून लखनऊचें वर्तमान आलें आहे. सत्य मिथ्या पक्की बातनी आल्यावर विनंति लिहूं. सांप्रत कानपुरास ब्रह्मावर्तापासीं चार हजार माणूस मात्र आहे. अंतर्वेद सर्व खाली आहे. करोडो रुपयांचा मुलूख खातात. जमाव त्यांचा आल्यास दिल्लीचा कस्त करतील. वर्तमान दुहराऊन येईल तें सेवेसीं विनंति लिहूं. विशेष काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ७४.

**श्री.** नोव्हेंबर इ. स. १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, छ २१ जिलकादीं जवांबख्त पातशाहाजाद्यास अकबराबादेची सुभेदारी देऊन, खिलत सरबस्ता पागोटें व ढाल तलवार, व लताफतअल्लीखान खोज्यास सरबस्ता पागोटें व तलवार, व पोल फरासीस यास सरबस्ता पागोटें, व समरू फिरंगी याचा पुत्र जफरयाबखान यास सरबस्ता पागोटें व निमअस्तीन व जेगा सिरपेंच व हत्ती घोडा व तलवार, येणेंप्रमाणें बहुमान करून बिदा केले आहेत. ते येथून कूच करून, हामाऊंचे मुकरब्यापासीं आरबाचे सराईसमीप मुक्काम करून आहेत, व नजबकुलीखान यास पेशजीं मिर्जासफीखान यांनीं कैद केलें होतें. त्यास जातेसमई यास घेऊन जावयास मिर्जासफीस फुरसद न जाली, यास हवेलींतच टाकून गेले होते. त्यास पातशाहांनीं नजबकुलीखानापासून लाख रुपये नजर करार करून, सरबस्ता पागोटें व निमअस्तीन व ढाल तलवार येणेंप्रमाणें सन्मान करून, छ २३ रोजीं गुरुवारीं मशारनिल्हेस सोडून,

बदस्तुर दुय्यम बक्षीगिरी करार केली. पुढें दिनचर्येचें वृत्त होईल तें विनंति लिहूं. शेवेचा मुरबा वजन ८८२ दोन शेर पाठविला आहे. मर्जीस बरासा वाटल्यास आणीख पाठऊन देऊं. वडिलामागें या संस्थानीं अन्न राहून पाळग्रहण करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ७५.

**श्री.** ३ नोव्हेंबर इ. स. १७८२.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ २६ माहे जिल्काद मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः—पेशजीं छ १७ सवालीं विनंतिपत्रें पाठविलीं होतीं, तें पाऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरः— पातशाहा दिल्लींत आहेत. शीख सबजीमंडईपावेतों व पटपरगंजपावेतों दिल्लीचे आसपास लुटीत फिरतात. हरिद्वारापासून खुर्जापावेतों अंतर्वेद तमाम लुटून ताराज केली. गढीबंद गांव आहेत, ते मात्र वस्ते आहेत. बाकी रयत उठोन गंगापार गेली. दिल्लींत दाहा शेर अन्न आहे. व मिर्जासफीखान यास मीरबक्षीगिरी देऊन पातशाहांनीं मुख्त्यार केलें होतें, त्यास परस्परें चित्त मलीन होऊन कलह उत्पन्न जाला. त्यास पातशाहांनीं, महमद याकूब ह्मणून खवास आहे, याचे विद्यमानें लताफत खोजा चार पलटणें, व पोल फरासीस समरूचा गुमास्ता यांचीं चार पलटणें, व गंगाराम व सैदअली वगैरे किरकोळी चार पांच पलटणें, येणेंप्रमाणें बारा तेरा पलटणांचे सरदार फोडून, आपले मायेंत मेळऊन, मिर्जासफीखान यांचे हवेलीचे आसपास मोर्चे लाऊन धरून घ्यावेसें केलें. त्यास मिर्जासफीस कांहींसी फरासद पावली. इतकियांत नवाब अबदुल अहदखान व शिवराम दिवाण व राजे मनीराम व मेहेदी कुलीखान या चौघांस हातीं पालखींत घालून, हवेलीहून निघोन दरमजल अकबराबादेकडे गेले. डिगेअलीकडे कोसी ह्मणून गांव आहे, तेथें मुक्काम करून आहेत. दहा हजार स्वार प्यादा जमा जाला आहे. महमद बेग हमदानी, मिर्जासफीकडील, लक्षुमणगडाचे रोखें राजे प्रतापसिंग जैपुरकर यांजवर गेले होते. त्यांजकडून खुशालीराम व दौलतराम हे दोघे कारभारी येऊन, सा लक्ष रुपये खंडणी नजबखानास सालाबाद देत होते, त्यांपैकीं चार लक्ष रुपये कराररमदार करून, हमदानीचा कूच माघारा करविला, व अफराशाबखानाचा परस्परें घर-

कलह होता, त्यास दिवाण शिवराम यांचे विद्यमानें सलूक जाला. अफराशाबखान यांनीं मिर्जासफीखानास वीस उंट फराशखाना, डेरे राहुट्या व पोशाकी वस्त्रें, व वीस हजार रुपये नख्त, येणेंप्रमाणें सरंजाम कोसीस पाठविला. त्यास महमदबेग हमदानी व अफराशाबखान हे दोघे मिर्जासफीस सामील होऊन त्रिवर्ग फौजसुद्धां दिल्लीस येणार. त्यास त्या मंडळांत नवाब अबदुल अहदखान पातशाहाचे मायेचे आहेत ह्मणून पातशाहा फिरून काबू पाहून तिकडे मिळतील, किंवा या करकषांत काय ईश्वरें नेमिलें असेल तें घडेल. या प्रकारचें येथील वृत्त आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ७६.

**श्री.** २६ नोव्हेंबर इ. स. १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजे, छ २० जिल्हेजीं महमदबेग हमदानी व अफराशाबखान व नवाब अबदुल अहदखान हे त्रिवर्ग, हमसिरा बेगम यांचे हवेलीस जाऊन, मुलाजमत केली. माफक मरातब नजरा देऊन विनंति केली कीं, 'आह्मांस नवाब नजबखान मरहूम यांचे जागां आपण आहेत. त्यास ज्याप्रमाणें त्यांचे आज्ञेंत चालत होतों, त्याप्रमाणें आपले आज्ञेनरूप मिर्जासफीखान यांचे आज्ञेंत चालत जाऊं.' ह्मणून बोलण्यांत आणून, तेथेंच सर्वांनीं भोजन एकत्र करून, बेगमेनें खिलत, महमदबेग हमदानीस सरबस्ता पागोटें बमय गोषवारा, जेगा सिरपेंच मोत्यांची माळ, हालखालक हत्ती घोडा येणेंप्रमाणें; व अफराशाबखान यास सरबस्ता पागोटें बमय गोषवारा व जेगा सिरपेंच माळ मोत्यांची व हालखालक व हत्ती घोडा; व नवाब अबदुल अहदखान यास सात किस्तीं वस्त्रें व हत्ती घोडा, येणेंप्रमाणें सर्वांचा सन्मान करून, केलेल्या कारभाराची पकाई होऊन, बेगमेपासून रुकसत होऊन, आपलाले डेरियास गेले. अद्यापि सर्वांचे मुक्काम दिल्लीचे बाहीर रेतीवर आहेत. पुढें कोणे वेळेस काय प्रकार घडेल, व काय विचार होऊन कोणती गोष्ट अमलांत येईल, तें मागाहून विनंति लिहूं. येथील कारभार क्षणभंगुर बारभाईचा जाला आहे. एकांत एक मिळत नाहींत. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

# लेखांक ७७.

श्री. १ डिसेंबर इ. स. १७८२.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ २५ माहे जिल्हेज मुक्काम दिल्ली जाणून स्वानंदलेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं छ० २७ जिल्कादीं विनंतिपत्रें पाठविलीं, ते पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर मिर्जासफीखान कोसीस होते. यांनीं महंमदबेग हमदानी व अफराशाबखान यांसीं एकवाक्यता परस्परें शपथपूर्वक करून, तेथून कूच करून त्रिवर्ग फरिदाबादेस आले. त्रिवर्ग मिळून समागमें स्वार प्यादे फौज चाळीस हजार व तोफा सुमार ७२ बाहात्तर, येणें-प्रमाणें सरंजामानिसीं आले. हें वर्तमान पातशाहांनीं ऐकून, छ० ७ जिल्हेजीं सा घटका दिवस चढतां, धन लग्नावर दिल्लीहून कूच करून, किसनदासाचे तळ्यावर डेरेदाखल जाले. पहिले जुवाबख्त पातशाहाजादा बारापुल्यावर जाऊन उतरले होते, त्यांसही समागमें घेऊन गेले. यांजसांगातें सरंजाम, पोल फरासीस व लताफत अल्लीखान हे दोघे आठा पलटणांनिसीं, व किरकोळी दोन पलटणें, एकूण दाहा-हजार माणूस व बादलबेग वगैरे मोंगलिये पांच सातशें स्वार, येणेंप्रमाणें सरंजाम पातशाहासमागमें. त्यास नवाब अबदुल अहदखान यांचें मानस पातशाहासीं बेअदबी न करितां, यांची ममनुनी करून, आपली तकसीर माफ करून घेऊन, पुन्हां पातशाहास दिल्लींत दाखल करावें; व महमद याकूब व लालू खवास व पोल व लताफत या त्रिवर्गांचे मतें कीं, मिर्जासफीखानास खराब करून, खारीज करून काढून द्यावें; ऐसें या तिघांचें मानस. त्यास मिर्जा-सफीनें व महमदबेग हमदानी यांनीं पातशाहाकडे जाबसाल लाविला कीं, आह्मांस हजुरांत विनंति करणें आहे, त्यास महमद याकुफखान व पोलसाहेब व लताफत अल्लीखान या तिघांस पाठऊन द्यावें; ह्मणजे यासीं पक्केपणें बोलणें तें बोलून, हे हजुरांत विनंति करितील त्याप्रमाणें बंदगींत हजर होऊं. ह्मणून निरोप जुवाबख्त पातशाहाजाद्याकडे बहादुरअल्लीखान खोजा खानसामा यांजसमा-गमें पाठविला. त्यावरून छ० ११ रोज सोमवारीं मिनहूस पातशाहांनीं महमद याकुफखान व पोल व लताफत या तिघांस गोष्टी पक्या करावयासाठीं पाठविलें. त्या सांगातें दोन पलटणें व बारा तोफा होत्या. हे बादरपूरचा नाला उतरून पलीकडे जाऊन उभे राहिले. फरिदाबादेहून मिर्जासफीखान व महमदबेग हमदानी व रावराजा प्रतापसिंग व खुशालीराम–जयपुरकर राजाकडून चार पांचशें स्वारांनसीं

कुमकीस आले होते—त्यासुद्धां चाळीस हजार स्वार प्यादा व बाहात्तर तोफांनसीं तयार होऊन आले. यांच्या त्यांच्या हत्तीवर भेटी होऊन कांहींसे शिष्टाचार बोलतात तों तमाम फौज गीर्द यांचे होऊन, या तिघांस घेऊन, फरिदाबादेकडे चालिले. इतक्यांत यांजकडील पलटणासीं व मिर्जासफीचे फौजेसीं झटपट होऊन, परस्परें पांच सात माणूस मारामार करून, लताफतास व पोलास व महमद याकुफखान यास कैद करून घेऊन गेले. ते अद्यापि कैदेंतच आहेत. राजे दयाराम ह्मणून कश्मिरी ब्राह्मण पातशाहाचे पदरचेच आहेत. यांस मध्यस्त घालून, आह्मी गुलाम खाना-जाद, बंदे पातशाही आहोंत, ह्मणून पातशाहास मनुन करून, छ. १९ रोज सोम-वारीं मिनहूस या सर्वांची मुलाजमत दोनप्रहरां जाली. मिर्जासफीखान यास सरबस्ता पागोटें व निमअस्तीन बमय गोषवारा व जेगा बमय परगिरी व शिरपेंच व ढाल तरवार व हत्ती घोडा व माळ मोत्यांची येणेंप्रमाणें; व महमदबेग हमदानीस सरबस्ता पागोटें बमय गोषवारा व नुकेसी तुरा व जेगा शिरपेंच निमअस्तीन तरवार येणेंप्रमाणें; व अफराशाबखान यास सरबस्ता पागोटें बमय गोषवारा नुकेसी तुरा व निमअस्तीन व जेगा सिरपेंच व तरवार येणेंप्रमाणें; व रावराजा प्रतापसिंग याचे वाला यास साता परचाचा खिलत व जेगा शिरपेंच व तरवार येणेंप्रमाणें; व खुशालीराम जैपुराकडील यास पांच पारच्याचा खिलत व सिरपेंच येणेंप्रमाणें; व नवाब अबदुल अहदखास यास सरबस्ता पागोटें बमय गोषवारा व नुकेसी तुरा व निमअस्तीन व तरवार येणेंप्रमाणें; सर्वांचा सन्मान करून पातशाहांनीं कूच केला. त्या समयीं भोयांचे जागां आह्मींच भोई व गुलाम सरकारचे आहोंत, ह्मणून सर्वांनीं पातशाहाचें तख्त उचलून आपले खांद्यावर घेऊन वाडाबाहीर आणून हत्तीवर बसविलें. हें सर्व फौजसुद्धां स्वारीसमागमें होऊन, किल्ल्यांत दोन घटका दिवस राहतां छ० १९ मीनहूस दाखल केलें. मीरबक्षीगिरी मिर्जा-सफीखान यांजकडे, यांनीं फौजसुद्धां सरहद्देकडे जाऊन शिखांचा बंदोबस्त करावा. व आगरियाकडे महमदबेग हमदानी यांनीं जाऊन, जैपूरकर राजाकडील खंडणीचा पैका उगवून घ्यावा; तिकडील बंदोबस्त राखावा. व अफराशाबखान यांनीं बदस्तुर कोलेकडेस जावें. व नवाब अबदुल अहदखान यांहीं खालशाची दिवाणगिरी करून, खालशाचे महाल आहेत यांचा बंदोबस्त करून हजुरांत असावें. व महमद बेग हमदानी यांनीं फौजसुद्धां राजश्री पाटीलबावांस सामील होऊन पूर्वेकडे जावें. मैदान खाली आहे. इंग्रेजांकडील फौज हैदरनाईकाकडे सर्व गुंतली आहे. ऐसा समय सांपडणार नाहीं. ह्मणून बोलण्यांत नवाब अब-दुल अहदखान यांचे विद्यमानें आणिलें आहे. परंतु अमलांत येईल तें खरें.

व किल्ल्यांत बंदोबस्त पातशाहाचाच राहिला. दुसरियाचा दखल नाहीं. याप्रमाणें सांप्रत येथील वृत्त आहे. पुढें कोणते वेळेस काय विचार ठरून काय घडेल, तें मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे. हे विनंति."

---

## लेखांक ७८.

**श्री.** इ. स. १७८२.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे– आह्मीं श्रीमथुरेचे मुक्कामीं राजश्री पाटिलबावांची भेट घेतली. त्यास सहा महिने जाले. आतां आज्ञा जाली आहे कीं, राजश्री मुरारराव दौलत पातशाहापासीं यांजकडून खानसामा आहेत, त्याजसमागमें दिल्लीस जाऊन सरंजाम नजराण्याचा पातशाहास गुजरणें. त्यास रावमजकूर लाडोजी देशमुखाचे रोजमुऱ्या वगैरे बंदोबस्ताकरितां लष्करांत आठा चौ रोजांचा गुंता आहे. मशारनिल्हे दिल्लीस चालतील तेव्हां त्याजसमागमें जाऊन, सरकारचा तोफातापा गुजराणोन, माघारा लष्करांत आलियावर काय आज्ञा करतील तें करूं. सहा महिने यांजपासीं राहिलों. दोन चार वेळां रोजमुऱ्याविसीं व पागेचे नेमणुकेविषयीं विनंति केली कीं, बंदोबस्त करून द्यावा. त्यास कांहींही उत्तर होत नाहीं. सरकारांतून हत्ती घोड्याचे खर्चास हजार रुपये दिल्हे होते, ते खर्च होऊन आणीक पांच सातशें रुपये जास्ती खर्च जाला. तेव्हां आतां आज्ञा जाली कीं, दिल्लीस जाणें. याप्रमाणें वृत्त आहे. त्यास राणेखानभाईस आपलें एक पत्र कीं, यांचा बंदोबस्त करून देवावा. वरकड वर्तमान पारसी आकबारावरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ७९.

**श्री.** जानेवारी इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं "इंग्रेजाचे तंबीवर मुंबई व सुरत व गुजराथ प्रांतीं आदिकरून मुकाबलियावर सरकारचे फौजांचा शह आहे. हैदरखान यांची लढाई नेहमीं चाललीच आहे. शिंदे तिकडे मसलतीवर आहेत. याखेरीज बंगाल्यांत सरकारच्या फौजा जाणार. याजवरून मुंबईहून इंग्रेजांचीं पत्रें आलीं कीं, सरकारांत सलूख इच्छितो; मातबर माणूस पाठवितो. त्यांचे बोलण्यांत

सर्व दर्जे ध्यानांत येतील म्हणून आलीं. त्यांचीं उत्तरें समर्पक गेलीं असतां, उदीष्ट नामें इंग्रेज मातबर माणूस मुंबईहून रवाना केला. तो छ० २९ मोहर्मीं पुण्यास आला. सरासरी भेटी मात्र जाल्या. सलुखाचें बोलणें ऐकतच आहों, व लढाईवर फौजेची जारी आहेच. बंगाल्यांत मसलतीस राजेश्री भवानी शिवराम यांची मातबर फौजेनसीं तयारी करविली, अगर सलुखही होणें जाल्यास जबरदस्तीचे पोटीं सलुख होईल, तो चांगला. ऐशा संधींत पातशाहानीं जलदी करून, अंतरवेदींत उतरून, बंगाल्यापावेतों तान द्यावा, हें काम मोठेंच आहे. नेक सलाह असेल, ते त्यांनीं करावी. सविस्तर तुह्मांस कळावें म्हणोन लिहिलें असे. फरासिसांचे वकील येऊन सरकारांत भेटले. त्यांजकडील जाहाजें वगैरे लढाईचा सरंजाम मारेस बंदराहून हैदरखान यांजकडे रवाना जाला. तोही महिन्या पंधरा दिवसांत दाखल होईल. फरासिसांचे सरंजाम येऊन दाखल जाल्याचीं पत्रें आलीं. इंग्रेजांचा वकील आला होता. तो बहुत मिनतीनें, सर्व मकानें व मुलुख सरकारचा माघारा देतों, पुढें बदमामली होणार नाहीं, ऐसें बोलत होता. परंतु साफच उत्तर दिल्हें कीं, सलुख करणें मंजूर नाहीं. याप्रमाणें बोलून रुकसत दिल्ही." म्हणून पत्रीं आज्ञा. त्यास सदर्हू पत्राचा फारसी तरजुमा करून पातशाहास दाखविला, आणि विनंति केली कीं, "कदीम फिदवी आहेत. त्यांच्यानें आजपावेतों सरकारची बंदगी व तरतूद जाली ते केली, आणि पुढेंही करणें तें करीतच आहेत. या दिवसांत आपण स्वारीस निघावें, हें नेक सलाह आहे. ऐसा समय फिरून येणार नाहीं." म्हणून बोलिलों. पातशाहांनीं उत्तर केलें कीं, "नजबखान मेला नसता, तरी आजपावेतों गंगापार स्वारी पावली असती. आतांही चालावयाचा विचार आहेच. परंतु येथील प्रकार तुह्मी पाहातच आहां कीं, नजबखानामागें त्याचे घरचे सरदारांचा वगैरे माणसांचा एकोपा एकमेकांत मिळत नाहींत. याजकरितां बादबरसात घरचा बंदोबस्त करून स्वारी बाहीर निघतों. यांत संदेह नाहीं." ह्मणून बोलून, आपले मनसब्याची रीत व नजबखानास पत्र लिहिलें होतें तें अक्षरशाहा वाचून, बहुतच समाधान पाऊन, उत्तर केलें कीं, "थोरल्या दौलतींत अशीं माणसें असणें हें मोठें पुण्याईचें फळ आहे." ह्मणून स्तुत बहुतच केली. पुढें बोलल्याप्रमाणें अमलांत येईल. व नजबखानाकडील सरदार आहेत यांची परस्परें चित्तशुद्धता होऊन, फौज व तोफखाना पातशाहाचे उपयोगीं पडेल किंवा न पडे, हें कांहीं सुचिन्ह दिसत नाहीं. माणुसमात्राचीं चित्तें वेगळीं वेगळीं जालीं आहेत. या दिवसांत कोणी मातबर फौज आली, तर

पातशाहा व नजबखानाची फौज व तोफखाना सर्व त्यांचे काबूंत येईलसा समय आहे. हें वर्तमान राजश्री पाटिलबावांसही लिहिलें आहे. त्यांचें उत्तर आलें. "येतों येतों" ह्मणतात. या प्रसंगीं दिल्लीस फौजा देसींहून रवाना जाल्यास सर्व काबू सरकारचा होऊन, द्रव्य, मुलुख, नजबखानाचा सरंजाम, सर्व अल्पआयासें हातीं लागेलसा समय आहे. पुढें होईल तें विनंति लिहूं. नजबखानाचा मृत्यु जाला त्या दिवसापासून, येथील वर्तमान दिनचर्येचें राजश्री पाटिलबावांस लिहिलें व लिहितों; व पातशाहांचे शुके पाठविले; व सूत्रें येथील लोकांचीं सर्वांचीं फौजेचीं आहेत, तें सर्व लिहिलीं. त्यांचीं पत्रें, दस्तावेज देखील घेतले. राजे-रजवाडे जमीदार सर्व अनुकूल व यांची फौज सर्व फुटलेली ! दौलत सर्व हातीं लागून पातशाहा स्वाधीन होतो व राजी सर्वप्रकारें होतात. ऐसा समय पुन्हां येणार नाहीं. हे सर्व दर्जे लिहिले. परंतु उत्तरें येतात त्यांत, "फौजेचा गवगवा भारी आहे. यांची समजाविशीस लागलों आहों. पैसा नाहीं. त्याही तजविजीस लागलों आहों; जालियावर येऊं. तुह्मीं सर्व सूत्रें लाऊन ठेवणें." हे येतात. आह्मी येथें बोलतों. जलदच येतात. त्यास पातशाहास आखबारेंत तेथील वर्तमान, फौजेची अवस्था, गोहदवाले, दतीयावाले जमीदार यांचें देखील पारिपत्य होत नाहीं. व जमीदार शेर होऊन पंचमाहालांतून पुढें चाल करूं देत नाहींत. नालबंदीची फौज नाहीं. त्यांत इंग्रेजाचे नादीं लागून, इंद्रसेन नामें इष्टिनाकडील आला, त्याचे विद्यमानें कलकत्त्यास जाबसाल लाविला आहे; व आनंदराव नरसिंह मिर्जाआमानीकडे पाठऊन, त्यांस येथें पातशाहापासीं बोलावयास पाठविलें, तेही बोलतात. व अनुपगीर गोसावी यांस व पाटीलबावांसीं पगडीबदल, पूर्वीं गोहदेस श्रीमंत राजश्री दादासाहेब आले होते ते समयीं, गोसावी यांनीं जाटाकडे फितुर केला, त्याजवरून जाटानें लुटून घेतलें; ते पळून पाटिलबावांचे लष्करांत आले, तेवेळेस जाली होती. तो स्नेह पत्रोपत्रीं चालतो. त्याजवर गोसावी यांची डांक व वकील अल्लीनकीखानाचा लेंक नेहमीं तेथें एक व येथें एक राहतो. तो दिनचर्येचें वर्तमान लिहितो. गोसावी बोलतात कीं, "पाटिलबावा व मी भाऊ आहों. जैसा मी नजबखानाचा चाकर, तैसेंच त्यांस जाणावें. त्यांस इकडील कस्त करूं देत नाहीं." याप्रमाणें आफरासाहेबखान वगैरेसीं बोलतो. व पत्रें त्यांचेही विद्यमानें पातशाहास व अफरासाहेबास येतात. पूर्वीं सुजाउद्दवला यासीं बोलणें व कौलकरार, राजश्री विसाजी कृष्ण इकडे होते ते समयीं, पाटिलबावा-कडून बहिरजी ताकपीर व बाळाराव गोविंद गेले होते व एलचखानाचे विद्यमानें व गोसावी यांचे विद्यमानें बोलून ठरविलें, त्यांतील सर्व मजकूर विसाजीपंतास

माहीत आहे. तो सरकार उपयोगी नाहींसें जाणून विसाजीपंतांनीं मान्य न केलें. त्याजवरून यांचा त्यांचा पेंच पडला. तेच कौलकराराची यादी आनंदराव नरसीसमागमें लखनऊस पाठऊन तेथून दिल्लीस आली आहे. आनंदराव पातशाहासीं बोलतात. त्यास, दोन वर्षें कमकसर स्वारी इकडे फिरते. इकडील लोक, जमीदार व हिंदुस्थानी सर्व, जोर व करण्याची चाल पाहून, तैसी वर्तणूक करितात. पातशाहा सर्व प्रकारें सरकारच्या फौजांचें येणें, आपला काबू होऊन बंदोबस्त व्हावासें इच्छितात. सांप्रत इंग्रेज कलकत्त्यापर्यंत सर्व चिनापट्टणाकडे गेले आहेत. त्यांचा काबू इकडे नाहीं. या प्रसंगीं वीस हजार फौज व होळकर यांची रवानगी जलद ये प्रांतीं जाल्यास, लाहोरपर्यंत व कलकत्त्यापर्यंत त्या प्रांतीचे जमीदार राजेरजवाडे अनुकूल होऊन, कार्यें मनोदयानुरूप होतील. एकवाक्यता व एकहातीं काम मात्र असावें. पाटीलबावा इकडे आहेतच. यांच्यानें होईल तें हेही करतील. व हुजुरून उभयतांची रवानगी जलद व्हावी. भवानी शिवराम यांस कलकत्त्याकडे रवाना करणार, ते याच मार्गें जाल्यास बहुत उपयोग. पैसाही पैदा वाकफगारीनें होईल. फौजेचा खर्चही बाहेर पडेल. नक्ष मोठा होऊन, पुन्हां इंग्रेजाचा काबू इकडे होणार नाहीं. मिर्जाआमानी केवळ इंग्रेजांचे काबूंत पडून, ऐशीं लक्ष रुपये इंग्रेजांनीं घेऊन, शहर लखनऊ अयोध्या देखील लुटितात. व वजिराची आई व आजी यांसीं कैद करून, त्यांचे खोजे एख्त्यारी धरून, नित्य मार त्यांस देऊन, पैसा जवाहीर जें निघतें तें घेतात. याप्रमाणें तेथील अवस्था ! वजीर मद्यप्राशन करून त्यांचे काबूंत पडले आहेत. ते सर्व सरकारचे काबूंत येतील. पातशाहासुद्धां मोहीम तिकडील करावीसा समय आहे. यास विलंब लागल्यास, चिनापट्टणाकडील मसलतीपासून रिकामे इंग्रेज जाल्यास, बंगाल्यापासून अंतरवेदीपर्यंत सर्व मुलूख, विना फौजेचा खर्च दाहा हजार माणसांनसीं खातात, हे गोडी त्यांस विना जोर सुटणार नाहीं. मातबर मसलत पडेल. पैसा खर्च होईल. व ते जागा सोडणार नाहींत. यास्तव समय जाणून विनंति लिहिली. व पातशाहाची मर्जी हीच. यास्तव पाटिलबावांसीं बोलून साकल्य वर्तमान सेवेसीं लिहीन. श्रुत होय. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ८०.



**श्री.** इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजे. श्रीमंत राजश्री नारायणरावसाहेब कैलासवासी जाले, आणि त्यांचे मागें आपले सरकारांत, एक एका माणसानें एकएक रंग घेऊन

उठोन बखेडे केले, त्याप्रमाणेंच नवाब नजबखान मृत्यु पावले त्या दिवसापासून, येथेंही आपलाले जागां नरवीर होऊन, नानाप्रकारें आपसांत बखेडे करितात. त्यास, हल्लीं हा मजकूर ठरला आहे. परंतु सर्वांची बुध्य एकसा राहून, बोलला कारभाराची निभावणी करतीलसें दिसत नाहीं. श्रीमंत राजश्री पंतप्रधान दैववान व आपल्यासारखे सारथी पुण्यवान होते ह्मणून सर्व बखेडे मोडून राज्याचा बंदोबस्त केला, हें वर्तमान आपले कर्तेपणाचें, येथील मातबर पातशाहा व अबदुल अहदखान यांसुद्धां तारीफ करितात. याचा तपशील पत्रीं काय ल्याहावा? ईश्वर श्रीमंत साहेबांस व आपल्यास सलामत बेमलामत राखो! येथील बंदोबस्त व एकवाक्यतेनें चालतीलसें दिसत नाहीं. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ८१.

श्री. २ मार्च इ. स. १७८३.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. सेवक शंकराजी सखदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ० २७ माहे रविलावल मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– इकडील वर्तमान सविस्तर आमचे यजमानांहीं विनंति लिहिली आहे, त्याजवरून श्रुत होईल. तात्पर्य, येथील प्रकार या काळांत ऐसा जाला आहे कीं, दिल्लीचे कोटापासून गुजर वाणी बकाल सराफाचीं मुलें व सराफ वगैरे लोक, कालिकेस अथवा जुन्या किल्ल्यापासीं भैरवदर्शनास जातात. त्यांस धरून नेऊन, हजार पांचसें जैसा जो माणूस आसिला, त्याजपासून दंड घेऊन सोडितात. त्याचा देखील बंदोबस्त यांच्यानें होत नाहीं. मग फौजबंद जो कोणी गनीम येईल, त्याचा बंदोबस्त करणें कळतच आहे! त्यास, येथील प्रकार ऐसा हलका जाला आहे कीं, जो कोणी फौजबंद हिंमतीचा माणूस असेल त्यानें येऊन, येथील अधिकाऱ्यांस भक्षावयास मात्र देऊन, मनास येईल त्याप्रमाणें मुलकाचा बंदोबस्त आपले खातरखा करून घ्यावा, ऐसा समय आला आहे. येथील फौज व सरदार कोणीही एकमेकांत नाहींत. सर्वांचीं चित्तें वेगळीं वेगळीं जालीं आहेत, आणि निसत्वी जाले आहेत. जैसे श्रीकृष्णजी निजधामास गेले, त्यांनीं अर्जुन आदिकरून सर्वांच्या शक्ती हरून नेल्या, आणि काव्याकाव्यांनीं गोपिका लुटल्या, हे अवस्था या दिवसांत या स्थळाची नजबखान मेल्यानें जाली आहे. सूचनार्थ विज्ञप्ति लिहिली असे. व आमचे यजमानांचें येथें देणेंदारीचा

दंगा बहुत. सेवकाची बेहुरमत करितात. याचा तपसील पत्रीं कोठवर ल्याहावा? याजकरितां येथें अटकून पडलों आहें. आज दाहा वर्षें जालीं, लेंकरें बाळें, घरदार सुटलें. यजमान कैलासवासी पुरुषोत्तमपंत यांस नित्यांनीं तगादा करीत होतों कीं, आह्मांस आज्ञा घरीं जावयास द्यावी. त्यास आज्ञा न देत. ह्मणत कीं, मीच टिका घेऊन श्रीमंतांस चालतों. शेवटीं त्यांनीं यमुनावास केला. आतां दोन वर्षें जालीं. राजश्री देवरावतात्या दिल्लीचे कर्जदारीमुळें झांशीस जाऊन बसले आहेत. तेथें त्यांस कपर्दिक खुशकीमुळें जागिरीपैकीं हातीं लागत नाहीं. ते तेथील कर्जदारीकरितां दिल्लीस येत नाहींत, आणि देशींही आपले चरणापासीं येऊं पावत नाहींत. याजकरितां विज्ञप्ति हेच कीं, विसा हजारांची हुंडी, श्रीमंत स्वामींस विनंति करून पाठऊन दिधल्यास, येथील स्थित अब्रू आपली दिधलेली आहे ते राहील. नाहींतर वकिलांनीं आज चाळीस पन्नास वर्षें सरकारची सेवा करून अब्रू मेळविली आहे, ते जाते! मुरबी स्वामी आहेत, हे जनांत लौकिक आहे. या गोष्टीचा अभिमान धरून, या कर्जापासून मुक्त करणार आणि यांस माणसांत ठेवणार, स्वामीवांचून दुसरा त्राता नाहीं. बहुत काय लिहिणें? कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ८२.

**श्री.** ता. २३ मे सन १७८३.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ० २१ माहे जमादिलाखर मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे विशेष. पेशजीं छ० २ मिनहूस विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें सेवेसीं प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर पातशाहानीं रेवाडीचे मुक्कामीं नजबकुलीखान यांजकडील जाबसाल फडशा करून, दिल्लीस छ १८ मिनहूस दाखल जाले आहेत. फौजेचे सरदार व पलटणें व तोफखाना दरोबस्त सरंजाम बदस्तुर आहेत. पुढें काय मसलत करतील ते विनंति लिहूं. वरकड सविस्तर राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे, त्याजवरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें? कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ८३.

श्री. इ. स. १७८३.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना. येथील वर्तमान तर, नजबखानाचे हातीं जाटाचें घर लागलें, याजकरितां तोफखाना व मुलुख व फौज व खजाना जवाहीर याची कमीगमी, जोंपावेतों तो होता तोंपावेतों कांहींच कमी राहिली नाहीं. आतां सरंजाम तोफखाना व फौज तेच आहे; परंतु आपसांत चित्तशुद्धता नाहीं. याकरितां कलह करून परस्परें मरतात, व मारले जातात. या दिवसांत आपली फौज, तिकडील बंदोबस्त खातरखा जाला असला तरी, या प्रांतीं यावयाचा समय आहे. इंग्रेजांस हैदरनाईकाकडील पायबंद लागला आहे. याजकरितां लखनऊकडील वगैरे पलटणें सर्व तिकडे गेलीं आहेत. इकडे सरदार फौजबंद येईल, त्यासी सामील व्हावयास हे फौज फुटून तयार आहे. नाहींतर ताबेदारी करून जिकडे घेऊन जातील, तिकडे चाकरी करावयास सिद्ध आहेत. याप्रमाणें आहे. श्रुत होय. इंग्रेजांचे पारपत्याचा मजकूर, जो नजबखानासीं बोलत होतों व ते सरकारांत पत्रें लिहित होते तो मजकूर, सविस्तर मिर्जा सफीखान यांसीं बोलिलों. त्यास त्यांनीं उत्तर केलें कीं, आमचा घरकलह विल्हे लागून, घरची शुद्धता जाली, ह्मणजे जे श्रीमंत आज्ञा करतील त्यास आह्मी सिद्ध आहोंत. ह्मणून बोलून, सरकारांत व आपल्यास पातशाही शुके व आपलीं पत्रें खलिते पाठविले आहेत; व आपण पातशाहास अर्जी पाठविली होती, तिचा जाब शुका पाठविला आहे. त्यांचीं उत्तरें स्नेहपूर्वक पाठविणार धणी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ८४.

पै॥ छ. १३ रजमान. श्री. ता. २५ मे इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:- इकडील वर्तमान पूर्वीं साकल्य सेवेसीं लिहिलें. अलीकडे छ. २३ जमादिलाखरपर्यंत मुजरद कासीदजोडीसमागमें लिहिलें आहे. त्याजवरून सविस्तर ध्यानास आलें असेल. त्या अलीकडे वर्तमान तर, शाहाजादे जवांबख्त डेरेदाखल, अफराशाबखान, अनुपगीर गोसावी यांचे मसलतीनें करून पुढें स्वारीस निघावें, मिर्जासफी व अमदानी व नजबकुलीखान यांस दबाऊन सर्वांवर आपण व्हावें, हा विचार यांनीं केला होता. त्यास हमसिर

बेगम, नजबखानाची बहीण यांसही समागमें घेऊन चालवावें, व पातशाहजादे हातीं आल्यास मुलकावर हुकूम चालेल, व बेगम हातीं असिल्यास घरचे फौजेवर हुकूम चालेल, हा विचार केला होता. त्यास पातशाहाची मर्जी शाहाजाद्यास द्यावें, हें सर्वथैव नाहीं. परंतु हे फौजेचे धणी. व किल्ल्यांत देखील बंदोबस्त यांचा. सीफळे तोरे भाषणें दोन चार दाहा पातशाहासीं गोसावी व अफराशाबखानांनीं केलीं, तीं अयोग्य केलीं. यास्तव पातशाहांनीं विचार केला कीं, यांस वोढूं नये. तूर्त सांगतील तैसें करून यांचे घरांत फूट करावी. त्यास शाहाजाद्यास डेरेदाखल केलें. पुढें पातशाहास खर्चास देणें, तेंही प्रत्ययास न आलें, व फौजेची वगैरे संचणी करावी व मागील लोकांचें देणें वारावें, तेंही न जालें. बेगमची मर्जी राखावी, तर शिवाय पैसा राहत नाहीं. यांची करणी केवळ हलकी पडूं लागली. तेव्हां पातशाहांनीं विषम मानिलेंच होतें. पातशाहांनीं बेगमकडे बोलणें लाऊन ममतेंत घेतलें. तेव्हां यांनीं पातशाहासीं सलुख गाजुदीखानाप्रमाणें करावा, हा इरादा करून पाहिला. त्यास दोन चार दिवस मसलत गोसावी व अफराशाबखान व शिवराम दिवाण नजबखानाचा, यांनीं हेंही पाहिलें. तें ही गोष्ट सिद्धीस गेल्यास पुढें पेंच भारी, व एवढें कारभाराची निभावणी होणार नाहीं. हें पाहून पातशाहांची मर्जी राखावी. शाहाजाद्यास फिरोन किल्लेदाखल करावें हा विचार करून, छ० २९ जमादिलाखरीं शाहाजाद्याचे डेऱ्यास जाऊन, त्यांजला हत्तीवर बसवून आपण खवासींत बसून फिरोन किल्लेदाखल केलें. त्यानें गोष्ट अगोदर हलकी होतीच, व शाहाजादा फिरून आलियानें केवळच हलकी बहुतच जाली. शाहाजाद्याचे दाखल होण्यांत तोफखाना वगैरे सर्व बेगमेपासीं गेले. अफराशाबखानांनीं चार पांच लक्ष रुपये नजबखान मेल्यातागाईत पदरचे खर्चिले, ते वृथा गेले. गोसावी अनुपगीर सर्वांसीं दुशमन जाले व खपीप जाले. यास्तव कूच करून तीन कोस मुक्काम केला. हें खपीप बेगमनें केलें. हे पातशाहाकडे न मिळती तर आह्मी खपीप न होतों. यास्तव शिक्के कटार व मसनत वगैरे बेगमेकडे पाठऊन दिधली. व त्या दिवसापासून नित्य बेगमेसीं कजिया सुरू बहुतच जाला. लोकांस खायास खर्चास नाहीं. नजबखानाची खाजगत हुजूर रिसाल्याचे लोक फांकेकशी करितात, घोडे हत्ती उपाशी मरतात! नित्यचें भक्षावयाचें बेगमचें देखील बंद जालें! तीन दिवस बेगमेस देखील फांका जाला. फारच नाचाखी होऊन घरकलह लागला. बेगमनें पत्रें मिर्जासफी, साहेबजादा, नजबखानाचा भाचा, यास पाठविलीं. व नजबकुलीखानास व अमदानीस पाठविलीं कीं, यांनीं

येथें निमकहरामी अनुपगीर गोसावी यांचे मसलतीनें या प्रकारें केली. त्यास तुह्मीं सत्वर येऊन दिल्लीस पोंहचावें व नजबखानाचें नांव रक्षावें. त्याजवरून नजबकुलीखान यांनीं जयनगरवाल्याची मामलत साडेसाहा लक्षांवर करून, जयनगरवाल्याचे कारभारी यास वस्त्रें देऊन, व राजास हत्ती जवाहीर वस्त्रें देऊन, फौज तोफखान्यासुद्धां कूच करून, लताफत खोजांच्या जागिरींत वगैरे खंडण्या घेतल्या; व गोसावी अनुपगीर यांनीं जयनगरचे मामलतींत पांच लक्ष ऐसी हजार रुपये वसूल घेतला, तो मधेंच ठेविला. सरकारांत दाखल न केला. त्याची याद कारभारी राजाकडील यापासून घेतली. व याशिवाय जागीर राजांनीं गोसावी यांस मध्यस्तींत पूर्वीं दिधली होती, ते आजपर्यंत चालत होती. त्याचा वसूल बाकीस काढिला व पुढें जागीर जयनगरवाल्याकडून जप्त करविली. व आपण कूच करून कृष्णगडास आले, व हमदानी यांनीं जाटांसीं सलुख करून, डिगे अलीकडे तीन कोस कूच करून आले. कृष्णगडास मुरादबेगखान यांचे घरीं मेजवानी घेऊन, दिल्लीकडे कूच नजबकुलीचें व अमदानीचें दरमजल होऊन, पांचा साता रोजा येथें येणार. व मिर्जासफीखान यांनीं किराण्याहून कूच करून, यमुना उतरून, सोनपताकडे येऊन, नेरल्याहून पांच कोस तेथें पेश खेमा पाठविला आहे. आपण सोनपतानजीक येथून विसां कोसांवर आहेत. बेगमेचे नित्य शुतरस्वार जातात. त्यास नजबकुलीखान, अमदानी यांचें कूच होऊन अलीकडे आले, ह्मणजे त्रिवर्गांनीं समागमें येऊन दाखल दिल्लीस व्हावें, हा विचार केला आहे. बेगमेचे विचारें, नजबखानाची कन्या अकरा वर्षांची आहे, ते मिर्जासफी साहेबजाद्यास द्यावी, व बक्षीगिरीचा खिलत पातशाहाकडून त्यास देववून बंदोबस्त करावा, व सर्वांनीं ताबेदारी त्याची करावी. सांप्रत या विचारास अनुकूल, नजबकुलीखान व अमदानी मिर्जासफी व नजबखानाचे खाजगत रिसालदार वगैरे जाले आहेत. व त्रिवर्ग सरदार फौजेचे धणी आहेत, त्यांची येणीयाची अमदानी येथें बहुत गरम जाली. यास्तव अफराशाबखान व गोसावी व लताफत खोजा यांचें अवसान व शिवराम दिवाण यांचें गेलें. दोन तीन दिवस मसलत केली. एकही सुधी न पडे. तेव्हां पातशाहाचा आश्रय करावा; पातशाहास राजी करावें; बक्षीगिरीचा खिलत आपण घ्यावा, व मुख्त्यारीच आपण घेऊन किल्ल्यांत अबदुल अहदखानाचे आतषखान्यांत राहावें; पातशाहास राजी राखून पातशाहाचे तर्फेनें बेगमेसीं कजिया करावा; व जवाहीर वगैरे बेगमेपासून नजबखानाची जप्ती घ्यावी हा विचार केला. वाजबुल-अर्ज पातशाहापासून दसखत करून मागितली. पातशाहांसही तूर्त लाऊन

घेणें प्राप्त. परंतु त्याचें किल्ल्यांत राहाणें ठीक नाहीं. यास्तव पातशाहांनीं गोष्टी मान्य सर्व केल्या. किल्ल्यांत राहावें हें मान्य न केलें. मुद्दा घातला कीं, किल्ल्यांतील बंदोबस्त तुह्मीं सर्व आपला उठऊन न्यावा, ह्मणजे सर्व मुद्दे कबूल. यांजला रजावंदी पातशाहाची राखणें जरूर, तेव्हां यांनीं मान्य केलें. पंधरावे तारखेस खिलत मुख्त्यारीचा घ्यावा, हें ठराऊन गेले. फिरोन मसलत फिरली कीं, बक्षी-गिरीचा खिलत, बेगमेसीं वाईटपण केल्यास परिणाम लागणार नाहीं, हें समजून तोही मजकूर राहिला. ज्यांत पातशाहा शपथपूर्वक राजी राहातील तें करावें, हा विचार करून पातशाहापासीं गेले. गोसावी, लताफत खोजा यांनीं पातशाहासीं बोलले. तेव्हां त्यांनीं सांगितलें, "माझी रजावंदी, किल्ल्याचा बंदोबस्त तुह्मीं आपला उठवावा, व आमचा करून द्यावा, व आमची जागीर खाजगत खर्चाची त्याचा मागील पैसा दाखल करावा. त्याजवरून त्यांनीं मान्य केलें. किल्ल्यांतील बंदोबस्त छ० १८ रजबीं दरोबस्त अफराशाबखानाचा उठऊन, पातशाही लाल पलटणें वगैरे लोक किल्ल्यांत दाखल जाले. किल्ल्याचा बंदोबस्त पातशाहांनीं अहमदअल्लीखान, पातशाहाचा भाचा आहे, त्याजकडे कुल सांगितला. किल्ला आपले स्वाधीन करून घेतला. नाजर मंजूरअल्लीखान यांचे ठिकाणीं पातशाहाचा विश्वास नाहीं. मध्यें कित्येक बखेडे जाले, याजमुळें भाच्याकडे काम किल्ल्याचें सांगितलें. अफराशाबखानांनीं शपथ कुराण दिधलें कीं, पातशाही चाकर जालों, नजबखानाचा चाकर नाहीं. पातशाहाचा खर्च चालवावा, व जागीर त्यांजकडे आहे, व कारभार बदस्तुर अबदुल अहदखान करावा. याप्रमाणें ठरावांत आणिलें आहे. व गोसावी व लताफत खोजा या पेच्यांत तकसीर माफ करऊन पातशाहाचे सेवेंत हजर जाले आहेत. लताफत खोजास जिनसी पातशाही त्याचें दारोगीचें काम, खवासाचें दारोगीचें काम सांगितलें; उमेदवार केलें; व लाख रुपयांची जागीर नवी द्यावीसें पातशाहांनीं केलें आहे. तूर्त पातशाहा आपला काबू साधितात. किल्ल्यांतील बंदोबस्त यांचा काढला आहे. व दुमाहा सलातीन वगैरे खाजगत खर्चास रुपये घेतले आहेत. नजबकुलीखान व मिर्जासफीखान अमदानी यांच्याही अंतस्थ अर्ज्या येतात. त्यांसीं सूत्र लाविलें आहे. बेगमेशींही लाविलें आहे. अफराशाबखान यांनीं आपली फौज जागीरदार वगैरे बोलाविले, तेही जमा होत जातात. चार पलटणें लताफत खोजा व चार पलटणें दिलाराम काफर व अफराशाबखान वगैरे आहेत. दोन तीन हजार स्वार इतक्यांनिसीं पातशाहाकडून अबदुल अहदखानाचे जागा होऊन, शहरचा बंदोबस्त करून आपला काबू राखावा; नजबकुलीखान, अमदानी व मिर्जासफीखान सर्व एक होऊन येतात, हे आपला

काबू इच्छितील. तर होऊं न द्यावा; शहर आपले हातीं ठेऊन झुंजावें; हा यांचा विचार जाला आहे. पातशाहाचा विचार, हे परस्परें भांडतील, यांसीं कलह लाऊन जे मारले जातील ते मारवावे, व श्रीमंतांच्या फौजेची वाट पाहावी. जलद आल्यास बाकी राहिले त्यांचें पारिपत्य त्यांजकडून करऊन आपला काबू करावा; व बंदोबस्त करून, मुलुख हाताखाले घालून, पातशाहातेस स्वरूप आणावें, व परस्वाधीनता सोडवावी; आपले यख्तियारांत राहावें; ऐसें आहे. मिर्जासफीखान व नजबकुलीखान व अमदानी भारी फौजेचे सरदार आहेत. ते मसलतीस अटकले होते. त्यास मिर्जासफींनीं शिखासीं सलुख करून मोकळे जाले. व जाबतेखान व ते एक जाले. व अमदानी जाटासीं सलुख करून मोकळे जाले. नजबकुलीखान जयनगरवाल्यासीं सलुख करून मोकळे होऊन ..........................

.......................................... ..........................................

सरकारचे फौजेची मार्गप्रतीक्षा बहुत केली, व करितात. परंतु चार महिने येणें राजश्री पाटिलबावांचें घडत नाहीं, व या फौजा पुढें येऊन यांचें पारपत्य करावें इतका जमाव नाहीं, यास्तव जुरत वाढत नाहीं ह्मणोन बोलतात. वर्षाकाल आहे तोंपर्यंत, हे आपसाचा कलह करून एक ठेरले, व बंदोबस्त त्यांचा जाल्यावर, पुढें मसलत पाटिलबावांस भारी पडेल. विना मातबर लढाई मैदानची काबू गांठणार नाहीं ह्मणून बोलतात. आह्मी सांगतों, "जलद स्वारी येते. मर्जीप्रमाणें कामें होतील. व मैदानचीही लढाई पडल्यास चिंता नाहीं. सरंजाम भारी आहे, व आणखीही फौजा बोलाविल्या आहेत." ह्मणून बोलतों. व अफराशाबखानास सांगितलें कीं, नवाब नजबखानासीं करार जाला आहे त्याप्रमाणें करारावर कायम आहेत. तेही ह्मणाले, आह्मी सिद्धच आहों. बाद बरसात एक होऊन बंदोबस्त करूं, व कित्येक गोष्टी बंदोबस्ताच्या बोलले. परंतु येथील करण्याची चाल येणेंप्रमाणें पडली आहे. हे सर्व आपसची खानाजंगी करून जो नजबखानाचे जागां कायम होईल, तो करारमदार त्याचे निभावील. तोंपर्यंत बखेडाच आहे. शिखांचा विचार, पाटलासीं एकवाक्यता करून, यांचे मुलुकांत बखेडा करून अंमल चहूंकडील उठऊन द्यावा. सरकारच्या फौजांनीं पुढें यावें; तिकडून शिखांनीं अंमल उठवीत यावें. राजेरजवाडे सर्वांस मेळऊन घ्यावें. मुलकाचा अंमल यांचा चहूंकडील उठला ह्मणजे जायदादेचे लोक राहाणार नाहींत. फौजेस पैसा द्यावा, तर खजाना यांजपासीं नाहीं. घरकलह! ऐशांत समय आहे. त्यास जैसिंग कन्हैया वगैरे शीख मातबर सरदार सर्व पटाल्यास जमा जाले आहेत. त्यास जयसिंग कन्हैया यांनीं पत्रें राजश्री पाटिल-

बावांस लिहिलीं, व आह्मांस लिहिलीं. त्यांजकडील महेश्वरदास येथें आहेत. त्यांनीं बोलले. त्यास तें पत्रें राजश्री पाटिलबावांकडे पाठविलीं आहेत. उत्तरें आलियावर शिखाकडे पाठऊं. वरकड पातशाहा वगैरे अंतस्थ सूत्रें सर्व लाऊन आज्ञेप्रमाणें ठेविलीं आहेत, व ठेवितों. फौजांस पाटिलबावांस यावयास दिरंग, यास्तव नाउमेद लोकांस होते. त्यास वर्षाकालानंतर तरी जलदी असावी. सूत्रें जे आहेत तीं पक्कीं राखितों. एक वेळ फौज यावी व एकहातीं काम असल्यास चाकरी करून दाखवावी, हेच उमेद आहे. श्रीमंतांचे ताळे शिकंदर आहेत, व सेवकानें सेवा करावी हा धर्मच आहे. तीर्थस्वरूप कैलासवासी पुरुषोत्तमपंत नानास पुत्र जाला. तो अडीच महिनीयांचा जाला. पातशाहांनीं कृपा करून त्यांचा किताब वगैरे चिरंजिवास दिधला. सेवेसीं श्रुत होय. मिर्जा सफीखान व नजबकुलीखान दिल्लीस येऊन दाखल जाले. मिर्जासफीखान, हमसिरा बेगम,—नजबखानाची बहीण, तिचा नातू, सुजाउद्दौलाचा पुतण्या. व सुजाउद्दौलाची कन्या ही त्यासच दिधली आहे. यास्तव मिर्जाआमानी यांनीं विजारतचे नियाबतीचा खिलत पाठवावासें केलें आहे. व हमसिरा बेगमेचा विचार, नजबखानाची कन्या अकरा वर्षांची आहे ते यास द्यावी, व दवलतीचे धणी त्यास करावें. यास्तव मिर्जामजकुरास फौजसुद्धां बोलाविलें आहे. अफराशाबखान यांनीं बखेडा करावा, होऊं न द्यावेंसें केलें आहे. यास्तव बेगमेंनीं फौज जमा केली. व अमदानी वीस पंचवीस हजार स्वार प्याद्यांनसीं अफरासाहेब व गोसावी यांचे जागिरींतील अंमल उठवावयास अंतरवेदींतील उतरले. ते, सरकारची फौज व आपण एक व्हावें, हा विचार करतात. जो तो आपण जबरदस्त व्हावें ह्मणतात. फितुर भारी जाला आहे. फौजेचे लोकांस एकास ठिकाण नाहीं. ह्मणून सरकारची खातरजमा व जागिरा चालवावयाचा करार करून, तेच येऊन चाकरीस हजर होऊन, हरोल होऊन दिल्लीसुद्धां स्वाधीन करितात, ऐसा प्रसंग पुढें दिवसगतीनंतर येईल. यास्तव इकडील ज्यांचीं ज्यांचीं सूत्रें उपयोगीं लहान मोठीं सर्व घेऊन, राजश्री पाटिलबावांकडे चाललों आहों. वर्तमान सर्व त्यांस निवेदन करून, होईल तें साकल्य विनंति लिहूं. येथें राजश्री शंकराजी सखदेव यांस ठेविलें आहे. वर्तमान होईल तें, चिरंजीव येथें आहेत त्यांचे नांवें, सेवेसीं विनंति लिहितील. विशेष काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ८५.

श्री.

माहे मे इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, "इंग्रेजांचे सलुकाचा ठराव, राजश्री महादजी शिंदे यांजपासीं इंद्रसेन साहेब फिरंगी आहे, त्याचे विद्यमानें जाला. सरकारचे किल्ले कोट वगैरे मुलुख इंग्रेजांनीं घेतला होता, तो माघारा दिल्हा. व श्रीमंत राजश्री दादासाहेब यांचीं पत्रें सुरतेहून आलीं कीं, आह्मी देसीं येतों; आमची खात-रजमा करावयास राजश्री हरिपंत व तुकोजी होळकर यांस पाठवावें. त्याज-वरून राजश्री हरिपंत व तुकोजी होळकर यांजसमागमें फौज देऊन रवाना केले. त्यांच्या व श्रीमंतांच्या भेटी जाल्या. तेथून गंगातीरास कुंभारीस येऊन राहिले आहेत. पुढें होईल तें लिहूं." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास राजश्री दादा-साहेब गंगातीरीं कुंभारीसच आहेत किंवा पुण्यास आले हें वृत्त, व नवाब निजामअल्लीखानासीं व सरकारासीं कांहीं जाबसाल मुलुक सोडून द्यावा ह्मणून लागला आहे, व हैदरनाइकाचे पुत्रानें सरकारचे वकिलासीं कांहीं बदसलुकी केली ह्मणून येथें श्रवणांत आलें हें वृत्त, सविस्तर ल्याहावयास आज्ञा कर-णार स्वामी समर्थ आहेत. व नवाब अबदुल अहदखान यांनीं सरकारांत व आपल्यास स्नेहवृद्धीचीं पत्रें खलिते पाठविले होते, त्या गोष्टीस आठ महिने जाले. कासदानें सहजपा मीर्धा याचे विद्यमानें पत्रें दिधलीं होतीं, त्या पत्रांचे जाब तों आले. परंतु खलित्याचीं उत्तरें न आलीं. याजकरितां नवाब अब-दुल अहदखान वारंवार स्मरण करितात कीं, आमचे पत्रांचीं उत्तरें न आलीं, याचें कारण काय? त्यास कृपा करून उत्तरीं लोभ करावा. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ८६.

श्री. ता. २३ जून इ. स. १७८३.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:–

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कु-शल तागाईत छ० २२ माहे रज्जब मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेष:–सरकारचें आज्ञापत्र छ० २९ रबिलाखरचें सादर जालें, तें छ० १ रज्जबीं पावलें. शिरसा वंदून सनाथ जालों. पत्रीं आज्ञा कीं, तिकडील वर्तमान होत जाईल तें वरचेवर लिहीत जाणें ह्मणोन आज्ञा. त्यास इकडील वर्तमान

पेशजीं छ० २१ जमादिलाखरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें सेवेसीं प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा बदस्तुर दिल्लींत आयाश करून आहेत; व वजीर असफद्दौला लखनौस कूच करून बहिणीचे लग्नास्तव अयोद्धेस जाणार; व राजे प्रतापसिंग जयपूरकर लग्नाकरितां जोतपुरास जाणार; ह्मणोन वर्तमान पातशाहाचें येथें बातनी आली त्याजवरून विनंति लिहिली आहे. त्याजवरून ध्यानारूढ होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ८७.

**श्री.** माहे जुलाई इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना कीं, जाबतेखानासीं व गुलाम कादर, त्यांचा पुत्र, यांसीं परस्परें चित्तशुद्धता नव्हती. ह्मणून जाबतेखानानें त्याची जागीर जप्त केली. त्यास गुलाम कादर गोसगडीहून उठोन दिल्लीस पातशाहापासीं आला. त्यास येथेंही भक्षावयास न मिळे. तेव्हां मिर्जासफीखान यांजपासीं कांहीं दिवस होता. थोडें बहुत पोटास देत होते, तें न पुरे. व आज्ञा मागूं लागला. त्यास आज्ञाही न देत. तेव्हां येथून पळून लखनऊस असफदौला यांजपासीं गेला. त्यांनीं साता पारचाचा खिलत, व जेगा, सिरपेंच, हत्ती, घोडा, माळ मोत्यांची, डेरे, राहुव्या, खेमा, बारा हजार रुपये नख्त खर्चास देऊन, सन्मान करून, दोन हजार स्वारांचा रिसाला देऊन, आपलेपासीं ठेविलें आहे. याचें कारण हेंच कीं, जाबतेखान पथरगडाकडे सिखांसमागमें घेऊन जावेंसी वळवळ करितात. ह्मणून त्याचे पुत्राचा आदर करून, लाऊन, फिरंगी याचे विचारें ठेविलें आहे. व पातशाहाचें येथें वृत्त आलें जे, जरनेल कोट चिनापट्टणास सरदार फिरंगी होता, तो सडा कलकत्त्यास इष्टिनापाशीं आला आहे. त्यास तेथील बंदोबस्त करून फौज ठेऊन आला आहे, किंवा पळून आला आहे, व कीं कांहीं मशवरा करावयास आला आहे, हें वृत्त कचें कांहीं लिहिणारानें लिहिलें नाहीं. दुसरी बातमी आलियावर कचें वृत्त कळेल, तें मागाहून विनंति लिहूं. व लखनऊस इंग्रेज आहे, त्याचे बदलीं कलकत्त्याहून होऊन दुसरा साहेब येणार. त्यास आज्ञा आहे कीं दिल्लीसही जावें. तो कलकत्त्याहून दोन मजला अलीकडे आला आहे ह्मणून वर्तमान आजच पातशाहाचें येथें आलें. त्यावरून लिहिलें असे. मागाहून पक्कें वृत्त आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ८८.

**श्री.** ता. २३ सपटेंबर स. १७८३.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १९ माहे सवाल मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली केली पाहिजे. विशेषः– छ० ३ रज्जबचें आज्ञापत्र पाठविलें, तें छ० २४ साबानीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, 'इंग्रेजांसीं संधान हरगीज करणें ठीक नाहीं, ह्मणून वारंवार पातशाहास अर्ज करीत जावा.' ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें आजपावेतों तो अर्ज करून व भयप्रीत दाखऊन, संधान राखिलें आहे. इंग्रेजांस यांचीं पत्रें जातात, त्यांचीं यांस येतात. परंतु इंग्रेजी पलटणें अनुपशहरापाशीं आलीं होतीं, तेही माघारा फरुकाबादेस गेलीं. इंग्रेजांत कांहीं .... दिसत नाहीं. इंद्रसेन नामें इंग्रेज राजश्री पाटीलबावांपासीं साधन करून आहेत. व मेजर ब्राउन नामें इंग्रेज मिर्जा सफीखान यांजपासीं साधन करून डिगेस आहेत. मिर्जासफीखानाची छावणी डिगेस ठैरली आहे. नजबखानाचे कन्येशीं लग्नाचा विचार आहे. इंग्रेजांस चिनापट्टणाकडील जुंझाची ओढ हैदरनाइकाचे लेंका-कडील भारी आहे. इंग्रेजांत कांहीं जीव नाहीं ह्मणून पातशाहाचें येथें वर्तमान आहे. व इंग्रेजांचें मानस कीं, कसेंही करून दिल्लींत पाय शिरवावा, या विचारांत आहेत. व आपल्या फौजा या प्रांतीं सत्वर याव्या आणि सलतनतचा बंदोबस्त व्हावा, हें मानस पातशाहाचें विशेष आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति मागाहून लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ८९.

**श्री.** इ.स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना. पत्रीं आज्ञा कीं, "पारसी पत्रें पातशाहाचे नांवें एक व नवाब अफराशाबखान यांचे नांवें दोन व हमसिराबेगम यांचें नांवें दोन व अबदुल अहदखां यांचे नांवें दोन, एकूण सात पत्रें पारसी पाठविलीं आहेत. त्यांतील मजकुराच्या हिंदवी नकला तुह्मांकडे पाठविल्या आहेत. त्याजवरून पारसी पत्रांतील मजकूर समजेल. कलकत्त्याहून इंग्रेजांचे वकील दिल्लीस येणार. त्यास ते हरतऱ्हेनें पातशाहास ममतेंत घ्यावयाचें करतील. .... त्यास, या गोष्टीचा पुरता विचार पातशाहांसीं व कोण अधिकारी असतील त्यांसीं बोलून, त्यांचा प्रवेश

न होय तें करावें. राजकारण नाजुक आहे. फार जपावें." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास दोन तीन वर्षांपासून आजपावेतों पातशाहास हाच बोध तीर्थरूप कैलासवासी करीत होते, कीं इंग्रेजांचा पाय सलतनतींत शिरणें योग्य नाहीं. ह्या गोष्टी बाह्य होऊन, निदान जखमी होऊन मृत्यु पावले. हल्लीं ज्या समयीं इंग्रेजांचा जिकीर निघतो, त्यासमयीं राजश्री शंकराजी सखदेव वारंवार पूर्वस्मरण पातशाहास यांजकडून देवितों. पातशाहाचे चित्तांत हे गोष्ट खचित आहे कीं, इंग्रेज दिल्लींत आलियावर आमची पातशाहात राहात नाहीं. व आतां नवे कारभारी जाले आहेत, यांचा व नवाब अफराशाबखान यांचा घरकलह लागला आहे. त्यास यांचें त्यांचें झुंज किंवा सलुख दोहींतून एक ठेरलें, ह्मणजे आज्ञेप्रमाणें त्यांसीही बोध करऊन ज्यांत सरकार उपयोगी मनसबा पडे, तेच गोष्ट आपले पुण्येंकडून घडल्यांत येईल. तीर्थरूप कैलासवासी जाले ह्मणून सरकारकामाविसीं व राजकारणाविसीं गुंता काडीमात्र पडणार नाहीं. श्रीमंतांचे प्रतापें व आपले पुण्येंकरून ईश्वर सर्व निर्वाह करील. येथील राजकारणाची काळजी आपण न धरावी. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ९०

**श्री.** ता. २४ सप्टेंबर स. १७८३.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, ताजाकलम वर्तमान आतांच श्रवणांत आलें कीं, मिर्जासफीखान व अमदानी यांसीं परस्परें विरुद्ध विशेष वाढलें होतें. त्यासी अमदानी भेटीस मिर्जासफीचे आला. तेथें मिर्जासफीस दगा जाला. ह्मणून वर्तमान आलें. विशेष वर्तमान मागाहून आमचे कारकुनाचे लिहिलें आलियावर लिहूं. श्रवणांत आलें तें सेवेसीं लिहिलें असे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ९१.

**श्री.** ता. २६ सप्टेंबर सन १७८३.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवसीं:—

"पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २८ माहे सवाल मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः—इकडील वर्तमान सविस्तर पेशजीं छ २५ माहे मजकुरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्त-

मान तर, मेजर ब्राऊन साहेब यांनीं मिर्जासफीखान यांजपासीं आज्ञा मागितली कीं, आह्मांस पातशाहाकडे रुकसत करावें. त्यास मेजर ब्राऊन दिल्लीस येऊन पातशाहाची भेट जालियावर, पातशाहा कांहीं आपलें वर्तमान त्यांस फाके-कसीचें सांगतील व पातशाहा इंग्रेजांसीं मिळून द्वैत करतील, ह्मणून पेस्तर राजे मनीराम यांस दिल्लीस पाठविलें होतें, आणि पातशाहासीं स्वाल केला होता कीं, "मेरट वगैरे माहाल आह्मी सोडून देतों. आपण जेनुल आबदीखान यांजसमागमें एक हजार स्वार व चार पलटणें आहेत, यांस भक्षावयाची खबर घ्यावी. आपण स्वारीस बाहेर निघावें. जर आपली मर्जी बाहेर निघावयाची नाहीं, तर तोफखाना पातशाही व गुसलखाना व किल्ल्यांत दोही दरवाज्यांवर आमचा बंदोबस्त करून द्यावा. व आह्मी मेजर ब्राऊन यांस घेऊन दिल्लीस येतों. त्यास इंग्रेजांसीं आह्मांवेगळें न बोलावें." याप्रमाणें राजे मनीराम यांनीं मिर्जासफीखान यांजकडून स्वाल केला. पातशाहांनीं उत्तर केलें कीं, "आह्मी बाहीर निघतों. आमचे फराशखान्याचा, भारबारदारीचा, व स्वारीचे लोकांचा खर्चाचा बंदोबस्त करून द्यावा." मनीराम यांनीं उत्तर केलें कीं, "मेरट वगैरे माहाल सोडितों. त्यांत सर्व आपला बंदोबस्त खर्चाचा व फराशखान्याचा व भारबारदारीचा करून घ्यावा." त्यास पातशाहानीं उत्तर केलें कीं, "खुशकी या-प्रमाणें पर्जन्य नाहीं. आठ शेर अन्न ! याहीवर जेनुल अबदीखान यांचे फौजेस खर्चास द्यावें, ह्या गोष्टी कैशा घडतात ?" निदान दोन तीन रोज खलबताचा मझेला होऊन निदान हें ठरलें कीं, मिर्जासफीखानास पत्रें लिहिलीं होतीं कीं, तुह्मीं दिल्लीस येणें. मग तुमच्या विचारें जो विचार ठरेल तो करूं. ह्मणून पत्रें गेलीं होतीं. उत्तरें आलीं नव्हतीं. महमदबेग हमदानीसीं व मिर्जासीं विरुद्ध ! त्या बखेड्यांत मिर्जासफीखान होते. त्यास छ० २५ सवालीं मंगळवारीं कासमजान वगैरे मोंगलीये सरदार यांनीं मध्यस्त पडून भेटीचा ठराव केला. त्यास छ० मजकुरीं चार घटका दिवस राहतांना, महमद बेग हमदानी तिकडून तयारी करून डिगेसमीप आला. इकडून मिर्जासफीखान तयार होऊन डिगेहून बाहेर निघाले. परस्परें भेटी व्हाव्या इतक्यांत मोंगलीये सरदार महमदबेगाकडे मिळाले होते, यांनीं मिर्जासफीखान यांचा हात धरिला. हें पाहून महमदबेग हमदानीनें पेशकबज पोटांत चालऊन मिर्जासफीखानास मारून टाकिलें. इतक्यांत हंगामा होऊन महमदबेगही जखमी जाला आहे ह्मणून वर्तमान आहे. तोही मरेल किंवा वांचेल हें नकळे. मागाहून दुसरें वर्तमान पक्कें आलियावर विनंति लिहूं. परंतु मिर्जासफीखान मारला गेला.

हिंदुस्थान सारें रिकामें पडलें आहे. अफराशाबखान व नजबकुलीखान हे दोघे सरदार नजबखानाकडील आहेत, हे जो कोणी फौजबंद सरदार येईल त्याची चाकरी करावयास सिद्ध आहेत. हिंदुस्थानांत लढाई तरवार राहिली नाहीं! या अर्थीं इकडे फौज पाठऊन खबर घेणें जरूर आहे. नाहींतर सिखाचा अथवा फिरंगी यांचा काबू दिल्लींत जालियावर मग मसलत भारी पडेल. सेवेसीं श्रुत व्हावें ह्मणून विनंति लिहिली आहे. फिरंगी यांचें मानस, दिल्लीस पातशाहांपासीं येऊन यांस आपले ममतेंत काबूंत घ्यावें आणि सर्वोपर व्हावें, हे मर्जी इंग्रेजांची आहे. या अर्थीं जलदी करून आपली फौज दिल्लीस आली तरी पातशाहा व हिंदुस्थान काबूंत राहेल. जर या गोष्टीस विलंब लागल्यास मग पुढें मसलत भारी पडेल. ह्मणून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ९२.

श्री. आक्टोबर इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, मिर्जासफीखान मारला गेलियावर राजे मनीराम व मेहदीकुलीखान यांनीं पातशाहापासीं पैगाम केला कीं, तीन लक्ष रुपये नजराणा घ्यावे आणि मिर्जासफीचा भाऊ जैनुल आबदीखान दौलतीचा वारस आहे, यास मीरबक्षी-गिरीचीं वस्त्रें द्यावीं ह्मणून पैगाम केला. त्यास पैगाम परस्परें पातशाहाकडे केला. नवाब अबदुल अहदखान यांचे विचारें न केला. ह्मणून यांनीं अफराशाबखान याजकडे आपलें एकोप्याचें सूत्र पक्कें करून, त्यास बक्षीगिरीचीं वस्त्रें पाठविलीं. आणि नजबकुलीखानास कानोडेहून बोलाऊन आणून, त्याचे हातून राजे मनीराम व मेहदीकुलीखान मिर्जासफीचे पक्षाचे आणि पातशाहासीं वेगळीं बोलणीं बोलतात हें जाणून, त्यांस कैद करून, राजे मनीराम यांपासून दहा हजार रुपये नख्त घेऊन सोडले. व मेहदीकुलीखानापासून सर्वस्व घेऊन, कैद करून, कानोडेस किल्ल्यांत नेऊन ठेविलें आहे. पुढें होईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ९३.

श्री. आक्टोबर १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. मिर्जासफीखान मारले गेले ते अफराशाहाबखान व मोंगलीये

सरदार हे सर्व महमदबेग अमदानीसीं मिळून हा दगा केला. त्यास मिर्जासफीखान मारला गेलियावर तिसरे दिवसीं, महमदबेगाकडील वकील लछीराम अफराशाहाबखानापासीं येऊन, बोलून, दहा हजार रुपये नख्त खर्चास, व तुह्मांकडे मुलुख ढवळपूर वगैरे आहे तो, व रावराजा प्रतापसिंग यांजकडील मामला व जयपूरकर राजे प्रतापसिंग यांजकडील मामला बदस्तुर तुह्मांकडे बाहाल आहे, याप्रमाणें बोलणें पक्कें करून त्यास आज्ञा दिधली. तो कूच करून ढवळपुराकडे गेला. अफराशाहाबखान यांनीं दरोबस्त फौजेचा व तोफखान्याचा बंदोबस्त केला. जुने दारोगे दूर करून, नवे दारोगे आपले ममतेचे ठेऊन, आपला काबू डिगेचे किल्ल्यांत वगैरे करून, तेथून हमसिरा बेगम यांस समागमें घेऊन, आगरियाचे किल्ल्याच्या बंदोबस्तास कूच केला आहे. ते मथुरेस आले आहेत. पुढें आगरियास जाऊन तेथील बंदोबस्त करून, मग दिल्लीस पातशाहाकडे येणार, हा विचार ठरला आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ २ मोहरम सन आर्बा समानीन मार्गशीर्ष मास

## लेखांक ९४.

श्री.

ता. २४ आक्टोबर १७८३.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २७ माहे जिलकाद मुक्काम दिल्ली जाणून, स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः— येथील वर्तमान तर छ० १४ रोजीं सिलेमां सिको पातशाहाजाद्यास व अफराशाबखानास खिलत रवाना राजे दयाराम याजसमागमें केले. राजेमजकूर छ० १५ मिनहूस येथून कूच करून पातशाहाजाद्याकडे अफराशाहाबखानाकडे व शहाजाद्यास वस्त्रें निमअस्तीन सरबस्ता, पागोटें बमय गोशवारा, नुकेसी तुरा, व हमसिरा बेगमेस एक दुशाला पल्लेदार मातमपुरसीचा, व अफराशाबखान यांस वस्त्रें खिलत सात पारचाचा व हत्ती घोडा व कंठी मोत्याची व जेगा सिरपेंच व ढाल तरवार, येणेंप्रमाणें मीरबक्षीगिरीचा खिलत दिल्हा. याचें कारण हेंच कीं, हे मुकिस्त. त्यानें दोन लक्ष रुपये देणें करार केलें, व पुढें पासष्ट हजार रुपये दरमाहा त्याजकडे पातशाही परगणे आहेत त्यांजपैकीं देत जावा. ऐसा करारमदार कागदीं पत्रीं त्याजकडील वकील बाहादरसिंग वाणी येथें नवाब अबदुल आहदखान याजपासीं आहे, याचे विद्यमानें जाला आहे. परंतु पैका पावेल न पावेल हें अमलांत येईल तें खरें. दुसरें, मिर्जासफीखान मृत्यु

पावला आणि यांनीं इतकी जलदी करून मीरबक्षीगिरीचा खिलत अफराशाबखानास द्यावयाचें कारण हेंच कीं, मेजर ब्राउन फिरंगी त्याजपासीं आहे. त्यास फिरंगी व अफराशाबखान एकविचारें होऊन सिलेमा सीको पातशाहाजाद्यावर तेथें छत्र फिरऊन बखेडा केला, तर काय करावें ? आपले पासीं फौज व खजाना नाहीं कीं झुंजत फिरावें ? ते जबरदस्त ऐशी दहशत खाऊन, अबदुल अहदखानाचे विचारें उभयतांस खिलत पाठविले आहेत. त्यास, पातशाहा सरकारचे फौजेची मार्गप्रतीक्षा पर्जन्यन्यायें करितात. जर सरकारचे फौजेचें आगमन सत्वर होय, तर उत्तम आहे. नाहींतर हें संस्थान हातचें जातें. फिरंगी अथवा सीख पातशाहास आपले काबूंत करून सर्वांवर हुकूम करतील. या दिवसांत पातशाहास धीर पुरत नाहीं. सूचनार्थ विनंति लिहिली असे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ९५.

श्री. इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, पातशाहांनीं येथें वर्तमान ऐकिलें कीं, गाजुदीखान पुण्यास येणार. त्यास आह्मांस आज्ञा जाली कीं, "गाजुदीखान निमकहराम आहे. तुह्मीं श्रीमंतांस विनंति ल्याहावी कीं, गाजुदीखान पुणियास आलियास त्याचा गौरव किमपि न करणें, व त्यास तेथें थारा न देतां काढून देणें. यांतच आमची खुषी आहे. ह्मणून वारंवार दोन वेळ आज्ञा केली कीं, तुह्मीं जरूर जरूर लिहून पाठविणें." त्याजवरून विनंति लिहिली असे. आपणही पातशाहास एक अर्जी लिहून पाठवावी कीं, जे हजरतची मर्जी, त्याप्रमाणें अमलांत येईल. व शाहा अबदाली यांचा शुका व त्याचे वजिराचें पत्र ऐसीं दोन पत्रें त्यांजकडील सरकारचे नांवें आलीं, ते सेवेसीं पाठविलीं आहेत. व त्याजकडील वकिलानें सरकारांत अर्जी व आपल्यास पत्र ऐसीं पाठविलीं आहेत. तरी पातशाहाचे शुक्याचा जाब, अर्जी व वजिराचे पत्राचा जाब व वकिलाचे पत्रांचीं उत्तरें ऐसीं पाठऊन द्यावीं. व पातशाहांनीं आह्मांस शुका पाठविला आहे, व वजिरानें पत्र लिहिलें आहे. हें बजिन्नस तिकडील वर्तमान कळावें ह्मणून सेवेसीं पत्रें पाठविलीं आहेत. त्यांजवरून विलायतचें वृत्त कळेल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ९६.

श्री. इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. पटिलाईच्या आसपासील सीख किरकोळी सरदार मिळून, चौदा पंधरा हजार स्वार व पंधरा वीस हजार प्यादे, बमय बायका लेंकरेंसुद्धां, तिकडे काळ पडला ह्मणून पोट भरावयास, या प्रांतीं बुढ्या सारंगपूरचा घाट यमुना उतरून आले आहेत. अंतरवेदींत सारंगपूर वगैरे आसपासचे गांव लुटून ताराज केले. पुढें कूच करून देबानेस आले. इकडून जे सीख भागसिंग व भंगेलसिंग वगैरे अंतरवेदींत रखीवाले होते ते, व जाबतेखान यांची फौज व दोन पलटणें व नाहारसिंग गुजर, वगैरे जमाव करून गोसगडाकडे गेले. त्यांसीं यांसीं झुंज जालें. शेवटीं जाबतेखानाकडील फौजेनें शिकस्त खाऊन, माघारा पळून गोसगडास आले. परस्परें चार पांचशें माणूस मारले गेले. त्यास सीख पुढें दरकूच मेरटप्रांतीं येणार ह्मणून वर्तमान आलें. त्याजवरून येथें सरदार आहेत ते गडबडून, त्यांजवर कूच अफराशाबखान पातशाहाजादासुद्धां मेरटकडे सिखावर जाणार. व रावराजा यांनीं कृष्णगडाकडे धामधूम केली आहे ह्मणून तिकडील बंदोबस्तास नजबकुलीखान जाणार. व पातशाहा व अबदुल अहदखान दिल्लींत आहेत. येणेंप्रमाणें तूर्त मसलत ठरली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ९७.

श्री. इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. अफराशाबखान यांनीं अबदुल अहदखान यांचे विद्यमानें पातशाहास आपले मतलबाची याद लिहून दिधली, कीं याजवर दसकत करून द्यावें ह्मणजे आमची खातरजमा होईल. बितपसील कलमें:—

१ अकबराबादेची सुभेदारी व किल्लेदारी.

१ तोफखाना पातशाही हशम याची दारोगी.

१ मीरबक्षीगिरीची जागीर बदस्तुर नजबखान यास होती ते.

१ मराठे व फिरंगी व जयपूर व बिकानेर वगैरे राजे रजवाडे यांचे जाबसाल आमचे विद्यमानें असावे.

१ आमचे फौजेंतील मोंगल किंवा पलटणवाले जमातदार जो कोणी अजुर्दा

होऊन उठोन हजुरांत आला, त्यास हजुरांत न ठेवावें; आणि त्याची जायदाद आहे त्याची मुखत्यारी आमची आह्मांकडे असावी.

१ खैर परगणा पेशजीं फुलयेर फिरंगी सरकारचा चाकर पातशाही होता, त्याजकडे खैरचा परगणा जायदाद होती. तो आह्मांकडे असावा.

१ साडेबावीस सुभे पातशाही त्यांजवर मुख्त्यारीचा हुकूम आमचा असावा.

१ स्वारीस चालावें, त्यास बक्षीगिरीचे माहाल व खालशाचे माहाल याखेरीज नवा मुलूख सुटेल त्यापैकीं फौजेचा खर्च मजुरा द्यावा, आणि आमचे जातीची सरफराजी करावी.

१ चित्तापासून आमचे ठायीं कृपा ममता असावी. कोणीही आह्मांविषयीं किंतु मनांत घातला तर न आणावा. आह्मांस बोलाऊन आणून परस्परें शुद्धता करावी."

९

सदरहू नव कलमें लिहून दिधलीं होतीं. त्यांपैकीं पातशाहांनीं दसकत करून दिल्हें कीं, आगरियाची सुभेदारी व किल्लेदारी व मीरबक्षीगिरीचे माहाल जागीर बदस्तुर नजबखान येणेंप्रमाणें करार दसकत करून दिल्हें. बाकी कलमांचा जाब दिधला कीं, विचारून मग जे आज्ञा करणें तें करूं. याप्रमाणें जाबसाल जाले. पुढें काय विचार ठरेल ते विनंति मागाहून लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ९८.

श्री. डिसेंबर १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, मिर्जासफीखान मारला गेलियावर नवाब अफराशाहाबखान यांस मीरबक्षीगिरीचीं वस्त्रें पातशाहानीं पाठविलीं. हें वर्तमान सविस्तर पेशजीं छ २७ जिल्कादीं पत्रें पाठविलीं तें पावून वृत्त श्रुत जालेंच असेल. अलीकडे वर्तमान तर, मिर्जासफीखान मारला गेला, तो अफराशाहाबखान व मोंगलीये सरदार या सर्वांचे मतें मारला गेला. अफराशाहबखानास मीरबक्षीगिरीचीं वस्त्रें जालियावर, पातशाहास अर्जी व नबाब अबदुल अहदखानास पत्रें पाठविलीं कीं, महमदबेग हमदानीस आह्मीं खिलत तयार केला आहे; आपणही हजुरीहून मेहेरबानगीचा खिलत पाठवावा. त्याजवरून अबदुल अहदखान यांनीं पातशाही खवास या समागमें देऊन वस्त्रें पाठवावीं ह्मणून तयारी केली आहे.

व मिर्जासफीखान यांचा बंधु जेनुल आबदीखान अंतर्वेदींत मेरटेकडे होता, त्यास काढून देऊन, मेरट वगैरे अकरा महाल सरकारांत घ्यावे हें अबदुल अहदखान यांचें मानस. त्याजवर यांची आज्ञा न चाले. त्याजबराबर चार पलटणें व एक हजार मोंगलीये स्वार व एक हजार सीख येणेंप्रमाणें सरंजाम आहे. ह्मणून यांनीं आपलीं पत्रें व पातशाहाचे शुके पाठवून, कानोडेस नजबकुलीखान होता त्यास बोलावून आणून बहुत सन्मान केला. सरबस्ता पागोटें, बमय गोशवारा, व मुकेसी तुरा, व निम अस्तिन व ढाल तरवार, दुय्यम बक्षीगिरीचीं वस्त्रें देऊन, त्यांजसमागमें भले माणूस जमातदार मातबर माणूस होते त्यांस सा निम अस्तिना व बावीस दुशाले व सा गोशवारे येणेंप्रमाणें देऊन, अंतर्वेदींत जेनुल अबदीखान यांचे व शिखांचे पारिपत्यास पाठवावें, तों इतक्यांत नवाब अफराशाहबखान यांनीं आगरियाकडील बंदोबस्त करून, हमसिरा बेगमेस समागमें घेऊन, कूच करून, मेरटेसमीप भुडबराल ह्मणून गांव चार कोस आहे, तेथें आले. दिल्लीहून नजबकुलीखानही कूच करून शामील जाले. व जेनुल आबदीखान बागपतास होता, तो तेथून कूच करून मेरट पाठीशीं देऊन, बागांत डेरे देऊन, लढाईस मुस्तेद जाला. हें पाहून आफराशाहबखान यांनीं जान अलीखान ह्मणून लथापतअलीखान खोजा—ज्यांस गुदस्तां मिर्जासफीनें धरून अंध केलें त्याजकडील दिवाण—मातबर माणूस आहे, त्याजसमागमें कुराण शपथपूर्वक पाठवून सलूख केला कीं, आपसांत झुंजणें ठीक नाहीं. ज्याप्रमाणें तुह्मी साहेबजादे नवाब महरूम नजबखान त्यांजपाशीं राहत होतां, त्याप्रमाणें आतां हमसिरा बेगमेपासीं असत जावें. ह्मणून बोलणें होऊन समरू फिरंगी याचे बेगमेचे विद्यमानें भेटी ठैरल्या. त्यास लष्करापुढें दोन कोस समरूचे बेगमेचे डेरे होते. तेथें छ २८ मोहरमीं हमसिरा बेगम व अफराशाहबखान व नजबकुलीखान गेले. तिकडून जेनुल आबदीखान दोनशां रावतांनिसीं आले. तेथें कुल बंदोबस्त समरूचे बेगमेचे पलटणाचा होता. तेथें परस्परें भेटी जाल्या. स्नेहवृद्धि करून आपलाल्या डेरियास गेले. दुसरे दिवशीं जेनुल आबदीखान हमसिरा बेगम यांचे डेरियास आले. तेथें अफराशाहबखान जाऊन, सरबस्ता पागोटें, बमय गोशवारा, व जेगा व शिरपेंच व निम अस्तिन व हत्ती घोडा तरवार, व हमराई जमातदार होते त्यांस दुशाले व गोशवारे देऊन, सन्मान करून, सिलेमा सिको पातशाजाहाजादा यांचे डेरियास नेऊन सरबस्ता पागोटें, बमय गोशवारा, मुकेसी तुरा व निम अस्तिन व दुशाला व तरवार येणेंप्रमाणें देऊन, समाधानाच्या गोष्टी बोलविल्या कीं, तुह्मीं सर्वांनीं एक

विचारें असोन, सरकार काम करीत जावें. ह्मणून बोलून आपलाले डेरियास गेले. जेनुल आबदीखानाचें बोलणें आहे कीं, नवाब नजबखान यांनीं मिर्जासफीखान यांस मेरट वगैरे अकरा महाल जायदाद दिली होती, ते त्यांनीं आह्मांस दिधली आहे. हे बदस्तुर आह्मांकडे असावी. नवाब अफराशाहबखान ह्मणतात कीं, हा मुलूख पातशाही आहे. त्यास मेरट वगैरे परगणे व तोफखाना व पलटणें हा सरंजाम सर्व सरकारचा आहे, तो तुह्मीं सोडून द्यावा. तुह्मी आह्मी दिल्लीस पातशाहापासीं जाऊं. ते धनी आहेत. जें देतील ते घ्यावें. नाहीं तर ज्याप्रमाणें नवाब नजबखानाचे वेळेस तुह्मांस चोविसां हजारांची जहागीर होती, ते मी देतों. भक्षून हमसिरा बेगमेसमागमें असावें. याप्रमाणें बोलणीं परस्परें होतीं. निदान ठैरलें कीं, पांचशें राऊत व दोन पलटणें यांचा सरंजाम लावून द्यावा. याप्रमाणें करारमदार ठैरून सलूख पक्का जाला. पुढें गुलाब गुजर परीक्षतगडकर यांजकडील व चत्रा जाटाकडील मामलत करून कुंज-पुरीयाकडे सीखांचा बंदोबस्त करीत जाणार ह्मणून मनसबा आहे. तूर्त पातशाहा-जादा सिलेमा सीको व अफराशाहबखान व हमसिराबेगम व नजबकुलीखान व जेनुल आबदीखान सर्व एक विचारें कसबे मेरट येथें सूर्यकुंडावर मुक्काम करून आहेत. पुढें काय मसलत ठरेल ते विनंति लिहूं. एक विचार हाही आहे कीं, दिल्लीस सर्वांनीं येऊन, पातशाहाची भेट घेऊन, मग जिकडे जाणें तिकडे जावें. अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ९९.

**श्री.** इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं विलायती नासपाती सुमार २५ पंचवीस व अंगुराची कुती एक, येणेंप्रमाणें पावला. दुसरियानें मेवा अद्याप आला नाहीं. त्यास पाठवीत जावा. ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास यंदा या प्रांतीं सिखाची गडबड बहुत ह्मणून महाप्रयासें एकवेळ विलायती मेवा आला, तोही कांहीं चांगला आला नाहीं. नासपाती बहुतच लहान होत्या. आणि सेव तो आलेच नाहींत. त्यास दुसरियानें मेवा आला असता तर जरूर जरूर हजुरांत पाठवितों. दुसरियानें मेवाच आला नाहीं ह्मणून पाठविला नाहीं. व या दिवसांत हैदरनाइकाचे पुत्राचीं पत्रें पातशाहास अर्जी व मिर्जासफीखानास पत्रें आलीं आहेत कीं, आमचे वकील राव बालमुकुंद हजुरांत आहेत, त्यांस बिदा करून द्यावें. व बालमुकुं-

दासही पत्र कीं, तुह्मीं उठोन येणें. त्यावरून वकील मशारनिल्हे दिल्लीहून जैपूरचे मार्गें जाणार. पातशाहास अर्ज, हैदरनाइकाचे पुत्रास मातमपुरसीचीं वस्त्रें द्यावीं ह्मणून केला होता. त्यास पातशाहानीं कांहीं उत्तर न दिधलें. व नवाब अबदुल अहदखान यांसीही दहा पांच वेळां हाटकिलें कीं, मातमपुरसीची वस्त्रें द्यावीं. त्यास यांनींही टाळाटाळच केली. वकिलास मात्र रुसकतीचीं वस्त्रें देऊन बिदा केलें. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १००.

**श्री.** इ. स. १७८३.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. राजश्री पाटिलबावा यांसी व आबा चिटणीस व राणेखान यांसी ल्याहावें कीं, कोट्याचे वरातीचा फडशा करून हरएक विषयीं साहित्य करणें ह्मणून ल्याहाविसें लिहिलें. त्यास पुरुषोत्तमपंत वारल्यावर, तुह्मी तेथें आहां हें पाटिलबावांस पेशजीं लिहिलेंच आहे. कोट्याचे वरातीचा मजकूर पाटिलबावांस लिहिला असतां तुह्मांस तेथें बरा पडतो कीं काय, तें लिहून पाठवावें. ह्मणोन आज्ञा. त्यास, आबा चिटणीस व राणेखान व राजश्री नारो शिवदेव यांसीं पत्रें कीं, कोट्याचे वरातीचा निकाल पडे, व रावतांचे बोलीचा ऐवज दरसाल पावे, व हरएक विषयीं यांचे साहित्य करून दिल्लीस यांचे कामांत बखेडा न पडे, व याचे हातें काम चाले, ह्मणोन त्रिवर्गास पत्रें; व पाटिलबावांसही पत्र कीं यांचे ठिकाणीं आपण कृपा करितच आहां, व विशेष करून चालवावें. बुंदेले व झांशीकर यांसीं निक्षून ताकीद करून यांचे बाकीचा ऐवज उभयतांकडे असेल तो देवावा, पुढें खेडीं वसुली लाऊन देवावीं. हरएक विषयीं यांचें चालवावें. ह्मणोन पत्रें जरूर पाठवावीं. येथें उपयोगीं पडतील. नारो शिवदेव व आबा चिटणीस यांस अधिक ल्याहावें कीं, उपयोगी प्रसंगीं पडतील. नारो शिवदेव यांसी स्वामींनीं खाजगत पत्रें पाठवावीं. त्यांतही एक दोन वेळां ल्याहावें कीं ममता धरून प्रसंगीं आमचे उपयोगी पडत. * * * * *

व किल्याची शिबंदी मनस्वी चढली आहे. इतका सरंजाम मशारनिल्हेकडून होणार नाहीं. बखेडा होऊन किल्यास अपकार अथवा रांगड्याचे हातीं जाऊन बखेडा जाल्यास प्रांतास अपकार. व दुसरी गोहदकराप्रमाणेंच मसलत उभी राहील. यास्तव सुचली विनंति लिहितों कीं, मामलतीचे तगेरीचा हंगाम नाहीं. सांप्रतच्या प्रसंगांत बखेडा नसावा. यास्तव यांसीच चार रुपये ठराऊन मामलत

# ऐतिहासिक टिपणें.



## भाग ४ था.



## १. पुण्याची राजबाग.

महादजी शिंदे ह्यांच्या एका पत्रामध्यें कसबे पुणें पेठ राजबाग असा एक उल्लेख आढळतो. त्यावरून पुण्यास कसबा पेठेंत एक 'राजबाग' होती असें दिसतें. शिवाजी महाराज व त्यांची आई जिजाबाई ह्याच पेठेंत कसब्याचे गणपतीचे जवळ राहात असत. त्यांच्या वाड्यास 'राजमहाल' असें ह्मणत असत. त्या शेजारील जी बाग, ती 'राजबाग' असावी, असा तर्क आहे.

श्री.

"राजश्री बाळाजीपंत नाना गोसावी यांसीः—

दंडवत विनंति उपरी, राजेश्री नारो रुद्र यांणीं कसबे पुणें पेठ राजबाग येथें गवळ्यापासून जागा विकत घेऊन, खरेदीपत्र व सरकारचें कवालेपत्र करून घेतलें. आणि जाग्यावर नवें घर बांधोन कुटुंबसुद्धां राहत असतां, सन तिसा समानीनांत राजश्री गणेशपंत निसबत खाजगीवाले यांणीं गैरवाका समजाविल्यावरून घर जप्त जालें आहे ह्मणून कळलें. त्याजवरून राजश्री रामजी पाटील जाधव यांजबरोबर येविषयीं आपणांस एक दोन वेळ सांगून पाठविलें. आपणही मनास आणितां, जागा यांची खरी; दरम्यान जप्ती गैरवाका समजाविल्यावरून जाहली, असें समजलें आहे. त्या अर्थी दिवसगतीवर न टाकितां, जागा मशारनिल्हेची मशारनिल्हेस देवावी. नारो रुद्र यांचे पुत्र इकडे आहेत व जाबसाल वाजवी जाणोन लिहिलें आहे. ता॥० छ० ४ जिल्हेज ही विनंति."

मोर्तब.

* * *

## २. पेशव्यांच्या दरबारांत घड्याळांचा प्रवेश.

कालमापन करणारीं इंग्रजी घड्याळें हिंदुस्थानांत केव्हां आलीं, हें समजणें आवश्यक आहे. ऐतिहासिक पुराव्यावरून मराठ्यांच्या दरबारांत घड्याळांचा प्रवेश, थोरले बाजीरावसाहेब पेशवे ह्यांच्या कारकीर्दीपासून झाला असावा, असें मानण्यास सबळ पुरावा सांपडतो. कॅप्टन वॉकर ह्यांनीं थोरले बाजीराव साहेब यांस लिहिलेलें इ. स. १७३५ सालचें एक पत्र उपलब्ध झालें आहे. त्यांत

पेशव्यांजवळील इंग्रजी घड्याळ साहेबमजकुरांनीं दुरुस्त केल्याचा उल्लेख आहे. ह्यावरून, थोरल्या बाजीराव साहेबांच्या कारकीर्दीपासून इंग्रजी घड्याळें मराठ्यांच्या दरबारांत प्रविष्ट झालीं होतीं, हें सिद्ध होतें. थोरले माधवराव, सवाई माधवराव ह्यांच्या कारकीर्दींत इंग्रजी घड्याळांचा प्रवेश चांगलाच झाला होता, हें प्रसिद्धच आहे. कॅप्टन वॉकर ह्यांनीं थोरले बाजीरावसाहेब ह्यांस लिहिलेलें पत्र येणेंप्रमाणेः—

उं.

"अजमं अकरमं बाजीराऊजी पंतप्रधानजी उस सलामतः—

मेहरदान कदरदान फौजंदास्त फौजरसां अजीदिलं एखलास कपितान शामील वाकर मेहजर मुकाम जंजिरे मुंबई सलाम बाजेद सलाम खैर अंज्याम महवल मकसूद अंकी, मोहिबाचा किताबतनामा मुजरत फतेमार सोबत रवाना केला, तो मुकाममजकुरीं दाखील होतांच, इंजानेबास मुफसल जाहला. ऐसीयासी अजम कपीतान इंचबर्ड तों स्वारीस रवाना जाहले असेत. तें इंजानेबास अजम मशारनिले तर्फेनें वकीलात फरमाविली असे. दिगर मोहिबाकडील घडियाळ तयार करोन उतावळी रवाना केलें पाहिजे. तर हें घडियाळ दुरुस्त करोन मोहिबाचे फतेमार यासोबत जात असे. यासी खर्च लागला, तो आपण अजम मशारनिले कपितान यांचे खातीं लिहिला असे. दराज काय लिहिणें? प्यार मोहबत असूं देणें. येथें सार शिकार खिजमत फरमावीत जाणें. खिजमतेस हाजीर असों. तारीख २८ जमादिलाखर ऊर्फ इंगरेजी तेरीख ३ नोवेंबर सन १७३५."

✠ ✠ ✠

## ३. फ्रेंच व मराठे ह्यांचे मधील राजकारणांची यादी.

इ. स. १७६० मध्यें मराठ्यांचीं व फुलचरीकर फरासिसांचीं जीं राजकारणें चाललीं होतीं, त्यासंबंधाची एक अस्सल यादी उपलब्ध झाली आहे. ती फार महत्त्वाची असून, तिच्यावर "श्री सिद्धेश्वरचरणीं तत्पर, विसाजी कृष्ण निरंतर." असा शिक्का आहे. त्यावरून हें राजकारस्थान, विसाजी कृष्ण ह्यांच्या मार्फत कर्नाटकांत चालू होतें, असें दिसतें. ही यादी येणेंप्रमाणेः—

श्री. ता. १७ सप्तेंबर इ. स. १७६०.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेब.

यादी फुलचरीकर यांजकडून व्हावयाचे मतलब सु॥ सन इहिदे सितैन मया व अलफ छ ७ सफर भाद्रपद मास विक्रम नाम संवत्सरे.

१ चंदीचा किल्ला तूर्त तुमचे हातीं आहे, तो देखील सरंजाम व जंगी सामानसुद्धां अर्धी सरकारांत द्यावा. कलम १.

२ सरकारची फौज कुमकेस येईल, त्यास दररोज दर स्वारास रु॥ १ व सरदारास व मुत्सद्दी यांस त्यांच्या खर्चामाफीक, ज्या तारखेस घाट उतरतील त्या तारखेपासून परतून घाटावर येई तोंपर्यंत, खर्चास देत जावें. कलम १.

३ सरकारच्या कामास कर्नाटकांत व हिंदुस्थानांत व आमच्या देशांत, जेथें बोलावूं तेथें, दोन हजार फिरंगी व तोफखाना व दारुगोळी जे सामान व सरंजाम सुद्धां येऊन रुबकार जाले, काम करावें जालें, ते वेळेस आपणास राजी ठेवून जावें. कर्नाटकांत व पाईनघाटांत कुमकेस आलिया खर्चास मागूं नये. देशांत व हिंदुस्थानांत बोलाविलिया सरकारांतून थोडें बहुत खर्चास देत जाऊं. कलम १.

४ सरकारचे सरदार व मुत्सद्दी व वकील यांचा बहुमान उत्तमप्रकारें करावा. कलम १.

५ बादशाहाचें आमचें विरुद्ध आहे. तर त्यांचे कुमक न करितां सरकारांत सामील होऊन, जें समान लागेल तें आणून जंजिरा घेऊन द्यावा. कलम १.

६ सदर्हू यादीप्रमाणें तुमचा करार ठरल्याउपरांतिक सरकारची फौज घांटमाथां येतांच दहशतीनें इंग्रेजाचे फौजेचा वेढा उठेल. अगर इतकियांतच तुमचीं जहाजें विलायतेहून आलीं तरी वेढा उठेल. तऱ्ही कराराप्रमाणें तुह्मीं निर्वाह करून द्यावें. कलम १.

७ सरकारचे मुखालिफ व दुश्मन जे कोणी असतील, त्यांस तुह्मीं आसरा देऊं नये. कलम १.

८ घांटमाथां येतांच सदर्हु करारमदार याची यादीवर मुसे लाली याची मोहर व मुसे लवाली याचे दस्कतनसीं आणून द्यावी. घांट उतरल्यानंतर चंदीच्या किल्ल्यांत आमचें ठाणें दाखल करवूं. तूर्त नक्त पांच लाख रुपयांची टीप देऊन निशा करून, सात कुमसलेवाले पैकीं एक जण मातबर येऊन घेऊन जावें. चंदीस मुसे लाली खुद्द व दिलावरजंग येऊन भेटून, पुढें जे मनसुबा करावयाचा तो करावा. कलम १.

९ नक्त बारा लक्ष रुपये द्यावे. पैकीं तूर्त पांच लक्ष रुपये द्यावे. ते साहुकारी निशा करून द्यावी. बाकी सात लक्ष रु॥ राहिले, ते चौ चौ महिनीयां दो वायद्यांनीं द्यावे. कलम १.

१० तूर्त फरासिसांचा कुंपनी तालुका जो मुलूख आहे त्यापैकीं, व ऐइंदा इंग्रेजाकडून जे ठाणीं व मुलूख व किले सुटतील त्यांपैकीं, निमे मुलूख व ठाणीं व किले सरकारांत द्यावे. सदर्हु सरकारचे वांटणींत चंदी व त्रिपती व चंद्रगिरी वगैरे देवस्थानें असतील, तें सरकारचे जिमेंत द्यावें.

११ राजश्री विसाजी कृष्ण व हरी गोपाळ यांसी ज्याफत एक लक्ष रुपये साहुकारी निशा करून द्यावी. कलम १.

१२ बंदरचा तोफा जिन्नस सरकारांत पसंद पडे ऐसा व दहाबारा तोफा पंचरसी चांगल्या व हत्ती पांच व घोडे पांच श्रीमंतांचे पसंद पडे ऐसे द्यावें. कलम १.

१३ तुमची कुमक केली तेव्हां इंग्रेजांसीं बिघाड जाला. ऐसियास इंग्रेज एखादे समयीं सरकारच्या किल्ल्यास अगर मुलखास उपद्रव करतील, तर तुह्मीं सर्व सामान-सुद्धां मदत येऊन, खर्चास न मागतां त्याचें पारिपत्य करावें. पुढेंही इमानेंइतबारें येखलासेंकडून वर्तत जावें. ह्मणजे सरकारांतून तुमचें बरें केलें जाईल. कलम १.

१४ लढाईत घोडीं पडतील तें व दंगादुंगा जालिया घोडीं पडतील तें द्यावें. कलम १.

१५ तुह्मीं आह्मीं मिळोन दुसमनाचें पारिपत्य करून मोडलियां, त्यासमयीं जे लूट सांपडेल त्यापैकीं निमें तुह्मीं व निमें आह्मीं वांटून घ्यावी. एखादे वेळेस आह्मी दुसरेकडे तंबी करणेंबद्दल गेलों, त्या समयीं मुखालिफाकडील लूट तुमच्या हातास-लागलियां, त्यापैकीं निमे आह्मांस व निमे तुह्मांस. कलम १.

एकूण पंधरा कलमें लिहिलीं असेत. छ ७ सफर ( मोर्तब सुद ).

※ ※ ※

## ४. सुभेदार मल्हारराव होळकर ह्यांच्या मुलाचें लग्न.

सुभेदार मल्हारराव होळकर ह्यांस खंडेराव ह्या नांवाचा एकुलता एक मुलगा होता. तो कुंभेरच्या वेढ्यांत तोफेचा गोळा लागून मृत्यु पावला. ह्याची पत्नी ती सुप्रसिद्ध साध्वी इंदूरची महाराणी अहिल्याबाई होळकर ही होय. खंडेरावाचे लग्नाची निमंत्रणपत्रिका आह्मांस उपलब्ध झाली आहे. ती येणेंप्रमाणें:—

श्री

"राजश्री लक्ष्मण शंकर कमाविसदार प्रगणे बासवाडा गोसावी यांसीं:—

अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य स्नेहांकित मलारजी होळकर दंडवत विनंति उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लेखन करणें. ह्यानंतर चिरंजीव राजश्री खंडेराऊ ह्याच्या लग्नाची तीथ ज्येष्ठ शुद्ध ७ सुरंजेस कर्तव्य निश्चय जाला आहे. तरी आपण येऊन लग्नमंडप शोभिवंत करावा. रवाना चंद्र २१ मोहरम हे विनंति."

मोर्तब सुद.

※ ※ ※

## ५. इ. स. १७७१ सालांतील सातारा येथील बाजार निरख.

### गल्ला कैली बारोली मापें.

ő।.। गहूं दर रुपयास ३। पायली.
ő।.।≈ गहूं बारीक ३। पायली २ चिपटीं.
ő।. हरभरे ३ पायली.
ő।१॥।≈ बाजरी मोठी ४॥। पायली २ चिपटीं.
ő।२ बाजरी बारीक ५ पायली.
ő।२।≈ जोरी शाळू उत्तम ५। पायली २ चिपटीं.
ő।२॥ जोरी मध्यम ५॥ पायली.
ő।२॥≈ जोरी कनिष्ट ५॥ पायली २ चिपटीं.
ő।.॥ तांदुळ बोडके ३॥ पायली.
ő।.।≈ तांदुळ बोडके सडीक ३। पायली २ चिपटीं.
ő।. तांदुळ ल्व्हे ३ पायली.
ő।.। तांदुळ ल्व्हे ३। पायली.
ő।. तांदुळ कुसळे ३ पायली.
ő।. तांदुळ काळे भात करळ ३ पायली.
őő२॥। तांदुळ काळे भात करळ चांगली २॥। पायली.
őő२॥ तांदुळ बारीक सडीक २॥ पायली.
őő२॥ तांदुळ जिरगे २॥ पायली.
őő२॥। तांदुळ जिरगे कोंकण २॥।पायली.
ő।१ उडीद ४ पायली.
őő२॥ मूग २॥ पायली.
őő२॥।≈ दाळ तुरीची २॥। पायली २ चिपटीं.
ő।१ तुरी ४ पायली.
őő२। डाळ हरबऱ्याची २। पायली.
őő२ तीळ गोडे २ पायली.
ő।२ कर्डी ५ पायली.
ő।. तीळ काळे ३ पायली.
őő२॥ तीळ बावरे २॥ पायली.
őő२॥। मसुरा २॥। पायली.
ő।. वाटाणे ३ पायली.
ő॥२॥ मीठ ८॥ पायली.
ő॥२ जागली ८ पायली.
ő।.॥। तांदुळ कोंकणी ३॥। पायली.
ő।२ तांदुळ पटणीचे ५ पायली.
őő२॥ मोहरी २॥ पायली.
őő२ मेथी २ पायली.
ő।.॥। कोथिंबीर ( धणे ) ३॥। पायली.
ő॥. पावटे ६ पायली.
ő॥.१ राळे ७ पायली.

### वजन पक्कें.

ő॥१ खासी कणीक २१ शेर.
ő।२ कणीक खर्ची १२ शेर.
ő॥. पीठ ज्वारीचें २० शेर.
ő।९ पीठ बाजरीचें १९ शेर.
őő२॥ साखर सफेत २॥ शेर.
őő२॥। साखर चिनी २॥। शेर.
őő३। साखर लाल ३। शेर.
őő१।९ साखर खडी १। शेर ९ टाक.
őő१॥। साखर खडी १॥। शेर.
őő२॥। सुपारी चिकणी २॥। शेर.
őő३।९ सुपारी मोठी ३। शेर ९ टाक.
őő४।. मेखडी ४। शेर.
őő४। काथ पांढरा ४। शेर.
ő।. काथ इमारतीचा १० शेर.
őő६ गोंद इमारतीचा ६ शेर.
őő५। गोंद चांगला ५। शेर.
őő१। शेंदूर १। शेर.
őő१॥। मेण १॥। शेर.

८८२॥ चंदन अव्वल २॥ शेर.

८८३।९ चंदन मध्यम ३। शेर ९ टाक.

८८४।· चंदन कनिष्ठ ४। शेर.

८८२ रक्त चंदन २ शेर.

८८३।९ गुलाल उत्तम ३। शेर ९ टाक.

८८३॥।· गुलाल कनिष्ठ ३॥। शेर.

८८१॥·१३॥ तूप १॥ शेर १३॥ टाक.

८८१॥। तूप मध्यम १॥। शेर.

८८२॥२ तेल २॥ शेर २ टाक.

८८२॥१३॥ तेल कनिष्ठ २॥ शेर
१३॥ टाक.

८८२॥। खोबरें बारीक २॥। शेर.

८८३।९ खोबरें मोठें ३। शेर ९ टाक.

८८६॥ खारीक ६॥ शेर.

८८७ खजूर ७ शेर.

८८४। हळद ४। शेर.

८८२॥ जिरें उत्तम २॥ शेर.

८८३।९ जिरें कनिष्ठ ३। शेर ९ टाक.

८८१॥ मिरें १॥ शेर.

८८४। तंबाकू बिनकाडीची ४। शेर.

८८६ तंबाकू मध्यम ६ शेर.

८८८ तंबाकू कनिष्ठ ८ शेर.

८८८ खासा गूळ ८ शेर.

८८९ गूळ खर्ची ९ शेर.

८८१ हिंग अव्वल ३॥। रुपये शेर.

८८१ हिंग मध्यम ३८≈ ,, ,,

८८१ हिंग कनिष्ठ २॥ ,, ,,

८८१ अफू अव्वल ४ ,, ,,

८८१ अफू कनिष्ठ ३ ,, ,,

८८१ अफू कनिष्ठ २ ,, ,,

८८१॥ द्राक्ष उत्तम रुपयाला १॥ शेर.

८८२॥ द्राक्ष कनिष्ठ २॥ शेर.

८८३।९ कापूस उत्तम ३। शेर ९ टाक.

८८३॥ कापूस कनिष्ठ ३॥ शेर.

८८४। काथा मोठा ४। शेर.

८८८ सुंदा ८ शेर.

८८१ अफू मिश्री १०

८८१॥। सुतळी बारीक.

८८३।९ सुतळी मोठी ३। शेर ९ टाक.

८८६ ताग ६ शेर.

८८७ अबू ७ शेर.

८८६।· अंबसोल.

८८७ अंबसोल काळें.

८८७ चिंच.

१००० पिकलेलीं पानें एका रुपयास.

१५०० पिकलेलीं पानें मध्यम १ रुपयास.

५००० देटीं पानें ,, ,,

६००० देटीं पानें कनिष्ठ ,, ,,

१०० नारळ ६ रुपयास.

१०० कनिष्ठ नारळ ३॥ रुपयास.

८३ पेंड १ रुपयास ३ मण.

## गोरस जिन्नस

८८१२ दूध थानाखालील १ रुपयास
१२ शेर

८८४ दूध का १४ शेर.

८८१२ दंही हंडी १२ शेर.

८८१४ दही कनिष्ठ १४ शेर.

८८४॥ लोणी गांवकरी ४॥ शेर.

८८४॥। लोणी बाजारी ४॥। शेर.

८८१५ कनिष्ठ दही १५ शेर.

## कागद.

गोवई रीम ४ रुपये.

गोवई रीम ३॥ रुपये.

गोवई रीम ३ रुपये.

गोवई रीम २॥।≈ ,,

गोवई रीम २॥

खर्ची गडी दर रुपयास १ गड्डी.

दवलताबादी गड्डी १ रुपये १०

दवलताबादी गड्डी एक रुपये ८
दवलताबादी १ गड्डी ६ रुपये.
दवलताबादी ,, ४॥ ,,
दवलताबादी ,, ४ ,,
दवलताबादी ,, ३॥ ,,

**लोणारी जिन्नस वजन मण पक्के**

बारीक तोडीचीं लांकडें ४॥ रु. खंडी.
नवी तोडीचीं लांकडें ४ रु. ,,
मोठ्या तोडीचीं ,, ३॥ रु. खंडी.
सकलाद गज ३।॥ रुपये.
,, सुलतानी गज ३।॥ रुपये.
,, नारजी गज २।॥ रुपये.
,, जसुदी गज २८= ,,
,, लाखी गज २ ,,

**तरकारी जिन्नस वजन टक्के**

मिरच्या अर्धामण दर रुपयास.
वांगी एकमण ,,
घेवडा एकमण ,,
कारलीं १२॥ शेर ,,
रताळीं १।२ मण ,,
पांढरा भोंपळा पावमण ६ शेर.
पांढरा भोंपळा अर्धामण ६ शेर.
गाजरें ३ मण.
भेंड्या ३ मण.
पोकळा ३ मण.
मेथी ३ मण.
चाकवत ३ मण.
मेथी ३॥ मण १ रुपयास.
पोकळा ३॥ मण ,,
चाकवत ३॥ मण.
कांदे ३॥ मण.
लसूण पावमण.
मुळे ३ मण.
२५० लिंबें पिकलेलीं १ रुपयास.
३०० कचीं लिंबें ,,
१२५ केळीं पिकलेलीं.
१५० कळीं कचीं.
१२५ पेरू मोठे.
२९० पेरू लहान.
१२५ कवठें.
३०० इड.
२५० मेथी.
२५० पोकळा.
२५० चाकवत.
३०० मेथी दर रुपयास.
३०० पोकळा.
३०० चाकवत.
२५० मुळे.
६४ कांदे.
६४ लसूण.

* * *

## ६. थोरल्या माधवरावांची धर्मसंबंधीं समदृष्टि.

थोरले माधवराव पेशवे ह्यांच्या ठिकाणीं सत्यप्रियता, स्पष्टवक्तेपणा, स्वाभिमान, सदाचारसंपन्नता इत्यादि अनेक गुण ज्याप्रमाणें वसत होते, त्याप्रमाणें सर्व धर्मांविषयीं समदृष्टि हा गुणही चांगल्या रीतीनें वसत होता. हिंदु व मुसलमान ह्या दोन्ही धर्मांतील प्रजेस ते ज्याप्रमाणें प्रेमभावानें वागवीत होते, त्याप्रमाणें ते ख्रिस्ती लोकांसही वागवीत असत. त्याबद्दलचीं पत्रें त्यांच्या रोजनिशींतून येथें दिलीं आहेत, तीं वाचनीय आहेतः—

लेखांक १. २ जून इ. स. १७६३.

"पाद्री फेल्वाद्र फिरंगी वैद्य यांनीं हुजूर कसबे पुणें येथील मुक्कामीं येऊन अर्ज केला कीं, आपला देव माजरदेस मामले रेवदंडा येथें आहे. तेथें देवाजवळ बागायत वाडी पादरी माजरदेस आहे. ते साहेबीं कृपाळू होऊन देवाकडे नूतन इनाम करार करून देऊन, भोगवटीयासी सनद करून दिली पाहिजे ह्मणोन. त्याजवरून पादरी-मजकूर याचा अर्ज खातरेस आणून, त्याजवर कृपाळू होऊन, मामलेमजकुरीं माजरदेस देवाजवळ बागायत वाडी पादरी माजरदेस आहे, त्याची मोजणी जमीन बिघे तपशीलवार.

८१८२ देवळाचे दक्षिणेकडील वाडी.
८॥३।· देवळाचे उत्तरेकडील वाडी.
८।१॥।· देवळाचे पूर्वेकडील खराब जमीन माळवे करावयाची.
८२८२

एकून दोन बिघे दोन पांड जमिनीपैकीं, बागायत पावणेदोन बिघे पाव पांड व खराब जमीन पाव बिघा पावणेदोनपांड येणेंप्रमाणें जमीन वाडी पेस्तरसाल सन खमस सितैन पासून इनाम करार करून देऊन, हे सनद तुह्मांस सादर केली असे. तरी सदरहू जमिनीचा आकार होईल तो पेस्तर सालापासून सालदरसाल देवाकडे इनामखर्च लिहित जाणें. दरसाल ताजे सनदेचा उजूर न करणें. या सनदेची प्रति लेहून घेऊन, हे अस्सल सनद पादरीमजकूर यांजवळ भोगवटियास परतोन देणें, ह्मणोन महादाजी रघुनाथ कमाविसदार जंजिरे रेवदंडा यांस सनद १."

लेखांक २. ता. ३१ आक्टोबर इ. स. १७६५.

"पादरी फेलपाद्र माजरदेस यांनीं हुजूर विदित केलें कीं, रेवदंडा येथें आपली देवी आहे. तिचा उत्साह नवरात्र होतो. त्यास शेवटचे दिवशीं तोफेचा एक बार करावयाचा हुकूम आहे. त्यास साहेबीं मेहरबान होऊन जाजती दोन बार करावयाची आज्ञा केली पाहिजे ह्मणोन. त्याजवरून हे सनद सादर केली असे. तरी यांचे देवीचा उत्साह नवरात्र जाहलियावर शेवटच्या दिवशीं तोफेचे बार १ पेशजीचे सनदेप्रमाणें व २ जाजती सालमजकुरापासून एकूण तीन बार तोफेचे करावयासी आज्ञा केली असे. तरी जंजिरे रेवदंडा येथील तोफेचे सदरहूप्रमाणें तीन बार करणें ह्मणोन महा-दाजी रघुनाथ यांस सनद १."

लेखांक ३. २० सप्टंबर इ. स. १७६७.

"मोरोजी शिंदे नामजाद जंजिरे रेवदंडा यांचे नांवें सनद कीं, जंजिरेमजकूर येथें पाद्री बिगार यांचें सेंटचे देवालय आहे. त्यांत देव नाहीं. देवालय मोडकळीस आलें आहे, ह्मणोन हुजूर विदित जाहलें. त्यास हल्लीं त्या देवालयाचीं लांकडें सिनोर पाद्री फेलपाद्र माजरदेश यास माजरदेशचे देवालयास लांकडें देविलीं असते. तरी पाद्री

बिगार याचे सेंटचे देवालयांत देव नसलियास, देवालय मोडकळीस आलें असिल्यास, बरोत वगैरे लांकडें असतील तीं, सिनोर पाद्री फेलपाद्र माजरदेश यांजकडे देऊन पावलियाचें कबज घेणें ह्मणोन. सनद १."

लेखांक ४. २ नोव्हेंबर इ. स. १७७१.

"पाद्री फेलपाद्र माजरदेस हे आपले देवाचें देवालय मौजे कोरलई येथें बांधणार. त्यास रेवदंड्याचे किल्ल्यांत सात आठ देवळें मोडलीं आहेत, त्यांचे दगड खांबाचे वगैरे देवळास लागतील तें देणें ह्मणून, आनंदराव शिंदे किल्ले रेवदंडा यांस सनद १."

❀ ❀ ❀

## ७. पेशव्यांचे तहनामे.

पेशव्यांचे अस्सल तहनामे व करारमदारांच्या यादी जवाहीरखान्यांत ठेवण्याची चाल होती, असें दिसून येतें. त्यावरून मूल्यवान् रत्नांप्रमाणेंच किंबहुना त्याहूनही अधिक अशी ह्या कागदपत्रांची किंमत समजण्यांत येत असे, हें स्पष्ट आहे. ता. १८ मार्च इ. स. १७९६ चें पुढील टिपण आह्मांस उपलब्ध झालें आहे. त्यावरून पेशव्यांचे तहनामे हे पेशव्यांच्या दप्तरांत नसून जवाहीरखान्यांत होते, असें दिसून येतें.

श्री.

"यादी इंग्रजांकडील तहनामे जवाहिरखान्यांत ठेवावयास दिल्हे ते. चंद्र ८ रमजान सन सीत तिसैन मया व अलफ. शके १७१७ राक्षस नाम संवत्सरे फाल्गुन शुद्ध १० भृगुवासरे. कागद. सुमार.

२ सन इसन्ने सितैनांत जाहले त्याच्या नकला.

१ सनसीत सबैन चंद्र १० मोहरम मुकाम पुरंदर."

३

❀ ❀ ❀

## ८. इंग्रजांचे वकील मि० मॉस्टीन यांचें पुण्यास आगमन.

इंग्रजांचे वकील मि० मॉस्टीन हे इ. स. १७७७ मध्यें पुण्यास पेशव्यांच्या दरबारांत इंग्रजांचे वतीनें तह करण्यासाठीं आले. या वेळीं पेशव्यांच्या गादीवर श्रीमंत सवाई माधवराव हे अल्पवयी पेशवे असून, ते पुरंधरच्या किल्ल्यावर राहात असत व पेशवाईचा राज्यकारभार त्यांचें प्रधानमंडळ तेथूनच करीत असे. अर्थात् ज्या वेळीं मि० मॉस्टीन हे तहाची वाटाघाट करण्यासाठीं पुण्यास आले, त्या वेळीं प्रधानमंडळीचा हेतु, त्यांनीं पुण्यास न राहतां एकदम पुरंधरास जावें, असा होता. परंतु वकिलांनीं आग्रह धरला कीं, पुण्यास जाऊन नंतर पुरंधरास येईन. तेव्हां पेशव्यांचे कारभारी नाना फडणवीस ह्यांनीं त्यांस पुण्यास

उतरण्यास अनुमोदन दिलें; परंतु त्यानें पुण्यास जाऊन एक दिवस रहावें व कोणाशीं भेटूं नये व बोलूं नये, अशी अट घातली. ह्या संबंधाचें एक मनोरंजक पत्र बहिरो रघुनाथ मेहंदळे यांनीं लिहिलेलें उपलब्ध झालें आहे. तें येथें देण्यासारखें आहेः—

**श्री.**		ता. १७ मार्च इ. स. १७७७.

"सेवेसीं बहिरो रघुनाथ मु॥ बेलापूर कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ १४ सफरपर्यंत क्षेम असे. विशेषः—छ ११ सफरचें आज्ञापत्र पाठविलें तें पावलें. लेखनाज्ञा कळली. मोष्टीन इंग्रजानें पुण्यास जाऊं नये, परभारें पुरंधरास यावें, ह्मणोन सरकारची मर्जी. परंतु त्याचा आग्रह पुण्यास सर्व सरंजाम ठेवून सडे पुरंधरास जावें. हें प्रथम बोलण्यांतही आणिलें होतें. त्यास, फारच त्याचें मानस असल्यास, पुण्यास जाऊन, सरंजाम ठेऊन, एक मुक्काम करोन, सडा होऊन पुरंधरास येणार असल्यास विनंति आइकावी. पुण्यास जाऊन एक दिवस राहिला, तरी कोणास भेटों नये, कोणासीं बोलों नये, येविसीं सूचना पहिली मीं त्यासीं बोललों आहें, व पुनः राजश्री गंगाधर रघुनाथ यांस येविसीं आज्ञापत्र पाठवावें, ह्मणजे ते त्यास सूचना युक्तीनें करतील व तेही त्याजजवळच आहेत. यांत जसी मर्जी असेल तसें उत्तर गंगाधरपंतास ल्याहावें. डेरे वगैरे सामान कांहीं मोष्टीनबराबर आहेच. कांहीं लागल्यास द्यावयाची आज्ञा व्हावी. थोडेसे मुदारतीनें त्यांस बहुमान केल्याचा संतोष आहे. ह्मणोन त्याचे बोलण्यांत आल्यावरोन विनंति लिहिली होती. गंगाधरपंत त्याजवळच गडाखालीं राहतील. राहुव्या वगैरे जासूद माणसें विनंति लिहितील ती देवावी. दुसरा कारकून गंगाधरपंताबराबर दिल्हा आहे, व मुंबईसही बातमीस शाहणा कारकून ठेविला आहे. कळावें, वरकड मजकूर पुरवणीपत्रावरून विदित होईल. श्रुत होय हे विज्ञापना."

❧ ❧ ❧

## ९. हिंमतबहादर गोसावी व महादजी शिंदे ह्यांचें भांडण.

मराठ्यांच्या इतिहासामध्यें, कलहाचें बीजारोपण करून मराठी राजसत्तेच्या विनाशास कारणभूत होणारे जे कित्येक उपद्व्यापी, स्वार्थपटु आणि कृष्णकारस्थानी असे पुरुष प्रसिद्ध होऊन गेले, त्यांमध्यें अनुपगीर हिंमतबहादर गोसावी हा एक होय. अनुपगीर हा जातीचा गोसावी असून, त्यानें गोसावी लोकांचें पुष्कळ सैन्य जमवून अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला याचे पदरीं प्रथम नोकरी धरली, व आपल्या शौर्यपराक्रमानें उदयास येऊन तो एक मोठा लष्करी सरदार बनला. तो इ. स. १७६३ च्या बक्सार येथील लढाईत हजर होता. तेथें सुजाउद्दौल्याचा पराभव झाल्यानंतर तो बुंदेलखंडांत शिरला, आणि संधि साधेल तेथें धामधूम करून तो लवकरच चांगला प्रसिद्धीस आला. महादजी शिंदे यांनीं गुलाम कादराचा

पराभव करून दिल्ली येथें आपलें वर्चस्व स्थापन केलें, त्या वेळीं हा इसम दिल्लीच्या राजकारणांत असून, तो अनेक कारस्थानें खेळवीत होता. त्यास दिल्लीचा नामधारी व दुर्बल बादशाहा शहाअलम याजकडून "राजा हिंमत-बहादर" असा एके वेळीं किताब मिळाला होता. त्यावरून त्याचें नांव हिंमत-बहादर असें प्रचारांत आलें व तेंच मराठी कागदपत्रांत आढळून येतें. ह्या हिंमतबहादर गोसाव्यानें महादजी शिंदे ह्यांस दगा करण्याचे अनेक प्रयत्न केले. त्यानें एके वेळीं महादजी शिंद्यांच्या जिवास अपघात करण्यासाठीं कांहीं बिकट मंत्रप्रयोग केले, तेणेंकरून त्यांना असाध्य दुखणें प्राप्त होऊन फार यातना झाल्या. तेव्हां पाटिलबोवांनीं थोर थोर ज्योतिषी जमवून त्याची पृच्छा केली. तेव्हां त्यांना हिंमतबहादर गोसाव्यानें मंत्रप्रयोग केल्याचें आढळून आलें. पुढें पाटिलबोवांनीं हिंमतबहादरास कैद करून आणण्याची आपल्या सरदा-रांस आज्ञा केली. परंतु त्यानें शिंद्यांच्या सरदारांस भूलथाप देऊन, अलीबहादराच्या लष्करांत जाऊन पेशव्यांच्या जरीपटक्याचा आश्रय केला, आणि अलीबहादराचें अभयवचन घेतलें. ही गोष्ट महादजी शिंदे ह्यांस कळली. तेव्हां त्यांना अतिशय राग येऊन त्यांचें व अलीबहादर ह्यांचें वैमनस्य आलें. ह्या संबंधाची सविस्तर हकीकत आपाजी राम दाभोळकर यांच्या एका पत्रांत दाखल आहे. ती येणेंप्रमाणेंः—

पै॥ छ ६ जिल्हेज तीसेन. **श्री.**

"सेवेसीं आपाजी राम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजेः— इकडील दर-बारी वर्तमान तर, राजश्री पाटिलबावांचे शरीरीं बहुतच समाधान नव्हतें. या दुखण्यांत पुनर्जन्म जाहला, व प्रयत्नही आरोग्यतेविशीं फार केला. परंतु गुणास कांहीं पडेना. तेव्हां थोर थोर ज्योतिषी वगैरे मंडळी यांच्या विचारें ठरलें कीं, शरीरास इतके उपाय करीत असतां गुण पडत नाहीं; तेव्हां हा शारीरिक रोग नव्हे. कोणी प्रयोगा-दिक केलें आहे. हाच सिद्धांत सर्वांचे अनुमतें जाहला. तेव्हां अनुष्ठानास ब्राह्मण-ही घातले. तेव्हां आरोग्यता होऊन थोडेसे शरीरास आराम वाटों लागले. तेव्हां याचा शोध बारकाईनें करितां जैपुरवाल्यांनीं अनुष्ठानास ब्राह्मण घालून हा प्रयोग नेहमीं चालविला आहे, आणि येथेंही हल्लीं हिंमतबहादर आला आहे. त्यांणींही अनुष्ठानाचा प्रयोग मुख्यास समाधान नसावें याजकरितां केला आहे. जेव्हां ही गोष्ट प्रसिद्धीस आली, तेव्हां याची चौकसी करावयासीं राजश्री अलीबहादर याजकडील कारभारी व राजश्री शिवाजी विठ्ठल बापू व राजश्री गोपाळराव त्रिंबक यांजकडील कारभारी ऐसे त्रिवर्गास बोलावून नेऊन सांगितलें कीं, ही गोष्ट खरी किंवा खोटी याची पुर्तेपणें चौकशी करून आम्हांस सांगणें. मग त्याप्रमाणें बंदोबस्त करावयासी येईल. ह्मणून

राजश्री पाटिलबावांनीं सांगितलें व आपले घरचे मुतसद्दी यांजलाही सांगितलें कीं, त्रिवर्गाकडील कारभारी व तुह्मीं एकत्र बसोन याचा सिद्धांत करावा; ह्मणजे त्याप्रमाणें बंदोबस्त केला जाईल. त्याजवरून सर्वत्रांनीं एक जागा बैठक करून, या गोष्टीचा शोध व चौकशी बहुत केली. तेथें सर्वांचे विचारें ठरलें कीं, हिंमतबहादर गोसावी याणें अनुष्ठानास ब्राह्मण घालून प्रयोग केला खरा, ही गोष्ट सर्वांचे मुखें ठरली. नंतर राजश्री पाटिलबावांस सांगितलें कीं, हिंमतबहादर गोसावी याणें प्रयोग केला खरा. तरी येविशींचा बंदोबस्त अविलंबें व्हावा. त्याजवरून राजश्री रायाजी पाटील व राजश्री लखबादादा आगऱ्यास होते, ते या उभयतांस गोसावी यांजला धरून आणावयाकरितां पाठविले. त्यास हे उभयतां तयार होऊन त्याजकडे जात आहेत, तों, त्याची बातमी अगोदर दरबारांत होतीच त्याजमुळें, हिंमतबहादर आपले आपण सावध होऊन आपले डेऱ्यांत शें दोनशें खाशांनशीं तयार होऊन बसला. तों इतक्यांत हे उभयतां जाऊन पोंहचले. तेव्हां त्यानें तितक्यांतच जलदी करून घोड्यावर स्वार होऊन बाहेर निघाला, आणि ह्मणों लागला कीं, मी राजश्री पाटीलबावांकडे जातों. ऐसें ह्मणोन बाजारचे आघाडीपावेतों ते व हे उभयतां मिळोन आले, आणि तेथून जलदी करून राजश्री अलीबहादर यांचे डेऱ्यास चालला. तेव्हां या उभयतांनीं त्याजला मनाही केलें. परंतु तो तसाच रेटाई करून डेऱ्यांत जाऊन बसला. आणि ह्मणूं लागला कीं, "श्रीमंतांच्या जरीपटक्याजवळ आलों. आतां माझे अंगीं मुद्दा शाबुद करावा. नंतर जें करणें तें करावें." तेव्हां सारीच मसलत विलग पडली. नंतर राजश्री अलीबहादर यांणीं गोसावी याजला धरून कैद करून राजश्री पाटिलबावांचे स्वाधीन करावा, तरी लौकिकास ठीक पडेना. यास्तव पाटिलबावांस सांगोन पाठविलें कीं, हिंमतबहादर गोसावी याजला इकडे येऊं न देतां परभारें आपले तेथें न्यावा. तो अर्थ घडलाच नाहीं. असो. हल्लीं गोसावी येथें बसला आहे. आपल्यास कळेल त्याप्रमाणें बंदोबस्त करून न्यावा. त्याजवर पाटिलबावांचें उत्तर जालें कीं, "तो चोर आमचा आहे, तो आमचा आह्मांकडे पाठवून द्यावा; अगर त्यानें आमचे डेऱ्यास यावें. मग जो विचार करणें तो करूं." याप्रमाणें परस्परें बोलणीं जालीं. त्याजवर पुन्हां अलीबहादर बोलिले कीं, "आपला चोर आहे तो घेऊन जावा. आह्मी येविशीं आडथळा करीत नाहीं." त्याजवरून मुख्यास दुराग्रह पडून, फौज तयार करावी आणि हिंमतबाहदर यांस धरून कैद करावें, ही मसलत ठरावून, चार हजार स्वार तयार करवून, गोसावी यांजकडे अलीबहादर यांचे गोटांत पाठविलें. त्यांस ते स्वार समग्र तीन च्यार दिवस त्यांचेच गोटाभोंवते चौकी देऊन होते. परंतु हिंमतबहादर गोसावी तिळमात्र डगमगला नाहीं. हल्ला करावी तर अलीबहादर याचे लष्करांत गर्दी होऊन लष्कर उठलें जाईल, या अर्थी हल्ल्याचाही उपाय न चाले. याप्रमाणें तीन च्यार रोज घालमेल जाहली. तत्रापि कोणताही जाबसाल शेवटास गेला नाहीं. आणि याचे लष्करांत मात्र उगाच दंगा! तेव्हां अलीबहादरबावा

यांणीं राजश्री सदाशिवपंत आसवलकर यांचे पुत्र बळवंतराव व राजश्री आपाजीपंत दामले व राजश्री भिकोबा पाळंदे या त्रिवर्गास राजश्री पाटिलबावांकडे बोलावयासी पाठविलें कीं, "हिंमतबहादर आमचे लष्करांत येऊन आज तीन च्यार दिवस जाहले, अद्याप त्याजला नेत नाहीं, आणि कांहीं तोडही पाडीत नाहीं. तेव्हां आह्मीं पुढें कोणता विच्यार करावा. यास्तव त्याजला कांहीं वचन कथन देऊन मोडून टाकावा, अगर आपले मर्जीस येईल, त्याजप्रमाणें करावें. परंतु याउपर बैदा नसावा. त्यास हे त्रिवर्ग तेथें जाऊन वर लिहिल्या अन्वयें बोलले. त्याजवरून राजश्री पाटिलबावांनीं उत्तर केलें कीं, 'तुह्मीं तोड पाडून टाकावें. त्याजवर पुन्हां हे त्रिवर्ग बोलले कीं, त्याजला वचन कथन देऊन तोड कोणते प्रकारें पाडावी, त्याची आज्ञा व्हावी. तत्रापि मुख्यांनीं उघडून सांगितलें नाहीं. मोघमच जाबसाल केले, व यादही थोडीशी ठरावून घेतली. परंतु जाबसाल निश्चयाचा ठरोन निर्णय जाहला नाहीं. शेवटीं, भिकोबा पाळंदे बोलले कीं, "आह्मांस तोड पाडावी ह्मणोन आज्ञा होते, त्यास उत्तम आहे. परंतु आपलेकडील दोन गृहस्थ चांगले द्यावे. ह्मणजे ते व आह्मी मिळोन, गोसावी यांस वचन कथन देऊन, जाबसाल कोणते तोडीवर येतो, तें पाहूं." त्याजवर बावांनीं मान्य करून, राजश्री रायाजी पाटील व राजश्री कृष्णोबाबा चिटणीस यांस आज्ञा केली कीं, "तुह्मीं या त्रिवर्गाबरोबर जाऊन जाबसाल कोणते रंगावर येतो तें पहावें." इतकें मुख्याचें बोलणें जाल्यावर हे त्रिवर्ग आपले गोटांत जाऊं लागले. ते समयीं रायाजी पाटील व कृष्णोबाबा चिटणीस यांजला समागमें घेऊन जावें. तें न होतां आपण निघोन गेले, आणि या उभयतांस न्यावयाकरितां राजश्री विठ्ठल हरी वकील यांजला तेथें ठेविलें. त्यास हे त्रिवर्ग आपले गोटांत पोंहचले नाहींत, तों इतक्यांत हेही उभयतां तेथें गेलें. तों हे त्रिवर्ग आपआपले राहुटीस गेले. हे आल्यावर त्यांणीं बैठक करून एखादा जाबसाल निर्णयांत आणावा, तो प्रकार न घडतां हे आपले गोटांत फिरोन माघारे आले. नंतर मुख्यास सांगितलें कीं, आपले आज्ञेप्रमाणें गेलों, परंतु तेथें बैठक होऊन जाबसाल एकही जाहला नाहीं. त्याजवर तों जाबसाल तसाच राहिला. मागाहून अल्लीबहादर यांणीं बावाकडे सांगोन पाठविलें कीं, "आह्मीं हिंमतबहादर यांजला वचन कथन दिलें कीं, तुजला पाटिलबावांचे हातीं देत नाहीं. परंतु तुझी दौलत येथें जितकी असेल ती झाडोन आह्मांजवळ आणोन द्यावी, आणि मुलांमाणसांसुद्धां आमचे कैदेंत राहणें." त्याजवरून गोसावी याणें मान्य करून उत्तर केलें कीं, "मी आपले कैदेंत राहतों परंतु माझी चौकशी पुर्तेपणें करावी. जर करतां मजकडे दोषच आला, तर जितकी माझी दौलत आहे ती आपण सरकारांत लावणें, आणि मजला कैदेंत ठेवणें." याप्रमाणें जाबसाल ठरण्यांत आला. ह्मणोन निरोप जातांच पाटिलबावांची मर्जी बहुतच खट्टी होऊन, मनस्वी भाषणें होऊं लागलीं; आणि सर्वांजवळ बोलूं लागले कीं, अल्लीबहादर यांजकडील कारभारी येऊन बोलले कीं, "गोसावी याची तोड अद्याप पडत नाहीं. त्या अर्थी त्याजला कांहीं वचन कथन देऊन बैदा जाहला आहे

तो मोडून टाकावा. अथवा आपलेकडील दोन गृहस्थ चांगले द्यावे, ह्मणजे ते आह्मी मिळोन एखादा जाबसाल तोडीवर आणून बंदा मोडून टाकावा. त्याजवरून रायाजी पाटील व कृष्णोबा चिटणीस यांजला पाठविलें असतां, त्यांचे विद्यमानें जाबसाल न होतां, त्यांणींच आपले जागा गोसावी यांस वचन कथन काय ह्मणोन दिल्हें ? ऐसें म्हणोन मुख्याची मर्जी बहुतच खट्टी जाहली. सारांश, येथील मुख्याचें ह्मणणें कीं, आमचा चोर आह्मांकडे पाठवून द्यावा, तरच ठीक आहे. आणि अलीबहादर याचें ह्मणणें कीं, "गोसावी आमचे डेऱ्यास चालोन आला, या अर्थी आह्मीं कसा द्यावा ? त्यांत प्रथम आला तेव्हांच आह्मीं सांगोन पाठविलें कीं, चोर आपला घेऊन जावा. तेव्हां आपली आज्ञा जाहली कीं, त्याची तोड तुह्मीं पाडणें. त्याजवरून आह्मीं त्याजला सदरहूअन्वयें वचन कथन देऊन जाबसाल ठरण्यांत आणिला. त्या अर्थी आह्मी आतां हातीं देत नाहीं." ऐसें हें बोलतात, आणि त्याचा तर हा दुराग्रह आहे. तेव्हां याचा परिणाम पुढें कैसा होईल तें पाहावें. परंतु विचार पहातां ही गोष्ट लौकर निर्गमांत आली तरच बरें आहे. नाहीं तर दुराग्रहामुळें काय होईल हें नकळे? असो. होईल वर्तमान तें सविस्तर वरचेवर लिहीत जाईन. सारांश लिहिणें हेंच कीं, गोसावी याचें इतकें प्रकर्ण जाहलें. परंतु मजला तिळमात्र ठाऊक नव्हतें. शेवटीं वाद प्रतिवाद होऊं लागले, तेव्हां मुख्यांनीं आपले परी सांगितलें व अलीबहादर यांणींही आपले परी सांगितलें, व बाह्यात्कारीही थोडथोडें ऐकिलें. परंतु आंतील पक्कें कच्चें यथास्थित समजण्यांत आलें नाहीं. परंतु जें वर्तमान लहान मोठें आढळलें, तें सेवेसीं लिहिलें आहे. येविशींचें वर्तमान तेही लिहितील, त्यावरून श्रुत होईल. वरकड मी बोलण्यांत किमपि नाहीं. यास्तव जें वर्तमान लिहिलें आहे, तें स्वामींनींच ध्यानांत धरून ठेवावें. केवळ याच लिहिण्यावर षट्कर्ण न व्हावें. मागाहून विस्तारें लिहून पाठवीन. राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांच्या व राजश्री पाटिलबावांच्या भेटी श्रावण शुद्ध दशमीस होणार आहेत. भेटी जाहल्यानंतर जें वर्तमान होईल तें मागाहून सेवेसीं लिहून पाठवीन. राजश्री नारो गणेश येथें लष्करांत येऊन आज पांच सात दिवस जाले. प्रथम राजश्री आबा चिटणीस सुभेदारांकडे पाठविले होते. त्यांचें त्यांचें बोलणें ठरोन मग पुढें नारो गणेश आले. मागाहून ते येणार. सेवेसीं कळावें ह्मणोन विनंतिपत्र लिहिलें आहे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

हिंमतबहादर गोसावी ह्याचें व महादजी शिंदे यांचें भांडण बरेंच दिवस पुढें चालू होतें. अलीबहादरानें हिंमतबहादराचा पक्ष बरेच दिवस धरिला होता. अखेर अलीबहादरानें बुंदेलखंडावर स्वारी केली व तो प्रांत जिंकून घेतला, त्या वेळीं हिंमतबहादर त्याच्याबरोबर तिकडे गेला. तेथें त्याचें प्रस्थ विशेष माजून तो पुढें अलीबहादराचा गळ्यांतील ताईत बनला. बुंदेलखंडावर मराठ्यांचें स्वामित्व संस्थापित होऊन अलीबहादर त्या प्रांताचा मुख्य अधिपति

झाल्यावर हिंमतबहादरचें महत्त्व विशेषच वाढलें. तें इतकें कीं, अलीबहादर मेल्यानंतर बुंदेलखंडांतील मराठ्यांची सत्ता नष्ट करून तेथें ब्रिटिश अंमल स्थापण्यासाठीं इंग्रज लोकांनाही त्याजबरोबर तह करून त्यास जहागीर द्यावी लागली. हिंमतबहादर हा इ. स. १८०४ मध्यें मृत्यु पावला.



## १०. शिवाजी विठ्ठल विंचूरकर यांचें एक महत्त्वाचें पत्र.

इ. स. १७७८ मध्यें महादजी शिंद्यांच्या मध्यस्थीनें नाना फडणविसांनीं राघोबादादा पेशवे यांस बुंदेलखंडांत जहागीर देण्याचें कबूल करून त्यांस झांशी येथें ठेवण्याचा घाट घातला, आणि त्याप्रमाणें राघोबादादांची स्वारी बुंदेलखंडांत जाण्यासाठीं नर्मदातीरापर्यंत हरी बाबाजीच्या फौजेसह जाऊन दाखल झाली. परंतु राघोबादादांनीं हरी बाबाजीसीं दगा करून, महेश्वर येथून पळ काढिला, आणि ते भडोच येथें इंग्रजांस मिळण्यासाठीं निघून गेले. ह्या समयीं शिवाजी विठ्ठल विंचूरकर बऱ्हाणपुरच्या रोखें सैन्यासह होते. त्यास नानांनीं ही हकीकत कळवून दादासाहेबांचा पाठलाग करण्याबद्दल सुचविलें. शिवाजी विठ्ठलांनीं नाना फडणविसांस या प्रसंगीं जें पत्र लिहिलें आहे तें फार महत्त्वाचें असून, त्यांत स्पष्टपणें नानांनीं राजकारणाची जी चूक केली, तिचा उल्लेख केला आहे. शिवाजी विठ्ठल नानांस लिहितात—"आपण राज्यांतील खुळें मोडून चांगलाच बंदोबस्त केला. परंतु श्रीमंतांची रवानगी झांसी प्रांतीं केली येविसींची दुरंदेशीं ध्यानांत आणिली नाहीं. दूर देशीं पाठवून बंदोबस्त होय सारिखा असता तरी, कै० रावसाहेबांस सन्निध बाळगावयाचें कारण काय होतें? तत्रापि आपण रवानगी केली, परंतु एका आळ्यांतील पांच सात हजार फौज समागमें देऊन, श्रीमंतांजवळील तोफा व पलटणें हुजूर ठेवून, इकडे पुरतेपणीं रवानगी करावयाची होती." नानांची ही चूक स्पष्टपणें पत्रद्वारें कळविणारे शिवाजी विठ्ठलासारखे बाणेदार सरदार क्वचित्‌च सांपडतात. असो. शिवाजी विठ्ठलांचें हें संपूर्ण पत्र आह्मी येथें सादर करतों.

**श्री.**

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य शिवाजी विठ्ठल कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील कुशल तागाईत चंद्र २४ माहे जमादिलावलपावेतों आपले कृपेंकरून यथास्थित असे. विशेषः—कृपा करून चंद्र ११ जमादिलावलचें पत्र पाठविलें, तें चंद्र २३ मिनहूस पावलें. पत्रीं लिहिलें कीं, "श्रीमंत राजश्री दादासाहेबांस झांशीकडे रवाना बराबर राजश्री हरी-

बावाजी फौजसुद्धां होते. त्यास नर्मदा उतरतेसमयीं दगा करून कैद केलें, त्यामुळें फौजेचा विसकट जाहला. याउपर स्वतंत्रपणें सुरतेस इंग्रजांस मिळावयास जातील, अथवा हिंदुस्थानांत जावयाचा प्रकार करतील. त्यास आपण फौजसुद्धां तयार होऊन पिच्छावर पोहोंचोन हस्तगत व्हावयाचा उद्योग केलाच असेल" ह्मणून विस्तारेंकरून पत्रीं लिहिलें. ऐसीयासी श्रीमंत दादासाहेब बराणपुरच्या मुक्कामीं आल्यानंतर सरकारचें पत्र व राजश्री पाटिलबावांचें पत्र आलें कीं, तुह्मांकडील हजार राऊत बराणपुरचे सुमारें पाठवावे ऐसीं पत्रें आलीं. परंतु फौज जवळ नव्हती. राजश्री खंडेराव हरी रातगडवाल्यांचे खंडणीकरितां घेऊन गेले होते. पत्र येतांच सांडणीस्वार फौज माघारीं आणावयासी पाठविला.........................फौज आल्यानंतर निकडीनें जाऊन हरीपंतास सामील व्हावें, इतक्यांत हजेरीचे कारकून राजश्री सिदो महादेव सरकारचें पत्र घेऊन आले. तेव्हां हजेरी दिल्याशिवाय जावें तरी तिकडूनही सरकारचा शब्द, ऐसें जाणोन एक दो रोजांत हजेरीचा गुंता उरकून, चि. रावजीची रवानगी फौजेसुद्धां मजल दरमजल केली. इंदूरच्या सुमारें गेले. पुढें एका दो रोजीं गांठ घालावी, तों महेश्वरीहून बातमी आली कीं, श्रीमंतांनीं हरिपंतास दगा करून कैद केलें आणि नर्मदेच्या दक्षणतीरानें मजल दरमजल बारी उतरून सुरतेकडे चालले. याप्रमाणें बातमीचीं पत्रें आलीं. दुसरें श्रीमंत बारीचे पलीकडे उतरून गेल्यावर भिल्लांनीं बारी बंद केली. फुटकळ हजार बाराशें स्वार श्रीमंतांचे मागें गेले होते. तेही बारीपासोन फिरोन माघारे आले. याप्रमाणें श्रीमंत दगा देऊन गेले. नाहीं तरी गांठ पडल्यावर सरकारसेवेंत किमपि अंतर होणार नाहीं. येविसीं आपण खातरजमा असों द्यावी. आपण राज्यांतील खूळ मोडून चांगलाच बंदोबस्त केला, परंतु श्रीमंतांची रवानगी ह्मांशी प्रांतीं केली, ऐविसींची दुरंदेशी ध्यानांत आणिली नाहीं. दूर देसीं पाठवून बंदोबस्त होय सारिखा असता, तरी कैलासवासी रावसाहेबांस सन्निध बाळगावयाचें कारण काय होतें? तत्रापि आपण रवानगी केली. परंतु एका आळ्यांतील पांच सात हजार फौज समागमें देऊन श्रीमंतांजवळील तोफा व पलटणें हुजूर ठेवून, इकडे पुर्तेपणीं रवानगी करावयाची होती. असो, होणार भविष्य चुकत नाहीं. आणि श्रीमंत गेल्यानेंही विशेष व्हावयाचें तें काय? आज चार वर्षें बाहेर देशीं त्याग करून गेले, त्याचा शेवट जाहला, आपले ध्यानांतच आहे. विस्तारें लिहावें असें नाहीं. श्रीमंत रावसाहेब दैववान् आहेत. त्यांजपुढें दुसरीयाचें किमपिही चालणार नाहीं. इंग्रज एक वेळ फजीत पावोन गेले आहेत. फिरोन मसलतीची आंगेजणी करतील ऐसें दिसत नाहीं. याजउपर काय होईल तें पाहावें. चि॥ रावजी व चिमणाजीपंत फौजसुद्धां उज्जनीनजीक मुक्काम करून आहेत. अखरीचे दिवस. लोकांचा गवगवा पडला आहे. रोजमरीयासी ठिकाण नाहीं! पुढें जशी आपली आज्ञा येईल तसें करूं. सरकारचाकरीस किमपि अंतर होणार नाहीं. सरंजामापैकीं एक उमरपाडावर भिस्त आहे. परंतु सध्यां हें अरिष्ट तिकडे गेलें आहे. काय परिणाम होईल तो पाहावा. देशचे माहालची लावणी व्हावयाची कठिण

# इतिहाससंग्रह.



धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥



**संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.**

**पुस्तक ४ थें.] नोव्हेंबर, डिसेंबर १९११–जानेवारी १९१२. [अंक ४।५।६.**

## विषयानुक्रम.





**मुंबई येथें**

**तुकाराम जावजी ह्यांनीं**

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु.

फुटकळ अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# पंडित काशीराज ह्यानें दिलेला पानिपतच्या लढाईचा नकाशा.

( स्पष्टीकरणासह. )




## नकाशाचें स्पष्टीकरण.

A **पानिपतः**-मराठ्यांच्या सैन्याचा तळ.

१ इब्राहिमखान गारदी
२ दमाजी गाईकवाड.
३ विठ्ठल शिवदेव.
४ सदाशिवराव भाऊ व विश्वासराव.
५ यशवंतराव पवार.
६ समशेर बहादूर.
७ मल्हारराव होळकर
८ जनकोजी शिंदे.

---

B दुराणी लष्कर.
C अहमदशाहाचा डेरा
१ बरखोरदार खान.
२ अमीर बेग.
३ दुंडीखान.
४ हफीज रहिमतखान
५ अहमदखान बंगल.
६ बादशाही वजीर.
७ सुजा उद्दौला.
८ नजीब उद्दौला.
९ शहापसंद खान.
१० इराणी बरकंदाज.

# जुन्या ऐतिहासिक गोष्टी.

## भाग ३ रा.

### १. काशीराज पंडित.

काशीराज पंडित हा लखनौचा नबाब सुजाउद्दौला याचा वकील होता. हा जातीचा मराठा ब्राह्मण असून, सुराजउद्दौल्याचा बाप व दिल्लीच्या बादशाहाचा वजीर जो सफदरजंग त्याच्या पदरीं प्रथम नोकरीस राहिला. सफदरजंग हा मराठ्यांचा पुरस्कर्ता व चाहता असल्यामुळें त्यानें बरेच मराठे लोक आपल्या पदरीं ठेविले होते. सफदरजंग हा इ. स. १७५४ मध्यें मृत्यु पावला. त्याची कबर दिल्ली येथें प्रसिद्ध आहे. पंडित काशीराज याजवर सफदरजंगाची विशेष मेहेरबानी असल्यामुळें नबाब सुजाउद्दौला यानें त्यास आपल्या बापाच्या वेळचा जुना व माहितगार माणूस समजून, त्यास आपल्या दरबारांत वकिलातीचें काम दिलें. पंडित काशीराज याची सुजाउद्दौल्याच्या दरबारांत चांगली प्रतिष्ठा व वजन असे, व सुजाउद्दौला मोठमोठ्या राजकारणांत त्याची सल्लामसलत घेत असे. इ. स. १७६१ मध्यें पानिपत येथें जें मराठ्यांचें व दुराणी यांचें घनघोर युद्ध झालें, त्या वेळीं सुजाउद्दौला दुराण्यांच्या बाजूनें रणभूमीवर हजर होता. त्या वेळीं त्याच्या लष्करांत पंडित काशीराज हा हजर असून, तो त्या वेळच्या राजकारणांत गढलेला असे. पंडित काशीराज यानें या बिकट प्रसंगीं मराठ्यांस जितकें साह्य करणें शक्य होतें, तितकें मोठ्या युक्तीनें व शहाणपणानें करण्याचा प्रयत्न केला. परंतु मराठ्यांवर या वेळीं दुर्धर प्रसंग गुदरून पानिपतच्या रणसंग्रामामध्यें त्यांस सर्वस्वी अपयश आलें; व त्यांचे मुख्य सेनापति श्रीमंत भाऊसाहेब व श्रीमंत विश्वासराव पेशवे हे आणि दुसरे अनेक मराठे सरदार रणभूमीवर पतन पावले. श्रीमंत भाऊसाहेब व विश्वासराव यांचीं प्रेतें पंडित काशीराज यानें शोधून काढून, त्यांस त्यानें चंदनादि काष्ठें जमवून अग्नि दिला व त्यांची उत्तरक्रिया हिंदुधर्माप्रमाणें उत्तम प्रकारें केली. त्यामुळें पंडित काशीराजाचे मराठ्यांवर अनंत उपकार झाले आहेत.

पंडित काशीराजानें पानिपतच्या लढाईचा फारशी भाषेमध्यें एक सविस्तर वृत्तांत लिहिला आहे. तो अतिशय महत्वाचा असून, त्याचें इंग्रजी भाषांतर जेम्स ब्राऊन नामक एका विद्वान् युरोपियन गृहस्थानें इ.स. १७९१ मध्यें "एशियाटिक रिसर्चेस"

ह्या ग्रंथांत प्रसिद्ध केलें आहे. तें इतिहासदृष्टीनें अतिशय उपयुक्त व महत्त्वाचें आहे. या वृत्तांतामध्यें पंडित काशीराज यानें, सुजाउद्दौल्याच्या मार्फत, अहमदशहा अबदाली याजकडून परवानगी घेऊन, सदाशिवराव भाऊ, संताजी वाघ आणि विश्वासराव यांच्या प्रेतांस अग्निसंस्कार केल्याचा उल्लेख केला आहे. याप्रसंगीं दुराणी लोक शत्रूच्या प्रेतास हिंदुधर्माप्रमाणें अग्निसंस्कार करूं देणार नाहींत, ह्मणून पंडित काशीराज यानें राजा अनुपगीर व शहाचे वीस खास नोकर मुद्दाम मदतीसाठीं घेतले होते. त्याप्रमाणें त्यानें अहमदशहा व नबाब सुजाउद्दौला यांच्या सैन्याच्या मध्यभागीं हीं प्रेतें नेऊन व यमुनेमध्यें त्यांस स्नान घालून, चंदनादि काष्ठें, सुगंधी द्रव्यें ह्यांसह त्यांचें दहन केलें. याबद्दलचा उल्लेख इंग्रजी भाषांतरामध्यें पुढें लिहिल्याप्रमाणें आहेः—

"The Shah, in compliment to Shuja-ul-Dowlah, gave orders that these two bodies, to-gether with the body of Biswas Row, should be burnt, according to the custom of their castes; and sent twenty of his Nesuckchees to attend, and prevent the Durranies from giving any interruption to the ceremony. His Excellency gave the bodies in charge to me, and told me that I was of the same country and tribe, and therefore, he desired that I would burn them with the proper ceremonials; and he sent Rajah Anupgheer with the Nesuckchees to attend me. Accordingly I carried them to a spot between the Shah's camp and the Nawab's, and, having washed them with Ganges water, and perfumed them with sandal wood, I burnt them".

पंडित काशीराज यानें लिहिलेल्या पानिपतच्या वृत्तांतांमध्यें, श्रीमंत भाऊसाहेब व विश्वासराव यांचीं प्रेतें शोधून काढून त्यांस अग्निसंस्कार केला ह्मणून जी हकीकत दिली आहे, ती त्या वेळीं लिहिलेल्या खुद्द काशीराज पंडित ह्याच्या मराठी पत्रावरूनही अगदीं सत्य व विश्वसनीय आहे, असें दिसून येतें. पंडित काशीराज ह्यानें ता० ३ मार्च इ. स. १७६१ रोजीं लिहिलेलें पुढील पत्र रा. राजवाडे ह्यांनीं 'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' भाग ६ ह्यामध्यें प्रसिद्ध केलें आहे. तें पंडित काशीराज ह्याच्या फारशी वृत्तांतांतील मजकुरास अगदीं बरोबर जुळतें. हें पत्र येणेंप्रमाणें:—

**श्रीसांबशिव.**

शके १६८२ माघ वद्य १२.

"राजश्रियाविराजित राजमान्य राजश्री त्रिंबकराव नाना स्वामींचे सेवेसीं:–पोष्य काशीराज शिव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति उपरी येथील क्षेम माघ बहुल १२

जाणून स्वकीय लेखनीं हर्षवीत जावें. विशेषः—बहुता दिवसांत कृपा करून पत्र पाठविलें, तें पाऊन लेखनाभिप्राय कळला. आनंद जाला. येथील वर्तमान तों आपणास कृतच आहे. श्रीमंत भाऊसाहेब व श्रीमंत रावजीचें साहित्य केलें ह्मणून लिहिलें. त्यास, कांहीं तों उभयलोकसाधन केलें. खेरीज, पुण्य कीं ऐसा योग जाला असतां चंदनादि संस्कार ब्राह्मणहस्तें जाला! आह्मी असतां न होय तर कोणे कार्यास यावें? आणिक सेवा न घडली! ईश्वरें हाच वांटा आह्मांस नेमिला होता! भगवतइच्छेस उपाय काय? गृहस्थ मंडळीचे साहित्यास लिहिलें. त्यास, आपणाकडील राजश्री सखोपंत व खंडोपंत वगैरे होते व आणीकही गृहस्थ मंडळी पांच चार शत व पांच सात हजार मनुष्यें आपलें सैन्याचीं होतीं. नबाबसाहेबास उत्तम प्रकारें विनंति करून, जें साहित्य व आपलें दास्य तें करून, फतुदाबादेपुढें जटवाड्याकडे मार्गस्त केलें. सुखरूप सेवेसीं पावलियां सविस्तर सांगतील. नबाबखानास या प्रसंगामुळें बहुत खेदावह जालें. परंतु उपाय काय? भगवत्सत्ता खरी. श्रीमंतांचा व नबाबसाहेबांचा स्नेह अविछिन्न अकृत्रिम आहे, तोच आहे. या कलेवरास पोष्यवर्गात जाणून सदैव कृपापत्रीं सांभाळ करीत जावा. बहुत काय लिहिणें, कृपालोभ असों दिजे. हे विनंति."



## २. गणेश वेदांती.

गणेश वेदांती हा अयोध्येचा नबाब सुजाउद्दौला याच्याजवळ मराठ्यांचे वतीनें वकिलीच्या कामावर होता. हा जातीचा महाराष्ट्र ब्राह्मण असून, त्याचे पूर्वज वेदांतविषयामध्यें निष्णात असल्यामुळें त्यांचें वेदांती असें नांव प्रसिद्धीस आलें. ह्यास पेशवे सरकाराकडून दरसाल बाराशें रुपयांची नेमणूक असे. हा पुरुष मोठा परोपकारी व दयार्द्रबुद्धीचा होता. हा आपली सर्व नेमणूक गोरगरीबांस अन्नदान देण्यांत खर्च करीत असे, त्यामुळें सुजाउद्दौल्याच्या लष्करांत त्याची एखाद्या महान् साधूप्रमाणें प्रसिद्धी असे. इ. स. १७६१ मध्यें पानिपत येथें मराठ्यांची व अबदालीची लढाई होऊन तींत श्रीमंत विश्वासराव आणि अनेक मराठे सरदार मारले गेले; त्या वेळीं त्यांची उत्तरक्रिया करण्याच्या कामीं ह्या परोपकारपटु पुरुषानें अपार परिश्रम केले आणि मोठमोठ्या मराठे वीरांच्या शवांस रणभूमीवरून उचलून आणून अग्निसंस्कार देण्याच्या कामीं काशीराज पंडित ह्यांस अतिशय मदत केली. श्रीमंत विश्वासराव पेशवे यांचें प्रेत शत्रूच्या हस्तगत झालें असतांही तें सुजाउद्दौल्याच्या मार्फत परत मिळवून, त्यानें चंदनादि काष्ठांनीं त्याचें विधिपूर्वक दहन केलें, आणि त्याच्या अस्थि ब्राह्मणाबरोबर भागीरथीमध्यें टाकण्याकरितां पाठवून दिल्या. तात्पर्य, मराठ्यांवर आलेल्या या अत्यंत दुर्धर व शोकप्रद प्रसंगीं काशीराज पंडित व गणेश वेदांती ह्या थोर पुरुषांनीं अतिशय

साहाय्य केलें. त्यामुळें त्यांचीं नांवें इतिहासांत अजरामर झालीं आहेत. गणेश वेदांती हा सुजाउद्दौल्याजवळ इ. स. १७६३ पर्यंत असल्याचा दाखला सांपडतो. पुढें त्यानें सर्व संसार सोडून देऊन काशीवास केला.

❧ ❧ ❧

## ३. माधवराव अनंत वेदांती.

हे गणेश वेदांती यांचे चुलत बंधू. हेही गणेश वेदांत्याप्रमाणें मोठे वेदांत-पारंगत व आत्मविद्या जाणणारे होते. हे गणेश वेदांती यांचे मागें बरींच वर्षें हयात होते. ह्यांनीं ता० २२ फेब्रुवारी इ. स. १७८३ रोजीं श्रीमंत सवाई माधवराव पेशवे यांस एक उपदेशपर पत्र लिहिलें आहे. तें अत्यंत वाचनीय असल्यावरून येथें सादर केलें आहेः—

श्री.

शके १७०४ माघ वद्य ५.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसींः—

पोष्य माधवराव अनंत वेदांती कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील वर्तमान ता॥ माघ वद्य ५ पर्यंत यथास्थित जाणोन स्वानंद वैभवपत्रीं लेखनाज्ञा करीत असलें पाहिजे. विशेषः–प्राचीन हिंदुधर्माचा लोप होऊन अपसव्याचें प्राबल्य जाहलें. त्यांणीं सर्व धर्म भ्रष्ट करून स्वधर्माचरणीं जनास लाऊन, वेदवेदांगप्रवृत्तीपासून परावृत्त होण्यामुळें ब्राह्मण्याचा लोप स्वधर्माचार राहिला. यास्तव भगवंतजीस संकट पडून, तदाश्रयीं हिंदुराजे कित्येक होते जाले; त्यांसही हितोपदेशकर्त्ते लोक निर्माण जाले. त्यांनीं नानाप्रकारें सांगून धर्मवांछा धरविली. परंतु जनाची प्रवृत्ती लावणें जालें नाहीं. जैपुरवाले यांनीं अश्वमेध केला. कोण्ही कांहीं, कोण्ही कांहीं, अशा प्रकारें चाललें. तें श्रीचे मनास न आलें. त्यावरून स्वतः अवतीर्ण जाल्याखेरीज दुर्मताचा नाश होणार नाहीं, जाणून बाबाजी भोंसले यांचे वंशीं मालोजी विठोजी राजे जाले. त्यांचे वंशीं साक्षात् भगवान विश्वेश्वर स्वयमेव आपण शिवशिवाजी राजे अवतीर्ण होऊन तुरुकाचा निःपात करून, हिंदुपति सिंहासनस्थ गागाभटप्रसादें जाहले. त्यांनीं एक ग्रंथ ब्राह्मणांनीं ह्मटला ह्मणजे मणभर धान्य व पांच रुपये रोख द्यावे. याप्रमाणें उत्तरोत्तर विशेषात्कारें दक्षिणा व धान्य देऊन विप्रकुलीचें संरक्षण केलें. धर्मवृद्धि पावविली. त्या अन्वयें दाभाडे सेनापति यांणीं पुण्यक्षेत्राचे ठायीं श्रावणमासीं धर्मदक्षणा देऊन दिवसेंदिवस लौकिक संपादिला. त्यांचा पराभव करून श्रीमंतीं वास्तव्य केल्यापासून सर्व गुणाचे ग्राहीक होऊन, दिगंत कीर्ति मिळवून, आसमुद्रान्त ध्वजारोपण केलें. धर्म, कलाकुशलता, वीर्यशौर्य, गीतनृत्यादि नानाप्रकारचे तर्क साधून, स्वामिसेवा करून, कुलोद्धारकता आपलाले वंशीं सर्वजनांनीं अवर्णनीय स्तुतिप्रद केल्यांनीं राज्याभ्यंतरीं सर्वांस मान्य असेच पुरुष होऊन प्रपंचीं इहपर उत्कृष्ट जालें. त्यास, वडिलोपार्जित

वागण्याच्या चाली कशा, त्यांणीं राज्य संपादलें कसें ह्मणाल तरीः– कोणत्याहि कर्मास प्रवृत्त होऊं नये. जालें असतां, त्यांत हानि होवो किंवा कांहीं घडो, परंतु ती मसलत शेवटास जाई तोंपर्यंत पिच्छा सोडूं नये. अशीं कर्मे कोणतीं ह्मणाल तरी पे॥ वसई घेण्याविशीं श्रीमंत थोरले चिमणाजी बल्लाळ आपासाहेब यांणीं साहास केला, तो काय लिहूं? तत्रापि ऐशीं हजार मनुष्यें लहान थोर सरकारकामीं आलीं. ऐसी जघन्य-कीर्ति वागती. ती वसई घेऊन फिरंगी यांस गोवें एक ठाणें ठेवून, संपूर्ण राज्यांतून काढून दिलें. तसेंच, सदाशिव चिमणाजी भाऊसाहेब पेशवे यांणीं दिल्लीपतीस स्पर्धा करून दिल्ली घेऊन, आपण सिंहासनस्थ होऊन, पुढें गिलच्यांवरी जाऊन, मोठे जवां-मर्दीनें लढाई दिली. त्या युद्धांत लक्षावधि मनुष्यें गारत जालीं. वरकड जीवजं-तूंची संख्या कोणीं धरली? परंतु पराभव जाल्यामुळें, हिंदुधर्माचा लोप व्हावा, असा प्रसंग प्राप्त जाला असतां, बाळाजी बल्लाळ नानासाहेब पेशवे यांणीं अभिमान धरून सरकारकामीं आले. त्यांचे घरीं लघुलघु लेंकरें राहिलीं! तीं गौरवसत्कार युक्त जाणोन, त्यांची मर्यादा ठेवून, अपरतारतम्य चित्तवित्तानिशीं अंतःकरण पुरवून वाढविलीं! हिंदु-स्थानांत राणोजी शिंदे व महादजी शिंदे यांस पाठवोन विदुरापासून सुयोधनाचा मानभंग जाला, तद्वत् उभयतां शिंदे यांणीं दिल्लीपतीसहित पादाक्रांत सर्व राजे लहानथोर करून पुण्यास राजधानी इंद्रभुवनवत् केली! ऐसे अभिमानी पुरुष! त्यांचे वंशीं आपण कीर्ति-मान् आहांत. त्यास, मागील इतिहासाचें कारण नसतां किंचित् लिहिणें बालबोधार्थ लागलें. आतां केलें तेंचि करावें; त्याकरितां मरोनी उरावें. उरले त्यांणीं मोडलें तेंच घडावें; हा धर्म मुख्यत्वें राजाचा. त्या राजांनीं स्वहित साधून परलोकीं योग्य व्हावें. त्या योग्यतेस श्रीहरिस्मरण अहर्निशीं असावें. तो साक्षेप कोणता ह्मणाल तरीः–नाना युक्ति प्रयुक्ति बोलणें; वादवेवाद जिंतणें; समयीं समर्पक उत्तर देणें; कलाकुशलता, हावभाव, नटनाट्य, कौतुक गीत, नृत्य, वीर्य, शौर्य, विवेक, शुचिष्मतता, लिहिणें, बेरीज तेरीज, शब्दशब्दांग, देशपरत्वें भाषा, विनोद, साहित्य जाणावें. बोलोन करून दाखवावें. ऐसे प्रकारें साक्षेपीं राहावें, व सेवक जनापासून लहान थोर अपराध जाला, तरी स्वामींनींच क्षमा केली पाहिजे. कारण, पदरचीं सर्व मनुष्यें जाणतीं असलीं तरी मूर्खत्व नाहींसें होईल. त्यास, मुळींच तो अज्ञान; त्यास नानाप्रकारें श्रम करून सज्ञानता आणली; तो कामाचें धोरण न जाणून चुकला; तेव्हां ज्या मनुष्यास या योग्यतेस सहस्रावधि द्रव्य खर्च केलें, तेव्हां तें मनुष्यसें जालें. तें मनुष्य तोडून आपले करितां प्राण देणारे. त्याजला अपराध सोडला नाहीं, तरी लक्षावधि मनुष्यांत सूज्ञ उत्पन्न होणार, तें मनुष्य दैववश प्राप्त जालें, तरी इतबारी वागणार क्वचित्! तेव्हां पृथ्वीपती जो त्यांनीं सर्वांचा संग्रह केला पाहिजे. त्याणीं त्याग केला तरी त्या मनुष्याचा निर्वाह कसा होईल आणि चाकरीचे सुज्ञ मनुष्यें कोठून मिळणार? याकरितां परंपरेचे कुलशीलाचे मनुष्य अज्ञान असलें तरी स्वामिसेवा जीवादारभ्य करील. सज्ञानी मनुष्य नाना प्रकारें आपला मतलब साधून सर्वस्वाचा पराचा नाश जाला तरी करील. त्याची प्रचीति हल्लीं सर्व राज्यांत तरी वागती. तिचा विस्तार कशास? सारांश, राजांनीं आधीं अंतःकरण जाणावें. ही कला त्यास असली

पाहिजे. जो परांचें अंतःकरण जाणील तोच राजा. राज्याधिकारास योग्य असा जो राजा त्यांणीं न्यायनीतीनें वर्तावें. आपपर तेथें मनांत न आणावें. वास्तविक असेल तेंच करावें. अन्यथा मार्गी लोकवार्तेवरी न जावें. समक्ष पाहिल्यावांचून न राहावें. अथवा निश्चयात्मकें शोधून पाहावें. मग जें सांगणें तें सांगावें. ज्या राज्यांत नीति बुडाली तें राज्य भ्रष्ट जालें ऐसें जाणावें. परंतु काळवेळ पाहावा. समय ओळखून चालावें. अधीरपणें नसावें. दुर्मदासी दूर ठेवावें. अपरिचितासी ओळखावें. दुरूनच बोलावें. उपाधीपासोन दूर असावें. उपाधींत न सांपडावें. लीनत्व पहिलेंच घ्यावें. मूर्खत्व सोडून द्यावें. दोष अवगुणातें झांकावें. दुर्जन दंडून सोडावे. दरिद्रियावरी उपकार करावे. अमित भाषण बोलावें. कोणतेही तऱ्हेतऱ्हेसी न जावें. कार्य करणें तेंचि करावें. अकार्यी मन न घालावें. होईल तेंचि करावें. न होण्याचें तें करण्याचा अभिमान धरूं नये. धरल्या होय, ऐसें साधन पाहावें. साधनीं फार न झटावें. दीर्घ प्रयत्न झाल्यास करावें. केलें कर्म न सोडावें. दुसरेयाचें अभीष्ट जाणावें. बहुत यत्नें करावें. न होय तरी नम्र असावें. दुःख कोणासही न द्यावें. अपार पाठांतर करावें. सदासर्वदा तत्पर ईश्वरचरणारविंदवत् स्वामिसेवेंत राहावें. शांति मनीं ठेवून वर्तावें. सत्क्रियेनीं चालावें. राजदंड उगाच न करावा. अपराधियासी दंडोन सोडावें. लोक पारखोन सोडावे. पुनः मेळवूनी घ्यावें. ऐशा नानाप्रकारच्या युक्ती बैसोन कोण्ही बोलती, परंतु प्रसंगीं नाना माघार घेती, ऐसें पुरुषीं न चालावें. सदासर्वदा स्वामिसेवा एकनिष्ठेनें करून कार्याकरितां श्रम करावे. श्रम करून कार्य करून घ्यावें. श्रम करितात त्यांस श्री अभयपूर्वक यश देतो, हा निश्चय मनीं सदृढ धरूनी चालावें. इहलोकीं भलेपणा मेळवून घेतला तर परलोकीं मुक्तीस गेला. हे निश्चयत्वें मनीं धरून वर्तत जावें. यांत श्रेयस्कर सर्वोपरी जाणावें. बहुत काय लिहिणें लोभ करीत जावा. हे विनंति."



## ४. सदाशिवराव भाऊ यांचा बनारस येथील तोतया.

श्री० सदाशिवराव भाऊसाहेब यांच्या नांवाचा जो तोतया महाराष्ट्राच्या इतिहासामध्यें प्रसिद्ध आहे व ज्यानें कोंकणकिनाऱ्यावर बंड करून पुण्याच्या दरबारास फार त्रास दिला व ज्यास कुलाबा येथें पकडून महादजी आणि रघुजी आंग्रे यांनीं इ. स. १७७६ मध्यें हत्तीच्या पायीं दिलें, त्याशिवाय उत्तर हिंदुस्थानांत बनारस येथें इ. स. १७७९–८० मध्यें एक दुसरा तोतया प्रसिद्धीस येऊन त्यानें बरेंच बंड माजविलें होतें. त्याची हकीगत येणेंप्रमाणें:—

इ. स. १७७९ मध्यें एक इसम, आपण भाऊसाहेब आहोंत, असें ह्मणून इटावा येथें आला; व तेथील सुप्रसिद्ध व्यापारी लाला बालगोविंद याजकडे जाऊन, भाऊसाहेबांची जुनी ओळख काढून, त्याच्या येथें राहिला. लाला बालगोविंद

हा भाऊसाहेबांचा परिचित असल्यामुळें या तोतयाचें रूपसादृश्य पाहून, त्यासही तो भाऊसाहेब असावा, असें भासलें. त्याचें वय, त्याची आकृती, आणि त्याच्या शरीरावरील कित्येक खुणा यांचें भाऊसाहेबांच्या शरीराशीं इतकें साम्य जुळलें कीं, लाला बालगोविंद अगदीं फसला; व त्यानें हा खरोखर भाऊसाहेब आहे असें समजून, त्यानें त्याचा फार आदरसत्कार केला. परंतु पुढें कांहीं दिवसांनीं त्यास असें दिसून आलें कीं, याचा स्वभाव व वागण्याची तऱ्हा भाऊसाहेबासारखी नाहीं. तेव्हां त्यास संशय येऊन, त्याची त्यानें विशेष विचारपूस केली. तेव्हां या लफंग्या गृहस्थानें त्याचें असें समाधान केलें कीं, "पानिपतची लढाई झाल्यानंतर मी जखमी होऊन कुमाउनच्या पहाडांत पळून गेलों व तेथें फकिराचा वेष घेऊन पांच वर्षेपर्यंत योगसाधन केलें. त्यामुळें माझ्या वागणुकींत व स्वभावांत अंतर पडलें असेल. नंतर मी कुमाऊनच्या पहाडांतून रोहिलखंडांत आलों व बैराग्याचा वेषानें फिरत फिरत येथें आलों आहें. आतां मला प्रसिद्धपणें भाऊसाहेब असें व्यक्त करावयाचें आहे. तर तूं मला सहाय्य कर." लाला बालगोविंद यानें त्यास असें कळविलें कीं, काशी येथें भाऊसाहेबांच्या परिचयाचे पुष्कळ मराठे ब्राह्मण आहेत. त्यांच्याकडे तुह्मी जा. ह्मणजे तुमची ओळख पटेल. त्याप्रमाणें तो इटाव्याहून चित्रकूटास गेला, आणि तेथून त्यानें मोरोजीभट्ट रामचंद्र कोटकर आणि गणेशभट्ट इत्यादिकांस बनारस येथें पत्रें लिहिलीं; व त्यांना भेटावयास बोलविलें. अर्थात् अशीं पत्रें जातांच मोरोजीभट्ट व धोंडोभट्ट हे तत्काळ चित्रकूटास आले. आणि त्यांनीं या तोतया भाऊसाहेबाची भेट घेतली. बाह्यचर्येवरून त्यांना हा खरोखरच भाऊसाहेब आहे असें वाटलें. परंतु या इसमानें पानिपतच्या लढाईस जाण्यापूर्वीं मी तुमच्याजवळ लाखों रुपयांची ठेव ठेविली आहे; ती माझी मला परत द्या, असें मागणें केलें. त्यामुळें या भिक्षुकमंडळीस हा कोणी लबाड मनुष्य आहे असें वाटून, त्यांनीं त्याचें बिंग बाहेर फोडिलें; व हा भाऊसाहेब नव्हे ह्मणून लोकांमध्यें जाहीर केलें. हें जेव्हां त्या तोतयास समजलें, तेव्हां त्यानें 'मी काशी येथें येऊन, तुमच्यावर हक्क सांगून माझी ठेव परत घेईन.' असा धाक घातला. अर्थात् गरीब बिचारे भिक्षुक, ती गोष्ट नाकबूल करून काशीस परत गेले. तदनंतर हे तोतये भाऊसाहेब स्वतः काशी येथें गेले, आणि तेथें त्यांनीं आपलें मोठें प्रस्थ माजविलें. या तोतयामध्यें भाऊसाहेबाच्या चेहऱ्याचें व शरीराचें इतकें साम्य होतें कीं, काशी येथेंही पुष्कळ लोकांस तो खरा भाऊसाहेब आहे असें वाटलें, व त्यांनीं त्याचा सन्मान करून, त्यास खर्चाकरितां द्रव्यही

दिलें. अशा प्रकारें काशी येथें त्याचें मोठें प्रस्थ वाढत जाऊन त्यानें पुष्कळ लोकांस ठकविलें व सावकार लोकांकडून पैसे घेऊन त्यानें हजार पांचशें सैन्यही जमविलें. तात्पर्य, थोड्या दिवसांत ह्या तोतया भाऊसाहेबांनीं पालखी घोडे वगैरे स्वारीचा थाट जमविला आणि गांवामध्यें मोठी चळवळ उत्पन्न केली.

या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीच्या तर्फें मि० टामस ग्रॅहाम या नांवाचे बनारस येथें रेसिडेंट होते. त्यांच्या कानापर्यंत ही तोतयाची चळवळ जाऊन पोंचली व त्यांनीं हा खरा भाऊसाहेब आहे कीं नाहीं, याची चौकशी चालू केली. याच-वेळीं एक गृहस्थ, या तोतयातर्फें काशीचा राजा चेतसिंग याच्याशीं गुप्त रीतीनें कारस्थानें करून व पैसे जमवून कांहीं कट करण्याचा प्रयत्न करीत होता. तेव्हां मि० ग्रॅहाम यांस भीति उत्पन्न होऊन, त्यांनीं चेतसिंग राजाची भेट घेतली व त्याच्या मदतीनें या तोतयास पकडून कैद करविलें. नंतर कांहीं दिवसपर्यंत हे खोटे भाऊसाहेब बनारस येथें बंदीवासांत होते. पुढें ग्रॅहाम यांनीं कलकत्ता-सरकाराशीं पत्रव्यवहार करून, त्यांच्या परवानगीनें या तोतयाची रवानगी चुनारगडच्या किल्ल्यावर केली, आणि त्याच्या खरेपणाबद्दल फार बारीक रीतीनें चौकशी चालविली. परंतु त्याचा बरोबर निकाल लागला नाहीं. पुढें मि० ग्रॅहाम यांची बदली मद्रास येथें सर अयरकूट यांच्या सेक्रेटरीच्या जागेवर झाली व ते तिकडे निघून गेले. पुढें हा दुर्दैवी इसम इ. स. १७८१ च्या आगष्ट-पर्यंत तसाच बंदिवासांत राहिला. नंतर हिंदुस्थानचे गव्हर्नरजनरल वॉरन हेस्टिंग्ज हे काशी येथें आले व तेथून चुनारगडास गेले. तेथें त्यांनीं या इसमाची सर्व हकीगत ऐकून घेतली आणि त्यास सोडून दिलें. पुढें तो काशी येथें परत आला आणि लौकरच मृत्यु पावला.





**तंजावरकर राजे.**

( साताराच्या राजवाड्यांत सांपडलेली तसबीर. )

होऊन, त्यांचे विचार अतिशय उदार आणि उदात्त असे झाले होते. त्यामुळें त्यांनीं पूर्वीच्या कित्येक अज्ञान व धर्मभोळ्या समजुती बाजूस ठेवून, आपल्या राज्यांत सामाजिक, धार्मिक आणि शिक्षणसंबंधीं पुष्कळ सुधारणा करण्याचा प्रयत्न केला होता. त्यांनीं हिंदु, मुसलमान व ख्रिश्चन ह्या सर्व जातींस समबुद्धीनें वागवून त्यांच्या प्रीत्यर्थ अनेक पाठशाला व विद्यालयें संस्थापित केलीं होतीं. ह्याप्रमाणें शिक्षणप्रसारार्थ व लोकहितार्थ सरफोजीराजे यांनीं अनेक प्रयत्न केल्यामुळें त्यांची कीर्ति दूरवर पसरून, मोठमोठे नामांकित विद्वान् लोक त्यांच्या भेटीसाठीं तंजावरास जात असत; आणि त्या सर्वांचा–मग ते नेटिव असोत अथवा युरोपियन असोत–त्यांच्या योग्यतेप्रमाणें सरफोजीराजांकडून योग्य सन्मान होत असे. सरफोजी राजांच्या भेटीचीं वर्णनें एतद्देशीय विद्वानांनीं लिहून ठेवल्याचें आढळून येत नाहीं; परंतु पाश्चात्य विद्वानांनीं मात्र तीं उत्कृष्ट रीतीनें लिहून आपल्या चरित्रग्रंथांत नमूद केलीं आहेत. तीं वाचून कोणासही या राजाविषयीं आदरबुद्धि उत्पन्न झाल्यावांचून राहणार नाहीं.*

* सरफोजी राजांबद्दल अनेक इंग्रजी ग्रंथकारांनीं आपल्या ग्रंथांत प्रशंसापर लेख लिहिले आहेत व ते सर्व वाचनीय आहेत. परंतु स्थलसंकोचामुळें ते सर्व येथें देणें शक्य नाहीं. सुप्रसिद्ध बिशप हिबर ह्यांनीं लिहिलेला एक लेख मात्र येथें देतो. तो येणेंप्रमाणें:—

"I have been passing the last four days in the society of a Hindu Prince, the Rajah of Tanjore, who quotes Fourcroy, Lauvisier, Linnœus and Buffon fluently, has formed a more accurate judgment of the poetical merits of Shakespeare's theme than that so felicitously expressed by Lord Byron, and has actually emitted English Poetry very superior indeed to Russian's epitaph on Shenstone, at the same time he that was much respected by the English Officers in his neighbourhood as a real good judge of a horse, and a cool, bold and deadly shot at a tiger. The truth is, that he is an extraordinary man, who having in early youth received such an education as old Swartz the celebrated Missionary could give him, has ever since continued in the midst of many disadvantages, to preserve his taste for, and extend his knowledge of, English literature, while he has never neglected the active exercise and frank soldierly bearing which became the descendent of the old Mahratta conquerors, and by which only, in the present state of things, he has it in his power to gratify the prejudices of his people, and prolong his popularity among them. Had he lived in the days of Hyder, he would have been a formidable ally or enemy, for he is, by the testimony of all in his neighbourhood, frugal, bold, popular and insinuating. At present, with less power than an English nobleman, he holds his head high, and appears contented, and the print of Bonaparte, which hangs in his library, is so neutralized by that of Lord Hastings, in full costume, that it can do no harm to anybody.

To finish the portrait of Maha Rajah Surfojee, I should tell you that he is a strong built and very handsome, middle-aged man, with eyes and nose like a fine hawk and very bushy gray mustaches, generally splendidly dressed, but with no effeminacy of ornament, and looking and talking more like a favourable specimen of a French General Officer, than any other object of comparison which occurs to me."

सरफोजी राजे यांची कीर्ति हिंदुस्थानांत प्रसृत झाली एवढेंच नव्हे, तर ती इंग्लंड देशापर्यंतही गेली. लंडन येथील रॉयल एशियाटिक सोसायटीनें सरफोजी-राजांची विद्वत्ता आणि संशोधनबुद्धि अवलोकन करून, त्यांस आपल्या संस्थेचे 'ऑनररी मेंबर' नेमिलें. हा बहुमान ह्यापूर्वी हिंदुस्थानांतील कोणाही संस्थानिकास मिळाला नव्हता. तो सरफोजीराजांस इ. स. १८२८ मध्यें प्राप्त झाला. ही तंजावरच्या राजघराण्यास आणि मराठ्यांच्या उच्च कुलास अत्यंत भूषणास्पद अशी गोष्ट घडून आली. ह्या वेळीं रॉयल एशियाटिक सोसायटीनें ह्या बहुमानाची सनद आणि अॅडमिरल लॉर्ड नेलसन यांचा एक पुतळा ह्या दोन वस्तू सरफोजी-राजांस तंजावर येथील ब्रिटिश रेसिडेंटच्या मार्फत नजर पाठविल्या. त्यांचा सरफोजीराजे ह्यांनीं अत्यंत आभारपूर्वक स्वीकार केला.*

* सरफोजी राजे ह्यांनीं रॉयल एशियाटिक सोसायटीच्या अध्यक्षास ह्या समयीं जें पत्र लिहिलें, तें उपलब्ध झालें आहे. ते येणेंप्रमाणें:—

To the Hon. Sir ALEXANDER JOHNSTON, Knt., &c. &c. &c.

"His Highness Chatterputty Rajashree Maharajah Surfojee Rajah Saheb, presents his

COMPLIMENTS.

Sir,

The letter which you did me the favour to write to me, together with the bust of the late Admiral Nelson, and the Diploma appointing me the first Honorary Member 'of the Royal Asiatic Society' of Great Britain, reached Tanjore in safety some time ago, and were delivered to me by the Resident. I must beg that the delay which has occured in acknowledging their arrival may not be considered as any proof that I am indifferent about such flattering marks of distinction; on the contrary, I request that you will assure both the Royal Asiatic Society and the Hon. Mrs. Damer, that I fully appreciate the compliment which they have respectively been pleased to pay to me.

I wish I could persuade myself that these compliments were well merited, but I am sensible that I am indebted for them to the partiality of your representations. It is true, indeed, that I have always taken great pleasure in endeavouring, by the establishment of Free Schools, and every other means in my power, to promote among my people the general diffusion of useful knowledge, and the study of such Arts and Sciences as I thought might be conducive to their temporal advantage or moral improvement, but it would be wrong to say, that from what little has been done, much good has already resulted. The character and manners of every people are necessarily, in some degree modified by circumstances, which, though certain in their result, are more or less slow in operation. In the present state of India, while knowledge is unprofitable, few can afford to become wise, or to devote themselves, whatever predilections may exist, to any parti-

सरफोजीराजे यांनीं आपल्या कारकीर्दीमध्यें अनेक तीर्थयात्रा व धार्मिक कृत्यें करून आपलें नांव अजरामर केलें. त्यांनीं तंजावर येथील बृहदीश्वराचे देवालयास अनेक देणग्या दिल्या. त्याचप्रमाणें गणपति, सुब्रह्मण्य इत्यादि देवालयें बांधिलीं, व कित्येक जुन्या देवळांचा जीर्णोद्धार केला. त्याचप्रमाणें, त्यांनीं कित्येक अन्नछत्रें घालून, तेथें विद्यार्थी व गरीब लोक यांस पात्रता पाहून अन्नदान देण्याची तजवीज केली. त्यांनीं आपली प्रियराणी मुक्तंबाबाईसाहेब ह्यांच्या नांवानें स्थापन केलेलें 'मुक्तंबापुरम् छत्रम्' हें तंजावरपासून चवदा मैलांवर अद्यापि चालू आहे.

सरफोजीराजे हे जसे विद्याप्रिय, दानशूर आणि रसिक होते, त्याप्रमाणें ते धर्मसुधारक आणि समाजसुधारकही असल्याचें आढळून येतें. ह्यांच्या संबंधानें अशी एक गोष्ट सांगतात कीं, ते काशीयात्रा व गयावर्जन करून जेव्हां तंजावरास आले, तेव्हां त्यांनीं काशीकर क्षेत्रस्थ ब्राह्मणांनीं शास्त्रार्थ सांगितल्याप्रमाणें रुप्याचें ब्रह्मांड खर्पर करून, त्यांत बसून, शास्त्रसंस्कार करून घेऊन, ब्राह्मणाची कन्या द्रव्य देऊन घेतली; आणि ती कन्या विद्वान् ब्राह्मणास आपण स्वतः कन्यादान करून अर्पण केली. हे स्वतः आपलीं सर्व धर्मकृत्यें वेदोक्त रीतीनें करीत असत. याप्रमाणें त्यांचें स्वधर्माकडे पूर्ण लक्ष असून, ते अन्य धर्माच्या लोकांसही समदृष्टीनें वागवून त्यांस पुष्कळ मदत करीत असत. तंजावर येथें मिशनरी

---

cular study or pursuit which does not hold out a fair prospect of a livelihood; but the British nation must, ere now, have seen enough of their Asiatic subjects to know that they are naturally clear-sighted to their own interests, and keen and persevering in the pursuit of them; they will therefore very readily cultivate such talents as are likely to find profitable and honourable employment, and better their actual condition in life, as well as enlighten their understandings. For a long time to come these two objects must of necessity go hand in hand; but concluding that a liberal and enlightened Government, anxious for the happiness and prosperity of its subjects, will not be sparing in the requisite incentives to laudable ambition and honourable exertion, I hope, it will be found that the moral and political improvement of the people, the development of useful talents and good qualities, and their progress in Literature, Science, and the Arts, will keep pace with the encouragement held out to them, and the confidence bestowed upon them by those rulers in whose hands Providence has placed their destiny.

I must again repeat my acknowledgements to your relation, the Hon. Mrs. Damer, who at so much personal trouble has sent me a very beautiful specimen of an elegent art; and I beg you will do me the favour to assure the Royal Asiatic Society that I trust their labours may tend to make Europeans and Asiatics better acquainted with each other, and be rewarded with the other benefits and advantages contemplated by its illustrious and enlightened founders. What can I say more?"

लोकांच्या ज्या अनेक धर्मसंस्था स्थापन झाल्या होत्या, त्यांस सरफोजीराजांची पूर्ण सहानुभूति असून, त्यांस त्यांजकडून चांगलें साहाय्य मिळत असे. मि० स्वार्ट्झ या स्वार्थत्यागी मिशनरी गृहस्थाबद्दल सरफोजीराजे यांच्या ठिकाणीं फार पूज्यबुद्धि असल्यामुळें त्यांनीं मिशनरीलोकांस विशेष मदत केली, व त्यांच्या करितां स्वतंत्र अनाथगृहें स्थापन केलीं, असें इंग्रजी ग्रंथावरून दिसून येतें.*

सरफोजीराजे हे आपल्या आयुष्याचें इतिकर्तव्य उत्तम प्रकारें बजावून व जगांत आपली सत्कीर्ति कायम ठेवून इ. स. १८३८ मध्यें कैलासवासी झाले. त्यांस मुक्तंबाबाईसाहेब आणि अहिल्याबाईसाहेब अशा दोन धर्मपत्न्या होत्या. त्यांपैकीं पहिली धर्मपत्नी अकालीं मृत्यु पावली. दुसरी धर्मपत्नी अहिल्याबाईसाहेब यांचे पोटीं तीन कन्या आणि एक पुत्र झाला. ह्या पुत्राचें नांव शिवाजी राजे हें असून ते सरफोजीराजे यांचे मागून तंजावरच्या गादीचे अधिपति झाले. त्यांची कारकीर्द पुढील भागांत येईल.

---

* रे० मि० कोलहॉफ यांनीं लिहिलेला पुढील लेख पहा:—

"His ( Sarfojee's ) tender regards for the memory of the late Reverend Mr. Swartz, induced him also to establish, in the adjacent village of Kunandigoodi, which is inhabited by a considerable number of Christians, a charitable institution for the education and support of fifty poor Christian children; thirty poor Christians are also maintained and clothed at the same munificent institution; and at a choultry near the fort of Tanjore, fifty poor, lame, and blind, and other real objects of charity, all belonging to the Mission are entirely supported by his bounteous hand. He has likewise given orders that his Christian servants, civil and military, should not be denied by their officers liberty to attend Divine service on Sundays and festival days, and that they should be excused from all other duty on such occasions."



**रे. स्वार्त्झ.**

(तंजावरच्या सरफोजी राजाचा मित्र व गुरु.)

# भाग बारावा.

## शिवाजी राजे यांची कारकीर्द.

[इ. स. १८३३ पासून इ. स १८५५ पर्यंत.]

सरफोजी राजे इ. स. १८३२ मध्यें मृत्यु पावल्यानंतर त्यांचे पुत्र शिवाजी राजे हे इ. स १८३२ च्या मार्चच्या १७ तारखेस तंजावरच्या गादीवर अधिष्ठित झाले. हे तंजावरच्या मराठे राजघराण्यांतील शेवटचे राजे होत. इ. स. १७९९ च्या तहाप्रमाणें तंजावर संस्थानाची सर्व सत्ता ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत गेल्यामुळें गादीवरील राजपुरुषास, स्वतःच्या खाजगी दौलतीशिवाय आणि मर्यादित अधिकाराशिवाय दुसरे राज्याधिकार मुळींच राहिले नव्हते. त्यामुळें शिवाजी राजे ह्यांस आपलें राजकारणपटुत्व किंवा बुद्धिकौशल्य व्यक्त करण्याचा फारसा प्रसंग आला नाहीं. त्यामुळें त्यांची सर्व कारकीर्द राजवैभवाचा उपभोग घेण्यांत व शानशौकतींत गेली. त्यांना ब्रिटिश सरकाराकडून १०,८०,९९३ रुपये दरसाल नेमणुकीबद्दल व तंजावरच्या वसुलाच्या पांचव्या हिश्शाबद्दल मिळत असत. आणि, राजे अमरसिंह यांच्या कुटुंबास ८७५०० रुपये नेमणूक मिळत असे. अर्थात् राजे शिवाजी यांस ऐषआरामास व सुखोपभोगास लागणारी सर्व अनुकूलता प्राप्त झाल्यामुळें त्यांनीं आपला काल चैनींत घालविला, असें ह्मटलें असतां अयथार्थ होणार नाहीं. राजे शिवाजी हे फार विलासी व सुस्वभावी राजपुरुष होते. त्यांचे वडील सरफोजी राजे ह्यांनीं त्यांना लहानपणापासून पुष्कळ चांगलें शिक्षण देण्याचा प्रयत्न केला होता, व त्यांना पुष्कळ प्रतिबंधांतही ठेविलें होतें. परंतु त्यांना आपल्या वडिलांप्रमाणें विद्येचा विशेष व्यासंग व अभिरुची लागली नाहीं. तथापि शिवाजी राजे हे मोठ्या मोकळ्या स्वभावाचे असून फार खर्चिक व उदार होते. त्यामुळें दक्षिण हिंदुस्थानांत त्यांचें नांव अतिशय प्रसिद्ध होऊन, त्यांना 'दानशूर कर्ण' अशी उपमा देत असत.

शिवाजी राजे हे ता २९ आक्टोबर इ. स. १८५५ रोजीं तंजावर येथें मृत्यु पावले. त्यांस औरस संतति नसल्यामुळें तंजावरचें राज्य त्या वेळचे हिंदुस्थानचे गव्हर्नरजनरल लॉर्ड डलहौसी ह्यांच्या कारकीर्दींत खालसा करण्यांत आलें. अशा रीतीनें इ. स. १८५५ मध्यें तंजावर येथील मराठी राजसत्तेची इतिश्री झाली.

शिवाजी राजे यांचीं लहानपणीं तीन लग्नें झालीं. त्या राण्या येणेंप्रमाणें:— सयदंबा बाईसाहेब, पद्मांबा बाईसाहेब आणि कामाक्षीअंबा बाईसाहेब. यांपैकीं पहिल्या दोन राण्या त्यांच्या हयातींत मृत्यु पावल्या, व तिसरी कामाक्षी अंबा-राणीसाहेब ही इ. स. १८९२ पर्यंत हयात होती. ह्या तीन राण्यांपैकीं सय-दंबाबाईसाहेब यांस दोन कन्या झाल्या. पुत्र मुळींच झाला नाहीं. ह्मणून शिवाजी राजे यांनीं आणखी सतरा लग्नें केलीं. त्यांपैकीं अकरा राण्या व सर्वांत वडील महाराणी कामाक्षी बाईसाहेब ह्या सर्व त्यांच्या मृत्यूनंतर पुष्कळ वर्षें जीवंत होत्या. ह्यांपैकीं कामाक्षीअंबा राणीसाहेब यांनीं तंजावरचें राज्य परत मिळविण्या-बद्दल पुष्कळ खटपट केली, व ईस्ट इंडिया कंपनीबरोबर खाजगी मिळकतीबद्दल वादही चालविला. त्याचा विशेष ह्मणण्यासारखा उपयोग झाला नाहीं. परंतु तंजावरच्या राजघराण्याची खासगी दौलत तंजावरच्या राण्यांकडे ठेवावी असें कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांनीं ठरविल्यामुळें तंजावरच्या राजघराण्याचें नांव अद्यापि कायम राहिलें आहे. कामाक्षीअंबा राणीसाहेब ह्या फार धार्मिक व उदार असून त्यांनीं तंजावर येथील देवालयाची व्यवस्था उत्कृष्ट रीतीनें ठेविली होती.*

शिवाजी राजे ह्यांस औरस पुत्रसंतति नसून फक्त दोन राजकन्या होत्या. त्या दोन्हीही कोल्हापूर येथील जुन्या मराठी राजघराण्यांपैकीं श्री० सखाराम रावसा-हेब मोहिते हंबीरराव यांस दिल्या होत्या. यांपैकीं पहिली राजकन्या अल्पवयांत मृत्यु पावल्यामुळें, दुसरी राजकन्या सखाराम रावसाहेब यांसच दिली होती. हिचें नांव विजयमोहना मुक्तंबा बाईसाहेब असें होतें. ब्रिटिश सरकारानें तंजावरच्या

---

* राणी कामाक्षी बाईसाहेब मृत्यु पावल्या त्या वेळीं मद्रासच्या 'हिंदू' पत्रामध्यें देवालयाच्या व्यवस्थेबद्दल पुढील लेख प्रसिद्ध झाला आहे: —

"° ° ° The deceased lady was brought up amidst the influence of by-gone times and not one of the class whom the present period of transition has made neither Hindus nor Atheists nor anything in particular. She had great faith in efficacy of worship in the temples and so deeply pious was she that if anything went wrong there, she would simply starve till she was assured that the wrong had been rectified. And the servants of the temple, loyal and old-fashioned as they are, could not brook to see their mistress once the Queen of a Kingdom, starve or otherwise unhappy. In this way the management has gone on satisfactorily, more satisfactorily in fact than most of the temples under the management of the Committees appointed by the Government has fared. Indeed, so efficient and so economical has the management been, that at the present moment after a good deal of rapairs have been effected in the temple buildings, a surplus of about half a lakh of rupees is on hand."

राजघराण्याचें महत्त्व लक्षांत घेऊन, या राजकन्येस 'Princess of Tanjore' अता किताब दिला होता; व मद्रासचे गव्हर्नर लॉर्ड होबर्ट यांच्या शिफारशी-वरून गव्हर्नरजनरल लॉर्ड नार्थब्रुक यांचे कारकीर्दींत तेरा तोफांची सलामी देण्यांत आली होती. या राजकन्येस एक कन्या झाली होती. ती बडोद्याचे सध्याचे अधिपति श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड सेनाखासखेल समशेर बहादुर यांस दिली होती. तिचें श्रीमन्महाराणी लक्ष्मी बाईसाहेब हें नांव असून, ती अल्पवयांत मृत्यु पावली. तिचे पुत्र कैलासवासी श्रीमंत फत्तेसिंगराव गायकवाड हे होत. दुर्दैवानें ह्या राजपुत्रासही अल्पवयांत मृत्यूनें आपल्या पाशांत ओढून घेतलें. त्यांस एक राजपुत्र व दोन राजकन्या आहेत. हाच तंजावरच्या राजघराण्याचा आजमितीस राहिलेला कन्येचा वंश होय.

श्री० शिवाजी राजे इ. स. १८५५ मध्यें मृत्यु पावल्यानंतर त्यांच्या पश्चात् पंधरा राण्या विद्यमान राहिल्या. त्यांपैकीं शेवटची राणी श्रीमंत जिजांबा बाई-साहेब ह्या ता. ३ मे इ. स. १९१२ रोजीं मृत्यु पावल्या. तंजावरच्या राण्यांनीं आपल्या खाजगी दौलतीकरितां दत्तक घेतलेले दोन राजपुत्र श्रीमंत शिवाजीराजे व श्रीमंत प्रतापसिंह राजे हे आजमितीस विद्यमान आहेत. ह्याशिवाय श्री. शिवाजी राजे ह्यांचे मुलीचा वंश व बहिणाचा वंशही तंजावर येथें आहे.

इ. स. १८५५ मध्यें तंजावरचें राज्य खालसा केल्यानंतर ब्रिटिश सरकारानें तंजावरच्या राजकन्येस दरमहा ३००० रुपये पेनशन चालू केलें, आणि सर्व राण्या व राजघराण्यांतील आप्तसंबंधी लोक यांस त्यांच्या दर्जाप्रमाणें नेमणुका करून दिल्या. इ. स. १८६० मध्यें ५४२८२० रुपयांची तैनात तंजावरच्या राजवाड्याकडे खर्चीं पडत असे. सांप्रत ही रक्कम राजघराण्यांतील जुने लोक मृत्यु पावल्यामुळें पुष्कळ कमी झाली आहे. तथापि तंजावरच्या राजघराण्याकडे खासगी मोकाशाचीं १९० गांवें व जमिनी वगैरे मिळून अद्यापि बरेंच उत्पन्न चालू आहे. त्याचप्रमाणें तंजावर येथील बृहदीश्वर स्वामींचें देवस्थान व इतर दुसरीं देवस्थानें व धर्मादाय यांची व्यवस्थाही तंजावरच्या राजवाड्यांतून होत असते.



[ मराठ्यांच्या इतिहासांतील एक अप्रसिद्ध प्रकरण. ]

# तंजावरचें राजघराणें.



हें


**दत्तात्रय बळवंत पारसनीस**

संपादक 'इतिहाससंग्रह'

**सातारा**


ह्यांनीं तयार केलें.



तें


**मुंबई येथें,**

**तुकाराम जावजी ह्यांनीं**

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

---

इ. स. १९१२.

---

किंमत १ रुपया.



# प्रस्तावना.

मराठ्यांच्या इतिहासांत, केवळ ऐतिहासिक माहितीच्या अभावामुळें व कालांतर आणि स्थलांतर यांच्या योगानें ओळख बिसरल्यामुळें, मराठ्यांची जीं सुप्रसिद्ध व एके कालीं राजसत्ता उपभोगिलेलीं घराणीं अगदीं अपरिचित आणि अज्ञात अशीं राहिलीं व विचित्र कालगतीनें ज्यांचीं नावें देखील महाराष्ट्रीयांस अश्रुत होऊन गेलीं, अशा थोर व वैभवशाली घराण्यांमध्यें मद्रास इलाख्यांतील तंजावरचे मराठी राजघराणें हें प्रमुख होय. हें घराणें महाराष्ट्रराज्यसंस्थापक छत्रपति श्री शिवाजी महाराज यांचे प्रत्यक्ष सापत्न बंधु व्यंकोजी राजे यांनीं संस्थापित केलें असून व भोसल्यांच्या कुलाची ती सातारा व कोल्हापूर या दोन शाखांप्रमाणें तिसरी अस्सल शाखा असून, तिची माहिती महाराष्ट्रीयांस अगदीं अपरिचित असावी, ही केवढी आश्चर्याची व दुर्दैवाची गोष्ट होय? तंजावरच्या राजघराण्याचा महाराष्ट्राशीं इतका निकट संबंध असून, तें महाराष्ट्रमंडळापासून अलग राहिल्यामुळें व राजकीय घडामोडींच्या अनेक आघातांनीं तें अगदीं जर्जर होऊन गेल्यामुळें त्याचें अस्तित्व अगदीं नष्टप्राय झालें आहे. तथापि, ब्रिटिश राजसत्तेच्या प्रभावामुळें विद्याप्रसार व राजकीय दळणवळण सर्व हिंदुस्थानांत विशेष वाढल्यानें, तंजावर येथील मराठी रियासतीमध्यें एके कालीं आपली बुद्धिमत्ता व राजकारणकौशल्य यांचा प्रभाव दाखविलेल्या जुन्या महाराष्ट्र मुत्सद्यांचे वंशज, सर. टी. माधवराव, दिवाण बहादूर रघुनाथराव, व्यंकास्वामीराव, गोपाळराव इत्यादि सुप्रसिद्ध, विद्वान्, राजकारण-कुशल आणि कर्तृत्वशाली नररत्नांची कीर्ति सर्वत्र चमकूं लागली व तिनें महाराष्ट्रीयांचीं मनें आकर्षून घेतलीं. त्यामुळें महाराष्ट्रीयांस पुन्हां तंजावराची ओळख पटून स्वकीयत्वाची जागृति झाली, आणि तेथील जुना इतिहास समजून घेण्याची त्यांस सहज जिज्ञासा उत्पन्न झाली. त्या जिज्ञासेचें फल ह्मणजे कै० न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे यांनीं इंग्रजीमध्यें लिहिलेला "Mahrattas in Southern India" हा उत्कृष्ट निबंध होय. हा निबंध न्यायमूर्ति रानडे यांनीं इ. स. १८९८ सालीं लिहून प्रसिद्ध केला, व त्यांत त्यांनीं तंजावरच्या इतिहासाचें महत्त्व केवढें आहे, तें फार मार्मिक रीतीनें जिज्ञासू वाचकांच्या निदर्शनास आणिलें; आणि तंजावरचा खरा इतिहास शोधून काढून तो उजेडांत आणण्याकडे महाराष्ट्रइतिहाससंशोधकांचें लक्ष्य वळविलें. अर्थात् त्यांच्या ह्या मार्गदर्शी निबंधाच्या योगानें व प्रत्यक्ष प्रोत्साहनानें आणि

साहाय्यानें, प्रस्तुत लेखकास तंजावरच्या मराठी राजघराण्याची साद्यंत माहिती एकत्र जमवून ती संगतवार प्रसिद्ध करण्याची प्रेरणा झाली. व ती 'इतिहाससंग्रह'द्वारें महाराष्ट्रवाचकांस सादर करण्याचा आज सुप्रसंग आला, ही संतोषाची गोष्ट होय.

मराठी भाषेमध्यें तंजावरच्या इतिहासाची सविस्तर माहिती कोठेंच प्रसिद्ध नसल्या-मुळें ह्या अल्प प्रयत्नाचा तंजावरचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास समजण्याचे कामीं थोडा तरी उपयोग होईल अशी आशा आहे. ह्या इतिहासामध्यें इंग्रजी ग्रंथांवरून, तामीळ ग्रंथांवरून आणि जुन्या कागदपत्रांवरून, तंजावरच्या राजघराण्याची जेवढी माहिती उपलब्ध झाली, तेवढी एकत्र करण्याचा प्रयत्न केला आहे. तो केवळ निर्दोष व परिपूर्ण असा नसून, अगदी विस्मरण पावलेल्या मराठ्यांच्या एका राजघराण्याची अल्पशी तरी ओळख व्हावी व त्याचा सविस्तर व साधार इतिहास जगापुढें आणण्याची जिज्ञासू वाचकांस प्रेरणा व्हावी, एवढ्याच हेतूनें तो प्रसिद्ध करण्याचें धारिष्ट केलें आहे. तो हेतू परमेश्वरकृपेनें केव्हां तरी सफल होईल अशी आशा आहे.

या अल्प प्रयत्नाचे कामीं ज्यांनीं अंतःकरणपूर्वक साहाय्य केलें, त्या सर्वांचे आभार मानल्यावांचून आह्मांस राहावत नाहीं. त्यांत मुख्यत्वेंकरून कै० न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे, कै० दिवाणबहादूर आर्. रघुनाथराव, कै० रावसाहेब के. गोविंदराव सरखेल, तंजावर प्यालेस, रा. रा. सांबमूर्तिराव इत्यादि सद्गृहस्थांचें आह्मांस वेळोवेळीं अतिशय साहाय्य झालें आहे. परंतु दुर्दैवानें पहिले तिन्ही गृहस्थ, त्यांच्या साहाय्यानें प्रसिद्ध झालेला हा इतिहासग्रंथ पहाण्यास हयात नाहींत, ही अतिशय दुःखाची गोष्ट होय! तथापि त्यांच्या मदतीनें तयार झालेला हा नवीन इतिहास, त्यांच्या देशबंधूंच्या व इष्टमित्रांच्या आदरास पात्र होईल, अशी आशा बाळगून ही प्रस्तावना येथें पुरी करितों.





**दुसरा अकबरशहा.**

( शहाअलम बादशाहाचा पुत्र· दिल्लीचा बादशाहा इ. स. १८०६-१८३७. )

ठेवावी. पुढें सरकारच्या फौजा इकडे येतील व पाटिलबावा गोहदेचे मसलतीपासून उलगडून येतील, तेव्हां जो अर्थ करणें तो करावा; किंवा घरचें सामान व पैकेकरी व इतबारी मातबर त्यांचे जिमेस जागा करावी. बंदोबस्त चांगला करून फौज या प्रांतीं राहिल्यास पैका येईल. येथील चर्या बखेड्याची आहे. व दिवस नाहींत जाणून विनंति लिहिली आहे. स्वामी करणें तें करतील. खावंदाचे प्रतापें सर्व बंदोबस्त होतील. येथील मामलेदार करारी होतील त्यांस ताकीदपत्रें व सनद आलाहिदा याद लिहिली आहे. त्याप्रमाणें जलदीनें पाठवावयास आज्ञा जाली पाहिजे. बुंदेल्यास व झांसीकरास निक्षून ताकीद कीं जागा लाऊन, मागील बाकी व हाल दरसालचा ऐवज बोभाट न ये, तें करणें ह्मणोन पत्र; व हुजरे कारकून बहुत निकड करून ऐवज व जागा पदरीं पडेसें करीत, इतका जोर व निकड सरकारची जाल्यासच यांजकडील कांहीं निकाल पडून उपयोगी पडेल. विनासक्ती हे कांहीं काम करीत नाहींत. प्रयत्न तितका जाला. निरुपाय विनंति स्वामींस लिहिली आहे. सिद्धीस जाईल. गोहदकरानें इंग्रेजांकडे कलकत्त्यास वकील पाठविला आहे. व इंद्रसेन इंग्रजांकडील पाटिलबावांपासीं आहे. लष्करांत पावलियावर साकल्य वर्तमान सेवेसीं विनंति लिहूं. सेवेसीं श्रुत होय कृपा केली पाहिजे हे विनंति."



---

## लेखांक १०१.

पै ॥ छ० १९ रविलावल. **श्री.** १३ जानेवारी इ. स. १७८४.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १९ माहे सफर मुक्काम दिल्ली जाणून स्वानंदलेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– आपण छ० १० सवालचें पत्र पाठविलें, तें छ० १९ जिल्हेजीं पावून, शिरसा वंदून सनाथ जालों. पत्रीं आज्ञा कीं, "मेजर बारून इंग्रेज दिल्लीस येऊन बोलणें होईल तें लिहून पाठवावें, व गोहदची मसलत आटोपून दिल्लीकडे जावें; पातशाहाची भेट घेऊन तिकडील बंदोबस्त करावा; ह्मणून राजश्री महादजी शिंदे यांस लिहिलें आहे. ते मसलत आटोपली ह्मणजे तिकडेच येतील. पातशाहानीं इंग्रेजांसीं राजकारण हरगीज लावूं नये. इंग्रेजांचा पाय पातशाहींत एक वेळ शिरला असतां पातशाहीस अपाय. याजकरितां त्यांजकडील संधान ठेवूं नये. जें लिहिणें तें राजश्री महादजी शिंदे यांस लिहिलें असतां, ते मसलत आटोपली ह्मणजे तिकडे येतील." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, मेजर

बारून इंग्रेज, नवाब अफराशाहबखान यांजपासून आज्ञा घेऊन, शरीरीं समाधान नाहीं ह्मणून, आज एक मास जाला आहे, दिल्लीस आला आहे. नवाब अबदुल-अहदखान यांनीं सबदरजंगाचे हवेलींत आपले समीप जागा राहावयास दिधली आहे. इंग्रेजांकडील वकील सलाउद्दीखान यांसीं नित्यानीं खिलबत होत असतें. खिलबताचा मजकूर अद्यापि समजण्यांत आला नाहीं. समजल्यावर विनंति लिहूं. अद्याप इंग्रजाची पातशाहासीं मुलाजमत जाली नाहीं. नवाब अफराशाहबखान यांची परवानगी येईल, अथवा तेच दिल्लीस येतील, तेव्हां मुलाजमत होईल. मुलाजमत जालियावर काय मनसबा ठैरावतील ते विनंति लिहूं. व राजश्री पाटीलबावांकडील प्रकार ह्मणावा, तर बदस्तुर गोहदेस घेरा घालून बसलेच आहेत. अद्यापि तेथील कांहीं गुंता उरकला नाहीं. आह्मी येथील वृत्त वरचे-वर आज्ञेप्रमाणें राजश्री पाटीलबावांस लिहीत असतों. तेथील वृत्त राजश्री नारो शिवदेव बारीक मोठें लिहीतच असतील. त्याजवरून ध्यानांत येतच असेल. रविसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत. ते स्वीकारून उत्तरीं लोभ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १०२.

**श्री.** माहे फेब्रुवारी इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति. पत्रीं आज्ञा कीं, "पातशाहा पूर्वीं प्रयागास असतां व त्याचे अगोदर व अलीकडे, इंग्रेजांसीं त्यांचे करारमदार कैसे कैसे जाले आहेत, व मुलकाच्या सनदा कोठकोठील कैशा दिल्या आहेत? अंतरवेदींत केवढ्याचा मुलख दिल्हा, त्याच्या सनदा दिलेल्या आहेत किंवा कसें आहे? याचा शोध बारकाईनें काढून, तपसीलवार लिहून पाठवणें". ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास पातशाहाचे दप्तरीं मनास आणिलें. त्यांत मजकूर कीं, प्रयागीं पातशाहा होते त्यासमयीं, इंग्रेज, शिवाय तोफा ताहफ, सव्वीस लक्ष रुपये दरसाल देत होते. व प्रयागचा सुभा व कडा कुरा हे दोन्हीं स्थळें सुजातद्दौलाकडून सोडवून पातशाहास देविलीं होतीं. त्यांत तेहतीस लक्ष रुपये पातशाहास येत होते दरसाल. व पातशाहांनीं इंग्रेजांस सनद, बर्दवान व इसलामनगर येथील कमाविसीनें मामलत सांगितली आहे ह्मणून सनद, व सुभे बंगाला व सुभे पट्टणा येथील दिवाणगिरीची सनद, याप्रमाणें दोन सनदा मात्र जाल्या आहेत. याशिवाय अंतरवेद वगैरे कोठीलही सनद पातशाहाचे घरींहून दिधली नाहीं. त्याची याद पातशाही दफ्तरची, पारसीची,

राय सिद्धराय पेशकार दप्तरचे, त्यांजपासून आणवून सेवेसीं पाठविली आहे. त्याजवरून ध्यानास येईल. दप्तरीं सनदा बंगाल्याची व पट्टण्याची दिवाणगिरी इंग्रेजांचे नांवें व सुभा पातशाही अलाबिर्दीखानाचा नातू मुबारकजंगबहाद्दर याचे नांवें व बर्दवान इसलामनगर यांची मामलत कमाविसीनें आमानी सांगितली आहे. ह्याचा दफ्तरीं दाखला इतकाच आहे. याजशिवाय पातशाहा त्याचे काबूंत होते तेसमयीं, खास दसखती शुके व फर्द दसखत करून त्यांत दस्तऐवज कांहीं असल्यास न कळे. सनदी दप्तरीं दाखला इतकाच, ह्मणून खालशाचे पेशकारांनीं सांगितलें. व याजशिवाय महमदखान पठाण वगैरे पातशाहास देत होते. दप्तरीची पारसी याद पाठविली आहे. त्याजवरून श्रुत होईल. विशेष काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १०३.

श्री. माहे फेब्रुआरी इ. स. १७८४.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति कीं, छ० १३ गुरुवारीं माहे मजकुरीं मेजर बारून व बक्षी बुरट व दोघे इंग्रज आणीक, यांची पातशाहासीं मुलाजमत अफराशाहाबखान यांचे विद्यमानें जाली. नजर पातशाहास व पातशाहाजाद्यास मिळून, मोहरा चारशें साठ दिधल्या. मेजर बारून त्यास सातापारच्याचा खिलत, व मोत्यांची माळ व जेगा व सिरपेंच, हत्ती, घोडा, तरवार येणेंप्रमाणें, व बक्षी बुरट यास पांचा पारच्याचा खिलत, सिरपेंच, व घोडा, व दोन इंग्रेज त्यांस पांचा पारच्याचा खिलत. व हमराई वकील व दिवाण मुनशी यांस पांच दुशाले व दोन गोशवारे येणेंप्रमाणें देऊन बहुमान केला; आणि विचार ठैराविला आहे कीं, दो चौ रोजां यांस येथून रुकसत करून द्यावें. लखनौस जातील. हें अफराशाहाबखानाचें मानस. व अबदुल अहदखान यांनीं फिरंगी यांस लाऊन घेऊन, पातशाहाचें त्यांचें अंतस्थ एक करून दिल्हें आहे कीं, आह्मांपाशीं तुह्मीं असावें. याचें कारण हेंच कीं, पातशाहाचे कारखाने उपासीं मरतात, आणि अबदुल अहदखान यांसही भक्षावयास नाहीं. मुलुक व जागिरा आहेत त्यांत अफत आसमानी जाली. व शीख व यांच्या फौजांनीं लुटून ताराज केला. ह्मणून खानखानाचा मुकरबा संगमरवरी होता, तो फिरंग्यास विकला. त्यांनीं दीडशें गाडी भरून लखनौस एक खेप गेली, पुढें आणीकही जाणार. त्यास यांची हे अवस्था ह्मणून, फिरंग्यास लावून घेऊन, निदान दिल्लींत यांनीं कोठीही केली तर करूं द्यावी, आणि त्यांजपासून पैका घेऊन

आपला कालक्षेप करावा, या विचारांत आहेत. मेजर बारून यांचें मानस कीं, पातशाहा व अबदुल अहदखान भुकिस्त, व यांची फौज अफराशाहबखान व नजबकुलीखान वगैरे आहेत, हे एकमेकांत नाहींत. याजकरितां पातशाहास व अबदुल अहदखान यांस भक्षावयास देऊन, आपलेकडे लावून घेऊन, सर्वांवर हुकूम राजे रजवाडे वगैरेवर करावा, या लक्षांत इंग्रेज आहेत. मेजर बारून यांनीं स्वतंत्र एक खत्री मुत्सद्दी व वीस हरकारे, जैसिंग कन्हया वगैरे शिखांचे सरदार मातबर आहेत त्यांकडे पाठविला आहे, आणि करार करून पाठविला आहे कीं, लाख स्वार घेऊन येणें. तुह्मी आह्मी मिळून जो मुलूक नवा घेऊं, त्यापैकीं सा आणे तुमचे व दहा आणे आमचे. तुह्मीं आह्मीं एक विचारें असावें. ह्मणून जाबसालास वकील, जैसिंग कन्हया वगैरेकडे गेला आहे. त्यांजपासीं पावून अद्याप उत्तर आलें नाहीं. तात्पर्य, फिरंगी यांचें मानस कीं, दिल्लींत पाय सिरऊन जैसे लखनौस मालक होऊन बसले आहेत, तैसे दिल्लींतही मालक होऊन बसावें, या लक्षांत आहेत. पुढें काय विचार ठरेल तें विनंति लिहूं. छ. १८ मीनहूस फिरंगी यांनीं पातशाहांस नजर वस्त्रें एकतीस किस्ती बंगाली कापड सफेद बाबथानें सुमार ४० चाळीस, व मुशजर वगैरे रेशमी थानें सुमार ३० तीस, एकूण कापड थानें सत्तर, व तरवार एक, व कटार एक, फिरंगी तांब्याच्या कबजा चार सोनेरी रंगाच्या, येणेंप्रमाणें गुजराणिलें. पातशाहांनीं मेहेरबानगीचा खिलत मेजर बारून यांस निमअस्तीन किनखापी व गोशवारा, बक्षी बुरट यास निमअस्तीन किनखापी, येणेंप्रमाणें देऊन आज्ञा केली कीं, तुह्मीं नी त्यांनीं मुजऱ्यास येत जाणें. येणेंप्रमाणें फिरंगी यांस लाऊन घेतलें आहे. मागाहून निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १०४.

**श्री.** १० फेब्रुवारी इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति कीं, या दिवसांत नवाब अबदुल अहदखान भीष्मपितामह होऊन, पातशाहास पुर्तेपणें आपले लगामीं लाऊन घेतलें आहे. नजबकुलीखानास बगलेंत घेऊन, अफराशाबखानासीं जाबसाल लाविला आहे कीं, पातशाहांस स्वारीस काढितां, तर स्वारीची तयारीस व माहालचे खर्चाची बेगमी करून द्यावी; ह्मणिजे तयारी करून स्वारीस चालूं. त्यास, अफराशाबखान यांचें मानस कीं,

रणजितसिंग जाट भरतपूरकराची मामलत, मेजर ब्राऊन फिरंगी यांचे विद्यमानें लाख रुपये जाली आहे, तोच ऐवज परस्परें फिरंग्याकडून पातशाहास देवावा; आणि फिरंगी यास रुसकत करून लखनऊस वाटेस लावावें; आणि पातशाहास स्वारीस बाहेर काढावें; याप्रमाणें अफराशाबखान यांचें मानस आहे. दुसरें, जैपुराकडे स्वारीस चालावें. व पातशाहाचें व अबदुल अहदखान यांचे मतें कीं, सरहद्देकडे शिखांवर चालावें. याप्रमाणें जाबसाल आहेत. अबदुल अहदखान यांचें मानस कीं, आपसांत परस्परें विरुद्ध पाडून, नजबखानाचें नांव कोठें न राहे या विचारांत आहेत. ह्मणून इंग्रेजांसही लाऊन अंतस्थ ठेविलें आहे, व शिखांकडेही जाबसाल आहेत. व आपलेकडील खाशा फौजांचीही मार्गप्रतीक्षा आहे कीं, पुण्याहून होळकर व खाशी फौज, व गोहद सुटून राजश्री पाटीलबावाही लौकर येत, असें ईश्वर कधीं करील तो सुदिन ! पातशाहा आदिकरून सर्वांचें लक्ष लागलें आहे. मनोरथ पूर्ण होईल तो सुदिन. हें अवघें कटकपें अबदुल अहदखान करितात. हें अफराशाबखान यांनीं जाणून, अबदुल अहदखानास विरुद्ध दाखविलें. तेव्हां हे दबून, पातशाहास विनंति केली कीं, अवघें निमित्त मजवर येतें, आणि हे माझी पुन्हां बेअब्रू करितील. त्याजवरून पातशाहांनीं पुन्हां सिलेमा सीको पातशाहाजाद्यास छ १८ रोज मंगळवारीं अफराशाबखान यांचे स्वाधीन केलें, कीं यास स्वारीसमागमें घेऊन जावें. त्यांनीं छ० मजकुरीं पातशाहाजाद्यास लष्करांत दाखल करून, गोसगडाकडे शीख आले आहेत त्यांजवर तूर्त जाणार. कळावें बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १०५.

श्री. १९ फेब्रुवारी इ. स. १७८४.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ २७ माहे रविलावल मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः-आपण....जिल्हेजचें पत्र पाठविलें, तें छ २ सफरीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, "सरकारची फौज लवकर यावी ह्मणून लिहिलें. त्यास हें वर्तमान .......महादजी शिंदे यांस दिल्लीकडील बंदोबस्ताविषयीं लिहिलें आहे. गोहदकर जाटाची मसलत आटोपांत आली आहे. ते आटोपली ह्मणिजे तिकडेच येतील. तुह्मींही राजश्री महादजी शिंदे यांस वरचेवर वर्तमान लिहित जावें. व पातशाहास अर्ज करावा कीं, इंग्रेजांसीं व शिखांसीं हरगीज राजकारण करूं नये. यांचा

पातशाहींत एक वेळ पाय शिरला ह्मणजे मग भारी पडेल. याजकरितां त्यांसीं राजकारण लाविलें असल्यास तोडून टाकावें. जें सांगणें तें शिंद्यांस सांगावें हें चांगलें. याप्रमाणें तुह्मीं अर्ज करावा. वरकड अधिक उणें वर्तमान होत जाईल तें लिहित जावें. मिर्जासफी मारला गेलियावर कसें कसें जालें, तें लिहून पाठवावें." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास, इकडील वर्तमान पेशजीं छ १९ सफरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, ते पावून वर्तमान श्रुत जालेंच असेल. त्यास, स्वामींचे आज्ञे- प्रमाणें रा० महादजी शिंदे यांस वरचेवर येथील वर्तमानाचीं पत्रें पाठवितों. ते समीप ह्मणून आधीं त्यांजकडे पत्रें रवाना करितों. मग हजुरांत पाठवितों. व आज्ञेप्रमाणें पातशाहास विनंति केली कीं, आमचे साहेबांनीं अर्ज केला आहे कीं, फिरंग्यांकडे व शिखांकडे जाबसाल ठेवणें ठीक नाहीं. हे कोमबंद (?) आहेत हें आपणही जाणतात. त्यास जे आज्ञा करणें ते, रा० माधवराव शिंदे समीप आहेत, यांस आज्ञा करणें ते करीत जावी. याचें उत्तर पातशाहांनीं दिधलें कीं, "ज्या दिवसापासून विसाजीपंत गेले आहेत, त्या दिवसापासून पुन्हां इकडील खबर घेतलीच नाहीं. व राजश्री पाटीलबावांस आज दोन वर्षें जालीं, लिहितां लिहितां थकलों! त्यांजकडील आनंदराव नरसी, एक वर्ष जालें, स्वतंत्र येऊन बसला आहे. तो नित्यांनीं लबाडी करितो कीं, आज पाटीलसाहेब येतात, उद्यां येतात! परंतु त्याची गोष्ट कांहींच अमलांत येत नाहीं." ह्मणून आज्ञा केली. त्याजवरून पुन्हां विनंति पातशाहास केली कीं, आतां गोहद बहुतच जेर जाली आहे. तेथील फडशा सत्वरच करून, राजश्री पाटीलबावा हजुरांत येतील. व श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबांचीही ताकीद आहे कीं, सत्वर हजुरांत जाणें. व आजपावेतों दक्षिणेंत इंग्रेजांचा वगैरे बखेडा होता, ह्मणून फौजा या प्रांतीं न आल्या. आतां तिकडील सर्व बंदोबस्त मनोदयानुरूप जाला आहे. हजूरच्याही फौजा सत्वरच येतील ह्मणून विनंति केली. याचें उत्तर पातशाहांनीं दिल्हें कीं, "जोंपावेतों ते येतील, तोंपावेतों ईश्वरें काय नेमिलें असेल तें घडेल." आह्मीं उत्तर दिल्हें कीं, ईश्वर उत्तमच करील. याप्रमाणें बोलणें जालें. परंतु यांनीं अबदुल अहदखान यांचे विचारें इंग्रेजांस लावून ठेविलें आहे. व येथें आनंदराव नरसी वेरूळकर गृहस्थ, राजश्री पाटीलबावांकडून वकालतीस पातशा- हापासीं स्वतंत्र आहे. तोही परस्परें पातशाहासीं नाजराचे विद्यमानें बोलत असतो, व येथील वर्तमानही वरचेवर यांस लिहित असतो, व आह्मीही लिहित असतों. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १०६.

श्री. १२ जुलई इ. स. १७८४.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ० २३ माहे साबान मुक्काम श्रीमथुरा जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– इकडील वर्तमान पेशजीं छ०६ माहे मजकुरीं विनंतिपत्रें पाठविलीं, तीं पावून वर्तमान सविस्तर कळलेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, पूर्वीं राजश्री पाटीलबावा चमेल उतरून आगरियाचे समीप येऊन, पातशाहाच्या व यांच्या भेटी जालियावर पातशाहांनीं आज्ञा केली कीं, सलतनतीचा बंदोबस्त करावा. त्यास राजश्री पाटीलबावांहीं विनंति केली कीं, कांहीं पदाखेरीज सलतनतीचा बंदोबस्त कैसा होतो? त्यावरून पातशाहा बोलले जे, "राजश्री विसाजी कृष्ण व राजश्री तुकोजी होळकर व तुह्मी ऐसे त्रिवर्ग एकत्र असतां, श्रीमंत राजश्री नारायणराव यांचे नांवें मीरबक्षीगिरीची खिजमत दसकत करून घेतली, आणि पुन्हां त्यांचा तुमचा बेबनाव जाला. तुह्मी कूच करून रेवा उतरून देशीं गेले. त्या उभयतांनीं किल्ल्यास मोर्चे लावून बदमामली करून झुंजले. पुढें तैसें आह्मीं आणीक पद तुह्मांकडे सांगावें, आणि आपलें घर तुह्मांस सोपून, पुन्हां हरकोणी येऊन बदमामली आह्मांसीं करील, ऐसा प्रकार न घडावा. याजकरितां चित्त प्रशस्त होत नाहीं." त्याजवरून राजश्री पाटीलबावा बोलिले जे, "विना पद दिल्ह्याखेरीज चौघांवर दाब बसून सलतनतीचा बंदोबस्तही होणार नाहीं." त्याजवरून पातशाहा बोलिले कीं, "तुह्मांकडे पद सांगावें, आणि वजीर व इंग्रेज आदिकरून सर्वांवर दबाव पडून सलतनतीचा बंदोबस्त व्हावा, ऐसा प्रकार घडला पाहिजे. त्यास श्रीमंत राजश्री पंतप्रधान यांचे नांवें वकील-मुतलखी व मीरबक्षीगिरी हें दोन्ही पदें त्यांजकडे देऊन, त्यांची नायबत आह्मी तुह्मांस देतों." याप्रमाणें बोलणें होऊन, राजश्री पाटीलबावांनीं विनंति केली कीं, "आह्मी श्रीमंतांस विनंति लिहून पाठवितों. तेथून आज्ञा येईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं." त्याजवरून पातशाहा बोलिले जे, "आफराशाबखान मृत्यु पावला, याजकरितां फौजेंत व तोफखान्यांत बखेडा जाला आहे. तुह्मीं दक्षिणेस पत्रें पाठवाल आणि तेथून उत्तरें येतील या गोष्टीस दिवसगत लागेल; आणि येथें बखेडा वाढेल. याजकरितां तुह्मांस नायबतीचीं वस्त्रें दोहीं पदाचीं देतों. हें घेऊन बंदोबस्त करावा, हें ठीक आहे." त्याजवरून यांणीं प्रथम श्रीमंतांचे नांवें वकील-मुतलखीचीं वस्त्रें व नालकी व मीरबक्षीगिरीचा खिलत व कांहीं मरातब व............सरंजाम

घेऊन, चौथे रोजीं आपण नायबतीचा खिलत व नालकी घेतली. याप्रमाणें वर्तमान जालें. त्या समयीं आह्मी येथें लष्करांत नव्हतों; दिल्लीस होतों. याजकरितां हल्लीं मागील वर्तमान मनन करून विनंति लिहिली आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १०७.

श्री. १३ जुलई इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. पृथ्वीसिंग राजा जयपूरकर याचा पुत्र किसनगडीं आजुळीं आहे. त्यास रावराजा प्रतापसिंग माचेडीकर यांचें मानस कीं, त्या मुलास आणून जयपुरीं राज्यावर बसवावें; आणि सरकारची नजर ठरेल त्याची निशा मी करून देईन. तेथील मुख्त्यारी व कारभार मजकडे सांगावा. राजा प्रतापसिंग हल्लीं राज्यावर आहे, तो नालायक आहे. कांहीं राज्यायोग्य नाहीं; आणि राज्याचा अधिकारही त्यास नाहीं. ज्येष्ठ पुत्राचा पुत्र आहे, त्यास अधिकार आहे. ऐसीं बोलणीं घटवटना आहे. त्यास खुशालीराम बोहरा जयपुराहून जाबसालास येणार. तो आलीयावर पूर्वी मामला जाला आहे, त्या ऐवजाचा फडशा करून दिल्हा तर उत्तम. नाहीं तरी रावराजा प्रतापसिंग यानें किसनगडचें राजकारण ह्मणतो तें करावें. ऐसा विचार आहे. परंतु प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १०८.

श्री. १३ जुलई इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. मोहरसिंग सीख यास रावराजा प्रतापसिंग याजवर तंखा करून पत्रें दिधलीं आहेत कीं, पावणेतीन लक्ष रुपयांचे परगणे जयपूरपैकीं लावून देणें. ह्मणून पत्रें लिहून देऊन, करारमदार जाला कीं, पातशाही खालशाचा मुलुख आहे, त्यांत धामधूम करूं नये व राखी घेऊं नये. येणेंप्रमाणें वर्तणूक करून, जयपूरचे माहाल रावराजा लावून देईल, तो ऐवज घेऊन स्वस्थ असावें. सरकारचा अंमल सरहद्देकडील जाईल, त्या समयीं पांचा हजार स्वारांनसीं समागमें असावें. तिकडील मुलुख सुटेल, त्यापैकीं दाहा लक्षांची जागा आणीक लावून देऊं. ह्मणून करारमदार होऊन, त्यास वस्त्रें देऊन बिदा केलें. त्यास

मोहरसिंग व तुलज्यासिंग हे दोही थोकांकडील दोघे जण लष्करास असतां, याप्रमाणें बोलणें बोलत असतां, व सरंजाम लाऊन देणें व दिल्हा ऐसें असोन, यांचे निसबतीचे सीख अंतरवेदींत मेरटेकडे जाऊन, दर रुपयास दोन आणे रखी येणेंप्रमाणें तमाम अंतरवेदींत हंसील केली व करितात. याप्रमाणें वर्तमान आहे. मुलुख मोठा, कारभार मोठा, परंतु अद्यापि खातरखा बंदोबस्त नाहीं. पुढें प्रत्ययास आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १०९.

**श्री.** १३ जुलई इ. स. १७८४.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. पूर्वीं राजश्री लालाजी बल्लाळ यांजकडे आगऱ्याचा सुभा सांगिला होता. त्यासी ते शिबंदी जाजती मागूं लागले, ह्मणून राजश्री बाळोबा पागनीस यांजकडे आगऱ्याचा सुभा सांगोन, राजश्री रायाजी पाटील यांस तेथून बोलावून आणून, कोलस रामगड उर्फ अल्लीगडाकडे पाठविणार त्यांच्या तैनातीस फौज व पलटणें रवाना केले आहेत. ते यमुनापार जाऊन उतरले आहेत. राजश्री रायाजी पाटील यांस दो चौ रोजा पार उतरून, अल्लीगड खाली करून घ्यावा या उद्योगास रवाना करणार. नजबकुलीखान यांचे विद्यमानें कांहीं रुपये देऊन किल्ला आपलेकडे ठेवावा, नाहीं तर कांहीं भक्षावयास जागीर करार करून घेऊन किल्ला स्वाधीन करावा, ऐसा जाबसालही आहे. प्रत्यास आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ११०.

**श्री.** १३ जुलई इ. स. १७८४.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री पाटीलबावांनीं आपलेकडून खिलत वस्त्रें रवाना केलीं बतपसील:—

१ मंजूरअल्लीखान नाजर यांसी खिलत पाठविली. साता पारच्याचा खिलत, वस्त्रें, व मोत्यांची कंठी व जेगा शिरपेंच व हत्ती व घोडा येणेंप्रमाणें.

१ सीतलदास मशारनिल्हेच्या कडील. त्यासी पांचा पारच्याचा खिलत, जेगा व शिरपेंच, येणेंप्रमाणें.

१ हसन रजाखान वजिराचा कारभारी. त्यासी पांचा पारच्याचा खिलत, वस्त्रें व जेगा व शिरपेंच, येणेंप्रमाणें.

१ हैदरबेगखान वजिराचा मुखत्यार. यासी साहा पारच्याचा खिलत, व जेगा, शिरपेंच येणेंप्रमाणें.

१ राजश्री सदाशिवपंत बक्षी, पाटीलबावांकडील वकील. यांसी पांचा पारच्याचा खिलत वस्त्रें व जेगा शिरपेंच येणेंप्रमाणें.

एकूण पांच खिलत रवाना केले आहेत. व या दिवसांत हापड साहेब इंग्रज पारमरसाहेबाचे बदली होऊन, मेघफासन साहेब याजकडून कलकत्याहून लखनौस आला आहे, ह्मणून वर्तमान आहे. पुढें विशेष वर्तमान ऐकिल्यास विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १११.

श्री. १३ जुलई इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री अंबाजी इंगळे यांस राजश्री पाटिलबावांनीं दिल्लीचे बंदोबस्तास व शीख दिल्लीचे आसपास व गुजर धामधूम करित होते ह्मणून पाठविले होते. त्यास मशारनिल्हेनीं दिल्लीसमीप पाहाड आहे, तिकडे धांवणी करून, पांच सात गांव गुजराचे मारून, कांहीं चाळीस पन्नास गुजर व एक दोन त्यांचे सरदार मारून, गुजरांचा बंदोबस्त करून, तेथून कूच करून, दिल्लीपलीकडे मौजे बेराडी पलीकडे चार कोसांवर, दिल्लीहून बारा कोसांवर, यमुनातीरीं मुक्काम करून आहेत. तिकडून शिखांची फौज रायसिंग व जसासिंग वगैरे पांच सरदार डलेवाले व भागसिंग व भंगासिंग वगैरे चार सरदार, एकूण नव सरदार शिखांचे, फौज दहा बारा हजार आहे; ते पाणिपताकडून कूच करून, यांजपासून तीन कोसांवर सोनपतासमीप मुक्काम करून आहेत. यांचा त्यांचा जाबसाल होऊन ठराव जाला कीं, त्यांची रखी, गांव पाहून प्राचीन आहे त्याप्रमाणें त्यांनीं घ्यावी, आणि यांजसमागमें फौजेसुद्धां चाकरी करावी. याप्रमाणें अंबाजी इंगळे यांचे विद्यमानें ठराव जाला आहे. शिखांच्या व इंगळ्यांच्या भेटी छ १६ मिनहूस जाल्या. ते सरदार शीख यांचे डेरियास आले. यांनीं वस्त्रें घोडीं शिष्टाचार केला. हे त्यांचे डेरियास गेले. त्यांनीं वस्त्रें घोडीं शिष्टाचार केला. याप्रमाणें होऊन, अंबाजी इंगळे यांनीं करार केला कीं, तुह्मांतून दोन सरदार मातबर आह्मांसांगातें चाला. मी श्रीमंत राजश्री पाटिलबावांसीं भेटी करून देतों, आणि याप्रमाणें ठराव

जाला आहे ह्मणून विनंति करितों. मग ते जे आज्ञा करितील, ते तुह्मीं आह्मीं मान्य करून वर्तणूक करावी. याप्रमाणें बोलणें ठरलें आहे. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ११२.

श्री. १३ जुलई इ. स. १७८४.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री कृष्णराव गोविंद यांचे पुत्राकडे उदेपूरचा कारभार होता; तो त्याजकडून काढून, राजश्री लालाजी बल्लाळ कोटेकर यांजपासून पाऊण लक्ष रुपये घेऊन, त्यांजकडे उदेपूरचा कारभार सांगितला. त्यांस हत्ती घोडा शिरपेंच जेगा व पागा व वस्त्रें येणेंप्रमाणें देऊन व सन्मान करून, त्यांस बिदा केलें आहे. परंतु कागदापत्रांचा बंदोबस्त होणें ह्मणून राहिले आहेत. आठा पंधरा रोजा जाणार. बुंदी, कोटे, उदेपूर, ऐशा, तीही संस्थानच्या वकालती व चवथाईचे अमलाची मामलत मशारनिल्हेकडेस करार जाली. मागील हिशेबाचे कांहीं फडशे जाले, कांहीं शेष बाकी फडशा होणें आहे, तो करून जाणार. व रामगडाकडे रायाजी पाटील फौजसुद्धां गेले आहेत. त्यांनीं कोलचे शहरांत ठाणें बसविलें. तेथें दोन पलटणें व चाळीस तोफा होत्या, त्यांपैकीं एक पलटण बाक फुटून यांजकडे जाबसाल लाविला. त्याची खातरजमा रायाजी पाटील यांनीं केली. त्यानें कोलचे दोन दरवाजे उघडून दिल्हे. त्या मार्गें यांजकडील फौज व पलटणें आंत शिरून, एका पलटणाची लढाई होऊन, यांजकडील जखमी व जाया चारशें माणूस जालें. पलटण पळून गेलें. चाळीस तोफा वगैरे सरंजाम सरकारांत आला. कसबें कोल येथील ठाण्याचा बंदोबस्त करून, रामगडास घेरा घालून रायाजी पाटील आहेत. कांहींका दिवसां 'रामगडही खाली होईल. आंत जमादार व पलटणवाले आहेत, त्यांत फूट आहे. त्यांजकडीलही बोलणीं लागलीं आहेत. प्रत्ययास येऊन गड खाली जालियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

## लेखांक ११३.

श्री. १३ जुलई इ. स. १७८४.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. बाबाराव नामें गृहस्थ, नवाब निजामअलीखान यांजकडून राजश्री पाटिलबावांकडे वकालतीस आले आहेत. याचें कारण कीं, हैदरा-

बादेपलीकडे सरहद्देस कांहीं नवाबाचे परगणे आहेत, ते इंग्रेजांहीं पूर्वी इजारा करून घेतले होते. त्याचा पैका प्रथम दिल्हा; आतां देत नाहींत. हिशेब करितां, एक करोड सत्रा लक्ष रुपये इंग्रेजांकडे नवाबाचे निघतात. त्यास इंग्रेजांचा सलुक श्रीमंतांसीं राजश्री पाटिलबावा यांचे विद्यमानें जाला आहे. यांचा इंग्रेजांचा स्नेह आहे, ह्मणून यांजकडे आपला गृहस्थ जाबसालास पाठविला आहे कीं, यांचे हातून कांहीं सामदामानें इंग्रेजांकडून ऐवज पदरीं पडला, तर उगऊन द्यावा. ह्मणून यांजकडेस पाठविलें आहे. त्यास राजश्री पाटिलबावांनीं इंद्रसेनासीं बोलून, आपलीं पत्रें व इंद्रसेनाचीं पत्रें कलकत्त्यास पाठविलीं आहेत. तेथून अद्यापि जाबसाल आला नाहीं. ह्मणून बाबाराय राजश्री पाटिलबावांपासींच आहेत. त्यास, यांसीं व नवाब निजामअलीखान यांसीं स्नेहवृद्धि व्हावी ह्मणून, वतरीक मेजमानी ह्मणून हत्ती एक व घोडा एक व मोत्यांची माळ व जेगा शिरपेंच व किनखाप साहा व शालजोड्या ६ व तरदाम बंगाली थान ६ व फुलकारी बदामी थान ६ व तीन हजार रुपये नख्त दिल्हे कीं, बऱ्हाणपुरीहून शेले पागोटीं कच्या रंगाचीं बऱ्हाणपुरीं घेऊन जावीं, ह्मणून कारकुनास आज्ञा. व नवाबाकडील मुख्त्यार कारभारी त्यांस घोडा एक व किनखाप ४ व शालजोड्या ४ व तरदाम ४ व फुलकारी ४ व मोत्यांची कंठी व जेगा शिरपेंच येणेंप्रमाणें सरंजाम आपला कारकुनासमागमें देऊन रवाना केला. व यांची बहीण आनंदीबाई महाराज निंबाळकर यांस दिल्ही होती, ते यांचे भेटीस आली होती. तीस या प्रांतीं पन्नास हजार रुपये कर्ज जालें. त्यास, ते यांची आज्ञा घेऊन माघारा जाऊं लागली; ते समयीं पन्नास हजार रुपये सावकारांचे वारून, पंचवीस हजार रुपये मार्गी खर्चास देऊन, येथून बिदा केली. ते ग्वालेरीसमीप जाऊन मृत्यु पावली. तिच्या नाती दोघी मुली समागमें होत्या. व सरंजाम सुखरूप देशीं कल्याणराव कवडे यांजपासीं जाऊन पोंहोचावा, ह्मणून येथून कारकून बिदा केला आहे. तो पावता करील. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ११४.

**श्री.** माहे जुलई इ. स. १७८४.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. आपण राजश्री पाटिलबावांस सांगून पाठविलें कीं, "टिपू सुलतान यांसीं व श्रीमंतांसीं बिघाड जाला आहे, त्यास पुढें काय विचार करावा? इंग्रेजांहीं आह्मांसीं व टिपू सुलतान यांसीं दोहीकडे सलूक केला आहे. त्यास तुह्मीं इंग्रेजांस पुसावें कीं, तुह्मी त्याजकडे होतां किंवा आह्मांकडे होतां? हें यांस

पुसून आह्मांस लिहिणें" ह्मणून आपण राजश्री सदाशिव दिनकर यांचे विद्यमानें पत्र पाठविलें होतें. त्याजवरून राजश्री पाटिलबावांनीं इंद्रसेन साहेबास बोलाऊन आणून हा मजकूर त्यास पुसला. त्यानें उत्तर दिल्हें कीं, टिपू सुलतान यानें तुमचा मुलूख दरोबस्त घेतला तर आह्मांस गरज नाहीं. व तुह्मी त्याचा मुलुख घेऊन त्यास खारीज केलें तर आह्मांस गरज नाहीं. आह्मी तुह्मांकडेसही कुमकेस येणार नाहीं, व त्याजकडेसही जाणार नाहीं. येणेंप्रमाणें परस्परें बोलणें होऊन, इंद्रसेनानें कलकत्त्यास व लखनऊस पारमलसाहेब व पापडसाहेब आहेत, त्यांजकडेस पत्रें पाठविलीं आहेत कीं, याप्रमाणें राजश्री पाटिलबावांचें बोलणें आहे. ह्मणून वर्तमान ऐकिलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.

राजश्री सदाशिव दिनकर यांसीं व राजश्री पाटिलबावा यांसीं कांहीं दिवस कांहीं जाबसालाकरितां तंटा पडला होता. हे दरबारास जात नव्हते. तेव्हां यांनीं कांहीं मतलबाच्या यादी सरकारसंबंधीं किंवा आपल्या खाजगत हें कांहीं समजलें नाहीं. त्यास त्या यादी त्यांनीं करारमदार मखलसी करून दिल्या. आतां सख्य जालें आहे. दरबारास जात असतात. याप्रमाणें श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक. ११५.

**श्री.** माहे जुलई इ. स. १७८४.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. वाटसाहेब इंग्रेज यानें हैदरनाइकाचे पुत्राकडील मामला तीन करोडीवर फैसल करून मंदराजचे किल्ल्याची लढाई महकूफ करविली. व मुलुख हैदर नाइकाचे पुत्रानें घेतला आहे, तो याजकडे बदस्तुर बहाल असावा, याप्रमाणें फैसला करून, मंदराज किल्ल्याहून कलकत्त्यास आला. मेघफास साहेब यांस भेटून वर्तमान सांगितलें. त्यांनीं उत्तर दिल्हें कीं, जें सर्वांचें मनास कंवसलियाचें आलें, ते गोष्ट आह्मांस मान्य आहे. हैदरनाइकाचे पुत्रासीं सलुख करणेंच योग्य आहे, ह्मणून बोलण्यांत आलें आहे. व महमदअल्लीखान अरकाटचा सुभा याचें पत्र कलकत्त्यास मेघफास साहेबास आलें कीं, फौजेची व खर्चाची खबर घेतां तर हा मुलुख राहतो. नाहींतर हैदरनाइकाचा पुत्र आह्मांवर गालब आहे. या दिवसांत खबर घेणें योग्य आहे. ह्मणून लिहिलें आहे. याप्रमाणें वर्तमान लखनऊहून आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक ११६.

**श्री.** १६ नोव्हेंबर इ. स. १७८४.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. छ ३ मीनहूस पातशाहा, अफराशाबखान यांचे लष्करांतून कूच करून, आंबाजी इंगळे यांचे व पाटीलबावांचे लष्कराचे मध्यें जाऊन मुक्काम केला, डेरियास दाखल जाले. त्या समयीं राजश्री पाटीलबावांनीं एकवीस मोहरा नजर केल्या. पाटीलबावांचे लष्करांत पातशाहा दाखल जाले. हिंदुस्थानी लष्कर दरोबस्त एकीकडे आहे. पाटीलबावा, पातशाहा, आंबाजी इंगळे ऐसे एकीकडे आहेत. या नक्षानें मुक्काम करून आहेत. चारशें तोफा व दहा हजार स्वार........एकूण चाळीस हजार स्वार प्यादा विना तरवार पादाक्रांत होऊन, जैसी पाण्यांत माती पडून विरून जाती, त्याप्रमाणें यवनाचे फौजेची अवस्था जाली आहे! कोणी कोणांत मिळत नाहींत. याप्रमाणें जालें. पुढें अंमलांत येईल, तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ११७.

पैवस्ती छ० ६ सफर सन खमस समानीन पौषमास. **श्री.** २३ नोव्हेंबर इ. स. १७८४.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ९ माहे मोहरम जाणोन स्वानंद लेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः- आपण छ २६ जिल्कादचें आज्ञापत्र पाठविलें, तें छ० ३० जिल्हेजीं पाऊन सनाथ जालों. पत्रीं आज्ञा कीं, "पातशाहा आगरियास दाखल जालेच आहेत. तेथून पुढें गेले किंवा तेथेंच आहेत, तें ल्याहावें. व राजश्री महादजी शिंदे यांच्या व पातशाहांच्या भेटी कधीं होणार? शिंद्यास येथून वरचेवर पत्रें लिहिलीं. त्यास त्यांत तुह्मींही होईल तें मशारनिल्हेस वरचेवर सुचवीत जावें" ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास आज्ञेप्रमाणें विशेष वृत्त असल्यास पाटिलबावांस लिहितों, व श्रुत करीत असतों. इकडील बारीक मोठें वृत्त, छ० १९ व छ० २१ माहे जिल्हेजीं पै दर पै दोन विनंतिपत्रें पाठविलीं, तीं पावलीं असतील; त्यावरून श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, महमदबेग हमदानी यास आणून कैद केलें आहे. त्याचा असबाब तोफा पंचावन्न व हत्ती बारा वगैरे सरंजाम होता. त्यापैकीं कांहीं राजश्री पाटीलबावांनीं आपले सरकारांत घेतला. कांहीं हिंमत-

बहादूर यांजकडील तोफा महमदबेगानें पेशजीं लुटून नेल्या होत्या, त्या त्यास दिधल्या. राहिला सरंजाम अफराशाबखान यांचे सरकारांत दिधला. याचें कारण हेंच कीं, राजे हिंमतबहादूर गोसावी व नारायणदास मुखत्यार अफराशाबखान यांचे घरचे आहेत, त्यांजपासून कांहीं पैका घेणें. त्यांनीं राजश्री पाटिलबावांसीं करार मदार केला आहे कीं, आमची सरदारी आह्मांकडे असावी. त्यावरून करार करून त्याचे पुत्रास सरदारी करार केली आहे. त्याचें नांव हुसेन दौलाबहादूर महमद हुसेनखान गालबजंग ह्मणून किताब देऊन वस्त्रें मातमपुरसीचीं व पैका आणावयास अलिगडास माणसें पाठविलीं आहेत. व तो मूल तीन वर्षांचा आहे, त्यासही लष्करांत बोलाविलें आहे. व मोंगलीये वगैरे सरदार यांस हिंमतबहादूर व नारायणदास यांनीं जाबसाल लाविला आहे कीं, तुह्मी बहुता दिवसापासून सरंजाम खातां. आतां कांहीं पैक्याचे तुह्मींही कुमक करावी. ह्मणून महमदबेगसुद्धां जितके सरदार मोंगलीये वगैरे होते, त्यांस तगादा आहे. त्यांचे लष्करचे आसपास राजश्री पाटिलबावा यांचीं पलटणें व फौजेची चौकी आहे, ते हिरासा आहेत. हिंदुस्थानचे यवनांची, शिवाय पातशाहां निपुता शांत जाली! कांहीं त्यांत जीव राहिला नाहीं. पातशाहाची मर्जी सर्व प्रकारें राजश्री पाटिलबावांकडे मुतवजे आहे. छ० ४ तारखेस पातशाहांसीं व राजश्री पाटिलबावांसीं खिलबत जालें. पातशाहांनीं आज्ञा केली कीं, 'तुह्मी आमचे घरची मुख्त्यारी कबूल करा.' यांनीं उत्तर दिल्हें कीं, 'ताजीयाचे दिवस आहेत. हे गेलियावर विनंति करीन.' ह्मणून बोलून, आपले डेरियास आले. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ११८.

**श्री.** २४ नोव्हेंबर इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—इष्टीन साहेब इंग्रेज पातशाहाजाद्यास घेऊन श्रीकाशीस गेले. हें वर्तमान विलायतेस कंपनीनें ऐकून, इष्टिनास पत्र लिहिलें कीं, तुह्मी हिंदुस्थानचे पातशाहाचा पुत्र पातशाहाजादा समागमें घेऊन येतां. त्यास तुमचा काय इरादा आहे तें लिहून पाठविणें. एक तर, दक्षणी सरदारांचा आमचा सलुख जाला आहे, आणि त्यांचे मर्जीशिवाय त्यांसीं बदसलुकी करून पातशाहाजाद्यास विना त्यांची मर्जी घेऊन आलां, ठीक नाहीं. तर, देखतपत्र पातशाहा-

जाण्यास माघारां राजश्री पाटीलबावापांशीं विदा करणें. ते पातशाहांस विनंति करून, पातशाहाजाद्याची तकसीर माफ करून, त्यांचे स्वाधीन करितील. तुह्मीं या बखेड्यांत न पडावें. ह्मणून लिहिलें होतें. त्याजवरून इष्टीन इंग्रज यानें पातशाहाजाद्यासमागमें दोन पलटणें देऊन, राजश्री सदाशिवपंत बक्षी, राजश्री पाटीलबावांकडील, यांजसमागमें बिदा केलें. ते लखनऊस आले आहेत. पुढें लष्करांत दाखल जालियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे. हे विनंति."

## लेखांक ११९.

श्री. २४ नोव्हेंबर इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजे. नवाब अफराशाबखान मारला गेला, त्याचा आरोप जयनुल अबदीखान यांजकडे आला. त्याजवरून त्यास कैद करून, गाढवावर बसऊन, तोंड काळें करून, लष्कराचे आसपास फिरऊन, भीक मागऊन, कैद करून ग्वालेरीस पाठविलें. दुसरे खुशालीराम, वकील राजे जयनगरकर यांचा, लष्करांत होता. तो पेशजीं राव राजा प्रतापसिंग माचेडीवाला याची दिवाणगिरी मुखत्यारी करून होता. अलिकडे नजबखानासीं मिळून, मागें रावराजास लुटविलें होतें ह्मणून, त्याची व यांची आकस होती. त्यास एका शिपायानें मारून टाकिलें. तो आरोप रावराजा प्रतापसिंग यांचे डिकऱ्यावर आला. त्याजवरून त्याचे लष्करावर दोन हजार फौजेची चौकी राजश्री पाटीलबावांनीं पाठविली आहे. पुढें जें ठरेल तें विनंति करूं. तात्पर्य, पैका मेळवावयाचे दिवस आहेत. श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेब दैववान आहेत, कीं त्यांचे प्रतापें ऐसीं यशें सेवक लोकांस यत्न न करितां येतात. ईश्वर त्यांस सदोदित बेमलामत राखो, आणि दिवसोंदिवस अधिक प्रताप हो. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १२०.

श्री. २४ नोव्हेंबर इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजे. छ० २६ माहे जिल्हेजीं पातशाहा आगऱ्याहून कूच करून, सिलम किस्ती दरगाहास जारत करून, मौजे फत्तेपुरीं समीप लष्कर अफरासिया-

बखान यांचें होतें, तेथें दाखल जाले. राजश्री पाटीलबावा भरतपूरचे नजीक होते. ते तेथून कूच करून पातशाहाचे लष्करासमीप आदकोसावर येऊन मुक्काम केला. छ. २९ रोजीं मिर्जा अकबरशाहा यांस पातशाहांनीं नवाब बेहरमखानास समागमें देऊन, सामोरा पाठविलें. राजश्री पाटीलबावांनीं आपले लष्कराबाहेर डेरा उभारला होता, तेथें त्यांस नेऊन बसविलें. हत्ती व एक घोडा ............ वस्त्रें व किस्ती जवाहीर व एकशें एक मोहोरा नजर व हमराही सरदार राजश्री कृष्णाजी पवार वगैरे यांनीं माफकमरातब नजरा देऊन, त्यांजसमागमें पातशाहापासीं येऊन, पातशाहाची मुलाजमत जाली. पायांवर डोई ठेवून एकशें एक मोहोरा नजर केली. पातशाहाजाद्यास पांच पांच मोहोरा नजर केल्या. यांजसमागमील सरदार कृष्णाजी पवार आदिकरून किरकोळी होते, त्यांनीं माफकमरातब अवघ्यांनीं नजरा केल्या. राजश्री पाटीलबावा यांचे पाठीवर पातशाहांनीं बहुत ममतापुरस्कर हात ठेऊन आज्ञा केली कीं, "तुह्मी उरुबरू बसा." त्याजवरून राजश्री पाटीलबावा बसले. पातशाहांनीं साता पारच्यांचा खिलत, जेगा बमय परगिरी, व शिरपेंच व मोत्यांची कंठी व हत्ती घोडा तरवार ढाल येणेंप्रमाणें सन्मान केला. हमराही कृष्णाजी पवार वगैरे सरदार होते, त्यांस खिलत पांच पांच पारच्यांचे बमय शिरपेंच, जेगे सुद्धां, सुमार खिलत ५० पन्नास व दुशाले सुमार १५० व गोशवारे १५० येणेंप्रमाणें, व तरवारीचे कबजे चार व वस्त्रें देऊन, सन्मान करून, दोन घटका पातशाहासीं खिलबत करून, रुकसत होऊन, आपले डेरियास जाऊन, पातशाहाचे लष्करचा व अफरासियाबखानाचे लष्करचा बंदोबस्त आपलीं पलटणें बसवून केला. शिवाय पाटीलबावांचे परवानगी, इकडून तिकडे कोणी जाऊं पावत नाहीं. अफरासियाबखान याचे लष्करांतून शिवाय परवानगी कोणी पातशाहापासीं जाऊं शकत नाहीं. पातशाहांचे लष्करचे अफरासियाबखान यांचे लष्करांत कोणी जाऊं पावत नाहीं. याप्रमाणें बंदोबस्त करून, पैका कराराप्रमाणें आणवावयाचा तगादा आहे. पुढें पातशाहाचे विचारें राजश्री पाटीलबावा मसलत ठरावितील, तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १२१.

श्री. इ. स. १७८४.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. लखनऊहून वर्तमान आलें कीं, इष्टिन साहेब इंग्रज याकडे कंपनीची बाकी विलायतेचे पातशाहाची आठरा करोड रुपये होती. त्यास चार

वर्षें आपल्यासीं व टिपू सुलतान हैदरनाईकासीं लढाई कायम राहिली, त्यांत तो ऐवज खर्च जाला. हें वर्तमान पातशाहांनीं कंपनीनें ऐकून, इष्टिनावर इतराजी केली कीं, इतका पैका सरकारचा खर्च करून, काम कांहीं न होतां वृथा पैका खर्च केला! ह्मणून इष्टिनानें आपली बिबी विलायतेस पाठवून, पातशाहाकडील मामला दुरुस्त करून, मशारनिल्हेस बहालीचीं वस्त्रें पाठविलीं. त्याजवरून यांनीं कांहीं कलकत्त्यांत व कांहीं चिनाडचे किल्ल्यांत, जिन्नस रुपें सोनें व पशमिना व बंगाली कापड वगैरे व खजाना नख्त ऐशा नावा भरून विलायतीस बिदा केलें. व पातशाहाकडून वस्त्रें बाहालींचीं आलीं होतीं तें घेऊन, अवघे इंग्रेज कंवसलवाले वगैरे होते, त्यांनीं नजरा केल्या. व फरोकाबाद व लखनऊस वगैरे जागा जागा इंग्रेज आहेत, त्यांस पातशाहांचीं चकतीं पत्रें विलायतीहून मेहेरबानगीचीं आलीं, त्यांच्या नकला करून वजीर असफदौला व पातशाहाजादा जुवांबख्त याजकडे पाठविल्या. त्याजवरून सर्वांनीं इष्टिनास नजरा व मुबारकबादीचीं पत्रें पाठविलीं आहेत. व मंदराज बंदराहून पत्रें इष्टिनास आलीं कीं, येथें खर्चाची व गल्ल्याची तंगी बहुत आहे, व टिपू सुलतान यांची लढाई कायम आहे. त्यास जर तुह्मांस यासीं लढाई कायम ठेवणें, तर गल्ला व खर्चास पैका पाठवून द्यावा. नाहीं तर आज्ञा कराल तर यासीं सलुख करूं. याजवरून यांनीं पत्राचें उत्तर दिल्हें कीं, पेशजीं तो तीन करोड रुपये मागत होता, त्याप्रमाणें त्यासीं बनेल त्या रीतीनें सलुख करावा. तिकडील मसलत आटोपली ह्मणजे आह्मांस दिल्लीप्रांतीं जाणें आहे. लखनऊस पातशाहाजादा आमची मार्गप्रतीक्षा करितो. म्हणून उत्तर लिहिलें. त्यास इष्टिनाची खातरजमा आपले खाविंदाकडून जाली. त्याचें मानस हिंदुस्थानांत पातशाहाजाद्यास घेऊन यावें. व राजश्री पाटीलबावांची व इष्टिनाची एकवाक्यता, इंद्रसेन साहेब व मेजर ब्रौन साहेब इंग्रेज यांजपासीं आहेत, त्यांचे विद्यमानें व सदाशिवपंत बक्षी यांचे विद्यमानें आहे. त्यांच्या यांच्या भेटी कालानरूप जालियावर कोणती मसलत करितात तें पाहावें. याप्रमाणें लखनऊहून वर्तमान लिहिलें आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १२२.

श्री. इ. स. १७८४ अखेर.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. इष्टिन इंग्रेज याजवर विलायतेस कंपनीची इतराजी जाली आहे. तेथून बाहाली दुसरा इंग्रेज या प्रांतीं पाठवावा, ह्मणून वर्तमान इष्टिनानें

ऐकून, आपली बायकोस विलायतेस कंपनीकडे रवाना केलें आहे कीं, तेथील तोडजोड करून आपली खिजमत कायम ठेवावी, या विचारांत आहेत. व फरासीचा फरसडांग ह्मणून कलकत्त्यासमीप जागा आहे, ते फरासिसांस देऊन त्यांसीं सख्य केलें व इकडे आपल्यासींही सख्य केलें आहे. एक हैदरनाईकाचे पुत्रासीं मात्र कटाक्ष आहे. त्यासींही सलुख करावा, या विचारांत आहेत. ह्मणून वर्तमान लखनऊहून आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. जुवांबख्त पातशाहाजादा लखनऊहून पांच कोस अलिकडे मुक्काम करून आहे. राजश्री सदाशिवपंत बक्षी, पातशाहाजाद्याची आज्ञा घेऊन, गयावर्जन करावयास गेले आहेत. ते आलियावर, तेथून कूच करून पातशाहापासीं व पाटिलबावांसीं येणार, ह्मणोन वृत्त आहे. श्रुत होय. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १२३.

**श्री.** इ. स. १७८४.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:— नवाब निजामअलीखान यांजपासीं नवाब असफउद्दौलाकडील वकील हैदराबादेस आहे. त्याचीं पत्रें लखनौस आलीं. त्यांत मजकूर कीं, नवाब निजामअलीखान यांनीं टिपूकडील मामला खातरखा करून घेतला, आणि मराठीयांचे मुलुखांतून व आपले मुलुखांतून टिपूस काढून दिल्हें; तो माघारां तुंगभद्रा उतरून आपले मुलुखांत गेला. ह्मणून लिहिलें होतें. हें पत्रें वाचून कासदास इनाम शंभर रुपये नवाब वजिरांनीं देऊन, मुनसीस आज्ञा केली कीं, आपलेकडूनही स्नेहवृद्धीचीं पत्रें लिहून द्यावीं, व आपले वकिलास पत्रांचे जाब लिहून द्यावे. ह्मणोन आज्ञा जाली. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १२४.

**श्री.** इ. स. १७८४.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. मेरटचे मुक्कामीं अफराशाहबखान यांनीं जाबतेखानास बोलावून आणून, परस्परें शपथप्रमाण जालें कीं, तुह्मीं आह्मीं एकविचारें असावें.

ह्मणून एकवाक्यता करून, परस्परें वस्त्रें, हत्ती, घोडे देऊन घेऊन, मसलत ठैराविली कीं, आह्मी दिल्लीस जातों. तेथें गेलियावर पातशाहास घेऊन जयपुराकडे मुलुखगिरीस जाऊं. तुह्मीं या प्रांतीं अंतर्वेदींत शिखांचा बंदोबस्त करून असावें. दिल्लीप्रांतीं शीख धामधूम न करीत, तें करावें. ह्मणून बोलणें करारांत आणून, जाबतेखानास गोसगडास रुकसत केलें, आणि आपण दिल्लीस आले. मार्गीं येतांना, जेनुल अबदीखान, मिर्जासफीखानाचा भाऊ, यासमागमें स्वार पलटणें होतीं, तें फोडून आपले लगामीं लावून घेतलीं; व त्यांस कांहीं परगणे लावून देणें करार केले होते ते न देतां, दों घोड्यांनिसीं व एका पालखीनसीं हमसिराबेगमेसमागमें बतरीक नजरबंद ठेविले आहेत. दिल्लीस आलियावर आपले घरीं सत्तर खिलत, निमअस्तिना, कारचोबी व गोशवारे व कारचोबी जामे तयार करून, पातशाहाची भेट घेतली. पातशाहास एकवीस मोहरा व शाहाजाद्यास दोन दोन मोहरा मिळून एकशेंवीस मोहरा नजर करून, सिलेमा सीको पातशाहाजाद्यासुद्धां भेटले. अफराशाहबखानास सरबस्ता पागोटें व बमय गोशवारा व मुकेशी तुरा व निमअस्तिन भरजरी व हत्ती घोडा, मोत्यांची कंठी व जेगा शिरपेंच व ढालतरवार येणेंप्रमाणें; व सिलेमा सीको पातशाहाजाद्यास सरबस्ता पागोटें, बमय गोशवारा, मुकेशी तुरा व निम अस्तिन येणेंप्रमाणें; व सत्तर खिलत समागमें करून आणिले होते, ते सर्व जमादार समागमीं व वकील राजे जयपूर व बिकानेर व रावराजांकडील वगैरेस, जो ज्याप्रमाणें होता त्यांस देऊन, डेऱ्यास रुकसत जालें. त्यासमयीं सिलेमा सीको पातशाहाजाद्यांस पातशाहांनीं ठेवून घेतलें कीं, यास आपले मातुश्रीस भेटावयास सोडून जाणें. ह्मणून बोलून पातशाहाजाद्यास ठेवून घेतलें. दुसरे दिवशीं पातशाहाजाद्याच्या बायका व डेरे, हत्ती, घोडे, सरंजाम, जो अफराशाहबखानाचे लष्करांत होता, तो सर्व आणून घेतला. तेव्हां अफराशाहबखान यांनीं विषम मानिलें. तेव्हां त्यांस बोलावून आणून, अबदुल अहद्खान यांचे विद्यमानें पातशाहांनीं समाधान केलें कीं, "जिकडे स्वारीस चालणें तिकडे आह्मीच चालतों. नाहींतर एक पातशाहाजादा काय, चौघे पातशाहाजादेच पाहिजेत तर समागमें देतों." ह्मणून समाधान करून, चारखोन अन्नाचे भक्षावयास उच्छिष्ट पाठवून, समाधान करून, डेरियास रुकसत केलें. आणि आज्ञा केली कीं, "आमचे स्वारीची तयारी करणें. आह्मीच स्वारीस चालावयास सिद्ध आहोंत." ह्मणून बोलले. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १२५.

श्री. इ. स. १७८४.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. नागपूरकर भोंसले यांनीं पत्र इष्टिनास कलकत्त्यास पाठविलें कीं, आह्मांस दररोज पत्रें टिपू सुलतान, हैदरनाईकाचा पुत्र, याचीं येतात कीं, श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबांसीं व आह्मांसीं सलुख एकदिली आहे. तुह्मीं इंग्रेजांची रफाकत करणें ठीक नाहीं. ह्मणून इष्टिनास आपले स्नेहवृद्धीकरितां पत्र लिहिलें होतें. त्याचें उत्तर इष्टिनानें पाठविलें कीं, तुह्मांस हैदरनाईकाचे पुत्राचें पत्र आलें आहे, तें आह्मांस पहावयास पाठवणें. व इकडून गल्ला व चार पलटणें मंदराज बंदरास रवाना केलीं आहेत, तें आपली हद्दपार करून देणें, ह्मणून लिहिलें. व मंदराज बंदराहून पत्र इष्टिनास आलें कीं, हैदर नाईकाचे पुत्रानें रात्रीं मंदराज किल्ल्यावर छापा घातला. त्याजकरितां दरवाज्यावर गोरे वगैरे लोक होते ते, व त्यांचीं कुटुंबें, लेंकरेंबाळें, बहुत माणसें व हशमांचा सरदार मारला गेला. पुढें त्याजकडे फौजेची निगादास्त जारी आहे. ह्मणून घाबरून पत्र मंदराजचे किल्लेदारानें पाठविलें होतें. त्याचें उत्तर इष्टिनानें पाठविलें कीं, गल्ला व चार पलटणें येथून रवाना केलीं आहेत, तें पावतील. परंतु लिहिल्या-प्रमाणें त्यासीं सलाह करणें. ह्मणून वर्तमान लखनऊहून आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. व इष्टिनाचे बिबीनें कंपनीची रजावंदीप्रमाणें मामला फैसल करून, कलकत्त्याचे आदालतीची खिजमत आपले नांवें करून घेऊन, त्याजपासून आज्ञा घेऊन, तीही कलकत्त्यास येणार ऐसें वृत्त आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

सेवेसीं विनंति सेवक शंकराजी सखदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. लिहिलें परिसोन कृपा केली पाहिजे. जाहीरदारीचें वर्तमान लखनऊहून व पातशाहाकडील व राजेश्री पाटिलबावाकडील श्रवणांत आलें, तें विनंति लिहिली आहे. कृपा करणार धणी समर्थ आहेत. हे विज्ञप्ति."

---

## लेखांक १२६.

पैवस्ती चंद्र २८ रविलावल. श्री. ६ जानेवारी इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत चंद्र २४ माहे सफर जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः—

पेशजीं चंद्र २७ मोहरमीं विनंतिपत्रें पै दर पै व पारसी वाकायाच्या फर्दा दररोजच्या पाठविल्या, ते पाऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, रावराजा प्रतापसिंग व रंजितसिंग जाट व राजे प्रतापसिंग जैपूरकर वगैरे किरकोळ कोठडीवाले रजपूत यांजकडील मामले करून, ऐवज नख्त व किस्तबंद्या करून, कूच करून, पातशाहा व राजश्री पाटिलबावा डिगेस येऊन, आगरियाचे किल्याचा बंदोबस्त करून, श्रीमथुरेवरून दिल्लीस जाणार. दिल्लीस दाखल जालियावर शिखांचा बंदोबस्त होणें, तो होईल. शीख जयसिंग कन्हया वगैरे आणीक मातबर सरदार दोनचार जमूकडे गेले होते. तेथील राजास खारीज करून, दोन प्रहरपर्यंत तमाम साहुकारा वगैरे लाखों रुपयांची लूट बहुत जाली. शेवटीं तेथें आपला अंमल केला. त्यास तेथील हवा न मानली. जयसिंग कन्हया वगैरे सरदार व फौजेचे लोक बहुत मृत्यु पावले. ऐसें वर्तमान आलें. परंतु राजश्री पाटिलबावांसमागमें फौज थोडी, याजकरितां कांहीं दिवस बंदोबस्तास दिवसगत लागणें ते लागो. त्यास श्रीमंत राजश्री पंतप्रधान व आपणास रविसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत. ते स्वीकारून उत्तरीं सनाथ करावें. वाकायाच्या फर्दा पातशाहांकडील व राजश्री पाटिलबावांकडील व वजिराकडील लखनऊचें वर्तमान रोजच्या फरदा पारसी पाठविल्या आहेत. त्याजवरून किरकोळी वृत्त सविस्तर कळं येईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे. हे विनंति.”

---

## लेखांक १२७.

पैवस्ती चंद्र २१ रविलाखर

सन खमस समानीन फाल्गुन मास. **श्री.** ३१ जानेवारी इ. स. १७८५.

“श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत चंद्र १९ माहे रविलावल जाणून स्वानंदलेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं चंद्र २४ सफरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा व राजश्री पाटिलबावा यांणीं जयपूर व रावराजा माचेडीवाला व रंजितसिंग जाट वगैरे कोठडीवाले रजपूत यांजकडील मामले करून माघारा डिगेस आले. डिगेचे किल्यांत हशम होते, त्यांची तलब पंधरा हजार रुपये चढले होते. ते त्यास देऊन, किल्ला खाली करून, देवजी पाटील नामें किल्लेदार करून, एक पलटण किल्यांत व शहरांत

आपला अंमल केला. पुढें आगरियाचे किल्ल्याचा जाबसाल आहे. सुजादिनखान पठाण, आफराशाहबखान यांचा सासरा, किल्लेदार आगरियाचा आहे. त्यानें जुंझाची तयारी केली आहे. परंतु जाबसाल होऊन मासपक्षांत आगरियाचे किल्ल्यांतही अंमल करून, मग पातशाहासुद्धां दिल्लीस जाणार. आगरे प्रांताचा तमाम मुलुखाचा बंदोबस्त जाला. राजश्री अंबाजी इंगळे यांस दिल्लीचे बंदोबस्तास व पानिपतपावेतों शिखांचे बंदोबस्तास रवाना केलें आहे. ते लष्करांतून निघून दोन मजला मेवातेकडे गेले आहेत. मेवातचा बंदोबस्त आठा पंधरा दिवसांत करून दिल्लीस जाणार. व राजश्री बापूजी मल्हार यांस तमाम अंतरवेदींतील बत्तीस माहाल यांचे बंदोबस्तास पाठविले आहेत. ते हंसीयागंजाजवळ नजीक मथुरा, मुक्काम करून, खुरजा शिकंदरापावतों ठाणीं बसवून, पुढें मेरटेकडे येणार. याप्रमाणें वर्तमान आहे. लखनऊहून वर्तमान आलें कीं, मुसाकश साहेब यांचें पत्र मंदराजचे किल्याहून आलें. इष्टिनास कीं, तुह्मांस टिपू सुलतान यासीं सलुख करणें असेल, तर लिहून पाठवणें. आह्मी यासीं सलुख करूं. यांनीं त्या पत्राचें उत्तर पाठविलें कीं, आह्मांस त्यासीं सलाह करणें जरूर आहे; परंतु शिवाय मंदराजचे किल्याचें बोलणें ठरल्यास सलूख करूं, ह्मणून उत्तर लिहून पाठविलें. व कानपुरीं करनेल लास साहेब आहे, त्यास पत्र आलें कीं, एक कंपू तुह्मीं तेथें चाकर ठेऊन तयार करणें; आह्मी जलद लखनऊस येतों ह्मणून. याप्रमाणेंच फरोकाबादेस व लखनऊस ऐसी तीन ठिकाणीं तीन कंपू चाकर ठेवावयाची परवानगी पाठविली आहे, व इकडे यावयाची गरमीही केली आहे. मग न जाणो, मंदराजचा किल्ला जेर बहुत जाला आहे, तिकडे कुमकेस जाईल किंवा इकडे येईल, हें नकळे. व कंवसलवाले फिरंगी इष्टिनास बोलले जे, राजे चेतसिंग यांची आबदी कासीद कराल, तर आह्मी जामीन होऊं. त्यास आबद करावें. इष्टिनानें उत्तर दिल्हें कीं, तो आपल्या आपुन आल्यास आबदी करूं, ह्मणून बोलला. याप्रमाणें आहे. पुढें अंमलांत येईल, तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.

पातशाहाकडील व राजश्री पाटिलबाबाकडील रोजच्यारोज वाकायाच्या फरदा व लखनऊकडील ऐशा पारशी पाठविल्या आहेत. त्यांजवरून दररोजचें वर्तमान श्रुत होईल. कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १२८.

पौ. छ १९ जमादिलावल **श्री.** २७ फेब्रुवारी इ. स. १७८५.
सन खमस समानीन–अधिक चैत्र मास.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागायत छ. १७ माहे रविलाखर जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं छ० १९ रविलावलीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पावून सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, पातशाहा व राजश्री पाटीलबावा दिगेस आहेत. नवाब नजबखान व नवाब अफराशाहाबखान यांचा तोफखाना बजितखान पठाण याजकडे होता. त्याचा भाऊ सुजादिलखान अकबराबादेचे किल्ल्यांत किल्लेदार आहे. त्यास तगीर करून रायाजी पाटील यांस आग्र्याच्या किल्लेदारीची सनद देऊन पाठविलें. त्यास सुजादिलखानानें किल्ला द्यावयास अनमान केला. लढाईची तयारी करून आहे. हें वर्तमान राजश्री पाटीलबावांनीं ऐकून बजितखान, मशारनिल्हेचा भाऊ, यास कैद करून, दरोबस्त तोफखान्यांत आपला अंमल केला; आणि तोफखान्याचे बैलांस घासदाणा लालजी सराफ याजकडून देविला. व आग्र्यास राजश्री खंडेराव हरी यांजला सामानसुद्धां पाठवावें आणि किल्ला खाली करून घ्यावा, या विचारांत आहेत. पेशजीं आग्र्यास राजश्री रायाजी पाटील यांस पाठविलें आहे. त्यानें तमाम शहरांत व गंजांत व मंडींत वगैरे दरोबस्त आपला बंदोबस्त करून, आग्र्याचे किल्ल्याचे आसपास मोर्चे लाविले आहेत. सुजादिलखानासमागमें चांद पलटण तैनातीस अफराशाहाबखान यांनीं करून दिल्हें होतें, तें फुटून रायाजी पाटील यांजकडे येऊन मिळालें. त्याजवरून सुजादिलखान ढिला होऊन, पातशाहांस व राजश्री पाटीलबावांस अर्जी पाठविली आहे कीं, "मी गुलाम खानाजाद आहें. मजला कौलनामा पाठवून द्यावा. ह्मणजे मी किल्ला खाली करून देऊन, मी हुजुरांत येईन." याप्रमाणें त्याचीं पत्रें आल्यावर अनुपगीर गोसावी यानें अफराशाहाबखान याचे पुत्रास राजश्री पाटीलबावांचे डेऱ्यास घेऊन जाऊन, त्यास हत्ती, घोडा, मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच, वस्त्रें देऊन, सा लक्षांचा सरंजाम मशारनिल्हेस, व दो लक्षांचा सरंजाम सुजादिलीखान व बजीदखान यांस; एकूण आठ लक्षांचा सरंजाम, व कोलचा किल्ला व अलीगड व मुंडसान ऐसीं तीन स्थळें त्यांचीं त्यांजकडे व तिन्ही किल्ले त्यांचे तावीन ठेवावे, ऐसा करारमदार जाला आहे. त्यास दो चौ रोजांत आग्र्याचा किल्लाही खाली होऊन, आपला अंमल

दाखल होईल. तिकडील प्रांताचा तो दरोबस्त बंदोबस्त दीगचे किल्ल्यासुद्धां राजश्री पाटीलबावांचा जालाच आहे. आग्र्याचे किल्ल्यांत ठाणें दाखल जालें ह्मणजे राजश्री पाटीलबावा पातशाहासुद्धां दिल्लीस जाणार. व राजश्री आंबाजी इंगळे यांस दिल्लीचे बंदोबस्तास पेस्तर रवाना केलें होतें, त्यास ते छ. १ रोजीं शनवारीं दिल्लीस दाखल होऊन, दरोबस्त शहरचा व दरवाजीयाचा बंदोबस्त नवाब नजबकुलीखान यांचा होता तो उठवून, मशारनिल्हेनीं आपला बंदोबस्त केला. व दिल्लीचे आसपास गुजर धामधूम करून होते, त्यांपैकीं दोन अडीचशें गुजर पाळत लावून, एका गुजराचे घरीं लग्न सुरजपुरासमीप होतें तेथें फौज पाठवून, दोन अडीचशें गुजर मारून टाकिले, व कांहीं धरले. जिवंत आले त्यांस कोतवालाचे स्वाधीन करून, त्यांसहि मारून टाकिलें. दुसरे दिवशीं कूच करून कालिकेचे आसपास वीस कोस लांब पहाड आहे, तेथें रावराजा व नजबकुलीखान व दरोबस्त मोंगलिये सरदार ऐसे मशारनिल्हेचे तैनातीस आहेत त्यांजसुद्धां व आपली फौज मऱ्हाठी हजार बारांशें आहे त्यासुद्धां जाऊन, तमाम पहाडास घेरा घालून, गुजरास कोंडिलें आहे. त्यास यांचे चित्तांत आहे कीं मारून कत्तल करावी. जर रात्रीस पळून गेले तर गेले, नाहींतर मारून कत्तल करतील. याप्रमाणें दिल्लीचा बंदोबस्त करून, शिखांचे पारपत्यास पुढें एक मजल सोनपताचे रोखें हरणमुजाऱ्यापासीं मुक्काम करून असावें, या विचारांत आंबाजी इंगळे आहेत. व बापूजी मल्हार त्यांचा दिवाण सेणवाई आहे, त्यास बत्तीसा महालांची सनद अंतरवेदींतील चकले, शिकंदरा, वगैरे अठ्ठावीस महाल, व कोल वगैरे चार महाल, ऐसे बत्तीस महालांची मामलत सांगून, दोन हजार स्वार, व दोन तीन पलटणें प्यादे ऐसें समागमें देऊन पाठविले आहेत. त्यांनीं कोलखुर्जापासून तों मेरटेपावेतों तमाम बंदोबस्त करून आपलीं ठाणीं बसविलीं. पुढेंही ठाणेबंदी करीत गोसगडाकडे जावें या विचारांत आहेत. व मेरटप्रांतांत शीख होते ते तमाम जमा होऊन, गोसगडापासीं जमाव करून आहेत. व पलीकडे कुरुक्षेत्राकडून व हरिद्वाराकडून पंधरा वीस हजार शीख जमाव धरून, हरिद्वारासमीप शुक्रतालाचे खादरांत मुक्काम करून आहेत. त्यांचें मानस कीं, मेरटेहून अलीकडे दक्षण्यांची फौज आली ह्मणजे त्यांशीं झुंजावें, या विचारांत आहेत. त्याजवरून राजश्री आंबाजी इंगळे यांनीं राजश्री बापूजी मल्हार यांस पत्रें पाठविलीं आहेत कीं, तुह्मीं जलदी करून पुढें न जाणें. तिकडून कूच करून लोणीजलालाबादेसमीप यमुनातीरीं यावें. तुह्मी आह्मी एक होऊन, मग पुढें शिखांचे पारपत्याची तजवीज करणें ते करूं. याप्रमाणें पत्रें गेलीं

आहेत. त्यास तेही कूच करून दिल्लीसमीप येणार. ते व हे एकत्र जालीयावर जे मसलत करणें ते करावी, ऐसा विचार ठरला आहे. तात्पर्य, श्रीमंत साहेबांचे प्रतापें दिल्लीपावेतों सरकारचा बंदोबस्त जाला; व पुढेंही साहेबांचे प्रतापें शिखांचें पारपत्य होऊन, लाहोरपावेतों बंदोबस्त बहुत यत्न न करितां होईलसा दिसतो. याचें कारण हेंच कीं, तमाम जमीदार शिखांशीं फुटून पेस्तर पुढें येऊन, आपलीं ठाणीं घेऊन जातात, आणि शीखही एकविचारें नाहींत. ते एकमेकांत विरुद्ध करून आहेत. याजकरितां ऐसें दिसतें कीं, लाहोरपावेतों अंमल दसऱ्यापावेतों होईलसा प्रकार आहे. परंतु दक्षणी फौज थोडी आहे, याजकरितां मात्र चित्तांत संशय वाटतो. आजपावेतों प्रकार जाला, तो एक श्रीमंतसाहेबांचे पुण्य साहाय्य आहे, तर अटकेपावेतों बंदोबस्त होईलसा समय घडून आला आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १२९.

श्री. फेब्रुवारी इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, इष्टीन साहेब यांस विलायतेहून चकती त्याचे बिबीनें बहालीची पाठविली होती, ते कृत्रिम करून पाठविली होती. विलायतेचे पातशाहाची इतराजी इष्टीनावर आहे, ते तैसीच आहे. इष्टीनाकडे बाकी निघाली आहे, त्यापैकीं तूर्त दोन करोड रुपये पातशाहा मागतात. त्यास इष्टीनानें उत्तर केलें कीं, मंदराजचे किल्ल्यावर टिपू सुलतान यांचे लढाईत वगैरे तमाम खर्च जाला; आतां आह्मांपासीं पैका द्यावयास कोठें आहे? व तमाम लोकांत शोहरत जाली कीं, यास पातशाहांनीं बोलाविलें आहे, व यांची तगीरी जाली आहे. याजकरितां आतां आह्मांस येथें राहणें ठीक नाहीं. ह्मणून विलायतेस जायाची तयारी केली आहे. याजपासीं कंवसलवाले इंग्रेज हुजुरचे आहेत. त्यांनीं सल्ला दिधली कीं, तुह्मीं हे जागा खाली टाकून जाणें ठीक नाहीं. याजकरितां आपला अहवाल लिहून विलायतेस पाठवावा. त्याचें दुसरें उत्तर चकती बोलावण्याची आली ह्मणजे जावें. तोंपावेतों जावयाचा मनसबा तहकूफ असूं द्यावा. याप्रमाणें मसलत ठेरली आहे. परंतु विलायतेस जावयाकरितां त्यांनीं एक हजार जहाज बजेर तयार केले आहेत. व कलकत्त्यास मिस्तर परलंग साहेब यांस कोठीयांचा वगैरे मुख्त्यार करून ठेविलें आहे. व जरनेल इष्टवरीष्ट यास दरोबस्त कंपूचा मालक, हिंदुस्थानचे फौजेचा बहाली बरतर्फीचा मुख्त्यार

केला आहे. याप्रमाणें बंदोबस्त करून आपण छ० २० रविलावलीं कलकत्त्याहून कूच करून नवशें इंग्रेज समागमें घेऊन इष्टीन साहेब विलायतेस गेले. जाते समयीं सर्वांचें समाधान केलें कीं, आठ महिने जाणें येणें यास लागतील; आणि एक महिना पातशाहापासीं राहून दहावे महिन्यांत सत्वरच माघारा येतों. ह्मणून सर्वांचें समाधान करून, एक हजार जहाज व शिवाय नावा व नावाडे ऐसे भरून, सरंजाम या प्रांताचा तोफातायफ जिन्नस व नख्त घेऊन गेले. ह्मणून वर्तमान लखनहून आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

पैवस्ती छ० १५ जमादिलाखर **लेखांक १३०.**

सन खमस समानीन चैत्रमास. **श्री.** ३१ मार्च इ. स. १७८५.

''श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १९ माहे जमादिलावल जाणून स्वानंद लेखन आज्ञा करीत असिलें पाहिजे. विशेषः– इकडील वर्तमान छ० १७ रविलाखरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त कळलेंच असेल. हल्लीं वर्तमान तर आज एक मास जाला, राजश्री पाटिलबावा व रायाजी पाटील यांस आगरियाचा किल्ला घ्यावा ह्मणून डिगेचे मुक्कामींहून रवाना केलें होतें. त्यास हे आगरियास जाऊन शहरांत अंमल करून किल्ल्यास मोर्चे लाविले होते. त्यास छ० ११ मीनहूपावेतों किल्ला झुंजला. निदान भवानीसिंग वगैरे पलटणवाले व गोलंदाज किल्ल्यांत होते, ते फुटून छ० १२ मीनहूस येऊन, रायाजी पाटील यांस भेटून, मागील तलब द्यावी आणि पुढें आमचे जायदादेचा बंदोबस्त करून द्यावा ह्मणून बोलून, परस्परें वचनप्रमाण होऊन, छ० १५ मीनहूस आगरियाचे किल्ल्यांत राजश्री पाटिलबावाकडून धनपतराव नामें गृहस्थ दाखल जाला. सुजादिलखान यांजकडील अमलाफैला सर्व किल्ल्यांतून बाहीर निघून जुमामहजदपाशीं येऊन, डेरा केला आहे. किल्ल्यांत राजश्री पाटिलबावांकडील बंदोबस्त जाला. व सुजादिलखानाचेही भेटीचा ठराव राणेखानभाई व रायाजी पाटील यांचे विद्यमानें ठैरलें आहे कीं, मशारनिल्हेसही जायदाद लाऊन देऊन, त्यांचेंही चालवावें ह्मणून ठैरलें आहे. त्यास पुढें एक विचार आहे कीं, श्रीयमुना उतरून, प्रांत कोल समीप रामगड–अलिकडे नजबखानानें 'अलीगड' ह्मणून नांव ठेविलें आहे–तेथें जाऊन तोही किल्ला खाली करून, आपला अंमल करून पात-

शाहासुद्धां दिल्लीस जावें, हा एक विचार आहे. परंतु पातशाहा दिल्लीस जावयाची जलदी बहुत करितात. याजकरितां दुसरा विचार आहे कीं, अलीगडाकडेस एक सरदार मातबर व फौज पलटणें समागमें देऊन, त्यास तिकडे रवाना करावें. व पातशाहासहित आपण दिल्लीस जावें. ऐसे दोन विचार ठैरले आहेत. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं. वरकड बारिक मोठें वर्तमान रोजच्या वाकायांच्या फर्दा पातशाहाच्या दरबारच्या व राजश्री पाटिलबावांच्या व वजिराचे दरबारच्या व कलकत्त्याकडील वर्तमान सविस्तर पारसी फर्दांवरून कळेल. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० २८ रज्जब सन खमस समानीन वैशाख मास.

## लेखांक १३१.

श्री.

४ मे इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २४ माहे जमादिलाखर मुक्काम श्रीमथुरा जाणोन स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशर्जी छ० १७ जमादिलावलीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहांनीं राजश्री पाटिलबावांस सांगून पाठविलें कीं, आमचें दिल्लीस कूच आहे. त्याजवरून यांनीं आपले कारभारी राणेखानभाई व आबा चिटणीस व माधवराव गंगाधर व आंबाजी इंगळे यांस पाठवून विनंति केली कीं, आणीक पंधरा दिवस मुक्काम करून असावें. या अवसरांत रामगडाचा बंदोबस्त होईल. मग येथून कूच करावा. ह्मणून बोलून दुसरे दिवशीं आपण पातशाहापासीं जाऊन, त्यांचें यांचें बोलणें होऊन, एक लक्ष रुपये खर्चास एकमाहा देऊन, येथें आणीक पंधरा दिवस मुक्काम ठैराविला आहे. व या दिवसांत मेजर ब्राऊन यांचे येथें दोन वेळां खासे गेले होते; आणि त्यांजकडील मोलवी ह्मणून वकील आहे, त्यासींही बहुत खलबत असतें. काय मजकूर आहे, हें समजल्यांत येत नाहीं. समजल्यांत आलियावर विनंति लिहूं. रामगड व अलीगड यांचें बोलणें राजश्री आंबाजी इंगळे व सुजादिलखान पठाण यांचें विद्यमानें लागलें आहे. त्यास मासपक्षांत तेथेंही सरकारचा अंमल जाला, ह्मणजे पातशाहासमागमें आंबाजी इंगळे यांस देऊन, पातशाहांची रवानगी दिल्लीस करावी आणि आपण खासा स्वारी जयपुराकडे स्वारीस जाणार, ऐसा विचार आहे. व श्रीमंत साहेबांस पातशाहाकडून खिलत वस्त्रें व नालकी व माहीमरातब व तोबतुमन व हत्ती घोडा व

ढालतरवार, मोत्याची कंठी व शिरपेंच जेगा बमय कलगी वगैरे तरकश कमाना व तरवार आणिक किरकोळी सरंजाम वगैरे जिन्नस आपलेकडून येथून गंगाजी हुजरे व आनंदराव नरसी यांचा पुत्र लक्ष्मणपंत यांजसमागमें रवाना केला आहे; तो सेवेसीं पावेल. आह्मीं यांसी विनंति केली कीं, "पातशाहाकडून वस्त्रें घेऊन जावीं, हा ओहोदा आमचा आहे." त्यास भाईनीं उत्तर दिल्हें जे, "राजश्री देवराव महादेव वस्त्रें घेऊन गेले, ते परभारां झांसीहून गेले. ते यांस पुसून देखील गेले नाहींत! तेव्हां हा प्रकार कैसा घडतो?" ऐसें बोलणें जालें. त्यास आह्मी सांप्रत येथें लष्करांत आहों. परंतु राजश्री पाटिलबावांचें लक्ष आह्मांकडे नाहीं. तीर्थ रक्षून मात्र आहों. इकडील बंदोबस्ताचा प्रकार ह्मणावा, तर दक्षिणी फौज केवळ थोडी. नजबखानासमागमील फौज व तोफखाना आहे, त्याचा सरंजाम प्रो आहेत, ते त्यांजकडे बदस्तुर आहेत. नजबखानाचा व अफराशाबखानाचा व पातशाहाचा खालसा मुलूख जो होता, तो यांनीं आपला अंमल बंदोबस्त केला आहे. व खंडेराव हरी भेलशाचे कमाविसदार यांजसमागमें फौज देऊन बुंदेलखंडांत बुंदेल्याचे बंदोबस्तास रवाना केले आहेत. तिकडे रजवाडे आहेत त्यांजपासोन पैका घ्यावा, या लक्षांत आहेत. या दिवसांत गोसावी अनुपगीर व राजे नारायणदास त्यांसी व यांसी चित्तशुद्धता नाहीं. अनुपगीर व नारायणदास एकविचारें आहेत. पाहावें, मासपक्षांत प्रकार कैसा घडतो! सांप्रत परमेश्वरानें मुलूख बहुत दिल्हा आहे, परंतु मुलकाचा बंदोबस्त नाहीं. कारभाराचा आटोप नाहीं. याप्रकारचें येथील वृत्त आहे. येथील बारीक मोठें वर्तमान सविस्तर राजश्री सदाशिव दिनकर विनंति लिहितच असतील. त्याजवरून श्रुत होत असेल. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १३२.

श्री. ४ मे इ. स. १७८५

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. ज्या समयीं अफराशाबखान मारला गेला, त्या समयीं राजश्री पाटिलबावा यांजकडे पातशाहांनीं आपले घरची मुख्त्यारी द्यावी, ऐसा विचार ठैरला. त्या समयीं पातशाहांनीं वकीलमुतलकीच्या दोन फर्दा दसखत केल्या. एक श्रीमंतांचे नांवें व एक राजश्री पाटिलबावांचे नांवें. व दोन फर्दा मीरबक्षी-गिरीच्या, एक श्रीमतांचे नांवें व एक राजश्री पाटिलबावांचे नांवें; एकूण चार फर्दा दोघांचे नांवें दसखत करून, यांजकडे पाठविल्या. आणि सांगून पाठविलें

कीं, "दोन खिजमता तुह्मांकडे सांगितल्या आहेत. त्यास पाहिजेल तर श्रीमंतांचे नांवें कारभार शिक्का खोदून करा; आणि पाहिजेल तर तुह्मी आपलें नांवें शिक्का खोदून कारभार करा. जे उत्तम सल्ला असेल तें करावें." ह्मणून राजश्री आनंदराव नरसी यांजसमागमें सांगून पाठविलें. त्यास यांनीं आज आठ नव महिने जाले, आपलेच नांवें वकीलमुतलकीचा शिक्का खोदून कारभार चालविला, आणि खिलत वस्त्रें सरकारांत रवाना केलीं. त्यास कांहीं हिसकासा बसून उज्जनीस ठैरली, आणि सरकारची मर्जी कांहींसी खटीसी आढळली. याजवरून हल्लीं वकीलमुतलखीचा शिक्का दुसरा खोदून चालविला आहे. त्याची नक्कल पेशर्जी सेवेसीं पाठविली आहे. त्यावरून व राजश्री सदाशिव दिनकर यांनीं कोरे कागदावर वठऊन, दोन शिक्के करून, यांस पुसून आपलेकडे पाठविले आहेत. त्या अक्षरांचा भाव मुनसीनें सर्व समजाविलाच असेल. त्यास पातशाहांनीं दुहीरी फर्दा दसकत करून दिघल्या आहेत. हें वर्तमान पहिलें कांहीं समजलें नव्हतें. त्यास सरकारची लक्षता पाहून यांनीं दुसरा शिक्का खोदला. तेव्हां हें वर्तमान समजल्यांत आलें कीं, पातशाहांनीं दुहीरी फर्दा दसखत करून पाठविल्या होत्या. हें वृत्त हल्लीं श्रवणांत आलें, त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १३३.

श्री. मे इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. रंजितसिंग जाट व रावराजा प्रतापसिंग माचेडीवाला यांजकडील मामलत जाली. मौजे सैदपूर येथून कूच करून, नजीक वैर तेथें जाऊन, मुक्काम करून पातशाहासुद्धां आहेत. तेथें राजे प्रतापसिंग जैपुरकर यांजकडील मामलत करून दिल्लीस जाणार. पातशाहांनीं राजश्री पाटिलबावा यांचे विचारें श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबांस मुखत्यारन-मुलुख किताब घेऊन, वस्त्रें हत्ती घोडा जेगा बमयपरगिरी व शिरपेंच बमयलटक व मोत्यांची कंठी माहीमरातब नगारा ढाल तरवार येणेंप्रमाणें खिलत घेऊन, एकशें एक मोहर श्रीमंतांकडून नजर पातशाहास केली. व पांच मोहरा तरवारीच्या नजर केल्या. व रावराजा याजकडील मामलत फडशा जाली, ह्मणून त्यास हत्ती, घोडा, वस्त्रें, जेगा, शिरपेंच, तरवार देऊन, त्यास आपले घरास रुकसत करविलें. श्रीमंतांचा खिलत पुण्याकडे रवाना करून, चंद्र २१ मिनहूस श्रीमंत राजश्री

पंतप्रधान स्वामी यांचे नायबतीचीं वस्त्रें मुखत्यारीचीं आपण घेतलीं. चारकुबा व नालकी पातशाहांनीं दिधली. चारकुबा ह्मणजे एक आंगरखा असतो, त्यास बाह्या नाहींत. बाहूपावेतों आणि आगापिछा मात्र असतो. आणि आघाडीस व बाहूवर मोत्याची झालर लागली असते. यास 'चारकुबा खिलत' ह्मणतात. आण नालकीही जाली. हा खिलत व मुखत्यारन-मुलुख ह्मणिजे मुतलख-वकील याचा मरातब जाला. पातशाहाजाद्यांनीं देखील आपले कामासाठीं यांचे घरास जावें, चिंता नाहीं. याप्रमाणें आहे. खिलत घेऊन पातशाहांस पांचशें मोहरा नजर केल्या, आणि रुकसत होऊन आपले डेरियास आले. त्यासमयीं मार्गांत हिंमतबहादर गोसावी व नारायणदास वगैरे कुल फौज मोंगलिये, परा धरून डावे बाजूस, व दरोबस्त राजश्री पाटिलबावांची फौज परा धरून उजवे बाजूस, सर्वांनीं मुजरा केला. आपले डेरियास दाखल जालियावर माफक मरातब सर्वांनीं नजरा दिधल्या, आणि मुखत्यारीचे दसकत करूं लागले आहेत. आणि किताबाप्रमाणें मोहर खोदविली आहे. रावराजा यानें राजश्री पाटिलबावां-पासून रुकसत होऊन, जातेसमयीं विनंति केली कीं, "जयपुरकर मामलत करीत असतील तर उत्तम; नाहीं तर मजला आज्ञा करावी. राजे पृथ्वीसिंग यांचा पुत्र कृष्णगडीं आपले अजूळीं आहे, त्यास आणून राज्यीं बसऊन द्यावें. मी पैक्याची निशा करून देतों." याप्रमाणें बोलणें बोलून रुकसत जाला. त्याजवरून जयपूरकराकडे मामल्याची ताकीद आहे. त्याजकडीलहीं वकील नित्यानीं बोलणीं बोलतात. मामल्याचे आंखाचा बंद बसत नाहीं. ह्मणून पातशा-हासुद्धां जयपुराकडे कूच केलें आहे. त्यास जयपूरकरांत कांहीं जीव नाहीं कीं कटकट करावी. राजश्री पाटिलबावांचे मर्जीनरूप मामलत करितील. तेथील मामलत जाली ह्मणिजे पातशाहांची मर्जी आहे कीं सत्वर दिल्लीस जावें. नित्याची नित्य वाकायाच्या फर्दा पारसी एकत्र करून चंद्र २२ पावेतों पाठ-विल्या आहेत. त्यास मुनशीजीस एकीकडे चार घटका बसून वाचून दाखवितील. त्याजवरून कच्चा हवाल अवघा ध्यानास येईल. व राजश्री पाटिलबावापासीं फौज थोडी आणि सारे हिंदुस्थानचें काम भारी. मुख्त्यारीचा कारभार ह्मणिजे पातशाहाचे प्रतिनिधी. वजिरास व मीरबक्षीस वगैरे ज्यास ज्या समयीं च्याहतील त्यास दूर करतील, अथवा ज्यास च्याहतील त्यास बहाल करतील, ऐसा प्रकार आहे. त्यास या प्रकारासीं आणि यांजपासीं फौज आहे या सामानासीं ठीक नाहीं. ह्मणून विनंति लिहिली आहे. आपण धणी आहेत. उत्तम जाणतील तें करतील. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १३४.

श्री. ४ मे इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, दिल्लीकडील वर्तमान तर भंगेलसिंग व गुरदत्तसिंग व रायासिंग वगैरे शीख सर्व एक होऊन, राजश्री आंबाजी इंगळे यांसीं भेटले. परस्परें करारमदार जाला कीं, दरोबस्त राखी पातशाही खालशा मुलखांतून उठवावी, आणि तुह्मीं व आमची फौज एकत्र होऊन, नवा पैका उत्पन्न करावा. त्यापैकीं एक रुपया तुह्मीं घ्यावा व दोन रुपये सरकारांत द्यावे. येणेंप्रमाणें तिसरा हिस्सा शिखांचा कररमदार होऊन, कौल करार जाले. त्यांनीं राखी दरोबस्त पातशाही मुलकांतून उठविली. त्यांजसमागमें आपली फौज व पलटणें व राजश्री शामराव आप्पाजी यांज समागमें देऊन, पानिपताकडे रवानगी केली. इतकियांत वर्तमान राघोगडाकडून आलें कीं, गुगुळ छिबडे हीं दोन्हीं ठाणीं खेचीनें घेतलीं. त्याजवरून राजश्री आंबाजी इंगळे यांनीं दिल्लीस आपला भाऊ विठोजी इंगळे यांस ठेऊन, आपण दोन रोजांत लष्करांत मथुरेचे मुक्कामीं येऊन दाखल जाले. राजश्री पाटिलबावांस विनंति करून, कांहीं फौज व पलटणें व तोफखाना येथून छिबडयाचे बंदोबस्तास रवाना केले आहेत. व देशीहून देवजी गौळी फौज घेऊन आले आहेत. त्यास त्यांचीं ताकीदपत्रें गेलीं आहेत कीं, खेचीचें पारिपत्य करून मग पुढें येणें. याप्रमाणें तिकडील बंदोबस्त करून, तूर्त आंबाजी इंगळे लष्करांत पाटिलबावा यांजपासीं कारभार करून आहेत. पानिपताकडे सरकारची फौज व शिखाची रवानगी केली होती, ते पानिपतापावेतों जाऊन बंदोबस्त केला. करणाळेस आला जाटाचा पुतण्या गजपतसिंग आहे, त्याजकडील भले माणूस येऊन भेटले. करणाळच्या मामलयाचा जाबसाल रूपकार आहे. तो मामला ठेरला ह्मणजे पुढें पटालीयास आला जाटाचा नातू आहे, त्याचा मामला करावा, या विचारांत शामराव आप्पाजी व शीख आहेत. राजश्री लालाजी बल्लाळ कोटेकर यांजकडे आग्र्याचा सुभा सांगितला. एका दो रोजांत तेही लष्करांतून कूच करून जाणार. साप्रत आग्र्यांत रामाजी पाटील आहेत. हे आगरियांत दाखल जाले ह्मणजे पाटिलमजकूर तेथून कूच करून लष्करांत येतील. याप्रमाणें आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे. हे विनंति."

---

पैवस्ती छ० २ रमजान सन सीत समानीन आषाढ मास.

## लेखांक १३५.

श्री.

१४ जून इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ६ माहे साबान मुक्काम श्रीमथुरा जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं छ० २४ जमादिलाखरीं विनंतिपत्रें पाठविलीं, तीं पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, राजश्री आंबाजी इंगळे यांणीं दिल्लीहून भंगेलसिंग शिखाकडून दुल्लभसिंग नामें सरदार समागमें घेऊन लष्करांत आले होते. त्यासीं करारमदार राजश्री पाटिलबावांचे मोहरे-निसीं जाहला कीं, पाणिपताअलीकडे दरोबस्त पातशाही खालसा वगैरे मुलुख आहे, त्यांतून रखी न घ्यावी, व धूमधाम लूटलाट करूं नये. पांचा हजारा स्वारांनसीं चाकरी करावी. आणि परगणे गोहाणा व परगणे खरखोदा व परगणे तोक्रम व परगणे महीम एकूण चार परगणे पाणिपताचे आसपास अडचा लक्षा जमेचे त्यास देऊन, सनदा करून दिल्ह्या. व पुढें करार केला कीं, सरहद प्रांतीं सरकारचा अंमल जाहला ह्मणजे तिकडे दहा लक्षांचे परगणे लाऊन देऊं. येणेंप्रमाणें करार मदार करून, हत्ती, घोडे, वस्त्रें, मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच, समागमील मानकरी होते त्यांस वस्त्रें; व दोन महिने लष्करांत राहिले तेव्हां खर्चास पांच हजार रुपये नख्त, येणेंप्रमाणें देऊन, त्यास रुकसत केलें. परंतु शीख बेमान आहेत. दोन महिने लष्करांत राहून, लष्करचा रंग पाहून, याची रजावंदी रक्षून कूच करून गेले. पुढें त्यांची वर्तणूक अमलांत येईल ते खरी. व मोहरसिंग शीख सरदार डलेवाल्याकडील अद्याप येथेंच आहे. त्याचा जाबसाल निर्गमांत आला नाहीं. त्याजकडील जाबसाल निर्गमांत आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १३६.

श्री.

जून इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः– पानिपताकडे सरकारची फौज शामराव बक्षी व पलटणें व भंगेलसिंग शीख वगैरे पानिपतापलीकडे सा कोसांवर मुक्काम करून आहेत. गज-पतासिंग व आलाजाटाचा नातू वगैरे किरकोळी जमीदार यांजकडील वकील येऊन मामल्याचा जाबसाल करितात. परंतु अद्यापि ठराऊन चार रुपये वसूल दिल्हा नाहीं.

रंग पाहून मात्र आहेत. पावसाळा प्राप्त जाला. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. किरकोळी गांव आहेत तेथील मामले चुकवून फौजेचा कालक्षेप करितात. याप्रमाणें वर्तमान आहे. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १३७.

श्री. १४ जून इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. भंगेलसिंग व रायसिंग डलेवाले या दोही थोकांस साडेपांचा लक्षांचे परगणे दिल्लीपलीकडे पाणिपताचे आसपास देऊन, त्यांचें समाधान केलें आहे. तेही तूर्त यांचे लक्षांतच आहेत. परंतु किरकोळी शीख बाराभाई आहेत, ते मेरट प्रांतीं वगैरे धामधूम करून आहेत. त्यांचे बंदोबस्तास राजश्री धारराव शिंदे पाठविले आहेत. त्यास शिखांचा बंदोबस्त होऊन अंमलांत येईल तें खरें. याचें कारण हेंच कीं, धारराव यासमागमें फौज रांगडी आहे; दक्षणी स्वार कमी आहेत. याजकरितां शिखांचें पारिपत्य होऊन जख बसेल, तो सुदिन. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १३८.

श्री. ३० जुलई इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागायत छ० २३ माहे रमजान मुक्काम श्री मथुरा जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं छ० २३ माहे साबानीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पावून सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, पातशाहा छ०१८ रोज मंगळवारीं येथून कूच करून छावणीस दिल्लीस गेले. त्याजसमागमें राजश्री पाटीलबावा यांनीं आपणाकडून लाडोजी सितोळे जांवई व मुरारराव दौलत, व आनंदराव नरसी व केसोपंत, व नथमल मुनसी राजश्री बालारायापासीं होता तो, एकूण तीन कारभारी, व दोन हजार स्वार, व चार पलटणें प्यादे येणेंप्रमाणें सरंजाम, व एक लाख तीस हजार रुपये दरमहा करार केला आहे. लाख रुपये खाशांचे व तीस हजार शागिर्दपेशा, एकूण एक लाख तीस हजार एकमाही खर्चास समागमें देऊन, पुढें दरमहाचा दरमहा द्यावा, ऐसी राजश्री

बापूजी नाईक भावे यांची निशा देऊन, पातशाहास दिल्लीस बिदा केलें. जाते समयीं परस्परें बोलण्यांत आलें कीं, "रामगडचे मोहिमेस रायाजी पाटिलांस पाठविलें आहे. त्यास किल्ला मासपक्षांत फत्ते जाला ह्मणजे मीच दिल्लीस आपणापासीं येतों. नाहींतर आपल्यास विनंतिपत्र पाठवूं; आपण यावें. मग बादबरसात जे मसलत करणें ते करावी." याप्रमाणें बोलणें पातशाहासीं होऊन, बिदा होते समयीं, नालकी नवी दिल्लीहून तयार करून आणली होती,–तीस लागत रुपये पसतीसशें लागले होते.– नालकी व सरबस्ता पागोटें बमय गोषवारा व यांचे मुत्सद्दी आदीकरून मानकरी त्यांस खिलत द्यावयास तयार नव्हते, ह्मणून पंचवीस हजार रुपये नख्त देविले, कीं सर्वांस खिलत रुसकतीचे तयार करून देणें. ह्मणून फर्द दसकत करून दिधली. व इंद्रसेन साहेब इंग्रेज यांज-समागमें आहेत. त्यांजपासीं लखनहून आणीक चार साहेब नवे आले, त्यांची मुलाजमत जाली. ह्मणून चौ साहेबांस चार चार पारच्यांच्या खिलत व इंद्रसेन सुद्धां पेशजीं येथें तीन इंग्रेज होते, त्यांस चार चार पारचे, व इंद्रसेनास शिरपेंच, जेगा व सलाउद्दीखान ह्मणून इंद्रसेनाकडील त्यास निमअस्तीन गोषपेंच, येणें-प्रमाणें यांस रुसकतीचे खिलत देऊन, राजश्री पाटिलबावांपासीं ठेविलें. व मुरारराव दौलत व केसोपंत या उभयतांस तीन तीन पारच्यांचे खिलत दिल्हे, कीं समागमें चाकरीस येतात. येणेंप्रमाणें देऊन पातशाहा दिल्लीस गेले. राजश्री पाटीलबावा त्यांस दोन कोस पोंहोचावून माघारा लष्करांत आले. छ० १९ तारखेस राजश्री लाडोजी देशमुख त्यांस बऱ्हाणपुरीं शेलापागोटें व किनखाप ठाण एक, व दोन महमुद्या, व मोत्यांची कंठी, व जेगा शिरपेंच, व व घोडा उदेपुरीहून राण्याकडून आला होता तो, बमय सरंजाम, येणेंप्रमाणें देऊन, यांनीं पातशाहापासीं असावें ह्मणून बिदा केले. तेही मागाहून गेले. त्यांच्या व पातशाहाच्या भेटी होडलचे मुक्कामीं एका जागा होऊन, पुढें दरकूच दिल्लीस गेले आहेत. तेथें गेलीयावर जें वर्तमान होईल, तें विनंति मागाहून लिहूं. आह्मांस आज्ञा केली आहे कीं, आठा चौ रोजां तुह्मांसही बिदा करून देऊं, ह्मणून आज्ञा जाली आहे. त्याजवरून येथें आहोंत. हे बिदा करतील तेव्हां जाऊं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति. वरकड दिनचर्येचें वर्तमान किरकोळी पारसी एकबारा फर्दा पाठविल्या आहेत, त्याजवरून श्रुत होईल. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १३९.

श्री. १ आगष्ट इ. स. १७८५.

"विज्ञापना ऐसीजेः–राजश्री पाटिलबावा यांचे मोठे मोहरेचा अलकाब–"वकील मुतलख उमेदतुलउमराव मुक्तारूलमुमालिक फरजंद अलीजाह महाराजाधिराज माधवराव शिंदे श्रीनाथबहादूर मनसूर जहा फिदवी शाहाअलम पातशाहा गाजी." येणेंप्रमाणें मोठी मोहर आहे. दस्ती मोहर लहान "वकील मुतलक अलीजाह श्रीनाथ महाराजे माधवराव शिंदे बहादूर" येणेंप्रमाणें लहान मोहर आहे.

---

पैवस्ती छ० १० मोहोरम. कार्तिक

## लेखांक १४०.

श्री. १५ आक्टोबर इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसींः—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १२ माहे जिल्हेज मुक्काम श्रीवृंदावन नजीक जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– इकडील वर्तमान पेशजीं छ० ७ माहे जिल्कादीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हलीं वर्तमान तरी, राजश्री पाटिलबावांचा मुक्काम येथें आहे. पातशाहा दिल्लीस आहेत. तेथें राहून इंग्रेजांकडे व वजिराकडे व जुवांबख्त पातशाहाजादा यांजकडे लखनऊस फितुराचीं पत्रें लिहितो, कीं सर्व दिल्ली प्रांत, आगरे व डीग वगैरे पाणिपत पावेतों यांणीं मुलूख आपले काबूंत घेतला. एक रामगड ऊर्फ अलीगड मात्र राहिला आहे. त्यास हाही यांनीं घेतला ह्मणजे सर्व मुसलमानीचा क्षय जाला. याजकरितां तुह्मीं जलद येऊन, अलिगडवाल्यांसीं कुमक करावी, हें ठीक आहे. ह्मणून वारंवार फितुराचीं पत्रें पाठवितात. ह्मणून राजश्री पाटिलबावा मथुरेहून कूच करून, दिल्लीचे रोखें सेरगड ह्मणून गांव श्रीयमुनातीरीं होडलेचे बरोबर आहे, तेथपावेतों जाऊन, तेथें वैरणपाणी, मैदान चांगलें आहे व रामगड नजीक आहे, व इकडे दिल्लीही तीस पस्तीस कोस राहाते, ऐसी समीपता पाहून, तेथें मुक्काम करून, राजश्री भागोजी देशमुख यांचे जांवई पातशाहापासीं आहेत, त्यांस पत्रें व पातशाहास अर्जी पाठविली आहे. व येथून दोनशें उंटें भारबारदारीसाठीं पाठविले आहेत कीं, आपण कूच करून यावें. व देशमुखास लिहिलें आहे कीं, त्यास घेऊन यावें, ह्मणून पत्रें गेलीं आहेत. त्याजवरून पातशाहांनीं कलंदरबेग फरासखान्याचा दारोगा यास ताकीद केली आहे कीं, खेम्याची डागडोजी वगैरे तयारी करणें. ह्मणून आज्ञा जाली आहे. त्यास राजश्री पाटिलबावांचें मानस कीं,

पातशाहा लिहिल्याप्रमाणें सत्वर दिल्लीहून निघून लष्करांत आले, तर उत्तम आहे. नाहींतरी आपण सडेस्वारीनसीं जाऊन पातशाहास घेऊन लष्करांत यावें. इतकी खटपट करावयाचें कारण कीं, चहूंकडे चार मसलती येऊन लागल्या आहेत. एक राघोगड व एक रामगड व एक जयपूर व एक पाणिपत. एकूण चौ ठिकाणीं फौजा शहास अटकल्या आहेत. व चौ ठिकाणींही झुंज लागलें आहे. पातशाहांची प्रकृत कुभंडी आणि आपलेपासीं कोणी तोरा नाहीं. श्रीमंत साहेब असावें, ते दूर राहिले. त्यापेक्षां पातशाहाच समीप आहे; त्यांचेच गळा पडून आपले काबूंत आणून समीप ठेवावा. ह्मणजे इंग्रज व असफदौला वजीर व जुवांबख्त पातशाहाजादा या सर्वांवर दाब राहून मसलत सिद्धीस जाईल. नाहींतर इंग्रेजां-पासीं पातशाहाजादा वजीर त्याचे काबूंत आहेत; त्याचे मनांत विकल्प आल्यास मग मसलत कठीण पडेल. ह्मणून विचार करून येथून कूच दिल्लीचे रोखें केला आहे. तिकडून पातशाहास आणून आपण यांनीं एकत्र असावें, हे सल्ला ठैराविली आहे, कीं पातशाहा आपण एकत्र असलयास सर्वांवर राजे रजवाडे वजीर आदिकरून सर्वांवर दाब राहून केलेली मसलत सिद्धीस जावी. यांजमध्यें कोणीही डोई उचलून, पातशाहासमीप असलयास येऊं शकणार नाहीं, ह्मणून सल्ला ठैरली आहे. पुढें प्रत्ययास येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १४१.

पैवस्ती छ० २ रविलाखर सीत. **श्री.** २९ दिसेंबर इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २६ माहे सफर मुक्काम लष्कर नजीक सेरगड यमुनातीर सीरघाट जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं छ० २० मोहरमीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर जहांगीरखान, अफराशाबखान यांचा कनिष्ठ बंधू, व अफराशाहबखानाची बेगम ऐसीं रामगडास होतीं. त्यांस मुंडसानचा किल्ला व एक लाख दाहा हजारांची जागीर देणें करार करून, त्यास किल्ल्यांतून अकबरखान ह्मणून जमादार मोंगल आहे, त्याचे विद्यमानें किल्ला खाली केला. बेगम आपली वस्तभाव घेऊन मुंडसानचे किल्ल्यांत दाखल जाली. जहांगीरखानास लष्करांत घेऊन आले. त्यास सा पारच्यांचा खिलत व हत्ती, घोडा, जेगा, शिरपेंच, मोत्यांची कंठी, तरवार येणें-

प्रमाणें सन्मान करून, लष्करांत एक पक्षानंतर त्याजवर चौकी बसविली; व बेगम मुंडसानचे किल्ल्यांत होती, तीसही धरून आणून, लष्करांत कैदेंत आहे. मुंडसानांत वस्तभाव होती ते सर्व जप्त केली. एक लाख दाहा हजारांचे परगणे कागदीं पत्रीं मात्र दिल्हे होते. तेथें बेगमेचा अंमल जाला नाहीं. यांचेच कमाविसदार जे आहेत, तेच आहेत. उभयतांस लष्करांत कैद करून, नजबखानाचें व अबदुल अहदखान यांस कैद केलें त्याचे घरचें, व लथापतास वगैरे लुटलें त्याचे घरचें जवाहीर व खजाना अफराशाबखान यानें कोल व खुर्जा वगैरे बारा माहालचा ऐवज बारा वर्षें जमा केला तो पैका, एकूण जवाहीर व पैक्याचा तगादा लाविला आहे. ते ह्मणतात कीं, आह्मांस कांहीं ठाऊक नाहीं. अनुपगीर गोसावी व नारायणदास दिवाण तुह्मांपासीं आहेत, त्यांस पुसून घ्यावें. ह्मणून जाबसाल आहे. पुढें काय ठरेल, ते विनंति लिहूं. मुंडसानचे किल्ल्यांत जप्ती केली होती, ते वस्तभाव कलमबंद होऊन, लष्करांत उंटें रथ भरून जामदारखान्यांत जिन्नस दाखल होतो. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १४२.

**श्री.** २९ दिसेंबर इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ० २६ माहे सफर मुक्काम नजीक शेरगड यमुनातीर सीरघांट जाणून स्वानंदलेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः— पेशजीं छ० २० मोहरमीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, ते पावून सविस्तर वृत्त कळलेंच असेल. हल्लीं इकडील वृत्त पातशाहाकडील व राजश्री पाटीलबावा तहमुरशहा दुराणी यांजकडील सविस्तर राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे. त्याजवरून श्रुत होईल. कृपा करणार धनी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, ही विज्ञप्ति."

---

## लेखांक १४३.

**श्री.** २९ डिसेंबर इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसिजे. मुक्काममजकुरींहून कूच करून जैपुरास जावें. तेथील खंडणीचे पैक्यास ठिकाण लागलें तर लावून ऐवज वसूल करावा, नाहींतर मुलकाची

जप्ती करून आपलीं ठाणीं बसविलींच आहेत, तेथेंही आपला अम्मल करून, तिकडून दिल्लीकडे फिरतेसमयीं रेवाडीचा मित्रसेन आहीर मृत्यु पावला आहे तेथील जप्ती करून आपलें ठाणें रेवाडींत बसवून, लाहोराकडे तहमूरशहा न आला तर पातशहासुद्धां दिल्लीस जावें. नाहींतर पातशाहांची बिदा दिल्लीस करावी, आपण रेवाडीहून डिगेस येऊन मुक्काम करून, येथून फौजा पाठवून मुलकाचा बंदोबस्त राखावा ह्मणून एक विचार हाही आहे. पुढें प्रत्ययास येईल तें खरें. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १४४.

श्री. डिसेंबर इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– राजश्री शिवाजी विठ्ठल ग्वालेरप्रांतीं होते, ते लष्करांत फौजसुद्धां आले. राजश्री पाटिलबावांच्या भेटी जाल्या. पुढें पातशाहांची मुलाजमत करावी. त्यास राजश्री शिवाजीपंत यांनीं सांगून पाठविलें कीं, ज्याप्रमाणें आमची रीत मुलाजमतीची आहे, त्याप्रमाणें पातशाहास नजर देऊन, सलाम करून बसूं. पातशाहापुढें उभे राहाणार नाहीं. ह्मणून सांगून पाठविलें. त्याजवरून पाटिलबावांनीं सांगितलें कीं, "आह्मांस मात्र आज्ञा पातशाहाची बसावयाची आहे. दुसऱ्यास आज्ञा बसावयाची नाहीं." त्याजवरून शिवाजीपंत बोलले कीं, "आह्मांस पातशाहाचे भेटीचें तरी प्रयोजन काय आहे? जर आमची रीत आहे, त्याप्रमाणें भेट जाली तर उत्तम. नाहीं तर आह्मांस गरज नाहीं." त्याजवरून एक मास जाला लष्करांत आले आहेत, परंतु पातशाहाची भेट नाहीं. पुढें होईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १४५.

श्री. इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे:– कलकत्त्याहून वर्तमान लखनौस आलें. तेथून वर्तमान दिल्लीस पातशाहाकडे आलें कीं, हिष्टिन साहेब इंग्रेज यानें एकविसां करोडीची टीप लिहून दिधली, आणि पुन्हां कलकत्त्याची व हिंदुस्थानची बदस्तुर बहाली करून घेतली. आणि त्याची बायको पहिलेच विलायतेस जाऊन बसली होती कीं, हा मामला बदस्तुर हिष्टिनाकडे बहाल असावा. त्यासमयीं तिनें कांहीं

लबाडीचीं पत्रें हिष्टिनाकडून आलीं, ह्मणून मध्येंच लिहून पातशाहास गुजराणलीं होतीं. तें वर्तमान पातशाहास कळलें कीं, इनें मधेंच लबाडी करून पत्रें गुजराणलीं. त्याजवरून पातशाहांनीं तीस कैद केलें होतें. त्यास तिची तकसीर पातशाहापासून माफ करवून, तीस सोडवून, पातशाहांची कृपा संपादिली. पातशाहांनीं आज्ञा केली कीं, एक कंपू हजूरचा व कांहीं गोरे व समुद्रांतील मार्गांची दस्तकें हजूरचीं, येणेंप्रमाणें सरंजाम समागमें घेऊन जाऊन, बदस्तुर आपला अंमल करणें ह्मणून आज्ञा जाली. त्यास याप्रमाणें हिष्टिनाचीं पत्रें कलकत्त्यास आलीं कीं, आह्मी....त्या प्रांतीं येतों. तें वर्तमान पातशाहापाशीं आलें ह्मणून श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. सरकारचा वकीलही कलकत्त्यांत असेल, तोही सरकारांत विनंति लिहीत असेल. आह्मीं येथें वृत्त ऐकिलें, तें सेवेसीं लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १४६.

श्री. इ. स. १७८५.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे, अफराशाहाबखान याचे बेगमेनें व जहांगीरखान यांनीं कांहीं जवाहीर वगैरे वस्तभाव फरोकाबादेस आपले माहेरीं रामगडीहून पळविली ह्मणून श्रवणांत आलें. त्याजवरून इंद्रसेनसाहेब इंग्रेजांकडून वकालतीस आहे, त्यास बोलावून आणून दोन वेळां खिलबत जालें; आणि सांगितलें कीं, जवाहीर व वस्तभाव बेगमेनें आपले माहेरीं फरोकाबादेस लांबविली आहे, त्यास तुह्मीं हापडसाहेबांस लखनऊस पत्रें लिहून पाठवून, पातशाहांचें सरकारची वस्तभाव आहे तिचें ठिकाण लाऊन आणवणें. ह्मणून बोलणें होऊन पत्रें पाठविलीं आहेत. अद्यापि उत्तरें आलीं नाहींत. उत्तर आल्यावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे ही विनंति."

## लेखांक १४७.

श्री. इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. अफराशहाबखान यांची बेगम व जहांगीरखान त्याचा बंधु रामगडांत झुंझत होते. त्यासमयीं नारायणदास काश्मीरी दिवाण व राजे आनुपगीर गोसावी यांनीं त्यांजकडे फितुराचीं पत्रें पाठविलीं होतीं कीं, तुह्मीं आंव न सोडणें व हिम्मत धरून झुंझणें. तोंपावेतों आह्मी वजीरास व इंग्रेजांस

पत्रें पाठविलीं आहेत, तेही तुमची कुमक करितील; व आम्हीही येथें यांचे तदबिरींत आहोंत. ऐसीं पत्रें होतीं. त्यास बेगमची जप्त जाली. त्यांत ते कागद सांपडले. त्यांजवरून नारायणदास व बजीदखान व सुजादिलखान या तिघांस कैद केलें. आणि गोसाव्यास सांगून पाठविलें कीं, तुह्मीं सरंजामी महाल आहेत, ते सोडून देणें आणि उठोन जाणें. त्याजवरून गोसाव्यानें महालच्या सोडचिठ्या भांडेर वगैरे नजबखानानें व यांनीं प्रगणे दिले होते, ते सर्व सोडविले. तेथें आपले कमाविसदार पाठविले आहेत. एक मोटची गढई व मोटचा प्रगणा झांशीपैकीं, त्याजपाशीं आहे, तो मात्र ठेविला. बाकी अवघ्या ठिकाणीं आपला अंमल करून घेतला. कमाविसदार व फौज गेली आहे. ठाणीं दाखल जालीयाचीं पत्रें अद्यापि आलीं नाहींत. याप्रमाणें वृत्त आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे ही विनंति."

---

## लेखांक १४८.

श्री. इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. मोटचा किल्ला तालुक्यासुद्धां अनुपगीर गोसावी त्याजकडे होता. त्याजकडून दूर करून राजश्री गोपाळराव त्रिंबक यांजकडे सांगितला. व राजश्री खंडेराव हरी व रघुनाथ हरी व राजधर गुजर व दतीयेकर राजा यांस साहित्यपत्रें लिहून दिधलीं कीं, गोसाव्याकडून मोटचा किल्ला व तालुका दूर करून, राजश्री गोपाळराव त्रिंबक यांजकडे दिधला आहे. तर तुह्मीं त्यांचें साहित्य करून, किल्ल्यांत ठाणें बसऊन, अंमल करू न देणें. ह्मणून पत्रें सरकारचीं लिहून देविलीं आहेत. परंतु यांजकडील कारकून अद्यापि गेले नाहींत. गोपाळरायांचें मानस आहे कीं जयपूरचा मामला जाला, आतां आपले पथकाची परवानगी घेऊन, मोटकडे रवानगी करून, आपला अंमल करून घेऊं. या विचारांत आहेत. मोटेंत ठाणें बसेल तेव्हां विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १४९.

श्री. इ. स. १७८५.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—अनुपगीर गोसावी यांजकडील प्रगणे दूर करून, त्यास आज्ञा केली कीं, तुह्मीं उठून जावें. त्यानें विनंति केली कीं, "मजला कोठें जावयास

ठिकाण नाहीं. ह्मणून एक मास पडून राहिला. तेव्हां प्रगणे मोट तालुके झांशी पैकीं व वृंदावन ह्या दोन्ही जागा त्याजकडे करार करून, पांच लाख रुपये फौजेचे खर्चास सालिना द्यावा; फौजेनें स्वारीसमागमें चाकरी करावी; खाशानें वृंदावनीं असावें; याप्रमाणें करारमदार होऊन, गोंसावीमजकुरास वृंदावनास डिगचे मुक्कामींहून बिदा करून, त्याची फौज चाकरीस समागमें घेऊन, इकडे कूच केला. याप्रमाणें वर्तमान जालें. पुढें येईल ते विनंति लिहूं. नारायणदास कशमिरी व अफराशाहाबखान यांचा भाऊ जहांगीर........त्याची धाकटी बेगम व तिचा बंधु व चुलता हे सर्व अद्यापि कैदेंतच आहेत. कांहीं फैसला जाला नाहीं. फैसला जाल्यावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १५०.

**श्री.** इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. या दिवसांत वजीर असफदौला व पातशाहाजादा जुवांबख्त लखनऊहून कूच करून बंगाल्यास अयोध्येस गेले आहेत. पातशाहाजाद्याची मर्जी आहे कीं, एक वेळ कलकत्त्यास जाऊन, तिकडीलही सहल करून यावेसें मानस आहे. प्रत्ययास येईल तें खरें. व राजे बखतसिंग भदावरकर यांजला बहापिनाट-पैकीं दोन तालुके पन्नास हजारांचे जागीर देऊन, त्यांसी स्थापना करावी; बिना गढी, वाडा नुस्ता चार दिवाली बांधून असावें. याप्रमाणें जमीदारी करून असावें, ह्मणून करारमदार होऊन, त्यासीं स्थापना करावीसें ठरलें आहे. व गुलाम कादर, जाबतेखानाचा पुत्र, त्याचा मुलुख त्याजकडे करार करून, दरबारखर्च सुद्धां तीन लक्षांची मालत त्यासी जाली. अखेर पौषमासपावेतों बेबाकी करून द्यावीसा करार ठराऊन, त्याजकडील वकिलास वस्त्रें देऊन बिदा केले आहेत. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १५१.

**श्री.** इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राघोगडकर खिची यांस रामजी पाटील जाधव व महमद बेग हमदानी यांनीं बहादरीनें राघोगडांतून काढून सरकारचें ठाणें बसविलें. हें वर्तमान राजश्री पाटिलबावांनीं ऐकून बहुत रागास आले कीं, त्यास बहादरीनें

काढावयाचें प्रयोजन काय ? त्याजवरून रा॰ आंबाजी इंगळे यांची रवानगी राघोगडाकडे केली कीं, त्यास धरून मारून टाकणें किंवा कैद करणें, ह्मणून आज्ञा. त्याजवरून आंबाजी इंगळे यांनीं राघोगडवाल्यास कैद करून, पायीं बेड्या घालून, ग्वालेरीचे किल्ल्यावर ठेविलें; व त्याचीं दोन मुलें व बायका एका एका वस्त्रानसीं कैद करून, भेलशाचे किल्ल्यांत ठेविलीं. त्याची वस्तभाव, हत्ती घोडे वगैरे, तोफा व बंदुका, सर्व सरंजाम सुतळीचा तोडा जप्त करून, सरकारांत आणिला. व तिकडील फौज राघोगडाकडील कुल सरकारचा बंदोबस्त करून, राजश्री खंडोजी इंगळे यांचा बंदोबस्त करून देऊन, ते फौज कुल देवजी गवळी व तोफखाना वगैरे सरंजाम सरकारनिजबतीचा होता, तो लष्करांत आला. व कोटेकराकडील कुमकी फौज होती, ते जिकडील तिकडे गेली, ह्मणून श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.”

---

## लेखांक १५२.

श्री. इ. स. १७८५.

“पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री पाटिलबावांनीं, इंग्रेजांची लढाई व ग्वालेर व गोहद घेऊन पातशाहापासीं येऊन, आफराशाहबखान मृत्यु पाऊन पातशाहाचे घरचीं मुखत्यारीचीं वस्त्रें श्रीमंत साहेबांस पाठऊन, आपण मुतालकीचीं वस्त्रें घेतलीं. इतका प्रकार जाला, तो एक श्रीमंत स्वामींचे प्रतापेंकडून व राजश्री पाटिलबावांचे तहमुली धिमेपणाकरितां जाला आहे. त्यास ऐसा समय पुढें येणार नाहीं. हिंदुस्थान केवळ निवारसी जालें आहे; आणि चकत्याचें पातशाहीची समाप्त बारावी सद्दी एक वर्ष बाकी राहिली आहे. संवत १८४२ बेतालीसांत सर्व यवनाची समाप्त आहे. असफदौला वजिराचे शरीरीं समाधान नाहीं. त्यास दिल्लीची पातशाहात आपले हातीं लागली आहे. या पातशाहीस एक रोग विलायतेचा मात्र आहे. त्यास पन्नास हजार स्वार प्यादा लाहोरास राहून, अटकचे दऱ्याचा व कशमीरचे सुभ्याचा बंदोबस्त करून, तेथील मजबुती राखल्यास चहूंकडे दाब बसून, पैक्यास कांहीं कमी नाहीं. मुबलग पैका दृष्टीस पडून सलतनतीचा बंदोबस्त होईल. नाहींतर इंग्रेज रिकामा जालियावर, तो अथवा शीख कोण्ही विलायतेचा सरदार येऊन दिल्लींत बसल्यास, मग आपल्यासच भारी पडेल. याजकरितां अज्ञानपणें विनंति लिहिली आहे. त्यास जो बंदोबस्त व

फौजेचें बल करणें, तें सत्वर करावें. नाहींतर राजश्री विसाजीपंत धुळीवरील सारवण करून गेले आणि मागें नजबखान बळावला, आणि इटावा वगैरे दरोबस्त अंतरवेद वजिरानें घेतली, तैसा प्रकार होऊं न पावे तें आपण करतील. याहीवर आपण दूरआंदेश धणी आहेत. उत्तम जाणतील तें करतील. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १५३.

श्री. इ. स. १७८५.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः— छ. १६ रविलावलीं नवाब जाबतेखान गोसगडीं होता, त्यास तरळ होऊन देवाज्ञा जाली. व छ० १ माहे मिनहूस दलेलखान कुंजपुरेवाला यासही देवाज्ञा जाली. अंतर्वेदींत शीख होते, तेही दरोबस्त जमा होऊन, बुढिया सारंगपुर यमुनातीरीं मुक्काम करून आहेत. दिलीपासून सारंगपुरपावेतों कोणी आडवी काठी करणार राहिला नाहीं. राजश्री आंबाजी इंगळे व बापूजी मल्हार या उभयतांस राजश्री पाटिलबावांनीं दिलीच्या व अंतर्वेदीच्या बंदोबस्तास पाठविले आहेत. तेही आठा पंधरा दिवसांत जाऊन पोहोंचतील. श्रीमंत साहेबांच्या प्रतापेंकरून मनोदयानुरूप बंदोबस्त होईल. वजीर असफदौला यांचे शरीरीं समाधान नव्हतें. परंतु आतां बरे जाले आहेत. भडोचेकडे शिकारीस पातशाहाजाद्यासुद्धां गेले आहेत. तिकडून लखनौस सत्वरच माघारां येणार. याप्रमाणें वर्तमान आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १५४.

श्री. १८ जानेवारी इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक शंकराजी सखदेव कृतानेक साष्टांग नमस्कार. विज्ञापना येथील कुशल तागाईत छ० २४ माहे साबान मुक्काम डीग जाणून स्वानंदलेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः— आपण कृपापत्र छ० १२ जमादिलाखरचें पाठविलें, तें छ० १६ मिनहूस पावलें. पत्रीं आज्ञा कीं, 'तुह्मीं वर्तमान लिहिलें तें कळलें. तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जावें.' ह्मणून आज्ञा. त्यास पेशजीं छ० २१ रजबीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पावलींच असतील. त्यांजवरून सर्व श्रुत जालेंच असेल.

इकडील वृत्त आमचे यजमानांहीं विनंति लिहिली आहे, त्याजवरून श्रुत होईल. कृपा करणार धनी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विज्ञप्ति."

## लेखांक १५५.

छ० २० रबिलाखर सीत. श्री. १८ जानेवारी इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १७ माहे रबिलावल मुक्काम नजीक डीग जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः- पेशजीं छ० २६ सफरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पावोन सविस्तर वृत्त कळलेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, शिरघाटाहून नजीक शेरगड यमुनातीर तेथून कूच करून, नजीक डीग दीड कोस येथें येऊन, मुक्काम केला आहे. जयपुराकडील तेविसा लक्षांचा मामला जाला आहे. त्यापैकीं दो लक्षांची हुंडी आली, बाकीचा ऐवज येत नाहीं. ह्मणून मुक्काममजकुरीं येऊन काम्पांत ठाणें सरकारचें बसविलें. व लष्करचे आसपास मेवात्यांनीं धुमधाम फार केली. कांहीं उंटें लष्करचीं घेऊन गेले. ह्मणून त्यांचे पारिपत्यास रा. आंबाजी इंगळे फौज देऊन पाठविले आहेत. त्यांनीं दोनचार गांव मेवात्यांचे मारून बंदी धरली आहे; व पुढेंही मेवात्यांचें पारपत्य करून बंदोबस्त करावा, या विचारांत आहेत. पुढें विशेष वृत्त आल्यास विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे ही विनंति."

## लेखांक १५६.

श्री. १८ जानेवारी. इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. तहमूरशाहा अबदाली पिशोरास मुक्काम करून होता. त्यास कंधाराकडे नादिरशाहाच नातू आहे. त्यानें फौजबंदी करून तहमूरशहाचीं ठाणीं कंधाराकडे होतीं तें उठवून आपला बंदोबस्त केला, ह्मणून वर्तमान पिशोरास तहमूरशहास आलें. त्याजवरून झिलम व टवा भकड व पिशोर व किशमीर (काश्मीर) व मुलतान येथील सरसुभेदारी हमायूं पातशाहाजाद्यास देऊन, यांजसमागमें दहा हजार फौज दुराणी ठेऊन, इकडील बंदोबस्त करून, आपण फौजसुद्धां कंधाराकडे कूच करून गेला. याप्रमाणें वर्तमान दिल्लीस व पातशाहाचे येथें आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे ही विनंति."

## लेखांक १५७.

**श्री.** १८ जानेवारी इ. स. १७८६.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. मित्रसेन आहीर रेवाडीवाला मृत्यु पावला. त्याजकडील मामला तीन लक्षांचा जाला होता, त्याचा फडशा न जाला; ह्मणून रेवाडीस फौज पाठवून गोकुळगड वगैरेचा सरकार बंदोबस्त करून खालसा रेवाडी केली. व राजश्री नारो शिवदेव यांचे पुतणे बापू लष्करांत येऊन दाखल जाले. कळावें ह्मणून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विनंति."

---

## लेखांक १५८.

**श्री.** १८ जानेवारी इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. तहमूरशहा अबदाली पिशोरास मुक्काम करून आहेत. त्यांचा पुत्र हमायूशाहा अटक उतरून झिलिम ह्मणून जागा लाहोरापलीकडे शंभर कोस आहे, तेथें चार दस्ते फौज चाळीस हजार समागमें आहेत. तेथें मुक्काम करून कशमीर व टवाभकड वगैरे सिंधेकडे व बिकानेरचे सरहद्देकडे त्यांचा मुलूक अटक अलीकडे आहे, त्याचा बंदोबस्त करून आहे. पातशाहांस हमायूनें सांगून पाठविलें होतें कीं, मजला आज्ञा होईल तर मी लाहोरास जाईन. त्यानें उत्तर पाठविलें कीं, मी झिलमचे मुक्कामीं येईन, मग पुढें तुह्मांस लाहोराकडे बिदा करीन. तोंपावेतों आपले मुलकाचा बंदोबस्त करून असणें. व चरससिंग शीख याचा पुत्र महासिंग, लाहोरचा सुभा, हमायूस जाऊन भेटला आहे. ह्मणतो कीं, काश्मीरचा सुभा आह्मांकडे इजाऱ्यानें सांगावा. आह्मी आपले स्वारीसमागमें हिंदुस्थानास चालतों. त्यास शिखांनीं जैसिंग कन्हैय्या वगैरेनीं विचार ठैराविला आहे कीं, अबदालीची फौज लाहोरास आली ह्मणजे अवघे एकविचारें होऊन, महासिंग त्यास भेटला आहे, त्याचे फौजसुद्धां झुंझावें. ऐसी शपथप्रमाण सर्वा शिखांची होऊन, अमरसरावर अवघे सरदार फौजसुद्धां मुक्काम करून आहेत. पुढें प्रत्यास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विनंति."

---

## लेखांक १५९.

श्री. १८ जानेवारी इ. स. १७८६.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री धारराव शिंदे फौज सुद्धां पाणिपतास होते. त्यास नानुमल दिवाण, आलाजाटाचा नातू साहेबसिंग आहे त्याजकडून येऊन, यांस पांच हजार रुपये रोज करार करून, सरहद्देकडे घेऊन गेले. त्याचीं ठाणीं कांहीं शिखांनीं घेतलीं होतीं, ते पुनः यांनीं मोरचे लाऊन तमाम आपलीं ठाणीं खाली करून घेऊन, नानुमलानें आपला बंदोबस्त केला. बोलल्याप्रमाणें हिशेब करून, शिंदे मजकुरास पांच लाख रुपये देऊन बिदा केलें. ते माघारा करनालेस आले. इतकियांत करनालकर गजपतसिंग जाट यांस देवाज्ञा जाली. त्याचे दोघे पुत्र आपसांत भांडूं लागले. त्यांतून धाकटा पुत्र येऊन, यांस भेटून, करनाल व सफेदा वगैरे दहाबारा लक्षांचा मुलूक आहे, त्यांत यांचा बंदोबस्त करून देऊन ठाणीं बसविलीं. त्यास हल्लीं सरकारचा अम्मल व बंदोबस्त सरहद्देअलीकडे वीस कोस पावेतों जाला. याप्रमाणें वर्तमान आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विनंति."

---

## लेखांक १६०.

श्री. १८ जानेवारी इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—राजश्री धारराव शिंदे पानिपताकडे व कुंजपुऱ्याकडे मुलुखगिरी शिखांचा बंदोबस्त करून होते. त्यास पतियाल्याहून अमरसिंग जाट, आला जाटाचा नातू यानें आपले दिवाणांस नानुमलास पाठवून तीन लक्ष रुपये नक्त, दररोज पांच हजार रुपये खर्चास देणें करार करून, झुंजास दारूगोळी जामगी जो खर्च लागेल तो जाटानें द्यावा याप्रमाणें करारमदार होऊन, यांचा कूच करवून, पतियाल्याकडे घेऊन गेले आहेत. प्रथुतीर्थपर्यंत शीखांच्या गढ्या दोन चार घेऊन, नानुमलाचा बंदोबस्त करून दिधला. पुढें गढ्या घेत जातात. याप्रमाणें वर्तमान आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १६१.

श्री. जानेवारी इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– जयपूरकरांकडील मामला ठरला आहे, त्यापैकीं पैका येत नाहीं. कांहीं जाबसाल बाकीस राहिले आहेत. ह्मणून खुशालीराम बोहरा जाबसालास येणार. त्याची मार्गप्रतीक्षा करितात. तो येऊन जाबसालाचा फडशा केला तरी उत्तम. नाहीं तरी राव राजा प्रतापसिंग माचेडीकर व नजबकुलीखान यांस राजश्री पाटीलबावांनीं आज्ञा केली आहे कीं, तुह्मी दोन महिने छावणी आपले जागांत करून, मागाहून आह्मी पत्रें पाठवून देऊं त्याप्रमाणें जयपूरचे मुलुखांत जाऊन, आपला बंदोबस्त करावा. येणेंप्रमाणें उभयतांसीं करारमदार करून, पातशाहाकडून हत्ती, घोडे, वस्त्रें, तरवारा, मोत्याच्या कंठ्या, जेगे, शिरपेंच व त्यांकडील मानकरी समागमें होते, त्यांसही वस्त्रें शिरपेंच देऊन, बहुमान करून रुकसत केलें आहे. एका दों रोजांत लष्करांतून कूच करून जाणार. पुढें प्रत्ययास येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १६२.

पै॥ छ१० जमादिलाखर
सन सीत चैत्रमास.

श्री. १० एप्रिल इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील........ २ जमादिलावल मुक्काम लालसोट नजीक जयपूर वीस कोस जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं छ १७ रविलावलीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पावून सविस्तर वृत्त कळलेंच असेल. हल्लीं वर्तमान तरीः– पातशाहा व राजश्री पाटीलबावा मुक्काममजकुरीं आहेत. जयपूरचा मामला सालगुदस्तां तेविसां लक्षांचा जाला होता त्यापैकीं हिंडोल वगैरे परगणे दहा लक्षांचे लावून दिल्हे व लाख रुपये नक्त दिल्हे. व दोन लक्षांच्या हुंड्या श्रावणमासीं पाठवून दिधल्या होत्या. आणि जाबसाल करीत होते कीं, रावराजा प्रतापसिंग व नजबकुलीखान या दोघांनीं नारनोल वगैरे परगणे दाबून बसले आहेत; त्यांस ताकीद करून परगणे सोडवून देवावे. आणि आपले सरकारची फौज मलक महमदखान वगैरे गेले आहेत, त्यांनीं पायमाली केली आहे. ते मजुरा देऊन, बाकी सरकारची निघेल ती घ्यावी. ह्मणून जयपूरकराकडील

वकील बोलत होते. त्यास, रावराजाकडील परगणे जातात, हें रावराजानें पाहून, राजश्री पाटीलबावांस विनंति केली कीं, "मजला आज्ञा कराल तरी मी राजा पृथ्वीसिंग याचा पुत्र कृष्णगडीं आहे, त्यास मी घेऊन येतों. त्यास राज्यीं बसवून द्यावें. मी पन्नासा लक्षांची निशा करून देतों." ह्मणून बोलणें करारमदार होऊन रावराजांस बिदा केलें. त्यानें जाऊन कृष्णगडीहून पृथ्वीसिंगाचा पुत्र मानसिंग यास घेऊन येऊन, जयपुरापाशीं सांगानेराकडे मुक्काम करून आहेत. तेथून राजश्री पाटिलबावांस सांगून पाठविलें कीं, आपण यावें. त्याजवरून हे पातशाहासुद्धां कूच करून मुक्काममजकुरीं आले आहेत. जयपूरकरांकडील खुशालीराम बोहरा व बालानंद महंत रावराजापाशीं राजे प्रतापसिंगाकडून आले आहेत. त्यांनीं रावराजांस पत्र लिहून दिधलें कीं, जे राजश्री पाटीलसाहेब आज्ञा करितील, ते आह्मांस मान्य आहे. ह्मणून बोलणें ठैरून, जाबसालास राव राजा प्रतापसिंग येणार. पुढें ठरेल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १६३.

श्री. ७ एप्रिल इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ ७ माहे जमादिलाखर मुक्काम नजीक लालसोट प्रांत जयपूर सोळा कोस जाणून स्वानंदलेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः— आपण छ० १५ रविलावलचें पत्र पाठविलें, तें छ० २७ जमादिलावलीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, तिकडील बातमीचें वर्तमान वरचेवर लिहीत जावें ह्मणून आज्ञा. त्यास, पेशजीं छ० २ माहे जमादिलावलीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत. ते पावून सविस्तर वृत्त कळलेंच असेल. हल्लीं वर्तमान तरः— जयपूरकरांकडून जाबसालास रावराजा प्रतापसिंग व बोहोरा खुशालीराम व महंत बालानंद हे तिघेजण आले. त्यास छ ५ जमादिलावलीं राव राजा प्रतापसिंग राजश्री पाटिलबावांचे भेटीस आला. त्यास आपले डोईचें पागोटें व किनखाबचा आंगरखा, पायजमा व जेगा शिरपेंच, मोत्यांची कंठी येणेंप्रमाणें, व त्यासमागमें सदारखान वगैरे असामी त्यास एक एक शालजोडी व तिघांस तीन किनखाब व तीन पागोटीं व तीन शीट जोड्या, येणेंप्रमाणें सन्मान करून बिदा केलें. अंबाजी इंगळे यांचा बंधु बाळाजी इंगळे त्यांसही येणेंप्रमाणें सनगें, विडे देऊन वाटेस लाविलें. दुसरे दिवशीं बोहोरा खुशालीराम भेटीस आले.

त्यांस अत्तर पानदान देऊन, त्यांस व रावराजा प्रतापसिंग यांस समागमें घेऊन पातशाहांचे येथें गेले. खुशालीरामानें राजे प्रतापसिंग यांजकडून एकशें एक मोहोर नजर केली, व आपलेकडून अकरा मोहोरा नजर केली. व राजा प्रतापसिंग यांनीं एकवीस मोहोरा नजर केल्या. "आह्मी खानाजाद फिदवी गुलाम या घरचे आहोंत." ह्मणून विनंति केली. त्यास पातशाहांनीं तबरूख देवायाची आज्ञा केली. त्याजवरून बोहोरा खुशालीरामास सा पारच्यांचा खिलत वस्त्रें व जेगा शिरपेंच, मोत्यांची कंठी व हत्ती व घोडा व तरवार येणेंप्रमाणें इनायत जाली; व याजप्रमाणेंच रावराजा प्रतापसिंगासही इनायत जाली. व पांचजण हमराई यांचे रजपूत होते. त्यांस दोघांस चार पारचे वस्त्रें व तिघांस तीन पारचे वस्त्रें देऊन बिदा केलें. तिसरे रोजीं राजश्री पाटिलबावा महंत बालानंद यांचे डेरियास दर्शनास गेले. त्यांजपुढें पांच मोहरा ठेवून नमस्कार केला. त्यांनीं मोत्यांची कंठी व तुळशीची माळ प्रसाद दिधला. तेथून खुशालीराम बोहोरा यांचे डेरीयास गेले. त्यानें चौदा खोन कापड शालजोड्या व सांगानेरीं छिटें व पागोटीं व किनखाब वगैरे कापड व मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच व एक हत्ती व चार घोडे येणेंप्रमाणें देऊन, तेथून रावराजा प्रतापसिंग यांचे डेरीयास गेले. त्यांनीं येणेंप्रमाणेंच कापड व मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच व हत्ती व घोडे चार दिधले. सदरहू घेऊन आपले डेरीयास आले. चवथे रोजीं बोहोरा खुशालीराम व रावराजा प्रतापसिंग राजश्री पाटिलबावांचे डेरीयास आले. त्याजसमागमील हमराई मानकरी रजपूत वगैरे सरदार होते, त्यांस वस्त्रें दुसाले सुमारें २४ व किनखाब सुमारीं १५ व छीट जोडी सुमारी १५ व पागोटीं सुमारीं १५ येणेंप्रमाणें शिरपेंच सुमारी ९ व जवाहीर व अत्तर पानदान देऊन बिदा केलें. पांचवे रोजापासून रावराजा प्रतापसिंग व बोहोरा खुशालीराम येऊन, मामल्याचा जाबसाल करूं लागले. त्यास यांनीं तीन करोड चाळीस लक्ष रुपये त्यांजकडे बाकी व हालचा मामला येणेप्रमाणें सवाल केला. त्यांनीं उत्तर केलें कीं, "इतके दगड देखील आमचे हवेलीस नाहींत. मग पैका कोठून द्यावा?" त्याजवरून हे रागास येऊन आज्ञा केली कीं, "जयपूरकर वकील आहेत, त्यांस लष्करांतून मार्गस्थ करा. आह्मी पुढें जयपुराकडे कूच करितों." ह्मणोन आज्ञा जाली. त्या गोष्टीस दोन चार दिवस दम खाऊन, रावराजा प्रतापसिंग यानें भानगड करून, साठ लक्ष रुपये यांचा मामला केला, व तीन लक्ष रुपये अंतस्थ दरबार खर्चाबद्दल, एकूण त्रेसष्ट लाखांचा करारमदार जाला. लिहिलें जालें. याचा तपशील:—

आकरा लक्ष रुपये नक्त द्यावे ह्मणून करार. १

दहा लक्ष रुपये सा महिन्यांचे मुदतीनें द्यावे ह्मणून करार. १

विसां लक्षांचे परगणे खाशा अंमलापैकीं लावून द्यावे ह्मणून करार. १

बावीस लक्ष रुपये, ठाकूर लोकांकडे मुलुख आहे त्यापैकीं जप्ती केली आहे, तो ऐवज मजुरा घेऊन, बाकी वसूल करून द्यावे. येणेंप्रमाणें करार. १

एकूण त्रेसष्ट लक्षांचा झाडा करून द्यावा ह्मणून करारमदार ठरून, सावकारी निशा तूर्त द्यावयाचा ऐवज अकरा लक्ष, त्याच्या हुंड्या आणावयास जयपुरीं त्यांजकडील कारभारी गेले आहेत. सावकारी हुंड्या निशा आली ह्मणजे येथून कूच होईल. याप्रमाणें श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १६४.

**श्री.** १० मे इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक शंकराजी सखदेव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ० ११ माहे रज्जब मुक्काम लष्कर पातशाहा व राजश्री पाटिलबावा नजीक जयपूर वीस कोस जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः- इकडील वृत्त सविस्तर आमचे यजमानांहीं विनंति लिहिली आहे, त्याजवरून श्रुत होईल. कृपा करणार धनी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे. हे विज्ञापना."

---

## लेखांक १६५.

**श्री.** १० मे इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ ११ माहे रज्जब मुक्काम लालसोट नजीक जयपूर वीस कोस जाणून स्वानंदलेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः- इकडील वर्तमान पेशजीं छ ७ माहे जमादिलाखरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, त्याजवरून सविस्तर वृत्त कळलेंच असेल. हल्लीं वर्तमान तरीः-पातशाहा व राजश्री पाटीलबावा मुक्काममजकुरीं आहेत. जयपुरकरांकडील मामला जाला आहे. त्यापैकीं तूर्त किस्त देणें ठरली आहे. त्यापैकीं दोन लक्ष रुपये नख्त व लाख रुपयांचें जवाहीर एकूण तीन लक्ष मात्र आले आहेत. बाकीची निशा करून देतों, ह्मणून खुशालीराम बोहोरा

जयपुरकरांकडील कारभारी आठां दिवसांचा करार करून, यांची आज्ञा घेऊन जयपुरास गेले. त्यास वीस दिवस जाले. अद्यापि कांहीं पैक्याची निशाची सोय पडली नाहीं. ह्मणून चंव कोसांचा कूच करून मुक्काममजकुरीं आले. त्यास एका दों रोजां जयपुरकराकडून कारभारी येऊन, निशेची खातर जमा करून दिधली, तरी उभयतांचें कूच माघारा होईल. जर ऐवजाचे निशेस दिवसगत लागली, तर जयपुरासमीप जाऊन बारा कोसांवर मुक्काम करून असावें, याप्रमाणें ठरलें आहे. व जयपुरकरांचें वर्तमान ऐकतों कीं, त्यांचे सरकारांत पैका नाहीं, व कोणी माणूसही खानदानचें नाहीं. रोडाराम ह्मणून मुसाहेब मुख्त्यार राज्याचा आहे. तो शिंपी आहे. दुसरे बोहोरा खुशालीराम आहेत. हे राजे माधवसिंग यांचे गंगाजळीवा लेपाणी पाजणार आहेत. वरकड या दोघांअलीकडे जे आहेत, ते वाणी आहेत. याप्रमाणें राज्याचे कारभारी! व फौज नाहीं. व बारा कोठडीवाले सरदार आहेत, ते फुटून रावराजा प्रतापसिंग यांचे विद्यमानें यांस भेटून, आपलाले तालुक्याचे मामले फैसल करून, तहसिलीस यांजकडील फौजसरदार तहसिलीस गेले आहेत. जे कोणी येऊन भेटले नाहींत, त्यांचे तालुक्याची व खाजगीखालें मुलुख आहे त्याची जप्ती केली आहे व करीत जातात. याप्रमाणें वर्तमान आहे. जयपूरचे राज्यांत कांहीं त्राण राहिला नाहीं. जैसें जाटाचें राज्य नजीबखानानें घेतलें होतें, तोच प्रसंग जयपूरचाही आहे. यंदाची छावणी या प्रांतीं जाली ह्मणजे सहज सलाबतीनेंच जयपुरांत अंमल होईल, ऐसा प्रसंग आहे. पुढें अमलांत येईल, ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १६६.

श्री. मे. इ. स. १७८६.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः— आपण छ २७ रविलाखरचीं पत्रें पाठविलीं, तें छ १५ रजबीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, जयपूरचे बाकीचे ऐवजाचें काय जालें, व तैमूरशाहाचे लकावर शीख जाणार होते, तें काय जालें? व राजश्री पाटिलबावा फौज पाठविणार होते, ते गेली किंवा नाहीं. व पुढें मसलत काय करणार? व गोसावी फितुरांत सांपडला असतां मोकळा काय ह्मणून सोडला? व अफराशाहाबखानाचे बेगमेचे वस्तभावेचें ठिकाण सांपडलेंच असेल, ते कोठपर्यंत सांपडलें असे? त्याचा शोध करून लिहून पाठवावें. व मथुरा वृंदावन गोसाव्याकडून सुटलें, या अर्थी

सरकारांत ठेवावें, येविसीं राजश्री पाटिलबावांस पत्र पाठविलें आहे. तुह्मीं बोलून, पातशाहापासून करार करून घ्यावयाचें करावें. येविसीं पूर्वीही राजश्री पाटिलबावांस लिहिलें होतें. तेसमयीं गोसाव्याकडे दिल्ही, ह्मणून उत्तर आलें होतें. हल्लीं जप्ती केली आहे. ते सरकारांत घेण्याविसीं बोलून करून घ्यावें. व पत्र पाठविलें आहे, तें देऊन काम होत असल्यास करून घ्यावें. नाहीं तर आपलें अंग न दाखवितां पत्र प्रविष्ट करून देत असल्यास तैसें करावें. ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास जयपूरचा मजकूर तर पूर्वीं पत्रावरून कळेल. व तैमूरशाहाचा पुत्र झीलमेअलीकडे आला नाहीं. याजकरितां कोणी शीख त्याजवर गेले नाहींत. राजश्री पाटिल बावांची फौज धारराव शिंदे चार पलटणें व तीन हजार स्वारांनसीं पानिपतापाशीं आहेत. ते करनालचा वगैरेचा बंदोबस्त करून आहेत. व गोसाव्यापाशीं शेंपन्नास माणूस जीवदार धारकरी चांगले होते. ह्मणून त्याजवर हात न पडला. व अफराशाहाबखानाची बेगम, नारायणदास व जहांगीरखान भाऊ व सुजादिलखान व सुजातखान........बदस्तुर कैदेंत आहेत. अद्यापि कांहीं वस्तभावाचें ठिकाण लागलें नाहीं. बेगम आदिकरून ह्मणतात कीं, आमचे घरचा कारभारी नारायणदास होता; जें आहे तें याचे कागदीं पत्रीं आहे; ह्मणून बोलतात. नारायणदास ह्मणतो कीं, मीं कांहीं वाकबगार नाहीं. असे जाबसाल होतात. परंतु वस्तभावचा अद्यापि ठिकाण नाहीं. पातशाहास दिल्लीस वाटेस लाविलीयावर मग छावणींत रिकामपणीं यांची छान करून, ठिकाण लावावें ह्मणून ऐकतों. व मथुरा वृंदावन तूर्त राजश्री पाटिलबावांचे खाजगींत आहे. तात्या फोंडेकर शेणवई, चांभारगोंदेकर यांचा पाग्या व सुतरखान्याचा दरोगा आहे. याजकडे कमाविशीनें दोन्हीं स्थळें आहेत. त्यास याजविषयीं आपलीं दोन पत्रें राजश्री सदाशिव दिनकर यांचे विद्यमानें आलीं होतीं. त्यास एका पत्राचें उत्तर पहिलें दिल्हें कीं, गोसाव्याकडे आहेत. दुसरे पत्राचें उत्तर दिल्हें कीं, धर्मादायाखालें दोन्हीं स्थळें दिधलीं. ह्मणून वर्तमान राजश्री सदाशिव दिनकर यांचे मुखें ऐकिलें. त्याजवरून आह्मीं तें पत्र आपलेपाशींच ठेवून घेतलें आहे, आणि कोठें उल्लेखही केला नाहीं. सदाशिव दिनकरासीं दोन वेळां नकार निघाला. तेव्हां आह्मांकडे सरकारचें पत्र यांस आलें आहे, ह्मणून सदाशिव दिनकराशीं देखील बोलिलों नाहीं. पुढें कांहीं यांची मर्जी काबू तशी असली, तर पत्र दाखवून उत्तर देतील तें घेऊन पाठवूं. नाहीं तर आपण आज्ञा करतील त्याप्रमाणें करूं. आपण लिहिलें कीं, आपलें अंग न दाखवितां काम होत असल्यास करून घ्यावें; ह्मणून पत्र तैसेंच ठेविलें आहे. पुढें आज्ञा येईल तैसें करूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

## लेखांक १६७.

श्री. मे इ. स. १७८६.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– इंद्रसेन साहेब इंग्रेज वकालतीवर पातशाहापासीं व राजश्री पाटिलबावांपासीं होता. त्यास, त्यांजकडून सलाउद्दीनखान व मौलवी फकरोद्दिन हे दोघेजण दरबारास जाबसालास नित्यानीं येत होते. त्यास त्यांनीं कांहीं इंग्रेजां कडील भेदाच्या गोष्टी यांसीं बोलिले. तें वर्तमान इंद्रसेनास कळलें. त्याजवरून सलाउद्दिखानास व मौलवी फकरूद्दीस दूर केलें. त्या दोघांस राजश्री पाटील-साहेबीं आपले पाशीं ठेविलें. ह्मणून व जुवाबख्त पातशाहाजाद्यास आग्रीयाचा किल्ला व सुभेदारी द्यावी आणि त्यास आणून आग्रीयांत दाखल करावें, ह्मणून इंद्रसेनाचे मार्फत जाबसाल होतो. ते गोष्ट कांहीं प्रत्ययास न आली. ह्मणून रागास येऊन, लष्करांतून कूच करून आग्रीयास जाऊन राहिला आहे. त्यास राजश्री पाटील-बावा त्याचे डेरीयास समजावयासही गेले होते. त्यानें यांस सांगितलें कीं, "मी कूच केला ह्मणून हापड साहेबास लखनौस व बडेसाहेबास कलकत्यास लिहिलें आहे. आतां मजला रहातां येत नाहीं. आग्रीयास जाऊन रहातों. मग तिकडील आज्ञा आली तर माघारा येईन. नाहीं तर पुढें कूच करून जाईन." ह्मणून बोलणें होऊन येथून कूच करून गेला आहे. आग्रीयांत आहे. पुढें वर्तमान आलीयावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १६८.

श्री. २१ जून इ. स. १७८६.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, भंगासिंग व कर्मसिंग वगैरे शीख पांच हजार फौजेनशीं यमुना उतरून गोसगड प्रांतीं दोन चार गांव ताख्तताराज केले. नंतर अंतरवेद प्रांतीं मेरठ हापड वगैरे येथील रखी घेऊन गडमुक्तेश्वर दरोबस्त लुटून नेलें. व जमीदार गुजर मिळोन त्या प्रांतीं दुंडी केली आहे. शाहद्र्यापावेतों दिल्लीहून दोन कोस मार्ग चालत नाहीं. हल्लीं रवळोजी शिंदे यांची आवाई व शाहनिजामुद्दीन दिल्लीस पावल्यावर कांहीं शीख यमुना पार उतरून गेले, व शिखांचे सरदार कर्मसिंग वगैरे अद्यापि गोसगड अंतरवेदप्रांतीं मुक्काम करून आहेत. बापुजी मल्हार व देवजी गवळी दोन तीन हजार लोकांनिशीं गोसगड नजीक थान्यास मुक्काम करून आहेत. नित्य करोलीची लढाई होते. परंतु

शीख व गुजर मिळोन जमात भारी, ह्मणून अद्यापि मुकाबिला जाला नाहीं. रवळोजी शिंदे यांजबरोबर रणजीतसिंग जाटाकडील एक हजार लोक स्वार प्यादे मिळोन आहेत, व दोन पलटणें एकूण दोन अडीच हजार फौज व तोफा व आठ दहा बरोबर आहेत. परंतु गडमुक्तेश्वर लुटल्याची आंवाई श्रवण करून, अद्यापि हातरस नजीक मथुरेहून चौदा कोसांवर मुक्काम करून आहेत. नवाब नाजर यास राजश्री पाटिलबावांनीं शहाकडे पाठविलें आहे. त्यास पातशाहाची मर्जी आहे कीं, मशारनिल्हेस जिवें मारावें. परंतु शहाजींनीं रदबदली बहुत केली कीं, अन्नवस्त्रें देऊन कैदेंत ठेवावें. त्यास हजरताचे मर्जीनुरूप घडेलसें वाटतें. सेवेसीं श्रुत होय. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पै॥ छ २ सवाल सन सब्बा संमानीन श्रावणमास शु॥ ३

## लेखांक १६९.

**श्री.**

२१ जून इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ २४ माहे साबान मुक्काम डीग जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं छ ११ रज्जबीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत. तें पावून सविस्तर वर्तमान कळलेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, पातशाहा व राजश्री पाटिलबावा जयपूरचा मामला फैसल करून मुक्काममजकुरीं आले. येथून छ २५ मिनहूस पातशाहास छावणीस दिल्लीस मार्गस्थ करणार. व आपण येथून कूच करून मथुरा वृंदावनासमीप जाऊन छावणी करावी; तमाम फौज पथकें पार अंतर्वेदींत पाठवून मुंडसानचा किल्ला व खुर्जापाशीं याकूबखान याचा किल्ला आहे तो, एकूण दोन्हीं स्थळें जमीदाराकडे आहेत ते मवासी करितात, याजकरितां त्यांस खारीज करून, सरकारचा बंदोबस्त करावा; याप्रमाणें मानस आहे. व इंद्रसेन साहेब इंग्रेजांकडील वकील रुसून आग्रीयास गेला होता. त्यांस सदाशिव मल्हार वकील, यांजकडून इंग्रेजाकडील जाबसाल करितात, त्यास पाठवून मशारनिल्हेस समजावून आणिलें. ते छ २१ तारिखेस लष्करांत डिगेचे मुक्कामीं दाखल जाले. वरकड वर्तमान पु॥ पत्रावरून व पारसी एक-बारावरून कळूं येईल. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पै॥ छ जिल्काद सन सब्बा भाद्रपदमास.

## लेखांक १७०.

श्री.

२३ जुलई इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ २६ माहे रमजान मुकाम श्री मथुरा जाणून स्वानंदलेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं इकडील बारीक मोठें वृत्त सविस्तर छ २४ माहे साबानीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पावून श्रुत जालेंच असेल. हलीं वर्तमान तरी पातशाहा दिल्लीस आहेत. राजश्री पाटिलबावा मुक्काममजकुरीं छावणी करून आहेत. जयपुरकराकडे व खोपरकराकडे वगैरे जिकडून ऐवज सरकार खंडणी पैकीं येणें, तिकडे तगादे करून आहेत. तूर्त नवी मसलत कांहीं नाहीं. बादबरसात जे मसलत ठरेल ते लिहूं. सुभ्यापाशीं याकुबगड ह्मणून आहे त्यास, व रेवाडीचा गोकुळगड त्यास मोर्चे, फौजा पाठवून लाविले आहेत. अद्यापि खालीं जाले नाहींत. वरचेवर तोफखाना व दारूगोळा सरजा रवाना होत आहे. मास पक्षांत खालीं होऊन सरकारखालसा होईल, ऐसें आहे. वरकड वर्तमान पारसी एकबारा पाठविल्या आहेत, त्यांवरून पातशाहाचे दरबारचें व राजश्री पाटिलबावांचे दरबारचें वृत्त कळं येईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १७१.

पा॥ छ १५ जिल्हेज

श्री.

१ सप्टेंबर इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ७ माहे जिल्काद मुक्काम श्री मथुरा जाणून स्वानंदलेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः– इकडील वृत्त पेशजीं छ २३ माहे रमजानीं विनंति पत्रें पाठविलीं आहेत, तें पावून सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हलीं वर्तमान तरी, पातशाहा दिल्लीस आहेत. राजश्री पाटिलबावा मुक्काममजकुरीं आहेत. रामगडाकडे फौज गेली आहे, ते रामगडाचे आसपास कोस कोसांवर मुक्काम करून आहेत. अद्यापि मोर्चे लाविले नाहींत. अफराशाहाबखान याचा भाऊ जहांगीरखान रामगडांत आहे. त्यानें लखनौस वजीराकडे व हापड साहेब फिरंगी यांजकडे, राजे दयाराम किशमेरी ब्राह्मण मातबर माणूस आहे, त्याज समागमें पत्रें पाठविलीं आहेत; आणि सांगून पाठविलें आहे कीं, "श्रीगंगेअलीकडे हिंदूंचें

राज्य जालें, मुसलमानी बुडाली. आह्मीं आजपावेतों मुसलमानीचा तगमा जतन करून आहोंत. आमची कुमक करितां तर उत्तम आहे. नाहीं तर आह्मांस सुचेल त्याप्रमाणें करूं." ह्मणून सांगून पाठविलें आहे. त्याचें उत्तर अद्यापि आलें नाहीं. याप्रमाणें वर्तमान श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक. १७२.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:— किर्कपट्रासू पाद्री साहेब इंग्रेज, लाट कलफदानस सितैन साहेब यांजकडून कलकत्त्याहून बदली, इंद्रसेन साहेब इष्टिनाकडून राजश्री पाटिलबावांपासीं वकालतीस होता, त्याची बदलीस आला. त्याचा सन्मान, हत्ती व घोडा व जेगा व शिरपेंच, मोत्यांची कंठी, सात किस्ती वस्त्रें येणेंप्रमाणें देऊन बहुमान केला. समागमें इंग्रेज तीन असाम्या, त्यांस चार चार पारचे वस्त्रें; व आणिक समागमें चार मुत्सद्दी, त्यांस दुशाले व पागोटीं चार दिधलीं. तिसरे रोजीं राजश्री पाटिलबावा इंग्रेजमजकुराचे डेरियास गेले. त्यांनींही सदर्हूप्रमाणें हत्ती, घोडा, मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच व सात किस्ती वस्त्रें व फिरंगी दोन पेटिया व कांहीं इंग्रेजी घड्याळ वगैरे सरंजाम देऊन बहुमान केला. समागमें लष्करांत होते. हल्लीं दिल्लीस आले आहेत. अद्याप पातशाहाची मुलाजमत जाली नाहीं. मुलाजमत जालियावर सविस्तर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १७३.

**श्री.** इ. स. १७८६.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

मुरादबेग मोंगल हजार स्वार व दोन पलटणेचा सरदार नजबखानाकडील होता. त्याजकडे कृष्णगड पातशाही किल्ला व दरोबस्त मेवात त्याचे सरंजामांत होते. तो राजश्री पाटिलबावांसमागमें चाकरी करीत होता. त्याजकडून कृष्णगड व मेवातची मामलत दूर करून, नौबतराय खत्री आग्रेकर यांजकडे सांगितली. पुढें मासपक्षांत तिकडील मेवातचा बंदोबस्त जाला ह्मणजे दिल्लीकडे येऊन शिखांवर दबाव द्यावा ऐसी मसलत आहे. दिल्लीपासून तिसां कोसांवर पलवले पलिकडे मुक्काम करून आहेत. पुढें अमलांत येईल, ते विनंति लिहूं.

राजश्री गणपतराव कृष्ण यांजकडे प्रगणे मेरट वगैरे बत्तीस महालांची मामलत आहे. त्यास मेरटकडे शिखांचा हंगामा. याजकरितां मेरटहून कूच करून बागपतास यमुनातीरीं आले आहेत. समागमें हैबतराव फाळके वगैरे सरकारची फौजही आहे. त्याचे मुकाबल्यास चार हजार स्वार डलेवाले ह्मणून एक जथा शिखांचा आहे, ते आपले जमावानिशीं आले आहेत. अद्याप लढाई जाली नाहीं. युद्धप्रसंग जालियावर मागाहून विनंति लिहूं.

जयपुरकराकडे खुशालीराम ब्राह्मण कारभारी होता. त्यानें सालगुदस्तां राजश्री पाटिलबावांकडे येऊन जयपूरचा मामला केला. त्या मामल्याचे ऐवजाचा फडशा होऊन, बाकी दहा लक्ष रुपये राहिले. त्याचा निकाल कांहीं जाला, कांहीं न जाला. सबब जयपुरकरांचे महाल रायाजी पाटलासमागमें फौज देऊन जप्त केले. रावराजा प्रतापसिंग व खुशालीराम एक विचारें होऊन, राजश्री पाटिलबावांचे ममतेंत रायाजी पाटलासमागमें आहेत. हें जाणून, राणावत ह्मणोन रजपूत जयपुरकरांकडील सरदार आहेत, त्यांजकडे राजानें सांगोन पाठविलें कीं, तुह्मांकडे मामल्यास रायाजी पाटील बमय फौज येतील. त्या मामल्याचे बोलण्यांत खुशालीरामास कैद करून, मारून टाकणें. त्यावरून मशारनिल्हेस मारून टाकलें. जोधपुरकर व जयपुरकर एकविचारें आहेत. पुन्हां राजश्री पाटिलबावांची स्वारी जयपुराकडे गेली, तर बिघाड करावा या लक्षांत आहेत. ह्मणोन श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. रायाजी पाटील जयपुरकरांच्या एक्या गढीवर चढून गेले. तेथें हल्ला करितांनां सातशें माणूस मारलें गेलें. गढी हातांस आली नाहीं. जयपुरकरांचा दबाव रायाजी पाटिलावर विशेष आहे, ह्मणोन पत्रें राजश्री पाटिलबावांकडे आलीं होतीं. पुढें विचार ठरेल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

## लेखांक १७४.

**श्री.** इ. स. १७८६.

''पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. या दिवसांत पातशाहापासीं मुख्त्यार नाजर मंजूरअल्लीखान आहेत. यांनीं वीस हजार स्वार प्यादा चाकर ठेऊन, आपली बाजी शेर केली कीं, राजश्री पाटिलबावांस दिल्लींत येऊं न दिल्हें. ते रेवाडीस येऊन, येथील रंग पाहून माघारा अजमेरीचे रोखें कूच करून गेले. पुढें तिकडल्या वाटेनें डिगेकडे, ढवळपूर बाडीकडे, आगऱ्याचे रोखें चमेल अलीकडे राहावें, या

विचारावर माघारा इकडून कूच करून आले आहेत. त्यास येथें शिबंदीचा हंगामा पातशाहाकडील ! कोणास भक्षावयास देत नाहींत. दोन तीन लक्ष रुपयांचें रुपें, कांहीं पलंग व कांहीं तारें वाट्या, कांहीं फरासी पंखे यांच्या दांड्या वगैरे जिन्नस रुप्याचा होता, तो दिल्हा. पुढें पैसा एक देत नाहींत. ह्मणून नाजरची व पातशाहांची चित्तशुद्धता नाहीं. त्याजवरून नाजरजींनीं गुलाम कादरखान यासीं संधान लाऊन आपला एकोपा केला, आणि परस्परें एकवाक्यता जाली. व तहनामा जाला कीं, पातशाहीची मुख्त्यारी तुह्मीं करावी. याप्रमाणें तह ठरला आहे. परंतु या गोष्टीस पातशाहा राजी नाहींत. ह्मणोन खैरून्निसा पातशाहाची बहीण धाकटी आहे, तिचे दोघे पुत्र बहुत काबील व शाहाणे आहेत. त्यांचें वय पंचविसातिसा वर्षांचें आहे. त्यांतून एकास पातशाहा करावें व बारा लक्ष रुपये फौजेचे खर्चास द्यावे, ह्मणोन करारमदार ठरला आहे. जर पातशाहांनीं दबून फौजेस खर्चास दिल्हें, अथवा हेच फौज घेऊन बाहीर निघाले, आणि मुलुख जबरदस्तांनीं दाबला आहे तो सोडून फौजेस सरंजाम लाऊन दिल्हा, तर उत्तम. जर ह्या दोन्ही गोष्टींतून एकही गोष्ट पातशाहांनीं न केली, आणि सुखावर दृष्टि देऊन दिल्लींतून न निघाले, तरी यांस कारागृहीं घालून खैरुन्निसाचे एका पुत्रास पातशाहा करावें, ऐसी सल्ला ठरली आहे. गुलाम कादरखान रोहिला याजपासीं तूर्त रोहिले वगैरे हिंदुस्थानी फौज वीस पंचवीस हजार स्वार प्यादा जमा जाला आहे. व नाजरजीची व खानमजकुराची एकवाक्यता होऊन शपथ प्रमाण कुराण जालें आहे. हें वर्तमान सविस्तर पातशाहांस समजलें. त्याजवरून पातशाहांनीं जुवाबक्ष शाहाजाद्यास आगरियास पैदरपै भले माणूस व खवास पाठऊन, पातशाहाजादा जुवाबक्ष यास आपलेपासीं बोलाविलें; आणि आगरियाचे सुब्याचीं सुभेदारीचीं वस्त्रें दिधलीं. आणि जितकी फौज नाजरजीहीं ठेविली होती, तितकी कुलपांत शाहाजाद्याचे ताबीन केली. आणि आज्ञा केली कीं, "जो मुलुख पातशाही खालसा आहे, तो दरोबस्त फौजेचे सरदारांस सरंजामांत लाऊन देणें. कांहीं लोक राहतील, त्यांस तूर्त नगदी देऊन बाहीर निघावें. मीही समागमें निघतों. जो मुलुक मुफसदांनीं घेतला आहे, त्याचें पारपत्य करून, मुलुख सोडवून, जे नगदीचे लोक राहतील त्यांस द्यावा." याप्रमाणें सल्ला ठरली आहे. हें वर्तमान गुलाम कादरखान यांनीं ऐकून, कूच करून शिकंदरा व खुर्जा शिकारपूर वगैरे ठाणीं बसवीत, रामगड कोलेकडे गेला आहे. पातशाहाजाद्याची मर्जी आहे कीं, अवघी यवनमंडळी मिळून राजश्री पाटिलबावांस चमेली पार करून द्यावें. मग गुलाम कादरखान याचें पारपत्य करून,

याजकडे मुलुख आहे तो सर्व सोडवून घ्यावा. ऐसे दोन विचार आहेत. परंतु पातशाहाची मर्जी आहे कीं, राजश्री पाटिलबावांस खारीज न करावें. प्रथम रोहिल्यास खारीज करून, याचा मुलुख हाताखालें घालून, मग जें करणें तें करावें. ह्मणोन पातशाहांची मर्जी आहे. परंतु घडल्यांत येईल तें खरें. मसलती व सल्ला बहुत करितात. परंतु एकही गोष्ट ठरून अंमलांत येत नाहीं. पुढें प्रत्यास येईल, ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १७५.

श्री. इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसी जे:– आपण छ० ९ जमादिलाखरचें पत्र पाठविलें, तें छ० ४ माहे रज्जबीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, "तिकडील वर्तमान वरचेवर लिहीत जाणें. इकडील वर्तमान तरी, टिपू तुंगभद्रापार दक्षिणतीरीं गेला. सरकारची फौज तुंगभद्रा अलीकडे उत्तरतीरीं तीन मजलीवर आहे. सलूखाचें बोलणें टिपूकडून लागलें आहे. अद्यापि ठराव जाला नाहीं. त्याचा कारभार लबाडीचा आहे. विश्वास नाहीं. घडेल तें लिहिलें जाईल. विलायती मेव्याचा मजकूर लिहिला तो व बेदाणा अनार तीस पाठविले ते पावले. जिकडील तिकडे प्रविष्ट जालें. आणिक विलायती मेवा येईल त्याची बातमी राखून पाठवावा, तर मेवा पाठवावयाचा होता. मग कांहीं नासता, कांहीं चांगला रहाता." ह्मणोन पत्रीं आज्ञा. त्यास येथें पुण्याची एकबारेचें वर्तमान वरचेवर पंधरावे सतरावे रोजीं राजश्री पाटिलबावांचे येथें येतें. त्यांत वर्तमान ऐकिलें कीं, टिपूची मामलत होऊन, सरकारच्या फौजा ज्येष्ठ वद्यांत पुण्यास दाखल होणार; ह्मणून श्रवणांत आलें. विलायती मेव्याविसीं आज्ञा. त्यास, कांहीं चांगला पोंचला, कांहीं नासला. इतका विश्वास मेवा फरोशाचे सांगितल्यावरून पुरला. याजकरितां अंतर पडलें. अतःपर कार्तिक मार्गशीर्ष मासीं मेवा येईल, तो माघमासीपावेतों वरचेवर एक दोन वेळां येत असतो. त्यास आज्ञेप्रमाणें जसा बनेल, तसा मेवा पाठवून देऊं. परंतु अंतर करणार नाहीं. यावेळेस तरी मेवे फरोशाचे बोलण्यावर चूक पडली. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १७६.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--

विनंति ऐसीजे:- पृथ्वीसिंगाचा पुत्र मानसिंग यासही कृष्णगडीहून आणून बगलेंत रावराजाचे विद्यमानें घेतला आहे. व राजे प्रतापसिंग यांजकडील कारभारी खुशालीराम बोहरा व बालानंद महंत हेही रावराजापासीं येऊन हजर जाले आहेत. व बोलतात कीं, राजश्री पाटिलसाहेब जे आज्ञा करितील, ते आह्मांस मान्य आहे. ह्मणून राजानें सांगून पाठविलें आहे. व येणेंप्रमाणें उभयतांनीं राजाकडून पत्र देखील लिहून दिल्हें आहे कीं, जे राजश्री पाटिल-साहेब आज्ञा करितील ते मान्य. व यांनीं मुक्काम मजकुरीं येऊन, तमाम जयपुर-प्रांताच्या जप्त्या करून, आपले सरकारचे कारकून पाठवून, ठाणेबंदीचा बंदोबस्त केला, व करीत जातात. पुढें एका दों रोजां रावराजा भेटीस जाबसालास येणार. तो आलियावर जिकडून पैका सरकारांत अधिक येईल, तिकडे राजाची स्थापना होईल ऐसा विचार आहे. घडल्यांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १७७.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:- मिर्जा रहीम बेग यांजकडे पेशजीं मंडीसर व अजमेर हे दोन किल्ले व त्यांजखालील परगणे, तेथील मामलत दरोबस्त मशारनिल्हेकडे होती. हल्लीं डीगचा किल्ला व डिगेखाले परगणे आहेत ते दरोबस्त राजश्री लक्ष्मणराव हरी पाऱ्होळकर यांजकडून दूर करून मिर्जाकडे सांगितली. व लक्ष्मणराव हरी यांचे फाजील डिगेसंबंधों चाळीस हजार रुपये निघाले. ह्मणून त्यांजकडे खुर्जा व मलकपूर आहार व सिकारपूर व चंडो....वगैरे सात महाल सालगुदस्तां जो आकार जाला त्याजवर दिढी चढ घालून, रावमजकुराकडे साल हालापासून मामलत सांगितली. सालगुदस्तां हरीबा बाजीचे चिरंजीव, गोपाळराव हरी, यांजकडे हे महाल होते. त्यांच्यानें महालाचा बंदोबस्त होऊन पैक्यास ठिकाण न लागे, ह्मणून त्यांजकडे पैक्याचा तगादा आहे. व हे सात महाल यांजकडून दूर करून लक्ष्मणरावजीकडे सांगितले. याप्रमाणें वृत्त जालें. आपणांस कळावें ह्मणून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १७८.

श्री. इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– बखतावरसिंग, रावराजाचा पुत्र, अलवारचे किल्ल्यांत बंदोबस्तेंकरून आहे. रामसेवक दिवाण यासीं व जीवनखान होशदारखानासीं पहिल्यापासून चित्तशुद्धता नाहीं. रावराजा मृत्यु पावल्यावर सांप्रत काळीं राणीचे अनुमतेंकरून जीवनखानांनीं रामसेवक दिवाण यास कैद करावेंसें केलें होतें. त्याजवरून मशारनिल्हे जयपुरास पळून आला. त्याची सरंजाम जीवनखां व राणींनीं जप्त केला. दिवाणमजकुरांनीं राजश्री पाटिलबावांस पत्रें पाठविलीं कीं, मी आज्ञेप्रमाणें फौज घेऊन रेवाडीस जाणार होतों. इतक्यांत ऐसा प्रकार फितुराचा घडला. तात्पर्य, रावराजाचे घरांत आपसांत कलह बहुत जाला आहे. जयपुरकरांचा मामला ठरल्यावर काय जाबसाल रावमजकुराचे मुलुखाचा ठरेल, तें प्रत्ययास आल्यावर सेवेसीं विनंति लिहूं. अंतर्वेद प्रांतीं शिखांनीं बहुत उपद्रव केला होता. इतक्यांत रवळोजी शिंदे पांच सात हजार फौजेनिसीं दरकूच हापडास आल्यानें दरोबस्त शीख हिरासा होऊन, यमुनापार पानिपताकडे गेले. मालियत बहुत नेली. देवजी गवळी व बापू मल्हार वगैरे आठ हजार फौजेनें त्यांचे मुकाबल्यास गेले आहेत. शिखांचा विचार आहे कीं, रब्बीचे हंगामांत पुन्हां अंतर्वेद प्रांतीं येऊन, रखी दुसाला घ्यावी, ऐसी अवई आहे. राजश्री रवळोजी शिंदे किराण्याचे नजीक मुक्काम करून आहेत. जोधपुरकरांचा सलूख ठरल्याचें वृत्त सर्वांनीं श्रवण करून जमीदार मवास वगैरे भयभीत आहेत. सेवेसीं श्रुत होय. पुढें प्रत्ययास येईल, तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १७९.

श्री. इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसी जे:– येथें पातशाहाचे व राजश्री पाटिलबावांचे येथें एकबारांत लखनौहून वर्तमान आलें कीं, टिपू सुलतान यासीं व कोणी संस्थानिक होता त्यासीं युद्ध जालें. त्या प्रसंगीं टिपूस गोळी लागून मृत्यु पावला. म्हणून वर्तमान आहे. परंतु आपले सरकारांतून वर्तमान आलें असेल तें खरें. याजकरितां येथील पक्केंसें वर्तमान ऐसी खातरजमा नाहीं. तरी सविस्तर लिहावयास आज्ञा करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति. वरकड

वर्तमान पारसी एकबारा वजिराकडील व पातशाहाकडील व पाटिलबावांकडील पाठविल्या आहेत. त्याजवरून कळों येईल. कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १८०.

**श्री.**

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसी जे:–राजश्री अंबाजी इंगळे यांसीं पानिपताकडे शिखांचे बंदोबस्तास पाठविलें होतें. त्यास शिखांची धूमधाम मेरट प्रांतीं रखीची आहे. तो बंदोबस्त इंगळे मजकुराच्यानें अद्यापि जाला नाहीं. परंतु हल्लीं सरकारचीं पत्रें गेलीं आहेत कीं, तिकडील बंदोबस्त करून, कांहीं फौज पलटणें तिकडें ठेवून, तुह्मीं आह्मांपाशीं लष्करांत येणें. ह्मणून पत्रें गेलीं आहेत. त्याजवरून राजश्री शामराव आपाजी यांजसमागमें दोन पलटणें व पांचशें स्वार व गुलाम कादर जाबेतेखानाचा पुत्र, याप्रमाणें जमाव पानिपताकडे ठेऊन, राजश्री अंबाजी इंगळे लष्करांत येणार. याप्रमाणें वृत्त आहे. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १८१.

**श्री.** इ. स. १७८६.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे. येथील प्रकार तर हिंदुस्थान निक्षत्री जालें. शीख आहेत, त्यांत फूट आहे. कोणी कोणाचें स्वाधीन नाहीं. तदबाव पडल्यास जमीदारी करावयासही लागतील जर जबरदस्ती न पाहिली, तर लुटींत फिरतच आहेत. हें शिखाचें वर्तमान आहे. वजिराचा प्रकार ह्मणावा, तर इंग्रेजांवर त्याची दवलत आहे. त्यास सांप्रत्य इंग्रेजांचा प्रकार हलका दिसतो. हिस्टीन विलायतेस गेला. त्याचे बदली बडेसाहेब ह्मणून आले आहेत. त्याचा बंदोबस्त हिस्टनाप्रमाणें नाहीं. व खजानाही पूर्ववत्प्रमाणें नाहीं. परंतु पहिली फरपट चालत आली आहे, त्याजप्रमाणें कारभार चालतो. व पातशाहाचा प्रकार ह्मणावा, तरी एक लाख तीस हजार रुपये दरमाहाचा चाकर आहे. तितका पैका अक्षत मरीट मिळाला ह्मणजे त्यास एका गांवाशीं व बिघाभर जमीनीची गरज नाहीं. याप्रमाणें हिंदुस्थानची अवस्था आहे. त्यास अवघे हिंदुस्थानचे बंदोबस्ताचें ओझें एकल्या राजेश्री पाटिलबावांवर आहे. जितका

बंदोबस्त यांचे जीवेंकडून जातीनें करणें तो केला आहे. व करावयाचा तो करितात. परंतु यांचे पदरीं कोणी माणूस नाहीं कीं, यांचे सरदारीचा पडदा राखून, मुलकी बंदोबस्त करून, पैका उत्पन्न करून दौलत सांभाळीसा माणूस नाहीं. याजकरितां स्वामींस सूचनार्थ विनंति लिहिली आहे. जो प्रकार दृष्टीनें पाहिला आणि प्रत्ययास आला आहे, ऐसें जाणून विनंति लिहिली आहे. पुढें उत्तम जाणतील, तें करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १८२.

**श्री.** इ. स. १७८६.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे:–राघोगडवाल्यास बहादारीनें किल्यांतून खंडोजी इंगळे व रामजी पाटील जाधव व महंमद बेग हमदानी यांनीं सरंजामसुद्धां काढलें; ह्मणून वर्तमान आलें. त्यावरून राजश्री पाटिलबावा रागास बहुत आले कीं, लाखों रुपये खर्च होऊन, त्यास बहादारीनें काढून, त्यासीं पगडीबदल भाऊपण करावयाचें प्रयोजन काय? त्याजवरून येथून राजश्री अंबाजी इंगळे यांची रवानगी केली आहे कीं, त्यास मारून टाकावें. नाहीं तर धरून आणून ग्वाल्हेरचे किल्यावर टाकावें. येणेंप्रमाणें बोलणें करारांत येऊन, राजश्री अंबाजी इंगळे यांस राघोगडास रवाना केलें आहे. पुढें वर्तमान येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १८३.

**श्री.** इ. स. १७८६.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– जुफकारखान खानजादा अलीनगर ह्मणून जागा डिगेसमीप दोन लक्षांची त्याजकडे होती. त्यास त्याजकडून दूर करून, अलीनगरीं सरकारचें ठाणें बसविलें. आणि त्याचे कुटुंबास भक्षावयास आडिंग ह्मणून एक जागा पथानीयाचे परगणीयाची आहे. त्यापैकीं पंधरा हजाराची कमाल जमेचीं खेडीं लावून देऊन, त्याचे कुटुंबास रहावयास गोवर्धनीं आपले कमाविसदारांस सांगून, एक हवेली रहावयास खाली करवून देविली. आणि त्याचे घरचे शें दीडशें घोडे व तीन हत्ती आहेत, त्यांस सिलेदारीनें चाकर ठेऊन त्याचें



**निजामउद्दीन अवलियाची कबर.**

(जुनें चित्र.)

चालवावें. येणेंप्रमाणें करारमदार होऊन, अलीनगर खाली करवून, आपला अंमल केला. कळावें ह्मणून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १८४.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:— अनुपगीर गोसावी मकनपुरासमीप मुक्काम करून होता. तेथून असफदौला वजीर यांजकडे जाबसाल लावून, आपली चाकरी करारमदार करून त्याची भेटी घेतली. सात पारच्यांचा खिलत व हत्ती व घोडा, मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच याप्रमाणें बहुमान करून, इलमासखान अंतर्वेदीचा इटावे वगैरेचा कमाविसदार आहे, त्याजवर यांचे दरमहाची खर्चाची नेमणूक करून दिधली ह्मणून वर्तमान ऐकिलें. व त्याचा भाऊ उमरावगीर यानें दोन चार हजार माणूस जमा करून, सरकारचे महाल डभई वगैरे आहेत तिकडे धूमधाम करून, सरकारचीं ठाणीं उठवून देऊन, आपलीं ठाणीं बसविलीं होतीं. त्यास देवजी गवळी वगैरे फौज राघोगड फत्ते करून आली होती, त्यास उमराव गिरावर पाठविलें. त्याचें यांचें सातां कोसांचें अंतर होतें. फौज आली, हें वर्तमान उमरावगिरानें ऐकतांच पळून श्रीगंगापार गेला. तोही अनुपगिरापाशीं लखनौस जाणार. त्यास देवजी गवळी यांनीं डभई वगैरे परगणियांत सरकारचे कमाविसदारांचा बंदोबस्त करून देऊन, सरकारांत पत्रें पाठविलीं. त्यावरून आज्ञा जाली कीं, याकुबखान खुर्जेवाला यास गढीसमोर चकवून सरकारचें ठाणें बसविणें. त्याजवरून देवजी गवळी व विठोजी शिंदे कूच करून, खुर्जास मोर्चे लाविले आहेत. तेही जागा मासपक्षांत खाली होऊन, सरकारचा बंदोबस्त होईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १८५.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:— जोधपुरकरांकडील वकील डिगेचे मुकामीं येऊन जोधपुरचा मामला तीन लक्षांचा केला. त्यापैकीं नख्त पन्नास हजार रुपये हुंडी देऊन, बाकी अडीच लक्ष रुपये राहिले; त्याचा करार केला कीं, अखेर चैत्रमास-

पावेतों बेबाकी करून देऊं. ह्मणून लिहिलें होऊन, राजश्री पाटीलबावांनीं वकिलास आज्ञा केली कीं, "जयपुरकरांचा आमचा बिघाड. त्यांचें पारिपत्य करणें आह्मांस अगत्य आहे. आह्मी तिकडे पातशाहासुद्धां कूच करितों. त्यास तुह्मीं जयपुरकरांस शामील न व्हावें ह्मणून शपथपूर्वक आपले धन्याचें पत्र आमचे नांवें आणून द्यावें." ह्मणून आज्ञा केली. त्याजवरून वकिलांनीं जोधपुरीं लिहून पाठवून उत्तर आणून दिल्हें कीं, आह्मी जयपूरकरास शामील होणार नाहीं. याप्रमाणें श्रवणांत आलें, त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १८६.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः-

विनंति ऐसीजेः- राजे बदरीनाथ ठाकोर, नवाब निजाम अल्लीखान यांजकडील वकील, यांचे मार्फत रमजानचे इदीबद्दल नजर मोहोरा सुमार एकशें एक नवाबांनीं पातशाहांस पाठविल्या होत्या. त्याची रसीद व नवाबांस इदेबद्दल वस्त्रें पावलीं नव्हतीं ह्मणून राजश्री बदरीनाथ यांनीं, राजश्री बाबाराव वकील नवाबांकडील निंबाळकरांचे निसबतीचा गृहस्थ येथें आहे, त्यांचे विद्यमानें राजश्री पाटिलबावांस विनंति करून, नजरची रसीद व सात पारच्यांचा खिलत व ढाल तरवार येणेंप्रमाणें सरंजाम, पातशाहाचा शुका नवाबांस व राजश्री पाटिलबावांचीं पत्रें, येणेंप्रमाणें घेऊन, यांनीं आपले चिरंजीव देवरावनामें आहेत, त्यांजसमागमें रवाना नवाब निजाम अल्लीखान यांजकडे केले आहेत. व यांचे बंधु मुकुंदराव हरकारे व पुतणे जगजीवनराव हे दोघेही जण, दोन वर्षांत पितापुत्र मृत्यु पावले; याजकरितां यांचे जहागिरीचाही पैका गुमास्ते कांहीं खर्चास पाठवीत नाहींत. त्याचाही बंदोबस्त करून घेतला पाहिजे. ह्मणून............समागमें नवाबांसही पातशाहाकडून वस्त्रें........करून तिकडे आले आहेत. त्यास, हें वर्तमान आपल्यास कळावें ह्मणून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक १८७.

**श्री.**

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः- पतियाल्याकडील वर्तमान आलें कीं, आला जाटाचा नातू

साहेबसिंग यासीं व त्याचे घरचा बक्षी फौजेचा होता त्यासीं फौजेचे हजिरी-गणतीकरितां कटकट जाली. त्यास बक्षीमजकुरानें साहेबसिंगाचे तोंडांत मारली. तो रडत आपले मातुश्रीपासीं गेला, आणि बहुत आक्रोश केला. त्याजवरून मातुश्रीनें आज्ञा केली कीं, त्यास कैद करा. त्याजवरून बक्षीस कैद केलें. त्याचे भाऊबंद होते, त्यांजकडे चार किल्ले मातबर होते. त्यांनीं हें वृत्त ऐकून भगेलसिंग व रायसिंग डलेवाले वगैरे शिखांचे स्वाधीन किल्ले केले. याकरितां जयसिंग कन्हय्या वगैरे शीख सतलज पलीकडील आहेत, ते साहेबसिंग जाटाचे सोयरे आहेत. त्यांस बोलावूं पाठविलें आहे. त्यास, जे शीख इकडे अंतर्वेदींत धांवत होते, ते तमाम जमा होऊन पतियाल्याकडे जाणार, ह्मणून वर्तमान आहे. अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १८८.

**श्री.** इ. स. १७८६.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– राजश्री गोविंदराव कृष्ण यांचे चिरंजीव गणपतराव गोविंद यांजकडून उदेपुरचा मामला दूर करून लालाजी बल्लाळास सांगितला. ह्मणून त्यांजकडील जिवाजी मोरेश्वर कारभारी त्यांस राजश्री धारराव शिंदे यांची दिवाणगिरी सांगितली. आणि गणपतरावाचे घरचे दोन तीनशें घोडे पागेचे आहे, त्यांची कांहीं सोय नाहीं ह्मणून शिलेदारानें पागाची बोली करून, राजश्री धारराव यांचे तैनातीस राजश्री गणपतरायाकडील सरंजाम द्यावा याप्रमाणें करारमदार ठरला आहे. ते अद्यापि सरंजामसुद्धां उदेपुरीहून आले नाहींत. लष्करांत आलियाबर अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १८९.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– उदेपुरची मामलत राजश्री लालाजी बल्लाळ यांजकडे सांगितली. त्याजवरून उदेपुरकर राणा यांजकडून त्यांचा मुनसी व कारभारी आले आहेत. हे विनंति करितात कीं, "लालाजी बल्लाळांसीं व आह्मांसीं आकस आहे.

त्याजकडे आपण आह्मांकडील मामलत सांगावयाचें प्रयोजन काय? श्रीमंत पंतप्रधान स्वामींचे दीडलक्ष रुपये सालाबादचे आहेत. ते आपण सालाबाद घेतच आहेत. व मागील खंडणीची बाकी आहे, त्यापैकीं चौथाई मुलूख आपण लावून घेतलाच आहे. त्याजवर तुह्मांकडील कमाविसदार स्वतंत्र आहेत. त्यांचा बंदोबस्त आहेच. इतकेंही असोन आमचे दुष्मनास आह्मांकडील मामलत सांगून कलहवृद्धि करावी, हा प्रकार ठीक नाहीं." ह्मणून विनंति करितात. ते लष्करांत आहेत. अद्यापि कांहीं जाबसाल ठरला नाहीं. जो कारभार केला आहे, तोच करार आहे. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १९०.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे:-राजे प्रतापसिंग शहरांत आहेत. खुशालीराम बोहोऱ्यास कैद करून, दोन लक्षांची निशा घेऊन, नजरबंद ठेविलें आहे. करोलीवाली राणी राजाची स्त्री, तिनें बारा लक्ष रुपये कबूल करून, दौलतरामास कारभार सांगावा ऐसा विचार आहे. व शहरांतील लोकांसीं दाड (?) घेतला. त्यानें बहुतेक सावकार वगैरे लोक देशांतरास उठोन गेले. राजेमजकूर स्वस्थ ऐषआराम करितात. ठाकूर पहाडसिंग फौजसुद्धां पाटणाचे अलीकडे मुक्काम करून आहे. रावराजाचे मुलुखांत दखल करून खंडणी घ्यावी ऐसा इरादा करून आहे. परंतु तिकडे पाटणवाला राव तोही जयपुरकरासीं सेखावल सुद्धां फिरून राहिले आहेत. ह्मणून राजे व कारभारी आपल्या ठिकाणीं घरचे बंदोबस्तांत आहेत. मिर्जाकडील वकिलाची बहुत खातरजमा करून ठेविलें आहे. सेवेसीं श्रुत होय. पुढें प्रत्ययास येईल ते विनंति लिहूं.

राजश्री सुभेदारांकडील फौजेचा गवगवा होता. त्याची समजूत खाशांनीं व राजश्री पाराजीपंत यांणीं करून फौजेची रवानगी काशीबा होळकर व शरीफभाई यांजबरोबर केली. ते दरकूच मेवातचे मार्गानें दिल्लीस जातात. वाटेंत इस्माईल बेगाकडील ठाणें परगणे नुह येथें होतें. त्यास दूर करून आपला बंदोबस्त केला. व पेंढारी दिवसां दौड करून लुटतात व रात्रीं मेवाती बदला घेऊन, मार्गांत माणूस निभूं देत नाहींत. ऐसा प्रकार आहे. पातशाहांनीं व शहाजींनीं यांची आवई ऐकोन खिलताची तयारी केली आहे. दिल्लीस गेल्यावर अगोदर

पातशाहाची मुलाजमत करून, मग तेथून त्यांचे विचारें व येथील लिहिल्याअन्वयें कूच करितील ऐसा बेत आहे.

मागें बंगालीचे जमीदार हिरासा होऊन उठोन गेलियावर मिर्जानीं गांवांची दरोबस्त जप्ती केली. गल्ला जिन्नस दों तीन लक्षांचा सरंजाम मिळाला. त्यास हल्लीं बेलदार लावून, गावांतील जिन्नस लांकडें, कड्या, सोटा वगैरे सर्व हिसार प्रांतीं पाठवितात. व हिसारचे किल्ल्यांत जकिऱ्याची तयारी होते. तात्पर्य हें कीं, भंभोखां व शीख यांसीं सूत्र करून, किल्ल्याचे आश्रयानें पतियाल्याकडे जाऊन, राजश्री बाळोजी इंगळे यांजवर मोहीम करावी, ऐसा बेत श्रवणांत आला आहे. मिर्जाचीं पत्रें राजश्री पाटीलबावा व राणेखानभाई व आबा चिटणीस वगैरे सरदारांस येतात कीं, "आह्मीं अकृत्रिम चाकरी सेवा आज्ञेप्रमाणें केली. आपण फौजेचा वगैरे खर्चाचा एकही उपराळा न करितां मसलत करून इकडील बंदोबस्त केला. आतां आपण फौजा इकडे रवाना करितां. ह्मणून अनेक कल्प येतात. मी चाकरीस हजर आहें." याप्रमाणें जाहीरदारी पत्रें येतात. त्याजवरून येथूनही खातरजमेचीं उत्तरें लिहितात कीं, मध्यस्थ आपसांत कलह लावितात. इकडून कोणेविसीं संशय न आणावा. फौजा दिल्लीकडे रवाना केल्या आहेत. याप्रमाणें परस्परें जाबसाल आहे. सेवेसीं श्रुत होय. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं.

बाराभाई वगैरे शिलेदार यांची हजेरी गणती होते. एक दों दिवसां जालियावर फौज राजश्री अंबाजी इंगळे यांजसमागमें देऊन दिल्लीकडे पाठवावें ह्मणून राजश्री पाटीलबावांनीं सर्व शिलेदार, सरदार, व बाराभाई वगैरे यांस सांगितलें कीं, तुह्मीं मशारनिल्हेबरोबर जावें. त्यावरून वाबळे वगैरे शिलेदार यांनीं उत्तर केलें कीं, इंगळे मजकुरांचे तैनातीस आह्मी जाणार नाहीं. राणेखानांचे तैनातीस हजर आहों. याप्रमाणें स्पष्ट बोलणें जालें. त्यास हजीरी होऊन काय ठरेल, तें सेवेसीं विनंति लिहूं. हे विनंति."

---

## लेखांक १९१.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः– कलकत्त्यास मदराज बंदराहून वर्तमान आलें कीं, हैदरनाईकाचा पुत्र मदराजचे किल्ल्यापासून पंधरा कोसांवर मुक्काम करून आहेत. तमाम आसपास मुलूख जाळून ताराज केला आहे. मदराजचे शहरांत महा-

गाई फार आहे. व फुलचेरीहून पंधरा सरदार फरासीसांकडून चाकर रहावयास आले आहेत. त्यांस चाकर ठेवून, आपले लष्करांत दंवडी फिरविली कीं, फरासीसांकडील लोक सवद्यासुतास वगैरे लष्करांत फिरतील, तर त्यांस मुजाहीम न होणें. ह्मणून ताकीद जाली. याप्रमाणें वृत्त श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १९२.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः— रघोजी आंग्रे सरखेल यांचे येथें पुत्र जाला ह्मणून राजश्री चिमणाजी गोविंद मशारनिल्हेकडील वकील आहेत, यांनीं विनंति केली. व त्यांजकडील पत्रेंही आलीं होतीं, तें दिधलीं. त्याजवरून मुलास वस्त्रें व हासळी, बिंदली, मोत्यांची कंठी व जेगा शिरपेंच, व बायकांस वस्त्रें लुगडीं वीस व किनखाब थान दोन येणेंप्रमाणें, व खांशास सातां पारच्यांचा खिलत व वडील पुत्रास पांचा पारच्यांचा खिलत व हत्ती नग एक, येणेंप्रमाणें सरंजाम बाळंतविड्याबद्दल रवाना सरखेलीकडे केला. व झालरदार पालखी तयार करून पाठवावी ह्मणून परवानगी जाली आहे. व मोर्चेल जोडी येथून पेशजीं पातशाहांची परवानगी घेऊन पाठविली होती. हें वृत्त आपणांस कळलेंच असेल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १९३.

**श्री.** इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः—हबीबशाहा बीडकर फकीर, राजश्री पाटीलबावांचा गुरुबंधु येथें आले होते. त्यास तमाम जितका पातशाही मुलूख आहे, दक्षिण आदिकरून साडेबावीस सुभे, त्याजवर सरदेही दोन रुपये द्यावे ह्मणून वकील मुतलखीचे मोहोरेनिसीं परवाने करून दिल्हे. व पातशाहाचे शुकेही सुभ्या सुभ्याचे नांवें लिहून देविले. व येथून त्यांस देशीं बिदा केलें त्यासमयीं, पन्नासां हजारांची पट्टी नख्त, आपण व आपले मुत्सद्दी व फौजेचे सरदार मातबर यांजवर करून देऊन, त्यांसीं बिदा करून दिधली. ते श्रावणमासीं कूच करून येथून देशीं बिडास गेले. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक १९४.

श्री. इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:-तमाम अंतर्वेदींतील महाल इजारीयानें मामलेदारांकडे सांगितले. त्यांजपासून सरकारांत रसदा पेशर्जी घेतल्या. कांहीं महाल मेरटेपासून तों पानिपत-पावेतों आहेत, तेही इजारीयानें रामरतन व गणेसीलाल व लालजीमल हे रांगडे मामलतदार उभे करून, त्यांस इजारीयानें महाल सांगून ऐवज इजारीयाचा ठरला. त्याची हप्तेबंदी करून, चार हप्ते खरीपाचे व चार हप्ते रब्बीचे एकूण आकार चैत्रमासपावेतों इजारीयाचे ऐवजाची बेबाकी करून द्यावी, याप्रमाणें करारमदार ठरविला. तेव्हां रांगड्या इजारदारांनीं विनंति केली कीं, आमचे महालांत शिखांचा उपद्रव आहे. त्याजवरून राजश्री साबाजी शिंदे यांचा नातू राजश्री धारराव शिंदे यांजसमागमें राजश्री जिवाजी मोरेश्वर निसबत गोविंद कृष्ण उदेपूरकर यांजकडील गृहस्थ दिवाणगिरीस, व चार पलटणें व तीन हजार स्वार, हिंदुस्थानी व दक्षणी, ऐसे तैनातीस देऊन, दरोबस्त चमेल-शिकंदऱ्यापासून तों पानिपत-कर्नोल पावेतों, सरसुभेदारी शिखांचे व जोरतलबी जमीदार यांचे बंदोबस्तास रवाना केले आहेत. ते दिल्लीस गेले आहेत. तेथेंच मुक्काम त्यांचा करविला आहे. पातशाहा निघोन इकडे लष्करांत आले ह्मणजे त्यांनीं कूच करून पुढें पानिपताकडे जावें, ऐसी सल्ला ठरली आहे. पुढें प्रत्ययास येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १९५.

श्री. इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:— महमद अल्लीखान अर्काटचा सुभा याची अर्जी व एकशें एक मोहोर पातशाहास नजर आली. अर्जींत हा मजकूर लिहिला होता कीं, अवघा प्रांत आह्मांकडील इंग्रेजांहीं ग्रासिला आहे व वैराण आहे; याप्रमाणें आमची अवस्था आहे. ह्मणून लिहिलें होतें. वकिलानें अर्जीचा दरजाब व नजरची पावती व मेहेरबानगीचा खिलत द्यावा ह्मणून सवाल केला आहे. परंतु अद्यापि कांहीं उत्तर द्यावयाची आज्ञा जाली नाहीं. याप्रमाणें वर्तमान ऐकिलें. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक १९६.

श्री. इ. स. १७८६.

“पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– राजश्री माधवराव गंगाधर यांजपाशीं कांहीं ऐवज कर्जाऊ खर्चास मागत होते. त्यास यांनीं उत्तर केलें कीं, कार्तिकमासीं दीड लक्ष रुपये बुडते दिधले. आतां आणिक पैका मागतां ? त्यास एखत्यारीचा कारभार मजकडे सांगत असल्यास जो पैका पाहिजे तो सरदारीस लावितों. नाहीं तर आतां ज्याप्रमाणें आज्ञेनुरूप एकुणात हिशेबावर व पत्रावर विनंति करून आहे, याप्रमाणें असल्यास आह्मांस पैका कोण देतो ? व आह्मीं सरदारीचें काम खर्चाचें कैसें चालवावें ? याप्रमाणें उत्तरें जालियावर राजश्री पाटीलबावा रागें भरून आज्ञा केली कीं, “मी एका बटकीहातून दिवाणगिरीचें काम घेईन. मजला दिवाण कशास पाहिजे ?” याप्रमाणें बोलून, बाळाजी सखदेव ह्मणून खाजगीचा कारकून विसा वर्षांचा मुलगा होता. त्याजकडून हिशेबावर एकुणाता व कागदपत्रावर विनंति करवितात. व आपणही पत्रावर आशीर्वाद विनंति करितात. राजश्री सदाशिवपंत फडणीस खाजगीचा व रामचंद्र बाबदेव फडणीस पातशाही मुलुखाचा, हे दोघेजण सनदी गैरसनदी हिशेब निवडून, खाशांस समजावितात. मग ते आज्ञा करितात त्याप्रमाणें बाळाजी सखदेव एकुणाता करून देतो. आणि राजश्री माधव गंगाधर यांजकडून दिवाणगिरीचा कारभार दूर करून घरीं बसविले आहेत. खाजगीचे कारकुनांहीं खाशांस हें समजाविलें आहे कीं, तीन हजार रुपये दरमाहा दिवाणास द्यावा लागतो. या खेरीज मुलकी कारभारांत वगैरे दोन तीन लाख रुपये कारकुनीचे उत्पन्न होतात, आणि जें करणें तें महाराज करितात. ऐसें असून वृथा पैका गमावावा यांत विशेष काय ? याजकरितां दिवाणगिरी खाजगत ठेऊन, पकौ दिवाणगिरीबद्दल येईल तो खाजगींत ठेवावा. याप्रमाणें समजाविलें आहे. याजवरून तूर्त दिवाणगिरीचें काम खांसेच चालवितात. माधवराव, दोन महिने जाले, आपले घरीं बेरोजगार बसून आहेत. पुढें होईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.”

---

## लेखांक १९७.

श्री. इ. स. १७८६.

“पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– राजश्री बळवंतराव धोंडदेव यांचे कारभारी यशवंतराव आहेत. यांसीं व बळवंतराव यांचा मामा देवरीयाचा कमाविसदार यांसीं वाद

जाला. मामा कांहीं कारभारी यांचे काबूंत न ये. ह्मणून राजश्री पाटीलबावांस पेशजीं दत (?) घ्यावया परवानगीबद्दल रुपये पन्नास हजार करार केलेच होते. हल्लीं या वादामुळें कारभारी यांनीं जास्ती दहा हजार कबूल करून, सरसा पत्रें घेऊन, देवरीस जसी पाठविली. एकूण सरकारांत साठ हजार रुपये नजर देऊन, या खेरीज दरबार खर्च करून, आपली गोष्ट कारभारी यांनीं सिद्धीस नेली. घरांत व मामलतींत आपली काबू करून घेतली. याप्रमाणें वृत्त श्रुत जालें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति.''

---

पैवस्ती छ० २० जमादिलावल सबा फाल्गुन.

## लेखांक १९८.

श्री. ५ फेब्रुवारी इ. स. १७८७.

''श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १६ माहे रविलाखर मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंदलेखन करीत असिलें पाहिजे. विशेषः— इकडील वृत्त विस्तारें पेशजीं छ० ६ माहे रविलावलीं विनंतिपत्रें पाठविलीं होतीं, तें सेवेसीं प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं सविस्तर वृत्त पुरवणीपत्रांवरून निवेदन होईल. रविसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त सेवेसीं पाठविले आहेत. ते स्वीकारून उत्तरीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति.''

---

पैवस्ती छ० २२ जमादिलाखर सबा.

## लेखांक १९९.

श्री. २२ फेब्रुवारी इ. स. १७८७.

'' पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. जैपुरीं बिजेसिंग जोतपूरकर यानें पांच हजार स्वार व पांच हजार प्यादा, पंधरा हजारपावेतों जमा केले आहेत. येणेंप्रमाणें जमाव करून शहराचा बंदोबस्त करून आहेत. नजबकुलीखान व महमदबेग हमदानी हें दोन्हीं पथकें आपलेकडून रायाजी पाटील यांचे कुमकेस पाठविलीं आहेत. त्यास हे दोघेही जयपूरकराकडील फितुराचा संदर्भ आहे. वरकड रायाजी पाटील आदिकरून सरकारी फौज, जयपुराहून दोन तीन कोसांवर तीही दरवाजांकडे वांटणी करून दाणाघास बंद करून आहेत. परंतु शहरचा दाणाघास रसद

बंद होत नाहीं. व जयपुरकरांनीं वजिराकडे आपला वकील पाठऊन, वजिरासीं व फिरंगी यांसीं पकाई करून आले आहेत. इंग्रेजांचीही चाल या दिवसांत कांहीं बिघाडाचीसी दिसते. एक कंपू दारानगरीं व एक कंपू इटाव्यास आपले मुलकाचे सरहद्देस आले आहेत. अद्याप आपले मुलकांत सरहद्देत पाय दिल्हा नाहीं. व आपलें येथील वर्तमान तरी, कोणी मुत्सद्दी नाहीं. कुलकारभार जातीवरच चालतो. फौज राजी नाहीं. तोफखाना व पलटणें आहेत यांचा भरंवसा नाहीं कीं, झुंजाचे समयीं एक बार बंदुकीचा काहाडतील. याप्रमाणें माणूसमात्र जे आहे, ते दिक आहेत. एक श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे प्रतापेंकरून जें होणें तें होईल. वरकड अर्थ फौजेचा व मुलकी आबादीचा सर्व ईश्वरइच्छाच आहे ! याप्रमाणें वर्तमान ऐकिलें, त्याजवरून विनंति लिहिली. पुढें निदर्शनास येईल तें लिहूं. कृपा करणार आपण समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २००.

**श्री.** फेब्रुवारी इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. कान्होजी आंगरे यांनीं राजश्री पाटिलबावांस चिकणसुपारी व सुकेळें व पिस्ते व बदाम व फणसपोळ्या व ओली नारळ वगैरे कोंकणचा जिन्नस पंचवीस बैल भरून पाठविले होते. त्यापैकीं कांहीं सरंजाम यांनीं ठेविला. कांहीं दिल्लीस पातशाहाकडे पाठविला आहे. वरकड वर्तमान पारसी एकबरावरून व पुरवणीपत्रांवरून श्रुत होईल. राजश्री पाटिलबावा जैपुरासमीप सातां कोसांवर होते. तेथून कूच करून पंचविसां कोसावर आले. याजकरितां तमाम गव्हारगर्दी मुलकांत जाली आहे. जैपुराकडील पांच सात हजार फौज बाहेर मुलकांत निघोन, रावराजे प्रतापसिंग व त्यांचे मुलकांत व आपले सरकारचीं ठाणीं जैपुर प्रांतीं बसलीं होतीं, तें उठविलीं. व लष्कराबाहेर वाट चालत नाहीं. तमाम काफिले मार्गात लुटले जातात. जोतपूरकराकडील बक्षी भीमसिंग पंधरा हजार स्वारप्यादांनसीं जैपुरकरास येऊन भेटला. त्यांची यांची सलाह होऊन, आपले फौजेचे मुकाबिल्यास जैपुराअलीकडे आठां कोसांवर आले आहेत. आपले फौजेसीं अठरा कोसांचा अंतर आहे. पुढें कूच करून येणार, ह्मणून श्रवणांत आलें. घडेल तें विनंति मागाहून लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २०१.

श्री. फेब्रुवारी इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. जयपुराकडील जाबसाल तरी, राजश्री पाटीलबावा जयपुराहून सात कोसांवर मोती टेकडीचे सुमारें मुक्काम करून आहेत. त्यास रावराजा प्रतापसिंग माचेडीवाला व बोहरा खुशालीराम व रामकृष्ण महंत हे तिघेजण राजश्री पाटिलबावांचे ममतेंत शिरून जाबसाल करितात कीं, राजे पृथ्वीसिंगाचा पुत्र मानसिंग वृंदावनांत आहेत, त्यास तुमचे स्वाधीन करावें. आणि देवासें ह्मणून जयपुराहून सोळा सत्रा कोस किल्ला आहे, तें स्थळ आमचे स्वाधीन करावें. ह्मणजे जयपुराकडील खंडणीचे ऐवजाची निशा आह्मी करून देऊं. ह्मणोन रावराजाचें वगैरे बोलणें आहे. व रोडाराम व राजे प्रतापसिंग जयपुरकर यांचें बोलणें आहे कीं, बारा लक्ष रुपये गुदस्ताचे खंडणीबद्दल बाकी आहे. त्यांजपैकीं चार लक्ष रुपये तूर्त घ्यावे, आणि आपण कूच करून माघारा जावें. दोन लक्ष रुपये श्रावणमासीं देऊं. व बाकी सा लक्षांचे परगणे लाऊन घ्यावे. ह्मणोन जयपूरवाल्यांचें बोलणें लागलें आहे. राजश्री पाटिलबावा दोन्ही भिंतीवर हात देऊन आहेत. जिकडून पैका हस्तगत होईल, तिकडे कल देऊन मामला करतील. याप्रमाणें मर्जी आहे. जयपूरकरांचें मानस कीं, याप्रमाणें मामला विल्हेस लागला तरी उत्तम. नाहीं तरी त्यांची मर्जी जयपुर घ्यावी अशी असली, व जयपुरासमीप येऊन मोर्चे लाविले, तरी परिछिन्न झुंजावें. यांत जोतपुरवालेही सामील आहेत. जोतपुराकडील स्वार पांच हजार व प्यादे गोसावी मिळोन पांच हजार ऐसी दाहा हजारांची भीड सामरासमीप येऊन मुक्काम करून आहेत. राजश्री पाटीलबावा येथून कूच करून जयपुरासमीप गेले ह्मणजे त्यांनीं तिकडून कूच करून जयपुरकरांचे सामील व्हावें ऐसें करारांत आलें आहे. जयपुरकरानेंही पंधरा वीस हजार स्वारप्यादे सेकावत वगैरे रजपूत आपले जागिरदार जमा केले आहेत. तेही आपले मजबुतीनें आहेत. मारवाडवाले वकील जयपुरकरांचे जाबसालांत आहेत. बोलल्याप्रमाणें हालचा जाबसाल फडशा करून घ्यावा. पुढल्या सालचा जिमा आमचा आहे. याप्रमाणें राजश्री पाटिलबावांची खातरजमा करितात. तात्पर्य, दोहींकडील जाबसाल लाऊन ठेविले आहेत. ज्यांत सरकार काम होईल तें करतील, याप्रमाणें वृत्त आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २०२.

श्री. फेब्रुवारी इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री खंडेराव हरी स्वार प्यादे मिळोन दाहा हजारांचे जमावानसीं व राजश्री आंबाजी इंगळे स्वार प्यादे मिळून पांच हजार जमावानसीं लष्करांत दाखल जाले आहेत. अद्यापि कांहीं झुंजाची तऱ्हे नाहीं. आपले खासे फौजेचें व राजे प्रतापसिंग यांचें खासे फौजेचें साता कोसांचें अंतर आहे. हे आपले ठिकाणीं त्यांचे फौजेस जपून आहेत. अद्यापि कांहीं सलुकाचा जाबसाल नाहीं. पहिले जाबसाल सा लक्ष रुपये द्यावे, ऐसें ह्मणत होते. परंतु तोही जाबसाल तुटून, पुढें परस्परें झुंजावें या भरावर उभयतां सरदार आहेत. पुढें ठरेल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक २०३.

पैवस्ती छ० २२ जमादिलाखर सबा समानीन चैत्र मास. श्री. ७ मार्च इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ. १६ माहे जमादिलावल मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– इकडील वृत्त सविस्तर पेशजीं छ० १६ रविलाखरीं पत्रें पाठविलीं होतीं, तें पावून वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं पातशाहांस सरकारचीं वस्त्रें, हत्ती व घोडीं, व जवाहिर व नजर मोहरा व अर्ज्या पाठविल्या होत्या, त्या गुजराणून पातशाहांचे रसीदेचे शुके घेऊन पाठविले आहेत. ते पाऊन ध्यानारूढ होईल. व पारसी अखबरा राजश्री पाटिलबावांचे दरबारच्या व पातशाहांचे दरबारच्या पाठविल्या आहेत. त्यावरून निवेदन होईल. वरकड पुरवणीपत्रांवरून श्रुत होईल. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २०४.

पैवस्ती छ० २२ जमादिलाखर सबा. श्री. १४ मार्च इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. शाहा निजामुद्दी फकीर पातशाहाकडील कारभारी राजश्री पाटिलबावांनीं लाडोजी देशमुख सुद्धां बोलाऊन नेले आहेत. व त्यांसीं बोलतात

कीं, इंग्रेजांची मर्जी आहे कीं, आगरियांत कोठी करावी. व जयपुराकडीलही मसलत. त्यास तुह्मी उभयतां पातशाहांचें संरक्षण करावें. नाहींतर बाहीर काढून लष्करांत स्वारीसमागमें ठेवावें. याप्रमाणें बोलणें जालें. तेव्हां हें ठरलें कीं, शाहा निजामुद्दीनीं [ व ]लाडोजी देशमुखांनीं दिल्लींत राहून, पातशाहांची मर्जी संरक्षण करून असावें; आणि राजश्री पाटिलबावांनीं जयपुरास स्वारीस जावें. याप्रमाणें सल्ला ठरून उभयतांस दिल्लीस रवाना केलें. व आपण दिल्लीकडे जयपूरचे रोखें कूच केला आहे. परंतु इंग्रेजांचा एक कंपू कानपुरीहून कूच करून इटावियाचे रोखें आला आहे. अद्याप ते आपले सरहद्देंत आहेत. पुढें चाल केलियास विशेष ऐकिल्यास विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० २२ जमादिलाखर सवा.

## लेखांक २०५.

श्री. ११ एप्रिल इ. स. १७८७.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री शिवाजी विठ्ठल बापू यांचे येथें देशीहून वकिलानें पत्रें पाठविलीं कीं, इकडे टिपूची मसलत भारी आहे. फौज नाहीं. याजकरितां श्रीमंतांकडून हुजरे व पत्रें येणार कीं, आपण व पवार व रघुनाथराव बल्लाळ व गोपाळराव त्रिंबक वगैरे सरकारी पथकें आहेत, तें सर्व बोलाऊन घ्यावीं. ह्मणून पत्रें आलीं आहेत. हें वर्तमान ऐकिलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

पैवस्ती छ. २२ जमादिलाखर सबा.

## लेखांक २०६.

श्री. ११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. लाहोराकडील वर्तमान तरी, शाहा आबदाली अहमदशाहा पिशोरांत अटकेपलीकडे आहेत, त्यांचे पुत्र तैमुरशाहा अटकेअलीकडे कशमीरचा वगैरे बंदोबस्त करून आहेत. चरखासिंग शीख याचा लेक भगवतसिंग शीख वगैरे लाहोरापासून तों शतद्रूपावेतों सरहद्देपर्यंत बंदोबस्त करून, आपलाले ठिकाणीं आहेत. आला जाटाचा नातू व जगपतसिंगाचे पुत्र सरहद्देअलीकडे पाणिपतपावेतों आपलें स्थळ संरक्षण करून आहेत. इकडे अंतरवेदींत शीख येऊन धामधूम करितात, ह्मणोन राजश्री आंबाजी इंगळे यांस पाणिपताकडील सरसु-

भेदारी देऊन रवाना केलें. ते पाणिपतास जाऊन पावले आहेत. पुढें शिखांचा बंदोबस्त होऊन अंतरवेद मेरट वगैरे माहाल निर्वेद होतील, ते विनंति लिहूं. जाबतेखानाचे पुत्र गुलामकादरखान यांसीं व शिखांसीं झुंज सारंगपूर हुडियापासीं यमुनातीरीं जालें. खानमजकुराचे पुत्रानें शिखांची लढाई फत्ते केली. शीख पळाले. पुढें वर्तमान आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २०७.

**श्री.** एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे:- तैमूरशाहा अबदाली अद्यापि पिशोरीं आहे. कांहीं फौज व हुमाऊ पातशाहाज्यादा सिंधूनद अटक उतरून, झिलमेस मुक्काम करून आहेत. तेथून कांहीं फौज कशमीरचे सुभ्याचे बंदोबस्तास पाठविली आहे. व कांहीं फौज टवाभकड वगैरे प्रांताचे बंदोबस्तास पाठविली आहे. त्यास कशमीरचे सुभ्यानें चोविसां लक्षांचा मामला करून बारा लक्ष रुपये नख्त दिल्हे, आणि बारा लक्षांचा करार केला कीं, पेस्तर सालीं देईन. ऐसा करारमदार जाला असतां, पातशाहाचे मनांत कीं, सुभेमजकुराचें पारपत्यच करावें. त्याजवर आणिक फौज बिदा केली. त्याजवरून शिकंदरशाहा, अबदालीचा भाऊ, पळून कशमिरास आला होता. त्याजवर छत्र फिरवून कशमीरचा सुभा झुंजला. परंतु अबदालीची फौज भारी. शेवटीं त्यांनीं कशमीरचे तीन पुरे कत्तल करून, सुभ्यास धरून, कशमिरेंत ठाणें बसवून, त्यास अबदालीकडे पाठविलें. पातशाहानें पोंट चिरून काव्या भरून, मारून टाकिलें. त्याचा भाऊ शिकंदरशाहा कशमीरीहून पळून पहाडांत एक गढी कोणी आहे, तेथें जाऊन बसला आहे. त्याचा पाठलाग करून, फौज गढीस जाऊन लागली आहे. परंतु अद्यापि हस्तगत जाल्याचें वर्तमान आलें नाहीं. पूर्वीं हिंदुस्थानांत यावें, हे आवई होती. उपरी त्यास त्या प्रांतींच बंदोबस्तास अटकाव जाला, ह्मणून यंदा इकडे येणें होत नाहीं. आणि त्याचें मानस कीं, उगेंच धावून जाऊन मुलुखगिरी करावी, हें ठीक नाहीं. याजकरितां जितका मुलुख आपले काबूंत येईल तितका पुरतेपणें बंदोबस्त करून, मग पुढें पेशकदमी करणें ठीक आहे. ह्मणून वर्तमान श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति. नित्यचें वर्तमान पातशाहाचे दरबारचें व राजश्री पाटील-

बावांचे दरबारचें व लखनौकडील वजिराचें दरबारचें पारसी एकबारा पाठविल्या आहेत, त्यांजवरून श्रुत होईल. कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, हे विनंति."

## लेखांक २०८.

श्री. एप्रिल इ. स. १७८६.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. पिशोराकडून पातशाहाचे येथें वकील, पत्रें, शिष्टाचार परस्परें स्नेहवृद्धीचे आले आहेत. व तिकडील वर्तमान तरी, मुरादशाहनामें उजबकाचा पातशाहा दो लाखा स्वारांनशीं चढून तैमूरशाहा अबदाली याचे मुलखांत खंदाराकडे आला आहे. त्याजवर तैमूरशाहाही स्वार होऊन जाणार. ह्मणून तमाम फौज जमा करून तिकडे पिशोराहून कूच करून खंदाराकडे बंदोबस्तास जाणार. हें वर्तमान अटकेअलीकडे पाळेगार वगैरे जमीदार आहेत, यांनीं टवाभकड व झिलीम व कश्मीर वगैरे मुलुक आहे, त्या स्थळीं अबदालीचे अंमलांत बदअमली केली आहे, ह्मणोन वर्तमान श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. लाहोर प्रांतीं चरखसिंग व गुजरसिंग वगैरे आहेत. त्यांचा बंदोबस्त बदस्तुर लाहोर प्रांतीं आहेत. आला जाटाचा नातू महासिंग सरहद्देंत वगैरे आपले मुलकांत अंमल करून बदस्तूर आहेत. व महासिंग व गजपतसिंग जाटाचा पुत्र पतियाळापासून तों पाणिपतपावेतों आपले मुलकाचा बंदोबस्त लावून बदस्तूर आहे. पाणिपतापासून तों दिल्लीपावेतों पातशाही मुलूक आहे. त्यांत तमाम शीख व गुजर लुटीत व मारीत फिरतात; मार्ग चालूं देत नाहींत. दरोबस्त पातशाही अंमल पाणिपतापासून तों कोलेपर्यंत आहे. तेथें शिखांनीं आपली चौथाई ठराविली आहे. याप्रमाणें तमाम शिखांनीं आपला अंमल करून चौथाई पैका घेतात. दिल्लींत नित्यांनीं आसपास गुजर आहेत, ते येऊन रात्रीस डाके घालितात. याप्रमाणें येथील वृत्त आहे. पुढें श्रवणांत येईल व पाहिल्यांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक. २०९.

पैवस्ती छ. २२ जमादिलाखर सबा. श्री. ११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. नवाब सालारजंग, मिर्जा अमानी वजीर याचा मामा, त्याचा नातू समशेरजंग हे लखनऊहून चाकरीचे उमेदवारीवर राजश्री पाटिलबावांपासीं

आले होते. त्यास यांजपासीं कांहीं सोय न जाली. लखनऊहून जातो ह्मणून आज्ञा घेऊन आगरियास गेले. जयपुरकरांची भेट घेतली. त्यांनीं बहुत सन्मान करून ठेविलें. एका दिवशीं राजांनीं आपलें जवाहीर यांस दाखविलें. यांनीं तें जवाहीर पाहून नापसंत केलें. दुसरे दिवशीं आपले घरचें जवाहीर साता आठा लक्षांचें एका पेटारींत घालून राजास दाखवावयास नेलें. त्यांनीं पाहून यांस रुकसत करून आपले डेरियास वाटे लाविलें. राजे आपले माहालांत गेले. दहा माणसें, ज्या माणसांपासीं पेटारीं जवाहिरांचीं होतीं, त्यांस स्वारींत मार्गीं जातांना मारून टाकिलें. पेटारीं आणून सरकारांत आपलेपासीं ठेविलीं. हल्लीं राजश्री पाटिलबावांस नवाब समशेरजंग यांचीं पत्रें जयपुरीहून आलीं आहेत कीं, हे अवस्था आमची जाली! ह्मणून लिहिलें होतें. यांनीं पत्रांचे जाब अद्यापि कांहीं दिल्हे नाहींत. याप्रमाणें वर्तमान जालें. पुढें ठरेल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २१०.

पैवस्ती छ २२ जमा-
दिलाखर सबा.

श्री.

११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. जयपुराकडे जावयाचें कारण हेंच कीं, अंतस्थ जयपूरकरास फिरंग्याकडील फौजही पांच सात हजार कुमकेस आली आहे. याजकरितां सालाबादप्रमाणें जयपूरकर खंडणीचा पैका देत नाहींत. ह्मणून तिकडे जावें, हे मर्जी राजश्री पाटिलबावांची आहे. व बोलतात कीं, जैसी गोहद खाली करून घेतली, तैसें जयपूरही खाली करून घेतों. पुढें प्रत्ययास येईल त्याप्रमाणें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २११.

पैवस्ती छ. २२ जमा-
दिलाखर सबा.

श्री.

११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. जयपुराकडील खबर एकबार पातशाहासीं आलीं कीं, जोतपूरकर व जयपूरकर एक सल्ला करून, दौलतराम खुशालीराम याचा भाऊ यास मुख्त्यार केलें कीं, आह्मांकडील फौज व जयपुराकडील फौज समागमें घेऊन, तुह्मीं राजश्री पाटिलबावांसीं झुंजावें. याप्रमाणें आपले घरांत मसलत करून, झुंजाची तयारी करून आहेत. जर राजश्री पाटिलबावा ज़यपुराकडे

# मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें.



## कानदखोरें—मरळ देशमुख.



### लेखांक १.

**श्री.**

"करीणा मौजे कारी ता। रोहिडखोरे येथील जेधियाणीं देशमुखीचें वतन मेळवीले ऐसीजेः— वडीलबंधू खेलोजी जेधा व धाकटा भाऊ बाजी नाईक जेधे उभयता बेदरास गेले; पाछायाची चाकरी येकनिष्ठपणे केली. जाबसाल यथास्थित जमेदारी प्रो करून; कामकाजहि तयार ऐसे पाछायें पाहून, खुश होऊन मेहरबान होऊन, देशमुखीच्या वतनाचे फर्मान व वस्त्रे देऊन, खेलोजी नाईक व बाजी नाईक यांची रवानगी केली. पाछाय फर्मान घेऊन बेदराहून निघाले, ते वाटेस येऊन सिरवळीं राहिले. तेथून पुढे त्याजबराबर माहार होता त्यास रवाना केले. तों खोपडीयाची व माहाराची भेट जाली. माहारानी बातमी खोपडीयास सांगितली की, जेधे याजवर पाछाह मेहरवान होऊन, फरमाणे देऊन रवाना केले; आज सिरवळीं राहिले आहेत. उदईक रविवारी येतील. ऐसे बातमीस कळले. यानंतर रवि प्रातःकाळी खोपडे निघोन जाऊन गोडखिंडीस बसले. रविवारी सिरवळचा बाजार भरत असे. तेव्हां खेलोजी नाईक व बाजी नाईक उभयतां निघोन गोडखिंडीस आले. ते खोपडेयाणी पाहून, तयार होऊन जाऊन, खेलोजी नाईक यास मारले. तसे बाजीनाईक यास मारावे, तों बाजी नाईक पळाले. त्याणी आपला जीव वाचविला. पुढे साह चहू महिन्यानीं बाजीनाईक याने प्रेत्न करून आपल्या पाठराखा आ।। १२ मेलऊन, दुधभाताची क्रीया शफत इमान बेलभंडार करून, करार मदार केला की, आगोंधर मुलेमाणसे थाऱ्यास ठेऊन, मग येऊन कामकाज करावे ऐसे बोलून, बारामुलवे व जेधे याणी मुलेमाणसे घेऊन धावडी-बंदरीस गेले. तेथे मुलेमाणसे ठेऊन त्यांचा साह महिन्याची बेगमी करून तेथून निघाले, ते श्रीराइरेश्वरास येऊन राहिले. विचार करू लागले, पुढे कसें करावें? खोपडे मारे केलियासिवाय आपला बंदोबस्त होत नाही ह्मणोन विचार करितात, तों दसवमाहला नाहवी याणी बातमी सांगितली की, खोपडियाचे लग्न मौजे

करनवडे येथे निचलाचे घरी आले आहे, तेथे जाऊन कामकाज करावे. ह्मणोन दसमाहला न्हावी व गोडवला यास बातमीस पा. त्याणी बातमी घेऊन आले. परंतु यास विश्वास पुरेना. तेव्हां दसमाहला व गोडवला याजबराबर हटकरी दिल्हा, करारीची बातमी घेऊन या. तेव्हा त्रिवर्गानी जाऊन पकी बातमी घेऊन आले. त्या समयास जाऊन कामकाज करावे ऐसा निश्चय होऊन जावे, तों पुढे आगोधर पाठिंबा केला, याचे समाधान करावे. ह्मणोन देशमुख याणी दुधभात व बेलभंडार याची क्रीया केली की, वतन साधले त्यांत निमे तुमचे बारामुलवे याचे व निमे आमचे जेधियाचे, यांत अंतर करूं नये, ऐसी क्रिया केली. ते समईचे बारामुलवे यांची नावनिसी बितपसिलः—

| | |
|---|---|
| १ राऊत यास देशमुखाची प्रधानकी दिल्ही होती तो | १ कऱ्या |
| | १ ढेकापा |
| १ घोलप सांगवीकर | १ नाईक रामराव |
| १ कोढालकर | १ खोचरा |
| १ गोडवला | १ मुहुकर |
| १ पेटकर | १ रोहमण |
| १ वाडकर | ६ |
| ३ कारकून मंडली लोहकरे कुलकर्णी व सबनीस व देशपांडे परभू एकूण आ ॥ ३ | |
| ९ | |

सदरहू असामी पंधरा याणी क्रियाशफत केली. त्याजवर लोकास देशमुख ह्मणो लागले की, निचलाचे घरच्या लग्नावर चला. तेव्हां लोकानी आड घेतली की, आह्मांस कामे वांटून द्याल तरी आह्मी येतो; नाहीं तरी आह्मी येत नाही. तेव्हां बाजी नाईक बोलिले की, कोण कोण काय कामे करिता, तीं वांटून घ्या. तेव्हां पेटकर व लोहकरे व वाडकर याणीं खासे व राऊ सदरचे बसणार यास मारावे ह्मणोन करार केला, व गोडावला याणीं वोवर मारावी व रामाजी नाईक कोढालकर व राऊत व समस्त लोक याणीं मंडप व दरवाजा धरून जो कोणी येईल त्यास मारावे ऐसा करार करून, देशमुख व कृष्णाजी कोढालकर या उभयतास राइरेश्वरीं ठेऊन वरकड लोक उतरून करणवडास आले. तेथे ज्याप्रमाणे करार होता त्याप्रमाणे ज्याची त्याणी कार्यें करून गेले. निचलाचे घरचे लग्न खोपडियाचे मारले. साठ माणूस ठार केले. याप्रमाणे तसनस लग्नाची करून

राइरेश्वरास गेले. पुढें आठा पंधरा रोजांनीं मागतीं करणवडास येऊन श्रीहनुमंताचे गळां चिठी बांधली की, धावडी बंदरीचा पुंड आपली दाद लागत नाही, यास्तव आपण किलियाचे पाइरीवर सीर ठेविले आहे. आपण धणी आहेत. दाद दिल्ही पाहिजे. त्याजवरून किले रोहिडा येथील हकीम शेख आखू रोहिले होते. त्याणी प्रेत्न करू लागले की, धावडी बंदर कोठे आहे ? तिचा ठिकाण कसा लागतो ? मुलुक पुंडावामुळें उजाड जाला, याचा शोध केला पाहिजे. तेव्हां त्याणी प्रेत्न करून धावडीबंदरीस बाजी नाईक याचे व बारामुलवे याचे ठिकाण लाऊन, त्यास रोहिडियास आणून, शेख आखू रोहील्याणीं जेधे व खोपडे याचा मजकूर मनास आणून वतन जेधे व खोपडे यास वांटून दिल्हें. जेधे याजकडे भोर ता॥ च्यार गाव देशमुखीचे वतन दिल्हे. व खोपडे याजकडे उभवली ता॥ च्यार गाव देशमुखी वतन देऊन उभयतांची समजावीस केली. ते वेळेस गाव नावनिसी बितपसिलः—

| जेधे याजकड ता॥ भोर येथील गाव सुमारे ४ | खोपडियाकडे ता॥ उभवली येथील मुलचे गाव सुमार ४ |
|---|---|
| १ मौजे सिरवली | १ मौजे वडगाव |
| १ मौजे नाव्ही | १ मौजे खानापूर |
| १ मौजे करणवडे | १ मौजे नेरे |
| १ मौजे चिखलगाव | १ मौजे पाले |
| ४ | ४ |

सदरहू आठ गाव दोनी रोहिडखोरीं त्याची वाटणी येणेप्रो देशमुखीचे वतनाची जाली. त्याजवर कान्होजी बीन भानजी नाईक जेधे देशमुख याचे च्यार गाव मुलचे होते, त्याचे वीस गाव भोर ता॥चे केले. ते समई देशमुख व देशपांडे व किल्याचे हकीम व गडकरी लोक व देशक व पाटील परवाडी समस्त मिळोन, मौजे सिरवलीच्या वडाखाली बसोन, च्यार गावचे वीस गाव केले. ते समई वीस गावांपैकी दोन गाव इसापत देशमुख याची व बारा मुलवे याची सेते मौजे कारी व मौजे आंबवड दोन गाव इसापत, त्यापैकी बारा मुलवे यास मौजे कारी दरोबस्त दिल्ही व मौजे आंबवड येथील इसापत देशमुख खुद्द याणी खावी. परंतु काही सेते व घर ठाणे मुलवियास दिल्ही आहेत. व गोडावला यास सेते व घर मौजे नाव्हीस दिल्हे आहे. याप्रो कान्होजी नाईक यास पुत्र सातजण होते. व कान्होजी नाईक ते तो किले रोहिडा येथून बरात जाली की, तुमचे माहालचे ऐवजी च्यार हजार टके पाठऊन देणे ह्मणोन

वरात घेऊन वरातदार आले. ते समई कान्होजी नाईक याणी वरात व वरातदार पाहून राग आला. तेव्हा नाइकानीं वरातदारास व हकीमास आईमाई जेरुबेटी करून वरात माघारी टाकिली. वरातदार निघोन किलियास गेले. किलेयाची श्वारी तयार होऊन आली. ते समई कानोजी नाईक व समस्त लोक मुलामाणसासुधा निघोन कारीस जाऊन राहिले. तेव्हा त्या जामीयास स्वारीचे बल चालेना. ह्मणोन स्वारी फिरोन किलेयास गेली. उपरांतिक आले. चौ रोजानी देखमुखाचे सातजण पुत्र व लोक मिलोन पत बांधोन किलेयास गेले. तेथे जाऊन ह्मणो लागले की, आह्मापासून तकसीर जाली. आपण धणी खावंद आहेत; तकसीर माफ केली पाहिजे. तेव्हा हकीम बोलिले की, तुह्मापासून काय तकसीर जाली? तुह्मी सिव्यागाळी केल्या व नानाप्रकारचे बोलिला की नाही? कसे जाले ते खरे सांगा. त्याजवर देशमुखाचे पुत्र साहजण याणीं साक्ष दिल्ही की, देशमुखानीं वरातदार यासच सिव्यागाळी दिल्या; परंतु हकीमास काही बोलिले नाहीत. ह्मणोन साक्ष दिल्ही. शेवटी सार पाहून, धाकटा नाईकजी नाईक यास पुसो लागले की, कसे जाले ते खरे सांग. तेव्हा नाइकजी नाईक बोलिले की, सत्य असेल ते मी सांगेन. साख चाकर परंतु आपण धणी हकीम ह्मणजे आमचे जमीदाराचे मायबाप. तेव्हा आईस सिवी दिल्ही. तिचा उचार माझे मुखे मी कसा करू? सर्वस्वे मायबाप धणी आहेत. सर्व अपराध माफ केले पो. ते समई हकीम तुष्ट होऊन मेहरबान जाले, आणि बोलिले कीं, सर्व वतनदारी व देशमुखी राखतां हाच राखील. जमीदारीस योग्य माणूस ह्मणोन वडिलापासी सिका होता तो घेऊन धाकटे नाईकजी नाईक याचे स्वाधीन केला. तेव्हांपासोन नाइकजी नाईक देशमुखी करू लागले. पुढे त्याचे वडील बंधू साहजण मिळोन नाइकजीस मारावयास जपो लागले. तेव्हा एके दिवसी साहा जणानीं मिळोन नाइकजी नाईक यास मारले. तेव्हां बारा मुलवे याणी मिळोन, समत करून, सोनजी व भिवजी नाईक जेधे यास मारावे. का की नाईकजीसारिखा माणूस याणी मारला. यास्तव समस्तानी मिळोन सोनजीस व भिवजीस मारावे ऐसा सर्वांचा मनोदय एक होऊन मसलत जाली. आणि रावतास ह्मणो लागले कीं, तुह्मी देशमुखाचे प्रधान, याजकरिता तुह्मी व आह्मी हे कार्य करावे. त्यास राऊत व घोलप ह्मणो लागले की आपण जेधे याजवर हात करणार नाहीं. ते समई सांगवीकर घोलप याचा गोत्रपुरुष जुन्नरदेसीं नांदत होता. त्याणे करार करून समस्त मुलवे मेळवून, सोनजीस व भिवजीस मारले. ते समई रावताची प्रधानकी काढून घोलपास दिल्ही. त्याजवर बारा मुलवे मिळोन हकिमाकडे गेले. नाईकजी नाईक मृत्य पावले. पुढे देशमुखी

कोणी करावी, सिका कोणापासी ठेवावा, त्याची आज्ञा करावी. ते वेळेस मुलवियास आज्ञा केली की, नाईकजीची स्त्री आनसावा आहे, तिणे करावी. आनसावा गरोदर पाच महीनियांची आहे. कदाचित परमेश्वराने कृपा केली, पुत्र जाला, तरी उतम. नाहीतर आनसावाचा जीव आहे तोपरियंत सिका देशमुखी आनसावा करील. ते समई पुढे चौ महिनीयानें आनसावा प्रसूत जाली. पुत्र जाला. तरी त्याचे नाव कानोजी नाईक ठेविलें. त्यास दाईपासी ठेऊन त्याची राखण मुलवियाणीं करून वाढविले. आनसावाचे चौकीस राऊत व घोलप दोघेजण होते. तशामध्ये कान्होजी नाईक याचे पुत्र सातजण, त्यापैकी तिघेजण मृत्य पावले. चोघेजण होते त्याणीं जपणीस लागोन वरसा सा महिन्यानीं याने आनसावा मारिली व तिची कुणबीण व कुणबीणीचे पोर ऐसी तिघे जण मारिली. त्याच्या ध्यानांत काय की, आनसावा व कुणबीण व आनसावाचा पुत्र ऐसी तिघेजणे मारली. ऐसे समजोन राहिले. पुढे आनसावा मृत्य पावल्याने तर दिवाणाची बेमर्जी जाली की, तुह्मी इतबारी लोक, राऊत व घोलप याणी जाबसाल केला कीं वादीयानीं मारली. यास उपाय काय? त्यावरून हकीमानी रावताची जमीन सेत व घोलपाची जमीन सेत होती ती खालीसाखाली घातली. ते वेळेस कानोजी नाईक तावेस पासलकराजवळ होता. त्याचे खसमतीस दस माहला नाह्वी, बाजीराव पासलकर याची कन्या सावित्रीबाई होती ती वधू पाहून लग्न केले. तेरावे वर्शी कारीस आले. पुढे देशमुखीचा हकलाजिमा घेऊन सिका रोखा करू लागले. ते समई समस्त लोकानीं अर्ज केला की, दस माहला याणें आपली खसमत बहुत केली, यास काही बक्षीस दिल्हे पाहिजे. त्याजवरून दस माहला नाह्वी यास नाईक मेहरबान होऊन, मौजे आंबवडे इसापतीचा गाव त्यास सेत बक्षीस दिल्हे. त्याजवर कृष्णाजी नाइकजी बांदल याणी येऊन, पुंडाबे करून हिरडस मावल येथे खून मारे करून, आह्मासी सिवे निमित्य व दाइत्या निमित्य कटकट करून जुंझो लागले. ते समई कृष्णाजी नाईक बांदल याची स्त्री दिपावा याच्या पायात बेडी घालून ठेविली होती. आपण जुंझांत जात होते. तेव्हा कृष्णाजी नाईक साहवे जुंज दिल्हे. परंतु बांदलास येश प्राप्त जाले नाही. पुढे अणिकहि जुंझावयाची मसलत करू लागले. तेव्हा कडतोपंताचे वडील होते. त्यास विचारले की आह्मी साहा वेळ जेधियास जुंझास गेलो, परंतु जेध्याचा मोड जाला नाही. पुढे कसे करावे, ते सांगणे. तेव्हा कडतोपंताचे वडील बोलिले की, दिपावाच्या पायांत बेडी घालून तुह्मी ठेविली तोपर्येत तुह्मास यश येत नाही. तुह्मी दिपावाची बेडी तोडून सन्मान करणे. दिपावानी तुह्मास व सर्व लोकास वोवाळून लोकास आशीर्वाद दिल्हा ह्मणजे

तुह्मास यश येईल. तेव्हा कृष्णाजी नाईक बांदल बोलिले की, तुह्मी सांगितले त्याप्रमाणे करितो. परंतु सांगितल्याप्रमाणे घडेना तरी कसें करावें? तेव्हा कडतोपंताचे वडील बोलिले. यांत खोटे जाले तरी आह्मास शासन करावे, ऐसे बोलिले. त्याजवरून कृष्णा नाईक याणी दिपावाचे पायाची बेडी काढून, न्हाऊ घालून, पाटाव नेसावयास दिल्हा. दिपावा याणी पाटाव नेसोन, हाती पंचार्ती घेऊन नाइकास ओवाळिले, व सर्व लोकास बोवाळून आसिर्वाद दिल्हा की, तुह्मी जुंझास जाणे. तुह्मास येश येईल. परंतु तुह्मी निरापार न जाणे. निरेचे अलिकडेच जुंझावे. ऐसी दिपावाची आज्ञा घेऊन, कृष्णाजी नाईक बांदल याणीं सर्व लोक जमा करून कासारखिंडीस रणखांब रोऊन, जुंझावयास सोमवारचा करार केला. समागमे साडेबारासे लोक घेऊन कासारखिंडीस आले. ते समई जेधे याणींहि आपले सर्व लोक सातसे माणूस जमा करून रणखांबाजवळ आले. तेथे जेधे बांदल यांचे युद्ध जाले. त्या युद्धांत जेधे याकडील लोक पडले. त्यांचीं नावनिसी तपसीलवार येणेंप्रमाणें:—

१ राघोजी कोढा व त्याचे साहजण भाऊ जमावासुधा पडले.

१ लुखजी नाईक पेटकर खासे असामी ३ व लोक जमावासुधा पडले.

१ अंतोजी लोहकर व त्याचे भा (ऊ) जमावासुधा पडले.

१ ढवले असामी खास नागोजी व जिवाजी व रायाजी व दसरोजी जमावासुधा पडला.

१ रामजी व पिलाजी तुपा जमावा सुधा पडले.

१ वरकड लोक आपलाले जमावा सुधा झाडून पडले.

६

१ राजजी सणस जमावासुधा पडले.

१ सिदाजी व बालो राऊत देशमुखाचे प्रधान जमावासुधा पडले.

१ धारराव घोलप नाइकाजवळ सेवेचे बाजेस पळसाचे झाडाखाली बसविले, सबब त्याचे कोण्हीही पडले नाही.

१ दस नाह्वी यांस जखमा लागोन जेर आला. तो बांदलानी नेला. जखमा बऱ्या करून लावून दिल्हे.

४

येणेंप्रमाणें लोकांची जुंझांत घरे बुडालीं. गणिती करिता तिनसे माणूस ठार पडले. येके दिवसी तिनसे मुडदे जाले असेत. त्यास जाळावयास घरे मोडून जाती जाती लोक येके जागा जमा करून जाळले. तेव्हापासून जेधे व बांदल यांची

कटकट वारली. बांदलानीं कजिया सोडिला. सेवेचा व दाईत याचा कजिया साध्य जाला नाही. दाईत दिल्हे नाही. कलम १

भोर तर्फेचे मुळचे चार गाव त्याचे वीस जाले. नावनिसी बितपसिलः—

| | |
|---|---|
| १ काा भोर | १ चिखलावडे |
| १ जानवले | १ न्हावी |
| १ वेन्हवडी | १ कारनीट |
| १ पामरडी | १ पानवाल |
| १ सिरवली | १ अंबवडे |
| १ अंबेघर | १ करनवडे |
| १ कारी | १ रावडी |
| १ म्हाकोसी | १ तिटेघर |
| १ वावघर | १ कारले |
| १ चिखलगाव | १ वडतोबी" |

---

## लेखांक २.

### श्री.

"करीना बा॥ बावाजी जुंझारराऊ बि॥ नारायणजी जुंझारराऊ मरल देशमुख ता॥ कानदखोरे सु॥ खमसैन मया अलफ कारणे करीना व वंशावली लेहून दिल्ही ऐसीजेः— जिवाजी बि॥ तुलबाजी नाईक मरल ता॥ मजकूर वृत्तीच्या देशमुखीच्या विभागाकरिता आपणासी कजिया सांगतो जे, आपण तुमचा भाऊ, आणि आपणास वाटा विभागाप्रमाणें वाटा दिल्हा नाहीं, ह्मणोन हुजुर फिर्याद जाला आहे. त्यावरून आपणास हुजूर सातारियाच्या मुकामास बोलाऊन आणून आज्ञा केली जे, जिवाजी नाईक ह्मणतो की तुह्मी वृत्तीच्या विभागाचा वाटा यथास्थित विभागाप्रमाणें दिल्हा नाही, ऐसे ह्मणतो. त्यास हा तुमचे वंसीचा नव्हे. याचा करीना व तुमची वंशावली मूळ पुरुष तुमचा कोण, मूळी देशमुखी कोणत्यानें केली, त्यापासून वंशावली लेहून देणे ह्मणून आज्ञा केली. ऐसियास जिवाजी मरळ आपले वंसीचा नव्हे. जातीचा मरल आहे. परंतु आपले वंशावलींत नाही त्याजला मौजे दापोडे देशमुखीचा गाव आपल्या वडिलानीं दिल्हा आहे. त्याचा करीना व आपली वंशावली ऐसी असे. आपला मूळ पुरुष रघनाक मरळ देशमुख त्यास पुत्र ३ नावनिसी बि॥ः—

१ वडिल परसनाक मरळ देशमुख
१ दुसरा कमलनाक मरळ
१ तिसरा तुकनाक मरळ

३

यासी दुसरा कमलनाक मरळ त्यास संतान नाही दोघांचा वंश आहे बि॥

वडिल परसनाक मरळ देशमुख यांचे पुत्र बाबाजी जुंझारराऊ मरळ एकलाच उरला. याचा मजकूर हकिकतींत येईल. बाबाजीराऊ यास पुत्र कानोजी जुंझारराऊ एक. दुसरा नाहीं. १

तुकनाक मरळ तिसरा याचा वंश कानदकर मरळ त्याचा वंश आहे. १

कानोजी जुंझारराऊ मरळ वडिल देशमुख त्यासी पुत्र ३ त्यांची संततीः—

वडिल बावाजी जुंझारराऊ त्यासी पुत्र ४ बि॥ नावनिसी

१ वडिल कानोजी जुंझारराऊ.

१ दुसरा बाजीराऊ.

१ तिसरा बहादुरजी राऊ.

दुसरा रायाजी राऊ त्यास पुत्र १ एक अबाजीराऊ. यासी संतान नाही.

तिसरा मलोजी पतंगराऊ ह्मणवीत होते. त्यासी पुत्र १ शाहाजीराऊ देशावरी गेले. त्यास पुत्र किती आहेत कळत नाहीत. १.

वडिल बावाजी जुंझारराऊ यासी पुत्र ४. त्याचा विस्तार त्याचा झाडा येणेप्रमाणे असे.

वडिल कानोजी जुंझारराऊ यासी पुत्र ३ तिघे.

१ वडिल शंकरराऊ.

१ दुसरे नारायणजीराऊ.

१ तिसरे यसवंतराऊ.

३

कानोजी जुंझारराऊ याचे पुत्र सदरहू तिघे. त्याची न॥ वडिल शंकरराऊ हे, मोगलाई जाली तेव्हां मोगलाचे ठाणे क॥ खेड त॥ खेडबोर येथे मोगल होता, त्याचा कौल त॥ मजकुरास घेतला जे, सारी मोगलाई जाली, कोठे जावयास जागा नाही. ह्मणून कौल घेतला होता. याजकरिता मोगलाने देशमुख पाटील ऐसे वोलीस ठेविले होते, तेथे वोलीस होते. तेथेच मेले. व तिसरे यसवंतराऊ आपमृत्य मेले. एकूण दोघांचे संतान नाही. नारायणजी जुंझारराऊ एकलेच राहिले. त्यासी पुत्र ३ हाली आहेत

१ वडिल बावाजी जुंझारराऊ

१ दुसरे यसवंतराऊ

१ तिसरे कानोजीराऊ

३

दुसरे बाजीराऊ याचे पुत्र सूर्याराऊ. याचे पुत्र दोघे हाली असेत.

१ वडील मल्हारराऊ.
१ दुसरे यादवराऊ.
१ तिसरे मोरोजीराऊ.
१ चौथे शाहाजीराऊ.
—
४

चौथा भानजीराऊ. त्यास पुत्र एक वेंकटराऊ. देशावरी आहेत १

एणेंप्रमाणें आपली वंशावल. वरकड मरळ आहेत परंतु आपले वंसीचे नव्हत. कितेक सिपाईपणा करून होते. त्यामधे जिवाजी नाईक मरळ आपले वंसीचा ह्मणून देशमुखीच्या वृत्तीच्या वाटियाचा कजिया सांगतो. त्यास त्याचा वडिल बाजीनाईक मरळ आपल्या वडिलास कार्यास आले. व सूर्याजी नाईक व मालोजी नाईक मरळ ऐसे तिघेहि कामकाजास आले. त्याचा मजकूरः— मुकनाक मरळ आपला तक्षीमदार कानदकर हा, बेदरास तांत्राकडे ता। मजकूरच्या कारभारास परसनाक मरळ देशमुख आमचे वडील सिकियाचे खावंद याणीं पाठविला होता तेथून तो आलियावरि तोच बळावला. परसनाक मरळ आपले वडिल होते. ते मृत्ये पावले. त्यावरि त्याची स्त्री पुतलावा होती. ती गरोदर होती. वडील पुत्र बावाजी जुंझारराऊ वडिल व दुसरा पुत्र त्याजहून लाहान होता. ऐसे दोघे पुत्र होते. त्यास कानदकर मरळ याणीं त्या तिघास मारावे, आणि देशमुखी आपणच करावी ह्मणून विचार केला. आणि गोंधळ आपले घरी आहे ऐसे निमित्य करून, त्या तिघास धानेबास येऊन, तिघासहि वाडियांतून काढून, मार्गावरी वाघवळावीर धानेबांत आहे तेथे आणून, तुलबाजीराऊ याहून लाहाण होता तो व पुतलाई आवा ऐसी दोघे मारिली. त्या दोघावरी गजर जाली. तेव्हा बावाजी-राऊ पळाले. ते श्रीच्या देवळामागें रान उढियाचे होते व गाठीयाचे गवत दाट होते, त्यामधे जाऊन दडाले. पुतलाईआवा व धाकटा पुत्र लाहान होता, तो मारिला. बावाजीराऊ याचा तलास त्याणीं केला, परंतु ते सापडले नाहीत. मग कानदकर मरळ इतके काम करून माघारे कानदास परतोन गेले. पुतलाई आवा व मूल कानदकर मरळ याणी मारिली, ऐसी खबर होनाजी सेडकर यास कळली. तो आप्तविशई नातलग होता. त्याजकरिता खबरीस तिसरे दिवसी आला. तो पुतलाई आवा व एक मूल मारिला, एक रानात पळोन गेला, ऐसे वर्तमान तह-कीक जाले. त्यावरून तो त्या रानांत जाऊन मी होनाजी सेडकर आलो आहे, कोठे असलास तरी मजपासी येणे ह्मणून बोलिला. मग बावाजीराऊ याणी जाब

वोळखिला ह्मणून त्यांजपासी आले. त्यास घेऊन होनाजी सेडकर गेला. मग जतन कैसा होईल ऐसा विचार पडिला. हे नायकाचे मूल, त्यामधे दावेदार जपणीस लागले आहेत, हे काही आपणास जतन होत नाही. जे नाईक याचे बरोबरीचे असतील तेथे जतन होईल. तरी यासी पासलकर याजपासी नेऊन त्याचे हवाला करावे. ते जोरावर आहेत ते जतन करितील. ह्मणून बाबाजी राऊ यास घेऊन निवगणी याकडे मौजे आंबी ता॥ मोसेखोरे येथें गेला. तेथूनहि तोवेस पासलकराकडे घेऊन गेले. तेथें त्याच्या हवाला बाबाजीराऊ केले. ते जाणते जालियावरी होनाजी सेडकर यासी बोलाऊन नेले, आणि त्यास विचारलें की आमची गत ऐसी जाली, पुढें कैसें करावें, ऐसे त्यास पुसिलें. त्याणी सांगितले कीं तुमचे सिपाई व आणखी उदंड मांग राहिले आहेत. परंतु तुमचें साहित्य पासलकर देशमुख ता॥ मोसेखोरे याची पाठी आहे. हेहि तुमची मदत करितील. आणि बाजी नाईक मरळ व सूर्याजी नाईक मरळ व मालोजी नाईक मरळ हे तिघे हाताखाले गवसून कार्य करावे. त्यांच्या हातून कार्यसिद्धि होईल. आपणहि साहित्य करून. परंतु त्या तिघास हातीं धरिलें पाहिजे ह्मणोन. ऐसे होनाजीं सेडकर याणे बाबाजीराव यास सांगितले. त्या तिघांचा तलास होनाजी सेडकर याच्या हातून केला, आणि त्यास घेऊन होनाजी सेडकर बाबाजीरायापासीं गेले. त्याचें व बाबाजीराव याचें इमान जाले जे, आपण देशमुखी करूं लागलियावरी तुह्मां तिघास तीन गाव देईन. ऐसी बोली जाली. त्यावरी सेडकर याजपासी घोडी होती त्याचे राऊत व बाजीनाईक मरळ व सूर्याजी नाईक मरळ व मालोजी नाईक मरळ ऐसे त्याखेरीज जमाव करून कानदकरावरी आले. त्यासी त्याचे पारपत्य जे प्रकारें कानदकर मरळ याणी काम केले होते, ते रीतीने त्याचेहि काम केले. जे सापडले त्यास मारिले. ऐसे काम त्या तिघांच्या हातून केले. बाबाजी जुंझारराऊ आपल्या वतनावरी येऊन देशमुखी करावयास लागले. मग मालोजी मरळ यासी वेले बु॥ येथील पाटीलकी दिल्ही व मौजे राजणे नीम सूर्याजी मरळ यास दिल्हे होते. बाजी नाईक मरळ यासी मौजे दापोडे येथील देशमुखीचा हक निमे दिल्हा होता. सेडकर कामास आले. त्यास मौजे दापोडे येथील पाटिलकी दिल्ही. पहिले कारले पाटील होते. त्याची पाटीलकी सेडेकरास दिल्ही. पुढे बाबाजीराऊ होते तोवरी जे या तिघास दिल्हे होते, ते तिघेहि खाऊन होते. त्यास बाबाजी-राऊ हे मेलियावरी कानोजी जुंझारराऊ देशमुखी करूं लागले. तेसमई बाजी नाईक व सूर्याजी नाईक मरळ ऐसे दोघे रुसवा करून, किले पुरंधरास राजश्री नरसिंगराऊ होते त्याजकडे गेले. त्याणी राजश्री भानजीपंत पाठविले की, बाजी

नाईक व सूर्याजी नाईक मरळ आह्माकडे तुह्मावरी रुसवा करून आले आहेत. त्यासी बाजी मरळ मौजे दापोडे तो गाव देशमुखीचा आवघाच मागतो. तोच गांव जरी बाजी नाईक यास मौजे दापोडे येथील देशमुखी आवघी द्याल तरी याची समजावीस करून. ऐसी बोली भानजीपंत याणी कानोजी जुंझारराऊ यासी केली. यावरून कानोजी जुंझारराऊ मरळ याणी भानजीपंत याच्या बराबरी पाटील वतनदार पुरंधरास पाठविले होते बि ॥ ना ॥

मालोजी चरघा मोकदम मौजे कोलवडी १
पाकोजी सेडकर मोकदम मौजे दापोडे १
परसोजी देवगीरकर चौगुला मौजे विझर १
लिखजी लिह्मण मोकदम मौजे विंझर १
लखजी सेडकर मोकदम मौजे मालवली १
जमानी बीन सेख भाई तुरसदाज मुसलमान १

एकूण साहाजणें त्याच्या सांगाते दिल्ही. त्यासी भानजीपंत घेऊन किले पुरंधरास गेले. ते व अवघे हजीरमजालसीस बसले होते. त्या हुजूर बाजी मरळ यासी समजावीस करून त्यास दापोडे येथील देशमुखीचा महजर करून दिल्हा. सु ॥ सबा अशर अलफ बतारीख ११ जिल्हेज मुकाम किले पुरंधर हजीरमजालसी बि ॥ नांवनिसीः—

राजश्री माहादजी जाधवराव नामजाद किले मजकूर
भानजी बनखस मुतालिक राजश्री नरसिंगराव
आपाजी फरजंद बि ॥ मल्हारजी देशमुख प्र ॥ सिरवल १
यसवंतराऊ अटगावकर खोत ता॥ सिवतरखोरे
कानोजी जेधे देशमुख ता॥ भोर ता॥ रोहिडा
यमाजी मोकदम मौजे पुणे प्र॥ पुणे
बाबसेट सेटिया पेठ मुर्तजाबाद ता॥ किले मजकूर नि॥ तागडी १
राजश्री हाणवंतराऊ हरकारी किले मजकूर
तमाजी अनंत मु॥ लबे बहीरदेव १
तुलाजी व जाखोजी देशमुख त॥ खेडबारे
बाजी हैबतराऊ देशमुख त॥ गुंजण मावळ प्र॥ मुरूमदेव
नरसोजी खोपडे देशमुख त॥ अत्रोली त॥ रोहिडा
आबाजी बांदल मोकदम मौजे अलंदे त॥ हिरडस मावळ
कडदसेट बाधा महाजन पेठ मुर्तजाबाद त॥ किले मजकूर नि॥ तागडी १

सदरहूप्रमाणें गोत व ता॥ मजकूरचे पाटील चौगुले सदरहू सहाजण तेथे गेले होते. त्यांचे साक्षीने बाजीनाईक मरळ यासी दापोडे येथील देशमुखीचा महजर करून दिल्हा आहे. त्याप्रमाणे अजी ता॥ खात आले आहेत. व सूर्याजी नाईक मरळ यासी मौजे राजणेस मळा व गाव दिल्हा व मालोजी मरळ यासहि मौजे वेले बु॥ पाटीलकी व देशमुखी देखील गाव त्यास दिल्हा. ऐसी तिघाची समजावीस केली व आणखी बाराजण सिपाई होते त्यास घर सेत मौजे धानेबांत आहे ते दिल्हे. वरकड रजपूत होते त्यांसहि सेत धानेबांत दिल्हे जे कामकाजास आले त्यास देऊन समजावीस केली. जिवाजी नाईक मरळ याचा काही वडील आपले वंसीचे नव्हे. त्याच्या वडिलानीं कट मेहनत केली. आपल्या वडिलास कार्यास आला. याजकरिता त्याजला गाव त्याच्या वडिलानीं मागितला होता. तोच गाव त्यास दिल्हा. ऐसा जिवाजी मरळ याचा मजकूर आहे. आपले वंसीचा नव्हे हे खरे. आपणावरी वतनामुळे नागवणा पडिला. कानदकर मरळ याणी बलवंतराऊ कोकाटे किले प्रचंडगड होते, त्याजपासी फिर्याद होऊन, त्यासी सांगोन, कानोजी जुंझारराऊ याची स्त्री अबई आवा त्यास गडावरी नेऊन, त्याजपासून खुर्दा टके १२०० बारासे टके घेतले. त्याचे हाल इजारेंत इंचू घालून देशमुखी मुळें विपत्य करून, सदरहू बारासे टके नागवण घेतली. त्यावरी महाराज राजश्री सिवाजी महाराज छत्रपति स्वामी सिंहासनारूढ जाले. तेसमई तमाम आवघा महालोमहालच्या वतनदारावरी सिंहासनपटी घातली. तेवेळेस आपणावरी होन १००० एक हजार होन पटी घातली. याखेरीज मिरासपट्या त्याहि दिल्हे. त्यावरी कानदकर मरळ, महाराज राजश्री कैलासवासी थोरले महाराजस्वामी यासी उभे राहिले, आणि देशमुखीच्या विभागाचा व खुनाचा आमच्या वडिलासी कजिया सांगो लागले. त्यास महाराज राजश्री छत्रपति स्वामीनी कानदकराची व आपली मनसुबी राजश्री अनाजी पंडित यांजकडे दिल्ही. त्याणी कानदकर याचा व आमचा इनसाफ पाहिला. त्यास कानदकर मरळ याणी आमचे खून केले ते गैर केले ह्मणून त्याजला नशहात करून त्याजला एक गाव देवऊन त्याचा आमचा कजिया तोडिला. तेथे अमच्या वडिलास हरखी पडिली. तोहि टका आमच्या वडिलानीं दिल्हा. त्यावरी हजरत अवरंगशाहा पातशाहा याची चाली दक्षणेंवरी जाली. तेसमई किले सिंहगड व राजगड प्रचंडगड ऐसे मोगलानीं घेतले. आपले आजे कानोजी जुंझारराऊ कबिला घेऊन कोकण प्रां॥ गेले. ता॥मजकूरचे पाटील व जावजी सेडकर व सोनजी कोंढीतकर व आणखी पाटील रयेत देखील वनखल तपियांत हातनली तर्फ

प्रा मौजे निंगडोलीस जाऊन राहिले. पदरीं काही नाही आणि कुटुंब भारी. अन्नाचा मजकूर येऊन पडिला. ते वेळेस हि तुलबाजी नाईक मरळ जिवाजी नाईक मरळ याचे बाप तो हि तेथे होता. त्याचा भाऊ रामाजी नाईक कल्याण प्रा भिवडी नि॥ सोनाल तपियात पहिलाच नांदत होता. त्याणे काही आमच्या वडिलाचा परामृष थोडा बहुत केला. ह्मणून जावजी सेडकर पाटील दापोडे व सोनजी कोढीतकर पाटिल हरपोडी याणी मधेस्ती करून, तुलबाजी नाईक व रामाजी नाईक मरळ यासी लासीरगाव देविला. त्याचे खरेदीखत करून द्यावे त्यास सेरणी पडेल, ह्मणून आपले आजे कानोजी जुंझारराऊ यासी जावजी सेडकर व सोनजी कोढीतकर याणी कितेक विचारें समजाऊन, याची सरपोसी करणे ह्मणून बोली करून, तुलबाजी नाईक यासी लासीरगावचा कागद करून दिल्हा. त्यामधे लेहविले जे, तुझा आजा बाजी नाईक व आपले आजे कानोजी जुंझारराऊ ऐसे साक्षात भाऊ ह्मणून लेहून दिल्हा आहे. अजीतागाईत त्याची फुटी पडो दिल्ही नाही. लासीरगाव जिवाजी मरळ याच्या वडिलास दिल्हे, परंतु काही त्याच्या वडिलास खरेदीखत करून दिल्हे नाही. गाव त्या तागाईत खात आहेत. त्यास जिवाजी नाईक त्याच्या वडिलानीं रास्ती टका देऊन, गावचे खरेदीखत करून आमच्या वडिलापासून घेतले नाही. ऐसे असोन त्याने गांव खादला आहे इतकेहि त्याचे चालविले. परंतु तो कजिया करावयास उठिला. आह्मी काही आपल्या-पासून अंतर पडो दिल्हे नाही. आता निदानची गोष्टी तो काही आपले वंसीचा नव्हे. त्याणे काही अजीतागाईत नागवण अगर वतनावरी टका पडिला त्याची तक्षीम दिल्ही असेल, त्याचा कागदपत्र त्याजपासी दिवाणचा अगर आमच्या वडिलाचा असेल, तो त्याणी काढावा. त्यासी नागवणा व खंड पडले. सदरहू पहिले व त्या अलिकडे शामलाने आपले आजे व आपणास कबिला देखील धरून राजपुरीस गेले होते, त्याची खंड खुद जातीचा व जमानगती व खर्च अंतस्त देखील रुपये ७००० सात हजार पडले. व हाबसी याचे वरातदार व स्वारीया येऊन बैसत होत्या. त्यास पोटखर्च गला कैली खंडी ४० चाळीस खंडी लागला. कानोजी जुंझारराऊ राजपुरीस बंदांत सा महिने होते. त्याणीं सा महिने बंद वोढिले. ते तेथेच मरावे, परंतु वतनावरी जीव सांडावा हा हेत त्याचा; ह्मणून निकड करून केवळ मढें ऐसेच ह्मणून उचलून आणिले. धानेबीं आलियावरी ते मेले. तिसरा दिवस गेला नाहीं. जे दिवसी वतनावरी आले त्याचे दुसरे दिवसी मेले. व शंकरराऊ आपले वडील चुलते क॥ खेड ता॥ खेडेबारे येथे मोगलाच्या बंदांत मेले. ऐसे कितेक खून खराबी व पैका टका पडिला सिंहासनपटी व मागे

टका पडला. तेव्हा गोडसे ह्मणून सावकार होते त्याजपासून दोन हजार घेऊन दिल्हे होते. ते अजीपावेतो आपण व्याज देखील फेडिले. ऐसी बहुत खराबी जाली आहे. टका उदंड पडिला. त्यास जिवाजी नाईक याणे अगर त्याच्या वडिलानीं अजी तागाईत एक गाव खात आहेत. याजवरी तक्षीम पडली. त्यामधे एक रुपया अथवा एक पैसा तोहि दिल्हा नाही, आणि वृत्ती खात आहेत. आपल्या वडिला ता॥ टका पैका पडला व आपले खून जाले आहेत. ऐसी खराबी या वतनाकरिता जाली. ऐसी हकीकत असोन, आपणासी जिवाजी मरळ याचे वडील पूर्वज बाजी नाईक मरळ कामाकाजास आला ह्मणून भाऊ मानिला होता. त्याजला आपले वडिल बाबाजीराऊ याचे पुत्र थोरले कानोजी जुंझार बाजी काका ऐसे जिवाजी नाईकाच्या वडिलास ह्मणत होते. ऐसे त्याचे दाखले आहेत. कानोजी जुंझारराऊ याणीहि मालुमातीचा कागद लासीरगावचा लेहून दिल्हा आहे. त्यामधे साक्षात भाऊ आपले आजीयाचे भाऊ ह्मणोन लिहिले आहे. परंतु बाजी नाईक मरळ काही आपले वंसीचा नव्हे, हे गोष्टी खरी असे. त्याच्या वडिलास आपल्या वडिलानी प्रगणियांत मातबर गाव सरस होता तो दिल्हा असे. हे गोष्टी दाखलियानसी खरी करून देऊन. अवघे गोष्टीची गोष्टी जिवाजी नाईक मरळ हा काही आमचा नव्हे. आपली वंशावळी सदरहू लिहिली असे. त्यामध्यें जिवाजी नाईक मरळ याचे वडील बाजी नाईक मरळ याचा दाखला आपले वंशावळींत नाही. सार गोष्टीची गोष्टी जिवाजी नाईक मरळ आपणासी कथला वृतीविभागाचा करितो. परंतु तो आपले वंसीचा नव्हे, हे खरे लिहिलें. सही."

---

## लेखांक ३.

### श्री.

"करीणा राजश्री बावाजी जुंझारराव देशमुख तर्फ कानदखोरे करिणा ऐसाजेः— जिवाजी बीन तुळबाजी मरळ याचा वडील मूळ पुरुष बाजी मरळ. यासी आपले वडिल राजश्री बावाजी जुंझारराऊ यानी बाजी मरळास मौजे दापोडे येथील हाक नेमून दिल्हा होता, तो बाजी मरळ खात होते. यास तपसिल कणसारा अडिच टके व माहाल तूप गाव खंडी गला व उडिद कोहल कणसारा येणेप्रमाणे थोरले राव यांचे कारकिर्दीस चालत होते. त्याउपर बाजी मरळ रुसनुका करून, पुरंधरास जाऊन राजश्री नरसिंगराव साहेब पेशवे याचे मुतालिक राजश्री भानजीपंत हे राजश्री कान्होजी जुंझारराव देशमुख याजवळ येऊन वर्तमान विदित केले कीं, "बाजी दापोडाचा हाक मागतात. तो द्याल तर त्यास समजाऊन आणून

विलाइतीचा बंद राहील" ऐसे वर्तमान सांगितले. त्याउपर कबूल करून, जाचती नवे नगद टके ऐसीं व गाव खेडी व माहार तकसीम दापोडे पावणेसात सेकार ऐसे देऊन, समजावीस माहाल व पर माहाल याचे इदमाने समजावीस करून, बाजी मरळ पुरंधरीहून समजावीस करून, मौजे दापोडे येथे येऊन राहोन, तेथील हक लाजमा खाऊन होते. त्याउपर करकशा काही जाला नाही. मग राजश्री कान्होजी जुंझारराव आपले आजे यानी तुळबाजी मरळ येकत्र चालू लागले. त्याजवर मौजे दापोडे येथे आपला खासा इनाम होता, तो त्यास साठी रुपयासी दिल्हा. त्याउपर अवरंगशाहा पातशाहा हे स्वार होऊन या प्रांते येऊन, देश दुर्गें आक्रमण करून, राजगड प्रचंडगड व सिंहगड घेतले. आपल्या वडिलास राहावयासी जागा नाही. मग कोकण प्रांते आपले आजे व तीर्थरूप ऐसे निघोनि मौजे निगडौली ता। वनखल येथे कबिलासुद्धा राहिले. त्यास मौजे नादेटन तर्फ सोनाले येथे येसजी बीन जिवाजी नाईक व रामाजी बीन बाळाजी नाईक व सिवजी बीन आबाजी नाईक मौजे दापोडे तेथे होते. तेव्हा तेथून आमचे आजे कान्होजी बावा याचे भेटीस आले. भेट जालिया उपर मौजे निगडवलीचे मुकामी काही खर्चावयाची बेगमी नव्हती. मग यानी बेगमी केली ह्मणोन यासी मौजे लासिरगाऊ तेथील हाक दिल्हा. ते समई यानी भाऊपणीयाचा करकशा केला नाही. मग आपले वडील व त्याचे वडील माहाराज छत्रपति शाहूस्वामी तांब्रारा-तून स्वार होऊन दक्षण देशास आले. मुलकास कौल जाले. त्या उपरांतिक आपले वडिल व याचे वडिल कबिले घेऊन माहालासी आले. माहालासी येऊन राहिले तेच वरसी शामळानें पाळत करून, आपले आजे कान्होजी बावा व कबिला देखील धरून, भाद्रपद मासीं दंडाराजपुरी इथें सा महिने बंदी ठेविले. त्या उपरातिक दंड करून माथा ठेविला. मग माघ वद्य त्रयोदसी सिवरात्र करावयासी माहालासी पैवस्ती जाली. मग आपल्या आज्याचें वृद्धपण व बंदी राहून शरीरास हागवण प्राप्त जाली होती. तेसमई अंतकाल व्होऊं लागला, मग तुळबाजी मरळ यासी व आपले तीर्थरूप राजश्री नारायणजीबावा यासी आज्ञा केली की, आपला अंतकाल आहे. नारायणजीचे पाठीसी कोण्ही नाही. याकरिता तू शाहाणा माणूस ह्मणोन तुझे हातीं दिल्हे. एकमते चालत जाणे ह्मणोन तुळबाजीस आज्ञा केली. त्यावरून तुळबाजीने क्रिया केली की, नारायणजी जुंझारराव यासी एकमतें एकविचारें चालत जाऊं. ह्मणून श्रीधानेश्वराची क्रिया केली. मग दाहा वीस वरसे सुधामत चालिले. क्रिया केली तिचे विप्रयास

दाखविले नाही. त्यास जे गाव २ दिल्हे ते व दापोडाचा इनाम ऐसे खाऊन सुखे होते. तेथे कोणे गोष्टीची इसकिल नव्हती. भोग भोगवटा त्याचा त्याजकडे चालत आहे. आपणहि त्यासी व आपल्या वडिलाहीं त्यासी काही विक्षोप केला नाही. सलामत चालिले ऐसे असोन आपणापासून अंतर पडले नाही. त्यासी महाराज शाहू छत्रपतिस्वामीनीं राजश्री फत्तेसिंगबावा भोसले व राजश्री बाजीरावपंत प्रधन यांची मोहीम दंडाराजपुरीकडे केली. त्याबराबर किलों किलाचे लोक व सरदार रवाना केले. त्यास किले प्रचंडगड येथील लोक व खंडो-मल्हार नामजाद हे ऐसे राजश्री आनंदराव बहिरव यांबराबर राजश्री सचीवपंत यांनी देऊन रवानगी केली. तेसमई खंडो मल्हार खासनीस किला अंमल करीत होते. त्यासी तुळबाजी मरळ याने अनुसंदान लाविलें कीं, आपल्यास चाकरीचुक-रीचा कसाला पडतो, तर तुह्मी आनंदराव बहिरव यासी बोली करून आह्मास इनाम होये ऐसे केले पाहिजे. मग या गोष्टीच्या विचारणांत पडोन रदबदल करू लागले. ते गोष्ट काही आपणास विदित नाही. शामळ मोडून हस्तगस्त राज्य जाले. मग रायगडास माहाराजाचें निशाण गेलें. तेसमई मागती फिरोन सिदी सात हाफसी बळाऊन रायगडास वेढा घातला. त्याउपर माहाराजानीं अवकाट फौजास हुकूम केला. मग सहवर्तमान लस्करें उतरोन कोकण प्रांते जाऊन रायगडाचा वेढा मारून काढिला. पाचाडचा कोट राजश्री सचीवपंत याकडे जाला. तेथे राजश्री आनंदराव बहिरव लोक व सरदार घेऊन बंदोबस्तीस राहिले. ते प्रसंगीं किले प्रचंडगडचे लोक व सरदार व तुळबाजी मरळ याचे लोक ऐसे व खंडो मल्हार नामजाद ऐसे होते. त्याउपर मागती बोली घातली की, आपण पूर्वी अर्ज केला तो सिद्धीस न्यावा. त्यावरून खंडो मल्हार यानीं अगत्य धरून अडचा खंडी रकमेचा गाव करून दिल्हा. मग हे वर्तमान आपणास कळलें. कांहीं उपाय नाहीं. आपले खासनीस खंडो मल्हार यानी ये गोष्टीचा पशेत करावा तो न केला. आपल्यास कोण्ही पुसले नाही. ऐसी वर्तमान परस्परे कळो आलें. मग तीर्थरूप नारायणजीबावा यासी विचारिले की, हे गोष्ट आपण ऐकिली की? गाव तुळबाजी मरळ करून घेतो हे गोष्टीचा विचार काय? तेव्हा आपल्यास बोलिले की लबाड गोष्ट. तेव्हा आपण त्यास फिरोन जाब दिल्हा की, तुळ (बाजी) आह्मासी माव करितो. त्यास ते बोलिले जे माव करीत नाही. तर ये गोष्टीचा विचार काय? तेव्हा त्यानी सांगितले की, किल्याखाली घेऱ्यांत गावचे रान पडले आहे ते घेतो. तेव्हा त्याणी आह्मास पुसिले की तुमच्या विचारे काय? तेव्हा आपण बोलिलो जे, घेऱ्यामधे राण पडले ते दिवाणांत गेले. ते आपल्यास सोडवा-

वयास अवकात नाही. कोण्ही एक मरळ उभा राहोन दिवाणातून सोडऊन घेतले तर ते आपलेच आहे. ऐसी बोली तीर्थरूपासी जाली. ऐसे असता घेराचें राण न घेतां, खासा गाव आपला होता तो घेतला. मग बावास पुसिले हे काय वर्तमान? तेव्हा ते बोलिले की हे आह्मास ठाऊक नाही. त्याउपर स (न) दा ब्राह्मण घरच्या आणून ठेविल्या. त्या काही आपण आज तागाईत पाहिल्या नाहीत. त्यास तुळबाजी मरळ एक दोन वेळा आह्मास निराळ्या वाटेनें विचारू लागला की ब्राह्मणघर दिवाणातून करून घेतले, तर तुह्मी तेथील हाक होईल तो मला माझे सेतचा सोडा. ह्मणोन बोलू लागला. त्यास आपण जाब दिल्हा की आपण लेकरू, त्यास लेकरू वडिलास विचारून सांगू. मग आपण काही वडिलास विचारिले नाही. दोन चार महिने जाले; मागती पुसो लागले. त्यास आह्मी त्यास सांगितले की बावा जे दिवसी समाधानांत असतील ते समई सांगू. ऐसे करिता करिता वरसे दोन वरसे जाली. त्याउपर मागती आह्मास विचारू लागले की, खंडीभर भात माझे पुत्र जिवाजी मरळ व सिदोजी व माहादजी हे तुझी पाठी राखतील, तर तू एवढे करून आह्मास हाक सोडा, आणि आपण पुत्रास सांगून खंडीभर साली देवित जाईन. तेव्हा आपल्या चित्तांत आले की, एक दोन वडिलापासून इनामे व गाऊ करून घेतले, आणि पुढे कोठवर द्यावे, ऐसे आले. मग त्यास सांगितले की, हे गोष्ट कार्याची नाही. आमचे पदरीं उरले काय? त्यांतून द्यावे काय? भाऊपणीयाखाले आणि गाव तुटोन गेले, ऐसे सांगितले. परंतु गोष्ट त्याच्या चित्तांत आली नाही. मग आह्मासी क्रिया करून बोलू लागले की, तुझी आमची कटकट नाही; परंतु एवढे देणे तुह्मीं ह्मणून द्या. ऐसी क्रिया धरून मागो लागले. माझे व तुझ्या वडिलाचे क्रियाप्रमाणे चालिले, त्याप्रमाणे पुढेहि चालेल. आह्मी तुह्मासी वाईट नाही. तुझे वाईट केलियाने आमचे बरें नाही. ऐसी एक दोन वेळा जे जे जागा क्रिया केली, त्यास साक्ष परमेश्वर आहे. त्याउपरातिक आपल्या चित्तांत आले कीं, दाढीस धरून पोटांत डोई घालून आंतडी काढितो. ऐसे भास निर्माण जाली. मग आपण तीर्थरूप राजश्री नारायणजीबावास विचारिले, हे गोष्ट तुळबाजी ह्मणतो. ये गोष्टीचा विचार काय? मग त्यानी आह्मास जाब दिल्हा की, याने आह्मासी क्रिया केली ती याने सोडिली. आह्मास गोष्ट हे पुरवत नाही. तेव्हा त्यास विचारिले की, मौजे लासीरगाऊ दिधला आहे याचा अर्थ काय? तेव्हा त्यानीं सांगितले की कोकणांत बावा गेले ते समई दोनसे रुपये घेऊन गाव दिल्हा. तेव्हा त्यास मागती विचारिले की, शामळानें धरून नेले ह्मणून तेचा रकमेचा गाऊ देऊन

कबिला सोडविला; ऐसे असता दोशा रुपयास गाव दिल्हा. त्याचा हिसेबु पाहाता गाव हस्तगत होईल. त्याचा महजर अगर खरिदपत्र जाले नाही. तेथून तुळबाजी मरळ व जिवाजी मरळ एका दो वरसामधें कटकट करू लागला. मागे आपल्या वडिलाचे व त्याच्या वडिलाची कटकट जाली नाही. हाली खंडो मल्हार यानीं येक दोन वेळा मध्येस्त घातले की, यास ब्राह्मणघरचा हाक द्यावा. ऐसे नाइकिले. ह्मणून खंडो मल्हार खासनीस यास अभिमान येऊन पडिला की, आमची गोष्ट अमान्य करितात; ह्मणून दूर दराज लाऊन ज्यानगिरी केली. हे गोष्ट खरी आहे. पूर्वापार आहे ऐसे असोन, ये गोष्टींत अभिमान खंडोपंतीं धरून, जिवाजी मरळ उभा करून, त्यास पत्र सचिवपंताचे आणून दिल्हे. त्याउपर जिवाजी मरळ हुजूर गेला. तेथे जाऊन आह्मास मसाला घातला. त्याउपर आह्मी वरातदारास न भेटलो. आपल्या चितात वाद्या खरा करून उठविला. हे खरेसें दिसोन आले. मग त्यानीं आमचा प्रयत्न करून आह्मास बोलाविले. त्यास आह्मास सांगितले कीं, जिवाजी सातारा जाऊन हजार दोनसे रुपये खर्च केला. तो उगाच गोतांत येत नाही. तो गोतांत आलिया उपर तुमचा उपाय आहे. ऐसे ह्मणोन आह्मापासून पाच सातसे रुपये घेऊन गेले. मग जिवाजी मरळ घेऊन आले. बाजीराव पासलकर मोसेखोरे व कर्यात मावळचे देशमुख देशपांडिये यासी आज्ञापत्र आणिले. त्याउपर जिवाजी मरळ याजवळ कर्यातमावळची सनद देऊन आह्मास मोसाखोराची सनद देऊन रवाना केले. त्यास आह्मी व त्यानें सनदा नेऊन लाविल्याउपर गोत मेळऊन इनसाफ करावा, तों चैत्रमासी राजश्री पंतसचिव नेराचे मोकामास मोछाव करावयासी आले. तेथे देसमुख माहालो माहालचे अवघे व्होते. तेथे आह्मापासून व त्याजपासून कागद कतबे व जामीन अमीन घेऊन बारा मावळच्या देसमुखानीं आधार आसरा उभयतांचा पाहाता ऐसे असोन, कोणे गोष्टीचा जिवाजी मरळाचा ठिकाण लागला नाही. गोतानें खोटा केला. त्याउपर मागती चढी देऊन इनसाफ राहाविला."

---

## लेखांक ४.

### श्री.

"करीना बाबाजी जुंझारराव मरळ देशमुख ता॥ कानदखोरे करीना ऐसाजेः—भिकाजी बीन भिवजी रेणुसा पाटील मौजे पाबे ता॥ मा॥र याचा बालोजी रेणुसा मौजे मजकुरचे गाव जत्रेचे फळे व रानसावजाचे फळे व दिवा व भागसी देत होता. त्यावरी बालोजी रेणुसा याने बळेंच जत्रेचे फळे व रानसावजाचे फळे ऐसे खाऊ

लागला. त्याउपरी आपले आजे राजश्री कान्होजी बावा जुंझारराव राजश्री कारकीर्द नारो माधव किले राजगडचे मुकामीं होते. तेथे बाळोजी रेणुसा नेऊन इनसाफ पाहिला. तेव्हा तेथें बाळोजी रेणुसा याजकडे इनसाफ लाऊन गुन्हेगारी खंड रुपये घेतले रु॥ ३५ पस्तीस घेतले. गावजत्रेचे फळे व रानसावजाचे फळे देखील डुकराचे सालाबाद चालत आले आहे, त्याप्रमाणें चालवणे ह्मणून खोटा केला, आणि रुपये घेतले. आणि बाळोजीस रजा फर्माविली की, देशमुखाची फळी मागे तीन वरसे खादली, त्याची समजावीस करणे. त्याउप्रातिक समजावीस केली नाही. त्याउपरी भोगवटा आपल्याकडे पडावा, तो राजक्रांत जाला. मग माहाल मुलूक देशदेशावरी गेला. तेथून आलियावरी आपल्यावर शामलाचा खंड पडिला. व आपल्या मातुश्री यास देवआज्ञा जाल्या. व मुलेमाणसे मेली. व कर्जवाम वडिलाचे वेळचे होते, ते कर्जदार येऊन उभे राहिले. याकरितां वृत्तीच्या बाबें व हक लाजिम्याच्या बाबें काही तीर्थरूप राजश्री नारायणजीबावास सुचले नाही. तेणेकरून भोगवटा राहिला. मग आह्मी खंड वारिला व कर्जवामहि वारिले. व तीर्थरूपाची दोन च्यार लग्नं व बहिणीयांचे सातं लग्नं जालीं. त्याउपरी दोन च्यार वरसं स्वस्त जाले. मग रेणुसा यास फलकुटियां विसीं जाजाऊ लागलो. मग त्याणीं फिरोन जाब दिल्हा की, आपण दाहापाच वरसं खात आलो त्याप्रमाणे पुढंहि खाऊ. त्यासी तुह्मी कोणा आधारावरी खाता? ते गोस्टीचा कागदपत्र व दाखला दुखला असेल तो दाखवणे, मग तुह्मी सुखे खाणे. नाहीतरी तुह्मास गरज नाही. मागे तीन वरसं खादले त्याची समजावीस काय केली? पुढे तू खातोसी त्याचे खरेदीपत्र काय असेल ते दाखवणे. मग तू सुखें खाणे. नाहीतरी तुह्मास गरज नाही. ऐसी दोन चार वरसं बोली पडली. तो राजश्री पंतसचिव याणी कामथपटी मुठेखोरे व मोसेखोरे या दोही माहालीं घातली. त्या उप्रांतिक कामथपटी आपले महालीं बैसली. तेव्हा राजश्री खंडोपंतीं आह्मास पटी करावयासी मौजे धानेबचे मुकामीं बोलाविले. तेथे बोली घातली की, कामथपटी दर माहालीं वसूल जाली. आह्मास काही सुटत नाही. तरी माहालची पटी करून घेणे. दर इसाफत खासगत गाव इनाम पाबे व धानब येथे कामथ पूर्वापार आपण खात आलो आहो त्याची वाट काय? तेव्हा खंडोपंत बोलिले जे, कामथ ह्मणिजे पाटिलाचे पाटिलास देणे. ऐसे उतर निरोत्तर होऊ लागले. परंतु आम्हास निकालस होऊन गोष्टी सांगितली नाही. ते समई आपलेस भास निर्माण जाली. पूर्वी चालत आले आहे आणि हे दिवाणदारीनें मोडितात, तेव्हा काही खासनीस व गाव कुलकर्णी ह्मणून अर्थ आणावा तो न आणिला. रेणुसी याची व आमची कटकट लाऊन

दिल्ही. त्याउपरी रेणुशाचा व आमचा कजिया करारच मांडिला. मागती खंडोपंतास जाऊन पुसिले की, याचा आमचा कजिया लावावा ऐसा नाही. ते गोष्टी मान्य केली नाही. मग राजश्री दाजीपंत व राजश्री सुभेदार नसरापूरचे मुकामी होते, तेथे तीर्थरूप बावा व आपण गेलो. मग सर्व वर्तमान विदित केले. त्यावरून राजश्री दामाजी कासी व राजश्री रंगोपंत ऐसे त्याणीं खंडोपंतास सांगितले की तुह्मी खासनीस आहां, देशमुखाचे सर्वप्रकारे चालवावे. ऐसी आज्ञा केली. मग फिरोन आह्मी पुसिले की, आमची वाट काय? त्यासी त्याणीं सांगितले की खंडोपंतास हे देशमुख व तुह्मी खासनीस ऐसे आहा. यास हिरवे अगर भाजले खाणे. सर्व धंदा तुमचा आहे. त्यावरून कामथाच्या पैकीयाचा निकाल पुसिला की, हे रुपये कोण्ही घ्यावे? त्यासी त्याणीं सांगितले की रुपये तुह्मी घेणे. कामथ तुमचे पुरातन आहेत तैसेच तुमच आहेत. त्यावरून कामथाचे रुपये दोही गावीच्या आपण दिल्हे आणि खंडोपंतापासून हुजती आणि कामथाचे कागद घेतले. तेथे लिहिले की हुजूरच्या सनदा आणून देऊ सबब गाव इनाम. यास्तव तुमचे कामथ तुह्माकडे व पुरातनहि खात आला आहा. ऐसे आह्मास लिहून दिल्हे असतां, मागती सनदा न देता, रेणुसा यासी बीर दिल्हा. त्याजवरून कर्कशा जाहाला. त्याउपरी सदरहू फलकुटीयाचा कजिया व कामथाचा कजिया एकच जाहाला. तेव्हा गाव जमा करूं लागले. ते समई त्यासी आपले माणूस पाठऊन दिल्हे की जत्रेचे फळे तुह्मी न घेणे, आमचे आह्माकडे पाठविणे, ऐसे दोन चार वेळा पूर्वी सांगितले. परंतु ते गोष्टी तुह्मी नाइकली. तरी हाली जत्रा करिता हे देणे. त्यावरून त्याणीं टाकला जाब दिल्हा की आपण देत नाही. त्याजवरून आपण दोही दिल्ही. समाकुल पांढर होती. तेव्हा त्याणीं चित्तात बोली आणिली की, आमच्या फलियास दोही दिल्ही, तेव्हा जत्रेविणे गरज आह्मास काय आहे? ऐसी बोली बोलून बकरें मारिले होते, ते तैसेच कातडीयात फले देखील बांधोन देवलास टांगिले. निवेदास मांस थोडे राहिले ते तैसेच चुलीवरी राहिले. त्याउपरी देवलीहून उठोन गेले. मग गावकरी राहिले. त्यांतून जाखोजी घीघा व बहीरजी चेरे हे आह्माकडे आले. त्याणी सर्व वर्तमान सांगितले. त्यास आपण त्याना सांगितले की देवास निवेद घातला आहे तो देवास दाखवणे, आणि बाल गोपाळ आहेत त्यासी प्रसाद देणे. जत्रेस दोही दुहवी केली नाही. फळकुटियास दोही दिल्ही. त्यावर त्याणी देवदेव केला. मग ते मांस व फळकुटे तैसेच तीन दिवस राहिले. मग रामाजी आपाजी देशपांडे याजकडे माणूस पाठविले. ते येऊन आपले नजरेंने पाहिले. तेव्हा त्याणीं शब्द लावावयाचा तो लाविला. मग आह्मी येऊन बोलिले जे,

श्रीच्या देवळामध्यें घाण उठिली आहे, तिचा हुकूम काढावयाचा करणे. ऐसे बोलिले. त्यास ते दिवसीं तीर्थरूप बावास सीतजर हागवण प्राप्त जाली. तेधवा त्याणीं हे बोली घातली की, आह्मी काही जत्रेस दोही दुऱ्हाई दिल्ही नाही. तुह्मी बोली करिता हे अपूर्व वाटत आहे. त्याणें लबाडी करू नये आणि केली तरी हे वेळेस देवळातून घाण काढावी. देवळांत काही जावत नाही. मग फलकुटीयाच्या बोलीचा निकाल करून देऊ. ऐसे रामाजी आपाजी देशपांडे बोलिले. त्यावरून हुकूम केला. मग त्याणीं देवळास जाऊन ते मास व फलकुटे काढिले. मग बोली ती तैसीच राहिली. त्याउपरी बावांची वेथा बळावली. देव धर्म करिता काही ठिकाण लागले नाही. ऐसा सोध करिता पंचाक्षरी देवरुसी आणून, पर माहालेच्या तोंडें रेणुसीयाची लाग ऐसी खरी जाली. मग त्याच्या विद्यमानें श्रीमेंगाई व श्रीजुगाई याणींहि ईनत्या प्रसाद दिल्हे. तेव्हा चडउतार होऊ लागला. मग ऐसे करितां पौडखोराचा भगत जानाईचा आणून, माहालचे मेंगाई व जुगाईला थला करून बकरे देवळीं द्यावें ऐसे केले. ते देऊन बावास उतार पडिला. तेव्हा दुसरे जत्रे कारणे त्यास सांगितले कीं अजी जत्रा करिता, तरी फळकुटीयाची बोली विल्हास लावणे ह्मणोन सांगोन पाठविले. त्यांस ते बोलिले, हे जत्रेविणे खोळंबा आह्मास काय? वारंवार बोली होते ह्मणून बोलिले. त्याजवरून आपल्या चित्तांत आले कीं, मागती मास बांधोन ठेवितील आणि श्रीचा कोप होईल. ऐसे चित्तांत आले. त्याजवरून ते समई सांडी केली. मग तिसरे जत्रेचे वेळेस निकड करून सांगितले. त्यावर बावाचे वेथेस थोडा बहुत उतार होता. तो राजश्री खंडोपंत याजकडे हरनाक माहार जाऊन वर्तमान रेणुसा याविसीं सांगितले. त्याचा मजकूर आपल्या काही ठावका नव्हता. त्याउपरी आह्मी त्याच्या भेटीस गेलो. तो त्याणीं सर्व वर्तमान सांगितले. त्याजवरून आह्मास त्याणीं सांगितले की, हरनाक बोलऊन घेऊन ऐसा ते बोली कार्याची आहे. त्याजवरून हरनाक बीन राघनाक इबिन हकनाक माहार मौजे पाबे ता। कानदखोरे सु॥ इसन्ने अर्बैन मया अलफ कारणे साहेबाचे सेवेसी तकरीर लेहून दिल्हे ऐसीजे, आपला वडिल हकनाक, त्याचा लेक पाकेनाक, गावीचा कारभार करीत होता. त्यासी ते समई दिवाण मलकाची पातशाही होती. तेव्हा गावात पेठ होती. लिंगाईत कारभार चालवित होता. तेव्हा फळकुटे जत्रेचे व पारधीचे देशमुखास आणून देत होते. हाली रेणुसे पाटिलकी करितात. त्याचा वडिल भिकाजी गावीं होता. परंतु पाटीलकीचा डांग त्याजकडे चालत नव्हता. व पाबेकरहि गावीं होता. त्याजकडेहि पाटिलकीचा काइदा चालिला नाही. व रेणुसी याणीं पाटिलकी घेतली अगर देशमुखानीं दिल्ही हे

आपल्यास दाखल नाही. भिवजी रेणुसाहि गावांत होता. परंतु पाटिलकी दिल्हे-याचा कागदपत्र दिवाणचा अगर देशमुखाचा आपल्यास ठावका नाही. याखेरीज रेणुसा याचे मुळे कोण्ही पुरऊन दिल्हे तरी आपण वतनाखेरिज होईन ऐसी तकरीर लेहून दिल्ही. शके १६६३ दुर्मतीनाम संवछरे भाद्रपद सुध शष्टी तेरीख ५ माहे रजब ते दिवसीं लेहून दिल्हे. त्यासी तीन कागद करीन्याचे केले. एक कागद खंडोपंतीं आपल्याजवळ ठेविला. एक कागद देशपांडे याणीं ठेविला. एक कागद आह्माजवळ दिल्हा. त्याउपर भिकाजी रेणुसा यास वर्तमान करिन्याबाब सांगितले. त्याजवरी बापास चड बहुतच जाला. काही केल्या उतार नाही. मग सीतजर हगवणची वेथा कठीण जाली. तेणेकरून भाद्रपद वद्य चतुर्दसीस शके १६६३ मधी देवआज्ञा जाली. मग आपल्यास धास्त निर्माण जाली. तेणेकरून मौजे पाबे येथून जावयासि सिधांत केला. तो घरामधे वेथा पोटदुखीयाची निर्माण जाली. देवधर्म करिता काही ठिकाण लागले नाही. मग दुखणाईत घेऊन धानेबास नांदावयास गेलो. तेथे राजश्री सुभेदार प्रांत मावळे हे मुलुकाचे खंडणी करावयासी आले. ते समई तर्फ मजकूरचे खोत पाटील व किलाचे लोक सरदार होते. तेव्हा त्याणी दुखणियाची अवस्था पाहिली व ऐकिली. राजश्री सुभेदार याणीं आज्ञा केली की, देशमुखाच्या घरामधें वेथा कठिण जाली आहे; तरी तुह्मी माहालकरी व किल्याचे लोक सरदार ऐसे दे श द दे व श्री ग वे स मे ल कुबलजाईस जाऊन बलकटी करणे. ऐसी आज्ञा केली. त्याजवरून श्रीस जाऊन समस्त लोक व राजश्री खंडोपंत व देशपांडे व माहालचे खोत पाटील ऐसे जाऊन देवाच्या नव्या मूर्ति आणिल्या होत्या, त्याची स्वस्थापना ब्राह्मण जोसी ऐसे नेऊन पुजा केली. तेसमई देवास पुसिले. श्रीनें सांगितले की, हे गोष्टी वेथेची काय सांगावी? त्यास सांगितल्याने खरे वाटत नाही. तेव्हा कुल साऱ्यानीं अर्ज केला, गुणास आले तरी आणावा नाहीतरी वाट दाखवावी. याची वेथेमुळे खराबी बहुत जाली. तेसमई श्रीनें सांगितले की रेणुसा याची समजावीस जालियावाचून वेथेस उतार पडत नाही. तेव्हा भिकाजी रेणुसा व महादजी रेणुसा व बावाजी रेणुसा हे ह्मणू लागले की, आह्मी आपल्या पोटापाणियाची बोली करितो; त्यासि देवानीं अघटित सांगितले. हा भोग दुसरा आमचे पाठीं लागला. ऐसे बोलिले. मग आह्मी त्यासी बोलिलो की, तुमचा पदर काही धरिला नाही, अगर गुणास आला नाही. तुह्मी श्रमी व्हावे ऐसे नाही. तुह्मास आह्मासी जीत झगड भांडण करावयाचे ते करणे. मग तेथून येऊन आपल्या वडिलाच्या वेळेचा वाडा बांधावयासि मुहूर्त केला. त्यासी भिंती चहू बाजूच्या पर परूस घातल्या. जो जो

घालितो तो पडत, ऐसा विचार जाह्ला. याउपरी आपण मौजे अत्रोली येथे श्रीची चोदास जाऊन पाटील बसऊन देवास विचारिले. तेथे देवानें सांगितले की ही लाग रेणुसा याची आहे. तो सिवाजी गंगाधर खासनीस व संभाजी पाटील निह्मणे मौजे विझर त्यांसी हे वर्तमान सांगितले. तैसेच सिवाजी गंगाधर व संभाजी पाटील व विठोजी पाटील राऊत मौजे अत्रोली वगैरे लोक ऐसे घेऊन श्रीसिकाई मौजे सिरकोली येथे जाऊन, सिवाजी पा॥ पडवले व समाकुल पांढर यांच्या विद्यमाने श्रीस प्रसाद लाविले. तेथे सांगितले, हे लिगाड रेणुसा याचे आहे. तेथून मौजे तावे तेथें जाऊन राजश्री गोरखराव पासलकर देशमुख व समाकुल पांढर ऐसे नेऊन श्रीस विचारिले. तेथेहि रेणुसा याचे लिगाड ऐसे खरें करून सांगितले. मग निघोन घरास आलो. त्याजउपरी बरोबर जे पाटील होते ते व आपण खंडोपंतास विदित केले. त्यास एक दोन दिवस जाले. तेव्हा वेथेस उतार न पडे. ह्मणून खंडोपंतास सांगितले की, रेणुसियास आणून जे सांगावयाचे ते सांगणे. तेव्हां ते बोलिलेः—आपण काय सांगावे ? तुह्मी रेणुसियाची समजावीस करणे. त्यावरून आपल्या मनांत विकल्प आला की, आपले वाईट हेच करितात. तेव्हा त्यासी जाब दिल्हा जे, आज तुमचे हाते दिवाणसत्ता आहे, आणि किल्याचे वतीं माहालचे तुमचे हाती पारपत्य होत आहे; आणि आह्मी तुमचे ऐसे असता मन न घालिता ! तेव्हा विस्वर बरे आमचे करितो, तेथें तुमचा उपाय काय आहे ? त्यावरून आह्मास बोलिले, राजश्री पंताकडे अगर सुभेदाराकडे विदित करणे. मग करिना मनास आणून तुह्मा (स) व रेणुसियास ऐसी थले नेमून व मसीदीचे राजणगाव अगर हरेस्वर ऐसे देतील. तुह्माबराबर कारकून व हुजरे देऊन थल करवितील. ऐसी बोली धानेबच्या घरामागें वृंदावनाजवळ जाली. ऐसा जाब त्यानीं पस्ट दिल्हा. त्याउपरी काय त्याच्या चित्तांत आले. तेव्हां आह्मास सांगितले की, त्यास माणूस पाठऊन भिकाजी रेणुसा यास घेऊन येणे. ऐसे बोलिले. त्यासी आपण बोलिलो, तो आमच्या येत नाही, तुह्मीच त्यास घेऊन येणे. त्यावरून दादजी मल्हार, भिकाजीस आणावयास पाठविला. मग त्याजवळ भिकाजी बोलिला की तेथं मी येत नाही. त्याणीं निघोन यावे. मग आह्मी निघोन हुजूर जाऊ. तेव्हा दादजी मल्हार फिरोन आला. मग खंडोपंतीं दादजी मल्हार व संकराजी ढमाल दि॥ राजश्री पंतसचिव ऐसे घेऊन येणे ह्मणून सांगितले. त्यासी त्यावरून निघोन कोढवले बु॥ येथे आले. तों बावाजी रेणुसा सुताराचे सालेस गेला होता. तो तिकडून येत होता. मग तेथे भेट जालियावरी हरपोडीच्या व पाबेच्या सिवेपावेतो आले. तेथून पळो लागला. तेव्हा

संकराजी ढमाल याणे मार्गावर धरून बांधून खंडोपंताकडे हजराहजीर पाठविला. मग हे भिकाजीस आणायासी गेले. तो भिकाजी भेटला नाही. पळोन गेला. त्याजवरी बावजीस खंडोपंतीं निरोप दिल्हा. बोली राहिली. त्याउपरी खासी आह्मास वेथा जाली. हिंवें आली. हुक भरली. काही उपाय चालेना. वाडा बांधीत होतो तेथून उचलोन घरास आणले. तेव्हा दोन च्यार दिवस जाले. मग आह्मास बोध करणारानीं केला की घर बुडवावे ऐसे नाही. त्यावरून त्यास आणून खंडोपंतीं दो बिघीयाचा कागद लेहून दिल्हा. त्यावरी सिका केला. तो बाजेवरी दोघानीं धरून बैसविलें. पाठीस कान्होजी वेणुपराव हंसाजी मरळ याणी नीट बैसऊन सिकीयास शाही लाऊन देशपांडे याणीं हातीं दिल्हा. तेव्हा सिका बाजल्यावर करून दिल्हा. त्यास साक्ष राजश्री खंडोपंत खासनीस व रामाजी आपाजी व निळो आपाजी व भानजी बाजी देशपांडे व राघोजी राऊत प॥ प्रतापराव देशमुख सिलीबकर त॥ गुंजण मावळ यांच्या मोझ्या सिका करून दिल्हा असे. दोन बिघे सेत दिल्हे व त्याचा कतबा घेतला की, आपला आजा बालोजी याउपरी लागला तरी जाब करून देऊ. याउपरी आपली व आपल्या घरांतील वेथा बरी जाली. कोण्हा देवाधर्मास काही दिल्हे नाही. तेणेकरून वडिलांचा वाडा व खर्चवेच तो कामथाविसें रुपये दिल्हे ते उगवले नाही, अगर आह्मीहि घेतले नाही. यामुळे तीर्थरूप मृत पावले. समागम मातुश्रीनें सहगमन केले आणि दोन बिघे सेतहि गेले. येणे प्रमाणे हा करीना असे. आपल्यापासीं त्याची तकरीर हरनाक याणे लेहून दिल्ही होती. त्याची होय नव्ह न करितां, खंडोपंतीं रामजी आपाजी देशपांडे हे पाठऊन घेऊन गेले. मग काही वेथा जाली नाही. त्यावरी दतोजी रेणुसा भिकाजीचा भाऊ सातारीयास जाऊन देवडीकडे लाग करून, सेरी अमानत करविली. सेरकर सेरी मोजावयासी निघाले. तेव्हा कोणी दिवाणचे कारकून नाहीत ह्मणून त्यास ते दिवसीं राहिले. मग तेच पहाटेस भिकाजी रेणुसा याणें फास लाऊन जीव दिल्हा. मग मोजणी राहिली. त्याउपरी माल जो जो फस्त केला होता त्याचे रुपये जाखा करून वारिले. सेरीच्या माथा रुपये ५० पनास दर वरसास ऊस लाऊन द्यावे ऐसा तह केला. त्यासी पाटील सेरी दाखवीत नाहीत. तुफानास येऊन आह्मासी कजिया करीत आहेत. दताजी रेणुसा यानें अदाव घालून आह्माजवळ चाकरीस राहिला. मग सेरीचे लचांड पडेल ह्मणून पळोन गेला. पुढे कितेक गोष्टी आहेत.

बी॥ बापुजी भास्कर देशपांडे त॥ कानदखोरे."

---

## लेखांक ५.

**श्री.** १५३८ मार्गशीर्ष शुद्ध १३

माहाल किले पुरंधरू बिहुजूर

म॥ ह॥ राजश्री माहादाजी जाधवराऊ ना॥ किले मजकूर

भानजी बानखस मु॥ राजश्री नरसिंगराऊ

आपाजी फर्जंद मल्हारजी देसमुख पा॥ सिरवल

यसवंतराउ आठगाठे खोत ता॥ सिवतर खोरे

कान्होजी जेधे देसमुख ता॥ भोर तपे रोहिडा

यमाजी मोकदम मौजे दूर पा॥ पुणा

बाबासेटी सेटिया पेठ मूर्तजाबाद ना॥ किले मजकूर

म॥ ह॥ हणवंतराउ हरकारे मु॥ किले मजकूर

तमाजी अनंत मु॥ कलबी बहीरदेउ

तुलजी व जाखोजी देसमुख पा॥ खेडेबोर

बाजी हैबतीराउ देसमुख ता॥ गुंजण मावळ पा॥ मुरऱ्हादेऊ

नरसोजी खोपडा देसमुख तरफ उतराले ता॥ रोहिडा

आबोजी बांदल मोकदम मौजे आल्हे ता॥ हिरडस मावल

कडतसेटी बांधा माहाजन पेठ मूर्तजाबाद ना॥ किले मजकूर

हजीर मजलसी हुजरू द॥ बे ॥

कालोजी चोरघा मोकदम मौजे कालवली

पाकोजी सेडकर मोकदम मौजे दापोडी

हरबोजी देवगीरकर चौगला मौजे विझर

लुखो निर्लीभट मोकदम मौजे विझरे

लखजी सेडकर मोकदम कालोली

जमाजी बिन सेखजीभाई दूसमान मु॥ कान्होजी झुंझारराउ देशमुख

समस्त देसक तर्फ कानदखोरे सु॥ सबा असर अलफ कारणे महजर लिहून दिल्हे ऐसा जेः—बाजी नाईक मरळ देसमुख ता॥ मजकूर यास पेसजी सालाबाद ता॥ मजकुरीं देसमुखीचा हक लाजिमा ता॥ कारकीर्दी बाबाजी झुंझारराऊ देसमुख खात होते. त्यावरी कुसूर करून किलेमजकुरास बाजी मरळ आला. यावरी रोज दरोज करकशा करीत होता. त्यावरी आह्मी समस्त खोत पाटील व देसक मिळोन

राजश्री कान्होजी नाईक देसमुख सदरहू मणउनुं त्यावरी देसमुखीबदल कागद बाजी नाईक व सुऱ्याजी नाईक मरळास देउनुं आह्मास किले मजकुरीं पाठविले. त्यावरी हजीरमजालसीं हुजूर पेसजीपासून बाजी वा सुर्याजीचे वा आमचे बलम नाही. हे पाउनुं हजीरमजालसी हुजर बाजी नाइकासी हकलाजिमाची पैवस्ती करून लिहून दिधले असे. लेकराचे लेकरी बाजी नाइकीं खाऊन सुखे असावे. येविसी आह्मामधें हरकोण्ही खोत पाटील फितवा फदडा करू, तरी दिवाणीचे गुन्हेगार, गोताचे अन्याई हो. आपुले लिहिले सही.

मौजे दापोडे

| गला खंडी | नख्त |
|---|---|
| १ गाव खडी | ८० गला खंडी १६ दर खंडीस ५ ए॥ टके |
| १ ३।१ कणसरा | १० कणसरा नख्त टके |
| ॥ खरीद खंडी मण | २॥ दसरा बकर नख्त टके |
| ॥३।१ | ९२॥ |
| उडिद कोहली माहाल तकसीम बाा साकार तेरीख ११ जिल्हेजु | माहाल तूप मोचे जाली |

## लेखांक ६.

१५३९ कार्तिक वद्य ८.

"ᗊ ई कौलुनामे अज दिवाण मामले समत तळकोकण हवाले बाजी याकूद इस्तबेली हवालदार त॥ कान्होजी जुंझारराऊ अधिकारी तपे कानदखोरे मामले राईर सु॥ समान असर अलफ बादे कौलुनामा ऐसा जेः—तुमचे बाबें रवळोजी मरळ एउनु मालूम केले जे, कान्होजी मजकुरु हुजुरु एउनु आपला मखसूद मालूम करील, ए बाबे तकवेसीचा कौलु मऱ्हामती होए. मालूम जाहाले. बराय मालूमाती खातिरेस आणुनु कौलुनामा सादर केला असे. तू बेसक हौनु देएइजे. तू आपला मकसूद असैल तो मालूम करुनु तुमची दौलतखाई व सरफराजी होईल. कोण्हे बाबे सक मुलाहिजा न धरिजे. पेसजी कारकीर्द एदिलसाही जो गुन्हा केला असेल तो माफ असे. कोण्हे बाबे तालूक आंदेसा न कीजे"

फारसी तेरीख २१ जिलकादी.

## लेखांक ७.

त॥ १५४० आषाढ वद्य ९

"ई कौलनामे अज रख्तखाने राजश्री पतंगराऊ दामदौलतहू त॥ कान्होजी जुंझारराऊ देसमुख तपे कानदखोरे मामले राईर बिदानद सु॥ तिसा असर अलफ बाबे कौलनामा ऐसा जेः—तुवा एउनु हुजूर मालूम केले जे, त॥ म॥ साल गु॥ सन समानामध्ये साहेबांस मुकासा अर्जानी जाल्यावरी सेरीकर साहेबांचे बंदगीस एत होतों. तों माहाली उगवणीचा व लावगणाचा हंगाम हे दोन्ही कामें जाली पाहिजेती, याबदल त॥ म॥चे कारकूनीं सेरीकरास माहालीं राहाविले. सदरहू लोकांची सरंजामी करून साहेबांचे बंदगीस आलों. त॥ मजकुरीचा हालहवाल सांगितला. यावरी साहेबीं सेरीकरास पुसिले कीं, तुझे इनामतीचा व हकलाजिमा यांचा कैसा अमल आहे ? तरी आपणास त॥ मजकुरी इसाहती व विस्वा व हकलाजिमा एणेप्रमाणे आहे बित्त॥

| इसापती देह २ | | सेते किते २ | |
|---|---|---|---|
| मौजे पाबे | मौजे धानेबू | सेत मौजे | सेत मौजे |
| १ | १ | अत्रोळी | विंझर |
| | | उंबरेपेढे | मोरटाके |
| | | १ | १ |

विस्वा मार्गी लाजिमा

एणेप्रमाणे सालबाद पिढी दर पिढी चालिले आहे. साहेबांचे कारकून सदरहू बाबें भोगवटेयाचे कागद दाखवा ह्मणताहेत. तरी हजरती साहेबाचे फर्मान बहसिके खास व वजिरांचीं खुर्दखतें होतीं. यावरी खान हैबतखान आदिलशाही तेहीं ते तरफ कबज केली. त॥ म॥ काहीजाती एता आधीं घाला घालून त॥ म॥ लुटून नागऊन तलाफ केले. ते वख्तीं भोगवटेयाचे कागद फर्मान व खुर्दखतें तमाम गेलीं. यावरी त्यांची काहीजाती बैसली. मग सेरीकरास व रयतीस कौल देउनु वसाहती करू लागले. यावरी तपे म॥ आपल्या लोकांस मुकासा गाव वाटून दिधले. आपले इसापती व हकलाजिमे सदरहू पहिलेप्रमाणें चालऊ लागले. तेणेप्रमाणें आपण खातच होतो. त्यावरी साल गु॥ ते तरफ हजरती साहेबांस मुकासा अर्जानी जाला. हजरत साहेबीं अवघीं खोरीं मावळे आगा बाजी याकूद इस्तबेल हवालदार समत तलकोकण याचे हवाला केली. तिही तमाम खोराचे देसमुखास तलबा करून चेउलास नेले. त्याबराबरी सेरीकरासहि नेले. त॥ म॥ हालहवाल मनास आणून सीसाला कौल दिधला. सेरीकराचे इसाहतीचे व

हकलाजिमे यांचे बाबे हमश्याही खोराचे देसमुखाचे मुकाबले पाहिले. त्याच्याहि इसाहती व हकलाजिमे मालूम जाले. व सेरीकराची तसरुफाती मालूम जाली. यावरून सदरहूप्रमाणे व आपले खुर्द खत लेहोनु दिधले. यावरी सवेंच साहेबांची काहजाती आली. साहेबांचे कारकुनीं रजा फर्माविलीकीं राऊसाहेबांचे खुर्द खत आणून मग तुमचे दुमाला करून. तरी सेरीकर साहेबांचा नफर आहे. साहेबीं आपणास अन्नवस्त्र देउनु, सेरीकरपणाची चाकरी कीर्दमामुरी घेतली पाहिजे. सेरीकरावरी नजर ऐनायत करून, कारकुनासि खुर्द खत व सेरीकरास कौल मऱ्हामत केला पाहिजे. ए तरफेस इनामती ह्मणौनु ह्मणतात. आपले देसाकडे इनामती व इसाहती ह्मणौनु ह्मणताती. सदरहू प्रमाणे अमल असे. बराय मालूमाती खातिरेस आणून, सदरहू पैकी इसाहती देह २ व सेते २ व विस्वा तुझा हकलाजिमा तुझे दुमालां केला असे. ए बाबें ता॥ मा॥ चे कारकुनास खुर्दखत सादर केले असे. सदरहू इसाहती व हकलाजिमा खाउनु लाठी बल घेउनु तपा तमाम मामूर करणे. सदरहू प्रमाणे तुज कौल असे."

तेरीख २२ रजब

---

## लेखांक ८.

१५४० आश्विन शुद्ध ७

"अज रख्तखाने राजश्री पतंगराऊ राजे दामदौलतहू बजानेबू कृष्णाजी गोविंद हवालदार व कारकून तपे कानदखोरें बिदानद सु॥ तिसा अशर अलफ कान्होजी जुंझारराऊ देसमुख ता॥ मा॥ अर्दास पाठविली. तेथें लिहिलें कीं आपले इनामतीचे गांव दोनी व सेतें दोनी याबदल सीरणी टके सतरासें साहेबांस कबूल जालों आहे, त्याची उगवणी करितों. व सालमजकुरीं तपेचे इजारतीची बेरीज आहे त्याचीहि उगवणी करितों. आणि कारकून आपले इनामतीचे गांव व गांवगना हकलाजिमा आहे तो तमाम कमावीस करून घेताती. बंदे कमीनास कांहीं देत नाहीत. तरी आपण काय खावें? आपला रोजगार कैसा चालेली? आपणास खावया नाही. कारकून तमाम विलायती अमानत कमावीस करून घेताती. आपण रयतीचे कौलाबोलाचे कीर्दी व हरएक बाबें अर्ज करितों, तो मनास आणीत नाहीत. आपली अर्दास आइकत नाही. याचे विसीं आपण ह्मणतों त्यास अदीकच ताकीद करिताती. आपली कांही हुरमती राखत नाहीत. सालाची उगवती आठा महिनियामध्यें करा ह्मणौनु कुणबियासि ह्मणताती. ऐसा आपला हाल आहे. ह्मणौनु रंजीस होउनु बहुत तपसीलें लिहिलें. तरी कान्होजी जुंझारराऊ देसमुख ता॥ मा॥

एणें इनामतीबदल सीरणी टके सतरासें कबूल केली आहे. त्याचे उगवणीची बेगमी देखौनु याच्या इनामती याच्या दुमाला करणे; व सालमजकुरीं तपेमजकूर इजारती रकमेस इस्तावा आहे तेणेप्रमाणे उगवणीची बेगमी जालेयावरी गावगनाचा हकलाजिमा देसमुखाचे दुमालां करणें; व याची इजती हुरमती राखत जाणे. रयतीचे बाबे व हरएक बाब अर्ज करीत जाईल तो खातिरेस आणून माकुल हाल सरंजाम करीत जाणें. गैरमाकुल न करणे. यास व रयतीस लायनी सीवीगाली व हाणमार न करणे व तशवीस नेदणे. माकुल अमल असेली त्यास एक जरेयाची तऱ्हे नेदणे. गैरमाकुल वर्तत असेली बिलाहरकती करीत असेली व गुन्हेगार असेली, त्यास पाहिजे तैसी ताकीद करणे. रयतीस लायनी एक जरा तशवीस नेदणे. गैरमाकुल अमल हरगीस होव नेदणे. माकुलहाल अमल करीत जाणें. अवघे रकमेची उगवणी आठा महिनेयामध्यें करा ह्मणौनु ह्मणता, तरी हंगामीचे हंगामीं उगवणी करणें. व देसमुखमजकुरें अर्दास लिहिले कीं, कारकून सालगुदस्ताचे कागद पुसताती, तरी सालगुदस्तांचा इस्तावा बेरीज टके ९०००. आणि उगवणी बेरीज महसुल टके ९६६० ८१०॥ ऐसी उगवणी जाली. तरी सालगुदस्ता नव हजार टके जमे आहेती. टके ६६० ८१०॥ जमा नाहीत. हा कैसा अमल आहे ते बखैर हुजूर लिहिणे."

तेरीख ५ सौवालु माहे सौवालु

---

## लेखांक ९.

१५४२ श्रावण शुद्ध ९

"छ विठल गणपती हवाले त॥ कानदखोरे मालूम दानद सु॥ इहिदे असरीन अलफ. त॥ मजकुरीचा देशमुख हुजूर एउनु मालूम केले जें, साहेबीं नजर अनायत करुनु आपला हकलाजिमा व इसाफती सालाबादप्रमाणे देविले पाहिजे ह्मणौनु. तरी त॥ मजकुरीच्या देसमुखाचा हकलाजिमा व इसाफति दुंमाला केले असे. ब॥ सालाबाद प्रमाणे देविजे."

तेरीख ७ माहे रमजान.

---

## लेखांक १०.

१५४५ आश्विन वद्य ११

"छ अज जानीब म॥ अंबर त॥ सिदी अंबर अबदुल वाहद हवालदार व साबाजी नारायण सबनिवीस किले कोंढाणा मालूम दानद सु॥ अर्बा इशरैन अलफ.

अर्जदास्त छ ११ जिलकादीं र॥ छ २ जिल्हेज मजमून कान्होजी जुंझारराऊ देसमुख त॥ कानदखोरे मु॥ वजारतमाब पतंगराऊ राजे तो नफर साहेबाचा आहे. त्याचा हकलाजिमा राऊ अजमाचे कारकून तहसील करुन नेताती ह्मणौनु बयानवार लिहिले. तरी ए बाबें हुजरून राऊ मस्यारुनइलेचे हेजिबास फर्माविले असे. मोर्तब सुद.

तेरीख २४　　रुजू सुरु
जिल्हेजू　　निवीस
　　बार सुद　　सुरु सुद

पे॥ छ १३ माहे सफर पाठविली * * * तिमाजी रायदेऊ नायकवाडी किले मजकूर."

---

## लेखांक ११.

१५४६ ज्येष्ट शुद्ध १

"अज दिवाण ठाणें मामले राएर व बारा मावळें हवाले खान इभराईम खान हवालदार व कारकून मामले मजकूर त॥ कान्होजी जुंझारराऊ देसमुख तपे कानदखोरे मामले मजकूर सु॥ अर्बा इसरीन अलफ. हुजरु मालूम केले जे, साहेबास ह॥ साहेबीं हवाला देऊन पाठविले; साहेब सलामत माहालास पैवस्ता जाले; साहेबीं आपणियासी मसलती बदल लोक फर्माविले; तरी आपली इसाहती व इनामती हकलाजिमा विस्वा सालाबाद आपले दुमाला आहे. हाल सालीं तो तरी साहेबास माहाल अर्जानी जाला आहे. तरी साहेबांचे खुर्द खत होए. मालूम जाले. तरी तू हिकविहाल होउनु असणे. तुमची इनामती व इसाहती व विस्वा तुमचे दुमाला केला असे. सालाबाद जैसे चालिले असे, तेणेप्रमाणे इनामती व इसाहती व विस्वा हकलाजिमा दुमाला केला असे. मोर्तब सुद."

तेरी २९　　माहे रजबू
रजबू

---

## लेखांक १२.

त॥　　१५४७ माघ वद्य ४

"अज रख्तखाने खुदायवंद मलिक शर्के मलिक मलिक अंबर खूलिदयामदौलतहू बजानेब कारकुनानि मामले राईर व बारा मावळे बिदानद सु॥ सीत इशरैन अलफ.

हेजीब जुंझार मरळ देसमुख ता॥ कानदखोरे मामले म॥ हुजूर मालूम केले जे, देशमुख मजकुरास इसाहती देह २ मौजे पाबे देह १ व मौजे धानेब देह १ व सेते २ इनामती ता॥ सेत मौजे अत्रोळी उंबरपेढे १ सेते मौजे विंझर मोरटाके १ व विस्वा व हकलाजिमा सालाबाद कारकीर्द दरकारकीर्द भोगवटा चालतो. बा॥ खु॥ खाने अजम हैबतखान व वजिरानी भोगवटा चालतो. हाली देसमुख म॥ म॥ साबाजीपंताबराबरी जमते लोक से ३०० तीन चाकरी करितो. देसमुखमजकुराचा बाप कान्होजी जुंझारराऊ मसलतीमध्ये खर्चला. तरी साहेबों नजर एनायती फर्माउनु ताजे खुर्द खत होए. मालूम जालें. तरी देसमुख म॥ इसाहती देह २ मौजें पाबे देह १ व मौजे धानेब देह १ व इनामती सेते २ मौजे अत्रोळी सेत उंबरपेढे १ व मौजे विंझर सेत मोरटाकें १ व विस्वा व हकलाजिमा सालाबाद कारकीर्दीं दर कारकीर्द भोगवटा चालतो. बा॥ खु॥ खाने अजम हैबतखान व वजिरानि भोगवटा चालतो. हाली देसमुखमजकुराचा वालीद मसलतीस खर्चला आहे ह्मणौनु इसाहती व इनामती व विस्वा व हकलाजिमा बा॥ भोगवटा तसरुफाती चालेले असेल तेणेप्रमाणें चालविणें. तालीक घेउनु असल फिराउनु दिजे."

तेरीख १७ माहे
जमादिलावेल

---

## लेखांक १३.

ता॥ १४४९ पौष शुद्ध १०

"अज रख्तखाने खुदायवंद सिदी अजम सिदी याकूद खूलीदयाम दौलतहू बजानेबु कारकुनानि हाल व हस्तकबाल देसमुखानि ता॥ कानदखोरे बिदानद सु॥ समान इशरीन अलफ. बाबाजी जुंझारराऊ देसमुख ता॥ म॥ हुजूर एउनु मालूम केले जे, आपणास तप म॥ इसाहती व विस्वा व हकलाजिमा एणेप्रमाणे आहे बित॥

| | | |
|---|---|---|
| देह १ ता॥ | सेते २ ता॥ | विस्वा व हकलाजिमा |
| १ मौजे पाबे | १ मौजे अत्रौळी उंबरपेढे | |
| १ धानेब | १ मौजे विंझर सेत मोरटाके | |
| २ | २ | |

एणे प्र॥ चालिले आहे. त॥ म॥ साहेबास मुकासा अर्जानी जाला. माहाली कारकून ताजे खुर्द खताचा उजूर करिताति इ. इ. इ."

तेरीख छ ८ जमादिलोवल.

---

## लेखांक १४.

त॥ १५५० श्रावण वद्य ३०

"अज रख्तखाने खुदायवंद खाने अजम खुदावंदखान खूलीदयामदौलतहू बजानेबु कारकुनानि त॥ कानंदखोरे बिदानद सु॥ तिसा इशरैन अलफ देशमुख त॥ म॥ यास पावे व धानेबु इ. इ. इ."

तेरीख २८ जिल्हेजु

---

## लेखांक १५.

१५५१ कार्तिक शुद्ध १४

"अज रख्तखाने खुदायवंद ख॥ खुदावदखान खूलीदयामदौलतहू बजानेबू बाबाजी जुंझारराऊ देसमुख त॥ कानदखोरे बिदानद सु॥ सलासैन अलफ अर्दास छ ३ र॥ छ ८ रबिलोवल लिहिले की, किलेकरी त॥ मजकुरास तोसीस लाविली आहे, गाऊ मारिताती व मौजे सणवडीची गुरे वळुनु नेली आहेती ह्मणौनु लिहिलें, तरी बअमल दिवाणचे बंदगीस मालूम करुनु फर्मान लिहविला. सिके विले लाविला आहे; तोवरी सिदी अंबर अबदूर साहेब हवालदार किल कोंढाणा त्यास किताबती पाठविली आहे जे, त्यास घेउनु सरंजाम करुनु घेणे. तोवरी फर्मानास सिका होउनु फर्मानहि पाठवितो तुवा मर्दाना होउनु दिवाणकाम चालवणे. काही शक न धरणे. अवघी सरंजामी करुनु फर्मान पाठवितो. मोर्तब सुद रुजू सुरुनिवीस तेरीख १२ माहे रबिलोवल."

---

## लेखांक १६.

१५५२ मार्गशीर्ष वद्य ५

"अज रख्तखाने खुदायवंद ख॥ खुदावदखान खूलीदयामदौलतहू बजानेबु बाबाजी जुंझारराऊ देसमुख त॥ कानदखोरे बिदानद सु॥ सलासैन अलफ अर्दास छ ११ जमादिलोवल र॥ छ १२ ज॥ लिहिले कीं, साहेबीं तकवेतीचे खुर्दखत सादर केले ते सिरीं धरिले, सरफराज जालो, तेथे रजा फर्माविली कीं, त॥ म॥चे तसविसीबदल सिदी अजमास किताबती पाठविली आहे? त्यावरुनु

पडलें आहे. उभयतां सरदारांकडील फौज जे खराब केली, येविसींचें तपशीलवार वर्तमान राजश्री आनंदराव विनायक व केसो कृष्ण यांनीं निवेदन केलेंच आहे. विस्तारें लिहावें असें नाहीं. हुजूर सरंजाम्याचे पैक्याकरितां येथें आले आहेत. त्यांनीं निकड केली आहे, ती पत्रीं लिहितां पुरवत नाहीं. उपहासास कारण आहे. याजकरितां कृपा करून हुजूर यांस मनाईपत्र पाठविलें पाहिजे. आमचें लक्ष आपल्याशिवाय............ ...... सासवडास आलों आणि आपलें भाषण भोजनोत्तर जाहलें, त्याशिवाय दुसरें लक्ष नाहीं. सरकारचाकरीस अंतर पडणार नाहीं. येविसीं आपली खातरजमा आहेच. वरकड आमचें वर्तमान रा. आनंदराव विनंति करीतच आहे. त्यावरून समजून आज्ञा करणें ती करावी. त्याप्रमाणें वर्तणूक करूं. विशेष काय लिहिणें. कृपालोभ कीजे हे विनंति."

※ ※ ※

## ११. लॉर्ड कार्नवॉलीस यांचे आगमनाची खबर.

नाना फडणविसांचे बातमीदार हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं पसरलेले असून ते पुण्यास बित्तंबातम्या पाठवीत असत. वॉरन हेस्टिंग्ज विलायतेस गेल्यानंतर त्यांचे जागीं लॉर्ड कार्नवालीस हे हिंदुस्थानचे गव्हर्नरजनरल होऊन इ. स. १७८६ मध्यें आले. त्या वेळीं नानांच्या बातमीदारानें पुढील पत्र लिहिलें आहे. त्यामध्यें लॉर्ड कॉर्नवालीस ह्यांचा किताब दिला आहे. तो कोठें इंग्रजी ग्रंथांत प्रसिद्ध नाहीं. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. लखनऊचें व कलकत्त्याकडील वर्तमान तरी, इष्टिनाचे बदली इंग्रेज आला आहे. त्याचा किताब "मशीरखास सुलतान इंग्लिस्तान जुबदे जोइनाज अजिमशा गवरनरजनरल चार्लिस अरल कार्नवालिस सिपेसालार आफवाज पातशाही व कंपनी मुतालके किशवर हिंद फिंदवी शाहाअलम पातशाहा गाजी." याप्रमाणें त्या साहेबास किताब आहे. परंतु नांव त्याचें लाट कलफदानश सितैन साहेब म्हणून आहे. यानीं पातशाहास जडाऊ जीन एक व चिनीचीं भांडीं भोजनाचीं व कांहीं विलायती कापड व विलायती पेट्या व गंज व घड्याळ वगैरे जिन्नस; व राजश्री पाटिलबावांस एक हत्ती व मोत्याची कंठी, जेगा, सिरपेंच, सात पारच्यांचें वस्त्रें, व इंग्रेजी जिन्नस डब्या, संदूक दोन, घड्याळ आदिकरून गंज वगैरे; येणेंप्रमाणें यांस पाठविलें आहे. पुढें राजश्री सदाशिव मल्हार सेणवई राजश्री पाटिलबावांकडून इंग्रेजांचे बकालतीस आहेत, त्यांस, साहेबमजकूर लखनऊस येणार, ते आलियावर यांस त्यांजकडे पाठविणार आहेत. सदाशिव मल्हार यांजकडील कारकून एक लखनऊस व एक कलकत्त्यास बातनीचे कामावर आहेत. त्यांचीं पत्रें वरचेवर लष्करांत येत असतात.

इंग्रेजाकडून कीर्कपातरीक साहेब इंग्रेज राजश्री पाटिलबावांपासीं वकालतीस होता. त्याचे शरीरीं समाधान नव्हतें, म्हणून तो यांची आज्ञा घेऊन आगऱ्यास गेला. त्यास त्याची बदली जाली म्हणोन पत्रें आलीं. याजवर तो लखनऊस गेला आहे. पाहावें, तोंच मागतें वकालतीस येतो, किंवा आणीक इंग्रेज येतो. हें ठरल्यावर विनंति लिहूं. आतां एक मोलवी ह्मणोन हिंदुस्थानी मुसलमान मात्र वकालतीस इंग्रेजांकडून राजश्री पाटिलबावांपासीं आहे. इंग्रेज कोणी नाहीं. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.''

* * *

## १२. शहाअलम बादशाहाची तैनात.

शहाअलम बादशाहा इंग्रजाच्या ताब्यामध्यें प्रयाग उर्फ अलहाबाद येथें कांहीं दिवस होता. त्यास इंग्रजाकडून नजर नजराणा व सव्वीस लक्ष रुपये नक्त नेमणूक दरसाल मिळत असे, असें बादशाही दप्तरच्या एका टिपणावरून दिसून येतें. ह्या टिपणामध्यें दुसरीही वसूलाची माहिती फार महत्त्वाची आहे. हें टिपण येणेंप्रमाणेंः—

श्री.

(पारसीची हिंदवी.)

"पातशाही दप्तरची कैफियत कीं, जे समयीं पातशाहा प्रयागास होते, तेव्हां इंग्रेज नजर तोहफेजात शिवाय सव्वीस लक्ष रुपये दरसाल हजुरांत देत होते. प्रयाग व कडाकुरा सुजाउद्दौला याजकडून सोडवून सरकारांत दिल्हे होते. व तेथून तेहतीस लक्ष रुपये खजीन्यांत पोंहचत होते. हजुरांतून बरद्वान व इसलामनगर येथील फौजदारी व अमिनी व बंगाला व अजीमाबाद येथील दिवाणी इंग्रेजास इनायत जाली. दुसऱ्या कोणा सुभ्याची अगर स्थलाची सनद दफ्तरांतून तयार जाली नाहीं. बंगाल्याची सनद मुबारकजंग यास मरहमत जाली. कारण, मशारनिल्हेच्या बापास सुभेदारी होती. सबब बदस्तुर साबक बहाल फर्माविली. दहा लक्षपावेतों सालिना अहमदखां व दोन लक्ष हाफीज रहमतखां दरसाल व सुजादौला बारा पंधरा लक्ष सालीना खजान्यांत दाखल करीत होते. दफ्तराचा अहवाल याप्रकारें असे."

* * *

## १३. सवाई माधवरावांचें तुकोजीराव होळकरांस एक महत्त्वाचें पत्र.

अलीबहादर व पाटिलबावा यांच्यामध्यें अनुपगीर गोसाव्याच्या प्रकरणाबद्दल तेढ उत्पन्न होऊन पुष्कळ वैमनस्य वाढलें होतें. ह्या प्रकरणांत तुकोजी होळकर हे अलीबहादर ह्याच्या बाजूचे होते. त्यास सवाई माधवराव पेशवे यांनीं या

बाबतींत लिहिलेलें एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें फार महत्त्वाचें आहे. त्यामध्यें पेशव्यांनीं तडजोड करण्याचा प्रयत्न केला आहे. हें पत्र येणेंप्रमाणें:—

श्री.

"राजश्री तुकोजी होळकर गोसावी यांसः–

सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य स्ने॥ माधवराव नारायण प्रधान आसिर्वाद उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित जाणें विशेषः– तुह्मी कार्तिक शुद्ध ७ सप्तमीचें विनंतीपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. अनुपगीर गोसावी याचे प्रकरणीं राजश्री माहादजी शिंदे यांचें बोलणें जाहलें कीं, गोसावी आला व प्रयोग करीत होता. त्याचा पक्ष चिरंजीव अलीबहादर यांनीं धरला, आणि त्यास वचन दिलें. यांत आमचा वाकर काय राहिला ? हिंदुस्थानांत सर्व आमचे दुस्मन, कोणासही सुख नाहीं. दाहा वर्षे श्रम केले, त्याचें सार्थक याप्रमाणें जाहलें. पुढें इकडे राहून फल नाहीं. देशीं जावें, धन्याचें दर्शन घ्यावें, आज्ञा होईल तसें करावें, परंतु येथें राहणें याउपर होणार नाहीं. याप्रमाणें उदासपणें बोलतां. व आपलेकडे परभारें तिकडील पत्रें येत होतीं, परंतु जाणें न जाहलें. व राजश्री अलीबहादरासही पाठविलें नाहीं. आपण लिहिलें कीं, उभयतांस नादीं लावून ठेविलें म्हणून तिकडील मसलतीस बल पडलें. नाहीं तर मोगले व हे एक जाहले असते तर दुरोख शह पडता म्हणून. त्यास उभयतां राजे आपलाले जागीं स्वस्थ होते. ते आपण होऊन मसलत न करते. आपला मेढा सोडून उगेच जाणार नाहींत. त्याजवर चालून आम्हास मग काय करणें तें करते. आपलें जाणें न जाहलेमुळें सर्वांस दुही दिसली. शत्रूस बल पडलें. निरोपसमयीं हेंच बोलण्यांत आलें होतें कीं, तिकडे राजश्री पाटिलबावांसीं मसलत भारी पडली आहे. याजकरितां आपण व अलीबहादर मिळोन लौकर कोठें न गुंततां जावें. उभयतां राजांसीं नाद राखूं नये. वाद तोडून ये, तें होऊन, आपली हद्द सोडून मसलत करणार नाहींत, याप्रमाणें आपणही मान्य केलें. परंतु जाणें लौकर न जाहलें. आपणास चार दिवस लागावयाचे होते, तर अलीबहादरास रवाना करावयाचें होतें. तेंही न जाहलें. शेवटीं, त्यांनीं होऊन आपणाजवळ निरोप मागितला, तेव्हां रवाना केलें. याउपर आम्हीही तिकडे जात जाहों. यांच्या व नबाबांच्या भेटी होतील. संस्थानिकांसीं सलुखा राखावा याप्रमाणें बोलणीं होतील. त्यांनीं रुकार दिल्यास उत्तम. नाहीं तर येविषयीं आपणास लिहावें लागेल म्हणोन. त्यास संस्थानिकांकडे सरकारचा पैका येणें तो दरोबस्त; व अजमेरचा किल्ला पातशाही यांनीं घेतला तो वगैरे जाबसाल असतील, ते उरकून दिले असतां पाटिलबावाही ऐकतील असें वाटतें. आपलीं त्यांचीं निखालसपणें बोलणीं, ज्यांत विरुद्ध पडून सरकार नुकसानी व फूट दिसे ती गोष्ट घडूं नये. हें निरोपसमयीं बोलणें जाहलेंच आहे. पाटिलबावांचींही पत्रें आपणास निखालसपणाचीं गेलींच आहेत. आपण निखालसपणें ज्यांत सरकारकाम ती गोष्ट केली असतां पाटिलबावा ओढणार नाहींत."

# १४. रघुनाथराव पेशव्यांच्या राजकारणाचें एक महत्त्वाचें पत्र.

ह्या पत्रावर नांव तारीख वगैरे कांहीं नाहीं. परंतु त्यांतील मजकुरावरून तें रघुनाथराव पेशव्यांच्या राजकारणासंबंधाचें तें असून तें पराकाष्ठेचें महत्त्वाचें आहे असें ह्मटलें तरी चालेल. पत्र लिहिणाराच्या हस्ताक्षरावरून तें हरिपंत फडक्यांचें असावें, असें वाटतें.

श्री.

"विज्ञापनाः—"चिरंजीव पुण्यांत आहेत. मनसुबे खलबतें फार होतात. सातारियाचीं वगैरे राजकारणें चाललीं आहेत. उभयतांनीं दौलत बुडविली! मोंगलांस वगैरे जहागीर देऊं केली! आह्मांस बंदोबस्त करणें. साबाजी भोंसले, पटवर्धन अनुकूल केले आहेत. शिंदे होळकरांचें अनुसंधान पक्कें आहे. हरिपंताजवळील फौज फोडिली आहे. तेथेंच चतुर्भुज करून आणूं असे मनसुबे घाटितात." ह्मणून आज्ञा केली. त्यास, जो मनसुबा आपण केला, यांत त्यांस संतोष नाहीं. त्यांनीं पूर्वी कर्में केलीं तीं अशींच, व पुढेंही करावयासी उद्योगांत आहेत. त्यास दुष्टांचें कल्याण व्हावें अशी ईश्वराची इच्छा असल्यास मग इलाज नाहीं. तर यांचें केल्यानें काय होणार? चार दिवस हिसके बसतील; बसोत. वामनराव भोंसले, इतर, प्राण गेला तरी आपल्याखेरीज दुसरें दैवत जाणत नाहींत. मग आह्मांकडे आहेत बोलतात, हें लटकें. दुसरे यांस साध्य करून घ्यावयाच्या खटपटींत आहेत. दुसरेही सरदार शिवाजी विठ्ठल, त्रिंबकराव शिवदेव, विसाजी कृष्ण, नरसिंगराव धायगुडे यांत दुसरे कोणी लक्ष धरावयाचा नाहीं. एक नारो शंकर याचें मात्र कळेना. सर्व मंडळ देखील मानकरी आपले उभयतांचे लक्षांत आहेत. असें असतां, ते कोणास आपले ह्मणत असतील, ते असोत. होळकर शिंदे याजकडील प्रकार तर शिंद्यांकडे नेहेमीं गुरुजी व होळकराकडे नारोपंत व विष्णुपंत बोलणार. त्यास त्यांणीं आपलीं लक्षें सोडून, दुसरीकडील धरावीं असा योग दिसत नाहीं. सरदार भले माणूस नाहींत तर आपल्या पासून कांहीं साधून घेतील. परंतु दुसरीकडे मिळणार नाहींत असें दिसतें. आपण बळकट असल्यावर त्यांणीं काय करणें असे? जे बखेडे करतात ते जवळपासच आहेत. याचा बंदोबस्त करावयाची तजवीज वामनराव आदिकरून सर्व मंडळी तेथें मिळाली आहे. विचार केलाच असेल. बाबूजी नायक, चिंतो विठ्ठल वगैरे, परभु मंडळी त्यांचेच पक्षींचे आहेत ह्मणोन लिहिलें. ही गोष्ट प्रमाण आहे. परंतु या उपरी श्रीमंत दादांचा पक्ष धरून पार पडूं, असा कोणासही भरोसा पुरणार नाहीं. तथापि जे राजकारणी आहेत, त्यांचीं कामेंच तीं कीं, बखेडा करीत असावें. असो. आपण मंडळ जमा के आहे, हें बळ पुरतें आहे. हे नबाबआदिकरून आपले लक्षांत आहेत. मग अशा किरकोळांनीं काय करणें? एक सरदार मात्र लगामीं असावें. कारण मातबर

लौकिकाचे आहेत. ऐवज तर कांहीं नाहीं. परंतु लौकिक मात्र. त्यांचें साधन आपणाकडून जालेंच आहे. असें करितां उभयतां सरदार श्रीमंतांस मिळाले, आणि आमचे मंडळ जे आहे तें आह्मी एकदिल असलों, तर सरदार सुद्धां कजियास भीत नाहीं. परंतु सरदार दूरदेशीं आहेत. असें करणार नाहीं. आपला स्वार्थमात्र आपणापासून करून घेतील. त्यास तूर्त कालाप्रमाणें आपणही कांहीं कबूल करावें. साष्टीचा प्रकार बोलणें लागलें होतें. परंतु लबाड. सेवटास गेलें नाहीं. दग्यादुग्याचें वर्तमान ऐकून सासवडाहून पुरंदरास आलों. या दिवसाची हवा फार वाईट. परंतु गडबड नाहीं. किल्ल्याचे राजकारणें करतात, व चिरंजीव बाह्यता भाषण करितात कीं, नानासीं शफत गुंतली आहे. श्रीमंत इकडे येण्यामुळें संतोष फार. जेणेंकरून दुसरें मनुष्य आह्मांवर खरे. अशा गोष्टी बोलतात. चिंतोबा व विष्णु शंकर, जनार्दन धोंडोपंत जातात येतात. धोंडोपंत दौलताबादेजवळ आढळले होते. शिंदे होळकराकडे सूत्र आहे. नारो गणेशाकडे आंतून सूत्र आहे असें ऐकतों. शिंद्याकडे रामचंद्र शिवदेव रवाना केले. त्यास पावणा लक्ष खर्चास द्यावयाचे केले. हिंदुस्थानांत थोडी बहुत जागीर देऊं. श्रीमंतांचा बंदोबस्त करावा याप्रमाणें सांगून रवाना केले. ह्मणून लिहिलें. त्यास साष्टीचा हवालदार विश्वासू. त्यानें केशवरायास आंत नेऊन बखेडा केला. यास गुढग्या खेरीज नाहीं. आबाजी यादव जामीन होते ह्मणोन ऐकत होतों. त्यास हर तजवीज करून साष्टीचा बखेडा मोडावा. आपण उद्योग करीतच असतील. आपणासी शफत गुंतली ह्मणतात. तें खरें कसें म्हणाल, तर आपण हा पक्ष धरला. ते आंत पुर्ते आलें नसतां आपण त्याचें वाईट काय केलें? इतकें आहे. याजकरितां लौकिकार्थ म्हणतात. मनांत राजकारणें करीतच असतील. मामा पांडवगडास गेले ते समयीं हे किल्ल्यास आले. भाषण जालें. शफत व्हावी. रहस्य करून न चालावें, ती गोष्ट राहिली. गोपाळ नाईक स्वामींनीं मायेंत घेतले होते. त्याचें काय जालें? जर शुद्ध होत असेल तर मायेंत हरप्रकारें मिळवावें. म्हणजे हूलच मोडेल. आपण उद्योग केलाच असेल. साध्य न होय तर राहिलें. शिंदे होळकर तुमचीं राजकारणें सोडून, त्यांचें धरतील असें दिसत नाहीं. नारो गणेश याजकडे निराळें राजकारण आहे. म्हणोन त्यास नारोपंतांचें लक्ष तिकडे नाहीं. नारोपंत विष्णुपंत एक. त्यांचीं लक्षें आपणाकडे आहेत. नारोपंताकडील केशोपंत ज्यासीं आह्मी पुण्यास बोलोन पाठविला, तो पुण्यास विसाजीपंत बिनीवाले यांजकडे गेला. मजला भेटला होता. मी त्याजवळ आपल्यास चिठ्ठी लिहून दिली आहे कीं, केसोपंत वर्तमान सांगतां कळेल, नारोपंत दादांचे पक्षांत लागणार नाहीं. शहाणा आहे. शिंद्याकडे रामचंद्रपंत पाठविले. त्यास जागिरीचा लोभ दाखविला. फार चांगली गोष्ट केली. होळकराकडील व शिंद्याकडील वर्तमान केसोपंत स्वामींस सांगेल, तें ऐकावें. विश्वासू आहे. विसाजीपंताचें त्याचें फार इष्टत्व आहे. बखेडे करणार करीतच आहेत. आपण सावध असावें. इतकें खरें! सरदारांनीं लांबणीवर गोष्ट

टाकून नासलें. नाहींतर आज फडशा जाला असता. पुढें यांणीं चांदवडीं यावें. तेथें बापूंनीं येऊन करारमदार करावा. त्यास बापू तर येणार नाहीं. तेव्हां निकाल कसा पडेल? कजिया वाढला तर वाईट ऐकवेल! काय देणें तें देऊन शफत सरदारापासून त्याजपासून घेऊन हलकें करून ठेवावें. पुढें अंतर पडल्यास बंदोबस्त करावा असें बोलणेंही आहे. राजश्री वामनरावबावा परवा रामभाऊ यांचीं आपलीं बोलणीं जालीं असतील. वरकडही सरदार तेथें आहेत. आपण उभयतां एक, यामुळें मनुष्यमात्र लगामी आहे. व इतका प्रकार जाला तो एकीनें जाला नाहीं. तर बारा बंदरचें माणूस कोणास कोणी मिळतेना. जी न होण्याची गोष्ट ती उभयतांनीं करून राज्य उभें केलें. यामुळें मनुष्यमात्रास भरवसा पुरतो. पैकाचें बळ कामीं पडलें. त्यास सदर राज्य आमचे स्वाधीन, किलेकोट मुलूक, त्यांजकडे कांहीं नसतां ते राजकारणें करतील, ते सेवटास जातील, आणि आम्ही करूं तें शेवटास जाणार नाहीं असें कसें होईल? पैकाची मात्र तर्दूद पाहिजे. कसेंही करावें, परंतु बाजी शेवटास न्यावी. यांत सर्व आहे. सर्वांनीं एक विचार करावा. दादा पुण्यांत राहून बखेडा करितात असें उमजल्याबरोबर बंदोबस्त करावा. असें कोणाचे मनांत येऊन आपणासी सरदार वगैरे बोलतात कीं नाहीं? सर्व भितात? हेंही कळावें. दौलताबादचा हवालदार धोंडोपंतीं धरला, तो दोघा चौघांचीं नांवें घेतो. त्यांत त्यांचें आहे. आपणास लिहिलें असेल. याचा विचार काय केला? आपण चौकसी, बंदोबस्त करतील, तो दुसऱ्यास होणार नाहीं. परंतु सुचली गोष्ट लिहिली असे. आपण उभयतांनीं श्रीमंतांचा वेश छातीचा कोट करून रक्षिला. एवढें मंडळ मिळालें होतें तें फोडून आपलेंसें केलें. ही कीर्ति दिगंत जाली. खुशामतीस्तव लिहित नाहीं. शिंदे होळकरांनीं श्रीमंतांचें यश वाढविलें. त्यास प्राप्त गोष्ट सेवटास गेली पाहिजे. याजकरितां सरदारास मेळवून घेऊन करारमदार करून हिंदुस्थानांत लावून द्यावें. श्रीमंत गंगातीरीं राहतील. प्रकृत बखेडे. खरे आहे तर मग चिंता नाहीं. एकादें अंतर पाहून पुरता बंदोबस्त करावयास येईल. श्रीमंत चांदवडास आल्यावर मातुश्री बाईचें रहाणें गंगापुरीं ठीक नाहीं. याचा विचार आजपासून करावा. हे आनंदवलीस मातुश्री गंगापुरीं हें कसें ठीक पडेल? व चांगलें दिसणार नाहीं. याजकरितां आजपासून काय करणें तें करावें. मातुश्रीनीं वडुथास जाऊन राहावें ही गोष्ट चांगली विचार करावी. श्रीमंतांचें सरकारांत लोकांनीं सरदारास अडवून बसवावें अशी चाल नव्हती. हिंदुस्थानापासून पडली. आतां आमचे फौजेंत नित्य धरणीं पारणीं भर नालबंदीसाठीं होतात. समजाऊन सांगतों. एक दिवस आप्पास दिवसरात्र बसविले होते. किती समजावीस करीत होतों. भर नालबंदी मागतात. तूर्त समजावीस केली आहे. असे प्रकार कधीं जाले नव्हते. असो, तेथें तोडमोड करून वराता पाठवितों. त्यास पैका मिळाला तर पत राहील. नाहींतर लोक कोणाचे नव्हत. याजकरितां पैका लौकर पावेसें करावें. नरसिंगराव धायगुडे गेले आहेत. एकनिष्ठ मायेचा आहे. भेटीनंतर सर्व विदित करतील. त्याचा बंदोबस्त करून द्यावा व शिवाजी विठ्ठल यांचा बंदोबस्त करावा. उपयोगी आहेत. हे विज्ञापना.”

* * *

## १५ पाटीलबावांचा मृत्यु व उत्तरहिंदुस्थानांतील व्यवस्था.

महादजी शिंदे पुणें येथें वानवडीस मृत्यु पावले. त्यावेळीं नाना फडणविसांनीं उत्तर हिंदुस्थानांत पत्रें लिहून, जागोजागच्या सुभेदारांस 'हिंमत धरून प्रसंग राखावा.' अशी ताकीद करविली. शिंद्यांचे सरदार गोपाळराव रघुनाथ यांस नानाफडणविसांच्या सूचनेवरून देवराव तात्या हिंगणे यांनीं जें पत्र लिहिलें आहे, त्याचें उत्तर गोपाळराव रघुनाथ यांनीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे, तें येथें दाखल करण्यासारखें आहे.

श्री.

पै ॥ छ० २० साबान.

"राजश्रीया विराजीत राजमान्य राजश्री देवराव तात्या स्वामींचे सेवेसीं.— पोष्य गोपाळराव रघुनाथ साष्टांग नमस्कार विनंति. उपरी येथील कुशल तागाईत छ० १३ साबान मु॥ नजीक सिंपवारी प्रांत दतिया जाणून स्वकीय कुशल लेखन करीत असलें पाहिजे. विशेषः— आपण छ० १९ माहे गुदस्तचें पत्र पाठविलें तें पावलें. पाटिलबावांचे शरीरीं आठ दहा दिवस ज्वर येऊन माघ शु॥ १३ कैलासवासी जाले ! ईश्वर इच्छेस उपाय नाहीं. श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींची व श्रीमंत नाना व तात्या यांचीं पत्रें आमचे नांवें व राजश्री सुभेदार यांचे नांवें आलीं. त्यांच्या नकला पाठविल्या आहेत. पावतील. हिंमत धरून प्रसंग राखावयाचा समय हाच आहे. दिल्लीचा बंदोबस्त व पातशाहा स्वाधीन आदि करून राखावा ह्मणोन लिहिलें. ऐशियास श्रीमंत यजमानसाहेबांचें वर्तमान येथें माघ वद्य एकादशीस कळोन चित्तास अत्यंत खेद आहे. ईश्वर इच्छेस उपाय नाहीं. श्रीमंत राजश्री सुभेदार साहेब यांचे विमनस्कतेचा अंदेशास्तव श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींनीं व श्रीमंत राजश्री नाना व तात्या याणीं मागील द्वैतभाव मनांत न आणितां, परस्परें पूर्वीपासोन उपराळे होत आल्याप्रमाणें घडत जावें, येविशीं पत्रें पाठविलीं. त्याच्या नकला पाठविल्याप्रमाणें पावल्या. त्यास दोनी दौलती भिन्न नाहींत. परस्परें अभिमानें पूर्वीपासोन उपराळे होत आले. मधीं दिवदिवसाच्या प्रभावानें होणार जालें. त्याविषयींचा किंतू मनांत राहील, यास्तव श्रीमंतांनीं सूचनार्थ पत्रें पाठविलीं. त्या अन्वयें श्रीमंत सुभेदार यांनीं लिहिलें उचित आहे. मसलत पडल्यास परस्परें उपराळे होत आले, व पुढेंही होतील. यांत गुंता काय ? श्रीमंत वैकुंठवासी यांचें पुण्य समर्थ आहे. बंदोबस्त यथास्थित राहील. माणसें पदरीं बाळगतात, त्यांनीं सेवा करून दाखवावी तो समय. त्या अर्थी तसेंच घडविणार श्रीमंतांचें पुण्य समर्थ आहे. काम पडल्यास आपल्यास सूचना लिहिण्यांत येईल. इकडील कोणेंविषयीं अंदेशा नसावा. सदैव पत्रीं तोषवीत असावें. बहुत काय लिहिणें, लोभ करावा ही विनंति."

* * *

## १६. फुलचरीचें बातमीपत्र.

फ्रेंच लोकांचा गव्हर्नर मुसा भुसी हा पाँडेचेरी येथें राहात असे. त्यास भेटून राजकारणाचें बोलणें करण्यासाठीं मराठ्यांचा कोणी वकील फुलचरी ऊर्फ पाँडेचरी येथें गेला होता. त्यानें तेथून लिहिलेलें बातमीपत्र उपलब्ध झालें आहे. तें अतिशय मनोरंजक आहे. या पत्राचा प्रारंभीचा कांहीं मजकूर कागद फाटल्यामुळें गहाळ झाला आहे. तथापि एकंदरींत सर्व पत्र वाचनीय आहे.

* * * * * * * * *

* * * * * * * * *

"* पोंहचलों. तीन रोज तेथें मुक्काम केला. तेथील भाव गर्भ पाहिला. महंमदअल्लीखानासीं इंग्रेजांची चित्तशुद्धि नाहीं. इंग्रेजांनीं तमाम मुलूख आपण घेऊन बसले. पांच वर्षें महमदअल्लीखांपासून लिहून घेतलें आहे कीं, आमचे चार क्रोड रुपये खर्च जाले, ते वसूल होतील तेव्हां मुलूख देऊं. महम्मदअल्लीखान निर्माल्यवत् बसले आहेत. इंग्रेजांची हैदरनाइकाशीं सल्लूकाची भानगड लागली होती. त्याजवरून इंग्रेजांनीं आपले तिघे सरदार, हजार पांचशें लोकांनशीं टिपूकडे ठेविले आहेत. सात सरदार पैकीं चार सरदार येथें आहेत. सरंजाम भारी आहे. चार पांच हजार फौज याशिवाय तोफखाना बरा निराळा आहे. जागाजागाचे सरदार आहेत त्यांस येण्याविषयीं पत्रें पाठविलीं आहेत. दोन तीन हजार गोरे आहेत. टिपूकडील सल्लूकाची भानगड. या या प्रांताची दोन क्रोड रुपये पायमाली ध्यावी. आठी लक्षांचें खत त्रिचनापल्लीचे वेळेस घेतलें तें माघारें द्यावें. पांचा लक्षांची जागीर कौड्याळ बंदरानजीक द्यावी. याप्रमाणें तह होऊन गेले. अद्यापि आले नाहीं. व ठाणीं मुलकाचीं बसलीं नाहीं. दोन महिने जाले. महम्मदअल्लीखानाची चित्तशुद्धी नाहीं. याचें कारण हेंच कीं, महम्मदअल्लीखान यांनीं फितवा करून, गोरनदरास मारावें या मनसुब्यांत होते. हें वर्तमान गोरनदरास कळलिया, तो गृहस्थ फितुरांतील धरून, कैद करून घालून, आपले पातशाहाकडे पाठविला. पंधरा हजार दरमाहास होन मशारनिल्हेस देतात. याप्रमाणें तेथील वर्तमान आहे. परंतु सा माही सिबंदी लोकांची तलब चढली आहे. त्याजकडून बातनीदार सेवकाकडे आले. कोठून आला, कोठें जातां ? त्याचें उत्तर केलें कीं, फुलचरी * * तो श्रीमंतांनीं जनराल मुसा भुसीकडे पाठविला आहे. त्याजवरून उत्तर केलें. सुखरूप जावें. पन्नास कोस फुलचरी, मधें वस्ती नाहीं. उजाडी सांगितली. तेव्हां पांचा दिवसांचा सरंजाम घेऊन, पांचवे रोजीं फुलचरी नजीक तीन कोस चावडी आहे, तेथें पोंहचलों. तेथून जासूदजोडी मुसा भुसीकडे पाठविली कीं, आम्हीं येथें आलों. त्याचें उत्तर आलें कीं, तुह्मी आले, उत्तम जालें. फुलचरीसन्निध छत्र दिवाणजीचें आहे, तेथें यावें. तेथून तुह्मांस इस्तवल पाळीनें घेऊन जाऊं. त्याप्रमाणें आह्मी तेथें आलों. मशारनिल्हेकडील माणूस दोघे ब्राह्मण दहा पांच माणसें घेऊन भेटी जाल्या. शहरांत जागा वाडा ठैराविला.

# इतिहाससंग्रह.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

**संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.**

पुस्तक ४ थें.] फेब्रुवारी, मार्च, एप्रिल १९१२. [अंक ७।८।९

## विषयानुक्रम.




**मुंबई येथें**

**तुकाराम जावजी ह्यांनीं**

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु.

फुटकळ अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.



**जमशेटजी बमनजी.**

( मुंबईतील जहाजें बांधणार. )

विसाजी कृष्ण व महादजी शिंदे यांनीं रोहिल्यांचा पूर्णपणें पराभव करून, जाबतेखानास टेहरीच्या जंगलामध्यें पळवून लाविलें, आणि मराठ्यांचा शत्रू जो नजीबउद्दौला त्याची कबर उकरून त्याच्या अस्थी जाळून टाकिल्या! याप्रमाणें रोहिल्यांचा सूड घेऊन, मराठ्यांनीं पानिपतच्या अपयशाचा कलंक नाहींसा करण्याचा प्रयत्न केला. अर्थात् या कामीं विसाजी कृष्ण बिनीवाले आणि महादजी शिंदे यांनीं आपल्या मनसुबेबाजपणाची आणि तरवारबहादुरीची शर्थ करून दाखविली आणि अमित यश संपादन केलें. ह्मणून त्यांची सर्व जगभर वाहवा झाली, व पेशव्यांनीं त्यांस मोठी शाबासकी दिली. श्रीमंत नारायणराव पेशवे यांनीं ता. २८ एप्रील इ. स. १७७२ रोजीं विसाजी कृष्ण बिनीवाले यांस पुढील पत्र लिहिलें आहे. तें वाचून कोणाच्या नेत्रांतून आनंदाश्रू येणार नाहींत? श्रीमंत नारायणराव पेशवे लिहितातः—

श्री.

"राजश्रिया विराजीत राजमान्य राजश्री विसाजी कृष्ण स्वामी गोसावी यांसः— पोष्य नारायणराव बल्लाळ नमस्कार विनंति उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय लिहित जाणें. विशेषः— तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. जाबतेखानास मोडून ताराज केलें. तो पळून पाहाडांत गेला. युद्ध मोठें झालें. सुक्रताल घेतलें. पथरगड घेतला. त्यांची दौलत, हत्ती, घोडे, तोफा वगैरे सरंजाम पाडाव केला. स्वामींच्या फौजेस मोठें यश आलियाचा विस्तार लिहिला. तो श्रवण होऊन संतोष जाहला. या प्रसंगीं तुह्मीं सर्वांनीं युद्धाची तरतूद फार चांगली केली. अमित यश संपादिलें. शाबास! रोहिला अति गर्वित होता, व त्यांनीं अन्याय फारच केले होते. त्याचे अन्यायानुरूप पारपत्य यथायुक्त जाहलें. याउपरी तिकडील वर्तमान लिहित जाणें. जाणीजे. छ० २४ मोहरम. बहुत काय लिहिणें, हे विनंति."

या पत्रावरून विसाजी कृष्ण व महादजी शिंदे यांच्या या कामगिरीमुळें पेशव्यांस केवढा आनंद व केवढी धन्यता वाटली असेल, याची सहज कल्पना करितां येईल.

विसाजी कृष्ण यांनीं रोहिलखंड पादाक्रांत करून दुआबामध्यें मराठ्यांची छावणी केली, आणि ते पातशाहाकडे दिल्लीस आले. दिल्ली येथें आल्यानंतर त्यांनीं पादशाहाकडून इटावे, गणमुक्तेश्वर, कडा, कुरा वगैरे प्रांतांच्या सनदा पेशवेसरकारच्या नांवें लिहून घेतल्या व मोठा नक्ष केला.

विसाजी कृष्ण यांनीं याप्रमाणें दिल्ली येथें मराठ्यांचा बोलबाला केला, हें पाहून थोरले माधवराव पेशवे यांस फार संतोष झाला. परंतु दुर्दैवानें, ते या समयास क्षयरोगानें ग्रस्त होऊन, थेऊर येथें ता० १८ नोव्हेंबर इ. स. १७७२ रोजीं मृत्यु पावले! त्यामुळें विसाजी कृष्ण यांच्या कर्तबगारीचें यथायोग्य गौरव त्यांच्या हातून होण्यास अवकाश मिळाला नाहीं. तथापि, अशी एक आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं, विसाजी कृष्ण यांच्या दिल्लीकडील पराक्रमांचें वर्णन ऐकून थोरले माधवराव साहेबांस अत्यंत समाधान झालें व मृत्युपूर्वी त्यांनीं अशी इच्छा प्रदर्शित केली कीं, विसाजी कृष्ण बिनीवाले ज्या वेळीं पुण्यास परत येतील, त्या वेळीं त्यांच्यावर सोन्यारुप्याचीं फुलें उधळून, मोठ्या समारंभानें व स्वागतानें त्यांस पुण्यनगरींत आणावें. यावरून विसाजी कृष्ण यांच्या अजब कर्तबगारीमुळें पेशव्यांचें हृदय आनंदातिशयानें किती उंचबळून गेलें होतें, त्याचें अनुमान करितां येतें.

विसाजी कृष्ण हे इ. स. १७७२ नंतर दक्षिणेंत परत आले. त्यानंतर त्यांनीं कोणकोणत्या कामगिऱ्या केल्या, हें समजत नाहीं. तथापि त्यांच्याकडे मरेपर्यंत बिनीवाल्याचा हुद्दा असून, त्यांस व त्यांच्या पुत्रास पालखीची तैनात आणि फौजसरंजाम चालू होता, असें उपलब्ध असलेल्या कागदपत्रांवरून दिसून येतें. इ. स. १७७६ सालीं विसाजी कृष्ण यांस व त्यांच्या मुलास व बंधूंस मिळून ३५१६० रुपयांची जात तैनात असून, पालखी, हत्ती व फौज ह्यांच्या खर्चासाटीं ३०९३१ रुपयांचा सरंजाम चालू होता. विसाजी कृष्ण हे इ. स. १७८५ मध्यें मृत्यु पावले. त्यांच्या मुलास सरदारीचीं वस्त्रें मिळालीं. त्यांच्या चिरंजीवांचें नांव महिपतराव विश्वनाथ असें होतें. त्यांच्या पाठीमागें इ. स. १७८७ सालीं सिद्धेश्वर महिपत यांस सरदारी मिळाली. यांच्याकडे जात तैनात, पालखी, हत्ती व नेमणूकखर्च मिळून ५६५०० रुपये व शिवाय इनामी गांव वगैरे सरंजाम, दुसरे बाजीराव पेशवे यांच्या कारकीर्दीपर्यंत चालू होता. सिद्धेश्वर महिपत हे बदामीच्या व खर्ड्याच्या लढाईंत हजर होते. बाजीराव पेशवे यांनीं बिनीवाल्याचा सरंजाम जप्त केल्यानंतर, त्यांस पागेच्या खर्चाबद्दल दरमहा ६०० रुपये व जातखर्चास दरसाल २००० रुपये नेमणूक मिळत असे. हीच २००० रुपयांची नेमूणक इ. स. १८१८ मध्यें इंग्रजी राज्य झाल्यानंतर मि० एलफिन्स्टन यांनीं त्यांच्याकडे चालविली होती. बिनीवाले यांचे वंशज अद्यापि पुणें येथें आहेत.

विसाजी कृष्ण बिनीवाले यांचें चरित्र फार महत्त्वाचें असून, तें अद्यापि प्रसिद्ध नाहीं ही दुर्दैवाची गोष्ट होय. त्यांची त्रोटक माहिती दक्षिणेंतील सरदारांच्या कैफियतीमध्यें व ग्रँडडफ साहेबांच्या इतिहासामध्यें थोडीशी प्रसिद्ध झाली आहे. तिच्या आधारानें ह्या चरित्राचा खर्डा आह्मीं येथें सादर केला आहे. हा वाचून कोणी इतिहासभक्तांनीं, विसाजी कृष्ण यांच्या चरित्राचे अस्सल कागदपत्र शोधून काढून आमच्याकडे पाठविले, तर या शूर वीराचें साद्यंत चरित्र देण्याचा पुनः सुप्रसंग येईल, अशी आह्मांस उमेद आहे.



# ११. मुंबई येथील जहाजें बांधणारें एक प्रख्यात पारशी घराणें.



हिंदुस्थानामध्यें फार प्राचीन कालापासून नौकानयनविद्या आणि नौकाशिल्पशास्त्र ह्यांची माहिती एतद्देशीय लोकांस फार चांगल्या प्रकारची असून, त्या विद्येमध्यें ते अतिशय निष्णात होते, हें प्राचीन संस्कृत ग्रंथ, पुरातन लेणीं इत्यादिकांवरून सुप्रसिद्धच आहे. नौकानयनाचा प्राचीन इतिहास उपलब्ध नसल्यामुळें ही कला हिंदुस्थानामध्यें किती उन्नतदशेप्रत पोंचली होती, हें स्पष्ट रीतीनें समजण्यास मार्ग नव्हता. अलीकडे बंगाल्यांतील एक प्रसिद्ध विद्वान् संशोधक प्रो० राधाकुमुद मुकर्जी यांनीं 'हिंदुस्थानांतील नौकाशास्त्राचा इतिहास' नांवाचा एक सुंदर ग्रंथ प्रसिद्ध केला आहे. ह्यामध्यें त्यांनीं नौकानयनाचा प्राचीन इतिहास उत्कृष्ट रीतीनें देऊन, भारतवर्षीय लोकांनीं एके काळीं त्यामध्यें किती प्राविण्य मिळविलें होतें, तें साधार कथन केलें आहे. त्यावरून हिंदुस्थानांतील लोक नौकानयनशास्त्रामध्यें फार पारंगत असून, त्यांनीं ही कला एके वेळीं पूर्णतेस आणिली होती, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. प्राचीन व अर्वाचीन इतिहासाचें पर्यालोचन केलें,तर नौकानयनविद्या हिंदुस्थानांत एके काळीं किती उच्चतेस पोंचली होती हें चांगलें दिसून येतें. सांची, अजंठा, वेरूळ वगैरे ठिकाणच्या कोरींव लेण्यांमध्यें जहाजांची व नौकांची निरनिराळीं चित्रें आढळून येतात. त्यांवरून प्राचीनकाळीं भिन्न भिन्न नौका अस्तित्वांत होत्या ह्याची साक्ष पटते. प्राचीन हिंदु राजांचे वेळचा नौकानयनशास्त्राचा इतिहास जरी फारसा उपलब्ध नाहीं, तथापि संस्कृत ग्रंथ आणि पुराणवस्तुसंशोधक लोक ह्यांनीं लिहिलेले लेख ह्यांच्यावरून त्याबद्दल पुष्कळ माहिती मिळूं शकते. मुसलमानी अमदानीचा विचार केला, तर त्यावेळींही जहाजें व आरमार ह्यांची विशेष सुधारणा झाली होती, असें आढळून येतें. अकबर बादशाहाचे कारकीर्दींत अबुल फजल ह्या इतिहासकारानें 'ऐनेअकबरी'नामक जो ग्रंथ लिहिला आहे, त्यामध्यें आरमारखातें (Admiralty or Naval Department) ह्मणून एक स्वतंत्र खात्याचा त्यानें उल्लेख केला असून, त्याच्या कायदेकानूंचें सविस्तर वर्णन दिलें आहे. ह्या खात्याचा जो मुख्य कामगार असे, त्यास 'मीर बेहरी' अशी संज्ञा असे. औरंगजेब बादशाहाचे कारकीर्दींत स्वतंत्र बादशाही आरमार संस्थापित होऊन, सुरत हें त्याचें मुख्य ठिकाण बनलें होतें; आणि जंजिऱ्याचे शिद्दी ह्यांजकडे त्या आरमाराचें मुख्य

आधिपत्य होतें. औरंगजेबाच्या कारकीर्दींत महाराष्ट्रराज्यसंस्थापक श्रीछत्रपति शिवाजी महाराज निर्माण झाले. त्यांनीं लढाऊ जहाजें तयार करून व समुद्रकिनाऱ्यावर विजयदुर्ग, कुलाबा, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, अंजनवेल, इत्यादि ठिकाणीं गोद्या तयार करून, स्वतंत्र आरमार स्थापन केलें. शिवाजीच्या आरमाराचे अधिपति दर्यासारंग व मायनाक भंडारी हे दोन प्रसिद्धच आहेत. शाहूचे कारकीर्दींत कान्होजी आंग्रे हा मराठ्यांच्या आरमाराचा मुख्य सेनापति असून, त्यानें नवीन जहाजें बांधून व उत्तम दर्यावर्दी फौजेचा संग्रह करून, पश्चिम किनाऱ्याचें चांगलें संरक्षण केलें. तो एके वेळीं इंग्रजी आरमारासही भारी झाला होता, व त्याचें पारिपत्य करण्यासाठीं मुंबईकर इंग्रजांस पुष्कळ प्रयत्न करावा लागला. इ. स. १७५५ मध्यें आंग्र्याची सत्ता रसातळास पोंचली; तथापि मराठ्यांच्या आरमाराचें बल कमी झालें नाहीं. बाळाजी बाजीराव पेशव्यांचे कारकीर्दींत आरमारी विद्येमध्यें धुळपाचें घराणें उदय पावून, त्यानें समुद्रयुद्धामध्यें आपलें कौशल्य आणि पराक्रमतेज चांगलेंच प्रकाशित केलें. ह्या घराण्यानें विजयदुर्ग हें आपलें आरमाराचें मुख्य ठिकाण करून, तेथें जहाजें बांधण्याचा जंगी कारखाना स्थापिला होता. आनंदराव धुळप व त्यांचे बंधु हरबाजीराव धुळप हे पेशव्यांच्या आरमाराचे मुख्य सेनापति असून, त्यांचें शौर्य व त्यांचे पराक्रम मराठ्यांच्या इतिहासांत प्रसिद्ध आहेत. असो.

ह्या वर दिलेल्या संक्षिप्त माहितीवरून, हिंदुस्थानामध्यें नौकाशास्त्र फार प्राचीन कालापासून अस्तित्वांत असून, त्याची भरभराट अठराव्या शतकाच्या अखेरपर्यंत होती, असें निःसंशय दिसून येईल. अर्थात् नौकाशास्त्राची माहिती एतद्देशीय लोकांस पूर्णपणें असल्यामुळें नौकाबंधनकला ह्मणजे जहाजें बांधण्याची कला त्यांस पूर्ण अवगत होती, हें निराळें सांगावयास नकोच. मराठ्यांचीं पाल, गुराबा वगैरे लढाऊ जहाजें; गलबत, तरांडी वगैरे व्यापारी जहाजें; हीं सर्व येथेंच बांधण्यांत येत असून, त्यांचें काम फार खंबीर व टिकाऊ असें केलें जात असे. एवढेंच नव्हे तर तें सशास्त्र व प्रमाणशुद्ध असून, तें पाश्चात्य लोकांनींही वाखाणण्यासारखें होत असे. ह्मणून इंग्रज लोक देखील आपलीं जहाजें हिंदुस्थानांत बांधविण्याचा एके काळीं प्रयत्न करीत असत, असें दिसून येतें. हें वाचून कित्येक लोकांस फार अचंबा वाटेल. परंतु हिंदुस्थानांतील जहाजें बांधण्याच्या कलेचा थोडासा जुना इतिहास अवलोकन केला, तर ज्या इंग्रज लोकांनीं आपल्या आरमाराच्या बलावर सर्व जगतीतलावर आपल्या राजसत्तेचा प्रसार केला, ते एके काळीं आपलीं जहाजें हिंदुस्थानांत सुरत किंवा मुंबई येथून बांधवून घेत असत,

ही अगदीं सत्य व निर्विवाद गोष्ट आहे, अशी त्यांची खात्री होईल. ह्या जहाजें बांधण्याच्या कलेची व ती बांधणाराची माहिती फार मनोरंजक व महत्त्वाची आहे. परंतु ती अप्रसिद्ध व अविश्रुत असल्यामुळें, हिंदुस्थानांत जहाजें बांधण्याची कला इतक्या परिपूर्णतेस पोंचली होती, हें सकृद्दर्शनीं कोणासही खरें वाटणार नाहीं. ह्यासाठीं आह्मीं मुंबईच्या जहाजें बांधणारांची थोडीशी जुनी माहिती येथें सादर करितों.

मुंबई येथें जहाजें बांधण्याचा कारखाना सतराव्या शतकाच्या प्रारंभीं ह्मणण्यासारखा भरभराटींत असावा, अशी माहिती उपलब्ध होत नाहीं. इ. स. १६२३ च्या सुमारास डच लोकांबरोबर डेविड डेव्हीस ह्यानें मुंबईच्या बेटावर हल्ला केला. त्या वेळीं त्यानें दोन नवीं जहाजें तेथें तयार होत असल्याचें पाहिलें होतें. ह्यानंतर सुमारें बारा वर्षांनीं ह्मणजे इ. स. १६३५ मध्यें, इंग्रज लोकांनीं पोर्तुगीज लोकांबरोबर तह करून, कांहीं शर्तींवर वसईच्या बंदरांत जहाजें बांधविण्याचा प्रयत्न केला, असा उल्लेख आढळतो. इ. स. १६६८ मध्यें मुंबईबेट ईस्ट इंडिया कंपनीचे ताब्यामध्यें आलें. त्यावेळीं मुंबई येथें १८० टनांचें एक आरमारी जहाज मुंबईच्या संरक्षणास ठेवावें, असा इंग्लंडाहून हुकूम आला होता. व त्याप्रमाणें 'वारिक पेठ' या नांवाचें एक जहाज मुंबईस येऊन दाखल झालें होतें. ह्या वेळेपासून मुंबई येथें नवीन जहाजें बांधण्यास इंग्रज लोकांनीं सुरुवात केली होती. हॅमिल्टन ह्या नांवाच्या प्रवाशानें ह्या वेळीं मुंबई येथें २०० पासून ८०० टन वजनाचीं उत्तम गलबतें तेथील व्यापारी लोकांजवळ असल्याचें लिहिलें आहे. ह्यावरून मुंबई येथें अठराव्या शतकाच्या प्रारंभीं, मुंबई बंदरांत व्यापाराकरितां येणारीं चांगलीं जहाजें पुष्कळ आढळून येत असत. परंतु हीं सर्व जहाजें मुंबई येथें बांधलेलीं नसून, तीं मुख्यतः सुरत बंदरामध्यें बांधलीं जात असत. ह्या वेळीं सुरत बंदर फार प्रसिद्ध असून, तेथें जहाजें बांधण्याचा कारखाना मोठ्या भरभराटींत चालत असे.

इ. स. १७३५ चे पूर्वीं मुंबई येथें चांगलीशी गोदी बांधण्यांत आलेली नसून, मुंबईच्या इंग्रज लोकांस व तेथील एतद्देशीय व्यापाऱ्यांस लागणारीं जहाजें सुरत येथूनच तयार करून आणलीं जात असत. ह्या वेळीं सुरत येथील जहाजें बांधण्याचा कारखाना, एकट्या मुंबई इलाख्यांतच नव्हे, परंतु सर्व हिंदुस्थानामध्यें प्रसिद्ध असे. आणि तेथें तयार झालेलीं जहाजें दूरदूरच्या देशास जात असत. त्यामुळें मुंबईकर इंग्रज लोकांसही सुरत येथेंच नवीन जहाजें बांधविणें अधिक सोईचें वाटत असे. इ. स. १७३५ चे सुमारास मुंबईच्या इंग्रज गव्हर्नरानें,

सुरत येथें मि० डडले ह्या नांवाचा आपला एक इसम 'क्वीन' नांवाचें एक आरमारी जहाज बांधण्यासाठीं पाठविला होता. त्यानें, सुरत येथील मुख्य जहाजें बांधणारे कारखानदार, धनजीभाई नांवाचे एक पारशी गृहस्थ होते, त्यांच्याकडून हें जहाज तयार करून घेतलें. तें इतकें उत्कृष्ट झालें कीं, तें पाहून मि० डडले हे अत्यंत संतुष्ट झाले, व त्यांनीं धनजीभाईच्या कारखान्यांतील मुख्य कारागीर लौजी नसरवानजी ह्यांस मुंबईस आणण्याचा प्रयत्न चालविला. ह्या वेळीं मुंबई येथें जहाजें बांधण्याचा कारखाना सुरू करावा, अशी मुंबईचे गव्हर्नराची विशेष इच्छा होती. परंतु डडले ह्याच्या नुसत्या विनवणीनें, लौजी नसरवानजी हा, सुरत येथील आपल्या मालकास सोडून मुंबईस आला नाहीं. तेव्हां मि. डडले ह्यांनीं मुंबई सरकारास लिहून, त्यांच्या कडून सुरतेच्या कारखान्याचे मालक धनजीभाई ह्यांची मनधरणी करून, लौजीस मुंबईस पाठविण्याबद्दल परवानगी घेतली. नंतर लौजी आपल्या थोड्याशा साहित्यानिशीं मुंबईस येऊन दाखल झाला. व त्यानें मुंबईची जुनी गोदी ( Dock-yard ) होती तेथें आपला कारखाना सुरू केला. ह्या वेळीं तेथं लोकवस्ती थोडी असून समुद्रावरचे अधिकारी आणि खलाशी वगैरे राहात असत. लौजी ह्यानें ज्या वेळीं हा कारखाना स्थापिला, त्या वेळीं त्यास सर्व प्रकारच्या अडचणी सोसाव्या लागल्या. त्या वेळीं मुंबई येथें सागाचें लांकूड बिलकूल मिळत नसे. तेव्हां त्यास, मुंबई सरकारच्या परवानगीनें, आसपासच्या गांवकरी लोकांशीं लांकडाचा व्यापार सुरू करावा लागला, व जंगलांतून चांगला माल पैदा करावा लागला. अशा रीतीनें व्यापारी लोकांकडून चांगलें लांकूड मिळविण्याची तजवीज झाल्यानंतर, त्यानें लहान लहान मचवे तयार केले; आणि व्यापाराकरितां लौकरच मोठीं गलबतें तयार केलीं. अशा रीतीनें त्याचा कारखाना नांवारूपास येऊं लागतांच, त्याजकडे सरकारी आरमारी जहाजांची दुरुस्ती करण्याचें काम येऊं लागलें, आणि तो थोड्या वेळांत फार प्रसिद्धीस आला.

इ. स. १७५४ मध्यें मुंबई बंदराची बरीच भरभराट झाल्यामुळें व तेथील जहाजांचे कारखान्यास चांगलें उत्तेजन मिळाल्यामुळें, तेथील 'सुपरिंटेंडंट आफ दी मरीन' ह्यांनीं मुंबई येथें एक बिनपाण्याची गोदी ( Dry Dock ) स्थापन करण्याबद्दल सरकारास शिफारस केली, आणि लौजीच्या साहाय्यानें बारा हजार रुपयांमध्यें ती तयारही केली. त्यामुळें लौजीच्या कारखान्यास विशेष महत्त्व येऊन, दूरदूरचे लोक आपलीं जहाजें दुरुस्त करण्यासाठीं मुंबईस पाठवूं लागले. अशा रीतीनें लौजीच्या अंगीकृत कार्यांत विशेष यश आल्यामुळें सरकारची त्यावर विशेष मेहेरबानी जडली; आणि त्याचा कारखाना सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध झाला. अर्थात्

हा धंदा चांगला किफायतशीर होऊन त्यांत लौजीचा लौकिकही वाढल्यामुळें, लौजीनें माणकजी व बम्मनजी ह्या नांवांच्या आपल्या दोन मुलांस याच धंद्यामध्यें घातलें; आणि त्यांना जहाजें बांधण्याची कला चांगल्या तऱ्हेनें अवगत करून दिली. त्यामुळें हे दोनी मुलगे त्यास साहाय्य करण्यास चांगले समर्थ होऊन, लौजीचा कारखाना एकसारखा वाढत चालला. आणि त्यास असलेली जागा पुरेनाशी होऊन, दुसरी एक गोदी इ. स. १७६० मध्यें बांधण्याचा प्रसंग आला.

ह्या वेळीं ईस्ट इंडिया कंपनीनें, मुंबईच्या गोदीचा लौजीच्या कारखान्यानें चांगला उपयोग केला आहे असें पाहून, व त्यायोगानें मुंबईच्या व्यापाराची दिवसेंदिवस अभिवृद्धि होत असल्याचें लक्षांत घेऊन, मोठ्या आनंदानें नवी गोदी बांधण्या-बद्दल परवानगी दिली. ह्या वेळीं लौजीची आपल्या धंद्यांतील वाकबगारी आणि प्रामाणिकपणा हे गुण ईस्ट इंडिया कंपनीच्या विशेष नजरेस येऊन, त्यांनीं त्याची फार तारीफ केली आणि त्यास कांहीं पारितोषकही दिलें.

मुंबई येथें दुसरी गोदी संस्थापित झाल्यानंतर तिचें महत्त्व इतकें वाढलें कीं, तेथें आणखी तिसरी गोदी बांधण्याबद्दल कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स ह्यांनीं मंजुरी दिली. आणि लौजी आणि त्याचे दोन मुलगे ह्यांच्या कर्तबगारीची फार तारीफ करून त्यांच्या पगारामध्यें बढती केली. अशा रीतीनें लौजीस ईस्ट इंडिया कंपनीचें चांगलें पाठबळ मिळाल्यामुळें, त्यानें आपल्या घराण्यांतील तिसऱ्या पिढीसही ह्याच धंद्यांत घातलें. इ. स. १७७१ मध्यें लौजीचे नातू फ्रामजी माणेकजी व जमशेटजी बमनजी हे लौजीच्या कारखान्यांत दरमाहा बारा रुपये पगारावर सुताराचें काम करीत असत. ह्यावरून त्या कालीं वैभवसंपन्न झालेले लोक, अल्प-वयामध्यें उद्योग आणि स्वावलंबन ह्यांचा धडा शिकण्याकरितां किती क्षुल्लक दर्जाचें काम करीत असत, त्याची चांगली साक्ष या उदाहरणावरून दिसून येते.

लौजी नसरवानजी हा, ईस्ट इंडिया कंपनीची चाळीस वर्षें इमानें इतबारें सेवा करून, इ. स. १७७४ मध्यें मृत्यु पावला. त्या वेळीं त्याजवळ अवघी वीस हजार रुपयांची शिल्लक व एक घर इतकी इस्टेट होती. परंतु त्यानें आपल्या मुलांकरितां आपल्या अंगच्या कौशल्य, उद्योगशीलता आणि प्रामाणिकपणा इत्यादि उत्कृष्ट गुणांचा विपुल ठेवा जतन करून ठेविला होता. तो त्यांस फार फलप्रद झाला. लौजी मृत्यु पावल्यानंतर त्याचा वडील मुलगा माणकजी हा जहाजें बांध-ण्याचें मुख्य काम करूं लागला; व बमनजी त्याच्या हाताखालीं मदतनीस बनला. ह्या दोघांनीं आपल्या वडिलांप्रमाणेंच ह्या कारखान्याची भरभराट करून कोर्ट ऑफ डायरेक्टर्स ह्यांच्याकडून वाहवा मिळविली. इ. स. १७७६ सालीं



मुंबई येथें बांधलेलें लढाऊ जहाज.

मुंबई सरकारानें त्यांच्या वेतनांत बढती केली, आणि कोर्ट ऑफ् डायरेक्टर्स यांनीं माणकजी यास एक चांदीचा रूळ आणि मूल्यवान् शाल नजर पाठविली. दिवसेंदिवस मुंबई बंदर हें राजकीय महत्त्वाचें झाल्यामुळें, तेथें आरमाराचा पुष्कळ भाग राहूं लागला, आणि लढाऊ जहाजांचा दारूगोळाही तेथें येऊन पडूं लागला. इ. स. १७७६ पासून इ. स. १७९० पर्यंत पश्चिम किनाऱ्यावर इंग्रजांचीं युद्धें चालू असल्यामुळें, त्यांच्या लढाऊ जहाजांची दागदुजी करणें व नवीन जहाजें तयार करणें हें फार जरूरीचें व महत्वाचें काम असे. तें माणकजी व बमनजी ह्यांनीं इतकें उत्कृष्ट रीतीनें केलें कीं, त्या वेळचे आरमाराधिपति सर एडवर्ड ह्यूजेस हे फार संतुष्ट झाले. माणकजी व बमनजी यांनीं ईस्ट इंडिया कंपनीचे उपयोगाकरितां ९०० टन वजनाचीं दोन नवीन जहाजें तयार केलीं. बमनजी हा इ. स. १७९० मध्यें व माणकजी हा इ. स. १७९२ मध्यें मृत्यु पावला. ह्या दोघांनींही आपल्या घराण्याची कीर्ति चांगल्या रीतीनें कायम ठेवून, मुंबई बंदरांतील जहाजांचा कारखाना आपल्या उत्कृष्ट कारागिरीच्या योगानें फार प्रसिद्धीस आणिला. ह्या कारखान्यामध्यें त्यांनीं जीं जहाजें तयार केलीं, तीं फार मजबूत, डौलदार व सुंदर असून, युरोपखंडांतील कोणत्याही बंदरांत तयार झालेल्या जहाजांशीं बरोबरी पावण्यासारखीं होतीं, असें त्या वेळच्या युरोपियन लेखकांनीं प्रांजलपणें कबूल केलें आहे.*

---

* "Forbes speaking of the shipping in 1766—1770 remarked the excellence of the ships of the line, the grabs and the galivats to be seen in Bombay: while Parsons in 1775 laid down the ships built at Bombay were as strong, as handsome and as well-finished as ships built in any part of Europe. The timber and plank of which they are built so far exceeds any in Europe for durability, that it is usual for ships to last fifty or sixty years. As a proof of this I am informed that the ship called the 'Bombay Grab' (the second in size belonging to the Company's marine) has been built more than sixty years and is now a good and strong ship. The Company's marine on the Bombay establishment are more than 20 in number, the largest of which is the 'Revenge' mounting 28 guns, 20 of which are twelve-pounders. The second is the Bombay Grab. The remainder are from 16 to 8 guns, and as there are several little piratical states both on the north as well as on the south coast of Bombay, the coasting trade could not be carried on in safety without being conveyed by such vessels belonging to the Company. It is usual to 60 or 80 coasting vessels sail between Surat and Bombay conveyed by one or two of these vessels."

माणकजी व बमनजी हे मृत्यु पावल्यानंतर, त्यांचे पुत्र फ्रामजी माणकजी व जमशेटजी बमनजी हे मुंबई येथील जहाजें बांधण्याचें काम करूं लागले. त्यांत त्यांनीं आपलें कौशल्य इतकें व्यक्त केलें कीं, त्यांचें नांव त्यांच्या वाड-वडिलांपेक्षांही अधिक प्रसिद्धीस आलें. त्यांनीं पूर्वीं कधींही बांधलीं गेलीं नाहींत अशीं प्रचंड जहाजें तयार केलीं, आणि बादशाही आरमाराचीं मोठमोठीं जहाजें वेळोवेळीं दुरुस्त करून दिलीं. त्यांच्या कारखान्यांत तयार झालेलीं जहाजें अतिशय मजबूत व प्रमाणशुद्ध असल्यामुळें, इंग्लंडांतील आरमार-खात्याच्या प्रधानमंडळानें तीं जहाजें अधिक पसंत केलीं; आणि मुंबई येथें बांधलेलें 'कार्नवालीस' नांवाचें पन्नास तोफांचें लढाऊ जहाज सर्वांत उत्तम आहे असें ठरवून, इंग्लंडांतील लढाऊ जहाजें मुंबई येथेंच बांधवावींत, असा, इ. स. १८०२ मध्यें निर्णय केला. त्या वेळीं प्रथमतः प्रधानमंडळाचे मनांत असें आलें कीं, जहाजें बांधण्याच्या कलेंत कुशल असा एक युरोपियन कारागीर मुंबई येथें पाठवावा व त्याच्या देखरेखीखालीं हीं जहाजें तयार करवावीं. परंतु बोर्ड ऑफ ॲडमिरल्टीचे एक सभासद, सर टामस ट्रौब्रिज, ह्यांनीं अशी हमी घेतली कीं, जमशेटजीच्या कारखान्यांत उत्तम लढाऊ जहाजें व व्यापारी गलबतें इतकीं उत्कृष्ट रीतीनें तयार होतात कीं, त्यांस युरोपियन देखरेखीची किंवा मदतीची जरूर नाहीं. ह्या वेळीं इंग्लंडमध्यें ह्या प्रश्नाबद्दल बरीच चर्चा झाली, व शेवटीं असें ठरलें कीं, दोन लढाऊ जहाजें व एक गलबत मुंबई येथेंच तयार करवून घ्यावें. त्याप्रमाणें जमशेटजी यास हुकूम मिळाला. त्यानें तदन्वयें उत्तम प्रकारें काम करून, दोन ३६।३६ तोफांचीं नमुनेदार आरमारी जहाजें व दुसरें एक ७४ तोफांचें लढाऊ गलबत हीं तयार केलीं. हीं जहाजें पाश्चात्य नौकाशास्त्रज्ञ लोकांस विशेष पसंत पडून, जमशेटजीच्या नौकाबंधनकौशल्याबद्दल फार तारीफ झाली; आणि त्याचीं जहाजें हीं एतद्देशीय कलाकौशल्याचे उत्तम मासले होऊन राहिलीं. हीं जहाजें बांधण्याच्या संबंधांत, रियर-ॲडमिरल सर टॉमस ट्रौब्रिज ह्यांनीं जमशेटजी बमनजी यास जीं पत्रें पाठविलीं आहेत, तीं उपलब्ध झालीं आहेत. त्या पत्रांवरून जमशेटजीच्या नौकाबंधननैपुण्याबद्दल ह्या थोर अधिकाऱ्याचें किती उत्कृष्ट मत होतें व त्यावर त्याचा केवढा भरंवसा होता, हें लक्षांत घेण्यासारखें आहे. ह्या वेळीं थोर मनाचे गुणज्ञ व उदार युरोपियन लोक एतद्देशीयांबद्दल किती आदरबुद्धि व सहानुभूति बाळगीत असत, त्याची ह्या पत्रांवरून चांगली कल्पना करितां येते. हीं पत्रें येणेंप्रमाणें:-

## No. 1.

*Extract of a letter from Rear-Admiral Sir Thomas Trowbridge, Bart. To Jemsatjee Bomanjee, Master-Builder, at Bombay, dated Admiralty, 14th June 1802.*

"I am favoured with your letter of the 12th December, but the one of the 15th November has never reached me. You will find I had anticipated your wishes respecting the building men of war in Bombay, and the plans must have long since been in your possession, having been forwarded by the Company's overland despatch. I had also written you on the subject, pledging myself for your ability and exertion, and that I was sure the ships you built would be models for our people to copy from. In short, I said everything in my power which your merits richly deserve, and any thing I can do for you, or your family, will give me great pleasure. Pray let me know how many ships of the classes you now have plans for, can to a certainty be built for us annually ? Timber I presume can now be had in abundance from Tipoo's country, as well as Poona, for temporary masts to navigate them home.

Mr. Dundas is not yet arrived in England; any assistance I can render your family with the Company will give me great pleasure. I sincerely hope the Cornwallis will soon be home, that our builders and surveyors may have occular demonstration, though they appear perfectly satisfied with, from what I have told them; as a proof they have not sent any one out to superintend the work, having a thorough confidence from my statement of your ability and integrity to perform the work well, and of the best materials; be assured you will have every support from the Admiralty."

## No. 2.

*Extract of a letter from Rear-Admiral Sir Thomas Trowbridge, Bart. To Jemsatjee Bomanjee, Master-Builder, at Bombay, dated Admiralty, 16th November 1803.*

"I am very anxious to hear you have begun our two ships; I am deeply pledged for your ability and exertion, and I know you will do all that is possible to meet the wishes of the Company and British Government, and be assured you will be rewarded. We have numberless offers of building at Bengal line of battle-ships, but I have no opinion of the people, who are to perform the work, or the Pegu Teak; I therefore rest

entirely on you; I have seen and know you are fully equal to it, and I have pledged myself you will produce ships that will eclipse those built in England."

असो. अशा रीतीनें जमशेटजी बमनजी ह्याच्या कारखान्याची दिवसेंदिवस विशेष प्रशंसा होऊन, त्याची एकसारखी भरभराट होत चालली, व आरमार-खात्याचे मोठमोठे अधिकारी त्यावर अतिशय प्रसन्न झाले. त्याचप्रमाणें एतद्देशीय आणि परदेशीय व्यापारी लोक ह्या कारखान्याचा विशेष उपयोग करून घेऊं लागले. अर्थात् अनेक जहाजें व गलबतें हीं मुंबई बंदरांत तयार होऊं लागल्या-मुळें तेथील गोदीचा विस्तार झपाट्यानें होऊं लागला, व जहाजांच्या हालचालीचे नियम अमलांत आले. आणि लोकांच्या सोयीकरितां, धक्के (Pier) बांधण्यांत आले. अशा रीतीनें जमशेटजीच्या कारखान्याची व त्याबरोबर मुंबई बंदराची प्रसिद्धी विशेष झाली. इ. स. १८०४ मध्यें मुंबई येथील इंग्रजांच्या आरमारी सैन्याचे अधिपति पिटर रेनियर ह्यांनीं मुंबईचे गव्हर्नर नामदार जोनाथन डंकन ह्यांस जमशेटजी बमनजी ह्याच्याबद्दल जें एक शिफारसपत्र लिहिलें आहे, तें उपलब्ध झालें आहे. त्यावरून जमशेटजीची योग्यता व कर्तबगारी चांगलीच व्यक्त होते. हें पत्र येणेंप्रमाणें:—

"The Honorable Jonathan Duncan, Governor in Council,
Bombay Castle.

Honorable Sir,

During the period in which I have had the honor to command His Majesty's squadron in India, which now embraces a space of nearly ten years, I have necessarily had frequent occasion to visit your Presidency as the only station to which the naval force in this country can resort, with a certainty of deriving a prompt and ample supply of those manifold and extensive wants which the nature of the maritime service at all times requires.

In bearing a due testimony to the zeal and alacrity which have distinguished those departments under your Government, with which my situation has led to frequent and important intercourse, it may, I trust, be permitted to me to bring more pointedly to the notice of your Honorable Board, the very able and meritorious assistance at all times derived by my squadron from the exertions of the builders department, under the immediate management of Jemsatjee Bomanjee and Framjee Manockjee, and their sons Nowrojee Jemsatjee and Nowrojee Framjee.

It is wholly unnecessary for me, Honorable Sir, to enlarge on the great ability displayed by those men ( but particularly Jemsatjee Bomanjee ) in the various branches of their professional duties, or to state to you their value to this most important naval station, as the numerous specimens they have already exhibited of their talents in the science of naval architecture will always form their best panegyric. I cannot, however, pass over, unnoticed, a further essential merit they possess, and which with those who have had less occasion than myself to view them in the discharge of their duties, might frequently not attract particular notice. I allude to their indefatigable zeal, activity and perseverance on those occasions, where the nature of the service has called for more than ordinary energy and exertion on their part; and I can with truth assert, that their conduct has not only claimed my highest approbation, but likewise been productive of a great national benefit.

Thus impressed with a sense of the important assistance rendered by these men to the naval department in India, I have already borne testimony thereof in my correspondence with the Honorable the Lords Commissioners of the Admiralty. I also feel it a duty incumbent on me to recommend them to the particular favour and protection of your Government, and to suggest the policy of conferring on them some public mark thereof, as a distinction that may at once prove gratifying to themselves, as well as the means of securing a continuance of their fidelity and attention to the duties of their departments. If I may be allowed to point out what manner this distinction could be most effectually bestowed, I would recommend that government should assign to them a small portion of batty ground, either on this island or that of Salsette, to be considered as an hereditary possession, which I have reason to believe, would be received by them as a very flattering and honorable assurance of the countenance and approbation of Government."

I have the honor to be,

Honorable Sir,

your most obedient, humble servant.

TRIDENT, BOMBAY HARBOUR.
*the 12th Feb. 1804.*

(Sd.) PETER RAINIER.

इ. स. १८०५ मध्यें मुंबई येथें आणखी नवीन दोन गोद्या तयार करण्यांत आल्या. त्यांचें काम कॅप्टन कौपर ह्यांच्या देखरेखीखालीं तडीस गेलें, ह्मणून त्यांस 'कूपर साहेबांच्या गोद्या' असें ह्मणत असत. ह्या गोद्या तयार झाल्यानंतर तेथें जमशेटजी ह्यांनीं 'मिंडेन' ह्या नांवाचें ७४ तोफा ठेवण्यासारखें एक अतिशय उत्कृष्ट व नमुनेदार जहाज तयार केलें. त्याचें बांधकाम, त्याचा प्रमाणशुद्धपणा, त्याची बळकटी आणि त्याचा सुबकपणा इत्यादि गुण पाहून, तो एक आरमारी कलाकौशल्याचा मासला आहे, असें इंग्लंडांतील नामांकित नौकापरीक्षकांनीं ठरविलें, आणि ब्रिटिश राज्यामध्यें अशा प्रकारचें दुसरें एकही जहाज तयार झालें नाहीं, असें प्रांजलपणें कबूल केलें. अर्थात् ह्या अप्रतिम कर्तबगारीबद्दल जमशेटजी ह्यांची कीर्ति युरोपखंडामध्यें अतिशय प्रसृत झाली; एवढेंच नव्हे तर सर्व इंग्रजी जहाजें मुंबई बंदरामध्येंच बांधून घ्यावींत, अशी वाटाघाट तिकडे सुरू झाली. मि० जमशेटजी ह्यांनीं मुंबई येथें बांधलेल्या 'सालसेट' व 'मिंडेन' ह्या दोन जहाजांबद्दल, इंग्लंडमधील मोठमोठ्या दर्यावर्दी लोकांनीं आपले फार अनुकूल अभिप्राय व्यक्त केले. ते मि० जमशेटजी ह्यांस अतिशय भूषणास्पद असून, ते येथें दिल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. ते येणेंप्रमाणेंः—

व्हाइस-ॲडमिरल सर एडवर्ड पेल्यू ह्यांनीं ता. २५ डिसेंबर इ. स. १८०९ रोजीं 'सालसेट' जहाजाबद्दल आपलें पुढीलप्रमाणें मत दिलें आहेः—

"I beg to make Jemsatjee proud of his frigates. The Salsette sails as well as any of ours, stands up better under canvas, and, had any other ship been frozen up in the Baltic as she was, for nine weeks, Captain Bathurst says she would not have stood the buffeting of the ice one day, whereas the Salsette came off unhurt. It was wonderful the shocks she resisted during heavy gales".

नेव्हल कमिशनर मि० डंडास ह्यांनीं इंग्लंडच्या आरमाराकरितां बांधलेलें पहिलें लढाऊ गलबत 'मिंडेन' ह्याबद्दल पुढील मत प्रदर्शित केलें आहेः—

"In replying to your letter of yesterday's date, wherein you request I would state my opinion of the construction and finishing of H. M. ship Minden, I beg to say, that on my arrival here in May, 1809, I visited the Minden with an earnestness and carefulness of enquiry, that I considered due to the undertaking; at the period of forwardness I first viewed the ship, her principal timbers were all open to inspection ; with such timbers I conld

not but be highly delighted, as certainly very many of them I have not seen equalled in the building of any ship in England; the mode of securing the beams by dove-tailing them into strong clamping planks (a method not used in King's yard) gave me much satisfaction, as much strength is thereby given to the ships. As the work was carried on towards completion, I continued daily watching the progress, and must declare was at all times pleased with the solidity of the work, as well as with the manner of its being put out of hand; and I can have no difficulty in giving it as my opinion, that she will be found to be as well put together, and as highly finished, as any ship built for the British Navy. I can only add my hopes, that while the Minden remains a proud proof of what may be expected from Bombay, she will add to that credit the builder has already gained in the opinion of those who, having had opportunities, are capable of setting a just value on his abilities".

ह्याप्रमाणें मि० जमशेटजी ह्यांनीं मुंबई येथें बांधलेल्या 'सालसेट' व 'मिंडेन' ह्या दोन जहाजांबद्दल नामांकित लोकांचे उत्तम अभिप्राय आले. तथापि ह्या जहाजांची कसोशीनें परीक्षा घेण्याकरितां आरमारखात्याच्या सेनापतींनीं कॅप्टन एस्. डब्ल्यू. होअर नामक एका नौकानयनकुशल गृहस्थाची योजना केली. त्यानें इंग्लंडच्या आरमारखात्याचें मुख्य जहाज जें 'रसेल' त्याची, व मुंबईत बांधलेलें जहाज 'मिंडेन' ह्याची, समुद्राच्या वेगवेगळ्या सफरी करून पूर्णपणें परीक्षा केली; आणि 'रसेल' जहाजापेक्षां 'मिंडेन' जहाज अनेक गुणांनीं श्रेष्ठ आहे, असें स्पष्टपणानें आपलें मत दिलें. ईस्ट इंडिया कंपनीस तें मत विशेष ग्राह्य वाटून, त्यांनीं या विषयासंबंधानें अधिक चर्चा केली; आणि मुंबई येथील दर्यावर्दी खात्याचे सुपरिंटेंडन्ट मि० मनी ह्यांजकडून अधिक खुलासेवार माहिती मागितली. त्यांनीं इ. स. १८११ मध्यें एक सविस्तर आणि उत्कृष्ट रिपोर्ट सादर करून, मुंबईस जहाजें बांधण्यामध्यें उत्तम लांकूड, स्वस्त मजुरी, आणि मजबूत बांधकाम इत्यादि अनेक फायदे होतील, व मुंबईच्या कारखान्याचा विशेष अभ्युदय होऊन व्यापारी दृष्टीनें त्यामध्यें फार यश येईल, असें आपलें मत दिलें. ह्या रिपोर्टामध्यें त्यांनीं लौजीचा कारखाना मुंबईत आल्यापासून जहाजें बांधण्यास लागणाऱ्या सागाच्या लांकडाचा व्यापार अतिशय भरभराटीस आला, व त्याचें सर्व श्रेय लौजी व त्याचे वंशज यांजकडे आहे, असें कबूल केलें. आणि जहाजें बांधण्याच्या कामासंबंधानें असे उद्गार काढिले कीं, "जमशेटजी बमनजी ह्यांच्या अंगीं उत्तम जहाजें बांध-

ण्यास लागणारें कौशल्य व सामर्थ्य पूर्णपणें वसत असून, तें काम त्यांच्या हातून निःसंशयपणें सिद्धीस जाईल. त्यास लागणारी सर्व सामुग्री त्यांस अनुकूल असून, त्यांच्या हाताखालीं काम करण्यास त्यांचा मुलगा नवरोजी व दुसरे एक हजार कारागीर तत्पर आहेत. त्या अर्थीं ईस्ट इंडिया कंपनीचीं जहाजें मुंबई येथें तयार केल्यास सर्व गोष्टी अनुकूल अशाच आहेत."

ह्यावरून इ. स. १८११ पर्यंत तरी लौजी व त्यांचे वंशज ह्यांचा जहाजें बांधण्याचा कारखाना उत्तम स्थितीप्रत पोंचला होता ह्यांत शंका नाहीं. इ. स. १८१६ मध्यें एक हजार टनांचीं नऊ जहाजें, ८०० टनाचीं पांच, ७०० टनाचीं व ६०० टनाचीं पांच, व त्याशिवाय ३५ लहान होड्या बांधण्यांत आल्या होत्या. ह्यावरून हा कारखाना बरेच दिवस भरभराटींत होता, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. इ. स. १८२९ मध्यें मुंबई येथें 'ह्यू लिंडसे' ह्या नांवाची पहिली स्टीमर बांधण्यांत आली. त्यानंतर आगबोटीचें प्रस्थ विशेष माजून, मुंबईचा जहाजें बांधण्याचा कारखाना हळहळू खालावत चालला, आणि आज मितीस त्याचें नांव देखील अस्तित्वांत राहिलें नाहीं !

ह्या अल्प माहितीवरून हिंदुस्थानामध्यें जहाजें बांधण्याची कला, प्राचीन काळींच नव्हे, तर अर्वाचीन काळीं देखील, किती अत्युच्च स्थितीस पोंचली होती, तें चांगलें दिसून येतें. ह्या कलेमध्यें एक पारशी घराणें उदयास येऊन त्यानें मुंबईचें नांव किती पुढें आणिलें व विलायतेच्या लोकांवरही कशी छाप बसविली, ही मनन करण्यासारखी गोष्ट आहे. परंतु इतिहासाच्या अभावामुळें ह्या घराण्याची माहिती लुप्त होऊन, मुंबईच्या कलाकौशल्याची ही मनोरंजक हकीकत कोणाच्याही स्मरणांत राहिलेली नाहीं. अशा विषयांची अधिक माहिती प्रकाशांत येईल, तर तिचा केवढा उपयोग होईल बरें ?



विजापूरचा बोल घुमज.

# विजापूर येथील बोल गुमज.

विजापुरचा सुप्रसिद्ध बादशाहा सुलतान महमूद (इ. स. १६२६–१६५६) ह्यानें आपल्या कारकीर्दीमध्यें विजापूर येथें एक अपूर्व मकबरा बांधिला, त्यास 'गोल घुमज' किंवा 'बोल गुमज' असें ह्मणतात. हा मकबरा वर्तुलाकार आहे ह्मणून त्यास 'गोल' असें नांव पडलें आहे; व त्यांतून उत्तम प्रतिध्वनि निघतो ह्मणून त्यास 'बोल' ह्मणजे बोलणारा गुमज असेंही ह्मणतात. ही इमारत विजापूर शहराच्या पूर्वेस उंच जागीं असून, ती फारच प्रेक्षणीय आहे. ही इमारत बांधण्यास दहा वर्षें लागलीं, अशी दंतकथा आहे. ही इमारत चौकोनी असून तिच्यावरील घुमट फार प्रचंड आहे. ह्या इमारतीची प्रत्येक बाजू १३५ फूट लांब असून, घुमटापर्यंतची तिची उंची १७८ फूट आहे. ह्या इमारतीचें क्षेत्र १८२२५ फूट असून तें रोम येथील 'पँथियन' (Pantheon) ह्या सुप्रसिद्ध इमारती पेक्षां $\frac{1}{2}$ नें अधिक आहे. ह्या इमारतीचें बांधकाम फार भव्य व प्रेक्षणीय असल्यामुळें तिचें वर्णन मोठमोठ्या युरोपियन लोकांनीं केलेलें आढळून येतें.* एका फारसी बखरीमध्यें तिची माहिती

---

*मि० मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन ह्यांनीं ह्या बोल गुमजाचें वर्णन येणेंप्रमाणें लिहिलें आहे:—

"Bijapur, June 10—In the morning I set out with a party to see the great dome, that is, the tomb of Mahmood Adilshah. We rode through the modern village and the deserted streets of the ancient city, passed the citadel, which has a double rampart and a moat, enclosing numerous and magnificent palaces, now in a state of ruin and decay. The courts seem overgrown with trees and choked with weeds, and everything looks dismal and forlorn. After a ride of two miles or more, we reached the tomb, the outside of which, when near, is inferior to Humayun's. Inside it is spacious, lofty and solemn. It is dimly lighted through the broken dome of a chapel joined to one of the large arches. Men look quite diminutive as they walk under this vast cupola, and the sound of their feet makes a strange whispering amidst the echoes of the dome. This swells when people speak into a sound like the chanting of a distant choir. I think this hall is larger than Humayan's, and it is certainly simpler, and inspires more awe. There are none of the apartments that surround the other; you step from the open air at once into the hall.

The whole is almost entirely devoid of ornament, and at first sight seems unfinished. In the centre is a very wide terrace, on which are the tombs. We ascended into the whispering gallery, which is 105 feet above the pavement and 123 in diameter. The distance is considerable in itself, and there is something in the dome overhead, in the vacant space between and in the imperfect light, that increases the effect, and makes a group of figures seen across the dome, seem remote and diminished. The voice heard with remarkable distinctness, but the power of the whispering gallery

पुढें लिहिल्याप्रमाणें आमचे वाचण्यांत आली आहे, ती येथें देण्यासारखी आहे. त्यावरून जुन्या बखरीमध्येंही सुप्रसिद्ध ऐतिहासिक स्थलांचा उल्लेख करण्याचा परिपाठ होता असें दिसून येतें. पौर्वात्य व पाश्चात्य लेखक ह्यांच्या वर्णनशैलीमध्यें किती अंतर असतें, तें पुढील उतारा वाचून वाचकांच्या सहज लक्षांत येईल.

"सुलतान महमद पादशाहा यांनीं जिवंतपणीं घुमच ह्मणजे घुमट बांधविला त्या प्रकर्णीं वर्णनः—

तो गुमट अशा प्रकारचा आहे कीं, आकाशाप्रमाणें उंच व कालचक्राचे पदवीचा ह्मणजे अति उंच बांधणावळीचा आहे. त्या गुमटाची इमारत व डौल फार नादर ह्मणजे अति उत्तम आहे. कारण कीं, दक्षिण देशाचे तुकडींत हिंदुस्तानचे मुलकांत देखील अशी उत्तम इमारत दुसरी नाहीं. बहुधा पृथ्वींत फिरणारे प्रवासी व जगांत फिरणारे लोक, पृथ्वींतील चहूंकडील मुलकांतून येतात व जेव्हां तो गुमट पाहातात, तेव्हां त्या गुमटाचें उत्तम प्रकारचें डौलदार व चमत्कारिक बांधकाम पाहून अति संतोष मानितात, व फार आश्चर्यचकित होऊन, ह्या पृथ्वींत असा गुमट बांधिलेला नाहीं, असें बोलतात. ह्या गुमटाची उंची व थोरवी, कारागिरी व डौल अशा प्रकारचा आहे कीं पाहाणारास फार कौतुक वाटतें. प्रत्येक मनुष्य, लहान असो कीं वृद्ध असो, त्यास या गुमटांत आल्यानंतर शब्द करण्याची प्रेरणा होते. त्या शब्दांचा प्रतिध्वनि ह्या गुमटांतून हुबेहूब ऐकूं येतो. त्यामुळें सर्वांस फार नवल वाटतें. कोणत्याहि पर्वतासन्निध, खोल विहिरीमध्यें किंवा तलावांत, मोठ्यानें आवाज केला, तर त्याचा प्रतिध्वनि उमटतो. परंतु ह्या गुमटांत मनुष्याचा आवाज ज्याप्रमाणें हुबेहूब ऐकूं येतो, त्याप्रमाणें दुसऱ्या ठिकाणीं प्रतिध्वनि होऊं शकत नाहीं, हा येथें फार चमत्कार आहे. ह्या गुमटाचे दरवाजावर एक धोंडा लोखंडाचे सांखळींत बांधून लोंबविला आहे. त्या धोंड्यास विजेचा धोंडा ह्मणतात. तो धोंडा सर्वप्रसिद्ध आहे. त्या धोंड्याचा गुण हा आहे कीं, विजेच्या उपद्रवापासून तो इमारतीचें संरक्षण करितो".



---

is very small compared to that of St. Paul's. We now went out on the terrace, and remained long admiring the view of the town and surrounding country. The morning was cloudy, with showers and gusts of wind; and from the east, which is the most sheltered side of the tomb, the view extended over the broken ramparts, and a few scattered tombs just beyond it, to a wide waste of naked plain, that accorded with the feelings of loneliness and desolation which the situation was calculated to inspire."

# ५. औरंगजेब बादशाहाची एक अत्यंत महत्त्वाची सनद.

औरंगजेब बादशाहा हा अतिशय धर्मवेडा असून, हिंदुधर्माचा फार द्वेष्टा होता असें इतिहासांत प्रसिद्ध आहे. त्यानें हिंदुधर्मीयांचा अनेक रीतीनें छळ केला व त्यांच्यावर जेझिया नांवाचा अत्यंत जुलमाचा करही बसविला; आणि अनेक ठिकाणचीं हिंदुदेवालयें व त्यांतील मूर्ति छिन्नविच्छिन्न करून, तेथें यवनधर्माच्या प्रसाराकरितां मशिदी संस्थापित केल्या, वगैरे गोष्टी त्याच्या चरित्रांत नमूद आहेत. खुद्द हिंदुलोकांचें पवित्र क्षेत्र जें बनारस, तेथें त्यानें वेणीमाधवाचें जुनें देवालय मोडून मशीद बांधली, ती अद्यापि प्रसिद्ध आहे. ह्या मशिदीचे उंच मनोरे औरंगजेब बादशाहाची स्वधर्मनिष्ठा व हिंदुधर्माबद्दलचा द्वेष, जणूं अद्यापि जगजाहीर करीत आहेत, असें भासतें. ह्या मशिदीचें नांव 'माधवजी का देवडा' असें प्रचलित आहे. अर्थात् ह्या त्याच्या कृतीवरून औरंगजेब बादशाहा हिंदुलोकांशीं समतेनें व सहानुभूतीनें वागत असेल, अशी कोणास सहसा कल्पना करतां येणार नाहीं. परंतु त्याच्या संबंधाचे जे अस्सल कागदपत्र नवीन उपलब्ध होत आहेत, त्यांवरून औरंगजेबाबद्दल इतिहासांत असलेलें ठाम लोकमत बदलण्याचा प्रसंग येईल, असें दिसून येतें. कलकत्ता येथील 'एशियाटिक सोसायटीचे' सभासद बाबू रजनीरंजन सेन यांनीं औरंगजेब बादशाहाच्या एका जुन्या सनदेचा शोध लाविला आहे. ती सनद फार महत्त्वाची असून, ती बनारस येथें 'मंगळागौरी' मोहल्यामध्यें राहणाऱ्या कोणी गोपी उपाध्याय नांवाच्या एका ब्राह्मणाजवळ होती. हा ब्राह्मण पंधरा वर्षांपूर्वीं मृत्यु पावला. त्याला औरस मुलगा नसून फक्त एक कन्या होती. तिला मंगल पांड्ये या नांवाचा एक मुलगा आहे. त्यास गोपी उपाध्याय याचे सर्व कागदपत्र मिळाले. त्यांत ही सनदही मिळाली. मंगल पांड्ये हा एक घाटिया पुजारी असून, तो गंगास्नानास येणाऱ्या यात्रेकरू लोकांस संकल्प सांगून आपला चरितार्थ चालविणारा एक गरीब मनुष्य आहे. त्याचा व कांहीं बनिया लोकांचा घाटावरील वृत्तीबद्दल तंटा उपस्थित झाला, व त्यानें काशीचे कोतवाल खानबहादूर शेखमहंमद तयब यांजकडे फिर्याद केली. त्या फिर्यादीच्या पुराव्यासाठीं कोर्टामध्यें मंगल पांड्ये ह्यानें जे कागदपत्र हजर केले, त्यांत ही सनद होती. ही पिंवळसर रंगाच्या जुन्या कागदावर लिहिलेली असून, ती सुरक्षित राहिलेली आहे. तिची लांबी २ फूट १०॥ इंच असून, रुंदी १ फूट १॥ इंच आहे. तिजवरील मजकूर काळ्या शाईनें लिहिलेला असून, तिच्यावर औरंगजेब बादशाहाचा व शाहजादा सुलतान महंमद बहादर याचा असे दोन शिक्के आहेत. ही सनद अबुलहसन

नांवाच्या इसमास लिहिलेली असून, ती सुलतान महंमद बहादर याच्या मार्फत रवाना जाहलेली आहे. ह्या सनदेंत जो मजकूर आहे, त्यांतील सारांश येणें-प्रमाणेंः—

"बादशाही कृपेस व दर्शनास पात्र जो अबुल हसन ह्यानें बादशाही औदार्यावर दृष्टी देऊन असें जाणावें कीं, आमच्या हृदयांत जी सहानुभूति व जें औदार्य वसत आहे, तेणेंकरून आमचे अखिल परिश्रम आणि सर्व सद्धेतू प्रजेचें कल्याण करावें आणि लोकांची स्थिति सुधारावी ह्यांमध्यें गढून गेलेले आहेत. ह्मणून आमच्या पवित्र धर्मास अनुसरून, आह्मीं असा ठराव केला आहे कीं, जुनीं देवालयें पाडून टाकावयाचीं नाहींत आणि नवीन देवालयें बांधूं द्यावयाचीं नाहींत. आमच्या न्यायी राज्यांत आह्मांस असें जाहीर झालें आहे कीं, कांहीं दुष्ट व मत्सरी लोकांनीं, बनारस येथील व आसपासच्या दुसऱ्या कांहीं ठिकाणच्या हिंदु लोकांस फार त्रासवून सोडिलें आहे, आणि देवालयांचे संरक्षक जे कित्येक ब्राह्मण लोक आहेत, त्यांना देवालयांतून घालवून देण्याचा प्रयत्न चालविला आहे. ह्या जुलुमामुळें सर्व हिंदु लोकांमध्यें फार हाहाःकार झाला आहे. ह्मणून आह्मी तुह्मांस अशी आज्ञा फरमावितों कीं, ह्यापुढें कोणीही इसमानें, ब्राह्मणास किंवा दुसऱ्या हिंदु रहिवाशास, कोणत्याहि प्रकारें त्रास देऊं नये, किंवा त्यांच्या धर्मास हरकत करूं नये. एवढेंच नव्हे तर, त्यांना त्यांच्या वृत्तीचा शांततेनें उपभोग घेऊं द्यावा, आणि आमच्या ईश्वरदत्त आणि चिरकाल टिकणाऱ्या राज्याबद्दल परमेश्वराजवळ अहर्निश अभिष्टचिंतन करूं द्यावें. हें काम फार महत्त्वाचें आहे असें समजावें. चंद्र १५ जमादिसानी सन १०६४."

या सनदेवरून औरंगजेब बादशाहास हिंदुप्रजेबद्दल चांगली सहानुभूति असून, तिला समतेनें व न्यायानें वागविण्याची सद्बुद्धि त्याच्या अंतःकरणांत वास करीत होती, असें मानणें भाग आहे. अशा प्रकारचे महत्त्वाचे अस्सल कागदपत्र अधिक उपलब्ध झाले, तर औरंगजेब बादशाहाच्या चरित्रावर अगदीं वेगळा प्रकाश पडेल यांत शंका नाहीं.



## ६. गायनकलेस उत्तेजन.



पुणें येथें नाना फडणविसांचे कारकीर्दींत, गायनकलेमध्यें निष्णात असे गवई व कळावंतिणी ह्यांचा संग्रह करण्याचा बराच प्रयत्न झाला होता, अशी आख्यायिका प्रसिद्ध आहे. दिल्ली, लखनौ, हैदराबाद व कर्नाटक ह्या प्रांतांतून

गायनकुशल व संगीतशास्त्रनिपुण असे लोक मोठमोठे पगार व बक्षिसें देऊन पुण्यास आणवीत असत, असें दिसतें. ह्या कामासाठीं राजकारणकुशल असे मराठ्यांचे परदरबारांतील वकील मुद्दाम प्रयत्न करीत असत, हें समजून कोणासही क्षणभर कौतुक वाटल्यावांचून राहणार नाहीं. पेशव्यांचे निजामाच्या दरबारांतील वकील गोविंदराव काळे ह्यांनीं ह्या बाबतींत नानांस लिहिलेलें पुढील पत्र वाचण्यासारखें आहे.

श्री.

"स्वामींचे सेवेसीं विज्ञापना:–

प्रयागचा भवयाचा पोर एक नवा आला आहे. त्याजबराबर सरंजाम गाण्याचा चांगला, पसंद पडावयाजोगता. त्यास पुण्यास येण्याविषयीं विचारिलें. दरमाहा तिनशें रुपये करार करावे लागतात. स्वामी ह्मणतील 'तीनशें रुपये दरमाहा भारी.' त्यास, सरंजाम तसाच आहे. पुण्यास आल्यावरी मर्जी असेल तितके दिवस ठेऊन पुढें निरोप द्यावयास येईल. हजार बारासें खर्च दो चौ महिन्यांचा पडला, तरी तितक्यांत गुणमाहात्म्य ध्यानांत येईल. कलम १.

चंद्री कळवंतीण सांप्रत गाण्यांत, नाचण्यांत, सुरतींत, हावभाव बतावणींत, येथें सर्व दौलतदारांचे पसंतींत आहे. ह्मणून तिची चालही उमदीच पडली आहे. आमच्या पाहण्यांत आले पुणियास बराबर घेऊन यावी असेंही मनांत आहे. परंतु रावरंभा निंबाळकर दोन हजार रुपये दरमाहा देतात. आमचे मतें हजार रुपये दरमाहा घेऊन येत असलिया आणावी. त्यास, येविशीं आज्ञा यावी. त्याप्रमाणें तीसीं बोलावयास येईल. कलमें दोन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति." कलम १.

## ७. पेशव्यांच्या शादीचा टिपूस पोषाख.

म्हैसूरचा प्रसिद्ध टिपू सुलतान हा मराठ्यांचा प्रबल प्रतिपक्षी होता हें इतिहासांत प्रसिद्धच आहे. परंतु पुण्याचा दरबार व श्रीरंगपट्टण येथील टिपूचा दरबार ह्यांच्यामध्यें औपचारिक व्यवहार त्या वेळच्या राजकीय पद्धतीस अनुसरून चालत असत. श्रीरंगपट्टण येथें पेशव्यांकडून कृष्णराव नारायण जोशी या नांवाचे वकील टिपूच्या दरबारीं असत, व टिपूकडून पुणेंदरबारांत नरसिंगराव या नांवाचे वकील असत. ह्यांच्या मार्फत सर्व दरबारी औपचारिक गोष्टी चालत असत. नानाफडणविसांनीं श्री० सवाई माधवराव पेशवे ह्यांच्या लग्नानिमित्त टिपूसुलतानास पोषाक पाठविला त्या प्रसंगाची हकीगत पेशव्यांचे वकील कृष्णराव नारायण जोशी ह्यांनीं नानांस लिहिली आहे. ती मनोरंजक आहे. ती येणेंप्रमाणें:–

## लेखांक १.

पै॥ छ ८ सफर. **श्री.**

"सेवेसीं कृष्णराव नारायण जोशी साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल त॥ छ १८ मोहरम मु॥ श्रीरंगपट्टणपावेतों वर्तमान यथास्थित असे. विशेषः– स्वामींनीं सांडणीस्वारासमागमें छ १९ जिल्हेजींचें पत्र व नबाबबहादर यांस शादीचीं वस्त्रें व जवाहीर रकमा व थैल्या श्रीमंतांकडून व खासगत पाठविल्या, त्या छ ११ मोह-रम मु॥ मजकुरीं पावून बहुत संतोष जाला. पत्रीं लिहिलें कीं, "शादीचीं वस्त्रें जवाहीर पाठविलें आहे. वस्त्रांची व जवाहीर रकमांची याद आलाहिदा आहे. त्याप्रमाणें तुह्मीं व राजश्री गोविंदराव व राजश्री नरसिंगराव मिळोन नबाबास आहेर करावा. वरकड तुम्ही पोहोंचून सर्व मसलतीचे अर्थ बोलण्यांत आलेच असतील. आदवनीचा हंगामा मना लौकर व्हावा, ह्मणजे नेमिले मसलतीचें सार्थक, निर्वेधपणें दुष्मानाचीं पारिपत्त्यें होतील. येविसींचे पर्याय जातेसमयीं तुह्मांस सांगितले आहेत. त्याप्रमाणें लौकर प्रत्ययास यावें" ह्मणून. ऐसियास आह्मी बागलकोट टाकून निघोन मजल दरमजल आलों. नबाबसाहेब यांचे जिल्हेयांत आल्यावर मार्गीं जागा जागा परामर्ष यथास्थित जाहला. छ १० मोहरमीं पट्टणानजीक येतांच, नबाबसाहेब यांणीं राजश्री श्रीनि-वासराव बरकी मातबर सरदार यांस पुढें सामोरें उलाडापर्यंत पाठवून, किल्ल्यानजीक कावेरीतीरीं बागेंत राहावयास जागा अगोदरच करविली होती. नजीक देवस्थान व मंडप अति उत्तम आहे. तेथें मशारनिल्हे यांणीं समागमें येऊन उतरविलें. भेटीस मुहूर्त छ १२ मिनहूस निश्चय करून सायंकालीं मातबरास पाठविलें. त्यास-मागमें चार घटका रात्रीस मंडळी व लोकसुद्धां सुसमयीं किल्ल्यांत गेलों. भेट जाहाली. भेटीचे समयीचीं वस्त्रें व शादीचीं वस्त्रें जवाहीर थैल्यांसहित निवेदन केलें. अत्यादरें स्वीकार केला. श्रीमंतांकडील व स्वामींकडील कुशलार्थ पुसोन उपचारिक भाषणें परस्परें जाहालीं. चार घटका दरबारांत होतों. नंतर निरोप देतेसमयीं बोलिले कीं, "कितेक मजकूर बोलावयाचे आहेत. त्यास, एकदोन रोजांनीं सूचना करूं, तेव्हां यावें. बोलणें होईल." याप्रमाणें बोलून निरोप दिल्हा. दुसरीं पत्रें छ २३ जिल्हेजीचीं आलीं, तीं छ १२ मिनहूस हजूर नबाबसाहेब यांजकडे गेलीं. त्यांणीं आपल्या थैल्या घेऊन, लखोटे आमचे आह्मांकडे पाठविले. त्या पत्रांतील मजकूर आदवनीचा विस्तारें करून होता. त्यास एकदोन रोजांनीं नबाबसाहेब बोलावतील, ते समयीं हाही मजकूर बोल-ण्यांत येईल. सांडणीस्वार ठेऊन घेतले आहेत. बोलण्याचा अभिप्राय सविस्तर मागाहून नबाब यांस पुसोन सुतरस्वारासमागमें लेहून पाठवूं. कळावें बहुत काय लिहिणें, कृपा लोभ केला पाहिजे हे विनंति."

## लेखांक २.

**श्री.**

"पुरवणी सेवेसीं कृष्णराव नारायण जोशी साष्टांग नमस्कार विनंति ऐसाजेः–

छ १४ मोहरम रविवारीं दुसऱ्यानें किल्ल्यांत नबाबसाहेब यांचे दर्शनास गेलों होतों. आपण सटवोजी भोंसले व मानाजी फाकडे व कोल्हापूरकर यांचा मजकूर व आदवनी तालुक्याविषयीं सांगावें ह्मणून पत्रीं लिहिलें होतें. त्याप्रमाणें तपशीलवार पत्रान्वयें अभिप्राय सांगितले. ते ऐकोन उत्तर केलें कीं, "मानाजी फांकडे यांचे चलन सुधें नाहीं. याकरितां त्यास येथून रजा दिल्ही. येथून कोल्हापुरकरांकडे जावयास आपण त्यास सांगितलें नाहीं. पेशजीं नरसिंगराव यांनीं देशीं असतां अर्जी पाठविली होती. त्यावरोन सटवोजी भोंसले व कोल्हापूरकर यांस मुजरदजासूदजोडीबराबर ताकीद पाठविली आहे. हालखुद राहतील." आदवनी तालुक्याचे म॥राचें उत्तर केलें जे, "बसालतजंग यांणीं इंग्रेजांसीं राजकारण करून गुंटुर तालुका पंधरावीस लक्षांचा त्यास देऊन इंग्रेज आदवनीस आणविले. हे बातमी आह्मांस कळतांच आपली फौज कडप्प्यानजीक होती त्यास ताकीद पाठविली. इंग्रेज आदवनीकडे येत होते, त्यास मार्गी लढाई होऊन इंग्रेजांस तंबी केली. माघारे फिरविले. ते गुंटुरास माघारे गेले. हल्लीं मागतीं इंग्रेजांनीं जमाव केला आहे. आदवनीस यावें याच तजविजेंत आहेत. इंग्रेज आदवनीस येऊन मकान बळकाविलें. तर श्रीमंतास व नबाबनिजामलीखांस हरे कीं काय? गुंटुराहून पेशजीं इंग्रेज आदवनीस यावयास लागले. हे खबर नबाब निजामअलीखां यांसही कळलीच होती. तिकडून फौज रवाना करून, इंग्रेजांचें पारिपत्य करून अदवनीचा बंदोबस्त कां केला नाहीं? असो. मदारूलमहाम यांचे खातरदास्त ऐकणें जरूर. तालुके मजकुरीं महसरा दिल्हा नाहीं. दोन अडीचशें स्वार मात्र आहेत. ते आणविले जातील. ह्मणोन बोलिले. कोल्हापूरकर व सटवोजी भोंसले वगैरे यांजवर सरकारांतून राजश्री रघुनाथराव मिरजकर दहा हजार फौजेनिसीं रवाना केलियाचें व फौजेंत नबाबबहादर यांचे तालुक्यांत उपद्रव न देणें ह्मणून ताकीद केली आहे. आपणांकडील कमाविसदार गैरवाका वर्तमान लिहितील यास्तव कळवावें, असें पत्र आपणाकडून आलें आहे, ह्मणून श्रवण केलें तें ऐकिलें. स्वामींस कळावें याकरितां लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

❧ ❧ ❧

## ८. मद्रास येथील फोर्ट सेंट जॉर्ज किल्ला.



फोर्ट सेंट जॉर्ज हें मद्रास येथील किल्ल्याचें नांव आहे. हा किल्ला मि० फ्रान्सिस डे नांवाच्या एका इंग्रज वखारवाल्यानें इ. स. १६४१ मध्यें बांधिला पूर्वी मद्रास हें गांव अस्तित्वांत नसून, इग्मोर, तोंडावाड्, आणि पुडुपाक य नांवाच्या तीन जागा, चंद्रगिरी येथील श्रीरंग रायलू नांवाच्या एका जमीनदाराच्या ताब्यांत होत्या. त्याजकडून व त्याचा भाऊ कोणी आयाप्पा नाईक हा पुनमली येथें राहात असे त्याजकडून, मि० डे यानें मद्रास येथें वखार बांधण्या-

साठीं कांहीं जागा मागून घेतली. तेथें पूर्वी कोळी लोक रहात असत व त्यास मदारसम्कूपम् असें नांव होतें. ती जागा प्रस्तुतच्या ट्रिप्लीकेन व रायापेठ या भागामध्यें होती. ही जागा व्यंकटप्पा नाईक याजकडून मिळाली ह्मणून त्यास मि० डे ह्यानें त्याच्या बापाचें चेनाप्पापट्टम् असें नांव दिलें. त्यावरून मद्रास नगरीस 'चिनाप्पापट्टम्,' 'चिन्नापट्टम्' किंवा नुसतें 'पट्टनम्' असें नांव अद्यापि चालू आहे. मद्रास ह्या नांवाची उपपत्ति मद्रसेन नांवाच्या कोळ्यापासून झाली असें कित्येकांचें ह्मणणें आहे. आणि कोणी ह्मणतात कीं, मद्रास याची उत्पत्ति 'मद्रेसा' ह्मणजे विद्यालय या फारसी शब्दापासून झाली. जेथें पूर्वी कोळी लोकांची वस्ती होती, तेथें सांप्रत मोठें नगर संस्थापित होऊन, मदारसम्कूपम्चें मद्रास हें विशाल नगर बनलें आहे.



## ९. हैदरानें आपला मद्रास येथील वकील विणाजी पंडित यांस लिहिलेलें एक पत्र.

विणाजी पंडित हा हैदराच्या वतीनें मद्रास येथील इंग्रजांजवळ वकील होता. हा मोठा धूर्त व चतुर मुत्सद्दी होता. ह्यास हैदरानें मराठ्यांच्या राजकारणासंबंधानें वेळोवेळीं अनेक पत्रें लिहिलीं आहेत. तीं उपलब्ध झालीं तर मराठ्यांच्या कर्नाटकांतील हालचालींचा खरा इतिहास अधिक प्रकाशित होईल. मद्रासकर इंग्रज हे हैदराविरुद्ध मराठ्यांस साहाय्य करणार, हें जेव्हां हैदरास समजलें, तेव्हां त्यानें विणाजी पंडित यांस अनेक पत्रें लिहून, मद्रासकर इंग्रजांस मराठ्यांना सामील न होऊं देण्याबद्दल पुष्कळ प्रयत्न केला. हैदरानें विणाजी पंडित यास लिहिलेल्या पत्रांपैकीं एक पत्र, मद्रास येथील मनाली चेन्ना केशवराव मुदलियार ह्यांच्या जुन्या कागदपत्रांत उपलब्ध झालें आहे. तें येथें मासल्यासाठीं दिलें आहे. हें पत्र अस्सल पत्राचें इंग्रजी भाषांतर आहे हें उघड आहे. तें आह्मी जसेंच्या तसेंच येथें देतोः—

"Letter from Hyder Ally Khan to Venajee Pandat.

I received the Governor's and Mr. Dupre's letter, and observe the contents, but could not understand any particular by it. Since a peace was concluded between me and the English, I think they should assist me against the Marattas if they were to march against me; I should in like manner assist the English if the Marattas were to march against them. As it was agreed that both should remain in union, it is better that

both should be of one mind; but it is not proper to keep one thing in heart, and to speak another by mouth. I received certain intelligence from some creditable persons in the Maratta Army, that their firm resolution is to come into the Carnatic, after the monsoon, with a design to get a large sum of money in these parts. It is not to be thought that they will decline coming into these parts; if I let them remain in possession of three or four places belonging to me, which they have already possessed, they certainly will come. As to my part, I am paying them every year the money agreed on. It is my opinion, if they come, their desire is to get a large sum of money from the English. If the English and I should act jointly and sincerely, it cannot be in their power to do anything. If the Marattas march against the English, I shall assist the English. The English should assist me, if the Marattas come against me; all these was agreed on before. If the Marattas come and act against me, the English will certainly say in that juncture, that they must write to Bombay and Bengal, and must hear from them to assist me; wherefore, if I know their intentions clearly at this time, it would enable me to consult proper measures for my future proceedings. While we both, the English and I, are friends, we should not give room for others to do anything. I write all these with a view of the mutual safety and welfare of the Company. I have force enough to retake three or four places the Marattas are in possession of as aforesaid. I lately requested the English to send me a battalion of Sepoys, thereby to make a trial of their intentions, whether they would assist me with their troops, according to their agreement, in case the Marattas began a war with me in future. I repeat that after the monsoon the Marattas will certianly come; and I hear their intention is to receive a large sum of money from the English; wherefore, if the English and I be in union to prevent their schemes, it will be for our safety. For all which we should talk face to face, and determine it; wherefore, I desire the Governor to send Moodookistna Moodeliar to me; you will also speak to his honour about it. I sent answers to the letters received; you will deliver them to the Governor and Mr. Dupre, and speak yourself in a proper manner. The Governor and Council may consult again upon the subject, and write me their real intentions clearly. You will, on your part, write me very fully."

ह्या पत्राचा सारांश येणेंप्रमाणेः–

" गव्हर्नरचें व मि० डुप्रे यांचीं पत्रें पोंचलीं. मजकूर पाहिला. परंतु त्यापासून विशेष बोध झाला नाहीं. इंग्रजांमध्यें व मजमध्यें तह झालेला आहे. त्यास अनुसरून त्यांनीं, मराठे जर माझेवर चालून येतील तर, मला मदत करावी. व उलटपक्षीं मींही त्यांस अशा प्रसंगीं मदत करावी. उभयतांनींही एकीनें राहावें. एकदिलानें असावें. मनांत एक ठेवून दुसरेंच बोलूं नये. मराठे सैन्यांतील कांहीं खात्रीचे इसमांकडून मला अशी बातमी लागली आहे कीं, बरसातीनंतर पैसा जमविण्याकरितां कर्नाटकांत मोहीम करण्याचा मराठ्यांचा इरादा आहे. त्याप्रमाणें ते येण्यास अनमान करतील असें समजूं नये. माझ्याकडून घेतलेलीं ३।४ ठाणीं मी जर तशींच त्यांजकडे राहूं दिलीं तर ते खास कर्नाटकांत जातील. माझ्याविषयीं ह्मणाल तर, मीं त्यांस ठरावाप्रमाणें दरसाल खंडणी देत आहें. माझें मत असें आहे कीं, त्यांची इच्छा इंग्रजांकडूनच जास्त पैसा मिळवावा ह्मणून ते इकडे येत असतील. इंग्रज व मी उभयतांही जर एकमतानें व निष्कपटपणानें वागलों तर मराठ्यांस कांहीं सुद्धां करतां यावयाचें नाहीं. मराठे जर इंग्रजांविरुद्ध चालून जातील तर मीं इंग्रजांस मदत करावी, व मजविरूद्ध जर ते येतील तर इंग्रजांनीं मला मदत करावी, असें ठरलेलें आहे. परंतु यदाकदाचित् जर मराठे, मजवर उठले, तर इंग्रज खात्रीनें ऐन प्रसंगीं ह्मणतील कीं, आह्मांस मुंबईस व बंगाल्यास लिहिलें पाहिजे, व नंतर मग आह्मीं काय मदत करावयाची ती करूं. आणि ह्मणूनच त्यांचा इरादा काय आहे तें मला आतां स्पष्ट समजलें पाहिजे. ह्मणजे त्याप्रमाणें मीं पुढें काय करावें, काय न करावें, ह्याचा मला विचार करण्यास सांपडेल. इंग्रज व मी स्नेही असतांनां इतरांनां वाटेल तें करण्यास सवड सांपडूं नये. परस्परांचा सुरक्षितपणा कायम असावा व कंपनी सरकारचें हित व्हावें ह्या हेतूनें मी हें पत्र लिहित आहें. वर सांगितल्याप्रमाणें मराठ्यांनीं जीं माझीं ३।४ ठाणीं घेतलीं आहेत तीं परत मिळविण्यास पुरेसें सैन्य मजपाशीं आहे. फौजेची एक पलटण मला मदतीस पाठवावी ह्मणून मीं नुकतीच इंग्रजांस विनंति केली आहे. हेतु हाच कीं, पुढेंमागें जर माझ्याशीं मराठ्यांनीं युद्ध सुरू केलें, तर इंग्रज मला मदत करितील कीं नाहीं ह्याची परीक्षा करावी. मीं पुन्हां सांगतों कीं बरसात झाल्यावर मराठे खास येतील. व त्यांचा इरादा इंग्रजांकडून पैका मिळवावा हाच आहे. तरी आतांच जर आह्मीं उभयतां एकमतानें त्यांचे विरुद्ध मसलत करूं, तरच त्यांत आमचा सुरक्षितपणा आहे. ह्या सर्व गोष्टींचा खल समक्ष झाला पाहिजे व काय तें ठरलें पाहिजे. ह्मणून माझी इच्छा आहे कीं, गव्हरनरनीं मुदुकृष्ण मुदलियार यास मजकडे पाठवावें व तुह्मींही त्यांस ह्या संबंधानें बोलावें. मीं पत्रांचीं उत्तरें यासोबत पाठविलीं आहेत. तीं तुह्मीं गव्हर्नरास व मि. डुपरे यांस पोंचतीं करावींत, आणि स्वतःही योग्य तो खुलासा करावा. गव्हर्नर व त्यांचें कौंसिल यांनीं ह्या विषयाचा पुन्हां विचार करून मला काय तें स्पष्ट खुलासा करून लिहावें. "

❦ ❦ ❦

स्वारीस गेले तर यांसीं झुंजतील. याप्रमाणें सविस्तर वर्तमान राजश्री पाटिल-बावांस समजलें. त्याजवरून जयपुराकडील वकील व डांक लष्करांत होती, त्यांस लष्करांतून काढून दिल्हें. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

पैवस्ती छ० २२ जमा-दिलाखर सबा.

## लेखांक २१२.

श्री. ११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री पाटिलबावांचे येथील वर्तमान तर, राजश्री माधवराव गंगाधर यांजवर इतराजी जाली. ते वेडे होऊन आपले घरास गेले. जिऊबा बक्षी याजवर इतराजी जाली. ते कैदेंत आहेत. त्यांजकडील बक्षीगिरीचें काम नौबतराय खत्री हिंदुस्थानी आगरेकर याजकडे सांगितलें. याजमुळें दरोबस्त फौज दिलगीर. एकदिली नाहीं. व पलटणाची व तोफखान्याची दरोबस्त मुख्त्यारी नौबतरायाकडे. सर्व कारभार फौजेचा मशारनिल्हेकडे दिल्हा आहे. याजकरितां सर्व दक्षिणी माणूस दिक आहे. हल्लीं मसलत ठरली आहे कीं, बाळोबा पागनीस यांजकडे दिवाणगिरीचें काम सांगावें. व जिऊबाची मुक्तता करून पुन्हां बक्षीगिरीचें काम त्यांचें त्यांजकडे सांगावें. परंतु उभयतांही कबूल करीत नाहींत. पुढें प्रत्ययास आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० २२ जमा-दिलाखर सबा.

## लेखांक २१३.

श्री. ११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. पातशाहांनीं लष्करांत पाजेश्री पाटिलबावांस पत्र लिहिलें कीं, फिरंगी याचे वकिलानें दिल्लीहून लष्करपावेतों व लष्कराहून लखनऊ-पावेतों सांडणीस्वारांची डांक बसविली आहे. त्यास लखनऊहून वर्तमान आलें कीं, कानपुरीहून दोन कंपू इंग्रेजांचे स्वार होऊन इकडे येणार; त्यास तुह्मीं गाफील न राहावें; व जयपुरकराकडे जावयाचा विचार करूं नये. तुह्मी जयपुराकडे जाऊन मसलतीस आटकाल, आणि आह्मी दिल्लीस आहोंत, येथें इंग्रेजांचीं पलटणें दाखल होतील. मग तुह्मांस दोन्ही मसलती सांभाळणार नाहींत. याजकरितां जें करणें तें बहुत समजून, दूरअंदेसीनें करावें. याप्रमाणें

पत्र लिहून पाठविलें आहे. पुढें अमलांत येईल, तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० २२ जमा- **लेखांक २१४.**
दिलाखर सबा. **श्री.** ११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसींः–

विनंति ऐसीजे. कर्क पाहसू पाद्री साहेब इंग्रेजांकडून राजश्री पाटिलबावांपासीं आला होता. त्यांची आज्ञा घेऊन दिल्लीस आले. पातशाहांची मुलाजमत जाली. साता पारचांचा खिलत, जेगा, शिरपेंच, मोत्यांची कंठी, समशेर, हत्ती, घोडा, येणेंप्रमाणें द्यावें ह्मणून लिहून पाठविलें. त्याप्रमाणें इनायत जाली. तत्क्षणीं पातशाहांनीं मशारनिल्हेस आज्ञा केली कीं, "तुह्मीं कूच करून लष्करांत राजश्री पाटिलबावांपासीं जावें." त्यास मशारनिल्हेनीं पातशाहास विनंति केली कीं, कांहीं दिवस राहून मग जाईन. याप्रमाणें बोलून दिल्लीस राहिले आहेत. चार पांचशें उंट खरीदी करून दिल्लीपासून तों लखनऊपावेतों डांक बसविली आहे. याप्रमाणेंच पुढेंही सांडणीयांची डांक कलकत्त्यापावेतों बसवावी, ह्मणोन श्रवणांत आलें. वकीलमजकूर सबदरजंगाचे हवेलींत दिल्लीस आहेत. हें वर्तमान सर्व राजश्री पाटिलबावांस विदित आहे. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पै॥ छ २२ जमादिलाखर **लेखांक २१५.**
सबा. **श्री.** ११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसींः—

विनंति ऐसीजे. लाडोजी देशमुख पुणेकर सितोळे राजश्री पाटिलबावांकडून मुख्त्यार शाहा निजामुद्दी ह्मणोन फकीर आहे. या उभयतांस लष्करांत पलवेलचे मुक्कामींहून बोलावूं पाठविलें. त्याजवरून पातशाहांनीं साता पारच्यांचा खिलत, बमय सरबस्ता पागोटें, व मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच, दोन घोडे, एक हत्ती, ढाल, तरवार, येणेंप्रमाणें सरंजाम देऊन, उभयतां कारभारी यांस लष्करांत रवाना केलें. लष्करांत दाखल जालियाचें वर्तमान आलें कीं, यांच्या त्यांच्या भेटी जाल्या. एक कोस सामोरा येऊन, शाहानिजामुद्दीस व देशमुखास घेऊन, पातशाहांनीं खिलत पाठविला होता तो घेऊन, उभयतांस समागमें घेऊन डेरियास दाखल जाले. शाहानिजामुद्दीस सात पारच्यांचा खिलत, व त्याचे पुत्रास

खिलत, व हत्ती, घोडा, जेगा, शिरपेंच, मोत्यांची कंठी, येणेंप्रमाणें पितापुत्रास देऊन, हमराई मुत्सद्दी पांच असामी त्यांस पांच पांच पारचे खिलत, व दोन शिरपेंच, येणेंप्रमाणें सन्मान करून, आपले डेरियास बिदा केलें. लष्करांत उभयतां कारभारी राहून, राजश्री पाटिलबावांची व यांची सल्ला ठरून पातशाहापासीं आले. व राजश्री पाटिलबावांनीं जयपुराकडे एक कूच केला आहे. पुढें घडल्यांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २१६.

पैवस्ती छ० २२ जमादिलाखर सबा.

श्री.

एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. लखनऊकडील वर्तमान तर, वजीर लखनऊस आहे. इंग्रेजाकडील पलटणें कानपुरीं होतीं. त्यांपैकीं एक कंपू कूच करून इटाव्यास आला. व लखनऊहून एक कंपू आणीख कानपुरीं गोरे वगैरे तोफा सुमार वीस येणेंप्रमाणं आले आहेत. परंतु आजपर्यंत आपले मुलखांतच आहेत. अनुपशहरकर राजा यांनीं सरकारचे तालुक्यांपैकीं आहारचे परगणियांत धामधूम करून, चार गांव मारले. व कलकत्त्यास इंग्रेज इष्टिनाची बदली आला आहे. लाट कलफदानश सितेन साहेब हेही कलकत्त्याहून कूच करून श्रीकाशीस येणार. जवांबख्त पातशाहाजादा यांची भेट श्रीकाशीस घेऊन, पुढें लखनऊस वजिराकडे येणार, ह्मणून वर्तमान आहे. राजश्री पाटिलबावा तूर्त पलवेलहून शाहानिजामुद्दी व लाडोजी देशमुख यांची बिदा दिल्लीस पातशाहापासीं करून, आज्ञा केली कीं, पातशाहा इंग्रेजांकडे कागदपत्र न पाठवीत, व त्यांचे व इंग्रेजांचे वकिलाचें एकांतीं बोलणें न होय, फितुर न करीत, ऐसा बंदोबस्त करून असावें. याप्रमाणें निर्वणूक करून, आपण कूच करून डिगेकडे गेले आहेत. डिगेस मुक्काम करून फौज जयपुराकडे रायाजी पाटलापासीं आणीक कुमकेस पाठवावी, व आपण तूर्त मास दोन मास जयपुरावरही दबाव व इकडे दिल्ली आगरेंहीं समीप, ऐसीं दोन्हीं नाकीं दाबून मुक्काम करून असावें, ऐसी मसलत ठराऊन, कूच करून डिगेकडे गेले. हुताशनी डिगेस करणार. पुढें विशेष आढळल्यास विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

पैवस्ती छ० २२ जमादिलाखर सबा.

## लेखांक २१७.

श्री.

११ एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. शाहा निजामुद्दी व लाडोजी देशमुख यांस दिल्लीहून राजश्री पाटिलबावांनीं बोलाऊन लष्करांत नेलें. पातशाहांनीं या उभयतांस पाठविलें. कारण कीं, सातमाही रुपये कराराप्रमाणें दरमाहा एक लक्ष तीसहजारप्रमाणें एकूण रुपये ८,४०,००० आठलक्ष चाळीस हजार रुपयांची तजवीज करून द्यावी, ह्मणून या दोघांस पाठविलें होतें. त्यास राजश्री पाटिलबावांनीं दोन लक्षांची नख्त निशा करून दिल्ही. व पांच लक्षांची तनखा मेरट वगैरेवर वरात करून दिल्ही. व बाकी एक लक्ष चाळीस हजार राहिले, याचा करार करून दिल्हा कीं, दो महिनियांत बेबाकी करून देऊं. याप्रमाणें करारमदार होऊन, कांहींजण जपसन ( ? ) वर्षगांटीचे व जडावलीचें साहित्य वस्त्रें पातशाहांस वगैरे देऊन, यांस दिल्लीचे मुख्त्यार शाहानिजामुद्दी व लाडोजी देशमुख यांस करून, दिल्लीहून पातशाहांनीं सात पारचे, खिलत व जेगा, शिरपेंच व मोत्यांची कंठी व हत्ती, घोडा व ढालतरवार, कलगी परगीरी, येणेंप्रमाणें घेऊन गेले होते. त्यास फरमानबाडी उभी करून छ० ५ मिनहूस खिलत घेतला, व शाहाजीस व देशमुखास यांचीं कामें काजें करून देऊन बिदा केलें. ते दिल्लीस दाखल जाले. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक २१८.

श्री.

एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ९ माहे रज्जब मुक्काम नजीक जयपूर सातकोस जाणोन स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः— आपण छ० ९ व छ. २७ व छ. २९ रबिलावलचीं तीन पत्रें व छ० १२ रबिलाखरचें एक पत्र एकूण चार पत्रें पाठविलीं, तें छ. १ रज्जबीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, "तिकडील वर्तमान वरचेवर लिहित जाणें, व संक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत, ते स्वीकारून पावलियाचें उत्तर पाठवावें." त्यास आज्ञेप्रमाणें शिरसा वंदून स्वीकारले. सनाथ जालों. व टिपूकडील वर्तमान, "राजश्री हरिपंत तात्या फौजसुद्धां टिपूभोंताले

फिरतात. दोन चार वेळां छापा घालावयास आला होता. परंतु सरकारचे फौजेनें टाळून राखिला. सावनूरकराचे लेंकाजवळून सावनूर फितूर करून टिपूनें घेतलें होतें, तें सरकारची फौज पायदळ जाऊन सावनूर सरकारांत घेतलें." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास हें सविस्तर पातशाहास निवेदन जाहलें. त्यावरून श्रीमंतांचे प्रतापाची बहुत वर्णना केली. "श्रीमंत प्रतापवान आहेत. शत्रूचें पारपत्यच करतील. व पूर्वापार पारपत्य मगरुरांचें करीतच आले आहेत." ह्मणोन बोलले. इकडील सविस्तर वर्तमान पुरवणी पत्रावरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक २१९.

**श्री.** एप्रिल इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. इकडील सविस्तर वृत्त पेशजीं छ० १६ जमादिलावलीं विनंतिपत्रें सेवेसीं पाठविलीं आहेत, तें पाऊन वर्तमान विदित जालेंच असेल. पूर्वी राजश्री पाटिलबावांची आज्ञा घेऊन दिल्लीस गेलों. तेथें जाऊन पातशाहांची मुलाजमत केली. सरकारचीं वस्त्रें, हत्ती घोडे, जवाहीर जो सरंजाम आणिला होता, तो पातशाहास गुजराणोन, त्याची रसीद व पत्रांचीं उत्तरें पातशाहांचे शुके घेऊन पेशजीं पाठविलींच आहेत; ते पावलेच असतील. त्याउपरी पातशाहांची आज्ञा घेऊन आह्मी राजश्री पाटिलबावांचे लष्करांत आलों. येथें येऊन जयपुरासमीप यांची भेट घेतली. समागमें आहोंत. अद्यापि कांहीं पोटाची सोय जाहली नाहीं. सोय जालियावर सेवेसीं विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक २२०.

पैवस्ती छ० २५ रमजान समान समानीन आषाढमास.

**श्री.** ९ जून इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २२ माहे साबान मुक्काम सारसा नजीक टोंक प्रांत जैपूर जाणोन स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं छ० १० माहे रज्जबचीं विनंतिपत्रें सेवेसीं पाठविलीं आहेत, त्यांजवरून सविस्तर श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, पातशाहा दिल्लीस आहेत. राजश्री पाटिल-

बावांस दोन तीन वेळां शुके लिहिले कीं, तुह्मीं डिगेहून पलीकडे जैपुराकडे न जावें. जैपूरचा मामला डिगेसच बनेल तैसा उरकोन घेऊन, याच मैदानांत मुक्काम करून असावें. ह्मणजे चहूंकडील बंदोबस्त राहेल. त्यास, राजश्री पाटिलबावांस रावराजा प्रतापसिंग यांनीं भर दिल्हा कीं, - जैपुरकरांनीं मामला दिल्हा तर उत्तम; नाहीं तरी जैपुर खाली करून घेऊं. त्याजवरून दरमजल जयपुरासमीप आले. त्यांनीं आपले वकील पाठऊन जाबसाल केला कीं, तूर्त चार लक्ष रुपये घ्यावे; बाकी तुमचा ऐवज राहिला, त्यास ( खुशालीरामास ) आमचे हातीं द्यावें; ह्मणजे आह्मी तुमचे मामल्याची बेबाकी करून देऊं. ह्मणून बोलणें जालें. त्यास यांनीं उत्तर दिल्हें कीं, पायमाली आह्मी मुजरा देत नाहीं. व खुशालीरामासही तुमचे स्वाधीन करीत नाहीं. साल हाल व साल गुदस्तची खंडणीची बेबाकी करून देणें. याप्रमाणें उत्तर जालें. त्याजवरून यांचा व जैपुरकरांचा बिघाड ठैरला. जैपुरकरांनीं आपले सरंजामी लोक पंचवीस तीस हजार जमा केले. व जोतपुरकरांचा व यांचा एक पेटा आहे. याजकरितां जोतपुरकराकडील पांच सात हजार स्वार कुमकेस आला आहे. एकूण सर्व फौज मिळोन, जैपुरकरांचा पस्तीस हजार जमाव जाला आहे. हें जाणून राजश्री पाटिलबावांनीं मसलत ठैराविली कीं, जैपुरासमीप आहों, हें ठीक नाहीं. याजकरितां पैस धरून, दरोबस्त जैपुरकरांच्या गढीबंदी कोटडीवाले सरंजामी लोक आहेत, त्यांची जागा जप्त करून, तमाम गढ्या काबीज करून, मग जैपुरासीं झटावें. याप्रमाणें मसलत ठैराऊन, जैपुरासमीप होते तेथून कूच करून नेवाईकडे आले. झिलाया व नेवाई वगैरे पांच सात गढ्या होत्या, त्या घेऊन सवा लक्ष रुपये खंडणी नेवाई व झिलाया येथील रयतीपासून घेऊन, ठाणेबंदी दरोबस्त करून, जैपुरास उजवें घेऊन, बुंदीचे रुखें जैपुरकरांचे मेड्यावर जैपूरकरांच्या गढ्या आहेत त्या घ्याव्या, ह्मणून तजवीज आहे. पुढें जें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, ही विनंति."

---

## लेखांक २२१.

श्री. जून इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. महमदबेग अमदानी जैपूरचे उत्तरेस सेकावताचे मुलकांत यांजकडून होता. त्यासीं जैपूरकरांचा संदर्भ लागून, त्यास दररोज तीन हजार रुपये राजांनीं करार करून त्यास आपलेपासीं चाकर ठेविलें. राजाच्या व मह-

मदबेग हमदानीच्या भेटी जाल्या. राजांनीं त्यास वस्त्रें, हत्ती, घोडा, जवाहीर देऊन सन्मान केला. हे वर्तमान ऐकून राजश्री पाटिलबावांनीं खुशालीराम बोहरा यांस राजे मानसिंग याची नायबत ह्मणून वस्त्रें, हत्ती, घोडा, जवाहीर मशारनिल्हेस दिल्हे. व आदतराम दिवाण यांस बोहराजीचीं नायबतीचीं वस्त्रें, जवाहीर दिल्हें. आणि राजे मानसिंग प्रतापसिंगाचे पुत्र वृंदावनीं होते, त्यांस डिगेस येणें ह्मणून बोलावूं गेलें आहे. व डिगेस मिर्जा रहिमबेग यांचे बंधु आहेत. त्यांस पत्रें गेलीं आहेत कीं, एक हवेली चांगली खाली करून, राजेमजकुरास राहावयास देणें, ह्मणून लिहिलें आहे. जोतपूरकर राजे यांजकडील वकीलही राणेखानभाई यांचे विद्यमानें बोलतात कीं, "हे दोनीं राज्यें हिंदूंचीं आहेत. आजपावेतों यवनांनीं देखील यांस बिघडलें नाहीं. त्यास तुह्मी हिंदू आहांत आणि आह्मी हेंच इच्छीत होतों कीं, हिंदूंचें राज्य व्हावें, आणि आमचे स्थळांचें संरक्षण व्हावें, हे इच्छा होती. त्यास तुह्मी आह्मांस राज्यभ्रष्ट करितां, हें ठीक नाहीं." आपले खंडणीचा ऐवज घेऊन, आमचे राज्यांतून फौज काढावी ह्मणून बोलतात. परंतु अद्यापि कांहीं ठरावांत आलें नाहीं. बोलणीं बाह्यात्कारीं बोलतात. परंतु रांगड्यांचा जमाव भारी जाला. हें जाणून राजश्री पाटिलबावा नेवाई व झिला यापासीं होते, तेथून पुढें जाणार होते. ते न जातां माघारा खुशालगडाकडे करोलीहून नवकोस अलीकडे येऊन मुक्काम केला आहे. येथून हिरा पेंढारा, व खंडेराव हरी व रायाजी पाटील व आंबाजी इंगळे वगैरे फौजा, जैपूर प्रांतीं घालून, मारून मुलूक ताराज करावा, हे सल्ला ठैराविली आहे. समागमें बाहीरबुणगें व बायका वगैरे बाजार बहुत होता. याजकरितां रांगड्यांसीं गांठ न घातली. माघारा येऊन, सड्या फौजा जैपूरप्रांतीं घालाव्या, याप्रमाणें सल्ला ठैरली आहे. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, ही विनंति."

---

पैवस्ती छ० ५ जिल्काद

## लेखांक २२२.

सन समान समानीन श्रावणमास. श्री. १२ जुलई इ. स. १७८७.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ० २६ माहे रमजान मुक्काम लालसोट प्रांत जैपूर जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष:– इकडील वर्तमान पेशजीं छ० २२ साबानीं विनंतिपत्रें पाठविलीं होतीं, तें पाऊन सविस्तर वृत्त श्रुत

जालेंच असेल. हल्लीं छ० २९ जमादिलाखरचीं आज्ञापत्रें पाठविलीं, तें छ० १४ मीनहूस पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, "पातशाहाचे स्वारीस निघावयाचें कैसें ठरलें, तें लिहून पाठवावें. व जैपूरकराकडील वर्तमान काय आहे, व इंग्रेजांचा वकील दिल्लीस आला आहे, त्याचें व पातशाहांचें बोलणें काय जालें, याचा शोध करून, पाटिलबावांकडे कधीं येणार, हें लिहून पाठवावें. इंग्रेजांचे कंपू दोन दोहों जागा आहेत. त्यांची चाल कशी काय करणार, हें लिहिणें. व पारसी येकबरा पाठविल्या, त्या पावल्या. मजकूर सर्व कळला. याप्रमाणें पुढें होत जाईल, तें वरचेवर लिहीत जावें. पातशाहाचे जाब शुके पाठविले, ते पावले." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास पातशाहा स्वारीस निघणार होते. त्यांजकडून पेशजीं शाहानिजामुद्दी राजश्री पाटिलबावांपासीं पिंगोरचे मुक्कामीं येऊन जाबसाल ठैराविला कीं, पातशाहांनीं स्वारीस न निघावें. जैपूरकरांचें पारपत्य पातशाहांचे एकबालेंकरूनच होईल. ह्मणोन शाहाजीसीं बोलून त्यांस दिल्लीस मार्गस्त केलें. हल्लीं पातशाहा दिल्लीसच आहेत. व जैपूरकर पेशजीं सा लक्ष रुपये देऊन सलूख करीत होते, त्यास हे गोष्ट राजश्री पाटिलबावांनीं न मानली. त्याजवरून त्यांनीं राजे बिजेसिंग जोतपूरकर यांस लिहून पाठविलें. त्याजकडून भीमसिंग नामें बक्षी त्यांचे फौजेचा, वीस हजार फौज समागमें घेऊन कुमकेस आला आहे. जैपूरकर व जोतपूरकर एकविचारें होऊन झुंजास सिद्ध जाले आहेत. त्यांचे फौजेसीं व आपले सडे फौजेसीं पांचा साता कोसांचा तफावत आहे. लढाई रूबकार आहे. तूर्त मामल्याचा कांहीं जाबसाल नाहीं. पुढें ठरेल तें विनंति लिहूं. व इंग्रेजांचे वकिलाचें व पातशाहांचें बोलणें शिष्टाचार घरोब्याचें मात्र उजागिरीचें बोलणें जालें. तो तेव्हांच पातशाहांची आज्ञा घेऊन, राजश्री पाटिलबावांचे लष्करांत आला होता. हें वर्तमान पेशजीं पत्रीं विनंति लिहिली होती. त्याजवरून श्रुत जालेंच असेल. इंग्रेजांचे कंपू दारानगरीं वगैरे आपले सरहद्देस आपले मुलकाचा बंदोबस्त करून आहेत. पुढें अद्यापि हालचाल कांहीं केली नाहीं. पारसी येकबरा हल्लीं पाठविल्या आहेत; त्यांजवरून वृत्त श्रुत होईल. वरकड वर्तमान पुरवणीपत्रावरून कळून येईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २२३.

**श्री.** आगष्ट इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:— छ. १८ माहे सव्वालीं राजे बिजेसिंग यांनीं सात हजार

सिंधी, भीमसिंग बक्षी यांचे कुमकेस पाठविले, ते लष्करांत राजे प्रतापसिंग याजपाशीं दाखल जाले, व राजे बिजेसिंग यांनीं राजश्री पाटिलबावांस पत्र पाठविलें होतें कीं, "आह्मी जमीदार आहोंत, आणि आपण वजीर आहांत. त्यास पूर्वापर तुह्मी आमचा प्रतिपाळ करीतच आलां आहांत. आह्मी तुमचे स्थापित आहोंत. याजकरितां कृपा करून, राजे प्रतापसिंग याजवर कृपालोभ करावा. तें मूल आहे. त्यांचे गुणदोषांवर दृष्टि न द्यावी. आह्मांवर दृष्टि देऊन पूर्वापर आमची स्थापना करीत आलां आहांत, तैसी आतांही स्थापनाच करावी." ह्मणोन लिहिलें होतें. याचें उत्तर राजश्री पाटिलबावांनीं काय लिहिलें, हें कांहीं समजल्यांत आलें नाहीं. याप्रमाणें पत्रें छ. १७ मीनहूस संध्याकाळीं आलीं; आणि सिंधी सात हजार त्याचे फौजेंत दाखल जाले. दुसरे दिवशीं संध्याकाळीं आपले कडील पलटणें त्याजकडे तोफा घेऊन उठोन गेलीं, व आपले फौजेंत रसद न ये. माहागाई रुपयाचें सा शेर अन्न! व तिकडील जमाव भारी जाणून, फौज हिरासा होऊन, माघारा बुणगे वगैरे सांभाळून आले. पुढें काय सल्ला ठरेल, ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २२४.

**श्री.** आगष्ट स. १७८७.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे. दुसरी लढाई छ० १२ माहे सवाल रोज मंदवारीं जाहाली. राणेखान भाई व राजश्री आंबाजी इंगळे व खंडेराव हरी वगैरे तोफखाना व फौजा राजांचे लष्करावर चालून गेले. तिकडूनही जैपूरवाले राजे व भीमसिंग राठोड व महमदबेग हमदानी वगैरे सर्व फौजा तयार होऊन आपले गोटांतून पौण कोसावर निघोन लढाई जाली. राठोडांनीं राजश्री आंबाजी इंगळे यांजवर चाल करून आले. परस्परें झुंज लागल्यावर राजश्री शिवाजी विठ्ठल यांचा पथक व राजश्री खंडेराव हरी व रायाजी पाटील पांच सात हजार स्वारांनसीं उठोन राठोडावर चालून गेले. यांचा त्यांचा झुंज रुबकर होऊन, शेवटीं राठोडास मारून माघारें घातलें. सोभाराम भंडारी व भीमसिंग राठोडाचा मेहुणा व याशिवाय पंधरा वीस मातबर जमादार रणांत पडले. व साहाशें लोक राठोडाकडील रणांत ठार राहिले, व जखमी हजार माणूस त्याजकडे जाहालें. अखेर राठोर माघारें हटून अर्ध कोस गेले. आपली बाजी शेर राहिली. राजश्री शिवाजीपंत बापूकडील चिमणाजी खंडेराव जखमी जाले, व तीस पस्तीस बारगीर व शिलेदार जखमी जाहाले. व मुर्तजाखान भडेच याचा भाऊ, गाजीखान

सरदार, तरवारचे जखमेंकरून रणांत राहिला. इकडील शंभर दीडशें लोक ठार जाले, व याप्रमाणें जखमी जाहाले. शेवटीं राठोडाचा मोड जाहाला. माघारें हटून गेले. फत्ते आपल्याकडील जाहाली. महमदबेग हमदानी यास इकडील तोफेचा गोळा लागला. हत्तीवरून खाले पडून मृत्यु पावला. येणेंप्रमाणें लढाई जाहाली. तोफखाना व पलटणें व फौजेची तरतूद लढाईचे समयीं राजश्री पाटिलबावांनीं फार चांगली केली. श्रीमंत साहेबांचे प्रतापेंकरून फत्ते जाली. पुढें ही लढाई रूबकर आहे. आपले लष्करचे बुणगे जैपूरकरांचे फौजेसीं आठा कोसांचें अंतर आहे. सडी फौज पांच कोस, पुढें जयपूरकरांचे फौजेसीं तीन कोसांचें अंतरानें राजश्री पाटिलबावा आहेत. तेथून दोन कोसांवर फौजा व तोफखाना व पलटणें झुंजास जातात. येणेंप्रमाणें लढाईची तरतूद आहे. उभयपक्षीं लढाईचा इरादा आहे. अद्यापि कांहीं सलुकाचा जाबसाल नाहीं. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.”

---

## लेखांक २२५.

पैवस्ती छ १४ जिल्काद समानीन.

श्री.

ता. २ आगष्ट इ. स. १७८७.

“श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ १७ माहे सवाल मुक्काम लष्कर नजीक लालसोट प्रांत जैपूर जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः—पेशजीं छ० २६ रमजानचीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन वर्तमान श्रुत जाहालें असेल. हल्लीं वर्तमान तरी पातशाहा दिल्लीस आहेत. दिल्लीस दोन पलटणें राजश्री लाडोजी देशमुख यांचे तैनातीस होतीं. त्यास सा महिने तलब चढली होती. ह्मणून पलटणवाल्यांनीं तलबेचा दंगा मोठा केला. दोन दिवस राजश्री लाडोजी देशमुखाचे हवेलीचा दरवाजा बंद होता. परस्परें लढाई होऊन, दाहा पांच माणूस मारलें गेलें. त्यावरून तें दोन पलटणें तेथून दूर करून, अंतर-वेदींत राजश्री गणपतराव कृष्ण यांचे तैनातीस पाठविलीं आहेत. त्याच ऐवजीं शाहा निजामुद्दी, पातशाहाकडील कारभारी, यांनीं दोन हजार माणूस चाकर ठेऊन, दिल्लीचे दरवाजे आदिकरून बंदोबस्त केला आहे. दिल्लीचे आसपास गव्हार गर्दी आहे, व शीख डलेवाले मार्ग चालूं देत नाहींत. येणेंप्रमाणें वृत्त आहे. वरकड सविस्तर पुरवणी पत्रांवरून व इकबारेवरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.”

---

पैवस्ती छ० ९ जिल्हेज सन समान समानीन भाद्रपदमास.

## लेखांक २२६.

श्री. ८ आगष्ट इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २३ माहे सवाल मुक्काम भुसावर प्रांत जटवाडा जाणोन स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष:– पेशजीं छ० १७ माहे मजकूरचीं विनंतिपत्रें सेवेसीं पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान, तारीख १८ मिनहूस राजश्री पाटिलबावाकडील आठ पलटणाचे कुमेदान व जमादार वगैरे लोकांनीं हंगामा तलबेसाठीं केला कीं, सा महिन्यांचे तलबेची निशा करून द्यावी. त्यांचे सात महिने चहडले होते. त्याजवरून राजश्री पाटिलबावांनीं, राजश्री रायाजी पाटील यांचे विद्यमानें तीनमाहा द्यावा. त्यापैकीं एकमाहा नख्त देत होते व दोन महिन्यांची तनखा आगरियावर देत होते. त्यास पलटणवाले व गोलंदाज न मानीत. निदान दोन घटका दिवस संध्याकाळचा राहातांना आठ पलटणा व गोलंदाज तोफांसुद्धां तोफा सुमार ९६ व खुशालगडांत तोफा ७ एकूण एकशें तीन तोफा बमय पेट्या दारूच्या व गोळ्याचे छकडे, चार दिवस रात्रंदिवस झुंज लागलें आणि तोफखाना चालविला तर सामान पुरेल, याप्रमाणें साहित्य होतें. तें सर्व घेऊन राजे प्रतापसिंग यांचे लष्करांत जाऊन सामील जाले. आपले सडे फौजेसीं व राजाचे फौजेसीं दिडा कोसाचें अंतर होतें. तिकडून पांच सात हजार स्वार तयार होऊन, पुढें पलटणास सामोरा येऊन घेऊन गेले. पलटणवाल्यांचे संदर्भ राजाकडे पेशजींच आठ नव दिवस लागलाच होता. हें वर्तमान कोणास समजलें नाहीं. याप्रमाणें फितूर होऊन दंगा जाला. हें जाणून राजश्री पाटिलबावांनीं राजाचा शह सोडून, आपले बहिरबुणगे सांभाळून घेऊन, परगणे भुसावर येथें माघारा आले. येथून दरकूच दोन दिवसांनीं डिगेस जाणार. तेथें कांहीं दिवस राहून दिल्लीस पातशाहापासीं जावें, ऐसी सल्ला ठैरली आहे. परंतु डिगेस गेलियावर जे सल्ला प्रत्यास येईल, ते विनंती लिहूं. पहिले लढाई जाली, त्या समयीं सरकारची फत्ते होऊन नक्ष बराच जाला. परंतु पलटणांनीं फितूर केला, व मुरादबेग वगैरे हजार बाराशें राऊत हिंदुस्थानी मोंगलिये वगैरे उठोन गेले. त्याजवरून आपले फौजेस धीर न पुरे. ह्मणून सर्व लष्कर सांभाळून माघारा आले. हें वर्तमान सर्वांनीं ऐकून चहूंकडे गव्हार गर्दी जाली. ......................................जाबतेखानाचा पुत्र यांनीं ....

............झिनाना, बरनावा, बडोद, बुढापा, वगैरे अंतरवेदींतील परगणे जप्त करून मेरटपावेतों आला आहे. परंतु अद्यापि मेरटचें ठाणें कायम आहे. आतां राजश्री पाटिलबावांची स्वारी डिगेस आली आहे. पुढें जो बंदोबस्त होईल, ते विनंति लिहूं. नजबकुलीखान दिल्लीपलीकडे विसा कोसांवर आहे, तेथेंच आहेत. अलिकडे आले नाहींत. व सरकारचे आमील आहेत, तेथेंही उपद्रव दिल्हा नाहीं, व कलकत्त्याचा लाट कलफदानीश सीतेन साहेबही कलकत्त्याहून कूच करून पटण्यास आला आहे. पुढें दरकूच लखनऊस येऊन फरुकाबादेस येणार आहेत. राजे प्रतापसिंग जयपूरकर यांचें व इंग्रजांचें सूत्र एकोप्याचें आहे, ह्मणून श्रवणांत आलें आहेत. प्रत्यास आलियावर समजल्यांत येईल, तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २२७.

पैवस्ती छ० २५ जिल्हेज सन समान समानीन. भाद्रपद मास बराबर कासीदजोडी.

श्री.

४ सप्टंबर १७८७.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २१ माहे जिलकाद मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः- इकडील वर्तमान तर, पेशजीं छ० २१ सव्वालीं विनंतिपत्रें सेवेसीं पाठविलीं होतीं, तें पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा दिल्लीस आहेत. नवाब जाबतेखान रोहिले यांचा पुत्र रोशनद्दौलेबाहादर गुलाम कादरखान यांनीं तमाम मेरट आदिकरून अंतरवेदींत सरकारचा अंमल उठवून मशारनिल्हेंनीं आपला बंदोबस्त केला, आणि आपण दिल्लीसमीप शाहदरियास आला. हें वर्तमान राजश्री लाडोजी नरसिंगराव देशमुख शितोळे व शाहा निजामुद्दी पातशाहाचे कारभारी यांनीं पाहून, दिल्लीहून पातशाहांस न पुसतां निघोन रात्रीस पळून गेले. त्यासमयीं देशमुखांची वस्तभाव वीस उंटें दिल्लीचे सोद्यांनीं लुटून घेतलीं, व शाहा निजामुद्दी न पुसतां गेला ह्मणोन त्याचे घरीं जप्ती जाली आहे व त्याचा भाऊ कैदेंत आहे. गुलाम कादरखान येऊन पातशाहांची मुलाजमत केली. पातशाहांनीं सातापारच्यांचा खिलत व जेगा शिरपेंच, मोत्यांची कंठी व ढाल तलवार, हत्ती घोडा येणेंप्रमाणें सन्मान केला. दुसरे दिवशीं त्यांची फौज कूच करून, यमुना उतरून अलीकडे येऊन, दिल्लीदरवाजापासीं व तुरकमान दरवाजापावेतों मुक्काम करून आहेत.

पातशाहांसीं जाबसाल आहे कीं, माझे आजास व माझे बापास जो किताब मीर-बक्षीगिरी होती, त्याप्रमाणें आह्मांसही मीरबक्षीगिरीचीं वस्त्रें द्यावीं. व माझे फौजेची हजीरी घेऊन भक्षावयास द्यावें. ह्मणोन नाजर मंजूरअलीखान यांचे विद्यमानें जाबसाल आहे. पाणिपतापासून तों अगरियापावेतों मुलूख होता, तो दरोबस्त ठाणीं उठोन पळून गेलीं. अवघ्या मुलखांत मराठा दृष्टीस न पडावा ऐसी बदअामली जाली. पुढें जें ठरेल तें विनंति लिहूं. राजश्री पाटिलबावांनीं आपलीं कुटुंबें व तोफखाना व नौबतखाना वस्तभाव सर्व ग्वालेरीस वाटे लाविलीं. त्याजवरून जितकी हिंदुस्थानी फौज होती, ते हिरासा होऊन त्यांजपासून उठोन दिल्लीस आली. कांहीं थोडी बहुत लोक राहिले आहेत. त्यास तमाम जट-वाडांतील माहाल व अंतरवेदींतील लाऊन दिल्हे. जसा मुलूख मेळविला होता तैसाच गमाविला! कांहीं राहिला आहे तो, ज्या जबरदस्ताचा हात पोंहोचला, त्यानें जप्त केला. याप्रमाणें चहूंकडे गव्हारगर्दी जाली आहे. राजश्री पाटिल-बावा अलवारेस गेले आहेत. तेथें रावराजानें एक लाख रुपये खर्चास दिल्हे. व किल्ला सरंजामसुद्धां अलवरेचा राहावयास खाली करून दिल्हा. राजश्री आंबाजी इंगळे यांचा बंदोबस्त आहे. यांस मेजमानी केली. सात किस्ती वस्त्रें, जेगा शिरपेंच, मोत्यांची कंठी, हत्ती एक व घोडे दोन नजर केले. राजश्री पाटिलबावांनीं रावराजाचे दत्त पुत्रास व बायकांस दक्षणी वस्त्रें दिल्हीं. याप्रमाणें वर्तमान आलें, त्याजवरून विनंति लिहिली असे. पुढें श्रवणांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २२८.

**श्री.** ता. ५ सप्टेंबर इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. छ० २२ जिलकादीं दोन प्रहर दिवस चढतां, रोशनदौला गुलाम कादरखान, दो हजार रोहिले समागमें घेऊन, किल्ल्यांत पातशाहांचे दर-बारास आले. दिल्लीदरवाजांत खल होऊन, तेथून आपला बंदोबस्त करीत, दिवाणखासांत आले. तसबीरखान्यांत पातशाहांस मुजरा केला, आणि विनंति केली कीं, "मजपासीं फौज जमा जाली आहे. नित्यानीं भक्षावयास पाहिजे. याजकरितां आपण फौजेस भक्षावयास द्यावें. जितके दिवस आज्ञा कराल, तितके दिवस दिल्लीस आपलेपाशीं राहूं. नाहींतर जे माझे आजास व बापास खिजमत होती, ते मजकडे सांगावी. दोन वस्त्रें द्या, ह्मणजे मी कूच करून आगरियाकडे

जटवाड्यांत जाईन." याप्रमाणें विनंति केली. व खानमजकुराचे नेत्र आरक्त, बेबदल पाहून, खानमजकुरास दबून, मीरबक्षी अमीरुल-उमराईचीं वस्त्रें, सरबस्ता पागोटें बमय गोशवारा व सातपारचांचा खिलत व मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच, ढाल, तरवार, हत्ती, घोडा येणेंप्रमाणें इनायत करून, खालसेवाले सिधराय याचा भाऊ व धारीराय याचा भाऊ दोघेजण हजर होते, त्यांस आज्ञा केली कीं, "तुह्मी खालशाचा कागद समजाऊन, मीरबक्षीगिरीचे माहाल वेगळे काढून, सनद करून देणें, व खालशाचेही माहाल त्यांचीही मुख्यत्यारीचा कारभार बंदोबस्त रोशन-दौला बाहादर करतील." याप्रमाणें आज्ञा जाली. व फराशास आज्ञा जाली कीं, "तुह्मी यांस मखतबखान्यांत फर्श करून देणें. त्याजवरून खानमजकूर बमय कारभारी व खालशाचे मुत्सद्दी बसून, माहालांची निवडानिवड करून सनद करून घेतली. खानमजकूर रसद घेऊन पातशाहास मुजरा केला. तरवारीची नजर करावयास एक मोहोर पाहिली, तर कोठें न मिळाली ! हे अवस्था मीर-बक्षीगिरीची आहे ! ज्या समयीं खिलतवस्त्रें दिधलीं, त्या समयीं पातशाहा व नाजर व जितके पातशाही खवास, खोजे व मुत्सद्दी, दिल्लीचे लोक मुजराही होते, तितके बहुत दिक व नाखुश जाले. कोणी कोणी बोलिले कीं, "या खिजमतीस हे योग्य नाहींत" ! त्याजवरून पातशाहा बोलिले कीं, "दिल्लीहून बलाय काढून कशी तरी द्यावी, इतकाच मात्र विचार आहे. नाहींतर रोहिल्यानें शहरावर हात घातला, तर येथें सांभाळणार कोण आहे? याजकरितां यास येथून काढून द्यावें. याचा संतोष राखावा. हेच सलाह आहे." ह्मणोन नाजरासीं विचार करून, वस्त्रें जवाहीर देऊन त्यास विदा केलें. मशारनिल्हे आपले लष्करांत जाऊन तोफा सोडल्या, व अबघे जमादार व मुत्सद्दी सर्वांनीं नजरा केल्या, व समरूचे बेगमेनेंही ताबेदारी करावी, याप्रणें कारभार ठरला. पुढें अमलांत येईल तें विनति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० २५ जिल्हेज सन समान समानीन भाद्रपद मास.

## लेखांक २२९.

श्री.

७ सप्टेंबर इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २४ माहे जिलकाद मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंदलेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– छ० २२ साबानचें आज्ञापत्र पाठविलें, तें छ० २१ जिलकादीं पावलें. पत्रें उशिरां पाठवावयाचें कारण हेंच कीं, कासीद मार्गीं

दुखण्या पडला होता; सबब दिवसगत लागली; ह्मणोन कासिदानें सांगितलें. त्यास पेशजीं छ० २१ मिनहूस विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं पत्र आलें, त्यांत आज्ञा कीं, "तिकडील वृत्त होत जाईल, तें वरचेवर लिहीत असावें. टिपूकडील वकील सरकारांत राजश्री हरिपंतांकडे व राजश्री तुकोजी होळकर व राजश्री गंगाधरराव रास्ते यांचे विद्यमानें आले आहेत, हें पूर्वीं तुह्मांस लिहिलेंच आहे. त्याजवर वकिलासीं बोलणें जालें कीं, नवाबसुद्धां तह ठरला. सरकारचा चार साला पेशकसीचा ऐवज राहिला, तो द्यावा. बदामी, नरगुंद, कितूर, हे तिन्ही किल्ले तालुकेसुद्धां सरकारांत द्यावे, व नवाबाकडील अदवानी तालुकेसुद्धां सोडावी. परस्परें दिलसफाईनें राहून, कोणी कोणाचे मुलखांत उपद्रव करूं नये. याप्रमाणें तह ठरला. सरकारचे पेशकसीचे ऐवजास तीन हप्ते लाविले. पैकीं दोन हप्त्यांचा भरणा जाला. एक राहिला तोही होईल. बदामी, नरगुंद, कितूर, येथें सरकारचीं ठाणीं बसून, अंमल नवाबाकडील ठाणें अदवानींत बसलें. राजश्री हरीपंत फौजेसुद्धां माघारा फिरोन देशीं आले. तुह्मांस कळावें. पातशाहास अर्ज करावा. उत्तर होईल, तें लिहून पाठवावें." ह्मणोन पत्रीं आज्ञा. त्यास, आज्ञेप्रमाणें हें वर्तमान सविस्तर पातशाहास निवेदन केलें. हें ऐकून आज्ञा केली कीं, "म्यां राजश्री पाटीलबावांस शुके लिहून पाठविले कीं, जैपूरकर मथुरेचे व डिगेचे मुक्कामीं मामला करितात, तो करूं न द्यावा, व मथुरेस छावणी करून, चहूंकडे दबाव देऊन, आपले मुलकाचा बंदोबस्त राखून असावें. बादबरसात आह्मीही स्वारीस बाहीर निघूं. मग जे सल्ला असेल, ते करूं. तुह्मी तोफखान्याचा व पलटणाचा भरणा फार केला आहे, हें ठीक नाहीं. पूर्वींये (परभये ?) लोक दगेखोर असतात. यांस भक्षावयास मिळेल, तोंपावेतों उगेच राहतील. नाहींतर दंगा करतील; दगा देतील. ह्मणोन शाहानिजामुद्दीसमागमें सांगोन पाठविलें. आह्मीं दोन गोष्टी सांगितल्या. त्यांतून एकही गोष्ट न मानितां जयपुरास गेले. तेथें तहबारीखालें येऊन पलटणें उठोन जाऊन खराब जाले. याहीवर आह्मीं लिहून पाठविलें कीं, तुह्मीं दिल्लीस येणें. तेंही न ऐकतां कूच करून अलवारेकडे गेले. आह्मांपासीं राजश्री लाडोजी देशमुख शितोळे होते. त्यांचें समाधान व खातरजमा केली कीं, तुह्मीं आपले खातरजमेनें मजपाशीं असावें. रतिभार भय नाहीं. मनांत संशय न आणावा. व शाहानिजामुद्दीस आज्ञा केली कीं, तुह्मी दोन चार हजार स्वार प्यादे ठेवणें. त्याप्रमाणें त्यांनीं स्वार प्यादेही ठेविले. इतकियांत सल्ला ठैरली कीं, यमुनापार स्वारप्यादे उतरून, रोशनदौला गुलामकादरखानासीं झुंजून, काढून

द्यावें. त्यास दोन कंपण्या प्यादे व माधवराव फाळके इतके मात्र यमुनापार उतरले होते. त्यांसीं झुंज जालें. दोन कंपण्यांच्या प्याद्यांपैकीं दहा वीस माणूस मारले गेले. कांहीं बुडून मेले. कांहीं पळून गेले. माधवराव फाळके शाहदरियांत घुसून दरवाजे बंद करून बसले. हें वर्तमान सविस्तर देशमुखानें व शाहानिजामुद्दीनें पाहून, आह्मांस न पुसतां पळून रात्रीस गेले." याप्रमाणें बोलणें पातशाहाचें होऊन, पुढें श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींची तारीफ केली कीं, "ते आमचे कदीमी फिदवी व पातशाही फर्जंद आहेत. त्यांजकडून सर्वप्रकारें आमची खातरजमा आहे, व ज्या समयीं जो सरदार फौजसुद्धां येईल, त्याचें घर आहे. राजश्री महादाजी शिंदे उगीच आह्मांकडील कांहीं नालिश लिहितील. ते खातरेस न आणावी. तुह्मांखेरीज आह्मांस खैरख्वा दुसरा नाहीं." ह्मणोन बोलणें नवाब मंजूरअलीखान नाजर यांचे विद्यमानें होऊन, श्रीमंत राजश्री पंतप्रधान साहेबांचे नांवें शुका लिहून दिल्हा. आणि आह्मांस आज्ञा जाली कीं, हें बोलणें सविस्तर तुह्मीं त्यांस लिहून पाठऊन, उत्तर सत्वर आणवणें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. तर पातशाहांचे शुक्याचा जाब बहुत खुशामतीचा व शिष्टाचाराचा व नवाब मंजूरअलीखान नाजर यांस शिष्टाचाराचा स्नेहवृद्धीचें पत्र-खलिता ऐसीं दोन्ही खलिते व पत्राचीं उत्तरें सत्वर पाठऊन द्यावीं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

पैवस्ती छ० ५ रविलावल

## लेखांक २३०.

सन समान समानीन. **श्री.** १७ आक्टोबर इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ५ माहे मोहरम मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः— आपण छ० १ सवालचें आज्ञापत्र पाठविलें, तें छ० १५ जिल्हेजीं मुक्काममजकुरीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, "तिकडील वर्तमान होत जाईल, तें वरचेवर लिहित जावें. टिपूचें सलूख जाल्याचें व राजश्री हरीपंत फौजसुद्धां देशीं आल्याचा मजकूर पूर्वी सविस्तर लिहिला आहे, त्यावरून सर्व कळलें असेल. त्याप्रमाणें पातशाहांस अर्ज करावा. प्रस्तुत पाटिलबावा कोठें आहेत, जैपुरकराकडील वर्तमान काय, राणेखान यांचे विद्यमानें बोलणें लागलें होतें त्याचें काय जालें, पुढें काय करणार, हें सविस्तर लिहून पाठवावें." ह्मणोन पत्रीं आज्ञा. त्यास इकडील बारीक मोठें वृत्त छ० २१ व छ २४ जिलकादीं

विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर श्रुत जालेंच असेल. त्यास राजश्री पाटिलबावा तूर्त अलवारेस रावराजा प्रतापसिंग याचे मुलकांत जयपुर प्रांतीं आहेत. विजयादशमी जालियावर कूच करणार, ह्मणोन बोलणें आहे. कूच जालियावर काय करणार, हें प्रत्ययास आलियावर विनंति लिहूं. व राणेखानभाईचे विद्यमानें बोलणें जयपुरकरांचें लागलें होतें. परंतु बोलणें पक्कें ठरलें नाहीं. जयपुरकरांची फौज सोळा कोसांचे अंतरानें मुक्काम करून राजासुद्धां आहे. व टिपूकडील सलूक जाल्याचें व राजश्री हरीपंततात्या पुण्यास आल्याचें वर्तमान सविस्तर पातशाहांस निवेदन केलें. त्याचें उत्तर पेशजीं पत्रें पाठविलीं आहेत, त्यांजवरून श्रुत जालेंच असेल. हल्लीं इकडील वर्तमान तर, रोशनदौला गुलाम कादरखान रोहिले यांस बक्षीगिरीचीं वस्त्रें देऊन, करार मदार जाला कीं, पातशाही मुलूख व जागीरदारांच्या जागिरा व बेगमा व पातशाहाजादे आदिकरून सर्वांच्या, सोडाव्या ह्मणोन बोलण्यांत येऊन, खानमजकुरानीं जप्त्या केल्या होत्या त्याच्या दरोबस्त सोडचिठ्या देऊन, आपण यमुना उतरून, शाहदरियापाशीं यमुनापार जाऊन मुक्काम केला. इतकियांत खैरुन्निसा बेगम, पातशाहाची बहीण धाकटी, इचा पैगाम खानमजकुरास गेला कीं, "मजपासून बारा लक्ष रुपये घ्यावे. आणि माझे भाऊ आणीक पांच जण आहेत, त्यास एकास पातशाहा करावें." ह्मणोन परस्परें संधान लागलें. त्यास बेगमेचे देवडीवरील दोन प्यादे रवणे होते, त्यांचे विद्यमानें जाबसाल होता. त्यांतून एक प्यादा फुटून, गुलाम कादरखान यांची चिटी आली होती तेच बजिन्नस धरून पातशाहांस दिधली. त्यांतून एक प्यादा पळून गेला, व एक कैदेंत आहे. त्याजवरून पातशाहांची व गुलाम कादरखान यांची बेमजगी होऊन, जितका पातशाही खालसा व बेगमा व पातशाहाजादे वगैरे जागीरदार यांचा मुलूख सर्व अंतर्वेदींतील जप्त केला आहे; आणि पातशाहांसीं झुंजास मुस्तेद आहे. रोहिल्यांपासीं स्वार प्यादा मिळून दहा हजार फौज आहे. आणि इकडे पातशाहापासींही दाहा बारा हजार स्वार प्यादा आहे. दिल्ली शहरचा बंदोबस्त करून आहेत. जर रोहिला यमुना उतरून पार आला, तर त्यासीं झुंजावें. यमुनापार न आला, तर पंचवीस तीस हजार स्वार प्यादा जमा करून यमुना उतरून रोहिल्यांचें पारिपत्य करावें, या विचारांत पातशाहा आहेत. याजकरितां राजश्री पाटिलबावांस दोन शुके पाठविले कीं, तुह्मींच कूच करून दिल्लीस येणें; नाहीं तर कांहीं फौज पाठविणें. त्यास या दोन्ही गोष्टींतून एकही गोष्ट प्रत्ययास न आली. त्यांजपासीं फौजच नाहीं. मग फौज कोठून पाठविणार ?

त्यांस तों रजपुतांचा शह सोडून येतां न ये, आणि पातशाहांस तों फौजेची गरज. ह्मणोन नजबकुलीखान व इस्माईल बेग व अनुपगीर गोसावी व इंग्रेज या सर्वांस फौजांविसीं शुके गेले आहेत. त्यांपैकीं नजबकुलीखान कूच करून रेवाडी अलीकडे पाटोदीस आला आहे. दिल्लीस येणार. तो दिल्लीस दाखल जालियावर पातशाहांची मुलाजमत जालियावर पुढें काय सल्ला ठरेल, तें विनंति लिहूं. परंतु यमुनापार गुलाम कादरखान व यमुनावार पातशाहांची फौज, दोहीकडे फौजा झुंजास मुस्तेद आहेत. पुढें प्रत्यास येईल तें विनंति लिहूं. या दिवसांत पातशाहांस फौजेची गरज फार आहे. नित्यानीं विचारितात कीं, "तुह्मांकडील सरदार व ताजी फौज कधीं येणार ?" त्यास आह्मीं विनंति केली कीं, विजयादशमीचे मुहूर्तें तेथून निघोन एका महिनियांत हुजूर येऊन पावतील. ह्मणोन विनंति पातशाहांस केली आहे. प्रत्ययास येईल तें खरें. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति.

कदाचित् आपण आज्ञा करतील कीं, विजयादशमीस तेथून निघोन येणार, हें कशावरून विनंति केली ? त्यास राजश्री पाटिलबावांचे येथें कृष्णराव महादेव यांचे विद्यमानें सरकारचें पत्र आलें कीं, अलीबहादर व गणेशपंत बहेरे यांचे बंधू व शाहाजी भोंसले व वोढेकर व गायकवाडाकडील फौज ऐसी हिंदुस्थानांत रवानगी जाली, ह्मणून लिहिलें आलें. त्याजवरून पातशाहांस विनंति केली. कळावें. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २३१.

पैवस्ती छ० ८ रविलावल
सन समान समानीन.

श्री.

२० नोव्हेंबर इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ० ९ माहे सफर मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः- इकडील वृत्त पेशजीं छ० ५ मोहरमीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हलीं वर्तमान तर, पातशाहा दिल्लींत शहरचा बंदोबस्त करून आहेत. गुलाम कादरखान रोहिले पातशाहांसीं बेबदल होऊन, शाहदरियापासीं यमुनापार अंतर्वेदींत मुक्काम करून आहेत. व राजश्री पाटिलबावा रेवाडी पाटोडीवर मुक्काम करून आहेत. राजश्री आंबाजी इंगळे यांस पातशाहापासीं वकलातीस पाठविलें होतें कीं, "गुलाम कादरखान यांनीं बेआदाई केली; ह्मणोन यांचे पारपत्यास आह्मीं

आलों आहोंत. त्यास जैसी मर्जी असेल तैसी वर्तणूक करूं." ह्मणून सांगोन पाठविलें होतें. त्यास, पातशाहांनीं आज्ञा केली कीं, "जुवाबक्ष पातशाहाजादा व अनुपगीर गोसावी व इस्माईल बेग व मलक महमदखान व राजे जयपूरकर वगैरे दिल्लीचे मोंगलीये ऐसे एक विचारें जाले आहेत. यांचें मानस कीं, तुह्मीं दिल्लीस न यावें. हे तुह्मांसीं सर्व दिक आहेत व फिरले आहेत. जर तुह्मी जबरदस्तीनें याल, तर तुह्मांपासीं फौज थोडी. व हे झुंजावयास सिद्ध आहेत. याजकरितां चार दिवस तुह्मीं रेवाडी पाटोदीचें मैदानांतच असावें. व पातशाहाजादा वृंदावनास मथुरेस आहे. त्यास म्यां बोलाविलें आहे. तो मजपासीं दाखल जालियावर मग तुह्मांस लिहून पाठऊं. त्या अन्वयें करावें." ह्मणून पातशाहांनीं आज्ञा केली. व शुकाही या अन्वयें लिहून दिल्हा. व आंबाजी इंगळे यांस खिलत पांच पारचे, मोत्यांची कंठी, जेगा, शिरपेंच, तरवार, येणेंप्रमाणें; व त्याजसमागमील चौघे मुत्सद्दी त्यांस निमअस्तीना व दोन शिरपेंच व चार दुशाले, येणेंप्रमाणें इनायत करून, रुकसत राजश्री पाटिलबावांकडे केलें. ते रेवाडीस गेले. पातशाहांनीं आपलेकडून भले माणूस पातशाहाजाद्यास आणावयास पाठविले आहेत. पातशाहाजादा दिल्लीस दाखल होय तोंपावेतों, राजश्री पाटिलबावा रेवाडीस व गुलाम कादरखान दिल्लीचे आसपास वारपार राहतील. शाहजाद्याची व पातशाहांची भेट जालियावर पुढें येथील काय नक्षा ठरेल, त्याप्रमाणें विनंति लिहूं. वरकड विस्तारें वृत्त राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे. त्याजवरून श्रुत होईल. कृपा करणार धणी समर्थ आहेत. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० ८ सफर

## लेखांक २३२.

मार्गशीर्ष. **श्री.** २० नोवेंबर इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ९ माहे सफर मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं इकडील वर्तमान सविस्तर छ० ५ मोहरमीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, ते पाऊन वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा दिल्लीचे शहराचा व किल्ल्याचा बंदोबस्त करून आहेत. गुलाम कादरखान शाहदरियापासीं यमुनापार बदस्तुर आहे. नित्यानीं लढाई रुबरू आहे. राजश्री पाटिलबावा अलवारेहून दिल्लीस यावयाबद्दल कूच करून रेवाडीस आले आहेत.

मार्गी येतांना बहीर बुणगे मेवाती यांनीं बहुत लुटिलें. त्यास, खासे रेवाडीस मुक्काम करून, राजश्री आंबाजी इंगळे यांस पातशाहापासीं दोनतीनशां रावतांनिसीं पाठविलें आहे. छ० २ मीनहूस यमुनातीरीं राजघाटावर येऊन उतरले आहेत. नाजर मंजुरअल्लीखान याजकडे राजश्री शामराव आपाजीस पाठविलें होतें. बहुताप्रकारें नाजरजीसीं बोलणें राजश्री पाटिलबावांकडील जालें कीं, "आमची बाजी बिघडली आहे. मुरबेगिरी करून, पातशाहांस विनंति करून, पूर्ववत्प्रमाणें आमचा बंदोबस्त होय, तो अर्थ करावा. आह्मीं आपले आज्ञेप्रमाणें वर्तणूक करूं." ह्मणून शामराव आपाजीचें बोलणें राजश्री पाटिलबावांकडून जालें; व आणभाख-वचनप्रमाण बेलभंडार द्यावयास सिद्ध जाले. परंतु नाजरजीची खातरजमा न जाली. व बोलिले कीं, "राजश्री पाटिलबावा दगाबाज आहेत. राघोगडकर राजास व गोहदकरास व फरोकाबादवाले खानसामा व सुजादिलखान व सुजातखान वगैरे लोकांसीं आणभाख कौल करार करून, बेलभंडार देऊन, दगा करून, कैद करून मारून टाकिलें. याजकरितां आह्मांस भरंवसा पुरवत नाहीं." ह्मणोन बोलणीं बोलून, रावमजकुरास मार्गस्त केलें. त्यांनीं जाऊन सविस्तर वृत्त आंबाजी इंगळे यांस सांगितलें. गोष्टीचा जवा न बसला. पातशाही कारभारी व दिल्लीवाले मोंगलिये या सर्वांचे मतें, राजश्री पाटिलबावांची मुख्त्यारी नसावी. व पातशाहांची मर्जी आहे कीं, सलतनतीचें काम आटोपील ऐसा राजश्री पाटिलबावावांचून दुसरा माणूस नाहीं. ह्मणून पातशाहांनीं राजश्री पाटिलबावांस बोलाविलें आहे. व नाजर मंजुर-अल्लीखान वगैरे मंडळींची मर्जी कीं, राजश्री पाटिलबावा नसावा. ऐसी दुई लागली आहे. त्याजवरून पातशाहांनीं राजश्री पाटिलबावांस लिहून पाठविलें आहे कीं, दोन चार रोज तुह्मीं रेवाडीसच मुक्काम करून असावें. व आंबाजी इंगळेही दिल्लीसच आहेत. यांची व पातशाहांची मुलाजमत जाली नाहीं. पातशाहांनीं सल्ला ठैराविली आहे कीं, जुवाबख्त पातशाहाजादा अकबराबादेस आला आहे. त्यास ममतेंत घेऊन, प्रथम दिल्लीस आपलेपासीं बोलवावें. त्याज सांगातें अनुपगीर गोसावी व मलक महमदखान व इस्माईल बेग व राजे जैपूरकर यांची फौज वगैरे पंधरा वीस हजार स्वारांचा जथा आहे. जर पाटिलबावांस प्रथम दिल्लीस बोलवावें, तर हे मंडळी पातशाहाजाद्यापासीं जमा जाली आहे. या सर्वांसीं व राजश्री पाटिलबावांसीं बिघाड आहे. याजकरितां पातशाहाजाद्यावर छत्र फिरवून त्यास आगरियांत पातशाहा केलें, तर त्यांसीं झुंजणें प्राप्त आहे. एक गुलाम कादरखान पांच सात हजार फौजेचा सरदार आहे. तो मसीं बिघडून किल्ल्यांत गोळे टाकितो. त्याचें पारपत्य आमच्यानें होत नाहीं! तेव्हां

वीस पंचवीस हजार स्वार प्यादा समागमें आणि पातशाहाजादा धणी, तेव्हां त्यांसीं कोणीं झुंजावें ? हा विचार करून, अहमदअल्लीखान ह्मणून मातबर माणूस पातशाहांनीं पातशाहाजाद्यास वस्त्रें देऊन पाठविला आहे. त्यास पातशाहाजाद्याच्याही अर्ज्या आल्या आहेत कीं, मी दिल्लीस आपलेपासीं आल्याखेरीज राजश्री पाटिलबावांस न बोलवावें. ह्मणून लिहिलें आहे. त्याजवरून तूर्त राजश्री पाटिलबावांस रेवाडीस राहाणें प्राप्त जालें आहे. पातशाहाजादा दिल्लीस आलियावर व पातशाहांची भेट जालियावर पुढें सल्ला ठैरेल, तें विनंति लिहूं. तूर्त पातशाहापासीं कारभारी नाजर आहे. याची मर्जी आहे कीं, गुलाम कादरखान यास बगलेंत घेऊन, व दिल्लीवाली फौज पातशाही दाहा पंधरा हजार आहे हे सर्व एकत्र करून, पाटिलबावांवर घालून, त्यांस रेवाडीहून हुसकून द्यावें कीं, पुन्हां दिल्लीचें नांव न घेत. याप्रमाणें यांची मर्जी आहे. राजश्री पाटिलबावांपासीं फौज थोडी आहे. कुल फौज दाहा बारा हजार आहे. याजकरितां पातशाहांसही धीर पुरून बेधडक राजश्री पाटिलबावांस बोलावूं शकत नाहीं. याप्रमाणें येथील वृत्त आहे. पातशाहांची व पातशाही मंडळींची मर्जी आहे कीं, नवा दक्षणी सरदार चांगला व फौज मातबर व कारभारी शाहाणा आला, तर त्यासीं रुजू होऊन आपले घरची मुख्त्यारी सांगावी. परंतु अतःपर राजश्री पाटिलबावांस दिल्लींत दखल देऊं नये. ह्मणोन परस्परें आपसांत बोलणें आहे. प्रत्ययास येईल तें मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २३३.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजे. राणेखानभाई व रायाजी पाटील व जिवबा बक्षी चर्मनवती उतरोन अकबराबादेस गेले. तेथें उमरावगिरी गोसावी मोर्चे लावून होते. त्यांसीं लढाई घेऊन त्यांस पाडाव करून धरून आणिलें. उमरावगीर पाटिलबावांजवळ आल्यावर खातरजमा करून वस्त्रें वगैरे सरंजाम देऊन सांगितलें कीं, राहणें तरी सुखरूप रहावें. जावयाचें असल्यास अवरोध नाहीं. विचारास येईल तैसें करावें. त्याजवरून आपले संतोषानें राहिले आहेत. राणेखानभाई फौजसुद्धां रंजितसिंग जाट यास सामील करून भरतपूर नजीक मुक्काम करून राहिले. जाटांनी चौदा पंधरा हजार जमाव केला आहे. इकडे गुलामकादर व इस्माईल बेग यांसी

परस्परें सख्य होऊन दस्तार बदल जाली. पातशाहातीचा बंदोबस्त उभयतांनीं मिळोन करावा. सांप्रत लढाईस सामील असावें. याप्रमाणें ठैरावून, आपली व जाटाची फौज एक जागा होती, तेथें लढाईस आले. दीड प्रहर जुंज जालें. उभयतां फौजांतील हजार बाराशें माणसें ठार व जखमी बहुत जालें. आपले फौजेचा पाय न टिकला. माघारा डेऱ्यास आले. जाटांकडील दहा बारा तोफा व सरंजाम निशाणें वगैरे गेलीं. तेव्हां जाटांनीं आपले फौजेस निषेध करून राणेखानभाई यांची खातरजमा करून सांगितलें कीं, आजची लढाई न बनली, त्यास चिंता नाहीं. मागतीं आपली फौज संभाळून लढाईची सिद्धता करावी. ह्मणोन जमाव करून मुकाबला जाला. एक वणजारा सात आठशें बैल मार्गांत उतरला होता. त्याजवर आपलेकडील भाई व रायाजी पाटील व बक्षी फौज घेऊन गेले. तिकडून गुलामकादर व इस्माईल बेग आले. त्यांसीं लढाई जाली. त्यांत जखमी व ठार बहुत जाले. नांवनिसी लिहिण्यांत आली नाहीं. मागाहून साकल्य विनंति लेहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २३४.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजे:— इस्मायल बेग यास रेवाडीकडे नजबकुलीखानाचे पारिपत्यास पाठविलें होतें. त्यास, उभयतांसीं मातबर लढाई होऊन, नजबकुलीस मारून चालविलें. त्यानें दोन मास गांवाचा आसरा धरून लढाई केली. मग सलूख ठरला. त्यानें जागा वांटणी करून दिल्ही. याप्रमाणें एकबारेंत वर्तमान आलें, तें सेवेसीं लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २३५.

पैवस्ती छ० १० रविलाखर
सन समान समानीन पौषमास.

श्री. १९ डिसेंबर इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ० ८ माहे रविलावल मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः— आपलीं आज्ञापत्रें छ० १० व छ० १२ जिलकादचीं सदरहू दोन पत्रें पाठविलीं, तें छ० १६ सफरीं मुक्काममजकुरीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, "प्रस्तुत राजश्री पाटिलबावा कोठें आहेत, व जैपुरकर कोठें आहेत, व पुढें मन-

सबा काय आहे, तें लिहून पाठविणें. व तिकडील वृत्त वरचेवर लिहित असावें." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास छ० ९ माहे सफरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत व एकबारा पाठविल्या आहेत. त्याजवरून सविस्तर श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, राजश्री पाटिलबावा, कौलची झील आगरियाचे अलिकडे बारा कोसांवर आहे, तेथें मुक्काम करून आहेत. आगरियाचे किल्ल्यांत अद्याप राजश्री पाटिलबावांचा बंदोबस्त आहे. इस्माईल बेग यांनीं आगरियाचे किल्याचे आसपास मोर्चे यांचा बंदोबस्त करून, आपण फौजसुद्धां राजश्री पाटिलबावा यांचे मुकाबलियास, सिकंदरा ह्मणोन आगरियाहून चार कोस जागा आहे, तेथें मुक्काम करून आहे. यांचे आगाडीचे फौजेचा व त्यांचे फौजेचा दोन कोसांचा तफावत आहे. झुंज गोळागोळी रूबकार आहे. व जैपूरकर राजे पाटणास लग्न करावयास गेले होते. ते लग्न करून माघारा राजश्री पाटिलबावांचे पिच्छावर आगरियाकडे येणार. जितके हिंदुस्थानी मोंगलिये व राजे जैपूरकर व जोतपूरकर या सर्वांचें मानस कीं, राजश्री पाटिलबावांस अवघे एकत्र होऊन चमेलपार करून द्यावें. व निदान बनल्यास व मऊ लागल्यास ग्वालेर प्रांत देखील खाली करून घ्यावा. ऐसी सर्वांची मसलत आहे. व राजश्री पाटिलबावा यांचें मानस कीं, सर्वस्व वेंचावें, परंतु जैपुरकरांचें व जोतपुरकरांचें पारिपत्य करावें व पातशाहाचे घरची मुख्त्यारी करावी. ऐसें यांचें मानस. समागमें फौज राजश्री शिवाजी विठ्ठल आदिकरून पागनीस व आंबाजी इंगळे व पागे व शिलेदार वगैरे मुत्सद्दी हे सर्व नामाफकत. कोणाचीही चित्तशुद्धता नाहीं. सर्व दाबाखालें व मर्जीनरूप आचरण करून आहेत. याचें कारण हेंच कीं, खुद्दपसंतीनें आजपावेतों जो कारभार करणें तो केला. व पुढेंही खुद्दपसंतीनें करितात. कोणाची सल्ला मसलत पसंत पडत नाहीं. ह्मणोन मंडळी मनोमय खिन्न आहेत. याप्रमाणें श्रवणांत आलें, त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २३६.

पैवस्ती छ० १० रविलाखर

सन समान समानीन पौषमास. **श्री.** १९ दिसेंबर इ. स. १७८७.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ० ८ माहे रविलावल मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः— आज्ञापत्रें छ० १० व छ० १२ जिलकादचीं सादर

जाली. तें छ० १६ सफरीं पाऊन शिरसा वंदून सनाथ जालों. पत्रीं आज्ञा कीं, तिकडील वर्तमान वरचेवर लिहित जाणें ह्मणोन आज्ञा. त्यास इकडील वृत्त पेशजीं छ० ९ सफरीं विनंतिपत्रें पाठविलीं होतीं, तें पाऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, गुलाम कादरखान यास पातशाहांनीं रुकसतीचीं वस्त्रें देऊन बिदा केलें. ते कूच करून दिल्लीपासून सिकंदरा व खुर्जा वगैरे किल्ल्यांत ठाणीं बसवीत कोलजलेश्वराकडे गेले. कोलेंत ठाणें बसवून रामगडावर फौज पाठविली आहे. मोर्चे लाऊन किल्ला खाली करून घ्यावा, या विचारांत आहेत. व पातशाहाजादा जुवाबक्ष दिल्लीस पातशाहापासीं दाखल जाला. परस्परें भेटी होऊन, पातशाहांनीं साता पारचांचा खिलत, बमय सरबस्ता, पागोटें, व जेगा, शिरपेंच व मोत्यांची कंठी, ढाल, तरवार, हत्ती घोडा, व आगरियाची सुभेदारी, येणेंप्रमाणें देऊन सन्मान केला. व पातशाहापासीं फौज होती त्या जमातदारास आज्ञा केली कीं, तुह्मीं पातशाहाजाद्यासमागमें असावें. हे तुमचे पोटाची सोय करून देतील. यांचे आज्ञेनरूप वर्तावें. ह्मणोन आज्ञा जाली. पुढें पातशाहाजाद्याचा विचार कीं, स्वारीस निघोन कांहींएक मसलत करावी. घडल्यांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. वरकड विस्तारें वृत्त राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे त्याजवरून व पारसी एकबरा पाठविल्या आहेत त्याजवरून श्रुत होईल. कृपा करणार धणी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २३७.

श्री. इ. स. १७८७.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे— राजश्री आंबोजी इंगळे पाणिपताकडे सरसुभेदार होऊन गेले आहेत. त्यास भंगेलसिंग शीख एकहजार स्वारांचा सरदार, त्यास चौ लक्षा रुपयांचे प्रगणे सरंजामांत लावून दिल्हे आहेत. याजकरितां मशारनिल्हे एकहजार स्वारांनशीं राजश्री आंबोजी इंगळे यांजसमागमें आहेत. डलेवाले कर्मसिंग व गुरुदत्तसिंग वगैरे दहा बारा हजार फौजेनशीं शीख इंगळेमजकुरांचे सन्मुख आले आहेत. यांची त्यांची नित्यानीं गोळागोळीची लढाई होत असते. इंगळे ह्मणतात कीं, सा आणे दरस्वारीं दररोज घेऊन चाकरी करावी. डलेवाले शीख ह्मणतात कीं, ज्याप्रमाणें भंगेलसिंगास परगणे लावून दिल्हे आहेत, त्याप्रमाणें आह्मांसही लावून द्यावे, ह्मणजे उत्तम. नाहींतर अंतरवेदींत आमची रखी दर

रुपयास आठ आणे आहेत, सुरळीत द्यावी. ह्मणजे आह्मी आपले रफिकतींत राहूं. ह्मणून बोलणीं बोलतात. अद्यापि एक तह ठरला नाहीं. गुलामखा, जाबते-खानाचा पुत्र, यांच्या व इंगळेमजकुरांच्या भेटी जाल्या. दोन्ही फौजा मिळोन जमाव भारीच आहे. पुढें डलेवाले शिखांचा तह ठरून परस्परें भेटी होतील, तें मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

## लेखांक २३८.

**श्री.** इ. स. १७८७.

''पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:–पातशाहाची मर्जी कीं, पोटास मात्र लक्ष दीड लक्ष रुपये दरमहा देत जावा. वरकड राजकारभारासीं व दौलतीसीं यांस गरज नाहीं. ऐसी यांची प्रकृत आहे. व यांचे पुत्र वगैरे शाहाजादे मिळून शेंदीडशें असामी आहे. परंतु त्यांतही कोणी जुरतवाला व दैववान् दिसत नाहीं कीं, पातशाहीस आळा घालून दौलत आटोपील. याजकरितां विनंति येथील रीत व प्रकार पाहून लिहिली आहे. श्रीमंत राजश्री रावसाहेब प्रारब्धवान् प्रतापवंत आहेत. यांचे दैवेंकडून पातशाहाचे घरची मुखत्यारी पदरीं पडली आहे. याजकरितां............ हजार फौज सडी चांगली व सरदार मातबर व कारभारी राजश्री त्रिंबकराव मामा व विसाजीपंत बिनीवाले यांचे प्रतीचा शाहाणा माणूस इकडे रवाना जालियास, जितके हिंदुस्थानी लहान थोर आहेत, त्यांस पोटसीं धरून कांहीं दिवस त्यांचें पाळीग्रहण करून, दौलत हाताखालें घालून, जैसें साताऱ्याचें संस्थान आपले स्वाधीन आहे, तैसें दिल्लीचें संस्थान आपले स्वाधीन राहे, ऐसा समय आहे. या दौलतीस दोन रोग आहेत. एक अबदाली, व एक इंग्रेज. त्यास अबदाली तर दूर, व त्यास त्या प्रांतीं पायबंदी भारी. त्याचें येणें इकडे होत नाहीं. बाकी इंग्रेज समीप आहेत. व ते शाहाणे, बुद्धिवान् आहेत. परंतु तूर्त दिल्लीचे कामांत मुखत्यारीचा हात घालावा, ऐसी बडे साहेबांची मर्जी नाहीं. त्यांनीं विलायतेस कंपनीस येथील वृत्त लिहिलें आहे. तेथून उत्तर आल्यावर कर्तव्य तें करावें, ऐसें इंग्रेजांचें मानस आहे. इंग्रेजांचा पाय दिल्लींत शिरला ह्मणजे मग आपले हातचें हिंदुस्थान गेलें. जों पावेतों त्यांचा पाय दिल्लींत शिरला नाहीं तों पावेतों............मर्जीस येईल त्याप्रमाणें येथील बंदोबस्त करावा. जर हें संस्थान आपले काबूंत व हातांत असलें, तर बंगाला आदिकरून इंग्रेजांचे दौलतीवर देखील मालकियत व खाविंदी राहील. त्यास इकडे मुलूक बहुत. परंतु

तीन वर्षें काळ पडला; पांच सा सेर अन्न विकलें. याजकरितां तमाम दुनियेचे लोक रयत मृत्य पावले. उजाडी जाली आहे. कांहीं दिवस सुरळीत बंदोबस्त जालियावर करोडो रुपये आमदानी आहे. पैक्यास कमी नाहीं. तूर्त फौजही पाहिजे, व कांहीं थोडा बहुत पैकाही पाहिजे. तेव्हां जो येथें राहील, त्याची अब्रू राहून, बंदोबस्त होऊन, पातशाहात श्रीमंतांचे घरांत राहे ऐसा समय पुढें येणार नाहीं. सूचनार्थ विनंति लिहिली असे. स्वामी धणी आहेत. उत्तम सल्ला जाणतील ते करतील. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २३९.

श्री.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. महमदबेग हमदानीं जैपूरवाल्याकडे उठोन गेला. त्याचा वकील लछीराम कुटुंबसुद्धां दिल्लीस होता. त्यास राजश्री पाटिलबावांनीं लिहून पाठविलें कीं, जे कोणी हमदानीचे निजबती लोक तेथें असतील, त्यांस कैद करावें, म्हणून देशमुख व शाहाजीस लिहिलें होतें. त्यास, लछीराम कुटुंबसुद्धां तेथेंच होता. तो राजे दयाराम यांनीं आपलें घरीं मशारनिल्हेस कुटुंबासहित लपविलें होतें. हें वर्तमान शाहाजी व देशमुख यांनीं ऐकून पातशाहांस विनंति केली कीं, हमदानीचा वकील कुटुंबसुद्धां राजे दयाराम यांनीं आपले घरांत ठेविला आहे. परंतु हजुरांत सूचना केली नाहीं. त्याजवरून पातशाहांनीं आज्ञा केली कीं, जे शिक्षा करणें ते करावी. त्यावरून शाहा निजामुद्दीन व देशमुख यांनीं राजे मजकुरास हत्तीचे पायाखालें घालोन मारिलें. व त्याचें घर व जागिरीची जप्ती केली. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २४०.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:- राजश्री पाटिलबावांनीं सडी फौज राणेखानभाई वगैरे जैपूरकरांचे मुकाबल्यास दोन कोसांचे अंतरानें आहेत. त्यास छ० २७ माहे रमजानीं राजाकडील फौज व महमदबेग हमदानी व भीमसिंग राठोर वगैरे यांसीं व आपलेकडील राजश्री शिवाजी विठ्ठल व खंडेराव हरी यांजकडील पथकांसी व राजांचे फौजेसीं लढाई जाली. त्यास राजाकडील चाळीस पन्नास

असामी राजश्री शिवाजीपंत बापूचे व खंडेराव हरी यांचे लोकांनीं मारिले. व पन्नास साठ माणसें जखमी केलीं. शेवटीं हमदानी व राठोर माघारे हटून आपले लष्करांत गेले. ते राजश्री बापूकडील पंधरा वीस माणसें जखमी जालीं, व एक शिलेदार मारला गेला. परंतु सरकारचे लोकांनीं रांगड्यांचा मोड करून माघारें हटविलें. राजाकडील दहा बारा घोडीं पाडून आणिलीं. याप्रमाणें जाहलें. राजश्री पाटिलबावांची कन्या अडीच वर्षांची होती. त्यास मळगूद निघोन श्रावण अधिक शु॥ २ स देवआज्ञा जाहाली. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २४१.

**श्री.** इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--

विनंति ऐसीजे:- लखनऊकडील वर्तमान तरी, वजीर लखनऊस आहेत. हसन रजाखान, त्यांचे कारभारी, लखनऊहून कलकत्यास लाट कलफदानीश सीतेन साहेब इष्टिनचे बदली आला आहे. त्याजकडे पांचा साता लक्षांचा तोफा-ताफ जवाहीर, वस्त्रें, हत्ती घोडे, सोन्याचे रुप्याचे दागिने, पालख्या, अंबाऱ्या, कलाबतू, जर दोनी नुकेसी, वगैरे बहुत नादर तयार करून त्याजकडे पाठविले होते. त्यांनीं सदरहू सरंजाम साहेबमजकुरास गुजराणोन, वजिरास खिलत वस्त्रें वगैरे इंग्रेजी जिन्नस विलायतचा तोफाताफ घेऊन माघारा लखनऊस आले. इंग्रेज हापडसाहेब वगैरे कुल तीन कंपू ज्या स्थळीं आहेत, त्या स्थळींच अद्यापि आहेत. परंतु साहेबमजकूर कलकत्याहून कूच करून श्रीकाशीस येणार. तेथून जवांबख्त पातशाहाजाद्यास बरोबर घेऊन लखनऊस येणार. ह्मणून वर्तमान आहे. ते लखनऊस आलियावर काय मसलत करतील, तें श्रवणांत आलियावर विनंति लिहूं. अद्यापि मसलतीचें वर्तमान जाहीरदारींत आलें नाहीं. ज्यासमयीं खानमजकूर रुकसत जाहाले, त्यावेळेस आज्ञा लाट कलफदानस सीतेन साहेबांनीं केली आहे कीं, तुह्मीं लखनऊस जाऊन फौज ठेवणें. त्याजवरून निगादास्त फौजेची करावी, ह्मणून वजिरांनीं आज्ञा खानमजकुरास केली आहे कीं, फौज ठेवावी. परंतु फौज ठेवून काय मसलत करावी, हें वर्तमान जाहीरदा-रींत समजल्यांत आलें नाहीं. अबदालीकडेही इंग्रेजांचा वकील, हत्ती घोडा, वस्त्रें जवाहीर वगैरे सामान घेऊन, राजश्री पाटिलबावांसीं भेटून अबदालीकडे विलाय-तेस गेला आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २४२.

श्री. इ. स. १७८७.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– पातशाहा दिल्लीस आहेत. पातशाहांनीं राजश्री पाटिलबावांस लिहिलें होतें कीं, तुह्मी एकाएकीं जयपुरासमीप जावयाचें नव्हतें. डिगेस जैपूरकर चौ लक्षांचा मामला करीत होते. तुह्मीं कूच केलें, त्यासमयीं सा लक्षांचा मामला करीत होते. त्यासमयींच मामल्याचा जाबसाल फडशा करून मथुरा डीग या ठिकाणीं राहून, चहूंकडे फौजा पाठवून, दाबाखालीं चहूंकडील कारभाराचा दाब राखायाचा होता, तो अर्थ न घडला. जलदी करून शहरासमीप गेला. तेथून माघारा फिरला. त्यास पर्जन्यकाल नदी नाले भरतील. रसद येऊन लष्करांत पावणार नाहीं. या अर्थी कूच करून, करील ? बारी लालसोट अलीकडे आहे, तिजला टाकून डिगेपासून विसा कोसांवर येऊन, आपला मुलूख पाठीमागें घेऊन मुक्काम करून असावें. ह्मणजे फौजेंत महागाई होणार नाहीं. आपले मुलकांतून रसद येऊन पावेल. तेथून सड्या फौजा पुढें घालून जैपूरकराचे फौजेसीं गांठ घालावी. व आह्मांस ह्मणाल तर आह्मीही कूच करून येऊं. परंतु स्वारीचें सामान तयार करून पाठवावें. ह्मणून लिहिलें होतें. त्याचें उत्तर यांनीं लिहिलें की, आपण खुश दिल्लींत असावें. रमजानचे दिवस आहेत. त्याजकरितां तसदी न करावी. आपले एकबलानें सर्व मनोदयानुरूप घडून येईल. ह्मणोन लिहिलें आहे. आपले फौजेची व जैपूरकराचे फौजेची सातां कोसांची तफावत आहे. जैपूरकराचे फौजेंत फूट आहे. एकदिल नाहींत. व राजा प्रतापसिंगही साशंकित आहे कीं माघारा जैपुरास जावें. त्यास भीमसिंग नामें बक्षी जोतपूरकराकडील वीसा हजारा फौजेनिशीं कुमकेस आला आहे. त्यानें मात्र राजास दम देऊन थांबवून ठेविलें आहे. या दिवसांत जोधपूरकर प्रतापसिंग या दोहीं राज्यांशीं व सरकारचे सरदारांशीं बिघाड आहे. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विनंति."

---

## लेखांक २४३.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे:– शाहा अबदाली पिशोरास आहे. त्यांजकडील फौज व त्याचा पुत्र अटक उतरून, किशमीर व झीलम व टवा भकड ( ? ) वगैरे अटक

नदीपार जो मुलूख आहे, त्याचा बंदोबस्त करून आहेत. पुढें पेशकदमी करीत नाहींत, व यंदा करणार नाहींत. याप्रमाणें वर्तमान आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. व हापडसाहेब फिरंगी व वजीर लखनौस पातशाहाजादा जुवांबख्तसुद्धां शिकार खेळन वगैरे ऐषआराम करून आहेत. कांहीं उद्योग करून नाहींत. मागें श्रवणांत वर्तमान आलें होतें कीं, मेहेदीघाटावर पूल बांधून अंतर्वेदींत उतरावें. याचें कारण हेंच कीं, शिखांनीं श्रीगंगापार जाऊन बरेलीचे आसपास कांहीं मुलूख लुटून नेला. ह्मणून गंगातीरीं घाटोंघाटचा बंदोबस्त करावा, या उद्योगांत होते. त्यास हल्लीं सरकारच्या फौजा शिखांचे तोंडावर आहेत. सबब ते आपले जागां स्वस्थ आहेत. सरकारांसीं व वजिरासीं व इंग्रेजांसीं तूर्त सलूख व स्नेह आहे. विशेष असल्यास व ऐकिल्यास विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

## लेखांक २४४.

श्री. इ. स. १७८७.

पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– नवाब नजबकुलीखान रोहतकेस आहे. व बदलबेगखान कोटपुतळीकडे आहेत. या दोघां थोकदारांकडेही जैपूरकरांचे संदर्भ आहे. परंतु ते आपलाले ठिकाणीं आहेत. यांचींही बोलावणीं व पत्रें गेलीं आहेत कीं, कूच करून लष्करांत आह्मांपासीं येणें. ह्मणून पत्रें गेलीं आहेत. परंतु ते जैपूरकराकडे कूच करून जातात, किंवा लष्करांत यांजपाशीं येतात, हें काहीं निवडलें नाहीं. परंतु महमदबेग हमदानी तिकडे गेला, त्यापेक्षां हिंदुस्थानी फौजेचा व सरदाराचा भरंवसा पडत नाहीं. व येथें तो सर्व प्रकारें भरंवसा तोफखान्याचा व पलटणाचा व हिंदुस्थानी फौजेचा आहे. समयास घडेल व प्रत्ययास येईल तें खरें. याप्रमाणें वृत्त आहे. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

## लेखांक २४५.

श्री. इ. स. १७८७.

विनंति ऐसीजे:– पातशाहांनीं आपले चिरंजीवास व बेगमास बोलावून आणिलें कीं, गुलाम कादरखान यानें तमाम मुलूक जप्त केला, त्यास काय करावें? पंधरा वीस हजार स्वार प्यादा जमा जाला आहे, त्यास भक्षावयास पाहिजे.

आणि कोणी एक जणानें हिंमत धरून, हे फौजा आटोपून खानमजकुराचें पारपत्य केलें पाहिजे. त्यास, बेगमांनीं उत्तर दिल्हें कीं, आमचा दरमहा आहे; त्यास जों पावेतों खानमजकुराचें पारपत्य होय व महालांची अमदानी ये, तोंपावेतों आह्मी खर्चास मागणार नाहीं. व पातशाहाजाद्यांनीं उत्तर दिल्हें कीं, जो आह्मांपाशीं आसबाब आहे तो हजरतचे कृपेचा आहे. हा घेऊन फौजेचे खर्चांत आणावा. व आह्मांस पातशाहीची गरज नाहीं. ज्यास आज्ञा कराल, तो फौज घेऊन जाऊन, सरकारचाकरी करावयास व आपला प्राण द्यावयास तयार आहे. आपले आज्ञेखेरीज दुसरा अर्थ नाहीं. ह्मणून विनंति सर्वांनीं केली. हें ऐकून पातशाहांनीं, कलंदरबेग फराशखान्याचा दारोगा आहे, त्यास ताकीद केली कीं, पेशखेम्याची तयारी करणें व जोतिषास बोलावून मुहूर्त बाहेर निघावयाचे विचारले आहे. जोतिषांनीं विनंति केली कीं, मुहूर्ताचा निश्चय करून विनंति करूं, ह्मणून विनंति केली. त्यास मुहूर्ताचा निश्चय होऊन पातशाहा कुणीकडे कूच करतील, हे प्रत्यास आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २४६.

**श्री.** इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:- अनुपगीर गोसावी यांची अर्जी पातशाहास आली होती व आपले मतलबाची यादी पाठविली होती. त्याजवरून पातशाहांनीं अर्जीचा दरजबाब लिहून दिल्हा, व मतलबाचे यादीवर दसकत करून दिल्हें कीं, सरकार सारंगपूर बारा परगणे तुह्मांस जायदादी सरंजामांत दिल्हे आहेत. तर तुह्मीं आपले जमावानिसीं हजुरांत येणें. गुलाम कादरखान निमकहरामीस प्रवर्तला आहे. त्याचें पारपत्य करणें जरूर. ह्मणोन मशारनिल्हेचा सरंजाम त्याजकडून दूर करून, तुह्मांस सरकार सारंगपूर सरजामांत दिल्हें आहे. ह्मणून मतलबाची याद दसकती व शुका पातशाहाचा गेला आहे. परंतु गोसावी मजकूर पेरोजाबादेचे किल्ल्यास मोर्चे लावून बसला आहे. किल्ला भांडतो. परंतु कोठून कुमक जाऊन पोंहचेल आणि किल्ला थांबेल, हा भरंवसा नाहीं. तेव्हां गोसावी किल्ला फत्ते करून, तिकडील बंदोबस्त करून, मग दिल्लीस येणार. याप्रमाणें वृत्त आहे. व इंग्रेज बडेसाहेब यांसही शुके गेले आहेत कीं, गुलाम कादरखान याजकडे सरकार सारंगपूर व गोसगड वगैरे महाल आहेत; तरी

श्रीगंगापथरगडापासीं चार पलटणें वार उतरून, सदरहू महालांची जप्ती करणें. ह्मणोन शुके गेले आहेत. परंतु अद्याप इंग्रेजांचीं पलटणें किंवा गोसावी यांची फौज हे कोणीही सारंगपूर गोसगडाकडे गेले नाहींत. आपलाले स्थळीं आहेत. पुढें होईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक २४७.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसींः—

विनंति ऐसीजेः— येथें श्रवणांत आलें कीं, सरकारची डांक पुण्याहून ते राजश्री पाटिलबावा यांचे लष्करपावेतों बसली आहे. त्यास डांकवाल्यास ताकीद होऊन राजश्री पाटिलबावांचे लष्करापासून तो दिल्लीपावेतों चार पांच मजला जमीन आहे. येथेंही डांक दिल्लीपावेतों बसली तर वरचेवर येथील वृत्त स्वामींस निवेदन होत जाईल. याचें कारण हेंच कीं, येथील पातशाहांची दौलत जेफ ह्मतारी जाली आहे. एक पातशाहाचें नांव व गादी मात्र आहे. जो कोणी यांची मर्यादा करून हे दौलत सांभाळील, तर साडेबावीस सुभ्यांवर हुकूम व फौजबंद असल्यास जबरदस्ती चालेल. याप्रमाणें येथील स्थित जाली आहे. पातशाहींत कोणी माणूस व फौज नाहीं कीं, या दौलतीस आव घालील. ह्मणून सूचनार्थ विनंति लिहिली आहे कीं, अजून पातशाहा व दिल्लीचें स्थळ आपले काबूंत आहे. आतां इंग्रेज, व वजीर, व पातशाहाजादा समीप फरोकाबादेस आले आहेत. कदाचित् त्यांचा पाय दिल्लींत, व पातशाहींत इंग्रेज शिरले, ह्मणजे सर्वांस भारी पडेल; व सर्वांवर हुकूम व जबरदस्ती करतील. मग मसलत आटोपणार नाहीं. ह्मणोन विनंति लिहिली असे. जलदीनें फौज व एक सरदार आलियास आपली काबू राहील. याहीवर स्वामी सर्वज्ञ आहेत. उत्तम सल्ला असेल तें करतील. येथील वृत्त कचें स्वामींस श्रुत व्हावें, ह्मणून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २४८.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसींः—

विनंति ऐसीजेः— मुंडसानचा किल्ला पोहपसिंग जाट यानें घेतला, व पेरोजाबादेचे किल्ल्यास अनुपगीर गोसावी लागला आहे. किल्ला मजबूत चांगला आहे.

परंतु उपराळा होत नाहीं. याजकरितां तोही सुटेल ऐसें आहे. खुर्जाचा किल्ला खुर्जेवाल्या पठाणानें घेतला. व मलक महंमदखान व अनुपगीर गोसावी यांनीं दरोबस्त मुलूख शिकंदऱ्यापासून तों पेरोजाबादेपावेतों कोलचें शहर व किल्ल्यासुद्धां राजश्री पाटिलबावांचीं ठाणीं उठोन दिधलीं व आपला बंदोबस्त केला आहे. सरकारांत एक आगरें व एक रामगड मात्र दोन किल्ले राहिले आहेत. वरकड सर्व किल्ले व सर्व मुलूख ज्याचे हातीं लागला, त्यानेंच दाबून घेतला. याप्रमाणें गर्दी जाली आहे. पुढें सरकारची फौज येऊन बंदोबस्त होईल, तो सुदिन असे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २४९.

**श्री.** इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, लखनौहून वृत्त आलें कीं, राजश्री सदाशिव मल्हार यांनीं लाट कलफदान सितेन साहेब इंग्रेजांस विनंति केली कीं, दोन कंपू आमचे कुमकेस द्यावे; पन्नास लक्ष रुपये आह्मांपासून घ्यावे. त्यास इंग्रेजांहीं उत्तर दिल्हें कीं, "तुह्मांपासीं पैका असता, तरी तुमची फौज बिघडून हा फजीता कां होता?" त्यास, राजश्री सदाशिव मल्हार यांनीं उत्तर इंग्रेजांसी केलें कीं, आपण "आज्ञा केली हे खरीच आहे. आह्मांपासीं पैका नाहींच. परंतु माळव्याचा मुलूक आमचा आहे. तो तुह्मांस पन्नास लक्षांत लाऊन देऊं. जों पावेतों तुमचा पैका फिटे, तों पावेतों माळव्याचे महालांत आपला अंमल. अथवा आह्मीं आपला आमील ठेऊन तुमचा पैका आदा करून देऊं." ह्मणून परस्परें बोलणें होऊन, पामरसाहेब इंग्रेजास याजसमागमें बडेसाहेबांनीं दोन कंपू यांचे तैनातीस एक वर्ष द्यावे ऐसा करार जाला, ह्मणून वर्तमान श्रवणांत आलें. व दुसरें वर्तमान कीं, इंग्रेजांहीं मस्लता करार न केला. ह्मणाले कीं, "जो मुलूक तुह्मांकडे आहे त्यापैकीं सा आणे आह्मांस द्यावे, व दहा आणे तुह्मीं घ्यावे. व नवा मुलूक तुह्मी आह्मी मिळून घेऊं. त्यांतही याप्रमाणें हिस्सा द्यावा." ह्मणोन इंग्रेजांनीं स्वाल केला. त्याजवरून जितका राजश्री पाटिलबावांकेड माळव्याचा वगैरे मुलूक आहे, त्यांत सा आणे हिस्सा द्यावा व भडोच किल्ला गुजरातप्रांतीं आहे, तो द्यावा. येणेंप्रमाणें सदाशिव मल्हार यांचे विद्यमानें कारारमदार होऊन, कंपू समागमें घेऊन येणार ह्मणोन, हेंही वर्तमान ऐकिलें आहे. त्यास दोहींतून मस्लत्याची गोष्ट करार जाली, किंवा हिस्सा द्यावा हे गोष्ट करार जाली, हा निश्चय



जुन्या दिल्लीचा उत्तर दरवाजा.

समजल्यांत आला नाहीं. प्रत्ययास आलियावर विनंति लिहूं. दोन्हीं वर्तमानें पातशाहांचे येथें श्रवणांत आलीं. त्याजवरून लिहिलें आहे. त्यास, सर्व, राजश्री पाटिलबावांचे बदकौलीमुळें त्यांसी बहुत दिक आहेत. कोणीही हे गोष्ट इच्छीत नाहीं कीं, पुन्हां राजश्री पाटिलबावांनीं पातशाहाचे घरची मुख्त्यारी करावी. हें मानस कोणाचेंही नाहीं. आणि राजश्री पाटिलबावांची मर्जी कीं, सर्वस्व द्यावें आणि फौज जमा करून जैपूरकर व मारवाडकर रजपुतांचें पारपत्य करावें; आणि पातशाहांचे घरची मुख्त्यारी करावी. हे गोष्ट न घडली तर सर्व बुडवून आपण बुडावें. परंतु दुसऱ्याचा पाय, दक्षण्याचा, हिंदुस्थानांत शिरूं देऊं नये. ऐसी यांची मर्जी आहे. श्रवणांत आलें तें वर्तमान श्रुत व्हावें ह्मणोन विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५०.

**श्री.** इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– कलकत्तेकर लाट कलफदानीश सितेन साहेब कलकत्त्याहून कूच करून लखनौस येतो. त्यास, फरोकाबादेस कंपू व इंग्रेज आहेत, यांस पत्रें पाठविलीं कीं, आह्मी सत्वर येतों. श्रीभागीरथीतीरीं आमचे छावणीची तयारी करावी. त्याजवरून फरोकाबादेस बंगले आदिकरून छपरबंदीची तयारी आहे. साहेबमजकूर लखनौस अथवा फरोकाबादेस दाखल जाल्यावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५१.

**श्री.** इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजे:– जवांबक्ष शाहाजादा वजिराचे येथें होते. खर्चवेंच चालवीत होते. त्यास आपले फौजेची घालमेल ऐकून नवाबासीं सख्त जाबसाल करून स्वार जाले. मार्गांत दहाबारा हजार फौज जमा करून, मथुरा वृंदावन वगैरे ठाणीं मार्गांत लागलीं, तीं कायम करून, आपण दिल्लीस जाऊन पातशाहांची मुलाजमत केली. जाबसालांत पितापुत्रासीं रहस्य न बनलें. तेव्हां माघारे लखनौस आले. हासनगंजास मुक्काम केला, आणि नवाबास सांगून पाठविलें. त्याचें उत्तर जालें कीं, "जाण्याचें प्रयोजन काय होतें? गेल्यास यावयाची जरूरी

काय आहे ? आमचे वस्तु खर्चवेंच चालत नाहीं." याअन्वयें निरोप गेल्यावर बहुत लाचार जाले. फिरंग्याकडील आईफसाहेब जाऊन आले. नवाबासीं मुलाजमत जाली. मेजमानी करून नवाब अयोध्येस गेले, आणि साहेबांकडे सांगून पाठविलें कीं, शाहाजादे लखनौस रहातील तोंपावेतों आमचें येणें होणार नाहीं. हें वर्तमान ऐकिल्यावर शाहाजादे तीन दिवस राहून काशीस गेले. तेथील साहेबांकडे सांगोन पाठविलें कीं, आमची रहावयाची सोय करून द्यावी. त्यांनीं वकील पाठवून विनंति केली कीं, कलकत्त्यास पत्रें पाठविलीं आहे. उत्तरें आल्यावर करणें तें करूं. तोंपावतों आपण मुक्काम करून रहावें. त्याप्रमाणें आजपावेतों होतों. आतां उत्तरें आलीं कीं, हवेली खाली करून द्यावी. जेथें विचारास येईल तेथें सुखरूप राहावें. त्याजवरून हवेली राहावयास सिद्ध करून दिल्ही. ते राहिले आहेत. सेवेसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५२.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः—इंग्रेज लाट कलफदानस सितेन साहेब कलकत्त्याकडून कूच करून श्रीकाशीस आले. जुवांबख्त पातशाहाजादा यांची भेट घेतली. एकशें एक मोहोर शाहाजाद्यांस नजर केली, व कांहीं तोफा तायेफ इंग्रेजी सरंजाम नजर केला. पातशाहाजाद्यांनीं साता पारच्यांचा खिलत, व हत्ती, व जेगा शिरपेंच, मोत्यांची कंठी बमय उरवसी, व तरवार येणेंप्रमाणें इनायत केलें. पांच मोहोरा तरवारीची नजर बडेसाहेबीं केली. तेथून पातशाहाजाद्यासमागमें घेऊन लखनौस कूच केला. इतक्यांत वजीर असफद्दोले लखनौहून सामोरा निघाले. मार्गीं त्यांच्या यांच्या भेटी जाल्या. दरमजल लखनौस आले. वजीर असफद्दौला यांनीं इंग्रेजांस मेजमानी केली. व इंग्रेजांनीं वजीरास केली. परस्परें वस्त्रें, हत्तीघोडे, जवाहीर, शिष्टाचार जाला. तेथून शहाजाद्यासुद्धां त्रिवर्गही कूच करून फरोकाबादेस श्रीभागीरथीतीरीं आले आहेत. फरोकाबादेस छावणी बंगले आदिकरून छपरबंदी जाली आहे. तेथें कांहीं दिवस स्थिरता आहे. तेथें राहून पुढें काय मसलत ठरेल, तें श्रवणांत आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५३.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे:—पातशाहाजादा जुवांबख्त फरोकाबादेहून कूच करून पिरोजाबादेस आले. तेथें अनुपगीर गोसावी व मलक महमदखान यांची मुलाजमत जाली; व सल्ला ठैरली कीं, अकबराबादेस जाऊन अकबराबादेचा किल्ला हाताखालें घालून, इस्मायल बेग यांस समागमें घेऊन दिल्लीस जावें. याप्रमाणें अनुपगीर गोसावी यांचे विचारें सल्ला ठैरली आहे. परंतु आगऱ्याचा किल्ला अद्याप मजबूत आहे. थोडक्याच दिवसांत कांहीं कुमक राजश्री पाटिलबावांकडून जाली तर किल्ला राहील. जर कुमकेस दिवसगत लागली, तर किल्ला राहणें कठीण. याप्रमाणें वृत्त आहे. येथूनही पातशाहाजाद्यास बोलावणीं पातशाहाचीं गेलीं आहेत कीं, किल्ल्यास न आटकतां येणें. गुलामकादरखान यांनीं बेअदबी करून किल्ल्यांत तोफांचे गोळे टाकिले, आणि नित्यांनीं जुंझतो. त्याचें पारपत्य करणें जरूर. याजकरितां बमय फौज व तुह्मांसमागमें येणार आहेत त्यां सुद्धां, तेथें भोजन करीत असाल, तरी दिल्लीस येऊन हात धुणें. येणेंप्रमाणें जरूरीचीं पत्रें गेलीं आहेत. ते दिल्लीस आलियावर जो नक्षा ठरेल तो विनंति मागाहून लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५४.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे:- वजीर असफद्दौला लखनौस आहेत. पातशाहाजादा जुवांबख्त लखनौस दाखल जाले. वजिरानें पातशाहाजाद्यांस, पंचमहाला ह्मणोन मोठी मातबर जागा लखनौंत आहे, ते खाली करून पातशाहाजाद्यांस रहावयास हवेली दिधली. हे कुटुंबसुद्धां तेथें जाऊन राहिले. एकशें एक मोहोर पातशाहाजाद्यांस व एकवीस एकवीस मोहोरा तिघे मुरशदजाद्यांस व पंचावन्न खोन कापड व चार खोन जवाहीर व हत्ती दोन व घोडे पांच येणेंप्रमाणें सन्मान करून, महालांत दाखल करून, आपण आज्ञा घेऊन, वजीर हवेलीस दाखल जाले आहेत. वजिराचे बहिणीचें लग्न कर्तव्य ह्मणून पातशाहाजाद्यापाशीं आज्ञा घेऊन अयोध्येस आजीपाशीं लग्नास जाणार. व लाट कलफदानस सितेन साहेब इंग्रेज कलकत्त्याहून पुन्हां लखनौ, फरोकाबादेकडे येणार, ह्मणून वर्तमान आहे.

अद्यापि कलत्त्याहून कूच केला नाहीं. व राजे प्रतापसिंग जैपूरकर यांजकडून दौलतराम हलदिया व रोडाराम दरजी ऐसे दोघेजण, राजे बिजेसिंग जोतपूरकर यांजपाशीं गेले आहेत. त्यांचें यांचें बोलणें शरीरसंबंधाचें व पुढें दक्षण्यांची मसलत करणें हा मजकूर ठैरावून, राजे प्रतापसिंगास पत्रें आलीं आहेत. त्याजवरून राजेमजकूर कूच करून पुष्करास जाणार. तिकडून जोतपुरीहून पुढें राजे बिजेसिंग सामोरा पुष्करास येऊन, राजास जोतपुरास घेऊन जाऊन, नातीचें लग्न करून, पुढें मसलत करणें ते करावी ह्मणून बोलणें ठरलें आहे. व राजे बिजेसिंग यांनीं आपले वकील राजश्री पाटिलबावांकडे पाठविले आहेत कीं, "तुमचा आमचा पूर्वस्नेह आहे त्याप्रमाणेंच असावा. ज्याप्रमाणें पूर्वापर आह्मांपासून मामला घेत आला आहांत, त्याप्रमाणें घ्यावा. आणि तुह्मी आह्मी एक विचारें असोन हिंदू राज्य असावें; म्लेंच्छांचा नाश असावा." ह्मणून बोलणीं बोलून वकील पाठविला आहे. ह्मणोन श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. तैमूरशा पातशाहा अबदाली यांजकडील फौज दोन दस्ते राजे बिकानेरकर यांचे सरहद्देस आली आहे. त्या प्रांतीं रहिमखान ह्मणून कोणी सिद्दी आहे, त्यासीं कांहीं बिघाड मामल्याचा जाला आहे, ह्मणोन बंदोबस्तास फौज पाठविली आहे. दुसरें, तैमूरशाहांनीं शहाअलम पातशाहास नामा स्नेहवृद्धीचा पाठविला आहे कीं, आमची फौज बिकानेराचे सरहद्देस आली आहे. त्यास आपल्यास फौजेचें प्रयोजन असिल्यास बोलावून घ्यावी, ह्मणून लिहिलें आहे. परंतु उष्ण काळ दिवस, बिकानेरापासून तो जोतपुरापावेतों पाणी नाहीं. याजकरितां फौज येणें कठीण. हें जाणून शिष्टाचार मात्र लिहिला आहे. शीख तमाम सरहद्देपासून तो कोलजलेश्वर पावेतों अंतरवेदींत महालांतून चौथा हिस्सा घेऊन बंदोबस्त करून आहेत. पुढें श्रवणांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५५.

**श्री.** इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे.- लाट कलफदानस साहेब इंग्रेज कलकत्त्याहून सहल करीत मुलूक पहात फरोकाबादेस आले. तेथें आठ पंधरा दिवस राहून वजीर असफउद्दौले यांजकडील पैका येणें त्याचा बंदोबस्त हसेबंदी करून, तेथें पहिलें इंग्रेजांकडून हापड साहेब पैक्याचे तहसिलीस होते, त्यास समागमें घेऊन, त्याची

बदली दुसरा इंग्रेज लखनौस वजिरापासीं ठेवून, पातशाहाजाद्यास दिल्लीकडे रवाना करून, आपण कूच करून माघारा कानपुरास भागीरथीतीरास गेले. मजल दरमजल कलकत्त्यास माघारा जाणार. ह्मणोन वर्तमान पातशाहाचे येथें आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. राजश्री सदाशिव मल्हार यांनीं आपलेकडून एक छोटेखानी गृहस्त सेणवाई बडे साहेबांचे स्वारीसमागमें बातनी लेहून पाठवीत जावी ह्मणून दिधला आहे. व आपण तूर्त वजिरापासीं आहेत. पुढें श्रवणांत येईल तें वृत्त मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५६.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे.– लाट कलफदानस सितेन साहेब कलकत्त्याहून निघाले, ते मुलकाची सहल करीत, श्रीकाशी व लखनौस येऊन फरोकाबादेस आले. तेथें राजे जैपूरकर यांचे वकील, व राजश्री सदाशिव मल्हार राजश्री पाटिलबावांकडील, व पातशाहाजादा जुवांबख्त, या सर्वांनीं आपले मतलबाविसीं विनंत्या केल्या कीं, आमची कुमक करावी. त्यास इंग्रेज बडेसाहेब यांनीं सर्वांस उत्तर दिल्हे कीं, "आह्मांस कंपणीची आज्ञा नाहीं कीं, कोणासीं बिघाड करावा व कोणाची कुमक करावी. ऐसी आह्मांस आज्ञा नाहीं. सर्वांसीं आमचा स्नेह. कोणासींही आम्हांस बिघाड करणें नाहीं." ह्मणून साफ सर्वांस उत्तर दिल्हें. आणि कांहीं दिवस फरोकाबादेस राहून माघारा कूच केला. कानपुरीं श्रीभागीरथीतीरीं जाऊन मुक्काम केला आहे. पुढें कलकत्त्याकडे कूच मुक्काम करीत, मुलकाची सहल करीत जाणार. ह्मणोन वृत्त पातशाहांचे येथें बातमी आली, त्याजवरून विनंति लिहिली आहे. बडेसाहेब कानपुरीहून पुढें कूच करून श्रीकाशीस गेले. पुढें मकसुदाबादेस जाऊन सत्वरच कलकत्त्यास दाखल होणार, ह्मणून वर्तमान आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५७.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे:– लखनऊकडील वर्तमान, तर लाट कलफदानास सितेन साहेब

श्रीकाशीहून कूच करून कलकत्त्यास गेले. वजीर असफद्दौला लखनऊहून कूच करून सहलशिकारीस कुटुंबेंसुद्धां गोमतीतीरीं झिलेवर जाऊन मुक्काम करून शिकार खेळत फिरतात. इंग्रेजांचा बंदोबस्त वजिराचे मुलकांत होता, तो सर्व इंग्रेजांनीं आपला उठऊन, वजिराचा जिमा करून दिल्हा; व आपले सा आणीच्या हिशाचा मक्ता ठैराऊन पैका घेत जावा. हैदरबेगाची निशा ठैराऊन गेले. याप्रमाणेंच अहंमदखा बंगस फरोकाबादवाले यांचा पुत्र मुजफरजंग यासींही स्नेह शिष्टाचार बहुत बडेसाहेबांनीं करून, त्याचाही मुलूख त्याचे स्वाधीन करून, आपला ऐवज सा आणीचा करारमदार करून, त्याजकडीलही खातरजमा करून गेले. एक बंगाल्याचा मुलूख कदीम पातशाही सुभा नवाब कासमअल्लीखान बंगाल्यांत राहात होता. मकसुदाबाद वगैरे भवानी राणीचा मुलूख आदिकरून तितका मात्र इंग्रेजांहीं आपले खाजगीखालें ठेविला. वरकड सादुलाखान रोहिल्यासुद्धां तमाम मुलूख सोडून, ऐवजाचा मखता ठैराऊन, शिबंदीचा खर्च तोडून माघारा कलकत्त्यास इंग्रेज गेला आहे. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५८.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विज्ञापना ऐसीजे:– नवाब वजीर, बकराझील ह्मणोन जागा अयोध्येहून पुढें पन्नास कोस आहे, तेथें हत्ती, गेंडे वगैरे जनावरें शिकार येतात, त्यांचे शिकारीकरितां गेले आहेत. चैत्रमासीं माघारां येणार. तेथील दिनचर्येचें वर्तमान, एकबार पाठविली आहे त्याजवरून निवेदन होईल. फिरंगी आपले स्थलीं आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २५९.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे:– छ० १० जिल्कादीं राजश्री सदाशिव मल्हार सेणवाई यांस लखनऊस वजिराकडे व इंग्रेज लाट कलफदानस सितेन साहेब यांजकडे रवाना केले आहेत. याचें कारण हेंच कीं, जो आपला पूर्व स्नेह आहे तो पक्का असावा. आणि जे कोणी आह्मांसीं बदमामली करितात, त्यांस ताकीद करावी

कीं, यांचा आमचा स्नेह, तुह्मी यांचे मुलकांत दंगा केलियास कामास येणार नाहीं. ह्मणोन गुलाम कादरखान व अनुपगीर गोसावी यांस ताकीदपत्रें इंग्रेजांचीं पाठवावीं. आणि जैपूरकरांनीं आपला वकील नंदराम हळदीया तुह्मांपासीं पाठविला आहे. त्यास आपण नादीं लाऊन ठेविलें आहे. त्यास साफ सांगावें कीं, राजश्री पाटिलबावांसीं व आह्मांसीं स्नेह आहे. त्यांसीं राजांनीं बेआदाई केली आहे हें ठीक नाहीं, ह्मणोन त्यांसीं बोलून, त्याजकडील जैपूरकरांचा नाद आहे तो तोडून टाकावा; ह्मणोन सदाशिवबावांस रवाना केलें आहे. याखेरीज अंतस्थ आणीक बारीक बोलणें असेल, तें समजल्यांत आलें नाहीं. याजसमागमें तीर्थस्वरूप राजश्री दामोदर देवराव यांसही करून दिल्हें आहे कीं, सरकारचीं वस्त्रें वजिरास आहेत, तें जाऊन गुजराणणें. ह्मणोन आज्ञा जाली. व वजिरास व हापड साहेब इंग्रेज यांसही पत्रें लिहून दिल्हीं आहेत. त्याजवरून पंत मशारनिल्हेही समागमें गेले आहेत. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २६०.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः– राजश्री पाटीलबावांनीं वजिरास व लाट कलफदानस सितेन साहेब यांस हत्ती घोडे वस्त्रें जवाहीर वगैरे तोफा तायफ राजश्री सदाशिव मल्हार यांसमागमें सरंजाम त्यांस द्यावयास दिल्हा आहे. त्यांच्या यांच्या भेटी जालियावर व बडेसाहेब लखनऊस फरुकाबादेस आलियावर, कदाचित् इंग्रेजांनीं आड घातली कीं, कराराप्रमाणें पातशाहाजादा जुवांबख्त यांस आगरियाचा किल्ला द्यावा, व आगरियाखाले तालुके आहेत ते द्यावे, ऐसेंही बोलणें पडल्यास कबूल करावें. याप्रमाणेंही राजश्री सदाशिव मल्हारास आज्ञा जाली आहे. ह्मणोन श्रवणांत आलें आहे. पुढें प्रत्ययास येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २६१.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजेः– उमरावगीर गोसावी राजे अनुपगीर गोसावी यांचे ज्येष्ठ बंधू आगरियाहून धरून, राणेखान, रायाजी पाटील घेऊन गेले होते. त्यास राजश्री

पाटिलबावांपासीं पावते केलें. राजश्री पाटिलबावांनीं बहुत सन्मान करून, हत्ती व घोडे व वस्त्रें जवाहीर वगैरे देऊन, शिष्टाचार करून देऊन, शपथप्रमाण बेलभंडार जाला कीं, तुह्मीं आह्मांपासीं असावें; तुमचे पूर्ववत्प्रमाणें चालवूं. ह्मणून करारमदार जाला आहे. त्यांनीं राजे अनुपगिरासही बोलावणियाचें पत्र पाठविलें आहे कीं, तुह्मीं कूच करून येणें. ह्मणून लिहिलें होतें. तेंच पत्र अनुपगिरांनीं पातशाहास दाखविलें. पातशाहा बहुत संतोष जाले कीं, बहुत उत्तम जालें कीं, पाटिलबावांची व तुमची एकवाक्यता जाली. त्यास पातशाहांचें मानस कीं, गुलाम कादरखान व इसमाईल बेग यांचें पारिपत्य करून राजश्री पाटिलबावांनीं येऊन आमची भेटी घ्यावी; आणि पूर्ववत्प्रमाणें मुख्त्यारीचा कारभार आटोपावा. ह्मणून यांची मर्जी अजुर आहे. सरकारआज्ञेप्रमाणें वारंवार विनंति करून राजश्री पाटिलबावांकडे बदस्तुर मर्जी कायम असावी ह्मणून विनंति करीत असतों. पुढें होईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २६२.

**श्री.** इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– राजे प्रतापसिंग यांजकडून गोसावी अनुपगीर व बक्षी नंदराम ऐसे दोघेजण दोन तीन हजार फौजेनिसीं पातशाहापासीं दिल्लीस येणार. याचें कारण हेंच कीं, राजश्री पाटिलबावा बदकौली आहे. यांचा विश्वास नाहीं. याजकरितां आह्मीही जिलीबींत फौजसुद्धां आहोंत, आणि आपण खासा स्वारी बाहेर निघोन दरोबस्त पातशाही सलतनतीचा व मुलकाचा बंदोबस्त करावा. हरोलीस आह्मी दोन्ही राजे हजर आहोंत. जर आपली मर्जी बाहीर निघावयाची नसली, तर जुवांबक्ष पातशाहाजादा तोही आह्मांसमागमें करून द्यावा. दरोबस्त मुलकांचा बंदोबस्त करणें आमचा जिमा आहे. ह्मणून घाट घडून, गोसावी हिंमतबहादर व बक्षी नंदराम दिल्लीस येणार आहेत. येथें आलियावर पातशाहांची मुलाजमत जालियावर काय नक्षा ठरेल, ती विनंति मागाहून लिहूं. याप्रमाणें वृत्त जैपूरकर राजे यांचे दरबारचें आलें. त्याजवरून विनंति लिहिली. पुढें प्रत्ययास येईल तें मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २६३.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विज्ञापना ऐसीजे. हिंमतबहादर अनुपगीर गोसावी, जैपूरकर राजे याजपासीं होते. तिकडून निघोन पातशाहापासीं येऊन मुलाजमत केली. पंधरा दिवस राहून गुलाम कादर याजकडे जाण्यास आज्ञा मागितली. त्याचें उत्तर सांगितलें कीं, "प्रस्तुत तुह्मीं आह्मांपासींच राहावें. आठा पंधरा दिवशीं रुकसत केली जाईल." ह्मणोन ठेऊन घेतले आहेत. इंग्रेजांनीं सामील व्हावें ह्मणोन राजश्री पाटिलबावांनीं सदाशिव मल्हार यांस पाठविलें आहे. यांनीं जाबसाल केला. त्याचें उत्तर केलें कीं, "कोणी एक मसलत करावयास सांप्रत आमचें सामर्थ्य राहिलें नाहीं. यास्तव आह्मी उभयतांकडेही बोलत नाहीं. तुमचा आमचा स्नेह आहे तो बनलाच आहे. परंतु फौजेची सरबरा प्रस्तुत होत नाहीं." सदाशिव मल्हार येथेंच आहेत. नवाब आल्यावर आज्ञा घेऊन माघारे जाणार. नवाबाचे तेथील कारभार सर्व इंग्रेजांचे स्वाधीन आहे. हैदरबेगखान कारभारी आहेत. तेही इंग्रेजांचें सूत्रांत आहेत. कलकत्त्याहून थोरला साहेब लाट कलफदान सितेन साहेब गुदस्तां वजिराचे भेटीकरितां आले होते. त्यांनीं यांसीं बहुत सलुखाचे जाबसाल बोलून, साहा आणे घ्यावयाचा ठराव होता त्याचेपैकीं दोन आणे माफ करून चार आणे घ्यावयाचा करार करून दिल्हा. व लखनऊस कोठी होती ते उठवून घेतली; व फिरंग्यांस अंमल माफ होता, तो घ्यावा या अन्वयेंकरून स्वस्थळीं गेले. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २६४.



श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पाटिलबावांस पातशाहांनीं खिलत व शिरपेंच, समशेर व हत्ती घोडा याप्रमाणें गोविंदराव, शाहा निजामुद्दीकडील गृहस्थ आहेत, त्यांजबराबर रवाना केलें. नाजर व रामरतन व अनुपगीर गोसावी यांचा एक विचार आहे. त्यांचे मनांत कीं, इस्माईलबेग गुलामकादर यांचा उपराळा करून, पाटिलबावांचा बंदोबस्त न होय तें करावें. पातशाहांची मर्जी त्यांचे ठिकाणीं दुरुस्त नाहीं. रामरतन याचे कबिले निघोन गेले. व राय सितलदास, नाजराकडील कारभारी, यांचेही कबिले पळोन गेले. नाजरही त्या तजविजेंत आहेत. पातशाहांची

मर्जी गुलामकादर व इस्माइलबेग यांचे ठिकाणीं ठीक नाहीं. अनुपगीर गोसावी यांनीं पाटिलबावांकडेही सूत्र लाविलें आहे. यांनींही खातरजमा केली. परंतु त्याचा धीर पुरता दिसत नाहीं. सविस्तर मागाहून विनंति लिहून पाठऊं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २६५.

श्री. इ. स. १७८७.

" पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– विलायतेकडील वर्तमान तरी, शाहा अबदाली व त्याचा पुत्र तैमूरशाहा आपलाले ठिकाणीं बदस्तुर आहेत. व शीख मंडळीही लाहोरापासोन तों सरहद्दपावेतों बदस्तुर आपले स्थळीं आहेत. गुलाम कादरखान सारंगपूर बुढीयास छावणी करून आहेत. यांचीं पत्रें बोलावणीचीं गेलीं होतीं. त्याचें उत्तर आलें कीं, "माझे मुलकांत शिखांचा दंगा होणार आहे. याजकरितां येणें होत नाहीं." ह्मणून उत्तर पाठविलें, व नजबकुलीखान रोहतकेस होता. तेथून कूच करून दिलीचे रुखवर आला आहे. येथीलही त्यास बोलावयाचीं पत्रें गेलीं आहेत. पाहावें, येईल किंवा नाहीं. मेरट प्रांतीं शिखांचा दंगा फार आहे. नित्य लुटितात. वाट चालत नाहीं. शीख दिल्लींत शाहदरयापावेतों लुटतात. मुलकांत बदआमली जाली आहे. राजे बिजेसिंग यांजकडील दाहा हजार फौज आणीक भीमसिंग याचे कुमकेस जैपूरकरांस सामील होणार. अद्यापि आली नाहीं. परंतु अवाई आहे. आपले लष्करांत माहागाई फार आहे. रसद येऊं पावत नाहीं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २६६.

श्री. इ. स. १७८७.

" पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– राजे बिजेसिंग यांनीं आपला वकील तैमूरशाहा अबदाली याजकडे पाठवून पैगाम केला आहे कीं, हिंदुस्थानची पातशाहात जइफ जाली आहे. तमाम मराठे मोहित जाले आहेत. याजकरितां आपण खांसा स्वारी हिंदुस्थानास यावें. लाहोराकडून शीख मार्ग देणार नाहींत, तर आह्मी आपले स्नेही आहोंत. आह्मी आपले मुलुखांतून मार्ग देऊन, आह्मीही आपले फौजेसुद्धां समागमें होऊं. दरोबस्त हिंदुस्थानचा बंदोबस्त करावा. जर आपली मर्जी यावयाची नसली, तर हमाऊं शहाजाद्यास परवानगी द्यावी कीं, फौजसुद्धां हिंदुस्थानांत

जावें. राजे बिजेसिंगहीं समागमें येतील. त्यांचे विचारें दक्षणियांस नर्मदापार करून देऊन आपला बंदोबस्त करावा. ह्मणोन शहाजाद्यास परवानगी द्यावी. ह्मणून बोलणें जालें. त्यावरून तैमूरशहा अबदाली यांनीं वकीलास आज्ञा केली कीं, आमचे मुलुखांत हंगामा हमेशा रहातो. याजकरितां इकडे मुलूख रिकामा टाकून तिकडे आमचें येणें व हमाऊं शाहाचें पाठविणें घडत नाहीं. जर तुह्मांस जरूरच असेल तर, आह्मी आपला बक्षी दहा हजारां फौजेनिसीं राजे बिजेसिंग यांजपाशीं पाठवितों. मग त्याचे विचारास येईल त्याप्रमाणें बंदोबस्त करितील. ह्मणोन बोलणें होऊन, राजे बिजेसिंग यांचे पत्राचे जाब व वकिलाचीं पत्रें ऐसीं राजेमजकुराकडे अबदालीपासून रवाना जालीं आहेत. यांची पुन्हां अर्जी अबदालीस व वकिलास पत्रें जातील. तेथून वर्तमान आलीयाउपर श्रवणांत येईल ते विनंति लिहूं. तात्पर्य, अबदालीस विलायतीकडील लोकांचा पायबंद भारी आहे. याजकरितां अबदालीस पांच स्वार वेगळे करूं सकत नाहीं, ह्मणोनही श्रवणांत आलें आहे. पुढें निदर्शनास आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.''

## लेखांक २६७.

**श्री.** इ. स. १७८७.

''पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– बुधसिंग नामें काइत वकील, बिजेसिंगाकडून पातशाहांपासीं आला आहे. तो भेटीस आमचे घरीं आला होता. त्यानें सविस्तर वृत्त राजे बिजेसिंगाकडील व राजे प्रतापसिंग जयपुरकर यांजकडील सांगितलें कीं, राजश्री पाटिलबावा ग्वाल्हेरीस होते त्या समयीं, व गुजराथेंत इंग्रजांचे मोहिमेस होते त्या समयीं, आह्मीं आपल्याकडील खंडणीचा ऐवज कराराप्रमाणें पावता करून, आह्मीं स्नेह व घरोबा रक्षिला. त्यास राजे प्रतापसिंग यांचे मामलयास जामीन होऊन, आठ लक्ष रुपये खंडणी ठैरावीत होतों. त्यांपैकीं तीन लक्ष रुपये नख्त व लाख रुपयांचें जवाहीर एकूण चार लक्ष, बाकी चार लक्ष रुपये राहिले, ते चौ महिन्यांनीं देऊं ह्मणून करारमदार करीत होतों. ह्या गोष्टी न मानितां, राव राजा प्रतापसिंग यानें बाहकाविल्यावर, खामखां आह्मी जयपुरांत ठाणें बसवून राजास काढून देऊं ह्मणोन बोलूं लागले. निदान वकील गेला होता, त्यास देखील लष्करांतून काढून दिल्हें. तेव्हां लाचार राजे बिजेसिंग जाले; आणि बक्षी भीमसिंगास दहा हजारा फौजेनिसीं जयपुरकरांचे कुमकेस पाठविलें. एक दोन लढायाही जाल्या.

निदान हा परिणाम जाला कीं, तमाम हिंदुस्थानी फौज व पलटणें यांचे बद-कौलीमुळें फुटून हे खराबी केली कीं, तमाम पातशाही मुख्त्यारी व मुलूख गमावून हलके जाले. त्यास आह्मीं पूर्वींच राजश्री पाटिलबावांस विनंति केली होती कीं, राजे जयपुरकर व राजे बिजेसिंग यांसीं सख्य राखून, पातशाहाचे घरची मुख्त्यारी व मुलूखदार करून असावें, हे सल्ला उत्तम आहे. ऐवजाची वृद्धि जालियास तुमचे व आमचे धर्मास योग्य नाहीं. ह्मणून राजे बिजेसिंग यांचें बोलणें, आमचे द्वारें करून, व पत्रें लिहिलीं आलीं. परंतु यांचे खात्रेस कांहींएक गोष्ट न आली. त्यास हल्लीं पातशाहाजादा जुवाबक्ष व अवघे जितके हिंदुस्थानी, मोंगलीये वगैरे यांचें मानस हेंच कीं, राजश्री पाटिलबावा चमेलपार करून द्यावे, आणि दरोबस्त मुलूख खाली करवून, आपला काबू करावा. ह्मणून यांचें मानस आहे. त्यास, आह्मीही दोन्ही राजांची फौज यांस शामील आहोंत. परंतु आमचे राजाची मर्जी कीं, हिंदु राज्य असावें, हा पक्ष उत्तम आहे. त्यास, जयपुराकडील वकील पुण्यांत आहेत. त्यांचे हातून उभयतां राजांचा तेथेंच जोड करून स्नेहवृद्धि करावी. अथवा आह्मीही राजाचा खलिता श्रीमंतांचे नांवें आणून तुह्मांपासीं देतों. येथून पकाई करून हिंदु राज्य व्हावें हें उत्तम आहे. सरकारांतून दुसरा सरदार पाठवावा. त्याची ताबेदारी आह्मी करून हजर राहूं. ह्मणोन बुधसिंगाचें बोलणें जालें. त्यांनीं सांगितलें कीं, हें वृत्त तुह्मीं सविस्तर आपले हजुरांत लिहावें. त्याजवरून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २६८.

श्री. इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– राजाकडील वकील तालकटोऱ्याचे मुकामीं आले. नाजर मंजूरअल्लीखान यांच्या भेटी दिल्लींत जाल्या. मेहता लालजी व मीठालाल बक्षी यांस निम अस्तिन् व गोशवारा व शिरपेंच व........दोघांस देऊन, पातशाहाकडे बिदा केले. पातशाहाची मुलाखत अद्याप जाली नाहीं. पातशाहा तालकटोऱ्याहून रेवाडीकडे कूच करून........आहेत. तेथें वकिलाची मुलाखत जाल्यावर काय सल्ला ठरेल ते विनंति लिहूं. या दिवसांत दरोबस्त यवन मंडळी दक्षण्यांसीं बेबदल जाली आहे. ज्याप्रमाणें पानिपताचे समयीं सर्व हिंदुस्थान मिळून दक्षण्यांसीं दुश्मनगी केली, तेच अवस्था आतां जाली आहे. या दिवसांत

मलकाजमानी, महंमदशाहाची बायको, इनें हवेलीविशीं आह्मांसीं कजिया मांडला आहे कीं, हवेली खाली करून देणें. आणि आह्मांस तों अहंमदशाहा पातशाहानें इनाम फरमान करून दिल्हा आहे. त्यास फरमान मनास न आणितां तगादा केला आहे. याजकरितां एक अर्जी पातशाहांस लिहून पाठवावी कीं, आमचे वकिलांसीं कोते अंदेश जमान्याची हवा पाहून, हरएकविशीं उपद्रव देतात. त्यास, आपण खाविंद समीप असतां, कोते अंदेशांनीं उपद्रव द्यावा हें ठीक नाहीं. आपण पूर्वापर हरएकविसीं यांचा गौर करीत आलां आहां, त्याप्रमाणेंच पुढेंही गौर करीत जावा, ह्मणोन एक अर्जी पाठविणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २६९.

**श्री.** इ. स. १७८७.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– शाहाजादा पळाल्याचें वर्तमान राजश्री पाटिलबावांनीं श्रवण करून रवळोजी शिंदे यांजवर बहुत इतराजी करून, शाहा निजामुद्दी पूर्वीं तेथें कारभारास ठेविले होते, त्यास हल्लीं तिकडे पाठवावें ऐसा विचार आहे. परंतु शाहाजी यांचें बोलणें आहे कीं, तेथील खर्चाची बेगमीचा बंदोबस्त करून दिधला, तर तिकडे जाईन. नाहीं तर माझें जाणें घडत नाहीं. याप्रमाणें वृत्त आहे. पेशजीं छ ५ माहे मजकुरीं विनंतिपत्रें सेवेसीं डाकेंत सरकारच्या पाठविलीं आहेत, तें प्रविष्ट होऊन सविस्तर वर्तमान श्रुत होईल. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २७०.

**श्री.** १ जानेवारी १७८८.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– राजश्री पाटीलबावा छ० १० माहे रविलावलीं इस्माईलबेग याचा मोहरा लढाईचा सोडून, कूच करून ग्वाल्हेरीस गेले आहेत. ग्वाल्हेरीअलीकडे आठ कोस कुवारी नदी आहे. तेथें मुक्काम करून आहेत. त्या मुक्कामींच पामर साहेब इंग्रज येऊन भेटला. जाबसाल कंपू चाकर ठेवायाचा करारमदार करून, कलकत्त्यास पत्रें इंग्रेजांचीं व राजश्री पाटीलबावांचीं गेलीं आहेत. तेथून जाबसाल ठैरून आलियावर कंपू यांजपाशीं दाखल होतील.

राजश्री पाटीलबावा नदी चमेल पार गेलीयावर, अजमेरचा किल्ला राजे बिजेसिंग यांनीं घेतला. व डिगेचा किल्ला राजे रंजीतसिंग जाट यांस दिल्हा. व अल्लीनगरचा किल्ला झुलफुकारखान खानजादा यास दिला, व कृष्णगडचा किल्ला जीवाराम जाट याचे पुत्रास दिला. रेवाडीपाशील गोकुळगड आहे, तो नजब कुलीखान यांनीं घेतला; व खुर्ज्याचा किल्ला गुलाम कादरखान यांनीं घेतला. मुंडसानचे किल्यास गुलामकादरखान यांहीं मोर्चे लाविले आहेत व रामगडासही मोर्चे लाविले आहेत. व पेरोजाबादचा किल्ला अनुपगीर गोसावी यांनीं घेतला. व आगरियाचे किल्यास इस्मालबेग व जुवाबक्ष पातशाहाजादा यांनीं मोर्चे लाविले आहेत. जर जलदीनें फौज कुमकेस सरकारची आली, तर रामगड व आगरे दोन्ही स्थळें राहतील. जर फौज जलदीनें न आली तर + + दोन्ही किल्ले राहूं शकत नाहींत. व हतरसचे किल्यास गुलाम कादरखान यांनीं मोर्चे लावून हतरसवाल्यापासून एक लाख चौतीस हजार रुपये घेतले. व कौल वगैरे मोहालाचा बंदोबस्त करून रामगडापाशीं आहे. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विनंति."

---

## लेखांक २७१.

**श्री.** ५ जानेवारी इ. स. १७८८.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. येथें वर्तमान श्रवणांत आलें कीं, पामर साहेब राजश्री पाटीलबावांपाशीं आले. त्यांच्या यांच्या भेटी जाल्यावर परस्परें शिष्टाचार वस्त्रें, हत्ती, घोडा जवाहीर दिले; आणि दोन कंपू चाकर इंग्रेजांचे ठेविले. त्यास सरंजामांत गोहदचा व मालवणचा मुलूख महाल लाऊन द्यावे, ह्मणून करारमदार जाला आहे. त्यास, राजश्री पाटीलबावांचीं पत्रें व पामरसाहेब इंग्रेजाचीं पत्रें, लाट कलफदानस साहेब कलकत्त्यास गेले आहेत, त्यांजकडे पाठविलीं आहेत. त्यास तेथील पोख्तगी जाली ह्मणजे दोन कंपू ग्वाल्हेरीस राजश्री पाटीलबावांपाशीं येऊन दाखल होतील. याप्रमाणें वृत्त श्रवणांत आलें, त्याजवरून विनंति लिहिलें आहे. व पातशाहाजादा जुवाबक्ष दिल्लीहून पातशाहाची आज्ञा घेऊन आगऱ्यास छ १४ रबिलावलीं कूच करून गेले. इस्माइलबेग व पातशाहाजादा एक विचारें आहेत. पातशहाजाद्याची मर्जी आहे कीं, गुलाम कादरखान व इस्माइलबेग व आपण व राजे प्रतापसिंग वगैरे सर्वत्र एकोपा करून, चमेलीअलीकडे तो बंदोबस्त जालाच आहे, पुढें मऊ सांपडल्यास ग्वाल्हेरीपावेतोंही हात घालावा. जर

तिकडे सरकारचे फौजांचा व राजश्री पाटीलबावांस भरणा भारी, आडल्यास तिकडील रोंख सोडून, व वजीर असफद्दौला याचे मुलुखांत इटावा वगैरे कडा कुरा यांजकडे जाऊन, तमाम मुलूख आपले काबूंत करून घ्यावा. याप्रमाणें पातशाहाजादा जुवाबक्ष यांनीं सल्ला ठरवून दिल्लीहून आगरियास गेले आहेत. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विनंति."

## लेखांक २७२.

**श्री.** जानेवारी इ. स. १७८८.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजश्री पाटीलबावांकडील दोन कंपू व तोफखाना उठून राजे प्रतापसिंग जैपूरकर यांजकडे गेले होते. त्यांपैकीं एक कंपू, इस्मालबेग यांचे तैनातीस, आग्र्याकडे आले त्या समयीं गेला होता; व एक कंपू राजापाशीं बमय तोफखाना होता, त्यास या दिवसांत नजबकुलीखान राजास जाऊन भेटला. यांनीं कंपूस फितावून आपलेकडे तोफखाना व कंपू आणून द्यावा ऐसा फितवा राजाचे लष्करांत केला. त्याजवरून राजेमजकुरांनीं नजबकुलीखानास तों नजरबंद करून कैद केलें, व कंपूसीं लढाई राजासीं जाली. हें वर्तमान पातशाहांनीं श्रवण केलें. त्याजवरून शहामीरखान ह्मणून मातबर माणूस सुजाउद्दवल्याचे भाऊबंदांत आहेत. त्यास राजाचे लष्करांत रवाना केलें आहे कीं, कंपू व तोफखाना घेऊन यावा; व कांहीं मोंगलीये वगैरे दिल्लीवाली फौजही राजापाशीं आहे, त्यासही फोडून आणावें. या अन्वयें पाठविले आहेत. कंपू व तोफखाना, मोंगलीये वगैरे फौज फोडून पातशहापाशीं येतील. तें मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विनंति."

## लेखांक २७३.

**श्री.** जानेवारी इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– इकडील वर्तमान बितपसील:– इस्माईल बेग आगरियांत किल्ल्यास मोरचे लाऊन सात आठ हजार स्वार प्यादांनसीं आहेत. किल्ला बदस्तुर आगरिया + + + इस्माईलबेगाचे मोर्चे लागू जाले नाहींत.

१

गुलाम कादरखान रामगडास मोरचे लाऊन आहेत. वीस पंचवीस हजार स्वार प्यादे रोहिले त्याजसमागमें आहेत. रामगडास मोरचे समीप लागू जाले

आहेत. बहुतेक किल्ला खाली करून घेईल. किल्लेदार बोलतो कीं, "आह्मांस सरंजामसुद्धां काढून द्यावे." गुलामकादरखान ह्मणतो कीं, "एका वस्त्रानिसीं निघावें." ह्मणून बोलणें लागलें आहे. गुलामकादरखान यांनीं हरिद्वारापासून तों पेरोजाबादपावेतों सर्व अंतर्वेदींत जितका पातशाही मुलूख होता, तो सर्व गुलामकादर यांनीं आपला बंदोबस्त केला आहे. व जुवांबख्त पातशाहाजादाची नाचक्की जाली. त्याजवरून तोही उठोन गुलामकादरखान यास सामील जाला आहे. पातशाहाजादा व खानमजकूर तूर्त एकविचारें आहेत. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं.

१

राजेश्री पाटिलबावा बदस्तुर ग्वालेरीस आहेत. कांहीं तोफखाना ग्वालेरीहून उतरला आहे. तयारी करितात. व पामर साहेब इंग्रेज त्यांजपासीं आला आहे. त्याचे विद्यमानें कलकत्त्यास थोरले इंग्रेजास पत्रें पाठविलीं आहेत. इंग्रेजांचे दोन कंपू चाकर ठेऊन, जैपूरकरांचें वगैरेचें पारपत्य करून, पूर्ववत् हिंदुस्थानचा बंदोबस्त करावा, ह्मणून दक्षणेहून नवी फौज सरकारांतून अलीबहादर व तुकोजी होळकर येणार. व यांनींही आपली खाजगी फौज राजश्री बाळाजी जनार्दन यांचे विद्यमानें देसीहून ठेऊन आणविली आहे. तिची मार्गप्रतीक्षा करून आहेत. देसच्या फौजा येऊन सामील जाल्या, ह्मणजे चमेल उतरून आगरियाकडे इस्माईलबेगाचे मुकाबलियास यावें ह्मणून वर्तमान ऐकिलें आहे. त्याजवरून विनंति लिहिली आहे.

१

रंजितसिंग जाट फौजेची निगादास्त करितो. सात आठ हजार स्वार प्यादे जमा केले आहेत. व इस्माईलबेगाचीं एक दोन ठाणींही उठोन दिधलीं आहेत. व राजश्री पाटिलबावांसही पत्रें पाठविलीं आहेत कीं, आपणही चमेल उतरून यावें. तुह्मी आह्मी सामील होऊन इस्माईलबेगाचें पारपत्य करूं. ह्मणून श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति लिहिली आहे.

वरकड किरकोळी वर्तमान पारसी अकबरा पाठविल्या आहेत, त्यांजवरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २७४.

**श्री.** ४ फेब्रुवारी १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—येथील वर्तमान तरी, छ २५ रविलाखरीं राजे प्रतापसिंग

सरंजामी होईल ते खबर हुजूर लिहिणे. ह्मणौनु रजा. तरी मौजे काळवडी ता॥ म॥ तेथील प्रजा कामसेटी काटकर बकाल व लुखोजी लिह्मण साल गु॥ ता॥ खेडाबाराहून आणौनु मौजे म॥ निमे त्यास देउनु मामूर केले होते. त्याच्या घरावरी बलवंतरायें माणुसे से सवासे पाठउनु घर जाळिले. घरामधे वित जळाले. ता॥

बैल गाडे व हणम १०

ह्मैसी १०

ह्मैसीची वासरे ८

जोरी ४ च्यार मण कुपे २

सदरहू जाळीले व दोघे कुणबी जखमी केले. ते जेर आहेती व अवरत माना ४ जखमी केलिया आहेती. त्या हि जेर आहेती. याखेरीज गला व वस्तभाऊ मोबलग जळाली. याकरिता मौजे म॥ व आणीकहि कितेक गौऊ बेदिल जाले आहेती. ऐसी खराबी होते. व साहेबाची किताबती माहालास पैवस्ता जाली, ते कारकुनानजिक पाठविलीयावरी त्यावरी कमीनास माहालदार पाठउनु किलेकराची गुरे मागत होते. त्यावरी कमीने ब॥ जाबिता माहालदाराचे हवाला गुरे केली. ते गुरे व हे गुरे सिदी अजमें आपले निसबती ठेविली. त्यावरी किलेमजकुरास माहालदार पाठउनु रयतेची गुरे किलेकरापासुनु आणविली. गुरे सुमार ११४ बाकी किलेकरी निवडुनु ठेविली. गुरे सुमार १०२. ए बाबे तकवा देउनु सिदी बोलिले आहेती कीं, गुरे राहिली आहेती ते आणौनु व रयतीची रयतीस देउनु आणि मग किलेकराची गुरे किलेकरास देउनु. व सिवेचे बाबे माहालीच्या कारकुनास किताबती लिहिली आहे कीं, दो चौ रोजामधे एउनु निवाडा करुनु ह्मणौनु बोलिले आहेती. त्याची तालीक बंदगीस पाठविली आहे. त्यावरून रोसन होईल. व एदिलशाही लोकी एउनु प॥ शिरवळ कबज केले आहे. कोठी बलकटी केली आहे. त्यापासीं घोडी हजार २००० एउनु बैसले आहेती. तेही कमीनास खुर्दखत सादर केले आहे. ते ऐन खुर्दखत बंदगीस पाठविले आहे. त्यावरुनु रोसन होईल. व ता॥ म॥ किलाचे तसविसी ब॥ तजावजु जाले आहे व कितेक गावीच्या प्रजा जागा जागा जाउनु राहिले आहेती. आजी संचणीचा वख्त आहे. रयतीस लुगडी पाठविली पाहिजेती. व तकवा दिलदारी पाठवणे. जागा जागा प्रजा गेलिया आहेती त्याहि एतील. ए बाबे दिरंग न करणे ह्मणौनु लिहिले. मालूम जाले. सिदी अंबरास किताबती पेसजी पाठविली होती. त्यावरून तेही कामावरी एउनु बहुतेक तह केला आहे. काही होणे आहे याबदल हाली किताबती पाठविली आहे त्यावरुनु अवघी सरंजामी होईल. पेस्तर तुह्मी आपले तरफेन कुसूर

हो नेदणें. एदिलशाही लोकांचे बाबे लिहिले. तरी तेही सिकस्ती खादली. तुह्मास मालूम जाली असेल. हाली आपले तरफेची नामजादी विजापूर पावेतोवरी गेली आहे. तुह्मी काही त्याची शक न धरणे. तू दौलतखा आहेसि. दौलतखाईस तकदीर केली नाही. हाली लावणीचा वख्त आहे. दिल घालुनु लावणी करून साल दरसाल कीर्दीमामूरी होन दस्तास माहाल ए ऐसे करणे. तुज हुजरून लुगडी पाठविलीं आहेती. हे घेउनु आपला खातिरजमा करणे मोर्तब सुद."

रुजु सुरु निवीस

तेरीख १९ माहे जमादिलोवल

---

## लेखांक १७.

१५५३ पौष शुद्ध १२

"अज रख्तखाने खुदायवंद ख॥ खुदावंद ख॥ खूलीदयामदौलतहू बजानीबु बाबाजी जुंझारराऊ देसमुख तपे कानदखोरे बिदानद सु॥ इहिदे सलासैन अलफ. अर्दास छ १९ जमादिलावल र॥ छ ३० मिनहू एदिलशाहाचे काही जातीचे बाबें बयानवार तपसिले लिहिले व किलेकरीयाची खबर बयानवार लिहिली, मालूम जाली. किलेकरी तपे म॥ कबज केले ते एथीले हुकुमे नाही. मुलुकगिरी-बदल कोरे सिकियाचे फर्मान हुजरून त्यानजीक पेसजी पाठविले आहेत, त्यापैकी दरम्यान च त॥ म॥ नाव घालुनु ऐसा अमल केला असेली. हाली हेजीब पंडितीं हुजुरतीचे बंदगीस मालूम करून, ताजा ताकीद फर्मान धेऊनु पाठविला आहे. व हजरती साहेब बहुत गरम जाले की, बगर रजा ऐसी कामे करितो. वख्त गेला. हाली याचा याबदल तहमुली केला. अमल जालयावरी याचा नतीजा यास पावेल. तू दौलतखा नफर आहेस. किलेकरियास बाहेर घालून, रयती लोकांचा दिलासा करून, माहालीची उगवणी करून रसद हुजूर पाठविणे. किलेकरी जोरी करितील तरी तुवा लोक मेळउनु संगीनाती करुनु सर्तीसी जाब देणे. मुलाहिजा न धरणे. जेणेकरून तुझी सरफराजी होए ऐसा अमल करणे. किलेकरी जे उचापती केली असेली ते फिराऊन घेणे. ए बाबे फर्मान हि पाठविला आहे. मोर्तब सुद."

तेरीख १० माहे जमादिलाखर

---

## लेखांक १८.

१५५६ कार्तिक वद्य १२.

"अज रख्तखाने खुदायवंद सिदी अजम सिदी अंबर अंबर हवालदार किले

कोंढाणा खूलीदयाददौलतहू बजानेबू कारकुनानि त॥ कानदखोरे बिदानद सु॥ खमस सलासीन अलफ बाबाजी कान्होजी जुंझारराऊ देशमुख त॥ म॥ यासी इसाफती अजरामन्हामतीबद्दल निवाले दिधला असे. मवाजे दोनी २ एकून बेरीज टके ८५९॥१०॥

मौजे विहीर अज रकम टके ३०९॥.

मौजे अत्रोळी अज रकम टके ६१९ पैकीं पेसजी इसाफती रुजू दस्तमल ब॥ सेत उंबरपेढ ए॥ टके ६८॥।१॥ बाकी हाली अजरामन्हामती देह सदरहू दिधला असे. ए॥ बेरीज टके ५५०।१०॥

एकुनु सदरहू मवाजे देहे २ अजरामन्हामती दिधले असती. बाब महसुलेसी देखील बाजे बाबा कुलबाब कुलकानू दिधले असे. दुमाला कीजे. दर हर साल ताजे खुर्द खताचा उजूर न कीजे. तालीक घेउनु असली फिराउनु दीजे. मोर्तबु"

तेरीख २५
जमादिलोवल

---

## लेखांक १९.

१५६० मार्गशीर्ष शुद्ध ६.

"अज रख्त राजश्री बाबाजी जुंझारराऊ देशमुख तर्फे कानदखोरे द॥ बे॥ रुद्राजी त्रिमल कुलकर्णी ता॥ मा॥ सु॥ तिसा सलासीन अलफ. कारने साहेबाचे बंदगीस कतबा दिधला ऐसाजे. कुलकर्णाचे करकसा गोजोवा व बाजी यामधी अपनांत लागले होते. ते साहेबी तिसरे तकसीम मा॥ टके १२० पैकी यारीदियाचा ब॥ टके २० देऊन बाकी टके १०० खाऊन व पाबाचे सेत मा॥ पैकी निमे व धानेबीचा पा + + तिसरी तकसीम खाऊन असने व दिवान तसरीफ तिसरी तकसीम घेऊन असने. त्यास हरकती करी तरी साहेबाचा गुन्हेगार व पडिझडी तिसरे तकसीमेसीस कबूल असे. हा कतबा सही पेसजी निवाडियाचे कागद असतील ते रद कतबा सही."

बिकलमु

गोही

बापूजी बापदेऊ

अंताजी

खासनीस देशमुख ता। मा। गोही काळजी त्रिंबक
रेखोजी सरखो मु॥ बोपाजी सर्जाराऊ
मौजे वाजल देसमुख का। मावल
पा। पुने

तेरीख ४ माहे साबानु.

## लेखांक २०.

१५६७ पौष शुद्ध ४.

"अज दिवाण मसरुल हजरती राजश्री दादाजी कोंडदेऊ सुभेदार नामजाद किले कोंढाणा व माहालानिहाय ता। बाबाजी जुंझारराऊ देशमुख ता। कानदखोरे सु॥ सीत अर्बैन अलफ. तुवा एउन आह्मापासी सांगितले जे, आपले इनाम सेत सालाबाद मौजे अतुरलीस होते; ते अतुरली इनामती सरदेशमुखीस दिल्ही. त्या खाले ते सेत दिल्हे. ते सेत इनाम आपणास सालाबाद चालिले आहे. आपणास नफराई पडते. साहेबी मेहरवान होऊन, त्या सेताचा मुबदला आपणास सेत मौजे दापोडा देविले पाहिजे, ह्मणोन सांगितलें. तरी आह्मी तरफ मजकुरच्या तरफदारास लिहिले आहे जे, त्यास सेत अतुरलीस इनाम किती होते ते मनास आणौन, त्या दस्तेदस्त यास मौजे दापोडा एक सेत इनाम देणे ऐसे लिहिले आहे. ते देतील. ते सेत कीर्दी करून खाणे. तेरीख २ जिलकादी."

## लेखांक २१.

श्री १५७९ वैशाख वद्य १२.

"राजश्री बाबाजी जुंझारराव मरळ देशमुख खंडो सजणाजी देशपांडे ता। कानदखोरे गो। यांसि.

श्रो। गोविंद सामराज नामजाद सुभा प्रांत मावळ आसिर्वाद सु॥ सन सबा खमसैन मया अलफ ता। मजकूरची रयत तजावजा जाहाली ह्मणून वर्तमान विदित जाहले. त्यास, तुह्मी जमीदार असतां मुलुकची संचणी करीत नाही हे गोष्टी कार्याची नाही. तुह्मास दस्त भरून द्यावे लागेल. मुलुकचे संचणी करावयास अंतर केलिया कार्यास येणार नाही. तरी तुह्मी रयत तजावजा होऊन न देणे. माहालिची संचणी करणे. राजश्री माणको पिलदेव याजकडे जाऊन, बोलीचाली करून रयतीस मशागतीस लावणे. या गोष्टीस हैगैवर न घालणे. जाणिजे छ २५ रजब या कामास हिरोजी सोनवणी पाठविला. यासी रुपये १० एक देणे. छ मजकूर."

## लेखांक २२.

१५८८ माघ शुद्ध १०.

"महजरनामा सके १५८८ पराभवनाव सवछरे माहा सुध दसमी वार गुरुवार तदिनी हाजीर मजालसी गोत व मातुश्री आवाजी स्थल मुकाम सो धानीब ता कानदखोरे.

मातुश्री आउसाहेब

वेदमूर्ति
भानभट व श्रीपति जोसी
नारायण भट वृतीवंत मामले
सातपुते सो राईर
धानीब

देसकुलकर्णी ता मजकूर

विसाजी तिमाजी
गोज प्रभु रुद्राजी
प्रभु

तान भट उपाधे
मामले राईर

दतो बापुजी व त्रिंबक
रंगनाथ खासनिस दाो
देसमुख ता मजकूर
सोनजी मरळ तकसीमदार
जिवाजी नाईक मरळ तकसीमदार
रामाजी व रेखोजी सरखोतु ता मजकूर
काब ठाकूर ता मजकूर
बालसेटी झिरंग महाजन ता मजकूर
रुपाजी कड्ड मोकदम मौजे धानीब
बनदुजी राउत मोकदम
व गणोजी सुपेकर
चौगुला मौजे अंत्रोली
बाबाजी व होनाजी सेडकर मोकदम व
कोडाजी चापाजी डफाला चौगुला मौजे दापोडे
+ + + व भिवजी चोरघा मोकदम
मौजे कोलवडी
जावजी व रामाजी सेडकर
मोकदम मौजे मालोवली

गिरमाजी नाईक व मुरारजी
नाईक गोडसे सो तुपे
मालोजी नाईक मरळ तकसीमदार

बाबाजी नाईक मरळ तकसीमदार
येसलिंग व बाललिंग मठपति
भिवसेटी सेटिया ता मजकूर
बकाजी नाईक मरळ रजपूत
हरजी रेणुसा मोकदम मौजे पाबे
अंबाजी व सोनजी
पिलाणा माकदम मौजे
कातवडी
विठोजी गायकवाड व भिकाजी
दाहीगावा मोकदम मौजे खांबोडे
जावजी व कोंडाजी अधवडा मो-
कदम मौजे लासीरगाउ
+ + + व पिलाजी लिह्मण
मोकदम मौजे विझर

हरजी व मल्हारजी पायगुडा मोकदम मौजे खांबोडे
गोंदजी धिउला मोकदम मौजे गिहर
सोनजी कारला मोकदम मौजे खैरव
नागोजी व हर्जोजी दारवटकर मोकदम मौजे कोडिगाऊ
कान्होजी भगत कोली
तुकोजी लिह्याणईदार मौजे धानीब
एसजी तेली मेहतरिया ता। मजकूर
रूप माहला न्हावी मेहतरिया ता। मा।
कृष्णजोगी मठपति तर्फ मजकूर
पिलाजी व कान्होजी दारवटकर मोकदम मौजे राजणे
साबाजी ठोसर मोकदम कोढवले तुपे
गोदजी सिलामकर मोकदम मौजे विहर
सुऱ्याजी व बाबजी डांगा मोकदम मौजे ब्राह्मणघर
मालर्लिंग रजपूत
एसदरणा गुरव मेहेतरीया ता। मा।
येमसालवी व आबासालवी कुंभार मेहतरिया ता। मा।
गोदवरटा व चापवरटा परीट मेहतरिया ता। मा।
बापनाक व भिकनाक माहार वृत्तीकर मौजे धानीब

खंडनाक व भिवनाक वरगण ता। मजकूर

सदरहू गोत बैसोन, बाबाजी जुंझारराव देसमुख तर्फ कानदखोरे याचे भाऊ मलोजी पतंगराव या हरदो जणामध्यें वृत्तीचा कथळा होत होता. त्याबद्दल सदरहू गोत बैसोन हरदो जणाचे वाटे केले व घरातून वेगले निघाले. ते वख्ती घरी जे कांहीं गुरढोर व पैके व गला व बाजे जिनस जे होते, ते कुल वाटून दिघले. कांहीं एक जरा उबार ठेविला नाहीं. या खेरीज वृत्तीचा वाटा मलोजी पतंगराव यासि बाबाजी जुंझारराव देसमुख यापासून वाटा देवविला. टके २५० अडिचशे टके यासि जागा.

हक तपेसमधें पैकीं देहाये २ एकूण एक टके

मौजे लासरगाव कास खंडी १२ यासि वजा सोडी खंडी ३ बाकी खंडी ९ एकून हक ४५ लाजिमा दर खंडीस टके ५ऽ ए।।
२।· तूप मापी ऽऽ।। एकूण
२ऽ दसरा बकरे
·।· कोंबडे १ ए।।
ऽ६ कोहले ए।।

मौजे वेले खुर्दकास खडी ८ एकून हक टके ४० लाजिमा टके
१।। दसरा बकरे ·।· कोंबडे १ ए।।
ऽ६ कोहले १ ए।।
२ऽ तूप मापी ऽऽ४ एकूण
२ऽ राबणूक ना। माहार रोज १२
४ऽ मोचेजाली

३ण रावणूक ना। माहार रोज १८ टके २ण शाकार व पाणभारे
४॥· मोचे जाली ३३ण गला कैली खंडी १ण गांवखंडी
॥६ शाकार व पाणभारे ०॥१॥२ वानवला
३४॥८ गला खंडी ण१।१ उडीद हवरे

१॥३
दर मण टका १

१ण गाव खंडी
·॥३ण२ वानवला
ण१॥ उडिद हवरे

१॥४॥२
दर मण टका १

८४॥।६
तेरीख
९४ण८
८४॥।६

९४ण८ १७९ण२

इनामती पैकी सेत २

एकूण टके
७०॥।१०

सेत धनमाल मौजे
दापोडे रकम पैकी
टके ४०ण
याखेरिज ऐवज हकदार
आलाहिदा ऐवज

सेत धानीब पैकी बीनाम
नाखती पैकी व किरकोळ
टके १२॥·
सेत कोलवडी टके १८।१०

एकूण टके २५०ण अडिचसे देवविले. तेणेप्रमाणे मलोजी पतंगराव याणी मान्य करून तकसीम घेतली. पुढे बाबाजी जुंझारराव यासि व मलोजी पतंगराव यासि मिरासीच्या कथलियाचे बाबे अर्था अर्थी समंध नाही व घरामधे हि जे काहीं वस्तभाव गला व पैका व बाजे जिनस होते, ते गोताने वाटून देवविले. तेहि मलोजी पतंगराव यानी मान्य करून तकसीम घेतली. पुढे काही हिला हरकती हरएक बाब करावयास गरज नाहीं. लेकराचे लेकरी मिरासीचा व वस्तभाव गला व पैका व बाजे जिनस जो होता त्याचा कथला तुटला असे. यांसि हरदो जणामधे जो कोण्ही इस्किल करील तो देवाचा व दिवाणीचा खोटा व तपेसमधे हरदो गाव दिधले आहेत. तेथील देसमुखीचा भोगवटा खवस टका व गावटका व पाटास व वऱ्हाडास दरएकास रुपये ·।· सालाबाद चालिले आहे ते बाबाजी जुंझा-

रराव याणीच घ्यावे. मलोजी पतंगराव यास काहीं समंध नाही. हा महजर सही. सु॥ सबा सितैन अलफ छ ९ साबान. व हर दो गावीं जकातीचा हसील होईल. त्यास जो विश्वा देसमुखीचा हक होईल, तो बाबाजी जुंझारराव याणीच घ्यावा मलोजी पतंगराव यासि काही समंध नाही. गावटका व खवसटका व वऱ्हाडास व पाटास रुपये ।. एकूण बाबी च्यारी बाबाजी जुंझारराव याणी घ्यावे. वरकड किरकोल कमाविसी हक मलोजी पतंगराव याणी घ्यावे."

---

## लेखांक २३.

( फारसी मजकूर )    १५८९ मार्गशीर्ष शुद्ध १४.

"कौलनामा बेस्मी बाबाजी जुंझारराव देसमुख ता। कानदखोरे सु॥ समान सितैन सन १०७७ कारने कौलनामा लिहून दिधला ऐसा जे. ना। मजकुराने एऊन जाहीर केले जे, आपन सिवाजीच्या दहशती करून पळून साहेबासी आलो आहे. तर साहेबी मेहरबानी करून गडाखालिया राहावयां जागा दिधली पाहिजे. व कौल दिधला पाहिजे की, खातिरजमा करून लेंकरबाळासी साहेबा कदमासी राहून. यावर साहेबी त्याची अर्ज खातिरेस आनऊन गरीबीवर नजर देऊन, सोनमेटी राहावयास जागा दिधली असे की, तुह्मी आपले भाऊबंदासी खातिरजमा राखोन जागा मजकूरवर राहोन कोन्हे बाबे मुलाहिजा न धरने. मा। हा कौल सही मा।"

तेरीख १२ जमादिलाखर

सन १०७७

---

## लेखांक २४.

१६०४ श्रावण वद्य २.

"राजश्री कान्होजी जुंझारराऊ देसमुख
ता। कानदखोरें साहेबाचे सेवेसीः–

विनंति सेवक विठोजी प्रभु देसकुळकर्णी ता। मजकूर जोहार विनंति. सु॥ सलास समानीन व अलफ उपर आपण व आपला तकसीमदार विसाजी गोज प्रभु ऐसे ह्मा बटाई पासुन सात पांच साले चाकरी गेलो. मागे तिमाजी मादाजी यानी गावकुळकर्णी खादली. त्यावर सन इहिदे समानीनामध्यें विसाजी गोजप्रभु वतनावर आले. त्यावरी आपनास एणे लागले. देसकुळकर्णी गावकुळकर्णी चालविली. सन इसने तिमाजी प्रभुकडे गेले. साल मजकुरी देसकुळकर्णी गावकुळकर्णी आपले सांभाळी विसाजीने एक साल केली. ऐसियासि आपले ह्मातारपण ह्मणुउनु साला

जाबास न पुरवे ह्मणौउनु साहेबास वर्तमान सांगितले. त्यावर साहेबीं मनास आनुनु आमच्या राजीपणे विसाजी गोजप्रभुचा तह करून, कारभार एकमते करावा. आपण केले ते विसाजीने केले व विसाजीने केले ते आपण केले. ऐसा तह साहेबीं आमच्या राजीपणे केला. हक उत्पनाची विल्हे ता।।

देसकुलकर्णी हक टके १५३
यासि ता।।
१०३ विसाजी प्रभु
५० विठोजी प्रभु
१५३

गांवकुळकर्णी १६ ता।।
१२ विसा
४ विठोजी
१६

लिहिनियासि आपला
मूल दादाजी फडी
हाताखाली ठेवावा.

एणे प्रों विल्हे केली. यासि परसपरे मनामधे किंत जरी करील त्यास श्रीची आण व साहेबाच्या पायाची आण असे लिहिले.

सही छ १५ साबान हे विनंति

गोही

त्रिंबक रंगनाथ खासनीस

अजहती देसमुख ता।। मा।।

गोजाजी लिह्मण

देवजी पाटील बाहीर
+ + + + +
+ + + + +
महालिंग जंगम
मठपति ता।। मा।।

---

## लेखांक २५.

श्री. १६०४.

"राजश्री राउसाहेब देसमुख तर्फ कानदखोरे
साहेबाचे सेवेसी.

सेवक विसाजी गोज प्रभु देशकुळकर्णी तर्फ मजकूर सेवेसी विनंती सु।। सलास समानैन व अलफ उपरी ई।। दाटाई पासून आपण चाकरीस गेलो. त्यावरी सन इहिदे समानीनामध्ये मिरासीस आलो. त्यावरी मागे तिमाजी व गदाजी तकसिमदार इही देसकुळकर्ण व गावकुलकर्ण हक उत्पन्न खादले होते. ऐसियासि आपण आलियावरी इहिदेचे साले, देशकुळकर्ण चालवावयास साहेबाच्या मते कारबार

सेवकाचे स्वाधीन केला. आपण आपला जोगजोड असावा ह्मणून, आपला भाऊ आवजी प्रभु राजश्री आबाजी प्रभु कुलकर्णी तर्फ चाडवे याचे येथे होता, त्यासी बोलाविले व राजश्री विठोजीकाका तर्फ मोसेखोरा होते त्यास हि बोलाऊ पाठविले. त्यावरी राजश्री विठोजी काका आलियावरी कारकिर्दी राजश्री केशोराम हवालदार व राजश्री गदाजी प्रभु मजमुदार ठाणे मुा मोजे विंझर येथे चाहुडीस साहेबा हुजूर आपण दो हि रुमाल एक देशकुलकर्णीचा व एक गावकुलकर्णाचा ऐसे दो हि रुमाल विठोजीकाकापुढें ठेविले की, तुह्मास चालेल तो एक रुमाल आपणास्वाधीन करून घेणे. त्यावरी विठोजीकाका इही दो हि रुमाल सेवकाच आधीन केले, आणि जे तुह्मी द्याल ते घेऊन ह्मणवून उतर दिल्हे. इतकियांत ते साल गुदरले. इसने तिमाजी प्रभूकडे लागले. हाली सालमजकूर सनसलासाकारणे सेवक साहेबास साक्ष करून गावकुलकर्णे १६ सोला व देसकुलकर्ण ऐसें दोही हि राजश्री विठोजीकाका स्वाधीन केली. त्यावरी राजश्री विठोजीकाका इही साहेबा हुजूर कथळा केला कीं, देसकुलकर्णाचा मुशाहिरा १५३ Ɔ. एकसे त्रीपन पैकी तिही द्यावे टके ५७ *"

---

## लेखांक २६.

१६१० ज्येष्ठ शुा १२.

( फारशी मजकुर )

"कौलनामा ता संकराजी जुंझारराऊ देसमुख ताा कानदखोरे सुा सन हजार १०९८ कारणे बादे कौलनामा ऐसाजे तुवा बापूजी मोकदम मौजे पावे ताा मजकूर याणे मालूम केले जे, देसमुख माा गणीमाचे ताा होता. हाली मुलकात येउनु आपले ताा देहबदेह लावणी करील, मुलूक वसाहती करील, आणि हजूर रुजू होईल, ह्मणउनु मालूम केले. बाा मालूमाति खातीरेस आणून, तुज कौल सादर केला असे. तर तुवा आपली खातीरजमा राखोन सुखें येउनु, आपले ताा अबदानी करणे. आणि हुजूर येउनु रुजू होणे. ताा माा अबादानी वसाहती करणे. अबादानी केलियाने तुझा मजुरा होईल. तर तुवा सुखे आपली खातीरजमा राखोन येणे. कोन्हे बाबे शक अंदेशा न धरणे. बेशक होउनु सुखे येणे दरीं बाब कौल असे. मोर्तब सुद."

तेरीख १०

साबान.

---

* पुढें एक बंद गहाळ.

## लेखांक २७.

श्री १६१२ आषाढ शुद्ध ८.

"मा। राजश्री कान्होजी जुंझारराऊ देसमुख ता। कानदखोरे यासि रामचंद्र नीलकंठ सु॥ इहिदे तिसैन अलफ तुह्मी विनंतिपत्र पाठविले + + + + न वर्तमान कळों आले. आपण प्रचंडगडीचे बाबे खटपट करून, गड हस्तगत करून दिल्हा. कापत गनीम गडावरी आला होता. ते समईहि कस्त करावयाची ते केली; ह्मणून कितेक तपसिलें लिहिलें. त्यावरून मुजरा जाला. कष्ट मेहनत केलीया गोमटेंच होईल. आपणास गनीमानें धरून नेलें होतें, परंतु हर इलाज करून प्रचंडगडास आलों. किहीम गडी च होता. आपण एकनिष्ट ह्मणोन. तरी तुह्मी एकनिष्ट, ए गोष्टींचा भरंवसा आहे. पुढें कितेक कार्य–प्रयोजनें होणें आहेत. राजगड सिंहगड हे किले हस्तगत जाले पाहिजेत. तरी एविशींहि खटपट तरतूद करून हस्तगत होत तें करणें, आणि आपले विशत्कारे गोमटें व मुजरा होए ते करून दाखविणें. ए विशे भरोसे तुमचे मानिले आहेत. त्याचे सारिखी वर्तणूक करावयास आळस न करणें. हरएकविसी आपला दिलासा असों देणें. जाणिजे छ ६ सौवाल."

---

## लेखांक २८.

श्री. १६१२ आश्विन शुद्ध १५.

"राजश्री हवालदार व कारकून ता। कानदखोरे गोसावियासिः–

॥ ७ अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य सेवक

माहादाजी सामराज सुभेदार व कारकून महालानिहाय प्रांत मावळ नमस्कार. सु॥ इहिदे तिसैन अलफ. मोगलांचे धामधूम आपल्या राज्यांत आज तीस वरसे होत आहे. यामुळें मुलूक वैरान जाला. साल गुदस्ता मोंगलास रायगड कबज जाला. मुलकांत मोगलाईचा अमल चालिला. हाली श्रीकृपेनें आपल्या राज्याचा मामला थाटत चालिला. ऐसियासि देशमुख व देशकुलकर्णी व मोकदम त॥ म॥ सुभा एऊन अर्ज केला कीं, आपण वतनदार राजश्री साहेबाच्या पायासी एकनिष्ठ आहों. राजश्री कैलासवासी स्वामींचे वेळेस आपलीं वतनें अमानत करून हकाच्या मोईनी करून देत असेत. सांप्रत गनीमाचे धामधुमेकरितां व दुकाळाकरितां रयती गेली, मेली. रुईजुई राहिली. त्यास खावयास व वाहावयासी नाहीं. ए जातीचा रयतीचा विचार जाला आहे. रयतीचा बहुत वजा दिलासा करून, कीर्दी मामुरी करऊन साहेबांच्या किल्या कोटाची मदती करावी लागते. तरी साहेबीं आह्मां वतनदारावरी कृपादृष्टीनें पाहोन, आमची वतनें इनामती व इसा-

फती हकलाजिमे जे आहेत, ते आमचे आमचे दुमाला केली पाहिजे, ह्मणून अर्ज केला. त्यावरून हकीकत मनास आणून पाहातां, वतनदारांचीं वतनें वतनदारांच्या दुमाला केल्या विरहित पोटतिडीक लागोन मुलूक मामूर होत नाहीं, व मुलकाचा जप्त रफ्त होत नाहीं, ऐसे कळों आलें. त्यावरून देशमुख व देशकुलकर्णी व मोकदम व बाजे मिरासदार यांचीं वतनें व इनामती व इसापती व हकलाजिमे इनामतीची सेतें, सेरिया याची याचे दुमाला केली असेती. तरी तुह्मी सदरहू लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणे. तालीक लेहून घेऊन असल परतोन याजपासीं देणें. जाणिजे. छ १३ मोहरम मोर्तब सुद."

---

## लेखांक २९.

श्री. १६१४ मार्गशीर्ष शुद्ध १.

राजेश्वरीभगवती

राजश्री बाबाजी जुझारराउ देसमुख
तर्फ कानदखोरे साहेबाचे सेवेसीं:—

राजश्री भानभट

अर्दास राजश्री

सेवक तिमाजी रुद्रा प्रभु देसकुलकरणी तर्फ मजकूर सेवेसीं. अर्ज सुा. *सलासीतैन अलफ सेवेसीं अर्ज ऐसा जे, साहेबीं आपल्या वडिलास इनाम गांवीं सेत मौजे पाबे नजीक सीव मौजे दापोडी तर्फ मजकूर येथील सेत देऊन, चाकरी घेतली आहे. ऐसियासि हाली आपणापासून चाकरीस अंतर पडिलें. ह्मनऊन साहेबीं सेत सालेदा अमानत करविले होते. त्यावरी आपण साहेबांची चाकरी जैसी कांहीं आपल्या वडिली केली आहे तेच रवेसीनं करावयासी रुजू जालों. ये बाबे साहेबांस मालुम केलें. बितपसिलः—

वेदमूरति दतो बापुजी हेजीब
गनोजी सुपेकर चौगुला मौजे अगौली
सोनजी बीन रतनोजी सेडकर मोकदम मौजे दापोडा
कृष्णाजी मरल
रेखोजी ढरखोली तर्फ मजकूर
सोनजी हिराजी
जाउजी आधवडा मोकदम मौजे लासीरगाव
साबाजी ठोसर मोकदम मौजे कोढवल
बावाजी डागी मोकदम मौजे बाह्मनघर

---

* सलास तिसैन असें पाहिजे.

आपले बाबे मालूम केले, त्यावरून साहेब मेहरबान होऊन, आपले सेत मि॥ टके ५० पैकीं तकसीम विसाजी गोज प्रभु निमे टके २५ त्याचे दुमाले केले. बाकी टके २५ आपली तकसीम आपले दुमाले केली. तरी आपनहि जैसी कांही आपले वडिलीं साहेबाची चाकरी केली आहे. तेन्हेच प्रमाणा पुढेहि एकतारीने चाकरी करून, एबाबे साहेबांच्या पायापासीं आपल्या वडिलानी जे काही क्रिया इमान करून, चाकिरी केली आहे, तेन च प्रमान आह्मी हि करून सेवेसीं अर्ज.

बीकलाम तीमजी रुद्र प्रभु

तेरीख २८ रबिलोवल."

अर्ज

---

## लेखांक ३०.

१६१४ माघ शुद्ध २.

"राजमान्ये राजश्री ( राव ) साहेबु देसमुख कानदखोरे स्वामि यांचे सेवेसीं:–

॥ ७ अर्जदास्त दर बंदगी हजरती राजाधिराज माहाराज या मंडित उदंड अविश हो. राजमान्ये राजश्री सेवक गदाजी प्रभु देसकुलकर्णी तर्फ कानदखोरे जोहार विनंती त॥ छ १ माहे जमादिलावल साहेबांचे कृपादृष्टी करून सेवकाचें वर्तमान यथास्तित असे.

द॥ सेवकास साहेबांची रजा व कागद बराबरी तीर्थरूप राजश्री दत्तोपंतदादा या बराबरी पत्र पाठविलें कीं, दोघा विचारे पूर्वी कारभार होतेस तैसे करीत जाणें ह्मणउनु रजा. तरी रजे बरहुकूम तर्पे मजकुरास आलों. तों येथें आमच्या समंधी दाज प्रभु व विठ प्रभु यांनीं कथला केला आहे जे, देसमुखाबराबरी बाहेर पडिलेस देसमुखाचे वतन गेले. त्याबराबरी तुह्मी हि मिरासीस तुटलेस. ह्मणउनु वेव्हार सांगत आहेती. ऐसियास राजश्री साहेबापासीं उभे राहिलों. तेथें साहेबांपासीं सांगितलें कीं, देसमुख व तिम प्रभु व गदाजी ऐसे मोंगलासीं मिलोन, बाहेर पडोन मारा केला आहे. ऐसियास साहेबें आह्मांस पुसिलें कीं, कीं, देसमुखांनीं मारा केला. खरें कां काय? त्यास आपण जाब दिधला कीं, देसमुखापासून हे घडनार नाहीं. देसमुख वतनदार. आपल्या वतनावरी जेव्हां

ऐसे करितील, तो हें घडत नाहीं. ऐसियास साहेबु धनी आहेती. साहेबांच्या पायापासीं येतील, ते वख्ती आपली पखी देतील. ऐसा जाब दिधला. त्यावरि राइरीप्रत गेलों. तेथें पेसवे व राजश्री मजूमदार ऐसे होते. तेथे आपले वर्तमान हर दो जनानीं सांगितलें. त्यास, सेवकास निरोप दिधला जे, आपले साल खाणें. आनगावास आलों. छ १२ माहे रबिलाखर वर्तमान अइकिला कीं, हवलदार व मजूमदार यांची दोन च्यारसे कांहीं उचापति केली, ते सेवके पैलीच हट-किलें. त्यास राइरीउनु आलों तो छ मजकुरी समाचार आइकिला कीं, वाजी जाली, ह्मणउनु तुमच्या नांवें टके २६४ आदा चढिला. ह्मणउनु समाचार आइकिला. तो समाचार आह्मी राजश्री दत्तोपंतास हटकिलें कीं, हें खरें कां खोटें? त्यास, आह्मास त्याहीं सांगितलें कीं; कातबा देतात. त्या(स), आह्मी राजश्री दत्तोपंतास बोलिलों कीं, कतबियावरी काय मदार आहे? आज माहाली दोन अडिच हजार तहसील जाली असतां, कतबा काय करावा? अजी सेखाडी रोकडी आले, तरी त्यास पाठउनु अजी मराडीचा दिवस आहे ह्मणउनु बोलिला. त्यास पंतीं काय बोलिले तें आपनास कलत नाही. व मागते कारकून नेदीतसे जाले. हेहि कळत नाहीं. त्यास आह्मी मागते बोलिलों कीं, न पावतां लिहिलें अन काय ह्मणउनु नेदा? तरी पेशवियापासीं मागेण ऐसें बोलिलों. त्यास सेवकाचे पाठी वेव्हार लागला आहे. तें काय वर्तमान जाले तेंहि कळलें नाहीं. ऐसियास हा समाचार राजश्री वेदमूर्ति नारायणभटास दखल आहे. साहेबांस कैसा कागद आला असे, तोहि कलत नाहीं. कारभारहि आपनास कळत नाहीं. हा कागद साहेबीं जतण करून ठेविला पाहिजे. याचा मोझ्या होईल. सेवकाची खराबी जाली ते काय ह्मणउनु ल्याहावी? वेव्हार निरमाण जाला आहे. त्यास सेवट काय होउनु येईल, तें कळत नाहीं. साहेबाबराबरी बाहेर पडिलों, ह्मणउनु बदलामी आली. माहालीं कारकुनी त्याची पटी राहिली आहे. कांहीं विचार राजश्री दत्तोपंतास पुसावा, तोहि सांगत नाहीं. ऐसा बाहेर पडलियाचा भोग जाला. कारभारहि सुर्त होईल. आपण खोता पाटिलासि बोलिलो की, देसमुखास पटवावा तोहि प्रभोरे रेखोजी गोही आहे. आज तुह्मा-पासीं काय लेहोन आले असे, ते साहेबास कलो येईल. टका पैके उचापती होईल. एकएकाचे गुजारतीने होवा, तोहि कलत नाहीं. जालें वर्तमान सेवेसीं पटउनु सुर्त होय हे अर्दास."

अर्दा

---

## लेखांक ३१.

श्री. १६१७.

"दसकत बेस्मी बालोजी बीन ह्रजी रेणुसा मोकदम मौजे पाबे इनामती देसमुख तर्फ कानदखोरें सुा सीत तिसैन व अलफ कतबा लिहून दिल्हा ऐसाजे.– मौजे मजकुरीची गांवजात्रेंफळीं व रानसावजाची फळी देखील डुकराचे कुले व विवा देसमुखी सालाबाद भोगवटा खादला असोन, आपण दरम्यान इस्कील केली होती. ह्मणून साहेबीं हुजूर आणून, देशमुखाचे गुजारतीनें गुन्हा शाबीत करून, गुन्हेगारी दंड रुपये ३५ पचतीस करून वसूल घेतला; आणि रजा फर्माविली कीं, इतकियाउपरी देसमुखांचा जो भोगवटा सालाबाद आहे, तेणेंप्रमाणें देसमुख मशारनिलेचे दुमाले केले असोन, तुवा हरकत केली. ह्मणून तुज गुन्हेगारि घेतली. तरी येथून पुढें गांवजात्रेची फळी व रानसावजाची फळी व डुकराची विवा देखील फळें देसमुखास देत जाणें. हरकत इस्कील करिसील ह्मणिजे तुझा उबार राहणार नाही. ह्मणून हुकूम केला. तरी आपण गावजात्रेची फळी व रानसावजाची फळी व डुकराची विवा देखील फळें देसमुखास देईन. यास एकजरा इस्किल हरकत फितवा करीन तरी दिवाणाचा गुन्हेगार साहेब जे शास्त्र अथवा गुन्हेगारी घेतील, ते आपण कबूल असे. गांवीची संचणी लावणी करीन व मागें तीन वरसें फळी खादली आहेत, त्याची समजावीस देसमुखाचे पाय धरून करीन. हा कतबा सही*"

## लेखांक ३२.

श्री. १६१८ फाल्गुन शुद्ध ८.

"छ मा अनाम कान्होजी झुंझारराव देसमुख ता कानदखोरे यासि भिकाजी शंकर आसिर्वाद सुा सन सबा तिसैन अलफ मा सोनाजी जाधव मोघम चाकर रा याचा सरिक येसजी खरवदकर पाबीयास आहे. तर त्यास वेठ बेगारीच कांहीं तगादा लावीत नव जाणे. सुखरूप राहोन किर्दी मामुरी करी तें करणें. येविसी बोभाट येऊ न देणें. छ ६ जिलकाद."

## लेखांक ३३.

श्री. १६१९ वैशाख वद्य १३.

"छ मा अनाम देशमुख व देशकुलकर्णी ता मोसेखोरे यासि शंकराजी नारायण सचिव सुा सबा तिसैन अलफ संताजी नाईक जाधव ठाणे ता मा यानें

* पाठीला कागद चिकटविल्यामुळें तेरीख बुजून गेली.

हुजूर येऊन विदित केलें कीं, ता। मा।री ठाणे नाइकीचें वतन आपलें आहे. ऐसियास आपण चाकरी करीत असतां, त्यास मुशाहिरा व हकलाजिमा न पावावया काय गरज आहे ? हाली हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी नफर मजकुरापासून सेवा घेऊन, पेसजी ता। मा।रास आज्ञापत्र सादर आहे. त्याप्रमाणें हकलाजिमा व मुशाहिरा पावित जाणें. छ२६ सवाल पा। हुजूर."

सुरुसुद.

---

## लेखांक ३४.

श्री. १६२० माघ शुद्ध १०.

"छ मा। अनाम राजश्री कान्होजी जुंझारराऊ देशमुख व देशकुलकर्णी ता। कानदखोरे यांसः—नारो यादव आसिर्वाद सु॥ तिसा तिसैन अलफ संभाजी पवार याकडे मिरासपटीची सेरणी तुह्मी आठ रुपयाची घातली होती. तो ऐवज माची पदमावतीस यात्रेबदल दिल्हा होता. यानिमित्य किलाच्या कारकुनानीं वसुलास माणूस पाठविला होता. त्यास तुह्मी तो ऐवज उडविला, आणि माणूस माघार पाठविले. तरी आज दसरियाचा दिवस, श्रीची यात्रा व्होवी, त्यास तुह्मी विक्षेप केला. ऐसा गैरमाकुल. याउपर देखत आज्ञापत्र सदरहू आठ रुपये तुह्मी खुद निसबती देणें. दिरंग न लावणें. या कामास लोक सुभानजी कवडे नामजाद माची पदमावती पा। आहेती. यास दविणें रुपये २ दोन रुपये रास खुद नि॥ आदा करणें. छ ८ रबिलावल."

---

## लेखांक ३५.

श्री. १६२२ कार्तिक वद्य ३.

"छ म॥ अनाम कानोजी जुंझारराऊ देशमुख त॥ कानदखोरें यासः—रामचंद्र नीळकंठ अमात्य सु॥ इहिदे मया अलफ. कोंकणांत हबसियानें बहुत वळवळ मांडिलियाकारणें त्यास बरा नतीजा पावावयाबदल राजश्री मलारराऊ यास सात हजार फौजेनसी आजी कुंभारली घाटे उतरोन चिपळुणास आले. त्यास सामील व्हावयाबदल आह्मी हशम घेऊन स्वार होऊन गेलों. अशास हें पत्र तुह्मास पावेल तें क्षणीं, आपला अवघा जमाव एक माणूस टाको न देतां, सारा जमाव घेऊन, बहुत सीताबीनें एऊन, आह्मास सामील होणें. एक घटिकेचा उजूर न करणें. आजिचे प्रसंगी जो मसलत चुकावील, तो मणजे गनीमादाखल असें समजोन, बहुत सीताबीने एणें. उजूर केलिया सारी मसलतेची बदनामी तुह्मावरी एईल. हें समजोन लिहिल्याप्रमाणें वर्तणूक करणें. छ १६ जमादिलाखर निदेश समक्ष."

---

## लेखांक ३६.

१६२९ श्रावण वद्य ३०.

हू

"ई कौलनामा अज रख्तखाने कोट जंजिरे दंडाराजपुरी ताहा देसमुखांनी व देसपांडियानी व मुकदमानी व पटेलानी व रयायानी ता। कानदखोरे सु। आसर मिया व अलफ बांदे कौलनामा ऐसा जेः– तुमचे बाबे बाजीराऊ पासलकर व तानाजी नाईक कडु देसमुख ता। मोसेखोरे येही अर्ज केला कीं, साहेब मेहरवान होऊन ता। मजकूरचे रयेतीस कौल मन्हामत केला, तर गावगना रयत येऊन वस्ति करून कीर्द अबादानी होईल; ह्मणऊन मालुमाती केली. बराय मालुमाती खातिरेस आणोन मामुरिवरी नजर देऊन, तुह्मास कौल मन्हामत केला आहे. तरी तपे मजकूरचे गावगना येऊन, वस्ती करून कीर्द अबादानी करणें. आणि चौथाईचा मुकरर असे तेण्हेप्रमाणे सरकारी वसूल देणे. वसूल दिल्हा नाहीं तर कौल नसे. तर सदरहू मुकररी मोजीब वसूल देऊन, खुसी असणें. कोण्हें बाबे शक अंदेशा ना धरणें. दरीबाब कौल असे. पाा हु। रा अलिखजमतगार जबानी येसजी टक्या अफराद रा। छ २८ माहे जमादिलाखर सन ३ जलुस."

रुजू सुरु सुद.

---

## लेखांक ३७.

श्री. १६३० आषाढ वद्य १४.

फारसी मजकूर

"छ २७ माहे रबिलाखर सन ३ जुलुसवाला सुा तिसा मियां व अलफ बो बाजी वलद बापूजी एसवंतराऊ पासलकर देशमुख तर्फ मोसेखोरे नौकर सरकार लेहून दिल्हा कतबा ऐसा जे, कानोजी वा। बावाजी झुंझारराव देशमुख तर्फ कानदखोरे याचा खुद कबिला व मौजे धानेब व मौजे एलें एथील रयत अा। ५२ दस्तगीर स्वारी सेख याकूब सुभेदार बंद आणून जंजिरियांत कैदेंत ठेविले. त्यास, खंड ऐन व भत्ता व कोतवाली रुपये ४२१५ एकूण च्यार हजार दोनसे पंधरा करार करून, जामिना बाबे हुकूम केला. त्यावरून आपण माल जामीन असो. इ। छ म। पासून सदरहू रुपये एका वरसाने सरकारी वसूल देऊं. हें लेहून दिल्हे. सही प्रा। हु। रा। बहादूर जबानी गंगाजी कडू अफराद."

---

## लेखांक ३८.

श्री.　　१६३२ चैत्र शुद्ध ९.

"कौलनामा अज सुभा राजश्री शामजी हरी नामजाद सुभा मावळ ताहा मोकदम व रयानी देहाय गावगना ता॥ कानदखोरे सु॥ असर मया अलफ बादे कौलनामा ऐसा जे, देशमुख व देशकुलकर्णी सुभा एऊन विनंति केली कीं, ऐंदा सुभाची स्वारी होऊन, माहालीची पाहणी केली. त्यास रयतीस पीक जालें नाही. यामुळें व पाहणीनें रयतीस दम नाहीं. यामुळें पेस्तर सालीची कीर्दी करावयासी रयत उमेद धरीत नाहींत. ह्मणुन विदित केलें. त्यावरून रयतीस कौल सादर केला असे. कोण्हे बाबे शक न धरितां, पेस्तर सालीची कीर्दी करणें. तुमची उगवणी जीवनमाफीक करून घेऊन, दरीं बाब कौल. असे. छ ७ सफर मोर्तब सुद."

---

## लेखांक ३९.

१६३५ ज्येष्ठ वद्य १३.

(फारशी मजकूर.)

"छ २६ माहे जमादिलावल सन २ जुलुसवाला सुहूर सन अर्बा असर मया व अलफ बो॥ साबाजी व॥ तुलाजी येसवंतराऊ पासलकर देशमुख तर्फ मोसे खोरे व संभाजी मराळ बरादर नारायणजी जुंझारराव देशमुख तर्फ कानदखोरे व त्रिंबकजी करजवणा देशमुख तर्फ कर्यात मावळ लेहून दिल्हा कतबा ऐसा जे, मौजे चापेवाडी तर्फ मजकूर येथील रयत वगैरा दस्तगीर स्वारी सेख याकुब सुभेदार बंद आणून, जंजिरीयांत कैदेंत ठेविलें. त्यास ऐन खंड व भता व कोतवाली नगद रुपये ८८९॥ एकूण खुद टके सोडून ह्यांसी करार करून, जामीनाबाबे हुकूम केला. त्यावरून आपण मालजामीन असो. ई॥ छ मजकुरापासून एका वरसानी सरकारी वसूल देऊं. हें लेहून दिल्हे. सही प्र॥ ह्या॥र रा॥ खुसमहमद जबानी रूपाजी कड्ड अफराद."

---

## लेखांक ४०.

श्री.　　१६३९ माघ शुद्ध ३.

"निवाडपत्र शके १६३९ हेमलंबी नाम संवछरें माघ शुद्ध त्रितीया गुरुवार हजीर मज्यालसी मुकाम किले सिंहगड.

दिवाणमुद्रा.

राजश्री संताजी सोमवंसी हवालदार

राजश्री राघो बाबाजी मुतालिक सबनिसी

अंताजी पवार हुजरी नामजाद किले मार

राजश्री बालकृष्ण भैरव सुभेदार किले मार.

राजश्री अंताजी विठल कारखानिवीस

गोत भले लोक.

खंडोजी न॥ थोपटे सरनाईक किले मजकूर.

बाजीराव पासलकर देशमुख त॥ मोसे खोरें

रामाजीराव पासलकर देशमुख त॥ मोसे खोरें

खंडोजी करजवणें व त्र्यंबकजी करजवणे देशमुख त॥ कर्यात मावळ.

संताजी जवलकर मोकदम मौजे खानापूर.

रामाजी इतबारराव सरन॥ घेरा किले मार.

तान्हाजी न॥ कडू नि॥ देशमुख त॥ मोसे खोरें.

मालजी न॥ कडू नि॥दार देशमुख त॥ मोसे खोरें.

बाजी बिन कान्होजी पायगुडे देशमुख त॥ कर्यात मावळ

माहादाजी न॥ थोपटे पंचसहस्री नामजाद किले मार.

सुहुर सन समान असर मया अलफ. यांच्या विद्यमानें नारायणजी जुंझारराव देशमुख त॥ कानदखोरें व उदमी व वाणी व गोळक व तेली वगैरे पेंठ घेरा किलें प्रचंडगड यांचा निवाडा केला ऐसाजे, पेशजी हपशी याची स्वारी संन तिस्सा मयांमध्यें जाली होती. ते समई बंद धरून नेला होता. त्याचा खंड रुपये ४२०० च्यार हजार दोनसें केला होता. त्याचें नावनिसी वाटणीचा कथळा वाढवला होता. त्याचा निवाडा करावयाबदल राजश्री मालजी भोसलें हवालदार व कारकून किले प्रचंडगड यार्णी किलें मजकुरास देशमुख व उदमी पाठविले. त्याची कुल हकीकत मनास आणून, तकरीरा व राजीनामें लेहून घेऊन देशमुखांस जमान रामाजीराव पासलकर देशमुख त॥ मोसेखोरें व उदमियांस जमान कोबजी न॥ जोरकर नाईकवाडी घेरा किले मजकूर जमान घेऊन राजपुरीच्या मुकामीचे खंडांचें कुलारग मनास आणून, आडसवा करून देशमुखाच्या व उदमियाच्या राजीपणें खंड नावनिसीवार करार केला असे."

बितपसील रुपये

१८७५ नारायणजी जुंझारराव देशमुख
३१२॥ गोंदजी भुरुक
५०० खंडोजी सोनार
३१२॥ बकाजी तेली व सखोजी तेली व भानजी तेली
१२५ तान्ही तेलीन कोम बालोजी तेली
१२५ जावजी कडू
१०० जयाजी कासार
१०० बाळलिंग गोसावी
१२५ कृष्णाजी तेली
४२०० (?)

एकूण च्यार हजार दोन सें वसूल देणें. याखेरीज दरबारखर्च दर सदे रु॥ २१। सवा एकवीस एकूण रुपये ८९२॥ आठसें साडे ब्याणव ज्याचे बेरजेवरी जें बसेल तें देणें. देशमुखांजवळ कागद होते ते घेऊन रद केले असेत. याउपरि पुढें जो कोण्ही वेव्हार करील व कथळा वाढवील, तो दिवाणचा गुन्हेगार व गोताचा खोटा छ २ रबिलावल."

## लेखांक ४१.

ई १६४२.

"हिसेबु कान्होजी जुंझारराऊ देसमुख ता॥ कानदखोरे खुर्द खंडी अज जामीनी खंडी कुले ता॥ मा॥ व चांदेवाडी सु॥ इहिदे असरीन मिया व अलफ खंड बाकी साल गु॥ जमा रुपये ११८३।-

ता॥

खुर्द खंडी कानोजी जुंझारराऊ देसमुख ता॥ मा॥ रु॥
१५०५॥≈॥

ता॥

ऐन खंड रु॥ १५००

कोतवाली आदमी २० दर खु॥ टके १ꣳ दे॥ खुर्द टके २० दर रुपयास टके ३॥ ए॥ रुपये ५॥≈॥

जामीनी खंड कुळे ता॥ मा॥ व चांदेवाडी आदमी सुमार ५ ए॥ म॥ खंडी पैकी नि॥ देसमुख रु॥ २७७॥-॥

ता॥

हवली गज गला खंडकरी ता॥ मा॥र आदमी २ मा॥

खंड पैकी बाकी नि॥ देसमुख सबब देसमुखाचे घरचे देव पूजितो, ह्मणोन त्याचे खंड पैकी बाकी देसमुखानीं आपलेकडे घेतली असे. नकद रुपये ६७॥।-

राधी रंडकी खंडकरीण चांदेवाडी आदमी २ मा॥

खंड पैकी बाकी तीस द्यावयासी अवकात नाहीं, सबब तिचा बेटा देसमुखानें आपले घरीं चाकर ठेऊन म॥ खंड पैकी बाकी देसमुख रुपये ७०॥≡

जावजी कडू खंडकरी तर्॥ मा॥ आदमी १ मोकदम मौजे धानेब गाव इनाम देसमुख तर्॥ मा॥ जावजी मा॥ फौत जाला, त्याचे औरतेस वसूल द्यावयाची अवकात नाही. वतनदार सबब मा॥ खंड पैकी बाकी नि॥ देसमुख रु॥ १३९〜॥

तो

६७॥।-
७०॥≡
१३९〜॥
२७७॥-॥

तेरीज एकंदर रुपये

१५०५॥≡॥ देसमुख
२७७॥-॥ जामीन कुळे
१७८३।-

वसूल रुपये

१६३३।-॥।

ता॥

ऐन वसूल माहाली जाला रु॥ ३१५।-।

ता॥

१८७॥। देससुख खुद रु॥
१२७॥-। जामिनी खंड कुळे म॥ रु॥
२७७॥-॥ पैकी रुपये
३१५।-।

ब॥ परवाना बनाम देसमुख तर्॥ मा॥ छ ७ माहे सवाल सन इहिदे राजश्री कानोजी आंगरे सरखेल याचे ऐवजी खर्च घालून देसमुखास मजुरा दिधले आहेत. नकद रुपये

१३१७॥≡॥

तेरीज वसूल रुपये.

| | खुद देसमुख | जामीनी |
|---|---|---|
| ऐन वसूल | १८७॥ | १२७।-। |
| म॥ रु॥ ३१५।-। | | |
| पैकी रु॥ | | |
| सरखेलचे ऐवजी | | |
| खर्च रु॥ | १३१७॥≈॥ | ० |
| | १५०५॥≈॥ | १२७।-। |

बाकी नि॥ देसमुख यानीं माहाली वसूल द्यावयाचे करार केले असे."

रुपये— १५०७।

---

## लेखांक ४२.

श्री १६४२ माघ शुद्ध १.

"इजतमाब नारायणजी जुंझारराव मरळ देसमुख व देसपांडे ता। कानदखोरे मालूम दानद सुहूर सन इहिदे अशरिन मया अलफ. सन सीत ता। सन मजकुरापासोन चौथाई मराठे यांचे ऐवजी हुजरून यास पडत असे. त्यास, ऐवज देणें तो हुजुरून देविला जाईल. तर पेस्तर साल सन इसने अशरिनापासोन चौथाई सरकारी वसूल घ्यावयासी करार केले असे. तर सन इसन्ने अशरामध्यें सनद सादर असे. ते मोजिब जमाबंदी जे सालीं जे होईल ते गोपाळ बजाजी मजमदारसी महाल याचे मारुफतीनें रुजुवात करून वसूल देत जाणे. वसुलास हैगै सुस्ती न करणें. खूब ताकिद समजणें. वसुलास है गै केली, तर मुलाइजा होणार नाहीं. ताकीद समजणें, व सिंहिगडचे दिमतीचे गावाची चौथाईची बाकी बहुत असे

| | |
|---|---|
| गाव दिमत सिंहगड. | गाव दिमत राघो बलाळ |
| रुपये ४६२८- | रुपये ४३५॥= |

येणेप्रमाणे बाकी पेसजी चौथाई पैकी पडित असे. ते हाली मराठे यांचे ऐवजी लिहिणें. म्हणैन अमलदारास फर्माविले असे. तर मराठे याचे ऐवजी सदरहू बाकी वसूल करणे. अगर ते कबूल न करीत तर सरकारी वसल घेतला जाईल. तर खूब ताकीद समजोन सदरहू बाकीची विल्हे करणें. व पेस्तर साल सन इसन्ने अशरीनपासोन, जे जमाबंदी चौकस करणें. जे साली जे जमाबंदी होईल, त्याची कुल चौथाई सरकारी वसूल देणे. हैगै न करणे. ताकीद समजणें. रा। हुजूर राबहादूर जबानी गंगाजी जाधव अफराद रा। छ २० माहे रबिलावल मोर्तब सुद."

---

## लेखांक ४३.

हू १६४३ चैत्र वद्य ९.

"ई कौलनामे अज रख्तखाने कोट जंजिरे दंडाराजपुरी ता। रयानि तपे कानदखोरे सु॥ इहिंदे असरैन मियाव अलफ. बादे कौलनामा ऐसा जेः– सीमाहाल मावळची रयतीने धासत खाऊन परागंदा होत असे. तर रयतीस कौल सादर करावा ह्मणऊन, गोपाळ बजाजी मजमूदार सीमाहाल याण्हे अर्जदास्त पाठविली. त्यावरून तपे मजकूरच्या रयतीस कौल सादर केला असे. सरकारतर्फेने तुह्मास तसवीस लागणार नाहीं. तरी बेशक होऊन आपले गांवचे गांवीं एऊन वसाहत करून कीर्द आबादानी करणे. आण तुह्मी असणें. कोण्हे बाबे शक अंदेसा न धरणें. दरीं बाब कौल असे. पा॥ हु॥ रा॥ बहादूर जबानी भिकाजी नाईक बोरकर अफराद रा॥ छ २२ माहे जमादिलाखर मोर्तब सुद."

## लेखांक ४४.

श्री. १६४३ माघ वद्य ३.

"आज्ञापत्र समस्त-राजकार्य-धुरंधर विस्वासनिधी ता। सेरी करेपठार का॥ सिवापूर सु॥ सन इसने असरीन मया अलफ. मौजे पाबे तर्फ कानदखोरे हा गांव देशमुखांचा इनाम आहे. तेथें तुह्मी दिवाणाची सेरी करून ह्मणून येऊन गांवांमधें दहशत घालितां, तरी मौजे मजकुरी पेशजी सेरी होती. त्यास गांव देशमुखाचा इनाम, देशमुखाचे दुमाला केला असे. याउपरी तुह्मी मौजे मजकुरी सेरीचा कथला न करणें. खालिसा गांवीं सेरी पुरातन असेल तें करणें. इनामामधें कथळा करीत नव जाणे. जाणिजे छ १६ रबिलाखर."

सुरु सुद.

## लेखांक ४५.

श्री. १६४३ माघ वद्य ७.

"मा। अनाम कमाविसदार सेरी खेडेबारे यासि दताजी सिवदेव सु॥ इसने असरीन मया अलफ. मौजे पाबे ता॥ कानदखोरे हा गांव देशमुख ता॥ याचा इनाम आहे. त्यास पूर्वी गाव अमानत केला होता, ते समई दिवाण सेरी जमीन सात बिघे केली होती. हाली इनाम गाव देशमुखास आहे. तेथील सेरी करावी ऐसी नाहीं. तरी तुह्मी सेरीविसीं कथला एकदर न करणें. या कागदाचे प्रति घेऊन असल देशमुखापासी देणे छ २० रबिलाखर."

सुरु सुद.

## लेखांक ४६.

श्री. १६४६ चैत्र वद्य १४.

"राजश्री नारायणजी जुंझारराव देशमुख
ता। कानदखोरे गोसावी यांसः—

छ अखंडित-लक्ष्मी-आलंकृत-राजमान्य-स्नों रंगोजी इंदलकर हवलदार व कारकून किले प्रचंडगड जोहार व आसिर्वाद सु॥ अर्बा असरैन मया अलफ. बाळोजी रेणुसा व गोदजी रेणुसा ऐसे हरदो जण नेरीपासी राजश्री पंतसचिवाकडे गेले होते. त्यानी हर दो जणाचा करीना लेहून घेऊन, किले मजकुरां पाठविले आहेत. या हर दो जणाचा कजया वारावा लागतो. तरी तुह्मी देखत कागद गडास येणें. बहुत काय लिहिणें छ २७ रजब हे विनंती."

---

## लेखांक ४७.

ह्रू १६४८ चैत्र शुद्ध ६.

"ई कौलनामे अज रख्तखाने कोट जंजिरे दंडाराजपुरी ता। देशमुख व देशपांडियानि व मोकदमानि व रयानि ता। कानदखोरे सु॥ सीत असरीन मिया व अलफ. बादे कौलनामा ऐसा जेः—कुंवरजी सिरका याणें ता। पौड खोरे एथें जमाव करून, कसबे पालीची पेठ मारून नेली. ह्मणौन तुह्मीं धाशत खादलीत की, जंजिरे तरफेन स्वारी मावळांत होईल. ऐसी धाशत घेऊन, परागंदा होऊं लागलेत. सबब गोपाळ बजाजी मजमदार सीमाहाल मावळे हुजूर एऊन तुमची हकीकत जाहीर करून, कौलाबाबें अर्ज केला. बराय अर्ज खातरेस आणौन तुह्मावर मेहरवान होऊन कौल सादर केला असे. तर तुह्मी बेशक होऊन माहालीं एऊन, कीर्द आबादानी करून, सरकारचे कामकाज चालऊन सरकारचे अमलदारासी रुजू असत जाणे. कोणें बाबें शक अंदेशा न धरणें. दरीं बाब कौल असे. प्र॥ हु॥ रा॥ खुश मा। जबानी रामजी रायवड अफराद र॥ छ ४ माहे साबान मोर्तब सुद."

---

## लेखांक ४८.

श्री. १६४८ ज्येष्ठ शुद्ध १४.

"आज्ञापत्र राजश्री लक्ष्मण त्र्यंबक तांबे मोकदम मौजे पाबे ता। कानदखोरें सु॥ समान अशरीन मया अलफ. मौजे मजकूर देशमुख याजकडे इनाम आहे. त्यासी वतनसमंधें तुजपासून सेरणी घेतली आहे. त्याचा दोनी तकसिमा

ऐवज बाकी राहिला आहे. तो देशमुख मागत असतां देत नाहींस; ह्मणौन हुजूर विदित जाले. तरी सेरणी दिवाणांत भरून घेतली. त्याचा ऐवजास खलेल करावयास प्रयोजन काये ? याउपरी दोन तकसिमा ऐवज राहिला, तो देशमुखाकडे देणे. फिरोन बोभाट येऊं न देणें. बोभाट आलिया मुलाहिजा होणार नाहीं. ऐसे पस्ट समजोन वर्तणुक करणे. छ १२ सवाल."

## लेखांक ४९.

श्री. १६४८ आश्विन वद्य ११.

"छ मा। अनाम देशमुख व देशकुलकर्णी ता। कानदखोररे यांसी नारो शंकर सचिव सुहूर सन सबा अशरैन मया अलफ. बालोजी रेणुसा मोकदम मौजे पाबे ता। मा।र याचे घर व ह्मैस १ एक यास पाळक देणे. ह्मणून पेशजी तुह्मास एक दोन आज्ञापत्रे सादर केली होती. ऐसे असता, तुह्मी बालोजीस वणी घरटकीयाचा तगादा लाविला आहे. ह्मणून हुजूर विदित जालें. त्यावरून हें पत्र तुह्मास सादर केलें असे. तरी तुह्मास पेशजी पत्र सादर केले असता बालोजीस तगादा लावावयास गरज काय ? याउपर बालोजीस घर व ह्मैस १ एक पाळक देविले असे. तुह्मी सदरहू प्रो। यास पालक देत जाणे. सदरहूचा तगादा लावित न जाणे. जाणिजे छ १४ सफर पा। हुजुर."

## लेखांक ५०.

१९ - ११ 1994

श्री. १६४८ कार्तिक शुद्ध ८.

तालिक

"मा।अनाम देशमुख देशकुलकरणी ता। कानदखोरें यास नारो शंकर सचिव सु।। सबा अशरीन मया अलफ. महादजी बीन बालोजी रेणुसा मोकदम मौजे पाबे ता। मा। याचा बाप बालोजी रेणुसा यार्णे साताराचे मुकामी हुजूर येऊन विदित केले की, आपल्यास दोघे पुत्र आहेत. वडिल भिवजी व धाकटा माहादजी. त्यास मोकदमीच्या वतनामुळे घर ह्मैस पुरातन पालक आहे, ते भिवजीचे वाटणीस दिल्हे. धाकटा माहादजी यास पालक चालत नाही व आपल्यासहि वतनाकरितां शेवा पडते. तरी स्वामीनीं कृपाळु होऊन महादजीस पालक दिल्हा पाहिजे ह्मणऊन विनंती केली. त्यावरून मनास आणितां यास वतनसमंधे सेवा बहुत पडते. याकरितां माहादजी रेणुसा यास मौजे पाबे ता। मा।र येथे घर १ एक व ह्मैस १ एक पालक दिल्ही असे. तरी तुह्मी सदरहूप्रमाणे पालक यास व (या) च्या पुत्रपौत्रादि वंशपरंपरेने चालवीत जाणे. प्रतिवर्षी नूतन पत्राचा आक्षेप न

करणे. या पत्राची प्रति लेहून घेऊन असल पत्र भोगवटियास महादजीजवळ परतोन देणे छ १६ रबिलावल."

## लेखांक ५१.

श्री. १६४८ पौष शुद्ध ११.

फारसी मजकूर

"अज दिवाण रा। खास बजानेबु देसमुखानि तपे कानदखोरें मामले राएर बिदानद सु॥ सबा इसरीन अलफ. हेजीब वा। मा। पतंगराऊ बंदगी हजरती मालूम केले जे, म॥ इलेस मुकासा तपे कानदखोरें मामले राएर व महाल तपे मजकूर मुकासा ब॥ हुजती बाहसिके खास व ब॥ हुजती म॥ सादर आहे. तेथे तेजी भेटी व उलफेपटी सिस्त केली आहे. म॥ फर्माउनु दुमाला व मा। फर्मान होए मालूम जाले. ब॥ इशारती दिवाण अला ब॥ इ॥ म॥ ब॥ मुकासा तपे मजकूर आहे. तेथील तेजीभेटी व उलफेपटी मा।इलेचे दुंबाला कीजे. मोर्तब सुद."

तेरीख ९ माहे जमादिलोवल पा। हुजुरु. रुजू रुजमुश्रीफ रुजू सुरुनिवीस

---

## लेखांक ५२.

श्री. १६५० वैशाख शुद्ध १२.

"आज्ञापत्र समस्त-राजकार्य–धुरंधर–विश्वासनिधी–राजमान्य-राजश्री नारोपंडित सचिव ता॥ मोकदम मौजे पाबे ता॥ कानदखोरे सुहूर सन समान अशरैन मया अलफ. मौजे मजकूर देशमुख ता॥ मजकूर याकडे इनाम आहे. ऐशास मौजे मजकुरीं कामथ खाचरे दिवाणांत अमानत होतीं, त्याविशीं नारायणजी जुंझारराव देशमुख ता॥ मजकूर यार्णीं दिवाणांत रदबदली करून, आपणाकडे करून घेतली. त्याची पत्रें हुजूरचीं व जिल्हेकडील त्याजवळ असतां तुह्मी कटकट करितां; खांचरे त्याजकडे सुरळीत चालवीत नाही ह्मणोन हुजूर विदित जाले. ऐशास दिवाणांतून खांचरे नारायणजी जुंझारराव यांचे दुमाले केली असतां, तुह्मास कथला करावयास संमध काय? हाली हे आज्ञापत्र सादर केले असे. तरी याउपरी तुह्मी नारायणजी जुंझारराव याजपासी खांचराविसी कथला न करणें. येविशीचा फिरोन बोभाट हुजूर आलिया ताकीद होईल; हें बरे समजोन वर्तणूक करणें. जाणिजे. छ १० सवाल पा॥ हुजूर."

सुरुसुद.

---

## लेखांक ५३.

श्री. १६५० वैशाख शुद्ध. १४.

"आज्ञापत्र राजश्री लक्ष्मण त्रिंबक तांबे मोकदम मौजे पाबे ता। कानदखोरें सु॥ समान अशरीन मया अलफ. मौजे मजकूर राजश्री नारायणजी जुंझारराउ देशमुख ता। मा। यांकडे मौजे मजकूर इनाम गाव आहे. ऐसियासी मौजे मजकूरची खाचरें दिवाणांत अमानत राहिली होती. याकरितां नारायणजी जुंझारराउ यांणी दिवाणांत रदबदल करून, राजश्री स्वामींची पत्रें व जिल्हेची पत्रें करून खाचरें आपले दुमाला करून घेतली. ऐसे असतां तूं खाचराविसी यांसी कटकट करितोस ह्मणोन विदित जालें. याउपरी खाचरासीं कटकट न करणें. फिरोन बोभाट येऊ न देणे. बोभाट आलिया मुलाहिजा होणार नाही. ऐसे पस्ट समजोन वर्तणूक करणें. छ १२ सवाल."

---

## लेखांक ५४.

श्री. १६५० फाल्गुन वद्य ९.

"॥छ मा। अनाम नारायणजी जुंझारराऊ मरळ देसमुख ता। कानदखोरे यास नारो शंकर सचिव सु॥ सन तिसा अशरैन मया अलफ साखराई मरळीमा तुमची चुलती इने मौजे मसुरे येथील मुकामी आपले वर्तमान विदित केले. त्यावरून तुह्मास सांगावयाचे तें सांगितले. परंतु तुह्मी त्याचे चालवावे, ते चालवीत नाही. ह्मणऊन हुजूर वर्तमान विदित जाले. त्यावरून साखराई मरळ याची तकसीम व इला गावगना इनामतीपैकी तकसीम असेल ते, याचे स्वाधीन करावयाची आज्ञा केली असे. तर करणें. फिरोन बोभाट येऊ न देणे. गाव इनाम व गावगना इनामे असतील, त्याची तकसीम प्रो। देणे. याउपर तिची तकसीन न दिल्ही तर हुजरून मसाला होईल, ऐसे समजोन वर्तणें. छ २२ साबान." सुरुसुद.

---

## लेखांक ५५.

श्री धनेश्वर प्र॥ १६५६ फाल्गुन शुद्ध ५.

तालीक

"महजरनामा शके १६५६ आनंद नाम संवछरे फालगुण शुद्ध पंचमी इंदुवासरे सु॥ खमस सलासीन मया अलफ बतारीख छ २ माहे रमजान हजीर गोत ता। कानदखोरे बित॥

नारायणजी जुंजारराव देशमुख
ता॥ मार

भानजी तुकोजी देसपांडे
ता॥ मार

जिवाजी नाईक मरळ ह॥ देशमुख
मौजे दापोडे ता॥ मार

साबाजी मरळ देशमुख मौजे
कानद.

रखमाजी बिन होनाजी धरफळे
सरखोत.

## मोकदम.

खंडोजी बिन रूपाजी गांयकवंडा
व जावजी बिन होनाजी दाहीगावे
मोकदम मौजे खांबवडी.

सावजी व नावजी दारवटकर मो-
कदम मौजे राजणे निमे व तुकोजी
बाधा निमे पाटील.

होनाजी बिन रखमाजी व रायाजी
बिन सखोजी धरफळा मोकदम मौजे
वांजळे.

गोंदजी व मल्हारजी दारवटकर
मोकदम मौजे कोंडगाव.

विठोजी बिन आबाजी व राघोजी
बिन मालजी राऊत मोकदम मौजे
अंत्रौली.

साबाजी पायगुडा व पुतळाजी
तोडकरी मोकदम मौजे खांबगाव.

कृष्णाजी बिन बावाजी व मल्हारजी
बिन खंडोजी सेडकर मोकदम मौ॥
दापोडे.

एसजी बिन बाबाजी व सिवजी
बिन कृष्णाजी चौरंघा मोकदम मौजे
कोळवडी.

भीवजी बिन बाळोजी व गोंदजी
बिन सूर्याजी रेणुसा मोकदम मौजे
पाबे.

एसजी बिन रायाजी लिम्हाण
मोकदम मौजे विंझार.

गोंदजी बिन कान्होजी आधावडा
मोकदम मौजे लासीरगांव.

खंडोजी बिन वाकोजी पिलाणा
मोकदम मौजे कातवडी.

बिजोजी बिन चांदजी व कृष्णाजी

सूर्याजी बिन कान्होजी व दादजी

बिन एसजी धिंउला मोकदम मौजे गींबर.

चांद्जी बिन बापूजी मरळ मोकदम मौजे चपेठे.

घोंडजी बिन बावाजी डांग्या मोकदम मौजे बाह्मणेघेर.

बाकाजी बिन सताजी दुळा मोकदम मौजे कोळंबी.

सोनजी बिन हरजी भुरुक मोकदम मौजे सेनवडी.

लखमोजी बिन गोंदजी व एसजी बिन सोनजी कोढीतकर मौ॥ हीरपोडी

भावजी बिन रूपाजी गोऱ्हे मोकदम मौजे निवी.

वाघोजी बिन नाईकजी धिंडक निमे मोकदम मौजे धानेब.

कावजी बिन गोंदजी सणस मोकदम मौजे खोडप.

बिन एसजी सिलमकर मोकदम मौजे विहीर.

सताजी बिन राजजी कारळा व सुभानजी बिन चापाजी सिंदा पाटील मौजे खरीवे.

धारोजी बिन धावजी दुळा मोकदम मौजे पासळी.

रामजी बिन एसजी ठोंसर मोकदम मौजे कोंढवळे खुर्द.

मावजी व सुभानजी करंजकर मोकदम मौजे कोढवली.

चांद्जी बिन दाद्जी पंवार मोकदम दोन तक्षीमा व शंकराजी बिन संभाजी गायखा पाटील तिसरी तक्षीम मौजे वेळे बु॥.

सूर्याजी बिन रामाजी माहादूणकर निमे पाटील मौजे माळवली.

## चौगुले.

चापाजी बिन लखमोजी डेफाला चौगुला मौजे दापोडे.

रामजी कारीम व सयाजी रसाटा चोगुला मौजे विंझार.

रामजी बिन धारोजी जाधव चौगुला मौजे माळवली.

सोनजी बिन बाळोजी वेणुपरा चौगुला मौजे पाबे.

माहादजी कान्हेरकर चौगुला मौजे कोलवडी.

दादजी बिन तान्हाजी कानगुडा चौगुला मौजे वाजळे.

कृष्णाजी ताखती चौगुला मौजे धानेब.

एमाजी जोगडा चौगुला मौजे निवी.

रामजी बिन हसाजी भावकुला चौगुला मौजे *

सुभानजी बेऱ्हेकर चौगुला मौजे ब्राह्मणेघेर.

## बाजे वतनदार.

बाळलिंग सतलिंग मठपति ता॥ मा॥र

तुकोजी बिन बापूजी बाधा पाणसारा ता॥ मा॥र

बाळ साळवी बिन राम साळवी कुंभार मेहतऱ्या ता॥ मा॥र

धोंडजी किरवा तेली मेहतऱ्या पेठ मौजे विंझार.

एसा बिन माला व लखा बिन कान वरटे परीट मेहतऱ्या ता॥ मा॥र

मल्हारजी बिन गणेसेट सोनार सेट्या ता॥ मा॥र

रूपाजी बिन गोंदजी सुतार.

दाद माळी गोम माळी मेहतऱ्या मौजे विंझार

मोरोजी व कान्होजी नगीना तेली मेहतऱ्या मौजे वेळ बु॥

रायाजी परीट माळवली व विंझार.

## चांभार.

जाना चांभार मौजे कानद.

सोना चांभार सौजे धानेब.

देक नाक ठाणगा
ता॥ म॥

## महार तर्फ मजकूर.

राधा माहार मौजे कानद
धाका माहार मौजे वेळ बु॥
मोरा माहार मौजे दापोडे
बळनाक बिन कमनाक माहार मौजे माळवली व विंझार
सदव माहार मौजे वेळ खुर्द

विठा माहार मौजे अत्रौळी
सानका माहार मौजे धानेब
एसा माहार मौजे खांबगाव
कोंडा माहार मौजे कोळवडी

संभा बिन नरसा मांग
ताा मार

सदरहू गोताच्या विद्यमानें गोतमहजर करून दिल्हा ऐसा जेः– बो। बावाजी बिन जावजी सेडकर पाटील चौथी तक्षीम मौजे माळवली ताा मजकूर सबब जे मौजे मजकूरची मोकदमी कदीम बो। कान्होजी बिन रामजी सेडकर याची होती, त्यास मावळें प्रांतें ताम्राची धामधूम जाली. तेणेकरून मुलूक वैरान जाला. तेव्हां कान्होजी मजकूर याचे वडील परागंदा जाले. त्याचे ठिकाण कोठें नाहीं. आणि राजक्रांत निवारल्या उपरि ताा मााची लावणी करावी असे जाले. ते वेळेस कान्होजी मजकूर याचे कोण्ही गांवावरी आले नाहीं; अथवा कोण्हास ही आढळले नाहीं. याजकरितां बाबाजी बिन बाजी माहादुणेकर यांस, गावीची वसाहत जाली पाहिजे व लावणीहि जाली पाहिजे, याजकरितां कीर्दीची पाटिलकी करून दिल्ही. गावीची वसाहत महादुणेकर यांणी केली. त्याजवरी कान्होजी सेडकर गावावरी नांदावयासी आला. इ. इ. इ.''

---

## लेखांक ५६.

**श्री.** १६५९ मार्गशीर्ष वद्य २.

''राजश्री नारायणजी जुंझारराऊ मरळ देसमुख ताा कानदखोरे गोसावी यासः–

।।७ अखंडितलक्ष्मीअलंकृत राजमान्य स्नो। रामाजी आपाजी व भानजी तुकाजी प्रभु देशपांडे ताा मजकूर सुा। समान सलासीन मया अलफ. कारणे सवादपत्र तुह्मास लेहोन दिधले ऐसे जे, मौजे पाबे व धानेब ताा माा हे दोन गाव देशमुखीचे इनाम आहेत. त्यास मौजेमजकूरच्या हकाचा कजिया तुमचा व आमचा होता. तुह्मास व आह्मास किले सिंहगडच्या मुकामी राजश्री पंतसचिव स्वामीनीं आणून, कतबे दोघांचेहि घेतले. ऐसीयास तुह्मी व आह्मी परस्थळीं जाऊन वाद सांगावा हे विहित नाही. त्याजकरितां आपले संतोसें आपण समजलों. बिा।

मौजे पाबे येथील देशकुलकर्णाचा हक व सावोत्रा आपण घ्यावा व देशमुखीचा व सरदेशमुखीचा हक तुह्मी घ्यावा. ऐसा तह केला कलम १.

धानेबचा तह देशमुखी सरदेशमुखी व सावोत्रा देखील देशकुलकर्णाचा हक तुह्मी घ्यावा. कलम १.

गावगना इनामें तुमची व आमची आहेत. त्यास तुमच्या इनामावरी

आह्मास तुह्मी सावोत्रा व देशकुलकर्णाचा हक द्यावा व आमच्या इनामावरी तुह्मास आह्मी सरदेशमुखीचा हक द्यावा. कलम १.

एणेप्रमाणे तिही कलमांचा तह केला आहे. तेणेप्रमाणे तुह्मी व आह्मी परस्परे आपले वतन अनभवावे. जो कोणी आपले वौसीचा होत असतां ए गोष्टीस हिलाहरकत करील, तो दिवाणचा गुन्हेगार. गोताचा अन्याई. शक १६५९ पिंगलनाम संवत्सरे मार्गसीर वद्य द्वितीया इंदुवासरे. हे सवादपत्र लेहोन दिल्हे. सही छ १५ साबान."

बिकलम रामाजी आपाजी देशपांडे त॥ मजकूर

## साक्ष.

| देसक ता। मोसेखोरे | | देसक ता। मुठेखोरे | |
|---|---|---|---|
| बाजी साबाजी एसवंतराव पासलकर देसमुख ता। मा | सताजी बिन बकाजीराव पासलकर देसमुख ता दार ता। मा | भिवजी बिन रुमाजी गंभीरराव मारणे देशमुख ता। मा | चाहूजी बिन साबाजी गंभीरराव मारणे देशमुख ता। मा |
| प्रतापराव पासलकर तर्फदार देसमुख ता। मा | तुळाजी बिन साबाजीराव तर्फदार देसमुख ता। मा | माधवराव जनार्दन देशपांडेए ता। मा | बाबूराव सजणाजी देसपांडे ता। मा |
| मालजी बिन आबाजी नाकड देसमुख तर्फदार तर्फ मजकूर | खेळोजी बिन बकाजी नाजिवगणे तर्फदार देसमुख ता। मा | त्र्यंबकजी पाटिल मारणे मौजे आंबेगाऊ ता। मा | रामजी पाटिल मारणे मौजे मुरवडे ता। मा |
| एसाजी नरसिंह देसपांडे ता। मा | मोरो गोविंद देशपांडे ता। मा | | |
| त्रिंबक वासुदेव | भास्कर मोरेस्वर | | |

| | |
|---|---|
| देसपांडे ता। | देसपांडे ता। |
| मा। | मा। |
| संताजी भूकर | हरजी जिवगणा |
| मोकदम मौजे | मोकदम मौजे |
| वडघर ता। | कसेळी ता। |
| मा। | मा। |

---

## लेखांक ५७.

श्रीधनेश्वर १६६१ चैत्र वद्य १३.

"महजरनामा शके १६६१ सिधार्थी नाम संवत्छरे चैत्र बहुल त्रयोदसी भौमवासरे बतारीख २६ माहे मोहरम बिहूजूर गोत

ता। मोसे खोरे व ता। कानदखोरे

( गोतांचीं नावें दिलीं आहेत. तीं महत्वाचीं नसल्यामुळें येथें लिहीत नाहीं. )

सुा तिसा सलासईन मया अलफ शिवजी गंगाधर व खंडो मल्हार उपनाम दिवाकर खासनीस दि॥ देशमुख ता। माार यासी महजर करून दिल्हा ऐसा जे, तुमची खासनिसी पुरातन वतनी आहे. ऐसीयासी खासनिसीचा हक ता। मजकुरी चालत नव्हता कीं, पुरातन हकजाबीते होते. ते सार्वभौम या प्रांतें आला होता, त्याच्या राजिकांत कोण्हाजवळ राहिले नाहींत. त्यास मनास आणितां खासनिसीस हकाचा तह आहे. याजकरितां तुह्मास हक ता। मारीं करून दिल्हा असे."

रकमी खंडकीस उगवणी टके ६०ɔ साटी टके आहे. त्यास दर रु॥ बस्तन टके २॥ अडीच प्रमाणे रु॥ २४ चोवीस रुपये होतात. ऐसीयास महालची नख्ती खंडणी जाहाली तर दर खंडी रु॥ २४. चोवीस रु॥ प्र॥ खंडकीया आकाराव्या, त्यास दर खंडकीस हक.

रु॥ ɔ—गला कैली ɔɔ२

पाहाणी माहालची जाहाली तरी दिवाणचा आकार कैली मापें खंडी १ɔ एक उगवेल, त्यास हक.

| खुर्दा टके | गला कैली |
|---|---|
| ɔ६ | ɔɔ१। |

एणे प्रमाणे रकमी खंडकीस रु॥ दुवल व गला केली दोन पाइली व पाहणीचे खंडकीस रुके साहा व गला केली सवा पाइली हक करार सदरहू देशमुख व देशपांडे व मोकदम देहाय ता। मा। याचें विचारें सदरहू हक तुह्मास खासनिसीचा करून दिल्हा, आणि श्रीमंत राजश्री चिमणाजी पंडित सचिव यांसी विनंति क॥ अंबोणे ता। गुंजण मावळ एथील मु। देशमुख व देशपांडे ता। मा। याणी अर्ज करून, तुह्मास सदरहू खासनिसीच्या हकाचीं पत्रें भोगोटियासी करून देविली आहेत. छ २० माहे मजकूरची पत्रें अलाहिदा आहेत. तरी तुह्मी व तुमचे पुत्रपौत्र वंशपरंपरेनें हक तह प्रो घेत जाणें. व दर माहारास राबणूक रोज २ दोन रोज नेमून दिल्हे असेत. या प्रो माहारापासून राबती घेत जाणें. हा महजर लिहिला. सही मोर्तब असे."

---

## लेखांक ५८.

**श्रीगेवंढे प्रा।** २ शक १७०१ वैशाख वद्य ५.

"बिदाणे इनाम राजश्री बाबाजी बिन नारायणजी जुंझारराव मरळ देशमुख ता। कानदखोरे यांचे इनाम मौजे गेवंढे ता। म॥ एथें आहे, त्याची बिदाणे श्रीचा आंगारा बादनाक व मातनाक बिन धाकनाक व धारनाक बिन राधनाक माहार मौजे म॥ यांणीं सत्य स्मरोन सांगितले. शके १७०१ प्लवनाम संवछरे वैशाख वद्य पंचमी शनवार सन इहिदे समानीन मया व अलफ.

राईचे पूर्वेस कानदजी सींव धुर गवंडावर खडक आहे, त्याचे पुढे सींव पावेतो राईच्या खालता धुर गवंडकड्यावरी आहे. त्याच गवंडाने गोवंडावर नांदुरखीचे झाड त्याचे खालता गोवंड तो खाली उत्तरेस राईच्या खाली घलईच्या कड्यापासून वागजाईच्या उत्तरेस केलाचे झाड, त्या खाली सुमारे कड्यासी सींव गेली आहे.

कानदचे सींवेने काळंबीची सींवधारेस दक्षणेस गेळेगाणीची वाहाळ.

एणे प्रो बिंदाणे पूर्वापार होती. त्या प्रा। माहार मौजे मजकूर यांणीं दाखविली असेत. छ १८ जमादिलावल."

---

## लेखांक ५९.

श्रीशंकर.

"राजश्री बावाजीराव देशमुख ता। कानदखोरे गोसावी यांसीः—

७ अखंडित—लक्ष्मी—अलंकृत— राजमान्य श्रे॥ जैसिंगराजे सिरके रामराम विनंती उपरी येथील कुशल जाणोन स्वकीय कुशल लेखन करीत असिले पाहिजे. विशेषः—आपणाकडील सविस्तर वर्तमान कळत नाही तरी सदैव लिहित असावे. यानंतरी श्रीचा मोहछाव आहे. तरी आपण आले पाहिजे. बहुत काय लिहिणे. हे विनंती."

---

## लेखांक ६०.

श्री.

"राजश्री बावाजी जुंझारराव मरळ देशमुख ता। कानदखोरे गोसावी यांसीः—

॥७ श्री गोविंद सामराव नामजाद सुभा प्रा। मावळे आसिर्वाद सु॥ सबा खमसैन मया अलफ. तुमचा व जिवाजी ना। मरळ यांचा कजिया लागला होता. त्याचा निवाडा हुजूर राजश्री पंतीं केला. तुह्मी खरे जाला. जिवाजी नाइक खोटे जाले. त्याजबदल तुह्माकडे हरकी सेरणी रुपये करार केलेः—

१००० ऐन
३०० नजर
———
१३००

ए॥ तेरासे रुपये राजश्री सिवाजीपंत मजमदार यांचे विद्यमानें सुभा वसुल करून हुजूर दिल्हे. ते पावले असेती. जाणिजे. छ १३ सफर मो सुद."

बार.

---

## लेखांक ६१.

श्री.

"राजश्री नारायणजी जुंझारराव देशमुख ता। कानदखोरे गोसावी यांसीः—

॥७ अखंडितलक्ष्मी—अलंकृत—राजमान्य श्रो रखमाजी अढलराऊ देशमुख ता। वेलवंडखोरे रामराम विनती. येथील कुशळ जाणून स्वकीय कुशळ लेखन करीत गेले पाहिजे. विशेष—आपण देशकुलकर्ण विशीई लिहिलें. त्यास आह्मी कासियावरून सडीं पाठवावी की, तुह्मी अद्यापी राजश्री पंताकडे गेले नाही, आणि समुख बसणेहि जाले नाहीं. आणि आह्मी कासियावरून सडी

घ्यावीं अथवा राजश्री पंताची आज्ञाहि नाही. त्यास, तुह्मी राजश्री पंताची भेटी घेणे. आणि तुह्मी आपले पुरातन जइसे असल ते सांगणे. मग राजश्री पंत माहालीचा देशमुखाची सडीची आज्ञा करितील. मग आह्मीं पुरातन जे वर्तले असेल, ते आह्मी लेहून पाठऊन देऊं. तोवरी आह्मास सडी देता न ये. कळले पाहिजे. व गुंजणमावलचे देशमुखहि त्याचीहि सडी आणवावी. दूर माहाल आहेती. कळले पाहिजे. बहुत काय लिहिणे. लोभ असो दीजे हे विनंती."

## लेखांक ६२.

### श्री.

"राजश्री बावाजी जुंझारराव देसमुख ता। कानदखोरे साहेबाचे सेवेसीः—

दा। बे॥ भिकाजी रेणुसे मोकदम मौजे पाबे ता। कानदखोरे सु॥ इसने अर्बैन मया अलफ. कारणे साहेबांचे सेवेसी कतबा लेहोन दिल्हा ऐसाजे, आपला आजा बालोजी रेणुसे छ १२ मोहरम पासोन पुडे उपद्रव तुह्मास थली पर–थली आपणाकडे शाबूत जाला, तरी याचा जाब आपण करून. हा कतबा लिहिला. सही छ मजकूर."

निशाणी.

(नांगर)

राघोजी बीन मालजी राऊत पा। अत्रोली घोडजी हिगा बा। रा। प्रतापराव सीलमकर देशमुख तर्फ मावळ.

तुकाजी बसापा राजपा कृष्णाजी लाड चौ। प्रचंडगड मोरोजी गोळक पेटा वेलवंडी.

## लेखांक ६३.

### श्री.

"श्रीमत् माहाराज मातुश्री आईसाहेब यांणीं बावाजी मरळ ता। कानदखोरे यासी आज्ञा केली ऐसीजे, मौजे पाबे ता। मजकूर येथे सरकारची सेरी पुरातन आहे. त्यास, तुह्मी इजारा सेरीचा रुपये ५० पनास सालाबाद देत असता. हालीं हुजूरचे कमाविसदाराकडे देत नाही. ह्मणून हुजूर विदित जहालें. एो यास सेरीचा ऐवजास खलेल करावयास गरज काय? याउपरी देखत आज्ञापत्र सदरहू ऐवज हुजूर पाठवणे. उजूर जालिया कार्यास येणार नाही. या कामास सिदोजी मुलिक पा। आहे. यासी मसाला रुपये १ देणे. जाणिजे. छ ४ माहे जिल्हेज सु॥ अर्बा खमसैन लेखनावधी." बार.

## लेखांक ६४.

श्री.

"राजश्री बाजी साबाजी यसवंतराउ पासलकर देशमुख
ता॥ मोसेखोरे गोसावी यांसीः-

॥छ अखंडित-लक्ष्मी-अलंकृत-राजमान्य श्रो नारायणजी झुंझारराऊ देशमुख ता॥ कानदखोरे सु॥ समान सलासैन मया अलफ कारणे तुह्मास सवादपत्र लेहून दिल्हे ऐसेजे, देशकुलकर्णी ता॥ मा॥ याचा व आमचा इनाम गाव पाबी व धानब हे दोन्ही गाव ता॥ मा॥ आहेत. तेथील हकाचा कजिया होता. त्यास, राजश्री पंतसचीव स्वामीनीं किले सिंहगडचे मुकामीं आणून दोघांचेहि कतबे घेतले. आणि त्याणीं व आपण परस्तली भांडत जावे ऐसें नाहीं. ह्मणोन देशपांडे व आह्मी समजोन त्याणीं आह्मास कागद लेहून दिल्हा व आह्मी त्यासी कागद लेहून दिल्हा आहे. त्याप्रमाणें वर्तावे. ह्मणऊन राजश्री पंतस्वामीनी आज्ञा केली की, वर्तावयास जामीन देणें. ह्मणऊन आपण तुह्मास दिवाणांत वर्तावयास जामीन दिल्हे असे. तरी जेणेप्रमाणे आह्मी देशपांडियास कागद लेहून दिल्हा आहे, त्याप्रमाणे वर्तोन. जरी तह्प्रमाणे न वर्तोन आणि नवदिगर करून त्यामुळें तुह्मास आमचा निसबत लागेल. त्याचा जाब आपण करून. छ १६ साबान. हे सवादपत्र लेहून दिल्हे सही."

---

## लेखांक ६५.

श्री.

"राजश्री बावाजी मरल झुंझारराऊ देशमुख ता॥ कानदखोरें गोसावी यांसी—

श्रे॥ आबाजी रघुनाथ कमावीसदार का॥ खेड सिवापूर दि॥ दरुनी-माहाल वाडा पहिला रामराम सु॥ सबा अबैन मयां अलफ. मौजे पाबे येथें सेरी सरकारची आहे. ते तुह्मी किर्दी करून खाता. दिवाणचा राजभाग देत नाहीं. ह्मणून आह्मांस हुजुरून पत्र सादर जालें आहे. तेथें आज्ञा कीं, सेरी सरकारांत ठेऊन, तेथील कुल ऐवज जप्त करून, हालीं जो गला मालिस्त जाला असेल, त्याचा राजभाग सरकारांत जमा करणें. देशमुखाकडे एक दाणा न देणें. ह्मणून आज्ञा जाली आहे. त्यावरून रतोजी पवार व लोक हुजरे पाठविले आहेत. तरी तेथील ऐवज मालिवज जमा जाहाला असेल, त्याचा राजभाग यांचे दुमाला करणें. जाणिजे. छ ४ जिलकाद हे विनंती.

या कामास बयाजी जाधव व मानाजी सुरवेसी पा॥ आहेत. यांस मसाला रुपये १ एक आदा करणे. जाणिजे. छ मजकूर."

---

## लेखांक ६६.

**श्री.**

तालीक.

"यादी कर्ज नि॥ देशमुख ता॥ कानदखोरे इ॥ कज्या जिवाजी नाईक मरळ ता॥ निवाडा खर्च पडला एकूण हिसेब रुपये.

३

| | अज रु॥ | मुदल | व्याज |
|---|---|---|---|
| गु॥ खंडो मल्हार व भानजी<br>तुकाजी रवानगी सातारा<br>तेव्हां दिल्हे प्रा<br>६०० मुा शके १६६<br>दुदुभि नाम संवछरे<br>३०० जावजी वाघ.<br>३०० खंडोजी हरफळे.<br>६००<br>२७३६ व्याज इ॥ ता॥ १६७६<br>इस्वर नाम संवछरे<br>ए॥ वरसे १६ यास<br>व्याज दर महा दर सदे<br>२ प्रा व्याज वरसास<br>१४४ ए॥<br>३३३६ | ३३३६ | ६०० | २७३६ |
| मु॥ नरे गु॥ आपाजी नऱ्हेर<br>खासनीस शके १६७५<br>रुधिरोद्गारी नाम संवछरे<br>ता॥ शके १६८९ ए॥<br>७०० मुदल<br>३०२४ व्याज वरसे १५<br>ए॥ दर माहा दर<br>सदे दुवोत्रा<br>३७२४ | ३७२४ | ७०० | ३०२४ |

| | | | |
|---|---|---|---|
| शके १६६५ रक्ताक्षी<br>संवछरे राजश्री गोविंद सामराज<br>यास दिल्हे रुपये<br>३०० मु॥ गु॥ खंडोपंत ह॥<br>मल्हारजी मोगल<br>१२२४ व्याज वरसे चौदा<br>दर माहा दर सदे<br>रु॥ २ प्र॥<br>१६२४ | १३०४ | ३०० | १००४ |
| वि॥ राजश्री दाजीपंत गु॥<br>खंडोपंत<br>१००० मुदल<br>२८८० व्याज शक १६६८<br>क्षय नाम संवछरे<br>ए॥ वरसे १२ ए॥<br>३८८० | ३८८० | १००० | २८८० |
| पोटखर्च मु॥ भोर<br>५०० मुदल<br>४८० व्याज शके १६७५<br>ए॥ वरसे ४ ए॥<br>९८० | ९८० | ५०० | ४८० |
| किती चाकर लोक असामी<br>३ ए॥ वरसे<br>१२०० मु॥ इ॥ शके<br>१६६४<br>२५९२ ता॥ शके ७१<br>वरसे ९ ए॥<br>व्याज<br>३७९२ | ३७९२ | १२०० | २५९२ |
| शके १६७८ धाता नाम<br>संवछरे | ९५०० | ८००० | १५०० |



८००० मुदल
१५०० व्याज रु॥ २०००
पैकी वसूल ५००
बाकी

९५००

| | | | |
|---|---|---|---|
| गोडशा बदल शके १६६६ रक्ताक्षी नाम संवछरे गु॥ शिवजी गंगाधर व संभाजी पाटील नि॥ ह॥ २७७ मुदल २०७ ६९३ व्याज वरसे १४ ९०० | ९०० | २०७ | ६९३ |
| कि॥ चाकर असामी तीन ए॥ दर ५० प्रा॥ ए॥ वरसास रु॥ १५० व्याज वरसे | १२०० | १२०० | ० |
| | २९७५५ | १४१८२ | १५५७३ |

## लेखांक ६७.

श्री.

जाबता हक देशमुख ता। कानदखोरे अज बेरीज
हक निमे समंधे गावगना अज देहे ३४

ता।

मौजे ३३ मजरे केणिग जमा मौजे कोलगड १

एकूण रकम कास खंडी ३००
यासि वजा खंडी
७॥। किले हद्द
२४ ॥३ सोडी
४५ ु१ इनामती
१२ मौजे अंत्रोळी इनाम सरदेसमुखी
देहे १ ए॥ रकम खंडी

३३।१ देशमुखी

१२ धानेब देह १ ए॥

१६ मौजे पाबे देहे १ ए॥

२८

२।४ शेत मोरटके विंझर पैकी

१।३ शेत धनमाळ मौजे दापोड पैकी

१॥३। शेत खार मौजे काढावले बु॥ पैकी

३३

४५

७७।३

बाकी खालीसा बेरीज रकम खंडी २२२॥२

ए॥ बेरीज हक टके २३३०॥१०

त॥

१२३६।८ देह ३० ए॥

१०५४।॥ प्रा॥ देहे २८ दर खंडीस टके ८।४

१८१।८ प्रा॥ देहे २ ए॥

१२३६।८

८६१॥६ किरकोळ हक देशमुखी गांव खंडी

६०० गाव खंडी दर गांवास खंडी १

ए॥ खंडी ३० दर मणास टके १

ए॥

२६१॥६ किरकोळ हक

८६१॥६

२०९७॥२

४५७॥३ किरकोळ हक बाजारविश्वा

सुधा टके व सेव पसकई ए॥

२५२५।५

इनामती देहे २ व सेते ए॥

९६४। = मौजे पाबे देहे १ ए॥ रकम खंडी १६ ए॥

७७२१॥३ मौजे धानेब देहे १ ए॥ रकम खंडी १२ ए॥

१३० शेत मोरटके खंडी २।४ ए॥

१०० शेत खार रकम १॥३ ए॥

६८॥१॥ शेत घनमाळ खंडी १।३ ए॥

१९८४॥८॥

२३२॥।८ हक

११२॥२ पावे

९१॥।६ धानेब

११॥।६ सेत मोरटके

७॥ सेत धनमाळ

९ ͻ ६ सेत खाकर

२३२॥।८

२२१७॥४॥

ए॥ हक बेरीज टके

२५५५।५ तपेसमंधी

२२१७॥४॥ इनामती

४७७२॥।९॥

यासि तह धारा र॥ पंतप्रधान दस्त बटाई सन समान तिसैन बटाई केली. सन तिसा मधें पाहणी करून, कुली कीर्दी नाकीर्दी मनास आणून धारियाचा तह दिल्हा. ए॥ बेरीज देह २ ए॥

मौजे धानेब यास खंडी १२ एकून
दर खंडीस खंडी ६
एकून खंडी ७२
हक वावेली ९ ॥।·॥।·
रकम खंडी १ ॥१॥
दर खंडीस
खंडी ६॥ ए॥
८१॥।·॥।·
यासि दस्त सालमजकुरी सन इसने
गला खंडी कैली ५४ͻ
नख्त वणी घरटका ए॥
ए॥ रकम खंडी ५ͻ=
दर खंडीस खंडी ६
ए॥ धारा खंडी ३०।·

मौजे पावे रकम खंडी १६

ए॥ धारा खंडी ९६ ए॥
वावेली रकम ८॥३
खंडी ११॥·॥।
ए॥ १०४॥३

यासि दस्त साल मजकुरी खंडी
गला खंडी ८५॥
नख्त वण घरटका ए॥

यासि दस्त अलाहिदा गांव नेहटणीस जमा केले नाही, सबब राहनीकाजकीर्दी माहादाजी अनंत सुभेदार प्रा॥ मावळ हाहि एकंदर गांव खाले जमा करविले, तेणे प्रो चालू असे सबब; अलाहिदा जमा नाही.”

## लेखांक ६८.

**श्री.**

"राजश्री नारायणजी जुंझारराव मरळ देशमुख ता॥ कानदखोरे गोसावियासी–

॥७ श्रे॥ आनंदराऊ बहिरव आशिर्वाद सु॥ सन अर्बा सलासैन मया अलफ तुह्मी एथे राजपुरीचे मोहिमेस चाकरीस बावाजीराव मरळ पाठविले होते. त्यास, ते रजा घेऊन गेले. ते समई त्याणीं बावजी ऐणपुरे ठेऊन गेले. त्यानीं आजी-पावेतो चाकरी केली. त्याचे मुबदले त्र्यंबकजी सिंदे पाठविले. त्यापासीं सेवा घेऊन बावजीस निरोप द्यावा, तो त्र्यंबकजीस वेथा जाली. याकरितां बावजी ठेऊन घेतला. तो चाकरी करीत असता, त्यास हि वेथा होऊन आजी छ मजकुरीं मृत्यु पावला. बावजीनें एकनिष्ठेने चाकरी केली आहे. याचे अगत्य चालवावे लागते. याकरितां हे पत्र तुह्मास लिहिले आहे. बावजीच्या मुला-माणसांचे चालवावयासी अंतर न करणे. *आह्मी तिकडे आलियावरी त्याचे मुलाबाळास कांहीं इनाम दिवाणांतून काढून देऊ. चोखट माणूस गेला. उपाय नाही. छ ५ जमादिलाखर. हे विनंति."

## लेखांक ६९.

**श्री.**

"यादी मु॥ पाबे खर्च देशमुखाची मनसुफी

जिनस सामान

| | तांदूळ | कणीक | दाळ |
|---|---|---|---|
| बुधवारी | ɔ॥२ | ɔ॥१ | ɔ। |
| गुरुवारी | ɔ॥।१ | ɔ१। | ɔ।१ |
| शुक्रवारी | ɔ१ | ɔ१॥ | ɔ।१ |
| शनवारी | ɔ१ | ɔ१॥ | ɔ।१ |
| रविवारी | ɔ१ | ɔ१॥ | ɔ।१ |

बाण सवदा वजन

| | मिरे | हळद | खोबरें | जिरे |
|---|---|---|---|---|
| बुधवारी | ɔɔ॥· | ɔɔ॥· | ɔɔ॥· | ɔɔ॥· |
| गुरुवारी | ० | ० | ० | ० |
| शुक्रवारी | ɔɔ॥· | ɔɔ॥· | ɔɔ॥· | ० |
| शनवारी | ɔɔ१ | ɔɔ१ | ɔɔ१ | ० |
| रविवारी | ɔɔ१ | ɔɔ१ | ɔɔ॥ | ० |

* हस्ताक्षर खाशाचें.

| पीठे साकर | गूळ | तूप | तेल | मिरची |
|---|---|---|---|---|
| ७॥ | ७ | ००१ | ००७ | ०७॥ |
| ०१ | ० | ००२ | ००६ | ०७॥ |
| ७॥१ | ००७ | ००३ | ००५ | ०७॥ |
| ०१ | ००६ | ००३ | ००६ | ०७॥ |
| ०१। | ००६ | ००३ | ००७ | ०७॥ |

| पान | सुपारी | तमाखू |
|---|---|---|
| २०० | ०७॥ | ००१ |
| २०० | ०७॥ | ००१॥ |
| १५० | ०७। | ००१ |
| ३०० | ०७॥ | ००२ |
| २०० | ०७॥ | ००१ |

## लेखांक ७०.

श्री.

तालिक

"आज्ञापत्र राजश्री पंत सचिव ता॥ महादजी बीन बालोजी रेणुसा मोकदम मौजे पाबे ता॥ कानदखोरे सुहूर सन इसने सलासीन मया अलफ. तुजला घर ह्मैस पाळक करून देऊन तुजपासून सेरणी रुपये ५० पन्नास हुजूर घेतले. त्याच्या दोन तक्षिमा देशमुखास दिल्हे नाहींत ह्मणोन हुजूर वर्तमान विदित जाले. या उपरी देखत आज्ञापत्र सदरहू दोन तक्षिमाचा ऐवज रुपये १०० एकसे नारायणजी जुंझारराऊ देशमुख याजकडे वसूल देणें. उजूर न करणें. छ २४ साबान."

## लेखांक ७१.

श्री.

"राजश्री बावाजी जुंझारराऊ देशमुख ता॥ कानदखोरे गोसावि यासीः—

॥छ अखंडित—लक्ष्मी—आलंकृत—राजमान्य श्नो सुर्याजी भोसले हवालदार व कारकून किले सुधागड रामराम व आसिर्वाद सु॥ सलास खमसैन मया अलफ तुह्मी पत्र पाठविले ते पावले. लिहिले वर्तमान कळले. मौजे पाबे येथील पाटील रेणुसे याजकडील भुते आह्माकडे पडोन, नाष जाला आहे. इकडील थले उतरली आहेत. याचा विचार करावा लागतो. तरी श्रीस प्रसाद लाऊन, काये

उतर येते ते लेहून पाठवावे ह्मणोन लिहिले. त्यावरून श्रीस प्रसाद लाविला. श्रीनें रेणुसा याकडील भुते खरी आहेत, ह्मणून प्रसाद दिल्हा. बहुत काय लिहिणे, लोभ असो दीजे. रा छ १ साबान हे विनंती."

## लेखांक ७२.

श्री.

"आज्ञापत्र राजश्री पंतसचिव ता। मोकदम मौजे पाबे ता। कानदखोरें सु॥ सलास खमसैन मया अलफ. मौजे मारीं रान देशमुखानीं पेशजीपासून राखीले आहे, ते तुह्मी गावकरी रान तोडितां ह्मणून हुजूर वर्तमान विदित जाले; तरी याउपरी रान न तोडणें. कड्याखाली रान जे तोडिले असेल, तरी ते न जालवणे. देशमुख सांगतील त्याप्रमाणे वर्तणुक करणे. उजूर केलिया मुलाहिजा होणार नाही. ऐसे पष्ट समजोन वर्तणुक करणें. जाणिजे. छ १३ जमादिलाखर पा। हुजूर."

सुरुसुद

## लेखांक ७३.

श्री.

"बि हुजूर राजश्री जुझारराऊ दा। बो

दतो बापुजी लेहोनु
दिधले की देसमुख व
पांच जे सांगतील ते
आइकोन. जरी पांचाचे
न आइको तरी गोताचा
खोटा.

त्रिंबक रंगनाथ लेहोनु
दिल्हे की देसमुख व पांच
जे सांगतील ते आइकोन.
जर पांचाचे न आइको
तरी गोताचा खोटा."

## लेखांक ७४.

श्री.

"अज स्वारी राजश्री बाबूराव दत्तो नामजाद सुभा किले हाय ता। मोकदम मौजे पाबे ता। कानदखोरे सु खमस खमसैन मया व अलफ. मौजे मजकुरी परभीकीचे सेत आहे. ते सरकारांत अनामत ठेविले आहे. त्याची लावणी जाली पाहिजे. त्यास तुह्मी गावातील कुळें लाऊन कीर्द करवणे. ज्याप्रमाणे सरकतीची बोली करून लावणी कराल, त्याप्रमाणे उगवणी होईल. तरी कुळें लाऊन लावणी करणे. बोली प्रो चालविले जाईल. जाजती अजार लागणार नाही. जाणिजे छ १० माहे सवाल."

## लेखांक ७५.

"मा। जमाल महमद ढालाईत स्वारी राजश्री पंतसचिव यास खंडो मल्हार नामजाद किले प्रचंडगड मु॥ समान सलासैन मया व अलफ तुजला येथून देशमुखाकडील पैकियाबदल पाठविले. ऐसियास देशमुख पैकियाचा निशा करितील. जर काही निशा न होये, तर विठोजी पा। अत्राले व संभाजी पाटील विझर हे जमान आहेत. त्यांचे घरी बैसोन पैकियाचा निकाल करून घेणे. येविसीं राजश्री पंताचीहि आज्ञा तुजला आहे. तरी रुपये बेमुरवत वसूल करून येणे. रा। छ १५ जिल्हेज सदरहू दोघा पाटिलाकडून बेमुरवत करून पैके घेणे. देशमुखास त्वष्ट न लावणे. सदरहू देशमुखापासून रुपये १०० येकसे घेणे. जाजती तगादा न लावणे जाणिजे."

---

## लेखांक ७६.

श्री.

"विनंती उपरी (मा)तुश्री आईसाहेब सिंहीगडास येत्यात ह्मणऊन राजश्री पंत सुभेदार याणीं गावगण सिस्त करून, वेठ व माहार आणविले. त्यास, पाबे व धानब येथील वेठ माहार आणविले आहे. किलाची अलगहाद सेकार आनविला. येथून सेकार आणीत होते. त्यास सुभाच्या वरातदाराणें निकड केली. सिहिगडास गेले. ह्मणजे सेकार बेजार नाही.तर गोसावी याणी तकूबचिटी आणविली पाहिजे हे विनंती."

---

## लेखांक ७७.

श्री.

"वंशावली राजश्री देशमुख जुंझारराव ता। कानदखोरे मूळ पुरुष राघनाईक त्याचे पुत्र ३

वडिल परसोजी नाईक. त्याचा लेक बावाजी जुं-झारराव. त्याचा लेक का-न्होजी जुंझारराव. त्याचा लेक मागती बावाजी जुंझा-रराव. त्याचा लेक मागती कान्होजी जुंझारराव. त्याचा नारायणजी जुंझार-राव. त्याचा लेक बावाजी जुंझारराव

दुसरा तुला नाईक. त्याची वंशावली कानदकर. तिसरा मुकलोजी त्याचे संतान बुडत बुडत आले. हा-ली कोणी नाहीं."

---

# लेखांक ७८.

श्री.

फारसी मजकूर

"मकसूदनामा कान्होजी जुंझारराऊ आदिकारी तपे कानदखोरे मामले राईर मकसूद किले तोरणा वसऊ नव्हता. दुसमानाच्या लोकी मुलाहिजा केला जे हसम व जकीरा वाढउनु किले मजाा कावीज करावे. हे खबर बादे कमीने आइकौनु साहेबाची नफराई केली. किले मजाा काबीज करुनु निगा वर्जोरीसी केलि. मकसुदु

हसम नफर १०० यासि
++ २ माहा १५ रोज
इाा छ१५ माहे रविलाखर
ताा माहे जमादिलाखरु यासि
तैनाती व बैगारी नाा १००
यासि अढैच सेरी बंदे
कमीने कर्ज करुनु दिल्हे

पेसजी दाभोळेची मसलत
फते इन मलिका बराबरी
मसादती झगडा केला ++
ही हुजुरु मऱ्हामती
पालक व छत्री व दिवटी
यासि तैनाती मौजे दापोडे
ताा माा मऱ्हामती केले.

( पुढें गहाळ. )

---

# लेखांक ७९.

श्री.

"राजश्री नारायणजी जुंझारराऊ देसमुख ताा कानदखोरें गोसावी यांसि

॥ ॐ श्वो अनंदराऊ बहिरव आसिर्वाद सुाा इसने सलासीन मया अलफ. तुह्मी पत्र पाठविलें, ते प्रविष्ट जाले. राा खंडोपंत याबरोबर मुखोद्गात कितेक वर्तमान सांगोन पाठविले. त्यावरून आद्यंत कळलें. ऐसियास तूर्त तुह्मास येथे बोलवावे तरी दंगा बहुत आहे. त्यास कार्तिकमासी राजश्री पंताची स्वारी किले सिंहगडास होणार आहे. ते समई तुह्मास बोलाऊन, काय ते वर्तमान मनास आणून निर्वाह केला जाईल. कदाचित् राजश्री पंताची स्वारी नव्हे तरी आह्मास तो खामखा यावे लागतें. मग तुमचें कार्य विल्हे लावून दिल्हे जाईल. तुह्मी कांही चिंता न करणें. येथील वर्तमान राा खंडोपंत सांगतील कळेल. राा छ ७ माहे रविलाखर."

---

## लेखांक ८०.

श्री.

"राजश्री नारायणजी जुंझारराऊ देसमुख ता। कानदखोरे गोः—

"छ अखंडित–लक्ष्मी–आलंकृत–राजमान्य श्नो पिलाजी जाधव रामराम येथील कुशल जाणून स्वकीय लिहिणे. यानंतर पत्र पाठविले. लिा की, शामलाने जागडे वतनदार पाठविले. तुह्माकडील आश्रा कळोन रुपयाचा भरवसा त्यास जाला आहे. ह्मणून कितेक लिहिले. ऐसियास कितेक वर्तमान कृष्णाजी जाधव याजपासी सांगितले आहे. आह्मी दसरा जालियावरी दहा पंधरा दिवसां कूच करून मुलुकगिरीस जाऊन, तेव्हां एक जण एका बसऊन आह्माबरोबर पाठवणें. मग लष्करांत कळेल तैसा निकाल काढून, से दोन से जे होतील ते करून देऊ. येथे कांही रुपयाची अनुकुलता होणार नाहीं. याजकरितां आह्मी विचार काढिला आहे. तजविजेनेच शामलाचे रुा वारेत ऐसे करून. कांही फिकीर न करणे जाणिजे. रा। छ ४ माहे सफर बहुत काय लिहिणे हे विनंती."

---

## लेखांक ८१.

श्री.

नकल.

"छ॥ म॥ अनाम नारायणजी जुंझारराव देशमुख व देशपांडे त॥ कानदखोरे यांसी नारो शंकर सचिव सु॥ अर्बा सलासैन मया व अलफ. तुमचे पुत्र बावाजी जुंझारराऊ व जिवाजी बिन तुलबाजी मरळ या उभयतानीं राजापुरीचे मुकामीं विनंती केली की, शामलावरी मोहीम राजश्री स्वामीनीं केली. फौज देऊन राजश्री फत्तेसिंग भोसले व राजश्री बाजीराव पंडित प्रधान ऐसे एकंदर वैशाखमासीं रवाना केले. पदाती जमाव मावळप्रांतीचा स्वार समागमे जाऊन स्वामिकार्य करणे ह्मणून आज्ञा केली. व राजश्री आनंदराऊ बहिरव यासमागमे आपण जमाव-निसी मोहिमेस आलो. कष्ट मेहनत जे करावयाचे ते उभयतासमागमे हुकुमाप्रमाणे केली. खोकरी राजापुरी कुल देशदुर्ग रायगडिसहवर्तमान हस्तगत जालिया खुशालीच्या प्रसंगीं मावळप्रांतीच्या जमीदाराचे बरें करावें; इसाफतीच्या गांवास मोगलाई बैसली आहे, ते माफ करून सोडावी; व स्वराज्यपैकी बाबती वसूल घेताती व ऐन दस्त पैकी तिजाई घेतात, त्यास ऐवज दस्त बाबती स्वराज्याची बेरीज एक करून तिजाईमात्र........बाबती घेऊ नये; ह्मणून विनंती केली. त्याप्रमाणे तह करून सनद सादर केली असे. गावगना बितपसिल."

तुमचे इनामाचे गांव
१ मौजे धानेब
१ मौजे पाबे
---
२

सदरहू देहे दोन येथील पाहाणीप्रमाणें जो आकार होईल, त्यापैकीं दोन तक्षिमा व स्वराज्य व एक तक्षीम मोगलाईपैकीं मोगलाई माफ केली असे. दोन तक्षिमा स्वराज्यपैकीं तिसरी तक्षीम घ्यावी. कलम १

इनामसेत गाव गना
१ दापोडे
१ लासीरगाव
---
२

सदरहू गावगना सेत आहेत. त्यास मोगलाई पडते, ते तह-प्रमाणें माफ करून स्वराज्याची तिजाई घ्यावी कलम १

बावेली मोकदमाची व बळोतियाची व माराची माहरिक पेसजी सुदामत आहेत. त्यास, मोगलाई माफ केली आहे. स्वराज्याच्या आकाराची इनाम तिजाई घ्यावी. कलम १

वणी घरटका नख्त बाब आकार होईल, त्यास राजपटी व दाहिजे बसताती. ते देखील आकार करून तिजाई घ्यावी. दोन तक्षिमा तुह्मास दिल्या असेत. कलम १

देशमुख देशपांडे याचे इनामगावी खंड गुन्हेगारी कमाविस होईल, त्याची तिजाई दिवाणांत घ्यावी. दोन तक्षिमा दिल्हा असत व निपुत्रिकाचा बैतल कमाविस गौरा जो वसूल जमा होईल, त्यापैकी तिजाई घेतली जाईल. कलम १

येणेप्रमाणें तह केला असे. या तहबरहुकूम तुमचें चालविलें जाईल. कदाचित् माहालसिरिस्तियानें पाहाणी होती ते न जाली, खंडणीच जाली, तरी आकार होईल त्यापैकीं मोगलाई वजा करून, त्याची तिसरी तक्षिम टका आकारेल तो वसुल घेतला जाईल. याखेरीज किरकोळी पटीयाचा तगादा लागणार नाही. जाणिजे. छ १० रबिलावल मोर्तब असे."

---

## लेखांक ८२.

**श्री.**

"॥छ म॥ अनाम देशमुख व देशपांडे ता॥ कानदखोरे यांस नारो शंकर सचिव सु॥ सन अर्बा सलासैन मया अलफ. रायगड.चे मदतीस लोक मावळप्रांती-

हून हशमाचा जमाव वतनदार चाकरलोक आहेत, त्यापैकी एक हजार लोक रवाना करणें ह्मणून राजश्री स्वामीनीं आज्ञा केली आहे. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तुह्मीं लोक १५ पंधरा मर्दाने माणूस पाहून, बा। एक सरदार नावाचा माणूस देऊन, लोकांची रवानगी राजश्री आनंदराऊ याजकडे रवानगी करणे. हे काम बदलामीचे आहे ऐसे स्पष्ट जाणून लोक रवाना करणे. लोकास तूर्त खर्चास राजश्री रंगो रघुनाथ बा। स्वारी याजबा। रुपये देऊन पाठविले आहेत. त्यास, मा।रनिले सदरहू रु। तुह्मास देतील. ते लोकाचे पदरीं घालून, आधी लोक रवाना करणे. मा।रनिले तुह्मास लोकांचेविशीं सांगतील, ते स्वमुखीची गोष्टी जाणून लोकांचेविशीं ढील न करणे. या कामास सेख मदारी व करीमखान हुजरात पा। यास रुपये १ एक रास देविला असे. अदा करणे. छ ९ रमजान पा। हुजुर."

सुरु सुद बार.

---

## लेखांक ८३.

**श्री.**

"॥छ मा। अनाम देशमुख व देशपांडे ता। कानदखोरे यांस नारो शंकर सचिव सु॥ सन अर्बा सलासीन मया अलफ. राजश्री स्वामीनीं पाचाडचे ठाणे स्वाधीन करून, राजश्री आनंदराऊ बहिरव पाठविले आहेत. यासमागमें मावळ प्रांतेचा व गडकिलाचा जमाव नेहमीं नेमणुक केली आहे, त्यापैकी तर्फमजकुरावरी तुह्माकडे लोक ५ पाच नेमणूक करून दिल्ही आहे. त्यापैकी बरकंदाज १ अढा व पंचरूढ हतेरी च्यार असामी नेमिले असेती. सदरहू पैकी पाचाडचे ठाणियांत लोक आहेत. त्यास, दोन अडिच महिने होऊन गेले; याउपर ते लोक तेथे राहाणार नाहीत. याकरिता हें आज्ञापत्र तुह्मास सादर केलें असे. तरी सदरहूप्रमाणे लोकांची नेमणूक करून भादवापर्यंत नेहमी लोक पाचाडच्या ठाणियास पाठऊन देणे. कदाचित् लोक तिकडून न आलेच, तरी दुसरे मुबदले वरच्यावरी रवाना करणें. छ १७ जिल्हेज पा। हुजूर."

---

## लेखांक ८४.

**श्री.**

"अखंडित लक्ष्मीअलंकृत राजमान्य राजश्री खंडो मल्हार गोसावी यांसिः—
सेवक चिमणाजी नारायण सचिव नमस्कार सु॥ सन सबा सलासैन मया व

अलफ. नारायणजी जुंझारराऊ देशमुख ता। कानदखोरे यासी पत्र लिहिलें, तेंच बजिनस तुह्मांकडे आलाहिदा पाठविलें आहे. त्यावरून अभिप्राय कळेल. तर तुह्मी व जिवाजी मरळ त्याकडे जाऊन वतनावरीं घेऊन येणें. ये गोष्टीस विलंब न लावणें. देशमुखाची रवानगी करून, तुह्मी पुढें मसलतीस जाणें. त्याच्या चित्तांत संकल्पविकल्प त्याचे परिमार्जन तुह्मी करून घेऊन येणें. येविशई स्वमुखें तुह्मांस सिंहगडचे मुकामीं आज्ञा करणे ते केलीच आहे. या उपर विलंबावरी न घालितां जुंझारराव माहालांत येत तें करणे. छ १ सफर पा। हुजूर."

---

## लेखांक ८५.

**श्री.**

"आज्ञापत्र समस्त राजकार्यधुरंधर विश्वासनिधि राजमान्य राजश्री चिमणाजी पंडित सचिव ता। मोकदम मौजे धानेब ता। कानदखोरें सु॥ समान सलासीन मया अलफ दिल्हें वतनपत्र ऐसे जे, तुझे बाबें देशमुख व देशकुलकर्णी ता। मजकूर यांणी पेसजी हुजूर नेराचे मुकामीं येऊन विनंति केली कीं, ता। मजकूरचे गावगनाचे कामथ आहेत. तीं सेतें खोतीकडे रकमेस वावेलीयाखालें वोढत आहेत. त्यास गावगनाच्या मोकदमास वतनसंमंधें कसाला पडतो व मोकदमीच्या वावेलीयाची व कामथसेताची तिजाई रकमप्रमाणें सालदरसाल पाटिलास वसूल पडतो. परंतु कामथ सेत पाटिलाच्या दुमाला पडत नाहीं. याकरितां स्वामीनीं मनास आणून, कामथ सेत मोकदमाच्या दुमाला करून, याचे जीवनमाफिक सेरणी करार करून, भोगवटियास वतनपत्रें सादर केलीं पाहिजेत. ह्मणऊन विदित केलें. त्यावरून मनास आणितां, देहाये मजकूरच्या मोकदमास वतनामुळें कसाला जबर पडतो, आणि कामथसेत मोकदमाच्या दुमाला पडत नाहीत, हे गोष्टी खरीच आहे. याकरितां तुजवरी कृपाळू होऊन मौजे मजकूरचे खोतीला कामथसेत रकम कास मण ·।१ साहा मण, पैकी वजा देशमुख मण ०३ तीन मण, बाकी तीन मण तुझे दुमाला केले असे. तरी सदरहू कामथ सेत पुत्रपौत्रादि वौंशपरंपरेने अनभऊन सुखरूप राहाणे. ये बाबें तुझे माथा सेरणी जीवनमाफिक दुतर्फा देखील बाबती रुपये ३६०= छेतीस रु॥ चवल करार केले असेत. सदरहूची उगवणी करून पावलियाचा हुजत घेणे. तेणेप्रमाणें मजुरा असेत. छ १० मोहरम पा। हुजूर."

बार सुरु सुद बार.

---

## लेखांक ८६.

श्री.

"छ म॥ अनाम देसमुख त॥ कानदखोरे यांस चिमणाजी नारायण सचिव सु॥ तिसा सलासीन मया अलफ. त॥ मजकुरीं मसलत तासगाव लोक २५ पंचवीस नेमिले आहेत. ते आपणास पाठविले नाहीत. हाली देखत आज्ञापत्र पंचवीस माणसें घेऊन, किले सिंहगडचे मुकामीं येणे. विलंब जाहलिया मुलाहिजा होणार नाही. या कामास जानोजी किवला दि॥ लबे ब॥ स्वारी प॥ असेत. यास महसल रु॥ २ दोन देविले असेत. आदा करणें र॥ छ २५ र॥ लावल"

बार सुरु सुद.

---

## लेखांक ८७.

श्री.

"छ म॥ अनाम देशमुख व देशपांडे त॥ कानदखोरे यांसि सदासिव चिमणाजी सचिव सु॥ इसने समानीन मया व अलफ. त॥ मजकूर येथें शामलाकडील चोरटे येऊन उपद्रव केला आहे. किल्ल्याखालील पेठेस येऊन दंगा करितात. ह्मणोन हुजूर विदित जालें. त्यावरून हें आज्ञापत्र सादर केलें असे. तरी तर्फ मजकूरचे इसाफतीचे लोक असामी ५० पंनास राजश्री माधवराव भिकाजी यांजकडे देविले असेत. तरी देऊन घाटाचा बंदोबस्त करणे. पोटास सिरस्तेप्रमाणें म॥रनिलेकडून देविलें असे. जाणिजे. छ १८ रमजान प॥ हुजूर."



[ इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झालेलीं ]

# मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें.



[ शिवकालीन घराणीं. ]

१

## कानदखोरें—मरळ देशमुख.



हें प्रकरण

**विश्वनाथ काशिनाथ राजवाडे, बी. ए.,**

ह्यांनीं संशोधून तयार केलें.



तें

**मुंबई येथें,**

तुकाराम जावजी ह्यांनीं

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

इ. स. १९१२.

तेथें पोंहचाऊन गेले. दुसरे रोजीं दिवाणास पाठवीत होते. त्यास संक्रमण करून दोन दिवस मधें आले. तिसरे दिवशीं दिवाण येऊन, शिष्टाचार करून बोलिले कीं, श्रीमंतांनीं बहुमान काय पाठविला ? वस्त्रें जवाहीर कोणें प्रकारचा ? ते दाखवावीं. म्हणून जनराल साहेबाचा विचार आहे. त्याजवरून वस्त्रें बहुमान दाखविला. पाहून ह्मणूं लागले कीं, "त्याजयोग्य नाहीं. श्रीमंत कैलासवासी नानासाहेब पासून ऐसा नाहीं. जरी बदली पोषाक जवाहीर बडी कंठी वगैरे येत असतात." आह्मी उत्तर केलें कीं, सांप्रतकालीं श्रीमंतांनीं कृपा करून पाठविला, तो बहुमान घ्यावा. आणखी येतील. चिंता नाहीं. त्याजवरून दिवाणजी जनराल साहेबाकडे गेले. वर्तमान सांगितलें. त्यांनीं उत्तर केलें कीं, आह्मास त्यांचे दोस्तीवर नजर आहे. समारंभें घेऊन येणें. त्याजवरून दिवाणजी बमय कारभारी दोनशें लोक वाजांत्री नृत्यांगना व खासी पालखी बहुमानास ठेवायास आणिली. बहुमानें मिरवीत घेऊन गेले. दोन घटका दरबार करून, वस्त्रें बहुमान बहुत खुशीनें घेतले. त्या दिवशीं तितकेंच करून रुखसत केलें. दुसरे दिवशीं मेजमानी सिधा पाठविली. तिसरे दिवशीं जावें तर दिवाणजीस आराम नव्हता. ह्मणून दोन चार दिवस दरबार नाहीं. पांचवे दिवसीं बरे जाले. दरबारास आले. * * * * तुह्मीं येणें. त्याजवरून तेथें गेलों. एकांत स्थलीं दिवाणजी व कृष्णराव कारभारी दुसरे व मुनसी दुभाषी त्रिवर्ग व आपण बसून बोलाविलें, तेथें गेलों. बोलावयास प्रारंभ केला. ह्मणों लागले कीं, श्रीमंत व नाना, हरीपंत खुशाल आहेत ? श्रीमंत किती वर्षांचे ? बोलणें कोणते प्रकारचें ? पुसिलें. त्याचें उत्तर केलें कीं, "आपले कृपेनें खुशाल आहेत. श्रीमंत अकरा वर्षांचे आहेत. बोलणें केवळ बृहस्पती. ईश्वरी अवतार आहे." दुसरें बोलणें कीं, आह्मीं आपले पातशापासून रुकसत जालों. चौमहिन्यांनीं यावें. त्यास भारी सरंजाम, पाण्यांतील कारभार, जहाजें न चालत. दिवसगत लागले. लाचार ! उपाय नाहीं. त्याचें उत्तर दिल्हे कीं, "तुह्मांकडील मुसामुतीन वकिलीस आले. त्यांनीं करार केला कीं, आमचे पातशापासून भारी सरंजाम मुसा भुसी घेऊन येतात. त्यांजवरोन तमाम सरदार हिंदोस्तान यांस लिहून पाठविलें कीं, फरासिसाकडील भारी सरंजाम येतो. त्याजवरून त्यांची खातरजमा जाली होती कीं, मुसा भुसी समर्थ माणूस, तमाम टोपीवाल्यांत सिरे ! तें कांहींच न जालें. लाचार होऊन मुसा मुसामुतीन यास इतल्ला देऊन सलूक केला. फिरोन बोलणें त्याचें कीं, "तुह्मी सलुख केला खरा, परंतु इंग्रेज बदमामला. काबूची यार. याचा भरंवसा हरगीज न धरावा. कोणे वेळेस काय करतील हें कळत नाहीं. तुह्मी आपले यजमानास लिहावें कीं, सावध असावें." त्याचें उत्तर केलें. "त्यांनीं बदमामली केली. दोन वेळां चढून आले, तेव्हां काय केलें ? पुढेंही काय होणें ? जैसें करतील तैसें फळ पावतीलच." तेथें बोलणें कीं, हैदरनायकानें कोणते प्रकारें सलूक केला ? त्याचें उत्तर केलें कीं, "हें करितां यांणीं आह्मांस लिहून पाठविलें कीं, तुह्मी सलूख हरगीज न करणें. आह्मी बंगाल्याचे मोहिमेस खर्च पडेल तो देतों. मुलूक सोडितों. पैका बाकी राहिली, तेही देतों. "त्याजवरून + + उद्दीष्टिन वकील

इंग्रेजांचा माघारे पाठविला. सलूक न केला. खर्चाखालीं आलों. आंतून आंतून इंग्रेजासी भानगड सलूकाची लाविली. हें वर्तमान आह्मांस कळलें. परंतु आह्मी हैदर नायकास सोडून सलूख केला नाहीं. ऐसें असतां त्यांनीं लबाडी केली, तर चिंता काय आहे ? फल पावतील." त्याचें त्यांनीं उत्तर केलें कीं, "विना फौजेचें जरबेवांचून ते ऐकणार नाहींत. त्यास फौज पाठवावी ह्मणजे सर्व मुद्दे हसील होतील. आह्मी त्यास लिहितों. उत्तर काय येईल तें कळवूं." आह्मीं उत्तर केलें कीं, "आपली श्रीमंतांची दोस्ती. त्यांचें कार्य कांहींच न केलें." त्याचें उत्तर केलें कीं, "गेली गोष्ट न काढावी. पुढें जे चाकरी सांगाल, त्यास कसूर करणार नाहीं. सांप्रत यांचा जमाव येथें भारी आहे. सरंजाम दोन अडीच हजार, गोरे दोन तीन हजार, भारी तोफा चालीस तयार, गाड्यावर चाळीस तोफा हल्लीं पडल्या आहेत. दारूगोळे तयार. बारा जाहाजें यांचे उभीं तयार आहे. एक जहाज यांचें सरंजामाचें हेंच मुलकांतील आलें. त्यांतही सरंजाम आला आहे. यांचे पातशहासीं व इंग्रेजांचे पातशाहासी सलूकाचें कारण हेंच कीं, इंग्रेजाचा मुलूख त्या प्रांतीचा फरासिसांनीं घेतला. जेर जाले. तेव्हां लाचार होऊन सलूख केला कीं, आमचा मुलूक सोडावा. तुह्मासीं दुसरी गोष्ट करीत, तुह्मासीं आह्मासीं बिघाड नसावा. जेर जाले. सबब मुलूक फरासिसांनीं सोडून सलूक केला. आणखी कितेक बंदोबस्त जाले. त्याचा तपशील आला नाहीं कीं कोणते बंदोबस्त जाले. आलियानंतर तुम्हास सूचना करून. आठा पंधरा रोजांत त्याचें जाहाज येतील त्यांजवरून सर्व कळेल. फुलचरीचा किल्ला इंग्रजांनीं बांधून द्यावा. गुळीर फरासिसांनी सोडावें. दुसरा किल्ला फरासिसांनीं पाडिला आहे. तो फरासिसांनीं बांधून द्यावा. येणेंप्रमाणें करार जाले. मुसा भुसींनीं ठाणें गुलीरचें सोडिलें. तमाम सरंजाम फुलचरीस आणिला. तेथें पांचसातसें लोक मात्र ठेविले आहेत. याचा अलकाब हलका लिहिला, म्हणून बोलत होते. त्यासी, चिटणीसासीं आज्ञा होऊन अधिकोत्तर अलकाब आज्ञा जाली पाहिजे. सारांश कीं, यांचीं राजकारणें चहूंकडे. चहूंकडून आलकाब यांचें मरातीबप्रमाणें येतात. यांचे दिवाणजीही बहुत थोर आहेत. यांसही पत्र बहुमानाचें लिहावें. सरकार चाकरीस सरगरम आहेत. सांप्रत माघ शु ॥ ८ आह्मांस जनराल मुसाभुसी यांनीं बोलिले कीं, तुह्मी आपले यजमानास लिहून पाठवावें कीं, राजकारण भारी आले. आपले पत्राची अपेक्षा आहे. खातरजमेचें पत्र आलें म्हणजे तुह्मांस समाधान राजकारणाचें सांगूं. पत्र ऐसें आलें पाहिजे कीं, तुह्मीं जें राजकारण कराल त्यांत शामील असों. दुसरें बोलिले कीं, तुमचे कार्यास अंतर करणार नाहीं. ऐसें भाषण जनराल यांणीं केलें. याचा विचार कीं, आपलेपाशी दोस्ती आहे. तेथें दुसरी गोष्ट कांहीं नसावी. साफच ते पत्रें यांस आलीं, ह्मणजे आपल्यास पत्रें राजकारणाचीं पाठवितील, अगर कोण्ही इतबारी रवाना करतील. याजसाठीं विनंति कीं, याचें उत्तर सत्वर आज्ञा जाली पाहिजे. यांजकडे चहूंकडील वकील बसले आहेत. पालखीनशीन वकील आहेत. संधानें चहूंकडे आहेत. येथें महर्गता विशेष. धारण तांदुळ

८८७ गहूं ८८५ सेर, हरभरे, उडीद, मुग दाल तुरीची आठ व सेर. गवत भारे ४ सदरहू प्रमाणें. तुप ८८२। गुळ ८८४ याप्रमाणें निरख. खर्चास रोज रुपये तीन. आज्ञा जाली ते मार्गांतच खर्च जाले. येथें कर्ज खाऊन आहें. तरी कृपाळू होऊन, खर्चाची आज्ञा करणार स्वामी समर्थ. वस्त्रें नाहींत. श्रीमंतांचें नांवानुरूप वस्त्रें पाहिजेत. स्वामी कृपा करणार समर्थ! निकडीचें काम जरूर जाणून, जासूदजोड्या दोन रवाना केल्या. आतां मार्गांत उजाडी. दूरपंथ. याजकरितां चौकडा पाठवून, चार जासूद येथें आहेत. त्यांजपैकीं दोन असामी आजारी! दोन मात्र आहेत. विनंति कीं, चार जोड्या अधिक आज्ञा जाली पाहिजे. चिनापट्टण येथें अद्यापि वकील आपले सरकारचा कोण्ही नाहीं. तैसें चंदावरकर राजे यांजकडे नजरेचें काम असेल, तर सेवकास आज्ञा जाली तर तेथें जाऊन चाकरी बजाऊन आणीन. पत्रें मात्र आज्ञा करणार स्वामी समर्थ. येथून चंदावर याची दिवसाची वाट आहे. त्याजकडून वस्त्रें लग्नाचीं व तीन हत्ती जवाहीर ऐसे घेऊन येतां आठापंध्रा दिवसांच्या मार्गें येतील. ऐसें वर्तमान चिनापट्टणांत वकील चंदावरकराचा आहे, तो सांगत होता. त्याजवरून लिहिलें. जनराल मुसाभुसींनीं बहुत प्रकारें बोलिलें कीं, आमचे तरफेनें बहुत सलाम सांगून पाठवावे कीं, आह्मीं तुह्मां वेगळे नाहीं. जे समयीं सांगाल ते समयीं चाकरीस हजर आहें. आपण येते समयीं गोष्ट सांगितली, ते एकांतीं खासा व सेवक दुसरें कोणी नसतां विनंति केली. त्यांनीं उत्तर केलें कीं, ते गोष्ट आमचे ध्यानांत आहे. त्याची तजवीज करून लिहून पाठवूं हिंदोस्तानी भाषानें समजाविलें. समजून उत्तर केलें, आपले पत्राचें उत्तर व राजश्री हरिपंत तात्याचें पत्राचें उत्तर ऐसीं दोन्ही थैल्या पाठविल्या आहेत. मुसामुतीन यास पत्र दिल्हें, तेंही पाठविलें आहे.

दिवाण मशारनिल्हे यास आपलें पत्र आज्ञा केली पाहिजे. जातीनें बहुत जळले आहेत. आपले आज्ञे वरून यांनीं पत्रें पाठविलीं आहेत. काय उत्तर येतें तें सेवेसीं लिहून पाठवीन. बहुत काय लिहिणें हे विज्ञापना."

❦ ❦ ❦

## १७. महादजी शिंदे यांचे वैद्य शुकदेव मिश्र.

महादजी शिंदे ह्यांचे वैद्य, शुकदेव मिश्र, ह्यांच्या संबंधाची अल्प माहिती व एक पत्र 'इतिहाससंग्रह' वर्ष ३– अंक १०।११।१२ ह्यांमध्यें ३५ व्या ऐतिहासिक टिपणामध्यें दिलें आहे. ह्याच वैद्यासंबधाचें आणखी एक पत्र उपलब्ध झालें आहे. तें येथें सादर केलें आहे.

श्री.

"सेवेसीं विज्ञापना तागाईत छ ११ माहे सवालपावेतों मुकाम ग्वालेर येथें समस्त मंडळी सुखरूप असों. विशेषः– सुकदेव मिश्र वैद्य गुजराथी हलीं वस्ती झांशी यांसीं राजश्री विश्वासराव लक्ष्मण यांचे कारकीर्दीत अडीच रुपये रोज झांशीचे चौथ्यावर करून दिला. सुकदेव मिश्र यांचे तीर्थरूप, नाथजी मिश्र, हे पहिले जयपुरास होते.

तेथून कांहींक दिवस वोढशाच्या राजापाशीं होते. तेथून झांशीस आले. ते समयीं मशारनिलेनीं वैद्यास रोज करून दिला. येविशींचा भोगवटा मनास आणितां, विश्वासराव याणीं, तहगिरी होणार त्या कालीं वैद्यास रोज करून दिला. भोगवटा सनद पैवस्तगिरीपासून चालला ऐसाही अर्थ नाहीं; आणि तोंडजबानीं मात्र नारो शंकर यांचे कारकीर्दीपासून रोज चालतो ह्मणोन सांगतात. परंतु शोध करतां, आंतील वहिवाट या रीतीची आहे. अलीकडे राजश्री रघुनाथ हरी यांचे कारकीर्दींतही नेहमीं रोजाची वहिवाट वैद्याकडे चालली ऐसेंही नाहीं. हल्लीं रघुनाथ हरी यांणीं मिश्राचे रदबदलीमुळें तीनशें साठ रुपयांची जमीन लाऊन दिली, व पांचशें चाळीस रुपये रोजाबद्दल चौऱ्यावर होते त्याप्रमाणें चालू केले. ऐसें असतां हल्लीं सुकदेव मिश्र, राजश्री माधवराव गंगाधर यांजपाशीं औषध देऊन राहिले आहेत. त्यास वैद्याचें ह्मणणें आहे कीं, आमचा रोज झांशीस आहे; त्यास रोजाचे ऐवजीं गांव इनाम झांशीचे गिर्दीपैकीं देऊन भोगवटीयास सनदा करून दिल्या पाहिजेत. त्याजवरून राजश्री माधवराव याणीं भटजीचे कामाची याद आह्मांकडे पाठविली; आणि सांगितलें कीं, येविशींचा जाबसाल राजश्री पाटीलबावांस पुसोन घ्यावा आणि इनामपत्रें करून द्यावीं. तेव्हां जो गृहस्थ आह्मांकडे वैद्याची याद घेऊन आला, त्याजपाशीं आह्मीं सांगितलें कीं, नवीन गांव नऊशें रुपयांचा इनाम रोजाचे ऐवजीं करून देणें ही गोष्ट आमच्यानें घडणार नाहीं. विना श्रीमंतांचे आज्ञेखेरीज हे जाबसाल करून द्यावयाचे नाहींत. सरकारचीं कामें येथें सर्व होतात, तीं आह्माखेरीज होत नाहींत, किंवा होतात हे अर्थ सर्व समजलेच आहेत. तेव्हां नऊशें रुपयांचा गांव मुत्सद्याचे ह्मटल्यावर करून देणें हें ठीक नाहीं. हें जाणोन स्पष्ट उत्तर केलें. नंतर रावजीनीं राजश्री पाटीलबावांचे कानावर परस्परें गांवचा मजकूर घालून, आह्मांस ताकीद करविली कीं, वैद्याचा भोगवटा मनास आणून गांवची सनद लेहून द्यावी. भोगवटीयाचा मजकूर ह्मणावा तरी वर लिहिलाच आहे. आणि येथें तर प्रसंग या रीतीचा पडतो. प्रसंगीं गोष्ट नाहीं ह्मणावी, तर मर्जी दिक होते. त्यास सरकारकामें चार आमचे हातून विल्हेस लागतीं, तरी इतका तपसील सेवेसीं दरकाविशीं न लिहितों. येविशींची सूचना असावी याजकरितां तपसीलवार विनंती लिहिली आहे. या कार्याविशीं आणखीही गृहस्थ आहेत. तेव्हां आह्मी सनद लेहून दिली तरी स्वामींस लेहून पाठवावें, आणि मिश्र याचे नांवें सनदा आणाव्या, ऐसेंही मानस कितीकांचें आहे. येथील मुख्यांची मर्जी कदाचित् विलगच जाहल्यास सनद लेहून द्यावी लागेल, तरी चिंता नाहीं. परंतु हुजुरून मात्र येविशींचा बंदोबस्त असावा. फार विस्तारें लिहिलें ह्मणोन मर्जी अप्रसन्न सेवकावर न व्हावी. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

❦ ❦ ❦

## १८. मथुरा-वृंदावन.

मथुरा वृंदावन हीं हिंदूंचीं दोन पवित्र क्षेत्रें मराठ्यांनीं आपल्या ताब्यांत घेण्याबद्दल पुष्कळ वर्षें खटपट केली; परंतु हीं क्षेत्रें बरेच दिवस त्यांच्या ताब्यांत

आलीं नाहींत. इ. स. १७८९ मध्यें महादजी शिंदे ह्यांनीं गुलाम कादराचा पराभव करून दिल्लीच्या शहाअलम बादशाहास दिल्ली येथें तक्तनशीन केल्यानंतर बादशाहाकडून त्यांस मथुरा व वृंदावन ह्या दोन पुराणप्रसिद्ध क्षेत्रांच्या सनदा मिळाल्या व तीं दोनीं क्षेत्रें मराठ्यांच्या ताब्यांत आलीं, असें ऐतिहासिक पुराव्यावरून दिसून येतें. वृंदावन क्षेत्र, पेशव्यांचे दिल्ली येथील वकील पुरुषोत्तम महादेव हिंगणे ह्यांनीं, नजबखानाचे वेळीं पूर्वीं एकदां घेण्याचा प्रयत्न केला होता. परंतु तेथें अनुपगीर गोसाव्याचा अंमल असल्यामुळें तें त्यांच्या ताब्यांत आल्याचें दिसत नाहीं. इ. स. १७८९ चें हिंगण्यांचें पुढील पत्र वाचण्यासारखें आहे.

श्री. इ. स. १७८९.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंती ऐसिजे. अनुपगीर गोसावी याजकडे सरंजाम प्रगणे होते. ते त्याजकडून कहाडून सरकारचे कमावीसदार पाठविले आहेत. त्यास मथुरा, वृंदावन हे दोन्ही तालोके सरकारांत आले. राजश्री बापुजी नाईक भावे या दोही स्थळांची मामलत करणार. त्यास ज्या समयीं तीर्थस्वरूप पुरुषोत्तमपंत नानांनीं श्रीमंतांस टीका पातशाहापासून घेतला, त्या समईं टिक्यांत वृंदावन क्षेत्राची जागा, तेथें सरकारचें अन्नछत्र असावें ह्मणोन, रावसाहेबांचे टिक्यांत वृंदावन घेतलें आहे. नवाब नजबखानाची सनदही सेवकापाशीं आहे. त्यास आजपावेतों गोसाव्याची भीड होती, ह्मणून त्याजपाशीं वृंदावन मथुरा होती. आतां तो इतराजींत आहे. ह्मणून सर्व सरंजामीं प्रगणे सरकारांत घेतले. त्यास, मर्जीस आल्यास, यांस लिहून पाठवावें कीं, वृंदावन तों नजीबखानानें सरकारांत दिल्हेंच आहे. मथुरेचीही सनद पातशाहांनीं करून घेऊन, दोन्ही स्थळें सरकारचे कारकुनाचे स्वाधीन करून, अमल करून देवणें. ह्मणून मर्जीस आल्यास लिहावें. येथील प्रकार आढळला तो लिहिला आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे ही विनंति."

❀ ❀ ❀

## १९. दिल्ली व आग्रा ह्या शहरांचे नकाशे काढणारा कर्नल बिरसकूट साहेब.

महादजी शिंदे ह्यांचा मुक्काम इ. स. १७८८ चे सुमारास आग्र्यास असतांना, कर्नल बिरसकूट नांवाचा साहेब, आग्रा व दिल्ली हीं शहरें पाहण्याकरितां गेला होता व त्यानें तेथील नक्षे ह्मणजे नकाशे उतरून घेतले होते, असा दाखला सांपडतो. ह्या कर्नल बिरसकूट साहेबाची व पाटिलबोवांची भेट झाली होती व त्यानें पाटिलबावांस पोषाख वगैरे नजर नजराणा दिला होता. हा बिरसकूट साहेब कंपूचा सरदार असून, त्याच्या बरोबर दुसरे तेरा असामी होते, असा उल्लेख आढळतो.

हा बिरसकूट साहेब कोण? ज्या बातमीपत्रांत हा उल्लेख आहे, तें पत्र येणेंप्रमाणें:—

"फरोकाबादेहून कर्नेल बिरसकूट साहेब कंपूचा सरदार वगैरे तेरा असामी साहेब, आग्र्या-दिल्लीच्या संस्तानचा तमाशा सेर पहावयाकरितां तेथून आग्र्यास येऊन, किल्ला व शहर वगैरे दरोबस्त जागा पाहोन, नक्षा लिहोन घेतला. नंतर मथुरेस दाखल जाले. राजश्री पाटीलबावा दोन कोंस पेशवा जाऊन, इंग्रेज मजकुरास घेऊन आलेत. हत्ती, घोडा, वस्त्रें वगैरे बहुमान केला. परंतु मशारनिल्हेनीं पान खुशबोवर मात्र कबूल केला. वरकड सर्व माघारें दिल्हें. दुसऱ्या दिवशीं राजश्री पाटीलबावा साहेबमजकुराचे डेऱ्यास जाऊन, बहुत शिष्टाचार, वेव्हारच्या गोष्टी व स्तुतिवाद सुज्यातच्या (?) परस्परें जाल्या. इंग्रेज मजकुरांनीं अकरा किस्ती पोशाकी व हत्ती, घोडा, जवाहीर, बंदुख, तमंचे दोन, तरवार, येणें प्रमाणें नजर केले. त्यांपैकीं बंदुख, तरवार, तमंचे व दोन थान विलायती मात्र पसंद करून घेतले. बाकी माघारें दिल्हे. पान खुशबोण घेऊन डेऱ्यास आले. दुसरे रोजीं इंग्रेजांनीं मथुरेचे घाट व यमुनेचा वगैरे सर्व जागां अवलोकन करून, नक्षा लिहून घेतला; व दिल्लीस गेले. नवाब वजीराचे ऐन दहा हजार रुपये नख्त व वजिरांनीं शंभर मोहोरा पातशाहांस नजर, इंग्रेजमजकुराबरोबर पाठविली आहेत. सेवेसीं श्रुत होय. अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

✠ ✠ ✠

## २०. कलकत्तेकर इंग्रज आणि नागपुरकर भोंसले ह्यांचीं राजकारणें.

इ. स. १७८०–८१ मध्यें नागपुरकर भोंसले आणि कलकत्तेकर इंग्रज ह्यांचीं जीं राजकारणें झालीं, त्यांची संगतवार व साधार माहिती उपलब्ध झाली असतां मराठ्यांचे इतिहासांत विशेष प्रकाश पडेल, ह्यांत शंका नाहीं. कलकत्त्यास पेशव्यांचा सेवकराम ह्या नांवाचा बातमीदार होता. त्याचीं कांहीं पत्रें, 'इतिहाससंग्रहा'च्या पहिल्या वर्षाच्या पुस्तकामध्यें 'मराठ्यांचे परराष्ट्रांतील वकील' या प्रकरणामध्यें छापलीं आहेत. त्यांमध्यें वॉरन हेस्टिंग्ज व नागपुरकर भोंसले ह्यांच्या मधील राजकारणांचा थोडासा उल्लेख आला आहे. ह्याशिवाय नारो कृष्ण काळे या नांवाचे इसमाचीं पांच सात पत्रें उपलब्ध झालीं आहेत. त्यांत बरीच मनोरंजक माहिती आढळून येते. हा नारो कृष्ण काळे, नाना फडणविसांच्या बाजूचा इसम असून, तो सातारा जिल्ह्यांतील निंबगोवें येथील राहणारा असावा असें ह्या पत्रांतील त्याच्या उल्लेखावरून दिसून येतें. ह्यानें ता. २८ जानेवारी इ. स. १७८१ च्या पत्रामध्यें वॉरन हेस्टिंग्ज व फ्रान्सिस ह्यांच्या मधील जो

संवाद नमूद केला आहे, तो फारच मनोरंजक आहे. ह्या इसमाचीं आणखी पत्रें उपलब्ध झाल्यास ह्या प्रकरणाची पुष्कळ मनोरंजक हकीकत बाहेर येईल.

## लेखांक १.

श्री. दिसेंबर इ. स. १७८०.

"सेवेसीं विज्ञापना ऐसीजेः- इकडील वर्तमान तरी, नगीनाबाग येथें राहुट्या जाल्याचें वर्तमान सेवेसीं विज्ञापना पेशजीं लिहिलेंच आहे. त्यावरून ध्यानांत आलेंच असेल. अलीकडे तेथून कूच करून करजोडीपार गेले. तेथें दहाबारा दिवस होते. तेथून चार कूचें जाहलीं. तीं अघाडीची पिछाडी याप्रमाणें जाहलीं. हल्लीं छ १२ जिल्हेजीं कूच करून माहानदीचे किनाऱ्यास शहरापासून अडीच कोसावर पडले आहेत. मसल ढेकानालावरून जाऊन त्याचें पारिपत्य करून, पुढें चुटया नागपुराचा मार्ग धरणार ऐसें आहे. त्यास पार होण्यास जिल्हेजीं अखेर होईल. मग तेथून कूच कधीं होईल तें पाहावें. अद्यापि कोणाचीही फौजेंत समजूत पडली नाहीं. व केवळ मसलतीस जाऊन नमूद व्हावें, ऐसेंही चित्तांतून नाहीं. फिरंग्याकडून बेणीराम शिवभद्र याचा भाऊ आला आहे. तोही ठेविलाच आहे. पत्रेंही डाकेवर जातच आहेत. अद्यापि एकही समजत नाहीं. मी कलकत्त्यास पत्र पाठविलें होतें. त्यास सेवकरामानें डाकेवर वेणीरामपंताजवळ दिल्हें. तें त्यानें येथें नाहींसें केलें. त्याजवरून मागाहून कासीद त्याजवळ चांगला शाहणा माणूस होता, तो पाठविला. त्यानें सर्व कच्चें वर्तमान कलकत्त्याचें सांगितलें. त्यास घेऊन भवानीपंताजवळ नेला. त्याणें सांगितलें कीं, पांच साहा पलटणें आहेत. कलकत्ते व मकसुदाबाद वगैरे जागे बजाग्यांत आहे. त्यास दोन हजार फौज समागमें घ्यावी. मीं तुह्मांस बंगाल्यांत घेऊन जातों. वरकडही बहुत सांगितलें. परंतु ध्यानांत न आलें. कासीद चार दिवस ठेवून घेऊन रवाना कलकत्त्यास केला. फिरोनही दुसरा कोणी भला माणूस पाठविला आहे. येथून कासीदजोडी महिन्याचे अंतरें रवाना करावें. त्यास पहिली जोडी जाईल, तेव्हां पासून दस्तक दुसरे रवानगीचे मागत असावें. तेव्हां त्यांनीं ह्मणावें कीं, आमची जोडी जाऊं लागेल, तेव्हां तुह्मीं आपली जोडी लावावी. त्याच्या तों बातन्या पत्र सोळावे दिवशीं, निदान अठरावे दिवशीं, डाकेवर येतात. मग त्यांनीं येथून जोडी कशास पाठवावी? तेव्हां मजला मात्र जोडी रवाना करावयाचें अगत्य. ऐसें करितां दोन महिने त्याजवळ खेपा घालाव्या, तेव्हां एकाधी जोडीस दीड महिना, एकाधीस दोन महिनें, तेही पत्रें तयार करावीं, त्यास दाखवावीं; तेव्हां दस्तक मिळेल. ऐसी येथील वर्तणूक आहे. येथून पांच जोड्या सेवेसीं रवाना केल्या. त्या न पोंचून, उत्तरें व जोडी कांहींच माघारी फिरली नाहीं. एक जोडी पत्रें घेऊन आली. त्यांणीं पत्रें नागपुरास टाकून माघारे गेले. तेवढें पत्र मात्र पोहोंचेल. आलीकडे पत्रें येत असतील तीं नागपुरास टाकून माणसें माघारीं जातात. तरी ती पत्रें एकंदर मजला पावत नाहीं. वस्त्रें उभयतांस आलीं. त्याजहस्तें माझें नांवें पत्र होतें कीं नव्हतें, हें न कळे. सारांश,

यांचे परवानगीशिवाय माझें पत्र येथून रवाना होत नाहीं. जोड्या व मी येथें ऋणाइतादाखल, परमुलखांत पोटाविणें हैराण, व्यर्थ आहें! तें दुःख काय सेवेसीं लिहूं? पेशजीं एक वेळ लिहिलें, त्याचें उत्तर हेंच आलें कीं, जें होणें तें येथूनच होईल. मग काय विनंति ल्याहावी? कासीद रोज कजिया करून नालिस्ता घेऊन जातात. काय विचार करावा? दहा माणसें घरचींही आहेत. शरीरें करून आत्यावस्तेची अवस्ता आहे. असें असोन सेवाचोर! मसलतीस सरकारचे जातात. आणि पत्राचे बंदोबस्त करितात. याविषयीं विनंति दोन वेळां सेवेसीं लिहली. परंतु उत्तर नाहीं. पुढें मसलत हे काय सेवटास नेणार, हें स्वामींच्या ध्यानांतच आहे. जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. मजला चार अक्षरें लिहावयास शक्त नाहीं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २.

पै॥ छ १ मोहरम इहिदे समानिन. **श्री.** २८ दिसेंबर इ. स. १७८०.

"सेवेसीं नारो कृष्ण काळे साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता ॥ छ १५ जिल्हेज पावेतों मुक्काम लष्कर चौधर नजीक कटक अडीच कोस महानदी परतीरीं येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- नगीनाबाग येथील मुक्कामचीं पत्रें ई॥ ता॥ जाहले वर्तमानाचीं सेवेसीं पेसजीं लिहून पाठविलीं. अलीकडील वर्तमान तरी, फौजेची समजोत आजपावेतों केली. गवगवा बहुत होता. आतां समजूत करून कूच करून, चौधारावर मुकाम जाला आहे. येथेंही कांहीं लोकांचा गवगवा थोडा बहुत होता, तोही वारला. आतां मजल दर मजल नेमले मसलतीस जाणार. याप्रमाणें वर्तमान आहे. यापुढें मजल दर मजलीचें वर्तमान लिहित जाईन. फिरंग्याकडील बातमी तरी, त्याणें टाई ठाई नाकेंबंदीस चांगलाच बंदोबस्त केला आहे. काल छ १३ जिल्हेजीं बातमी आली. डेरे बाहेर जाहाल्याचें वर्तमान इंग्रेजांस कळल्यावर मिस्तर प्याज सरदार, सा पलटणें व तोफा व गोरे ऐसे तयारी करून, यांचें तोंडावर येत आहेत. आठा दिवसांत गांठ पडेल, ऐसें आहे. वरकड फौजेंतील घोडीं, उंट, तट्टें, व बाजारचे लवाणीयाचे बैल सुद्धां फार मेलीं. फौजेंत कांहीं हाल राहिला नाहीं. त्यांत पैका नाहीं! याजमुळें लोकांचे समजुतीस महिना दीड महिना लागला. येथील सुभे दरसाल येतात, त्याजमुळें वडोसा प्रांतहो खराब जाला. मोठ्या संकटानें दाहा बारा लाखांची तोड लाऊन, फौजेची समजूत कांहीं थोडें बहुत खर्चास देऊन, समजूत करून, कूच करून मजल दर मजल नेमले मसलतीस जात. याप्रमाणें इकडील वर्तमान आहे. सारांश, राजश्री भवानीपंत आबा यांजवर फौजेचा पेंच भारी पडला आहे. याचा सरीक प्रस्तुत कोणीच नाहीं. आतां मसलतीस गेल्यावांचून परिणामही नाहीं. फौजेचे तों हे हवाल जाहले आहेत. काम पडल्यास आवघे फौजेंतून, पांच हजार फौज जाऊन, दहा कोसांची धावणी करून उलटोन माघारी येईल, ऐसा दम कोणाचेही घोडयामध्यें नाहीं. काम इंग्रेजांसीं. मुलूक ताराज करावा, तेव्हां धावणीचें काम. येथील हवाल तो या प्रकारचा आहे. सारांश, श्रीमंत महाराजांचें पुण्यप्रतापेंकरून यश येईल तें खरें. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

# लेखांक ३.

पै॥ छ ३ सफर. श्री. २८ जानेवारी इ. स. १७८१.

"सेवेसीं नारो कृष्ण काळे साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ १६ जिल्हेजपावेतों मुकाम लष्कर नजीक कटक दोन कोस येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः– कलकत्त्यास पत्रें पाठविलीं म्हणोन पेशजीं विनंति सेवेसीं लिहिली होती. त्याचीं उत्तरें सेवकरामानें बेणीरामपंताजवळ दिल्हीं. तीं पत्रें आम्हांस पावलीं नाहीं. त्याजवरून संशय प्राप्त जाला कीं, सेवकरामाचें पत्र आम्हांपावेतों निभावत नाहीं. मार्ग दुर्घट, बातनी कांहींच कळत नाहीं. त्याजवरून येथील कटकी भला मनुष्य, पत्र न देतां व सेवकरामास न कळतां, मकसुदाबादेपर्यंत पाठविला होता, तो आगोदर आला. मागाहून सेवकरामानें कासीद देवा बल्द थाना जथे न्याहार चंद्र १३ जिल्कादीं पाठविला, तो चौदावे दिवशीं येथें आला. त्याजबरोबर पत्र आलें. परंतु वर्तमान लिहिलें नवतें. जबानीवर हवाला दिल्हा होता. त्यास, त्याची जबानी व या गृहस्थाची बातनी एक जाली कीं, कलकत्ते व मकसुदाबाद सुद्धां अवघ्या बंगालियांत सहा पलटणें आहेत. त्याचा तपशीलः—पांच तोफा व एक पलटण व खासा कर्नेल बेकर साहेब जलेश्वरीं आहे. कलकत्त्यास पलटणें दोन खासा गिलाईस तोफखानेवाला कर्णेल प्याज अवघे पलटणाचा सरदार कलकत्त्यास आहे. कर्णेल कोट फरकाबादेस बडे साहेबानें खजीना मुलकाचा पैसा आणावयास पाठविला होता, तो खजीना रुपये एक कोड पस्तीस लक्ष रुपये घेऊन कलकत्त्यास आला. चार दिवस राहून कोंसल करून, बडे साहेबानें त्यास सिरपाव देऊन मदराजेस बिदा केलें. त्यानें तमाम धोबी व न्हावी वगैरे धरून, दोन चारसे जमाव करून, चारसे गोरे बिलायतेहून आले होते ते घेऊन, चार गलबतें मातबर तयार करून, दारूगोळा व खजीना ऐसे मिळोन एका गलबतावर होता. तें जहाज काळ्या पाण्यावर बुडालें! दुसरें जहाज कलकत्त्याचे किल्ल्याजवळ बुडालें! दोनसें माणूस बाचलें. बाकी गेलें! खासा जर्णल कोट बसला होता. ते व दुसरे गोरीयांचे या दोन्हीचा ठिकाना नाहीं. हें वर्तमान कलकत्त्यास आल्यावर हिष्टीन बहुत घाबरा होऊन, दरबार व कारखाने बंद केले. चार दिवस श्रमी होऊन राहिले. परंतु अद्यापवर दोन्ही गलबतांचा शोध आला नव्हता. हल्लीं कलकत्त्यांत कोंसलांत बसून विचार करणें तरी विलाइतचे पातशाहा याजकडील सरदार फरांसीस साहेब व दुसरे विलाइतकर उलियेर(!) विलायतवाले व पातशाही चाकर कुंपणीकडील हिष्टीन व होगल साहेब, ऐकूण चार मिळोन मसलत करणें ते करतात. हल्लीं कलकत्त्यांतील माल हिष्टीन याणें भुटगांव म्हणोन बदरीकेदारानजीक आहे, तेथें एक हवेली बांधिली आहे. तेथें होगल साहेब यानें नव कोड रुपये नक्त × × × ऐसे घेऊन गेला. त्यास मोठी दहशत बसली आहे. परंतु सरकारी फौज असती तर आजला मोहोरा दाखविला असता. परंतु येथील विचार कांहींच प्रस्तुत घडण्यांत येईलसा वाटत नाहीं. आज दसरियापासून लोकांच्या

समजुता पोटाच्या करतात. त्याचा अद्यापवर ठिकाण नाहीं. सारांश, त्याणें भुरट बलकुबलीस जवळ करावी. त्यास, जाण्याची तजवीज तर नावा सोळा. त्याजवर बसणाराचा बेत, खासा एक व चाकर एक, व बत्तीस आवले, ऐसी डाक शंभरा कोसांवर ठेविली आहे. कलकत्त्याहून चार खासे बडे साहेबाजवळून गोहदेस जावयाकरितां निरोप घेऊन गेले. येणेंप्रमाणें नांवनिसीः—

१ धाकटा मटेटण काशीचा सुभा
१ अंदरसेन साहेब कंपणीचा रिसालदार
१ कनज नेजर बक्षी.
१ थोरला मटेटण कपीतान

४

सदरहू चौघेजण गोहदेस जातो म्हणोन गेले. परंतु दोघे फरकाबादेस गेले. आणि दोघे गोहदेस गेले. कळावें. पेसजीं दोघानीं जुळून मागोन कोंसल करून, बागेंत गोळ्या चालविल्याचे संकलित वर्तमान पेसजीं सेवेसीं लिहिलें होतें. त्याजपैकीं फरासीस साहेब याणें आपली वस्तवानी दरोबस्त विलायतेस लाऊन दिल्ही. आपणहीं मागाहून जाणार. कारण तरी, तो हिष्टीनास ह्मणतो कीं "तुजला बडीसाहेबी कोण्हीं दिल्ही ?" हिष्टीण ह्मणतो कीं, "फरासीस साहेब, आजपावेतों इतका मुलख मी सर केला. हल्लीं मऱ्हाठे बुडवावे ह्मणजे तूं बडीसाहेबी कर." त्यास फरांसीस ह्मणतो कीं, "आजपावितों मऱ्हाठे कोण्ही मोडले नाहींत, आणि आह्मीही मोडीत नाहीं. आह्मी मराठ्याजवळ लढाई घेत नाहीं. पुणेंवाल्यासीं आम्ही बिघाड करणार नाहीं. विलाइतेहून गोरे आणून पातशाहीचा हुकूम घेऊन तुझें पारिपत्य करतों. चिंता नाहीं." ऐसें वर्तमान आहे. सारांश, वकिली बेणीरामपंताची आहे. चोर जिवंत आहेत. कळावें. हें पत्र तानको कृष्ण वकील यांस न समजे तो अर्थ जाला पाहिजे. सेवेसीं श्रुत होय ही विज्ञापना. जबानीचें वर्तमान अन्वय यथास्थित नवता. आणि माझ्यानें लिहिवेना. याजकरितां जसा मजकूर तसा सेवेसीं कळावा म्हणोन विनंतिपत्र वाईट बरें लिहिलें आहे. हे विज्ञप्ती."

## लेखांक ४.

पै॥ छ ३ सफर. **श्री.** २८ जानेवारी इ. स. १७८१.

"सेवेसीं नारो कृष्ण काळे साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ १५ जिल्हेजपावेतों मुक्काम लष्कर नजीक चौधर महानदी परतीर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—स्वामीकडून चार महिने पत्र येऊन सेवकांचा सांभाळ होत नाहीं, तेणेंकरून बहुत चित्त उदास आहे. तरी ऐसे न जाहलें पाहिजे. सदैव आलिया पांथिकासमवेत पत्रद्वारें तरी परामर्ष होई, तो अर्थ घडविणार स्वामी समर्थ आहेत. वरकड मजकूर, श्रीमंत यजमान स्वामींचे पत्रीं येथील मसलतीचा वगैरे यथामती करून आडव्यानीं लिहिला आहे. बसोन लिहावयाचें सामर्थ्य नाहीं. याप्रमाणें

शरीराची आवस्ता! आज चार महिने दुखण्यानें हैराण! दोन दोन वेळां जीवही गेला! परंतु स्वामींचा हात माझे मस्तकीं आहे. याजमुळें हेही दिवस पाहिले! त्यांत भोंसलेशाई लष्कर. कोणी खयात व ममतेनें दोन घटका समाधान करी, अगर जीव घाबरा जाहला तरी धीर तरी देई, तोही अर्थ नाहीं. शरीराची तो हे आवस्ता! प्रारंभीं निघाल्यापासून चार महिने डोळे दुखले! आतां ज्वर आणि दमा तो चालविला ह्मणजे क्षणामध्यें डोळे पांढरे करितो! त्यांत कटकची वस्ती. त्यांत खर्चाची हैराणगत! त्यांत निपुरीस पांच सात जोड्या कासीदाच्या. ते तीन महिने चार महिने रोज कटक करावी. कर्जही सेवटीं मिळेनासारिखें जालें. तेव्हां चार खेडीं केलीं. इजारा सरकारांत न कळतां, तेथें तरी कासीदास आठ पंधरा दिवसाची गुजराण होईल. तेथून रोज कजिये आणावें. याच्या नालीस्ता स्वामीपावेतोंही त्यांणीं केल्या. याप्रमाणें कांडादिक करून आजपावेतों कालाचे दिवस घालविले. खर्चाविशीं पेशजी एक वेळ लिहिलें होतें. त्याचें उत्तर आलें कीं, जें घडणें तें येथूनच घडेल. व एक पत्रीं होतें कीं, राजश्री सदाशिवपंतास सांगितलें आहे. तेंही कांहींच घडलें नाहीं. तो लाचाराचा बयाण लिहितां नये! थोर नांव! पदरीं दहा माणसें शिबंदीचीं. त्यांत चारशें एकावन देत होते. ते या महिन्याचे त्या महिन्यांत! दरमाहा काशीदास दोन रुपये आसामीस पाहिजेत. मोठ्या नांवावर येतां त्यास काय उत्तर द्यावें. बाजार निरखें फजीत जालों. तें कोठवर लिहूं? वरकड या गृहस्थाच्यानें मसलत सिद्धीस जात नाहीं. इंग्रेजांचीं दररोज पत्रें येतात. त्यांच्या भाऊपणांत तिलप्राय अंतर नाहीं. वकील एक बसवून ठेविलाच आहे. खलबतें चाललींच आहेत. मग यांच्यानें त्यांची गोष्ट कसी रगडून सांगवते? आमचें पत्र त्यांचे परवानगीसिवाय निभावत नाहीं. कदाचित् यांचे डाकेच्या भरंशावर पत्र नागपुरीं सरकारचीं माणसें टाकून जातात. मजला एकंदर पावत नाहीं. आबरू राखणें कठीण! सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना. घरचा समाचार नाहीं."

## लेखांक ५.

श्री. १६ मार्च इ. स. १७८१.

"सेवेसीं विज्ञापना ऐसीजे. इकडील फौज नेमलेले मसलतीस जाण्याचा प्रकार तरी इ॥ त॥ जें वर्तमान होतें तें सेवेसीं लिहित गेलों. हल्लीं कटकापासून फिरंगी याजकडील गोरे हमेशा येतच आहेत. आईने व सनगे वगैरे जिन्नस जिनसा हमेश येतच आहेत. पत्रेंही टप्पावर नित्य जात आहे. त्याजवरून राजश्री चिमणाबापूनें कोणा मुत्सद्याचे व भवानीपंताचें हरद्द न घेतां, वेणीरामपंताचे भावासीं बोलोन ठीक केलें कीं, आमचे सिबंदीचा पेंच वारावा लागतो. त्यास बडे साहेबांनीं सांगितलें कीं, तुमची चौथाई तुम्हांस देतों, आणि सिबंदीही वारतों. पुढेंही चौथाई सुरळीत चालवितों. त्यास तुम्ही व आम्ही मिळोन, हैदरखानावर जाऊं. त्याजवरून यांणीं नाद लाविला आहे. त्यावरून हमेशा कागदपत्र खेळतात. हल्लीं इंद्रसेन बंगाल्याचा सुभा पेसजी

एक वेळ येथें आला होता. परंतु चिमणाबापूची गांठ पडली नव्हती. कटकास आम लष्कर ढेकानालावर होतें. त्यांस हिरदेराम दिवाण वडोशाचा व मनाजीपंत या उभयतां जवळ बोलोन चालोन गेला. आतां हल्लीं लष्करांत आला आहे. पलटणें पांच यांचे प्रांतीहून यांचे आंगावरून चेनापट्टणास गेल्यावर पाठीमागून इंद्रसेन आला. त्यानें वस्त्रें व आइने व घडयाळ व पिस्तोल वगैरे नरमिना जिन्नस घेऊन, यांसी मामलत करावयासी आला कीं, बंगाल्यांत फौज येऊं नये. आणि बारा लक्ष रुपये देतों. व पेशजी ढेकानालावर तीन लक्ष दिल्हे. त्यास, हे ऐकत नाहींत. त्यावरून इंद्रसेन बोलला कीं, "बडे साहेबानें मजजवळ सांगितलें. त्याप्रमाणें मी तुम्हांजवळ बोलिलों. तुमचें मागणें जाजती आहे. त्यास, तुम्ही एक आपला गृहस्थ आम्हाबरोबर द्यावा व मीही बडे साहेबांस सांगोन मामलत करतों." त्याजवरून काल फाल्गुन वद्य ६ स राजाराम मुकुंद, देवाजीपंताकडील बडोशांत राहतो, तो व इंद्रसेन त्यास व विश्वंभर यास वस्त्रें वगैरे देऊन रवाना केलें. त्यांनीं जाबसाल पंधरावे दिवशीं करून येऊन, तदनंतर मग हैदरखानावर जाण्याची मसलत होणार. त्यास भवानीपंत ह्मणतो कीं, माझा प्राण गेल्यावर जें होणें तें होऊ. परंतु आलीकडे ही गोष्ट घडूं देणार नाहीं. त्यांतही उभयतांचा एक विचार नाहीं. भवानीपंतासीं व त्यासीं बरकसीच आहे. त्यावरून अशी गोष्ट घडेल तरी जमेल. मुधोजी भोंसल्यांनीं सांगितलें कीं, सिबंदी वारून येणें. तस्मात् तेथून कांहीं शुभ आहे किंवा काय हें न कळे. सारांश, सरकार मसलतीपैकीं कांहींच यांच्यानें घडावें ऐसें दिसत नाहीं. याचा कसकसा विचार असेल तो रा॥ सदाशिवपंतीं स्वामींस लिहिलाच असेल. याप्रमाणें इकडील मजकूर आहे. सारांश, श्रीमंत महाराजांचे पुण्यप्रतापेंकरून जें घडणें तें घडो! इकडील भरवंसा ह्मणावा तरी काडीमात्र दिसत नाहीं. वरकड सेवकाचा मजकूर, खर्चाची अडचण आहे, त्याचा बयान पत्रीं काय ल्याहावा? त्यांत येथें कांहीं कामाकाजामुळें माझें अगत्य किंचित् असावें. तरी वस्त्रें दसरियाचीं आलीं तीं परभारें मजला ठाऊकही नाहीं! व पत्रही नाहीं! शिक्के आले तेही राजश्री सदाशिवपंतांनीं त्याचेच खिजमतगाराबरोबर पाठविले. त्याजबरोबर आपली एक जोडीही दिल्ही होती. मजला पत्रही होतें. परंतु शिक्क्याचा मजकूर काडीमात्र मजला लिहिला नाहीं व कळोंही दिल्हा नाहीं. तेव्हां मी बारासें कोसावर येऊन हैराण होऊन व्यर्थ, असें जाहालें! त्यांत आणखी येथून मी सेवेसीं पत्रें लिहितों, ते लखोटे नागपुरास फोडून पाहतात. तेव्हां हे आज्ञाच सरकारांतून आहे, किंवा मध्येंच आहे, हेंही समजत नाहीं! येथें तों भोंसल्याचे घरचा प्रकार! त्यांत चिमणाबापूजवळ राहाणें! कोणा मुत्सद्यासीं व त्यासीं बनत नाहीं. त्याजवरून मसीं बनेल न बनेल, हें सर्व स्वामींचें ध्यानांतच आहे. तरी असीच मर्जी स्वामींची असल्यास कर्जाचें वोझें डोईवर करून, राहावयाचें कारण काय आहे? घरींही माणसें अन्नास महाग जाहलीं. त्याचेंही पत्र आलें. ऐसे अस्वस्थेंत आहे. ही गिराणी स्वामीशिवाय परिहार करणार

दुसरा कोण आहे? आणि कोणास लिहावी? येथें आज तीन महिने ऐक पैसाही कोणी देत नाहीं, आणि कर्जही मिळत नाहीं. ऐसी तकलफींत आहे. सर्व पार पाडविणार स्वामी समर्थ आहेत. देशीं मौजे गोवें नजीक निंब येथें वे॥ राजश्री रामभट गाडमीळ यांचे शेजारीं मुलें माणसें आहेत. तीं अन्नाविणें उपासीं मरतात! ऐसी गत आहे! माझे कोणी येऊन साहेबांस खर्चाविसीं विनंति करावी, तरी कोणी नाहीं. आणि कामगिरी या प्रकारची. स्वामींचे पायाकडे पाहून येथें राहावें इतका मात्र अर्थ आहे. कळावें. सेवेसीं श्रुत होय ही विज्ञापना. अन्वयांतील प्रायः कोठें श्रुत जाल्यास माझा प्राण वांचत नाहीं ही विज्ञापना. चौकडा कासीद पंचेचाळसा दिवसांत पावल्यास पंचवीस रु॥ करार केले आहेत."

## पुरवणी.

"पुरवणी सेवेसीं विज्ञापना ऐसीजेः–कलकत्त्यास गृहस्थ रवाना जाले आहेत. त्यास येथून सांगणें आहे कीं, पन्नासपर्यंत जाल्यास सामिलतेचा प्रकार घडत नाहीं. ते न घडल्यास कदाचित् निश्चयांत आल्यास चौकडा कासीदपत्र सेवेसीं लिहून तारखेनेंच सेवेसीं रवाना करीन. साहेबांची आज्ञा कीं, कचें वर्तमान ल्याहावें. त्याजवरून ऐकण्यांत आलें तें अर्जी लिहिलें आहे. माझा सर्व अभिमान साहेबांस आहे. माझा वगवसीला साहेबास अर्ज करावयासी कोणीच नाहीं. येथें प्राण रक्षण करणार साहेब धणी समर्थ आहेत. राजश्री भवानीपंत यांस सरकारचें पत्रें दिल्हें. उत्तर मागूं लागलों, तेव्हां बोलले कीं, "उत्तरांत काय ल्याहावें? व बापुसाहेबास पत्रें आहेत, त्याचें उत्तर काय लिहावें तें तुह्मीं सांगणें. त्याप्रमाणें लिहून देतों." त्याजवरून मी बोलिलों कीं, "मीं काय सांगावें? सर्व मसलतीचा भार आपणावर आहे. ऐसी खातरजमा तेथील आहे. आणि आपण ऐसें बोलतां, तेव्हां विनंति काय करावी? बरें, चार दिवशीं उत्तरें देऊं." त्यास पत्रें लौकर हातास येत नाहींसें जाहलें. तेव्हां सांगितलें कीं, उत्तरें मागाहून पाठवितां येतील. हें काम जरूर. त्यावरून मागाहून सेवेसीं लिहून घेऊन पाठवितों. साहेबीं तपशीलवार उत्तरें लिहावयासीं आज्ञा करावी. येथें मन मानेशा आवया उठतात व मजलाही पुसतात. त्याजकरितां तपशीलें ल्याहावयाची आज्ञा जाहली पाहिजे. सेवेसीं निवेदन व्हावें. हें विज्ञापना. पाटीलबावाकडून कृष्णाजी बाबूराव कारकून कलकत्त्यास आला होता. तो काल येथें आला आहे. कोणत्या विचारानें येथें आला आहे त्याचा शोध करून, मागाहून तपशीलवार लिहून पाठवीन. हे विज्ञापना."

पै॥ छ ८ जमादिलावल इहदेसमानिन **लेखांक ६.**

आवशीची सा घटका रात्र ह॥ काशीद. **श्री.** ३ मे इ. स. १७८१.

"सेवेसीं नारो कृष्ण काळे त्रिकाल चरणांवर मस्तक ठेवून शिरसाष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ० १६ रविलावलपावेतों मुकाम लष्करनजीक बंदर बालेसर येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–इकडील फौज नेमले मसलतीस

नमूद होण्याचा प्रकार तरी फौजेचा गळाठा फार आहे. हा पेशजींपासून सेवेसीं विनंति लिहितच गेलों. त्या अलीकडेही घोड्याचा टबका नित्यांनीं लागलाच आहे असेंही असतां कामकाज न होतां, क्रोडो रुपयांचा पेंच आला. तेव्हां मसलतीस नमूद होणें प्राप्तच आहे. त्यास, पत्रें तों सरकारचीं येतात कीं, मुलूख जाळून लुटून ताराज करावा. मुलूख जाळल्या लुटल्यानें क्रोडो रुपयाचा पेंच शिबंदीचा वारतो, ऐसाही अर्थ नाहीं. पेंचही सोसून मसलत करावी, तरी फौजेंत कांहीं जीव नाहीं. मुलूक जाळल्या लुटण्यास घोड्यांत बल पाहिजे. धावणी करावी लागते. त्यांत अंग्रेजांचें घरांत शिरणें कठीण! तेंही असोन फौजेस पैसा नाहीं. नित्य उपास पारणीं आहेत! पैशास ठिकाण नाहीं! तेव्हां लाचार जालों! ऐसेंही असतां राजे रजवाडे यांजकडून लाख दोन लाख रुपयांची हर कसी तोड लाऊन, एक रोजमुरा देऊन अंग्रेजांचा मुलूख ताराज करावा म्हणोन ढेकानालास आलों. तेथें मोर्चे लावून ठाणें हस्तगत केलें. तेथेंही कांहीं प्राप्त न जाहलें. तों इतकियांत कलकत्त्याहून पांच पलटणें चेनापट्टणचे कुमकेस जावयासी खुसकीचे वाटेनें याच मुलखांतून बडे साहेबांनीं रवाना केलीं. मजल दर मजल बालेसर बंदरानजीक आलीं. तेव्हां फौज जाऊन बंदरानजीक चार कोसांवर पडली. तेव्हां शहास गुंतले. माघेर फिरतां नये. फौजेंत हवाल ह्मणावे तरी अंग्रेजांसीं लढाई घेऊन, नक्ष करून दाखविणें हा तो अर्थ पूर्वींपासोन स्वामींचे ध्यानांतच आहे. तेव्हां संकट पडेल, त्यास वाट द्यावी किंवा काय करावें? सर्व फौजेचें अंतर शोधून पाहिलें, तों पंधरा सोळा हजार फौजेंत चांगला घोडा राऊत पांच हजार तोंडावर जावयासीं धडधडीत निघत नाहीं. तेव्हां विचार केला कीं, यांजवळ तोफा व बारूद गोळी वगैरे सामान पोख्त आहे. लढाईस तों उभें राहावयाचें सामर्थ्य नाहीं आणि पुढील मसलत बंगाला मारून जाळून ताराज करावा, तरी प्रस्तुत येथेंच कलागत वाढते. तेथवर जाणेंही घडत नाहीं. तेव्हां हीं पलटणें पुढें आलीं आहेत, त्यांस वाट दिल्यानें घाटनाकें मोकळें होऊन, बंगाल्यांत शिरावयासी गुंता पडणार नाहीं. तेव्हां यांस मार्ग देणें प्राप्त जाला. त्याजवरून फौजेचें कूच होऊन, माघारे वाट सोडून तीन कोसांवर मुक्काम केला. त्यांनीं कूच करून मजल दर मजल पुरीपावेतों पोंहोचऊन बहाराचीं माणसें आलीं, तें चिलका पार जाल्यावर फौजेची समजोत करून नेमले मसलतीस जावें, ऐसें आहे. येथून इंग्रेजांचा मुलूक नजीक बारा कोस आहे. याप्रमाणें इकडील वर्तमान आहे. सेवेसीं निवेदन व्हावें. यापुढें जो मजकूर होईल, तो वरचेवर सेवेसीं लिहित जाईन. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

❧ ❧ ❧

## २०. अंजनवेलसंबंधीं माहिती.

(कृ. वि. आचार्य.)

अंजनवेल येथील अमल मराठ्यांकडे असतां, तो किल्ला अंबरखान हबसी

(सिद्दी) यानें शके १६२२ मध्यें घेतला. शामल (शिद्दी) ह्यांचे कारकीर्दीत येथें अमलदार झाले त्यांचीं नांवें:—

| | | |
|---|---|---|
| १ हिरोजी अंताजीराव दळवी | वर्षें | ५ |
| २ धर्म सांवत | ,, | १ |
| ३ शेख याकूब | ,, | ६ |
| ४ तुळाजीराव निडलीकर | ,, | ३ |
| ५ खंडोजी नाईक गायकवाड | ,, | ४ |
| ६ शिद्दी साद सुभेदार किल्लेदार | ,, | ६ |
| ७ शिद्दी सय्यद बाढले? | ,, | ८ |
| ८ शिद्दी सय्यद अमलगास | ,, | १ |
| ९ शिद्दी याकूब अखैरी | ,, | ९ |
| ९ | | ४३ |

याप्रमाणें नऊ अमलदारांनीं त्रेचाळीस वर्षें अमल केला. पुढें हबशी याजपासून किल्ला अंजनवेल तुळाजी आंग्रे यांणीं शके १६६६ त घेतला. ती मिती माघ शु॥ ४ बुधवार रक्ताक्षीनाम संवत्सर सन खमस अर्बैन मया व अल्लफ.

आंग्रे यांचे कारकीर्दीत अमलदार झाले त्यांचीं नांवें:—

१ बुबाजी नाईक व नारो वासुदेव
२ मोत्याजीराव विचारे व राघोबा सावंत
३ सखोजी साठम
४ केसो त्रिंबक धामणकर
४

आंगरे ह्यांजकडे तालुका अंजनवेल सुमारें अकरा ११ वर्षें होता. त्यानंतर मराठी राज्यांत पेशव्यांचें प्राबल्य झालें. त्यांच्या आड जे जे सरदार आले त्यांस जिंकून आपला अम्मल पक्का करण्याकरितां बाळाजी बाजीराव ऊर्फ नानासाहेब यांनीं जे प्रयत्न केले; त्यांत आंग्रे यांचें सामर्थ्य कमी करण्याचा जो त्यांनीं प्रयत्न केला, तो महाराष्ट्राच्या इतिहासांतील फार ठळक गोष्टींपैकी एक होय. ह्या करण्यानें नाना साहेब पेशव्यांचा अमल कोंकण प्रांतावर बसला खरा, परंतु मराठ्यांच्या आरमाराचें सामर्थ्य तेव्हां पासून जें कमी झालें तें पुन्हां पूर्वस्थितीवर कधींही आलें नाहीं.

पेशव्यांनीं अंजनवेल आंग्र्यापासून शके १६७७ युवानाम संवत्सर पौष शु॥ १४ रोजीं घेतली. त्यांच्या कारकीर्दीत झालेल्या अमलदारांची नांवें.

१ कानोजी ताजणे हवालदार निसबत रामाजी महादेव
२ चिमाजी माणकर
३ गणेश कृष्ण कोल्हटकर.
४ चिमाजी माणकर (पुन्हा)

५ कृष्णाजी विश्वनाथ बर्वे सुभेदार कारभारी आबाजी बल्लाळ फडके शके १७०१ पावेतों.
६ त्रिंबक कृष्ण बर्वे शके १७११ पावेतों
७ रघुनाथ त्रिंबक बर्वे
८ बाळकृष्ण बापूजी लेले.
९ रघुनाथ त्रिंबक बर्वे (फिरून)
१० बाळकृष्ण बापूजी लेले (फिरून)
११ विठोजी नाईक गायकवाड कारभारी गोविंदपंत घारे
१२ विठ्ठल विश्वनाथ पटवर्धन कारभारी अंताजी केळकर
१३ परशुराम केशव ओक
१४ नारो गोविंद आपटी कारभारी दिनकरपंत गोडबोले
१५ गंगाधर बाळकृष्ण मराठे
१६ येसाजी पवार हुजरे बाजीराव साहेबांचे
१७ जनार्दन नारायण देशपांडे
१८ रामचंद्र यशवंत नगरकर कारभारी बळवंत दात्ये व त्रिंबक कृष्ण उदगीर सन समान अशर मयातैन व अल्लफ वैशाख वद्य १३ पावेतों. पुढें किल्ला इंग्रेज बहादूर यांणीं घेतला.

याप्रमाणें नानासाहेब यांनीं अंजनवेल घेतल्यापासून इंग्रेजांचे हातीं जाईपर्यंत अमलदार झाले.

❋ ❋ ❋

## २१. दाभोळची कांहीं माहिती.

(कृ. वि. आचार्य)

मुस्तफाबाद ऊर्फ दाभोळ प्रांत कोंकण येथें मुसलमानी अमलांत व मराठ्यांच्या अमलांत कोण कोण अमलदार झाले त्यांची यादीः—

मुसलमानी अमलांतील.

१ मुस्तफाखान
२ हमजाखान
३ खुरासानेखान गैबती पटाईत
४ मुरादखान गैबती दिवाण
५ चीजखान सरनोबत
६ शेख अल्ली हवालदार
७ अफजलखान दिवाण खास मजालसी
८ बडेखान खास मजालसी
९ मीर अहंमदखान दिवाण खास मजालसी

---

Published by Tukaram Javaji, Proprietor N. S. Press,
23, Kolbhat Lane, Bombay.

---

Printed by B. R. Ghanekar at the Nirnaya-Sagar Press,
23, Kolbhat Lane, Bombay.

Ken

# इतिहाससंग्रह.

धर्मार्थकाममोक्षाणामुपदेशसमन्वितं ।
पूर्ववृत्तं कथायुक्तमितिहासं प्रचक्षते ॥ १ ॥

संपादकः—दत्तात्रय बळवंत पारसनीस, सातारा.

पुस्तक ४ थें.] मे, जून, जुलई १९१२. [अंक १०।११।१२.

## विषयानुक्रम.



मुंबई येथें
तुकाराम जावजी ह्यांनीं
'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.

वार्षिक वर्गणी ट. ह. सह ४ रु.
फुटकळ अंकाची किं. ट. ह. सह ६ आणे.

# सूचना.

'इतिहाससंग्रहा'चें चवथें वर्ष परमेश्वराच्या कृपाप्रसादानें पुरें झालें ह्याबद्दल त्या जगन्नियंत्याचे अत्यंत नम्र भावानें आह्मी अतिशय उपकार मानितों.

चालू वर्षामध्यें इतिहाससंग्रह प्रतिमासीं प्रसिद्ध न करितां, सर्व अंक तीन तीन महिन्यांच्या जोडअंकानेंच प्रसिद्ध करावे लागले! त्याचप्रमाणें ५ व्या वर्षाचेही अंक जोडअंकाच्या रूपानेंच प्रसिद्ध करून तें वर्ष पुरें करण्यांत येईल. आणि इ. स. १९१३ आगष्टपासून ह्मणजे ६ व्या वर्षापासून 'इतिहाससंग्रहां'त बरेच नवीन फेरफार करून तो अधिक सुंदर व मनोरंजक करण्यांत येईल. प्रिय आश्रयदात्यांनीं त्यास उदार आश्रय देऊन आज चार वर्षें त्याची सेवा जशी मान्य करून घेतली, त्याप्रमाणें ते पुढेंही त्यावर आपली कृपादृष्टि ठेवतील अशी पूर्ण आशा आहे.

चालू वर्षामध्यें "तंजावरचें राजघराणें" हें स्वतंत्र प्रकरण समाप्त झालें आहे. त्याचप्रमाणें "दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारणें" ह्या महत्वाच्या प्रकरणाचा पहिला भाग संपूर्ण प्रसिद्ध झाला आहे. पुढील वर्षामध्यें त्याचा दुसरा भाग संपूर्ण प्रसिद्ध होईल.

रा. रा. राजवाडे ह्यांनीं संशोधिलेले शिवकालीन कागदपत्र 'इतिहाससंग्रहां'त प्रसिद्ध करण्यासाठीं त्यांनीं मोठ्या कळकळीनें आमच्याकडे पाठविले आहेत. त्यांपैकीं शिवकालीन पत्रव्यवहाराचें एक प्रकरण गेल्या वर्षामध्यें प्रसिद्ध करण्यांत आलें आहे व दुसऱ्यास प्रारंभ केला आहे. यापुढील प्रकरणेंही यथावकाश हातीं घेण्यांत येतील. ह्याशिवाय श्रीमंत सरदार मुजूमदार ह्यांच्या दप्तरांतील पत्रव्यवहार क्रमवार प्रसिद्ध करण्यास लवकरच सुरवात होईल.

चालू अंकामध्यें छापलेलें खंडेराव हरी ह्यांचें चित्र रा. ब. बाळकृष्ण आत्माराम गुप्ते, कलकत्ता, ह्यांनीं शोधून पाठविलें, व तें प्रसिद्ध करण्याबद्दल 'व्हिक्टोरिया मेमोरियल हाल'च्या ट्रस्टींनीं कृपा करून परवानगी दिली, ह्याबद्दल त्यांचे फार उपकार आहेत.

# १२. खंडेराव हरी.

## ( महादजी शिंद्यांचे सेनापति व दिल्लीचे किल्लेदार. )



महादजी शिंदे ह्यांनीं उत्तर हिंदुस्थानामध्यें मोठमोठे पराक्रम करून मराठ्यांची सत्ता संस्थापित केली, त्यांस या कामीं ज्या अनेक शूर पुरुषांचें साहाय्य झालें, त्यांचीं नांवें देखील इतिहासांत संपूर्ण प्रसिद्ध नाहींत. मग त्यांच्या चरित्रांची गोष्टच बोलावयास नको. महादजी शिंदे ह्यांच्या रणशूर सेनापतींपैकीं 'जिवबादादा बक्षी ह्यांचें चरित्र' अलीकडे प्रसिद्ध झालें आहे व त्यामुळें त्यांची बरीच माहिती इतिहासवाचकांस श्रुत झाली आहे. महादजी शिंदे ह्यांच्या हाताखालीं ज्या शूर पुरुषांनीं आपलें रणशौर्य व्यक्त करून, मराठ्यांची राजसत्ता उत्तर हिंदुस्थानामध्यें संस्थापित करण्याचें कामीं अतोनात श्रम केले व आपल्या अंगचे अलौकिक गुण प्रदर्शित करून इतिहासांमध्यें आपलें नांव अजरामर केलें, असे रणशूर योद्धे ह्मटले ह्मणजे राणेखान भाई, अंबोजी इंगळे, खंडेराव हरी, गोपाळराव भाऊ, हैबतराव फाळके, रायाजी पाटील, बापू शिंदे, धारराव शिंदे इत्यादि अनेक मराठे व ब्राह्मण सरदार होत. ह्यांचीं चरित्रें अतिशय महत्वाचीं व मनोरंजक आहेत. त्याप्रमाणेंच ह्यांच्याच बरोबरीनें रणांगणावर प्रसिद्धीस आलेले युरोपियन योद्धे, जॉर्ज टॉमस, डि बॉयन, पेरन, इत्यादि प्रमुख होत. त्यांचीं चरित्रें महादजी शिंदे ह्यांच्या चरित्रांत अंतर्भूत होण्यासारखीं आहेत. ह्या वर निर्दिष्ट केलेल्या शूर पुरुषांची माहिती संशोधन करून 'इतिहाससंग्रहांत' प्रसिद्ध करण्याचा आमचा मानस आहे. ह्या कामीं अस्सल कागदपत्र फारसे उपलब्ध होण्याची आशा नाहीं. तथापि आमच्याजवळ असलेल्या कागदपत्रांतून व इंग्रजी ग्रंथांतून त्यांची जी अल्प माहिती आढळून येते, तेवढी येथें संक्षेपेंकरून देण्याचा आह्मी प्रयत्न करीत आहों. ह्या प्रयत्नाचे योगानें या शूर योद्ध्यांची अधिक माहिती कोणास उपलब्ध झाली, तर ती आह्मी मोठ्या आनंदानें 'इतिहाससंग्रहांत' प्रसिद्ध करूं.

खंडेराव हरी हे शिंद्यांच्या प्रमुख सरदारांपैकीं एक होत. ह्यांचें संपूर्ण नांव काय होतें तें समजत नाहीं. शिंद्यांच्या कागदपत्रांमध्यें त्यांचें नांव खंडेराव हरी किंवा खंडेराव आपा असेंच लिहिलेलें आढळतें. 'खंडेराव आपा' ह्या नांवावरून इंग्रज लेखकांनीं त्यांचा उल्लेख 'आपा खंडेराव' असा केलेला आढळतो. खंडेराव हरी हे महादजी शिंदे ह्यांच्या पदरीं नोकरीस केव्हां राहिले, हेंही समजत नाहीं.

त्यांचा अगदीं पहिला उल्लेख इ. स. १७८० पासून आढळतो. इ. स. १७८० मध्यें इंग्रज, गोहदकर राणा, व शिंदे यांचें जें युद्ध चालू होतें, त्यामध्यें खंडेराव हरी हे शिंद्यांच्या बाजूनें लढत होते. परंतु ह्या लढाईत गोहदकराची सरशी होऊन त्यानें ग्वाल्हेरचा किल्ला हस्तगत केला. त्यामुळें खंडेराव हरी हे ग्वाल्हेर प्रांत सोडून झांशी प्रांतांत व कोंच काल्पीकडे लूट करावयास व पोट भरावयास गेले. इ. स. १७८० पासून इ. स. १७८३ पर्यंत गोहदकर राणा व महादजी शिंदे यांचें युद्ध चालू होतें. ह्या युद्धामध्यें खंडेराव हरी यांनीं पुष्कळ पराक्रमाचीं कामें केलीं, हें उघड आहे.

इ. स. १७८५ मध्यें महादजी शिंदे हे दिल्लीच्या बादशाहांस मदत करण्यासाठीं दिल्लीकडे गेले. त्या वेळीं त्यांनीं आग्र्याचा किल्ला घेण्यासाठीं रायाजी पाटील यांचेबरोबर खंडेराव हरी यांची योजना केली. या समयीं खंडेराव हरी यांनीं चांगली मेहनत केली. इ. स. १७८५ मध्यें महादजी शिंदे ह्यांनीं दिल्लीच्या बादशाहांस अंकित करून दिल्ली येथें मराठ्यांचें वर्चस्व प्रथम संस्थापित केलें. ह्या प्रसंगीं जीं अनेक राजकारणें झालीं व जे युद्धप्रसंग घडून आले, त्यांमध्यें अंबोजी इंगळे, खंडेराव हरी व रायाजी पाटील यांचीं नांवें प्रमुखत्वेंकरून दिसून येतात. ह्यानंतर खंडेराव हरी हे कांहीं दिवस भेलसे प्रांताचे कमाविसदार होते. तेथून पुढें त्यांची योजना बुंदेलखंडांतील संस्थानिकांचा बंदोबस्त करण्याचे कामीं झाली.

इ. स. १७८६ मध्यें खंडेराव हरी बुंदेलखंडांत रवाना झाले. त्या वेळीं पन्ना संस्थानचा राजा हिंदुपत हा मृत्यु पावून, त्याच्या गादीबद्दल त्याच्या मुलांमध्यें तंटे उत्पन्न झाले होते. तेथील दिवाण बेणीहुजुरी हा प्रबल होऊन त्यानें सर्व सत्ता आपल्या हातीं बळकाविली होती. त्याचा प्रतिपक्षी, कलिंजरचा सुभेदार कायमजी चौबे, हा दुसऱ्या मुलाचा पक्ष घेऊन, बेणीहुजुरी याजबरोबर युद्धास सिद्ध झाला होता. "खंडेराव हरी बुंदेलखंडांत रवाना झाले. ते दरकूच जात असतां, अगोदर बेणीहुजुरी पर्णेवाला व गुमानसिंग चरखारीवाला एक होऊन, कालिंजर गडासीं भांडत होते. तेथें दाल गळली नाहीं. मग मनसबा करून दोघेहि बांधेकर गुमानसिंगाचे पुत्र, मधुकर साहावर, बेणी व गुमानसिंग चालून गेले. बांधेकर मोठे मजबूत आहेत. ते बाहेर निघाले. युद्ध केलें. त्यांत तोफेचा गोळा लागून गुमानसिंग मारला गेला. फत्ते बांधेवाल्यांची जाली. बेणी व खुमानसिंगाचा पुत्र, पर्ण्यास गेले. नंतर खंडेराव हरी बुंदेलखंडांत पावले." खंडेराव हरी यांणीं पर्ण्यावर चाल करून बेणीहुजुरी याजला खंडणी मागितली.

प्रथमतः त्यानें खंडणी देण्याचें मान्य केलें. परंतु एक महिन्यांत खंडणी न मिळाल्यामुळें खंडेराव हरी व बेणीहुजुरी यांची पुनः कटकट होऊन झुंज झालें. शेवटीं बेणीहुजुरी पळून गेला. तोफखाना वगैरे जिन्नस व पर्ण्याचा किल्ला खंडेराव हरी यांचे हातीं लागला. हें विजयाचें वृत्त खंडेराव हरी यांनीं श्रीमंत पाटिलबावा यांस कळविलें. पाटिलबावा यांनीं, आपल्या रणशूर सरदारानें बुंदेलखंडांत स्वारी करून पर्ण्याचा किल्ला हस्तगत केला, ही आनंददायक बातमी बादशाहांस एकशें एक मोहरा नजर करून सादर केली. बादशाहांनीं महादजी शिंदे यांस व श्रीमंत पेशवे यांस बहुमानाचा पोषाख देऊन ह्या पराक्रमाबद्दल पाटिलबावांस नौबतखाना वाजविण्याची परवानगी दिली.

खंडेराव हरी यांनीं पर्ण्याचा किल्ला हस्तगत केल्यानंतर कलिंजरावर स्वारी केली. आणि पर्ण्याच्या राजाचा दुसरा मुलगा,—जो तेथील किल्ल्याचा आश्रय धरून प्रमत्त झाला होता,—त्यास नतीजा देऊन, किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. नंतर पुढें बाळाजी गोविंद बुंदेले हे मध्यस्थ होऊन, त्यांनीं खंडेराव हरी ह्यांस पस्तीस लक्ष रुपये खंडणी देऊन पर्ण्याच्या राजाचा तंटा आपसामध्यें मिटविला. पर्ण्याच्या गादीचा मालक ढोकळसिंग ह्यानें दोन हिस्से खंडणी देण्याचें मान्य केलें. तिसरा हिस्सा सरजेतसिंग यानें द्यावा असें ठरलें. ढोकळसिंगाची निशा बाळाजी गोविंद यांचे विद्यमानें ठरली. ह्यानंतर खंडेराव हरी हे कलिंजराहून कूच करून ओढशास आले व त्यांनीं तेथील राजापासून दीड लक्ष रुपये खंडणी घेतली. नंतर ते दतियास आले व तेथील राजाकडे खंडणीबद्दल जाबसाल लाविला. दोन लक्ष रुपये खंडणी द्यावी किंवा सेंवढा किल्ला खाली करून द्यावा अशी अट घातली. त्याप्रमाणें लवकरच राजानें कबूल केलें. ह्याप्रमाणें खंडेराव हरी यांणीं बुंदेलखंडामध्यें महादजी शिंदे यांचा चांगला अंमल बसविला.

खंडेराव हरी बुंदेलखंडांतील राजकारणांत गुंतले असतां इ. स. १७८७ मध्यें जयपुरचा राजा प्रतापसिंग व महादजी शिंदे यांची लढाई सुरू झाली. तेव्हां पाटिलबावांनीं खंडेराव हरी यांस दहा हजार सैन्यानिशीं युद्धास येण्याबद्दल आज्ञा केली. त्याप्रमाणें खंडेराव हरी हे बुंदेलखंडांतील कार्यभाग आटोपून जयपुरच्या मोहिमेवर जाऊन हजर झाले. जयपुरचा राजा प्रतापसिंग हा, जोधपुरचा राजा भीमसिंग राठोड व महंमदबेग हमदानी ह्यांचें सहाय्य घेऊन मराठ्यांशीं युद्ध करण्यास सिद्ध झाला. मराठ्यांच्या वतीनें राणेखानभाई, अंबोजी इंगळे, खंडेराव हरी व शिवाजी विठ्ठल असे नामांकित सरदार आपआपल्या सैन्यांनिशीं युद्धास सिद्ध होते. ता. २८ जुलै इ. स. १७८७ रोजीं भीमसिंग राठोड व

महंमदबेग हमदानी यांच्याशीं मराठ्यांचें जें निकराचें युद्ध झालें, त्यांत खंडेराव हरी व रायाजी पाटील यांनीं पराक्रमाची शर्थ केली. ह्या युद्धांमध्यें भीमसिंग राठोडाचा मेहुणा सोभाराम भंडारी हा मृत्यु पावला व शत्रूकडील पुष्कळ लोक रणांगणीं पडले व जखमी जाले. अशा रीतीनें राठोडांचा पराभव होऊन मराठ्यांस जय आला. परंतु दुसरीकडे आठ कोसांच्या अंतरावर लालसोट येथें पाटिलबोवांचें लष्कर होतें, तें बेदिल होऊन मोठा दंगा झाला; व तेथून पाटिलबावांस पिछेहाट करणें भाग पडलें. नंतर पाटिलबोवांनीं आपलें बरेंच सैन्य व तोफा वगैरे अवजड सामान ग्वाल्हेरीस पाठविलें. ह्या वेळीं रजपूत, रांगडे व रोहिले एक होऊन, त्यांनीं मराठ्यांना दिल्लीच्या राजकारणांतून काढून देऊन आपलें वर्चस्व बादशाही दरबारांत स्थापण्याचा प्रयत्न केला. ह्या वेळीं महादजी शिंदे यांनीं ग्वाल्हेर प्रांताचा उत्तम बंदोबस्त करून, व जाट वगैरे संस्थानिक अनुकूल करून घेऊन, आपल्या फौजेची चांगली तयारी केली.

इ. स. १७८७ चे अखेरीस, खंडेराव हरी हे, ग्वाल्हेर, गोहद, भिंड, भदावर अटेर वगैरे प्रांताचे कमाविसदार असून, त्यांनीं दहा लक्ष रुपये मामलतीबद्दल पाटिलबावांस दिले होते, असा दाखला सांपडतो. त्यावरून त्या अडचणीच्या प्रसंगीं पाटिलबावांनीं खंडेराव हरीसारख्या शूर सरदाराची ग्वाल्हेर प्रांताच्या बंदोबस्तासाठीं योजना केली होती असें दिसतें. खंडेराव हे दोन वर्षें ग्वाल्हेर प्रांतांत होते. परंतु पुढें सैन्याचा खर्च विशेष वाढून, रसदेचा भरणा वेळेवर होईनासा झाल्यामुळें त्यांचें व पाटिलबावांचें मध्यंतरीं वितुष्ट आलें. परंतु त्यांनीं पैक्याची व्यवस्था करून व सैन्याची जमावाजमव करून पाटिलबावांची मर्जी संपादन केली. इ. स. १७८८–८९ मध्यें दिल्ली येथील गुलाम कादर रोहिल्याचें बंड मोडून सर्व बादशाही प्रांत रोहिल्यांचे ताब्यांतून हस्तगत करण्याचे कामीं महादजी शिंदे यांस खंडेराव हरी ह्यांची चांगली मदत झाली. त्यांनीं आग्र्याचा किल्ला घेण्याचे कामीं चांगले परिश्रम केले. त्याचप्रमाणें दिल्ली प्रांतींही पुष्कळ कष्ट व मेहनत केली. ह्या सर्व परिश्रमाबद्दल दिल्लीची बादशाही हस्तगत झाल्यानंतर महादजी शिंदे ह्यांनीं खंडेराव हरी ह्यांस रेवाडी प्रांतीं बावीस महालांची मामलत सांगितली. खंडेराव ह्यांच्या पराक्रमाबद्दल पाटिलबावांची त्यांच्यावर इतकी सुप्रसन्न मर्जी झाली कीं, त्यांनीं त्यांस दिल्लीच्या किल्लेदारीचीं बादशाहाकडून इ. स. १७९० मध्यें वस्त्रें देवविलीं. ह्या प्रसंगाची हकीकत हिंगणे ह्यांनीं आपल्या पत्रांत पुढें लिहिल्याप्रमाणें दिली आहेः—"राव मशारनिल्हे खंडेराव हरी दिल्लीस चंद्र ६ तारखेस दाखल झाले. पादशाहांची मुलाजमत शाहाजींनीं



जॉर्ज टॉमस ऊर्फ जहाज फिरंगी.

केली व चंद्र २१ तारखेस राजश्री खंडेराव हरी ह्यांनीं हजरतांची मुलाजमत केली. सा पार्चे खिलत, जेगा, शिरपेंच, मोत्यांची माळ येणेंप्रमाणें मशारनिल्हेची व हमराई लोकांची मुलाजमत झाली. त्यांस चवदा खिलत, चार चार पार्चे इनायत जाले. राव मशारनिल्हेनीं व लोकांनीं नजरा पादशाहांस केल्या. नंतर किल्ल्यांत चौकी पाहऱ्याचा बंदोबस्त करून नाजरच्या हवेलींत राहिले. किल्लेदारी यांजकडे जाल्यानें पादशाहांस मोठी खुशी जाली." खंडेराव हरी ह्यांनीं दिल्लीच्या किल्ल्याचा बंदोबस्त करून तेथें आपल्या वतीनें भवानीकुंवर यास किल्लेदारीचें काम पहाण्यास ठेविलें.

इ. स. १७९० पासून खंडेराव हरी यांचे बहुतेक पराक्रम व राजकारणें दिल्ली प्रांतांतच घडून आलीं, असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ह्या सर्व राजकारणांची इत्थंभूत हकीकत अद्यापि उपलब्ध झाली नाहीं. तथापि त्यामध्यें खंडेराव हरी ह्यांचें बुद्धिचातुर्य व तरवारबहादुरी हे दोन्ही गुण व्यक्त झाले, असें ह्मटलें तरी चालेल. इ. स. १७९० च्या अखेरीस नजबकुलीखान मृत्यु पावल्यानंतर कानोडचा किल्ला खंडेराव हरी ह्यांनीं लढाईचा मुकाबला करून मोठ्या पराक्रमानें काबीज केला. दिल्लीच्या पादशाहांनीं हें लढाईचें वृत्त श्रवण करून खंडेराव हरी यांस "सा पार्चे खिलत, जेगा, शिरपेंच, मोत्यांची माळ, तरवार, येणेंप्रमाणें इनायत करून हत्तीघोड्याची परवानगी दिली." ह्यानंतर खंडेराव हरी यांनीं कानोड येथें आपल्या जहागिरीचें मुख्य ठिकाण स्थापन करून तेथून पुढील सर्व राजकीय उलाढाली चालविल्या. ह्या सुमारास त्यांनीं आपल्या पदरीं युरोपियन लष्करी अंमलदार नेमून, त्यांच्या शिक्षणासाठीं कवाइती फौज तयार केली, व मराठ्यांच्या घोडेस्वारांबरोबर पायदळ पलटणेंही युद्धाच्या कामीं तरबेज केलीं. डी बॉयन् नामक जो फ्रेंच सेनापति शिंद्याच्या लष्करांत प्रसिद्धीस आला, तो प्रथमतः खंडेराव हरी यांच्या हाताखालीं नौकरीस राहिला. त्यानें बुंदेलखंडाच्या स्वारीमध्यें कलिंजर येथील वेढ्यांत आपल्या शौर्याचें व युद्धकौशल्याचें पहिलें प्रदर्शन केलें, आणि तेव्हांपासून खंडेराव हरी यांस कवाइती सैन्याचें महत्व विशेष वाटून, ते युरोपियन लोकांस आपल्या नौकरीस ठेवूं लागले असें ह्मणतात. खंडेराव हरी यांनीं इ. स. १७९३ चे सुमारास जॉर्ज टॉमस नांवाचा एक नामांकित युरोपियन सेनापति नौकरीस ठेविला व त्याजकडून एक हजार लोकांचें कवाइती पलटण तयार करविलें; व त्याच्या खर्चासाठीं आपल्या जहागिरीपैकीं, तिजारा, तापुकडा आणि फिरोजपूर हीं गांवें तोडून दिलीं. खंडेराव हरी यांजकडे दिल्लीच्या दक्षिणेस

चाळीस मैलांवर रेवाडी प्रांताची जहागीर होती व तिचा बंदोबस्त करण्याचें काम त्यांजकडेसच होतें हें वर सांगितलेंच आहे. त्यांस त्या कामीं ह्या नवीन सैन्याची चांगली मदत झाली. इ. स. १७९४मध्यें महादजी शिंदे पुणें येथें मृत्यु पावल्यानंतर दिल्लीकडील प्रांताचा बंदोबस्त करण्याचें काम, शिंद्याचे मुख्य लष्करी अंमलदार डी बॉईन, खंडेराव हरी, गोपाळराव भाऊ वगैरे सरदारांवर पडलें. त्या वेळीं खंडेराव हरी यांस जॉर्ज टॉमस याचा चांगला उपयोग झाला. यानंतर शिंद्यांच्या सरदारांमध्यें परस्पर मत्सर उत्पन्न होऊन अनेक तंटे बखेडे झाले. त्यांमध्यें टॉमस व खंडेराव हरी यांचा बराच संबंध आला आहे. परंतु खंडेराव हरी यांनीं मेवाती प्रांताचा एकंदरींत चांगला बंदोबस्त करून कानोड येथील आपली जहागीर भरभराटीस आणिली, आणि दिल्लीप्रांतांतील शिंद्यांची सत्ता कांहीं काल तरी सुरक्षित ठेविली. खंडेराव हरी यांच्या हाताखालील युरोपियन सेनापति जॉर्ज टॉमस हा दिल्ली प्रांतीं प्रसिद्धीस येऊन पुढें फार प्रबल झाला, व त्यानें झाजर येथें आपली जायदाद स्थापित केली. ह्याचें नांव मराठ्यांच्या कागदपत्रांत 'जहाज फिरंगी' असें प्रसिद्ध आहे. ह्याचा व खंडेराव हरी ह्यांचा पुढें बराच बेबनाव झाला. तथापि टॉमस यानें सहारणपूर प्रांतांतील शीखांचा उपसर्ग नाहींसा करून, लखबादादांच्या शिफारशीनें पानिपत, सोनपत, आणि कर्नाळ हे तीन तालुके खंडेराव हरी यांजकडून आपल्या सैन्याच्या खर्चासाठीं नवीन तोडून घेतले; आणि दोन हजार कवाइती फौज, दोनशें घोडेस्वार आणि सोळा तोफा इतकें जादा सैन्य त्या प्रांताच्या बंदोबस्ताकरितां ठेविलें. ह्याप्रमाणें दिवसेंदिवस टॉमस याचें प्राबल्य अधिक वाढून तो एक शिरजोर सरदार बनला, आणि त्यानें खंडेराव हरी यांचें महत्त्व व वजन बरेंच कमी केलें. त्यामुळें व प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें खंडेराव हरी हे अत्यंत उदास होऊन त्यांनीं इ. स. १७९७ मध्यें यमुनेमध्यें जलसमाधि घेतली. अशा रीतीनें ह्या शूर पुरुषाचा शेवट झाला.

खंडेराव हरी यांच्या चरित्राची साद्यंत माहिति मिळाली, तर त्यावरून पुष्कळ महत्वाच्या गोष्टी कळून येतील, व मराठ्यांच्या सत्तेचा नाश होण्यास कोणकोणतीं कारणें साहाय्यभूत झालीं, हें चांगलें व्यक्त होईल. खंडेराव हरी यांच्याबद्दल एका इंग्रज ग्रंथकारानें पुढील उल्लेख केला आहे, त्यावरून त्यांची योग्यता केवढी होती, हें आपोआप समजून येईल.

"Thus perished, in 1797, one of Madhoji Sindhia's most intrepid and enterprising chieftain, and a man who had played no inconsiderable a part in the Maratha conquest of Hindustan.

Appa had been engaged in the battle of Lalsot, Chaksana, and Agra, and the occupation of Delhi. He was a typical Maratha whose mind was never free from intrigue and treachery .........On the other hand Appa was a brave and skilful general whose later misfortunes were due to political causes, and who, during a troublous time in the history of Hindustan, held his own against many and powerful enemies, and retained his distinguished position until his death."*

खंडेराव हरी यांस औरस पुत्र होता असें दिसत नाहीं. त्यांनीं वामनराव ह्या नांवाचा आपला पुतण्या दत्तक घेऊन त्यास आपल्या जहागिरीचा मालक केलें. तो इ. स. १७९८ पासून कानोड प्रांताचा बंदोबस्त करूं लागला. तो तरुण असून त्यास राज्यकारभाराचें बिलकुल ज्ञान नसल्यामुळें त्यानें टॉमस वगैरे प्रबल सरदारांबरोबर ऐक्य न करितां वैमनस्य सुरू केलें. त्यामुळें आपसांमध्यें फूट होऊन ती विकोपास गेली व मराठ्यांच्या सत्तेचा जोर कमी करण्यास कारणीभूत झाली. वामनराव याचें नांव इ. स. १७९९ मध्यें जयपुरकरांच्या युद्धांत थोडेंसें प्रसिद्धीस आलें, परंतु पुढें त्याच्या हातून ह्मणण्यासारखें पराक्रमाचें कृत्य झाल्याचें दिसून येत नाहीं. वामनराव याच्या ताब्यांत सुरजी अंजनगांवच्या तहापर्यंत ह्मणजे इ. स. १८०३ अखेरपर्यंत, कानोड, रतियामुंडावर, इस्माइलपूर, निमराडा, कोट पुतळी, दादेनी, सराई सभाचंद, बिजवाडा, होदाना, गुनाळी, नाहुरजाळ वगैरे प्रांत होता. त्याचें स्वामित्व सुरजी अंजनगांवच्या तहाप्रमाणें इ. स. १८०४ मध्यें ब्रिटिश सरकाराकडे आलें. त्यानंतर कानोडच्या जहागिरीचें नांव देखील अस्तित्वांत राहिलें नाहीं!



## १३. मराठेशाहींतील तीन फांकडे.

मराठी राज्यामध्यें, रणशूर व पराक्रमी योद्धयांची योग्यता पराकाष्ठेची समजली जात असून त्यांच्या शौर्याची फार प्रशंसा होत असे, व त्याबद्दल त्यांना नानाप्रकारचे बहुमान व मोठमोठ्या जहागिरी, देणग्या व बक्षिसें मिळत असत. शिवाजी महाराजांपासून तों दुसऱ्या बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दीपर्यंत, ज्यांनीं ज्यांनीं ह्मणून तरवारबहादुरीचीं व शौर्यपराक्रमाचीं प्रशंसनीय कामें केलीं आहेत,

* Compton's European Military Adventurers. P. 132-133.

त्यांना त्यांना त्यांच्या योग्यतेनुरूप, कोणत्याना कोणत्या तरी रूपानें, मोबदला मिळाल्यावांचून राहिला नाहीं. त्यांच्या पराक्रमाची वाहवा सर्वतोमुखीं होऊन त्यांना तत्कालीन सार्वभौमाकडून किंवा राज्यकर्त्याकडून बहुमान व पारितोषकें मिळाल्याचें आढळून येतें. मराठे लोक हे शौर्यगुणामध्यें निष्णात असल्यामुळें त्यांच्या शौर्याची विख्याति, शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीच्या अगोदरपासूनच झालेली आहे. मुसलमानी राज्यामध्यें मोहिते, घाटगे, जाधव, मोरे, शिर्के इत्यादि मराठ्यांनीं, आपल्या समशेरीच्या जोरावर आपलें वर्चस्व संस्थापित करून, मुसलमानी राज्यांतूनही मोठमोठ्या जहागिरी व किताब मिळविले. हंबीरराव, झुंझारराव, रुस्तुमराव, चंद्रराव, इत्यादि किताब हे मराठ्यांच्या रणशौर्याचे द्योतक असून आजमितीपर्यंत त्यांच्या शौर्याची कीर्ति इतिहासांतरीं गात आहेत. शूर पुरुषांच्या मर्दुमकीची वाखाणणी करून, त्यांचा, पदव्या व पारितोषकें इत्यादिकांच्या योगानें गौरव करणें, ही चाल प्रत्येक राष्ट्रामध्यें आढळून येते. त्याप्रमाणें ती मराठी राज्यांतही असल्याचें दिसून येतें. शिवाजी महाराजांचे कारकीर्दीमध्यें प्रतापराव, दर्यासारंग इत्यादि पदव्या अस्तित्वांत आल्या, व राजाराममहाराजांचे कारकीर्दीमध्यें तर शौर्यदर्शक पदव्यांची अगदीं गर्दीच उडाली. संताजी घोरपड्यासारख्या ज्या बाणेदार वीरानें केवळ तरवारीच्या जोरावर हिंदु लोकांचें हिंदुत्व राखिलें, त्यांस 'हिंदुराव' ही पदवी देण्यांत यावी, किंवा धनाजीराव जाधवासारख्या वीर्यशाली पुरुषानें यवनांच्या दंष्ट्रेंत सांपडलेल्या मराठी राज्यसत्तेचें पुनरुज्जीवन केलें, ह्मणून त्यास 'जयसिंगराव' हा किताब मिळावा, ह्यापेक्षां अधिक कौतुकास्पद व भूषणास्पद गोष्ट दुसरी काय असणार ? छत्रपति शाहूमहाराजांच्या कारकीर्दीमध्यें 'समशेरबहादर' 'सेनाखासखेल', 'सेनाकर्ते' इत्यादि शौर्यद्योतक पदें निर्माण झालीं. सारांश, मराठी राज्यामध्यें अशा प्रकारच्या बहुमानाच्या पदव्या राजदरबारांतून वारंवार मिळून अनेक वीरांची शौर्यकीर्ति अजरामर झाली आहे. ह्याशिवाय कित्येक शूर पुरुषांच्या अलौकिक रणशौर्यामुळें व अचाट धाडसामुळें त्यांना बहुजनसमाजाकडून किंवा जनतेकडून कांहीं विवक्षित पदव्या मिळाल्या आहेत, त्यांची योग्यता वरील राजकीय पदव्यांपेक्षां फार वेगळी आहे. ह्या पदव्यांस सार्वजनिक किंवा लोकप्रिय असें नांव दिलें तरी चालेल. अशा प्रकारच्या पदव्या मराठी राज्यामध्यें फार थोड्या लोकांस मिळालेल्या आढळतात. राघोबादादा पेशव्यांस 'राघोबा भरारी' असें एक जनतेकडून मिळालेलें नांव इतिहासांत प्रसिद्ध आहे. परंतु खरोखर, एकाद्या वीराच्या अपूर्व शौर्याबद्दल बहुजनसमाजाकडून एखादें अभिनंदनपर अथवा गौरवसूचक

असें पद जर कांहीं मिळालें असेल, तर तें 'फांकडे' हें होय. हें पद फक्त तीन योद्ध्यांसच प्राप्त झालेलें आढळतें. ते योद्धे ह्मणजे कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे, मानाजी शिंदे आणि कॅप्टन जेम्स स्टुअर्ट हे होत. ह्यांचीं नांवें मराठी कागदपत्रांत कोन्हेरराव फांकडे, मानाजी फांकडे आणि इष्टुर फांकडे अशीं प्रसिद्ध आहेत. 'फांकडे' हें विशेषण केवळ शौर्याचेंच दर्शक नसून, त्यामध्यें त्या वीराच्या आणखी कांहीं विशिष्ट गुणांचाही अंतर्भाव होतो. ह्या तीन फांकड्यांची हकीकत मोठी मनोरंजक असून, ती संक्षेपतः येथें सादर करण्याचा आमचा मानस आहे.

## १. कोन्हेरराव फांकडे.

पहिले फांकडे कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे. हे बाळाजी बाजीराव पेशवे यांचे कारकीर्दीमध्यें एक प्रसिद्ध शिलेदार होते. ह्यांनीं अनेक युद्धांमध्यें शत्रूच्या फौजेवर चढाई करून फार मर्दुमकीचीं कामें केलीं; त्यामुळें त्यांचें शौर्य श्रीमंतांचें नजरेस येऊन त्यांस शिलेदारीचें स्वतंत्र पथक मिळालें. इ. स. १७५१–५२ मध्यें मोंगलांचें व मराठ्यांचें जें तुमुल युद्ध झालें, त्यामध्यें कोन्हेर त्रिंबक ह्यांनीं आपल्या शौर्याचे असे कांहीं चमत्कार दाखविले कीं, त्या योगानें त्यांची रणांगणावरील कीर्ति अजरामर झाली, असें ह्मटलें तरी चालेल. ह्या वेळीं मराठ्यांचा प्रतिपक्षी सलाबतजंग हा असून, त्याच्या बाजूस सुप्रसिद्ध फ्रेंच सरदार बुसी हा आपल्या कवायती सैन्यांसह मिळाला होता. ह्या वेळीं मोंगलांचा विचार, पुण्यावर चढाई करून मराठ्यांची मुख्य राजधानीच हस्तगत करावी असा होता. त्याप्रमाणें ते ढमढेऱ्यांचें तळेगांव व रांजणगांव येथपर्यंत चढाई करून आले. तारीख २२ नोव्हेंबर रोजीं, बुसीनें, ग्रहणाचे दिवशीं हिंदुलोक धर्मकृत्यांत गुंतलेले असतांना, त्यांच्यावर छापा घालून, त्यांना सैरावैरा पळावयास लाविलें, व त्यांच्या लष्करांतून त्यानें बरीचशी लूट नेली. त्यामध्यें पेशव्यांचे देव व पूजेचीं उपकरणींही गेलीं असें ह्मणतात. त्यामुळें बुसीस मोठा विजयानंद वाटून, तो अधिकच जोरानें पुढें चाल करून आला. ह्या बिकट प्रसंगीं मराठ्यांचे सरदार बिलकूल न डगमगतां, ते मोठ्या आवेशानें शत्रूंसीं युद्ध करण्यास सिद्ध झाले. ह्या वेळीं मराठी सैन्याचे मुख्य सेनापति महादाजीपंत पुरंदरे हे असून, त्यांच्या हाताखालीं दत्ताजी शिंदे व महादजी शिंदे हे दोन नवीन जोमाचे तरुण सरदार आणि कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे हे होतकरू शिलेदार हजर होते. मराठ्यांचें व मोंगलांचें ह्या समयीं मोठें हातघाईचें युद्ध झालें. ह्या युद्धामध्यें कोन्हेरराव त्रिंबक एकबोटे ह्यांनीं आपल्या शौर्याची अगदीं सीमा करून दाखविली. त्यांनीं प्रतिपक्षाकडील फ्रेंचांच्या तोफांचा

एकसारखा भडीमार होत असतांना शत्रूंवर निकराचे हल्ले करून त्यांना नेस्तनाबूत करून सोडिलें. ह्या वेळीं कोन्हेर त्रिंबक ह्यांच्या युद्धकलाकौशल्याची फार तारीफ होऊन त्यांस 'फांकडे' असें शौर्यदर्शक पद मिळालें. तेव्हांपासून त्यांची कोन्हेर त्रिंबक फांकडे ह्या नांवानें प्रसिद्धी झाली, आणि त्यांस पेशवे सरकारांतून मोठा बहुमान व इनाम मिळालें. आणि त्यांच्या बहादुरीबद्दल त्यांच्या घोड्याच्या पायांत चांदीचा वाळा घालण्याचा मान मिळाला. हा बहुमान फारच थोड्या सरदारांस पूर्वी मिळत असे. कोन्हेर त्रिंबक फांकडे हे होळीहुन्नुरच्या लढाईमध्यें हजर होते. तेथें त्यांनीं शत्रूंवर जवांमर्दीनें चालून जाऊन आपलें रणशौर्य चांगलें व्यक्त केलें. होळी हुन्नुरच्या लढाईमध्यें ते मोठ्या पराकाष्ठेनें बचावले. पुढें ते श्रीमंत सदाशिवराव भाऊसाहेब पेशवे ह्यांच्याबरोबर इ. स. १७५६ मध्यें सावनूरच्या स्वारीवर गेले. तेथें त्यांच्या डोक्यावर बुसीच्या तोफखान्यांतील एक तोफेचा गोळा पडून त्यांचा रणभूमीवरच अंत झाला. श्रीमंत बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांस त्यांच्या मरणानें फार दुःख झालें. परंतु त्यांनीं त्यांच्या वंशजास चांगलें इनाम देऊन ह्या शूर पुरुषाची निस्सीम स्वामिभक्ति आणि पराक्रमपटुत्व या गुणांचें योग्य चीज केलें. पेशवाईमध्यें कोन्हेरराव फांकडे ह्यांची कीर्ति फार प्रसिद्ध असून, त्यांच्या शौर्यकथा तरुण वीरांना फार प्रोत्साहन देत असत.

## २. मानाजी फांकडे.

पेशवाईतील दुसरे सुप्रसिद्ध व सर्वतोमुखीं गाजणारे फांकडे ह्मणजे मानाजी शिंदे हे होत. हे इतिहासांत मानाजी फांकडे ह्या नांवानेंच विख्यात आहेत. हा पुरुष मोठा साहसी व बाणेदार असून, लढण्याचे कामामध्यें अगदीं हातखंडा असे. ह्याची शक्ति अचाट असून काळीज अगदीं उलटें होतें, असें ह्मटलें तरी चालेल. ह्याच्या अंतःकरणांत भीतीचा लवलेश नसून, तो शत्रूंस रणांगणामध्यें कर्दनकाळासारखा वाटत असे. त्यामुळें त्याचा दरारा फार असून त्यास सर्व लोक वचकून असत. हा कन्हेरखेडकर शिंद्यांच्या घराण्यापैकीं एक औरस वंशज असून, तो बाळाजी बाजीराव पेशवे ह्यांचे कारकीर्दींत नांवारूपास चढला. हा रघुनाथरावदादा पेशव्यांबरोबर हमेशा स्वारी शिकारीस हजर असून, त्यांच्या फार मेहरबानींतला होता. जनकोजी शिंदे मेल्यानंतर, शिंद्याची सरदारी व जहागीर सुप्रसिद्ध महादजीस ऊर्फ पाटीलबावास न देतां मानाजीस द्यावी, असें रघुनाथराव पेशव्यांचें मत होतें. एवढेंच नव्हे तर त्यांनीं आपल्या स्वतःच्या अधिकारानें त्यास ता. १ जुलै इ. स. १७६४ रोजीं शिंद्यांच्या सरदारीचीं वस्त्रें देखील देऊन, त्याजकडून तीन लक्ष रुपये नजर

करार करून घेतली होती. महादजी शिंदे ह्यांच्या अंगचे गुण व त्यांची योग्यता हीं थोरले माधवराव साहेब पेशवे यांना पूर्ण अवगत असल्यामुळें, त्यांनीं रघुनाथराव पेशव्यांची ही कृति अमान्य करून, महादजी शिंदे ह्यांसच सरदारी सांगितली. ही त्यांची योजना किती यथायोग्य झाली, तें पुढील इतिहास सांगतच आहे. प्रस्तुत मुद्यासंबंधीं येथें एवढेंच सांगावयाचें आहे कीं, मानाजी शिंदे हा उगीच कोणीतरी सामान्य मनुष्य नसून, रघुनाथरावांच्या कृपेनें कांहीं वेळ तरी शिंद्यांच्या डौलाची सरदारी अनुभवलेला सरदार होता. ह्यानें रघुनाथराव पेशवे ह्यांचे बरोबर अनेक युद्धांमध्यें हजर राहून शूरपणाचीं कामेंही चांगल्या प्रकारचीं करून दाखविलीं होतीं. त्यामुळें त्याची चांगली प्रसिद्धी होऊन, त्याची गणना नांवाजलेल्या तरवारबहाद्दरांमध्यें होत असे. 'फांकडे' हें शौर्यद्योतक पद मानाजी शिंदे यांस केव्हां प्राप्त झालें, हें नक्की सांगतां येत नाहीं. परंतु मानाजी फांकडे हें नांव सवाई माधवरावांच्या कारकीर्दीच्या प्रारंभापासून –ह्मणजे इ. स. १७७२ पासून– पुणें दरबारांत फार प्रसिद्ध होतें, ह्यांत शंका नाहीं.

पुणें दरबाराचे मुत्सद्दी व रघुनाथराव पेशवे ह्यांच्यामध्यें दुफळी उत्पन्न होऊन इ. स. १७७४ पासून जीं कारस्थानें सुरू झालीं, त्यांत मानाजी फांकडे हा सामील असून तो मुख्यत्वेंकरून रघुनाथराव पेशव्यांचे बाजूनें होता. रघुनाथराव पेशव्यांनीं इंग्रजांसीं सख्य करून, त्यांच्या मार्फत पुणें दरबाराकडून ज्या अद्वातद्वा मागण्या मागितल्या, त्यांत मानाजी शिंदे यास दहा लक्षांची जहागीर द्यावी, अशी एक मागणी होती. त्यावरून तो दादासाहेबांच्या नाकचा बाल कसा झाला होता, हें स्पष्ट दिसून येतें. रघुनाथरावांच्या पक्षाचे खरे व एकनिष्ठ असे सेवक ह्मटले ह्मणजे मानाजी फांकडे व सखाराम हरी गुप्ते हे दोघे होते. हे दोघेही चांगले लढवय्ये व कर्तबगारीचे पुरुष होते. गुजराथेंत महीनदीच्या कांठीं इ. स. १७७५ च्या फेब्रुवारीमध्यें पुणें दरबारच्या सैन्याची व रघुनाथराव पेशव्यांच्या सैन्याची जी चकमक उडाली, तींत मानाजी शिंदे व सखाराम हरी हे रघुनाथरावांच्या बाजूनें फार शौर्यानें लढले. पण तींत त्यांस जखमा लागून रघुनाथरावांच्या सैन्याचा पराभव झाला व त्यांस समरांगणांतून पळून जावें लागलें. ह्यानंतर राघोबादादा हे सुरत येथील इंग्रजांस जाऊन मिळाले व त्यांनीं त्यांच्याशीं तह करून पुढील राजकारस्थानें सुरू केलीं. सुरत येथें राघोबादादांचे सैन्याची वाताहात झाल्यानंतर, मानाजी फांकडे हे दादासाहेबांची चाकरी सोडून देऊन, कांहीं दिवस हरिपंताबरोबर पुण्यास आले व त्यांनीं पुणें दरबारचा पक्ष स्वीकारला. पुण्यास आल्यानंतर त्यांची व श्रीमंत सवाई माधवराव पेशव्यांची भेट झाली. ह्या भेटीचा उद्देश, श्रीमंतांकडून त्यांस सरदाराचीं

वस्त्रें द्यावींत व त्यांची राजनिष्ठा श्रीमंतांचे चरणीं गुंतवून टाकावी, असा होता. परंतु मानाजी फांकडे हे अंतःकरणपूर्वक पुणें दरबारच्या पक्षास मिळालेसे नसून, प्रसंगवशात् रघुनाथराव पेशव्यांच्या सैन्याची वाताहात जाहल्यामुळें ते वरकरणीं हरिपंत फडक्यांच्या चातुर्यानें व शौर्यप्रभावानें ह्या बाजूस येऊन मिळाले होते. ते तोंडानें आपल्या स्वामिनिष्ठेच्या खूब बाता मारीत असत, एवढेंच नव्हे तर त्यांस कोणी 'फितुरी' किंवा प्रतिपक्षाच्या बाजूचे असें ह्मटलें, तर तें बिलकूल आवडत नसे. परंतु नाना फडणवीस व हरिपंत फडके ह्यांस त्यांचें अंतरंग पूर्णपणें माहीत असल्यामुळें ते त्यांच्या मोहजालांत गुरफटले न जातां, त्यांनीं त्यांस, बालश्रीमंतांस भेटवून व सरदारीचीं वस्त्रें अर्पण करून, जुळल्यास हें सावज हस्तगत करण्याचा एक मुत्सद्देगिरीचा डाव योजिला होता. तथापि मानाजी फांकडे ही व्यक्ति उलट्या काळजाची असल्यामुळें प्रसंगविशेषीं ती काय करील, याचा नेम नव्हता. ह्मणून त्यांची व श्रीमंतांची भेट सुरक्षितपणें कशी पार पडेल याची त्यांना काळजी वाटत होती. ह्या प्रसंगाचें वर्णन 'हरिवंशा'च्या बखरीमध्यें दिलें आहे. तें फार मनोरंजक असून त्यावरून मानाजी फांकड्यांच्या स्वभावाचें व कृतीचें चित्र हुबेहूब नेत्रांसमोर उभें राहातें. तें वर्णन येणेंप्रमाणेंः—

"मानाजी फांकडे पुरंदरास श्रीमंतांचे भेटीस येण्याचें ठरलें, तेव्हां नाना फडणीस यांनीं पुरुषोत्तमराव दाजींस सांगितलें जे, मानाजी फांकडे यांजबरोबर बोलावयाचा आमचा कांहीं लाग नाहीं, त्यांजबरोबर आपणच बोलावें. दाजी बोलले कीं, 'तुमचा पंचहत्यारी कसला जरी आला, तरी मी त्याजबरोबर बोलतों. सारे माझे ओळखीचे आहेत.' असें बोलिले. नंतर कचेरीचे वेळेस पुरुषोत्तमराव दाजी श्रीमंत रावसाहेब यांस आणावयास गेले. तेव्हां बाईसाहेब बोलिल्या कीं, 'दाजी, बाळासी सांभाळावें.' त्यांनीं उत्तर केलें कीं, 'बाईसाहेब, आपण कांहीं काळजी करूं नये. पुरुषोत्तमराव जिवंत आहे तों कोणाचें भय नाहीं!' मानाजी फांकडे भेटीस येणार ह्मणून सर्वत्रांस भय वाटलें. दाजी यांनीं श्रीमंतांस कडेवर घेऊन कचेरीस आणून मसनदीवर बसविलें. शेजारीं तलवार घेऊन पुरुषोत्तमराव दाजी बसले. नाना फडणीस व सखाराम बापू झाडून मानकरी बसले. नंतर मानाजी फांकडे आले. त्यांस दोन समले, समागमें पंचवीस तीस खासे, याप्रमाणें आले. नीट कचेरींत येऊन मसनदीजवळ आले. तों पुरुषोत्तमराव दाजी बोलिले कीं, 'रावसाहेब, मानाजीबावांस ताजीम द्यावी.' असें ह्मणतांच श्रीमंतांचे मसनदीवर खुरनिसा करून समोर मध्येंच मसनदीजवळ मानाजी फांकडे बसले; आणि कचेरींत चहूंकडे पाहून 'दाजी, राम राम' असें ह्मणतांच, हे बोलले 'मानाजीबावा, राम राम.' मग त्यानें

कोणासही राम राम केला नाहीं, आणि बोलावयास आरंभ केला. 'पुरुषोत्तमराव, मी कसा आहें तो मीं आपल्या तोंडानें वर्णन करावेसें नाहीं. परंतु मला हीं बामणें फितुरी ह्मणतात ! त्यास आह्मांस कोठेंही चाकरी करावयाची ! दादासाहेब काय आणि हे पाय काय, त्यास आतां पुरे. आह्मी कांहीं आईचे पोटांतून दाली बांधून आलों नाहीं. त्यांनीं आह्मांस दाली बांधली.' असें ह्मणून गळ्यांतून पडदळसुद्धां तलवार काढून श्रीमंतांचे पायांपुढें ठेविली. तों नाना फडणीस यांणीं खुणेनें पुरुषोत्तमराव यांस सांगितलें जे, यांस लौकर जावयाचें करा. असें ह्मणतांच दाजी बोलले कीं, 'मानाजीबाबा, हें काय करतां? तुह्मांस दाली बांधिली ती माघारी घ्यावयास बांधिली कीं काय ? आणि तुह्मांस फितुरी तरी ह्मणतो कोण ? तुह्मीं आपला सरंजाम खाऊन श्रीमंतांचें पायांसीं लक्ष स्वस्थ असावें.' असें ह्मणतांच मानाजी फांकडे बोलले कीं, 'पुरुषोत्तमराव, आह्मी सरकारचे चाकर. आजपर्यंत चाकरी कशी केली ती आपणास माहीत आहेच.' असें ह्मणतांच दाजी बोलले कीं, 'मानाजीबाबा, आह्मी काय ब्राह्मण !' असें ह्मणतांच मानाजीबाबा बोलले कीं, 'वरकड बामणावाणी तुह्मी ब्राह्मण नव्हे. तुमची खातरजमा मला आहे. आणि माझी खातरजमा तुह्मांला आहे !' असें ह्मणतांच दाजी बोलले जे, 'रावसाहेब, मानाजीरावास तलवार उचलून द्यावी.' असें ह्मणून श्रीमंतांचा हात लाऊन तलवार उचलून दिली. आणि बोलिले जे, 'मानाजीबाबा, श्रीमंतांची भोजनाची वेळ जाहाली, निरोप घ्यावा.' असें ह्मणून लागलीच विडे आणविले; आणि श्रीमंतांचा हात लाऊन विडे दिले. आणि बोलले जें, अहो, मानाजीबाबाचे लोकांस विडे देणें.' असें ह्मणून त्यांचे लोकांस विडे दिले. नंतर सांगितलें जे, आतां निरोप द्यावा. असें ह्मणून श्रीमंतांस उठावयाची खूण करतांच श्रीमंत उठले. तों मानाजी फांकडे मुजरा करून निघाले. दाजी बोलिले, 'तुह्मीं सरकारचे पायांशीं लक्ष ठेऊन स्वस्थ असावें. कोणे गोष्टीची फिकीर न करणें.' असें ह्मणून त्यांस निरोप दिल्हा. ते गेल्यावर नाना फडणीस बोलले जे, 'दाजी, आज आपण होतां, ह्मणून मानाजी फांकडे यांसीं बोललां. आमचा कांहीं त्याजबरोबर बोलण्याचा लाग नव्हता. अहो, कचेरींत ह्मणतो, हीं बामणें मला फितुरी ह्मणतात ! त्यासीं काय बोलावें ?''

ह्याप्रमाणें मानाजी फांकड्याची व श्रीमंतांची भेट होऊन वर्ष सहा महिने लोटले नाहींत, तोंच तो हैदराशीं फितुरीचीं राजकारणें करण्यास प्रवृत्त होऊन श्रीमंतांच्या फौजेवर संकट आणण्याचा प्रयत्न करूं लागला. केवढी ही अपूर्व राजनिष्ठा !

इ. स. १७७७ सालीं हैदरानें कर्नाटकांत धुमाकूळ उडवून मराठ्यांच्या मुलुखास उपद्रव दिल्यामुळें, हरिपंत फडके यांस स्वसैन्यानिशीं हैदरावर स्वारी करणें भाग पडलें. ह्या स्वारीमध्यें मानाजी फांकडे हा आपल्या सैन्यानिशीं हरिपंताबरोबर गेला होता. त्यानें, दादासाहेबांचे सरदार, बाजीराव बर्वे व आबाजी महादेव (हे हैदरास सामील झाले होते.) ह्यांच्याशीं गुप्त राजकारस्थानें करून, हरिपंतास दगा करण्याचा बेत योजिला. त्यानें हैदराकडून १,११,००० होन घेऊन, हरिपंताचे सैन्यांतील यशवंतराव माने, नीळकंठराव थोरात, महादजी राजे भोंसले मुंगीकर वगैरे मराठे सरदार फितविले, आणि हैदरास आकस्मिक आणून मराठ्यांच्या सैन्यावर छापा घालण्याची योजना केली. परंतु हरिपंत फडके अत्यंत दक्ष असल्यामुळें त्यांनीं हा कट तत्क्षणींच उघडकीस आणून, मानाजी शिंदे व त्याचे साथीदार यांचें यथास्थित पारिपत्य केलें. हरिपंत फडके ता. १४ जानेवारी इ. स. १७७८ च्या पत्रांत नानांस लिहितातः–"मानाजी शिंदे यांणीं संधान फितुराचें राखोन, त्याची (हैदराची) फौज पाठीवरी आणिली. नाहींतरी हैदरानें चालोन यावें, जुरत काय होती? फितुरामुळें छ १ जिल्हेजापासून छ ५ रोजपर्यंत हैदराचे फौजेचा फासळा जवळ होऊं लागला. चैन पडों न देत! इतकियांत हैदराचे कागद फितुराचे मानाजीस आले कीं, 'तुह्मीं पत्र पाठविलें त्याप्रमाणें आडवून बसवावें; तों इकडील फौज चालून येत आहे.' अशीं पत्रें सांपडलीं. तेव्हां राजश्री परशरामपंत भाऊ व आह्मी तलाव्यास होतों. तेथून पाहाटेस निघून मानाजी शिंदे यांचे गोटावर चालून येऊन हल्ला केली. धरावें असा मजकूर असतां, कोणी फितुरी यांणीं इशारा करविल्यावरून घोड्यावर बसोन निघाला. दोन तीन हजार फौज पाठलागास तीन चार कोस गेली. त्याचे लोक झाडून वळून आणिले. तो मात्र जातीनें दहा पांच स्वारांनिसीं निघोन गेला. त्याची बायको व सलतनत सर्व सरकारांत आली. वरकड लुटलें गेलें. फितुऱ्यानें मोठाच दगा केला होता. तें सर्व श्रीकृपेनें चुकोन, केलें कर्म त्यास फळास आलें. ईश्वर असें कर्मास दूर नाहीं. स्वामींचा पुण्यप्रताप थोर आहे. आणखी यांत असतील त्यांचाही शोध करून सेवेसीं विनंति लिहीन." ह्यानंतर हरिपंत पुढच्या पत्रांत लिहितातः–"मानाजी शिंदे यांणीं फितूर केला. त्यास लुटलें. खासा पळोन गेला. हें वर्तमान सेवेसीं लिहिलेंच आहे. यांतील बारीक वर्तमान राजकारणाचें मनास आणितां, हैदरखानाजवळ बाजीराव बर्वे व आपाजी महादेव आहेत. त्यांणीं मानाजी शिंदे यांचे हातें सूत्र केलें कीं, पैका पाहिजे तो पाठवितों, फौज फोडावी. लढाईस उभे राहूं ते समयीं सर्वांनीं येऊन मिळावें. दुसरें, मानाजी शिंदे यांणीं कबूल

केलें कीं, आह्मी अडवून बसतों. तुह्मीं चालोन यावें. त्याच बेताप्रमाणें मानाजीची योजना [जाली]. आह्मी सडे होऊन लष्करापासून अदकोस राहिलों. ते दिवशीं मानाजी शिंदे गोटांत होते. उद्यां येऊं ह्मणून सांगितलें. दुसरे दिवशीं सरंजाम सुद्धां चालोन आला. आह्मी मानाजीस बोलावूं पाठविलें. त्यांणीं यावयास उशीर केला. लबाडी अशी समजली. तेव्हां फौजेची गांठ पडूं दिल्ही नाहीं. तजवजेनें फौज काढून बुणगें नदीपार लावून दिलें. आह्मी नदीतीरास आलों. तों पळालीकडून बुणग्यावर फौज धांवली. हें कळतांच फौजसुद्धां नदी उतरलों. बुणगे पुढें लाऊन पाठीवर राहिलों. संभाळून आलों. फितूर असें समजलें. मानाजीचा बंदोबस्त करावा ह्मणोन दोन तीन मजली सुरापुरचे सुमारें आलों. जाबीतजंग जवळ आले. इतक्यांत हैदरखानाचा कागद सांपडला. त्यावरून निशाच जाली. त्या कागदाची नक्कल पूर्वी सेवेसीं पाठविली आहे. ती पावली असेल. आणखीही फितुरास मानाजीस मिळालेले आहेत. त्यांचा शोध करितों. लेहून पाठवूं. दगा करून गारत करावयासी बाकी राहिली नव्हती. परंतु स्वामींचे पुण्यप्रतापेंकरून सावध जाहलों. हें राजकारण दादासाहेबांसंबंधीं, फौजेची फोडाफोड करून दादास आणून दौलतीचा बंदोबस्त करावा हा इरादा. कोल्हापुराकडे फौज मेळवावयास पैका जातो. संक्राजी घोरपडे याजकडे पैका गेला आहे. दादांनीं मालवणास यावें, तेथून कोल्हापुराकडे यावें, फौज मिळवावी, असे मनसुबे घाटीत होते. पुण्याकडील गृहस्थ कोणी कोणी या अनुसंधानांत आहेत. त्यांजवर हा खेळ आहे. सारीक बारीक मनास आणितां, फौज बुडावयास बाकी राहिली नव्हती. परंतु स्वामींचा प्रताप थोर ह्मणून टळलें! आतां जाबीतजंगाची भेट जाहली; लौकिकामध्यें आह्मी मोंगल एक असे जाहालों. याउपरी जी गोष्ट करणें ती समजूनच करूं. सविस्तर स्वामींस कळावें ह्मणोन लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

वरील हकीकतीवरून मानाजी फांकडे ही व्यक्ति कशी काय होती, त्याचा बराच अंदाज करितां येईल. त्यांच्या आंगीं, धाडसीपणा, मर्दुमकी, आणि कर्तबगारी वगैरे गुण जसे होते, त्याप्रमाणें राजकारणकौशल्य, स्वामिनिष्ठा आणि सत्यप्रीति ह्यांचीही त्यांस जोड असती, तर त्यांच्या हातून मराठी राज्याची उत्कृष्ट सेवा झाली असती, असें ह्मटलें असतां अयथार्थ होणार नाहीं. तथापि केवळ शौर्यातिशयत्वामुळें त्यांचें 'फांकडे' हें नांव सर्वतोमुखीं असून पुणें दरबारांत त्यांचा दरारा फार विलक्षण होता. मानाजी फांकडे ह्यांच्या सर्व कारकीर्दीची इत्थंभूत हकीकत उपलब्ध नसल्यामुळें त्यांचें संगतवार चरित्र बरोबर समज-

ण्यास मार्ग नाहीं. परंतु प्रसिद्ध झालेल्या माहितीवरून ती एक विलक्षण व्यक्ति होती व तत्कालीन दरबारी लोकांमध्यें त्यांच्या शौर्याबद्दल आदरबुद्धि असे, असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

मानाजी फांकडे ह्यांची तत्कालीन मराठे सरदारांमध्येंच केवळ प्रसिद्धी नसून, इंग्रज लोकांसही ते चांगले माहीत होते. मेजर प्राईस ह्या नांवाचा एक इंग्रज लष्करी अंमलदार इ. स. १७९१ मध्यें पुण्यास आला होता. त्यानें पेशव्यांच्या दरबाराचें प्रत्यक्ष अवलोकन करून जें वर्णन लिहिलें आहे, त्यांत मानाजी फांकडे ह्यांच्याबद्दल मोठा गमतीचा उल्लेख केला आहे, तो फार वाचनीय आहे. तो लिहितोः—

"While we were thus seated, we had full leisure to contemplate the assembly; which was sufficiently numerous, and composed of many of the most distinguished feudatories of the Maratha State; and among others, that more particularly attracted our attention, was Manaji Fankra, long known to the Bombay Army, for his reckless bravery. His grotesque appearance, on the present occasion, was peculiarly striking; like the genuine Maratha, he was naked from the waist upwards, with merely a loose scraf thrown over his shoulders. His face, breast and arms were so strangely painted in streaks of white and yellow, as might have taken the conciet out of the wildest of the red chiefs, of the American wilderness,—and certainly, when leaning on his shield with a settled scowl upon his countenance, he exhibited an exterior of savage ferocity, whatever might have been the animating spirit. He probably argued, that after turning our backs upon him at Talegaum, he scarcely expected to witness the cordial reception which we now experienced at Poonah."

ह्या वर्णनावरून मानाजी फांकडे हे इ. स. १७९१ मध्यें पुणें दरबारांत हजर होते, हें उघड होतें. बाजीराव पेशवे ह्यांच्या राज्यारोहणाचे वेळीं (ह्मणजे इ. स. १७९६ मध्यें) पुण्यास जीं कारस्थानें झालीं, त्या वेळीं मानाजी फांकडे हे दौलतराव शिंद्यांच्या लष्करामध्यें हजर असून, ते बाजीरावास मनोभावें मदत करीत होते, अशीही माहिती मिळते. ह्या प्रसंगाचें वर्णन मि० टोन नामक एका युरोपियन गृहस्थानें केलें आहे. त्यांत त्यानें मानाजी फांकडे हे बाजीरावाच्या 'निस्सीम भक्तां' (faithful adherent) पैकीं एक होते, असें ह्मणून त्यांच्याबद्दल पुढील प्रशंसापर उद्गार काढिले आहेतः—"Of these, many were of considerable rank; particularly Manaji Phankria, an officer of high military reputa-

tion, and so disfigured with wounds, as to have scarcely the appearance of a human creature." अर्थात् मानाजी फांकडे ह्यांची स्वारी इ. स. १७९६ पर्यंत तर पुणें दरबारामध्यें विद्यमान होती, हें मि० टोन ह्यांच्या लेखावरून सिद्ध होतें. ह्यानंतर ते मृत्यु पावले असावे. त्यांच्या मृत्यूची नक्की तारीख समजत नाहीं.

## ३. इष्टुर फांकडा.

मराठीशाहीमधील तिसरा सुप्रसिद्ध फांकडा ह्मणजे इष्टुर फांकडा होय. ह्याचें खरें नांव क्याप्टन स्टुअर्ट असें होतें. मराठे लोक त्याच्या शौर्यप्रभावामुळें त्यास मोठ्या कौतुकानें 'इष्टुर फांकडा' असें ह्मणत. श्रीमंत रघुनाथराव दादासाहेब पेशवे हे पुण्याची पेशव्यांची गादी मिळविण्याकरितां मुंबईच्या इंग्रजांस जाऊन मिळाले व त्यांचें सैन्य मदतीस घेऊन पुणें दरबाराच्या सैन्याशीं लढण्याकरितां इ. स. १७७८ मध्यें बोरघांटामध्यें आले. त्या युद्धप्रसंगामध्यें इंग्रजांच्या वतीनें जे रणशूर योद्धे प्रसिद्धीस आले, त्यांपैकीं क्याप्टन स्टुअर्ट हा एक अग्रगण्य होय. ह्या वेळीं सर्व इंग्रज सैन्याचें आधिपत्य कर्नल इगर्टन ह्यांच्याकडे असून, त्यांनीं आपल्या सैन्याच्या मुख्य दोन तुकड्या केल्या होत्या, व त्यांचें आधिपत्य लेफ्टनंट-कर्नल काकबर्न व लेफ्टनंट-कर्नल के ह्या दोन नामांकित सेनापतींस दिलें होतें. ह्याशिवाय तलाव्यासाठीं पुढें चाल करून जाणारी बिनीच्या सैन्याची एक वेगळी तुकडी केली होती. तिचें आधिपत्य क्याप्टन स्टुअर्ट ह्यांजकडे होतें. पुणें दरबारच्या सैन्याच्या वेगवेगळ्या तुकड्या केल्या असून त्यांचें सेनाधिपत्य हरिपंत फडके, रामचंद्र गणेश, बाजीपंत बर्वे, तुकोजी होळकर, महादजी शिंदे, वगैरे नामांकित योध्द्यांकडे होतें. हे सर्व सरदार आपापल्या सैन्यांनिसीं तळेगांवापासून बोरघांटापर्यंत माऱ्याच्या जागा रोंखून युद्धास सिद्ध होते.

खुद्द नाना फडणवीस व सखाराम बापू हे प्रधान मंत्रीही ह्या मोहिमीमध्यें हजर असून, ते तळेगांवच्या रोखें आले होते. तात्पर्य, उभय सैन्यांस, परस्परांवर चढाई करण्याची अत्यंत ईर्षा व वीरश्री वाटत असून, ह्या लढाईचें महत्त्व त्यांस पराकाष्ठेचें वाटत होतें. इंग्रजांची मराठी सैन्यावर सरशी झाली, तर पुण्याच्या कारभारी मंडळीचा वरचष्मा सर्वस्वीं नाहींसा होऊन, दादासाहेबांचें प्रस्थ यशस्वी होण्याचा संभव होता. व तसें झालें असतें तर पुण्यांत राजकीय स्थित्यंतर होण्याची भीति होती. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं, उभय पक्षांकडील सेनापति किती दक्ष व रणोत्सुक असले पाहिजेत, हें निराळें सांगावयास नकोच. ह्या मोहिमेचा सर्व भार महादजी शिंद्यांवर असून, त्यांनीं प्रतिपक्षास पराजित कर-

ण्याची प्रतिज्ञा केली होती, असें ह्मणतात. अर्थात् मोठ्या हिंमतीनें व रणौत्सुक्यानें मराठें सैन्य आपली कर्तबगारी दाखविण्यास तत्पर झालें होतें. त्यामुळें ह्या युद्धास कांहीं अपूर्व स्वरूप आलें होतें.

इंग्रजांच्या सैन्याचे अधिपतीही मोठे रणझुंजार व हिय्येबाज होते. त्यांनीं मराठ्यांच्या फौजांवर चालून जाण्याकरितां जागोजाग त्यांच्या चौक्या मारून बोरघांटापर्यंत पेशकदमी केली होती. ह्यामध्यें क्याप्टन जेम्स स्टुअर्ट हा योद्धा फार पटाईत असून, त्यास सर्व रस्त्यांची व घाटनाक्यांची पूर्ण माहिती होती. तो आपल्याबरोबर ग्रेनेडियर शिपायांची एक पलटण व थोडासा तोफखाना बरोबर घेऊन ता. २२ नोवेंबर रोजीं मुंबईहून निघाला; व आप्टे नदीपर्यंत येऊन तेथून दुसरा मार्ग घेऊन बोरघांट चढून वर येऊन पोहोंचला. ता. २५ रोजीं त्यांन खंडाळ्याच्या उंच टेंकडीवर आपलें निशाण लाविलें. ता. २२ पासून ता. २५ पर्यंत, ह्मणजे अवघ्या तीन दिवसांमध्यें, शत्रूसीं सावधगिरीनें वागून, इतका लांबीचा पल्ला आक्रमण करणें, हें फार धाडसाचें व शौर्याचें कृत्य होय.

क्याप्टन स्टुअर्ट ह्यानें खंडाळ्यास बराच मुकाम केला. मुंबईचें दुसरें सैन्य व तोफखाना ता. २३ दिसेंबर इ. स. १७७८ रोजीं पनवेलच्या मार्गानें घाट चढून एकदां खंडाळ्यास येऊन पोहोंचला. इकडे मराठ्यांचें सैन्य व तोफखाना शत्रूंशीं तोंड देण्याकरितां खंडाळ्याच्या आजबाजूस येऊन मान्याच्या जागा रोंखून युद्धास सिद्ध झाला. मराठ्यांच्या तोफखान्याचे मुख्य सेनापति भिवराव पानसे ह्यांनीं तोफा व बाण ह्यांचा प्रतिपक्षावर दररोज वर्षाव चालविला. मराठ्यांच्या सैन्यामध्यें नरोन्हा नांवाचा एक फिरंगी गोलंदाज होता. तो तोफा डागण्यामध्यें अतिशय कुशल होता. त्यानें शत्रूवर तोफांचा व बाणांचा असा मारा केला कीं, प्रत्येक खेपेस शत्रूचा नामांकित शिपाई नेमका गोळ्याखालीं सांपडत असे. अशा प्रकारची निकराची लढाई चालू असतां, क्याप्टन स्टुअर्ट ह्यानें आपल्या पराक्रमाची शर्थ करून व शत्रूंच्या तोफांचा भडिमार सहन करून, कारल्यापर्यंत आपली फौज नेऊन पोहोंचविली. त्या योगानें मराठे सेनापतींस त्याच्या शौर्याचा प्रभाव फार अलौकिक वाटून, त्यांनीं त्याची फार वाहवा केली; व त्यास कौतुकानें "इष्टुर फांकडा" असें अभिधान दिलें. मराठ्यांच्या सैन्यामध्यें इंग्रजी फौजेंतील ज्या गुप्त बातम्या येत असत, त्यांमध्यें इष्टुर फांकड्याच्या शौर्याबद्दल, धैर्याबद्दल आणि युद्धचातुर्याबद्दल फार प्रशंसनीय उल्लेख असत. त्यामुळें मराठ्यांच्या सेनापतींसही इष्टुर फांकड्यासीं शर्थीचें युद्ध करून त्यास आपलें रणशौर्य दाखविण्याचें विशेष स्फुरण चढलें. भिवराव पानसे ह्यांनीं तोफांची

मारगिरी फार निकराची करून इंग्रज सैन्याची दाणादाण उडवून देण्याचा प्रयत्न केला. इकडे इट्टुर फांकडा ह्यासही अपूर्व रणावेश उत्पन्न होऊन, तो तसाच तोफांच्या व बाणांच्या वर्षावामध्यें मराठ्यांच्या सैन्यावर उलट मारे करूं लगला. त्याची मर्दुमकी व शौर्य पाहून मराठे सेनापति आश्चर्यानें चकित झाले, व त्यांनीं निकराचें युद्ध तसेंच आवेशानें चालू ठेविलें. भिवराव पानसे ह्यांच्याजवळ अवघ्या सात तोफा होत्या, पण त्यांनीं त्या सप्त अग्नियंत्रांचा एकसारखा भडिमार चालवून अखेर प्रतिपक्षाच्या सेनापतीस स्वर्गलोक दाखविला.*

ह्या निकराच्या चकमकीमध्यें इट्टुर फांकड्यास तोफेचा गोळा लागून तो ता. ४ जानेवारी इ. स. १७७९ रोजीं धारातीर्थी पतन पावला. ह्या प्रसंगीं मराठी सैन्यानें "इट्टुर फांकड्या, शाबास." अशी सानंद चित्तानें शाबासकी दिली. खरोखर शूरत्वाची कमाल करून समरांगणामध्यें शत्रूंकडून देखील वाहवा मिळविणाऱ्या योद्ध्याची धन्यता आणखी काय वर्णन करावी? मराठ्यांनीं प्रांजलपणानें इट्टुर फांकड्याच्या शौर्याची तारीफ केली, हें खरोखर त्यांस अत्यंत भूषणावह होय, यांत शंका नाहीं. कवि मोरोपंत ह्यांनीं ह्मटलें आहेः—

**"अरिच्याहि सद्गुणातें प्रेमें वाखाणितात सुज्ञानी!"**

हें ह्या प्रसंगीं चांगलें व्यक्त झालें. असो.†

इट्टुर फांकडा मृत्यु पावला, त्याच समयास दुसरा इंग्रज सेनापति कर्नल के हाही तोफेचा गोळा लागून घायाळ झाला. त्यामुळें इंग्रज सैन्याचा दम खचला. त्यांना मराठ्यांवर चढाई करून पुणें सहज हस्तगत करून घेतां येईल ह्मणून

---

* भिवराव पानसे ह्यांनीं ह्या युद्धामध्यें जी अपूर्व कामगिरी केली, त्याबद्दल पेशव्यांच्या दरबारांत त्यांची फार तारीफ होऊन त्यांना योग्य बक्षीस मिळालें. पानसे ह्यांच्या कैफीयतीमध्यें पुढील उल्लेख आढळतोः—"श्रीमंत माधवराव नारायण प्रधान यांचे कारकीर्दींत कसबें तळेगांव येथें इंग्रजबहादूर यांशीं लढाई जाहली. त्या लढाईंत भिवराव, तोफखाना व फौज सुद्धां इंग्रज बहादूर यांजवर चालून घेऊन, तोफेचें निशाण धरून, गोळ्यानें इट्टुर साहेब इंग्रज बहादूर यांजकडील सरदार मारिले, व मोरच्यांचे हल्ल्यांत बंधूसह सक्त मेहेनत करून बहुत जवांमर्दीनें यश संपादिलें. सबब श्रीमंतांनीं चौघडा, जरीपटका, व फौजेच्या बेगमीस सरंजाम नंवद हजार रुपयांचा छ २१ सवाल तिसा सबैन मया व अलफांत दिला."

† इट्टुर फांकड्याच्या मृत्यूबद्दल मुंबई-सरकारच्या रिपोर्टामध्यें पुढील वाक्य आहे तें किती सार्थ आहे, तें निराळें सांगावयास नकोच.

"On the same day they met with a very loss by the death of Captain Stewart, who was a most active, gallant, and judicious officer, and possessed of the true military spirit."

जी प्रथम आशा होती, ती निष्फल झाली. ते वडगांव येथें मराठ्यांच्या पूर्ण पेंचांत सांपडले. तेव्हां त्यांस मि० चार्लस स्टुअर्ट व फार्मर असे दोन युरोपियन लष्करी अंमलदार मराठ्यांकडे ओलीस पाठवून, त्यांच्या बरोबर तह ठरविणें भाग पडलें. मराठ्यांच्या इतिहासामध्यें 'वडगांवचा तह' ह्मणून जो प्रसिद्ध आहे तोच हा होय.

इष्टुर फांकड्याच्या मृत्यूचें वर्तमान तत्कालिन अस्सल मराठी पत्रांत आढळून येतें. त्यामध्यें इंष्टुर फांकड्याचे नांवापुढें **'लढाव'** ह्मणजे **'लढवय्या'** असें विशेषण मराठ्यांनीं लाविलेलें दिसून येतें. परशुरामभाऊ पटवर्धनांचा कारकून शिवाजी बावाजी ह्यानें ता. २२ जानेवारी इ. स. १७७९ च्या पत्रामध्यें पुढील उद्गार काढले आहेतः—"मुख्यत्वें श्रीमंतांचें पुण्य विचित्र! अवतारी पुरुष! त्यासारखे योग घडले. ज्या मॉष्टीनानें मसलत केली, तो घांटावर येतांच, समाधान नाहीं ह्मणोन मुंबईस गेला; तेव्हां मृत्यु पावला. **इष्टुर फांकडा लढाव**, इकडील फौजेचा, कारल्याच्या मुकामीं गोळा लागून ठार जाहला. कर्णेल के ह्मणोन होता, त्यास बाण लागोन जेर जाहला. आकारिक ( कर्ते ) होते त्यांची अशी अवस्था जाहली................सारांश, श्रीमंतांचा प्रताप हें खरें."* मराठ्यांनीं इष्टुर फांकड्याच्या शौर्याचें अभिनंदन करून, त्यास 'फांकडा' हें शौर्यदर्शक पद दिलें, त्याबद्दल ग्रांटडफ साहेब लिहितातः—

"It is a remarkable fact that his name is to this day familiar in the Mahratha Country by the appellation of Stewart Phakray, which expresses something more than the gallant Stewart—a circumstance that marks the strong impression made by his conduct; and what soldier, wherever he may fall, could desire a nobler epitaph, than that such a tradition should be preserved by his enemies?"

हें ह्मणणें किती यथार्थ आहे हें निराळें सांगावयास नकोच.



* रा. खरेकृत ऐ. ल० संग्रह. भा. ७ पृ० ३३९७.

मुक्काम मजकुरीं येऊन पातशाहाची मुलाजमत केली. एकशें एक मोहोर नजर पातशाहास व मुरशदज़ाद्यास पांच पांच मोहोरा नजर केल्या. पातशाहानीं साता पारच्यांचा खिलत व मोत्यांची कंठी व जेगा शिरपेंच बमय परगिरी, व ढाल-तरवार व हत्ती घोडा, येणेप्रमाणें सन्मान केला. व दौलतरामास पांचा पारच्यांचा खिलत व एक शिरपेंच व भीमसिंग बक्षी बिजेसिंगाकडील यास पांचा पारच्यांचा खिलत व शिरपेंच व हमराई सरदार यांस पंचाण्णव दुशाले व गोशवारे येणें-प्रमाणें देऊन डेरियास बिदा केले. त्याजउपरीं दोन वेळां पातशाहाचे दर्शनास आले. खिलबत जालें कीं, "आह्मीं बंदगींत हजर आहोंत. जिकडे मर्जीस येईल तिकडे चालावें. परंतु फौजेस पोटास पाहिजे." त्याजवरून पातशाहानीं उत्तर दिल्हें कीं, "तुह्मीं आह्मांस दिल्लीहून बोलाविलें, त्यास आह्मांस व आह्मांसमागमें फौज आहे ईस, खर्चाची बेगमी करून द्यावी; आणि तुह्मीं समागमें चालावें. जिकडे घेऊन जाल, तिकडे यावयास सिद्ध आहोंत." हें उत्तर राजांनीं ऐकून विनंति केली कीं, "विचार करून अर्ज करूं." ह्मणून विनंति करून आज्ञा घेऊन आपले डेरियास गेले. त्यास, दोन लाख रुपये पातशाहास खर्चास देऊन, माघारां जयपुरास जावें, या विचारांत राजे आहेत. त्यास, राजाचे घरीं भक्षा-वयास नाहीं. व इकडे पातशाहाचीही हेच अवस्था आहे ! पैका कोठें दृष्टीस पडत नाहीं ! नित्यानीं अनुपगीर गोसावी यांचे विद्यमानें राजांस तगादा खर्चाविशीं होतो. त्यांत पंचविसा हजारांची टीप आणून दिधली आहे. त्यापैकीं पांच हजार रुपये पटले. बाकी पटावयाचे आहेत. या घालमेलीस एक महिना जाला. पैका कोठेंही दिसत नाहीं. पातशाहासमागमें पांच सात हजार स्वार प्यादा आहे. त्यांतून उपासाकरितां नित्यानीं शेंपन्नास माणूस उठोन जातें. रेवाडी व गोकुळगड नजबकुलीखानापाशीं आहे त्यास पातशाहाची मर्जी आहे कीं, रेवाडी व गोकुळगड सरकारांत द्यावा. त्यास नजबकुलीखान पांचसात हजार स्वार प्याद्यांनशीं रेवाडीपासून एका कोसावर मुक्काम करून आहेत. रेवाडी व गोकुळगड सोडीत नाहीं. ह्मणतात कीं, ज्याप्रमाणें नवाब नजबखान साठ हजार रुपये दरमहा महालांत खर्चास देत होते, त्याप्रमाणें मजपासून घ्यावे, आणि मजला मुखत्यारीचा कारभार सांगावा. ह्मणून बोलणें होतें. परंतु तो जातीनशीं लबाड आहे. कारभार पार पाडील न पाडील, ह्मणून पातशाहा अंदेशांत आहेत. अद्यापि नजबकुलीखान यांची व पातशाहाची मुलाजमत जाली नाहीं. पातशाहा रागें भरतात कीं, गोकुळगड व रेवाडी सोडीत नाहीं. त्यास राजेही येथें, पातशाहाही येथें, आणि नजबकुलीखान

सातआठ हजार माणसांनशीं एका कोसावर. परंतु त्याचें पारिपत्य करून रेवाडीचा व गोकुळगडचा बंदोबस्त होत नाहीं. इतकी पातशाहात हलकी जाली आहे. कांहीं ताळ राहिला नाहीं. राजे प्रतापसिंग यांस राजे बिजेसिंग यांची न्मात यांस दिधली आहे. लग्नाचा विचार आहे. ह्मणून वारंवार राजे बिजेसिंग यांचीं पत्रें प्रतापसिंगास व भीमसिंग बक्षीस येतात कीं, तुह्मीं पातशाहासीं सामदाम करून सत्वर पुष्करास येणें. मुलीचें लग्न जालियावर पुढें सल्ला पडेल तें करूं. ह्मणून वारंवार पत्रें येतात. त्यास येथील प्रकार राजे प्रतापसिंग कैसा ठैरावून रुसकत होतील, तें प्रत्यास आलियावर मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २७५.

श्री. ५ फेब्रुवारी इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य देवराव महादेव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत ता २६ रविलाखर मुक्काम वेहलालवाडी प्रो डांगरी थालनेराहून नवकोस. तापी दक्षिण तीर प्रांत खानदेश स्वामीकृपेंकरून यथास्थित असों. विशेषः—स्वामीनीं कृपाकरून जासूदजोडीसमागमें छ ५ रविलाखरचें पत्र पाठविलें, तें छ १७ मिनहूस दोनप्रहरां पावलें. साकल्यार्थ कळला. आज्ञेप्रमाणें राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांनीं कूच करून, तापी दक्षिणतीरास मुक्काम मजकूरपावेतों आले. पुढें दरमजल येत आहेत. साकल्यार्थ पुरवणीपत्रीं विनंति लिहिली आहे. व सुभेदार यांनीं पत्र स्वामीस लिहिलें आहे. त्याजवरून श्रुत होईल. विशेष काय लिहिणें, कृपा केली पाहिजे. सेवेसीं श्रुत होय हे विनंति."

---

## लेखांक २७६.

श्री. फेब्रुवारी इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—नाजर मंजूरअलीखान, व रामरतन मोदी, सीतळदास नाजरजीचा पेशकार यांचें मानस कीं, पातशाहांनीं इस्माइलबेग व गुलाम कादरखान यांचे सामील व्हावें. त्यास, पातशाहांची मर्जी नाहीं. व कारभारी यांचें मानस कीं, कसेंही करून दिल्लीहून कूच पातशाहांचें करवून पातशाहांस नमूद करून राजश्री पाटीलबावांचें पारपत्य करावें याप्रमाणें यांचें मानस. त्यास,

पातशाहांची मर्जी कीं, गुलाम कादरखान व इस्माईलबेग यांचें पारपत्य व्हावें. या अर्थी दुखण्याचें सोंग घेऊन महालांत असतात. प्रातःकाळीं मात्र एकवेळ क्षणभर निघोन सर्वांचे मुजरे घेतात. फिरून महालांत जातात. पुन्हा बाहीर निघत नाहींत. याप्रमाणें आठ दहा रोज गुजरले आहेत. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २७७.

पैवस्ती छ० ९ जमादिलाखर. **श्री.** २५ फेब्रुवारी इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः–

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ० १७ माहे जमादिलावल मुक्काम रेवाडी जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः– आपलीं आज्ञापत्रें छ० १७ जिल्हेज व छ० २० मोहरम व छ० ५ सफर एकूण तीन पत्रें पाठविलीं. ते छ० ११ रविलाखरीं पावलीं. पत्रीं आज्ञा कीं, "पलटणाचे फितुरीमुळें राजश्री पाटीलबावांनीं विचार करून डिगेस आले. चांगलें केलें. पुढें मसलत पाहातील, तैसें करतील. सरकारांतून राजश्री पाटिलबावांचे कुमकेस अलीबहादर यांजबराबर सरंजामी व इतलाखी मातबर फौज देऊन रवाना होत आहेत. डेरेदाखल जाले आहेत. पातशाहांची मजबुती कसी आहे? याची बारीक रीतीनें चौकशी करून लिहून पाठवावें. व प्रस्तुत पाटिलबावांकडील व जैपुरकराकडील वर्तमान काय आहे तें ल्याहावें. व कलकत्तेकर इंग्रेज लखनऊस येणार, त्याजकडील बातनी राखून, कोठपर्यंत आला, लखनऊस कधीं येणार, हें लिहून पाठवावें. पुढें होत जाईल तें वरचेवर लिहित जावें. व तुह्मीं लिहिल्या अन्वयें पातशाहांचे पत्राचें उत्तर अर्जी पाठविली आहे. व नवाब मंजुरअलीखान यास खलितापत्र पाठविलें आहे. प्रविष्ट करावीं. दोहीं पत्रांतील मजकूर तुह्मांस कळला पाहिजे. याजकरितां हिंदवी नक्कल पाठविली आहे. त्याजवरून कळेल. त्या अन्वयें तुह्मीं बहुत तऱ्हेनें पातशाहांस अर्ज करून, राजश्री पाटिलबावांकडील संधान पूर्ववत् राहे ऐसें करावें. गुलामकादरखानाचा मजकूर लिहिला तो कळला." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास इकडील वर्तमान पेशजीं छ० ५ मोहरम व छ० ९ सफर व छ० ८ रबिलावल व छ० ६ रविलाखर एकूण चार विनंतीपत्रें पेशजी पाठविलीं आहेत. त्याजवरून पातशाहांकडील व राजश्री पाटिलबावांकडील व इंग्रेजांकडील वगैरे वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, पातशाहांची मर्जी बारीक

रीतीनें मना आणिलियास पातशाहा राजश्री पाटिलबावांवर बहुत संतोष आहेत. याचें कारण हेंच कीं, पाटिलबावांनीं पैका पातशाहास दिल्हा आणी राजी ठेविलें. ऐसें नवाब नजबखान यांनीं व अफराशाहबखान यांनीं कोणीही मुख्त्यारींत पैका दिल्हा नाहीं. व पातशाहांस राजी ठेविलें आहे. त्याअन्वयें राजश्री पाटिलबावांनीं पैकाही (फाटलें आहे) + + + + + + व आतांही राजश्री पाटिलबावा व अलीबहादर पातशाहांपासीं येऊन दाखल जाले. ह्मणजे पातशाहा पूर्ववत्प्रमाणेंच हजर आहेत. यांत रतीभार गुंता नाहीं. याप्रमाणें बोलणेंही करारांत आणिलें आहे............यांत संशय रतिभारही नाहीं. व पातशाहांनीं सरकारचे अर्जीचा जाब शुका दिल्हा आहे, तो पाठविला आहे. त्याजवरूनच ममतेचा प्रकार ध्यानास येईल. परंतु पातशाहांची प्रकृत ऐसी आहे कीं, जैसी सासूखाले सून आज्ञेनरूप चालते, त्याप्रमाणें जो मुख्त्यार समीप राहेल, तो जैसें बोलवील तैसें बोलतील. याप्रमाणें मुखत्याराचे मर्जीनरूप चालतात. ऐसी यांची प्रकृत आहे. जातीनसीं नेट देऊन एखादा कारभार करावा, ऐसा अर्थ नाहीं. येथील शेवटचा प्रकार येऊन बजखाक आहे. अखेरीस कांहीं बाकी राहिली नाहीं. कोणी एक जबरदस्त यांजपासीं राहून, यांस पोटास मात्र देऊन यांजला समागमें घेऊन, मनास येईल त्याप्रमाणें सलतनतीचा बंदोबस्त करावा, ऐसा समय आहे. कोणी एक जबरदस्त यांजपासीं येऊन मिळाला, तरी पातशाहा त्याचे काबूंत गेलियावर पुढें मसलत भारी पडेल. आतां जागा रिकामी आहे. कोणी माणूस ऐसा नाहीं कीं, सलतनतीस आळा घाली. याप्रमाणें येथील प्रकार आहे. स्वामींस श्रुत व्हावें ह्मणून कच्चें वृत्त येथील लिहिलें आहे. याहीवर स्वामी धणी आहेत. जे सल्ला उत्तम जाणतील, ते करतील. जैसें सातान्याचें संस्थान आपले हातीं आहे, तोच प्रकार येथीलही प्रस्तुत आहे. परंतु येऊन सत्वर सांभाळणें सल्ला आहे. मातबर फौज व शाहाणे माणूस सरदार कीं, सर्वांस वरीस दोन वरसें मायेंत घेऊन अवघ्या मुलकांत आपला काबू करून घेतला ह्मणजे पुढें मर्जी येईल त्याप्रमाणें करावें. पुणें व दिल्ली एक होऊन जाईल ऐसा समय आहे. पाहिला प्रकार विनंति लिहिली आहे. जे उत्तम सल्ला असेल ते धणी करतील. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २७८.

श्री. फेब्रुवारी इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः– राव राजा प्रतापसिंग व नजब कुलीखान दोघे एकत्र होऊन,

तमाम मेवातचा बंदोबस्त करून, आपलीं ठाणीं बसविलीं. आणि कृष्णगडांत राजश्री पाटिलबावांकडील अंमल आहे. तेथें कृष्णगडास मोर्चे लाविले आहेत. व राजे प्रतापसिंग जैपूरकर लग्न करावयास जोतपुरास जाणार ह्मणून दोन कोस जयपुरीहून बाहीर मुक्काम करून आहेत. राजे बिजेसिंग बदस्तुर जोतपुरीं आहेत. बिकानेरकर राजा मृत्यु पावला ह्मणोन त्याचा पुत्र राज्यीं बसला. त्यास, राजे बिजेसिंग यांनीं आपलेकडून राज्याचा टिका देऊन, भला माणूस पाठविला आहे. सीख लाहोरापासून तों पाणीपतपावेतों, आपलाले ठिकाणीं बदस्तुर आहेत. कांहीं शीख शहाबादवाले येऊन, तमाम अंतरवेदींत गुलामकादरखान याचा अंमल व पातशाही अंमल व जागीरदार आहेत, यांच्यापासून घासदाणा दरसैंकडा रुपये पंचवीसप्रमाणें अंमल करून, रुपाया वसूल करून घेतला. दिल्लीचे आसपास तमाम सिखांचा अंमल चौथाईचा बंदोबस्त आहे. वजीर असफद्दौला बदस्तुर लखनौस आहेत. इंग्रेज कलकत्त्यांतआहेत. आपलेकडील फौज राजश्री पाटिल बावांकडील धारराव शिंदे वगैरे कांहीं मथुरेस येऊन, रोहिल्यांचा अंमल उठऊन देऊन, मथुरा वृंदावन वगैरे आपलीं ठाणीं बसविलीं; व कांहीं फौज देवजी गवळी वगैरे श्रीयमुना उतरून कोलेकडे गेली. कोलेचे ठाणें रोहिल्याचें कापून काहाडिलें. दोनप्रहरपर्यंत कोलेचा कसबा मराठ्यांनीं लुटला. हें वर्तमान गुलामकादरखानानें ऐकून, कांहीं फौज रोहिल्यांचीही पार उतरली आहे. आपण खासा व इस्माइल बेग मिळून, आगरियास मोर्चे लाऊन आहेत. पुढें श्रवणांत येईल ते विनंति लिहूं. आगरियाचे किल्ल्यांत या दिवसांत धान्याची कमती जाली आहे ह्मणून ऐकिलें आहे. श्रीमंत साहेबांचे प्रतापेंकरून यवनाचें पारिपत्य लौकरच होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २७९.

**श्री.** ५ मार्च इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. हिंदुस्थानचे दलाल रामरतन मोदी वगैरे यांनीं व दौलतराम हलदीया, राजे प्रतापसिंगाकडील, यांनीं बटेबाजी करून पातशाहांस दिल्लींतून बाहेर काढून रेवाडीस आणिलें. जैपुराकडून राजे प्रतापसिंग व भीमसिंग जोतपूरकराकडील बक्षी यांसही रेवाडीस घेऊन आले. पातशाहांस भासविलें कीं, आपण रेवाडीस चालावें, ह्मणजे प्रतापसिंगास दाबून दोन चार लाख रुपये त्याजपासून घेऊन व जैपूरकरांची व जोतपूरकरांची फौज समागमें घेऊन, तमाम

मुलुखगिरी करून, आपला खालसा करावा. ह्मणून यांस भासविलें. तिकडे राजास भासविलें कीं, राजश्री पाटिलबावांसीं तुह्मांसीं विपट पडलें आहे. तेव्हां मागें पुढें दक्षणी फौजा येऊन तुमचें पारपत्यच करतील. याजकरितां पातशाहांस सामील करून त्यांजला समागमें घेऊन पुरतें दक्षण्यांचें पारपत्य करावें. व उज्जेनपावेतों बंदोबस्त करावा. हा विचार ठैराऊन दिल्लीहून पातशाहांस आणिलें. आपण जैपुराकडून आले. परस्पर भेटी जाल्या. पातशाहांनीं राजास वस्त्रें देऊन सन्मान केला. शेवटीं पातशाहांचे येथें खर्चाची वोढ. तेव्हां .खर्चास मागूं लागले. सक्त तगादा केला. तेव्हां राजांनीं साफ जाब दिल्हा कीं, आह्मांस राजश्री पाटिलबावांनीं खराब केलें आहे. त्यांनीं आमचे घरीं कांहीं बाकी ठेविली नाहीं. याप्रमाणें पातशाहांस विनंति केली. त्याजवरून छ० २६ जमादिलावलीं राजास सरबस्ता पागोटें व भीमसिंग बक्षी यास एक दुशाला गोषवारा व दौलतरामास एक दुशाला गोषवारा देऊन बिदा केलें. त्यासमयीं राजांनीं कांहीं नक्त व कांहीं कापड एकूण अवघें पन्नास हजारांचें वित्त दिधलें. आणि पातशाहांपासून नालकी व आलवरचे किल्ल्याची फर्द दसकत करून घेतली. आणि आज्ञा घेऊन आपले डेरियास गेले. दुसरे दिवशीं दरकूच जयपुरास गेले आहेत. त्यास बिजेसिंगाचें पत्र आलें होतें कीं, तुह्मीं तिकडून सामरास येणें. आह्मी इकडून सामरास येतों. फाल्गुन वद्य ५ मीचें लग्न विजेसिंगानीं आपले नातीचें राजे प्रतापसिंगासीं नेमिलें आहे. याजकरितां पुष्कर तीर्थावर लग्न करून, पुढें हे सल्ला ठैराविली कीं, तिकडून अलीबहादर व तुकोजी होळकर राजश्री पाटिलबावांचे कुमकेस येतात. त्यास, त्यांजकडे आपले वकील पाठऊन सामदाम करून सलुक करावा. जर हे गोष्ट जैपूरकरांनीं न ऐकली, तरी दोन लाख रजपूत दोही राज्यांतील आहेत, इतकें मरूं; तेव्हां कोणी आमची जमीन घेईल व राज्यभ्रष्ट करील. याप्रमाणें बोलणें करारांत आलें आहे ह्मणून भीमसिंग बक्षी यांनीं आह्मांस मुजरद बोलाऊन सांगितलें कीं, आह्मी पातशाहांस व यवनाचे राजास राजी नाहीं. यांची अधर्माची वर्तणूक हे आमचे राजास माफकत पडत नाहीं. याजकरितां श्रीमंतांची पांच रुपये अधिकउणे आह्मां पासून खंडणी घेतील ते आह्मांस पुरवेल; परंतु यवनाची सेवा पुरवत नाहीं. व आह्मांस कोणी राज्यभ्रष्टच करील आणि आमची जमीन हिराऊन घेईल, तर आह्मांस मरणें प्राप्त आहे. याप्रमाणें आह्मांसीं गोष्टी बोलून, आपण कूच करून राजे प्रतापसिंगासमागमें गेले. याप्रमाणें इकडील वृत्त आहे. स्वामींस निवेदन व्हावें, ह्मणून विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.

अलवरचा किल्ला सांप्रत रावराजा प्रतापसिंग याजपासीं आहे. त्याजपासून जैपूरकरांचे हातीं लागणें कठीण आहे. तूर्त पातशाहांपासून दसकत मात्र करून घेतले आहेत. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पहिजे हे विनंति."

## लेखांक २८०.

श्री. मार्च इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. गुलाम कादरखान यांनीं रामगडचा बंदोबस्त करून आंतरोली, डबईकडे बंदोबस्तास गेले आहेत. पंचवीस तीस हजार स्वार प्यादा समागमें आहे. हिंदुस्थानांत एक गुलाम कादरखान मात्र राजश्री पाटिलबावांसीं बदआमली जालियावर बळावला आहे. वरकड इस्माइलबेग आगरियाचे आसपास माहालावर अंमल करून पांच हजार स्वारप्यादांनसीं आहे. व नजबकुलीखान पांचसहा हजार स्वार प्याद्यांनिसी कानोड रेवाडी पाटोदी वगैरे माहाल दाबून आहे. हे तिघेहीजण पातशाहांसीं रुजू नाहींत. पातशाहांच्यानें यांचें कांहीं होत नाहीं. याजकरितां पातशाहा आपले फौजेची मार्गप्रतीक्षा करून आहेत. नित्यानीं एका दो रोजां पुसतात कीं, "तुकोजी होळकर व अलीबहादर कोठपर्यंत आले?" त्याजकडे निजध्यास फार लागला आहे. राजश्री पाटिलबावांबराबर फौज आहे इचा आब हिंदुस्थानांत गेला आहे. याजकरितां या फौजेचा इतबार पातशाहांस पडत नाहीं. बोलून देखील दाखविलें कीं, "बाबा, या फौजेनें कांहीं होणार नाहीं. नवी फौज येईल ते काय करील तें करो." ह्मणून बोलतात. याप्रमाणें इकडील वृत्त आहे. पुढें विशेष श्रवणांत आलियावर विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २८१.

श्री. ११ मार्च इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २ माहे जमादिलाखर मुक्काम रेवाडी जाणून स्वानंदलेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः— आपण छ० ७ रबिलाखरचें पत्र पाठविलें, तें छ० २९ जमादिलावलीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, "पातशाहाजवळ इकडील प्रकर्णी वरचेवर बोलत जावें. अलीबहादर यांची रवानगी केली आहे. मजल दरमजल पाटिलबावांजवळ जाऊन पोहोंचतील. याउपर दिरंग लागणार नाहीं. पातशा-

हांची कायेमी पाटिलबावाविसीं पक्की असावी. त्यांत वांकडें असूं नये. इंग्रेजही माघारा कलकत्त्यास गेला. श्रीमंतांचे प्रतापें सर्व बंदोबस्त पाटिलबावा करतील. वरचेवर वर्तमान होत जाईल तें लिहित जावें." ह्मणोन पत्रीं आज्ञा. त्यास, नबाब अलीबहादर मातबर फौजेनसीं हिंदुस्थानांत आले, हें वर्तमान पातशाहांनीं ऐकून श्रीमंतास शुका व अलीबहादरास शुका ऐसे लिहून, आमचे स्वाधीन केले; व अनुपगीर गोसावी हिंमतबहादर यांनीं आपले खलिते स्नेहवृद्धीचे लिहून दिल्हे. त्याप्रमाणें सरकारचे नांवाचा खलिता व शुका व आपले नांवाचा खलिता ऐसे पाठविले आहेत. त्याजवरून सविस्तर ध्यानारूढ होईल. उत्तरीं लोभ करणार स्वामी समर्थ आहेत. पातशाहांची कायममिजाजी ह्मणावी तरी राजश्री पाटिलबावा रेवाडीस आले. आणि मोंगलिये वगैरे मंडळी समीप होती, त्यांच्या ह्मटल्यानें पाटिलबावांस लिहून पाठविलें कीं, तुह्मीं तूर्त दिल्लीस न यावें. त्याचें फळ आतां दृष्टीस पडलें, कीं जयपूरकर राजे आले. दोन महिने घोळ पडला. शेवटीं पातशाहा दिक जाले. राजाकडून कांहीं प्राप्त न जालें. ते रुकसत होऊन माघारा जयपुरास गेले. आतां नजबकुलीखान यांचा घोळ पडला आहे. पातशाहांची मर्जी कीं रेवाडी व गोकुळगडचा किल्ला सोडावा. व नजबकुलीखान किल्ला व रेवाडीचा परगणा सोडीत नाहीं, नजबकुलीखान चौकोसांवर एक हजार स्वार व पांच पलटणें प्यादे व पस्तीस तोफा या सरंजामानसीं उतरला आहे. तो पातशाहांपासीं मुलाजमतीस येत नाहीं. यांच्यानें त्याचें पारपत्य होत नाहीं. पातशाहांपासीं दोन हजार स्वार व तीन पलटणें व तीस पस्तीस तोफाही आहेत. परंतु भक्षावयास नाहीं, ह्मणून माणूस मात्र दिक आहे. यांचे कायम मिजाजीचा प्रकार ह्मणावा तरी मेणाचें नाक यांचा मिजाज आहे. जो जबरदस्त मातबर मुख्त्यार जवळ राहेल, तो जैसें यांस नाच नाचवील, तैसें जातील. याप्रमाणेंच तीस वरसें पातशाहात केली आहे. आतां खर्चाची तंगी; फौजेची तडातोड; याजमुळें बहुत दिक आहेत. कोणीं एकजणानें येऊन आह्मांस भक्षावयास मात्र द्यावें, आणि मनास येईल त्याचें पारिपत्य करून मुलकाचा बंदोबस्त करावा, ऐसें यांचें मानस आहे. पुढें घडल्यांत येईल तें विनंति लिहूं. बहुतं काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.

पातशाहांनीं आपला शुका व अकबरशाहा पातशाहाचा पुत्र यांनीं स्नेहवृद्धीचें पत्र श्रीमंत साहेबांस लिहिलें आहे. व गोसावी अनुपगीर हिंमतबहादर तूर्त पातशाहापासीं आहेत. यांनीं आपला खलिता पाठविला आहे. त्यास तीही पत्राचा मजकूर मनन करून उचीत असेल त्याप्रमाणें उत्तरें पाठवावीं. सर्वांस श्रीमंत साहेबांकडील उर्जिताची उमेद आहे. कळावें बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."



**औरंगजेब.**

( वृद्धावस्था. )

पैवस्ती छ० ३ रज्जब
समान समानीन चैत्र

## लेखांक २८२.

श्री. ११ मार्च इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ० २ माहे जमादिलाखर मुक्काम रेवाडी जाणून स्वानंद-लेखनआज्ञा केली पाहिजे. विशेष:—सरकारचें आज्ञापत्र छ० ७ रविलाखरचें सादर जालें, तें छ० २९ जमादिलावलीं पावलें. शिरसा वंदून सनाथ जालों. पत्रीं आज्ञा कीं, "तिकडील वर्तमान वरचेवर लिहित जाणें. व चिरंजीव अली-बहादर यांची रवानगी फौजसुद्धां केली असे. दरमजल तिकडे येऊन पोहोंचतील." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास इकडील वर्तमान, पेशजीं छ० १७ जमादिलावलीं विनंति-पत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, नवाब अलीबहादर यांचें येण्याचें वर्तमान पातशाहांनीं ऐकून, नवाब अलीबहादर यांस शुका लिहून दिल्हा आहे. तो त्यांजकडे रवाना करून दिल्हा. व आह्मींही येथील वर्तमान त्यांस लिहिलें आहे. व आपणासही पातशाहांनीं शुका पाठविला आहे, त्याजवरून सविस्तर कळेल. व राजे हिंमतबहादर अनुपगीर गोसावी यांनीं आपले स्नेहवृद्धीचा खलिता पाठविला आहे. उत्तरीं लोभ करणार स्वामी समर्थ आहेत. वरकड इकडील वृत्त सविस्तर राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे. त्याजवरून ध्यानारूढ होईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २८३.

श्री. मार्च इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. जुवाबख्त पातशाहाजादा दिल्लीहून कुटुंब घेऊन, आगरियास इस्माइलबेगापासीं गेले. त्यासीं बनाव न बसला. तेथून कूच करून गुलाम कादरखान यांजपासीं गेले. त्यांसींही बिधन बसली. निदान तेथूनही कूच करून फरोकाबादेस गेले. तेथें गेलियावर वजिरास पत्रें पाठविलीं. त्यांनीं एक लाख रुपयांची हुंडी खर्चास पाठविली, आणि अर्जी पाठविली कीं, हें घर आपलें आहे, सुखरूप यावें. त्याजवरून पातशाहाजादा लखनऊस गेला आहे. तेथें कुटुंब ठेऊन आपण कलकत्त्यास जाणार. ह्मणून वर्तमान आहे. त्याज-वरून विनंति लिहिली आहे. वजीर असफदौला बदस्तुर लखनऊस आहेत.

इंग्रेज लाट कलफदान सितेन साहेब बदस्तुर कलकत्यास आहेत. सीख लाहोरापासून तों पाणिपतपावेतों बदस्तुर आपलाले ठिकाणीं आहेत. कांहीं किरकोळी सीख दिल्लीचे आसपास लुटीत फिरतात. व तहमूरशाहा अबदाली कंदारापलीकडे मुलुखगिरीस गेले आहेत. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २८४.

**श्री.** मार्च इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. राजे बीजेसिंग यांस पातशाहांनीं साता पारचांचा खिलत व हत्ती घोडा व जवाहीर, जेगा, शिरपेंच, मोत्याची कंठी, तरवार येणेप्रमाणें सर्फराज + + + याजसमागमें सरंजाम देऊन पाठविला आहे. त्याचें कारण कीं, त्यांनीं कांहीं खर्चास पाठवावें. ह्मणून इतका शिष्टाचार करून पाठविला आहे. भीमसिंग बक्षी यांनीं अजमेरचे किल्याविसीं फर्द पातशाहांस दिधली कीं, आह्मांस बक्षीस द्यावा. तूर्त अंमलही त्यांचाच अजमेरींत आहे. त्या फर्देवर पातशाहांनीं दसकत केलें कीं, माकुल पेशकस सरकारांत दिधलिया देऊं, ह्मणून दसकत करून दिल्हें आहे. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २८५.

**श्री.** ५ एप्रील इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—छ २७ जमादिलाखरीं राजश्री पाटीलबावांची फौज देवजी गवळी व राणेखान भाई वगैरे चमेल उतरून, ढवळपुराअलीकडे आगरियासमीप आली. आगरियाहून इस्मायलबेग कूच करून ढवळपुराकडे गेला. इस्मायलबेगाशीं थोडी बहुत करोली फौजेची होऊन, राजश्री पाटीलबावांची फौज माघारा चमेल उतरून गेली. इस्मायलबेग चमेलेचे कांठीं ढवळपुरावर मुक्काम करून होता. त्यास, राणेखान व रायाजी पाटील वगैरे फौज, करोलीचे रोखें चमेल उतरून आग्र्यास आले. तेथें इस्मायलबेगाचा बाप व उमरावगीर गोसावी आगरियाचे बंदोबस्तास होते. यांसीं लढाई जाली. उमरावगीर जखमी जाला. उमरावगिराचें पथक लुटून, उमरावगिरास धरून घेऊन, आगरियापासून आठ कोंस भरतपुराचे रोखें इछनेरा गांव आहे तेथें

घेऊन जाऊन, तेथून उमरावगिराची रवानगी राजश्री पाटीलबावांकडे चमेलपार केली. व आगरियाचे किल्ल्यांत अंमल बदस्तुर पाटीलबावांचा आहे, व शहरांत बंदोबस्त इस्मायलबेगाचा आहे. आग्र्यास उमरावगिराशीं लढाई जाली, त्यास धरूस नेलें, हें वर्तमान इस्मालयबेगानें ऐकून, माघारा कूच करून आगरियास आला. गुलामकादरखान यमुनापार होते. त्यासीं एकवाक्यता करून, त्यांचे फौजेचा उतारा करून आगऱ्यास एकत्र जाले. तेथून गुलामकादरखान यांनीं पातशाहांस अर्जी पाठविली होती कीं, आगरियास राजश्री पाटीलबावांची फौज दाखल जाली; पुढें आह्मांस काय आज्ञा? त्याजवरून, तूर्त येथें मुखत्यार नाजरजी व रामरतन आहेत, यांनीं पातशाहांचा शिक्का व आपलीं पत्रें गुलामकादरखान यांस लिहून पाठविलीं कीं, तुह्मीं व इस्मायलबेग एकत्र होऊन, आगरियाचा किल्ला आपले काबूंत ठेवून, राजश्री पाटीलबावा चमेल उतरेत तें करणें; व त्यांची फौज आछनेरास उतरली आहे, तीस चमेल पार करून देणें; ह्मणोन पत्रें गेलीं आहेत. व पातशाहांची मर्जी आहे कीं, पाटीलबावांचा पुन्हां बंदोबस्त होऊन, आह्मीं त्यांनीं एकत्र होऊन, गुलामकादरखान व नजबकुलीखान व इस्मायलबेग यांचीं पारपत्यें करावीं. व नाजरजीचें व रामरतन मोदी वगैरे मंडळी आहे यांचें मानस कीं, राजश्री पाटीलबावा नसावे. इस्मायलबेग व गुलामकादरखान हे असावे. असे दोन प्रकार एका घरांत जाले आहेत. धन्या चाकराची चित्तशुद्धता नाहीं. पुढें अंमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २८६.

श्री. २४ एप्रिल इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:— इस्माईलबेग, महमदबेग अमदानी याचा पुतण्या, पांच सात हजार स्वारप्यादा समागमें घेऊन, राजे प्रतापसिंग जयपूरकर यांजपासून आज्ञा घेऊन अकबराबादेस आले. त्यास निळोबा ह्मणून शेणवाई, राजश्री बाळोबा पागनिसाकडून अकबराबादेस किल्लेदार आहे, व राजश्री रायाजी पाटील शिंदे सात आठ हजार स्वार प्याद्यांनिसीं अकबराबादेबाहेर होते, त्यांसीं व इस्माईलबेगासीं लढाई जाली. शेवटीं रायाजी पाटील पळून भरतपुरास गेले. इस्माईलबेग यानें शहरांत अंमल करून, आगरियाचे सराफांपासून पस्तीस हजार रुपये दंड घेतला. व नौबतराय खत्री, राजश्री पाटीलबावांकडील कारभारी,

त्याचें घर जप्त केलें व खणती लाविली. त्याचे हवेलींतून सा हजार मोहोरा व शालेचे गठ्ठे, व बनातीचे गठ्ठे, व सोनें रुपें मिळून दोन लक्षांचें वित्त सांपडलें. व राजे नारायणदास, अफराशाहाबखान याचा दिवाण, त्याचेंही घर आगरियांत होतें, तेंही खाणिलें. त्यांतूनही लाखा दिढा लाखांचें वित्त सांपडलें. तेणेंकरून तमाम फौज ताजी होऊन, नवी निगादास्त करितो. वीस पंचवीस हजार स्वार प्याद्यांचा जमाव जाला आहे. व शहरांतून मोर्चे लागू करून, किल्याचे दरवाजापाशीं जुम्मा महजद आहे, तेथें जाऊन मोर्चे लागू जाले आहेत. किल्याचा दरवाजा व खिडकी बंद जाली आहे. परंतु निळोबानें किल्ला अद्यापि राखिला आहे. जर जलदीनें उपराळा जाला, तर आगरियाचा किल्ला रहातो. नाहीं तर मग कोठेंही दम घ्यावयास जागा नाहीं. राजश्री रायाजी पाटील व कांहीं फौज रंजितसिंग जाटाची जमा होऊन, दहाबारा हजार आगरियाचे आसपास फिरतात. परंतु इस्माईलबेगाचे फौजेवर हात पडत नाहीं. व त्याचे फौजेवर आपले कडील फौजेची इभ्रतही नाहीं. पुढें निदर्शनास येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २८७.

श्री. २९ एप्रील इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २२ माहे रज्जब मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः- पेशजीं छ २१ जमादिलाखरीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन वृत्त श्रुत जालें असेल. सरकारचें आज्ञापत्र छ० २९ रविलाखरचें सादर जालें. तें छ० ७ रज्जबीं मुक्काममजकुरीं पाऊन सनाथ जालों. पत्रीं आज्ञा कीं, "राजश्री पाटिलबावा ग्वालेरीस आले. तिकडे कोणी नाहीं. मोकळें पडलें. त्याअर्थीं ज्याचें मनास जैसें येतें, तैसें करितो. व पातशाहांचेंही अंतःकरण स्थिर नाहीं. असो. तुह्मीं पातशाहासीं इकडील लक्षाविसीं बोलत जावें. सरकारांतून राजश्री पाटिलबावांचे कुमकेस अलीबहादर मातबर फौजेनसीं रवाना जाले. गंगा उतरल्याउपर लौकर पाटिलबावांकडे जातील. व राजश्री तुकोजी होळकर सुभेदार यांचीही रवानगी होत आहे. श्रीमंतांचे प्रतापेंकरून सर्व गोष्टी घडोन येतील. पातशाहांचा मात्र खमीर असावा. त्यांत चलबिचल होऊं नये." ह्मणोन लिहिलें. त्यास येथील प्रकार तर, जो कोणी

पातशाहांपासीं राहील, त्याचेंच लक्षावर सर्व बंदोबस्त आहे. व पातशाहांचा खमीर पक्का नाहीं. मेणाचें नाक आहेत. जो जबरदस्त जवळ येऊन राहील, त्याचे मर्जीप्रमाणें पातशाहांनीं वर्तावें. दुसरा अर्थ रतीभार नाहीं. याप्रमाणें येथील प्रकार आहे. या दिवसांत हिंदुस्थानांत श्रीभागीरथीअलीकडे गुलामकादरखान रोहिले व इस्माईल बेग आगरियाचे आसपास ऐसा उभयतांनीं मुलुख दाबिला आहे. उभयतांपासीं फौज बारा तेरा हजार व प्यादे पंचवीस हजार व शें सवाशें तोफा येणेंप्रमाणें जमाव दोघां मिळून आहे. हे मोंगली फौज हमेशा सरकारचे फौजेनें मारलेली आहे. हिंदुस्थानी फौजेचा जमाव आहे. व राजश्री पाटीलबावापासीं वीस पंचवीस हजार स्वारप्यादगान मिळून आहे. व तोफा दोन अडीचशें आहेत. याखेरीज राजे रंजितसिंग जाट यांचा जमाव पंचवीस तीस हजार स्वारप्यादा आहे. ते व राजश्री पाटिलबावा एकविचारें आहेत. परंतु राजश्री पाटिलबावा चमेलपार कुवारी नदीवर आहेत. व रंजितसिंग जाट भरतपुराजवळ आहत. याप्रमाणें दोघे सरदार दों ठिकाणीं आहेत. दोघाकडील फौजा मात्र गुलामकादरखान व इस्माईल बेग यांचे फौजेचे आसपास आठदाहा कोसांचे अंतरानें आहेत. जिकडे हे दोघेजण रूख करितात, तिकडे फौज ठरत नाहीं. राजश्री पाटिलबावाकडील व रंजितसिंगाकडील फौज पळून जाते. याप्रमाणें अवस्था आहे. राजश्री पाटिलबावांची व रंजितसिंगाची फौज मिळून पन्नास साठ हजार स्वारप्यादा आहे. परंतु रोहिले व इस्माईलबेग यांजवर शेर आहेत. मांड धरून झुंज पावत नाहींत. याप्रमाणें वृत्त आहे. पुढें नवाब अलीबहादर व राजश्री तुकोजी होळकर सुभेदार या दोघांतून कोणी एक फौज येऊन, राजश्री पाटिलबावांचे फौजेचे सामील जालियावर, यवनांचें पारिपत्य होणें तें होईल. परंतु तूर्त यवनांचे फौजेचा दाब राजश्री पाटिलबावांचे व रंजितसिंग जाट यांचे फौजेवर आहे. ह्मणोन वरचेवर वर्तमान पातशाहांचें येथें आहे. त्याजवरून विनंति लिहिली आहे. व पातशाहांचें अंतःकरण तर आपलेकडे कायेवाचेमनेंकरून आहे. व राजश्री पाटिलबावाकडे आस्थाही विशेष आहे. परंतु तूर्त नाजर मंजुरअलीखान व रामरतन मोदी व सितलदास नाजरजीचा पेशकार हे जबरदस्त हजुरांत आहेत. याजकरितां पातशाहांकडून मनस्वीपणें ज्यास जो शुका लिहविणें तो मुनसीकडून लिहून, पातशाहांपासून मोहर करून घेऊन पाठऊन देतात. याजकरितां पातशाहांची कायममिजाजी दृष्टीस पडत नाहीं. व पातशाहांची जुरत ऐसी नाहीं कीं, तुह्मीं हें पत्र गैरवाजवी लिहविलें आहे; याजवर मी मोहर करून

देत नाहीं. याप्रमाणें परिछिन्न पातशाहांच्यानें बोलवत नाहीं. ह्मणून पातशाहा मुखत्याराचे हातून विकले जातात. याप्रमाणें येथील वृत्त आहे. आह्मीं आपले आज्ञेप्रमाणें आपले कडील लक्षाविसीं पातशाहांसीं विनंति करून यांचें चित्त आपले-कडे हमवार करून ठेविलें आहे. श्रीमंतांचे प्रतापेंकडून सर्व बंदोबस्त पूर्ववत प्रमाणें घडून येईल. चिंता नाहीं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे, हे विनंति."

---

## लेखांक २८८.

श्री. एप्रिल इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:– इस्माईलबेग व गुलामकादरखान आगरियाहून कूच करून भरतपुरास गेले. भरतपूरचे पेटेवर लढाई जाटासीं जाली. निदान तीन हजार माणूस परस्परें मारलें गेलें. तेथें उभयतांचा यत्न न चालतां, तेथें खटे होऊन कुंभेरीस आले. कुंभेरचा किल्ला खाली होता. तें शहर लुटून कूच करून डिगेस गेले. डिगेचे किल्ल्यास मोर्चे लाविले. किल्ल्यांतून जाटाकडील लोक निघाले. त्यांनीं तमाम मोर्चे मारून, दोन तीन हजार रोहिला मारला गेला. आपले कडील फौज राणेखानभाई व रायाजी पाटिल आदिकरून यांनीं रसदबंद केली. पांचशेर अन्न रोहिल्याचें लष्करांत जालें. तेव्हां डिगेहून कूच करून माघारा आगरियास उभयतां आले आहेत. आगरियाचे आसपास आपले सरकारची फौज पांचा साता कोसांवर रसदबंद करून आहे. आगरियाचे शहर इस्माईलबेगानें तमाम लुटून मारून ताराज केलें आहे. वस्तीचे लोकांत कोणांत हाल ठेविला नाहीं. पुढें काय मसलत करतील तें मागाहून लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० ४ रमजान

## लेखांक २८९.

सन तिसा समानीन ज्येष्ठमास. श्री. १६ मे इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ९ माहे साबान मुक्काम लष्कर नजिक श्री-मथुरा जाणून स्वानंदलेखाज्ञान केली पाहिजे. विशेष:– स्वामीनीं कृपा करून

पत्रें छ० २१ रविलावलचें व छ० १४ रबिलाखरचें तीळशर्करायुक्त पाठविलें, तें छ० ४ माहे साबानीं पाऊन तीळ शर्करा स्वीकार करून सनाथ जालों. पेशजीं विनंतिपत्रें छ० २९ जमादिलाखरचीं सेवेसीं पाठविलीं आहेत. तें प्रविष्ट होऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जाहालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, राजश्री पाटिलबावांनीं भुजंगराव बाजी यांस राजश्री सुभेदारांकडे रामपुऱ्यास पाठविलें आहे. व पत्रें पाठविलीं त्यांत मजकूर कीं, आपली मर्जी असली कीं दोन तीन मजला आह्मींच पुढें यावें, अथवा राजश्री आबा चिटणीस यांस पाठवावें, ऐसें असल्यास येथून सिद्धताच आहे. नाहीं तरी आपण लौकर स्वार होऊन येथें यावें. येथें आल्यावर कित्येक जाबसाल आहेत, ते आपले आल्याखेरीज घडत नाहीं. याप्रमाणें पत्रें पाठविलीं आहेत. तेथून राजश्री सुभेदारांचीं पत्रें येतात कीं, येथील गुंता उरकोन सत्वरच तिकडे येतों. राजश्री पाटिलबावांचें मानस आहे कीं, राजश्री सुभेदार आल्यावर हें सर्व सलतनत नवाब अलीबहादर व राजश्री सुभेदार यांचे स्वाधीन करून, आपण छावणीस उज्जनीस जावें. व राजश्री आंबोजी इंगळे यांजबरोबर दहा पंधरा हजार फौज ठेऊन, येथें नवाब अलीबहादर यांचे तैनातीस ठेवावें. ऐसी सलाह ठैरली आहे. जोतपूरकराकडील वकील, राजश्री सुभेदार यांजपासीं येऊन, जाबसाल करितात कीं, आपण अथवा नवाब अलीबहादर यांणीं सरकारसंबंधीं मामला करून घ्यावा. व राजश्री पाटिलबावांनीं आमची सफाई करून द्यावी. त्यास अद्यापि कांहीं अमलांत आलें नाहीं. राजश्री पाटिलबावांजवळही वकील जोतपूरवाल्याकडील येणार ह्मणून वदंता आहे. हिंमतगीर गोसावी यांस राजश्री पाटीलबावांनीं फेरोजाबाद सादाबाद वगैरे दोन अडीच लक्षांचा सरंजाम लाऊन दिल्हा आहे. राणेखानभाईबरोबर तेथें सर्वांचे जाबसालांत आहेत. सरकारची अर्जी पातशाहास पाठविली. त्यास हजुरांत पावती करून, उत्तर घेऊन सेवेसीं पाठवितों. सेवेसीं श्रुत होय. वरकड सविस्तर वृत्त पुरवणी पत्रावरून व अखबरा पाठविल्या आहेत त्यांजवरून ध्यानारूढ होईल. सदोदित कृपापत्रीं सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.

सेवेसीं—विनंति सेवक गंगाधर शिवराम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसीजे. सदोदित कृपापत्रीं सनाथ करणार धनी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञापना."

---

पैवस्ती छ० ४ माहे रमजान

## लेखांक २९०.

सन तिसा समानीन ज्येष्ठमास. श्री. १६ मे इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ० ९ माहे साबान मुक्काम लष्करनजिक श्रीमथुरा जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– स्वामीनीं कृपा करून पत्र व तीळ शर्करायुक्त पाठविले, ते छ० १ माहे मजकुरीं पाऊन शिरसा वंदून सनाथ जालों. पेशजीं विनंतिपत्रें छ० २९ जमादिलाखरचीं सेवेसीं पाठविलीं आहेत. तें प्रविष्ट होऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जाहालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, राजश्री सुभेदार रामपुऱ्यास मुक्काम करून आहेत. जैपूरवाल्याकडील मामला रूपकर आहे. राणेखानभाई यांणीं पांच कोस अलीकडे कूच करून आलेत. लवकरच लष्करांत येणार आहेत. इस्मायलबेग कानोड ........गीर्द किल्ल्यास मोर्चे लाऊन आहे. राजश्री बाळोजी शिंदे व अहमद अलीखान राजश्री पाटिलबावांपासीं आले आहेत. शाहानिजामुद्दी यांस पातशाहापासीं कारभारी ठेवावें ऐसा विचार राजश्री पाटिलबावांचा आहे. सेवेसीं श्रुत होय.

वरकड सविस्तर वृत्त राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे. त्याजवरून ध्यानारूढ होईल................पत्रीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २९१.

श्री. २२ मे इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. सर्फराज खोजा, राजे बिजेसिंग याजकडे, रेवाडीचे मुकामीहून पातशाहांकडील खिलत वगैरे सरंजाम घेऊन गेला होता. त्यास, बिजेसिंगास खिलत वस्त्रें देऊन माघारा आला. राजे मजकुरांनीं, खोज्यास वस्त्रें व नख्त साहाशें रुपये खर्चास देऊन, पातशाहांस दोन नागोरी गाई देऊन, बिदा केला. येतेसमयीं खोजानें राजांस विनंति केली कीं, पातशाहांस कांहीं तोफा ताहेफ पेशकस द्यावयाविसीं काय आज्ञा? त्यास, राजेमजकुरांनीं सांगितलें कीं, "जे पातशाहांस तोफा ताहेफ पाठविणें ते मागाहून आह्मी आपले वकिलासमागमें

देऊन पाठवूं." ह्मणोन बोलून यास बिदा केलें. तो दिल्लीस छ० १५ साबानीं पातशाहांपासीं येऊन दाखल जाला. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २९२.

श्री. मे-जून इ. स. १७८८

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं.

पोष्य दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील. कुशल तागाईत छ माहे साबान मुक्काम लखनौ जाणोन स्वकीय कुशल लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः- अलीकडे पत्र येऊन सांभाळ न जाला, तेणेंकरून सचिंत असे. तरी पत्रीं सनाथ केलें पाहिजे. यानंतर इकडील वर्तमानः- सरकारांतून वजिराचे नजराण्याकरितां हत्ती राजश्री बाळाजी गोविंद यांजकडून देविला होता. त्यास हत्ती येण्यास दोन तीन मास लागले. नंतर आह्मी निघोन लखनौस आलों. त्यास, नवाब वजीर अयोध्येस गेले आहेत. आह्मांस येथें रहावयास सांगितलें. पिराची ज्यारत करून, आखर शाबान येणार, ह्मणून पत्रें आलीं होतीं. त्यांचें येणें जाल्यावर नजराणा गुजरून देऊं. यावर राजश्री पाटीलबावांकडील वर्तमान डांकेंत आलें, तें पुरवणी बंदावरून निवेदन होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २९३.

श्री. १४ जून इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ९ माहे रमजान मुक्काम दिल्ली जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः- आपलें पत्र छ १० जमादिलाखरचें आलें, तें छ ४ साबानीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, "अलीबहादर यांजबराबर फौज देऊन रवाना जाले आहेत. ते बऱ्हाणपूरचे सुमारें गेले. महेश्वराकडून राजश्री पाटिलबावांकडे जातील. व राजेश्री तुकोजी होळकर यांचीही रवानगी फौजसुद्धां जाली आहे. तेही लौकर तिकडे येतील. पातशाहांचा मिजाज मात्र कायम असावा. याविसीं तुमचें बोलणें होतच असेल. श्रीमंतांचे प्रतापेंकरून सर्व यथास्थित होईल." ह्मणून लिहिलें. त्यास, इकडील वर्तमान पेशजीं छ० २२ रजबीं पत्रें पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त कळलेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा

दिल्लींत आहेत. इस्माइलबेग व गुलामकादरखान आगरियांत आहेत. त्यांचे आसपास आपली फौज, राजश्री पाटिलबावांकडील पांचा साता कोसांवर रसदबंद करून आहेत. राजश्री पाटिलबावा खुद्द चमेलपार कुवारी नदीवर ग्वालेरीनजिक आहेत. इस्माइलबेग व गुलामकादरखान यांनीं आपलेकडून गुलमहमदखान व सिलेमाबेगखान ऐसे दोघे जमातदार पातशाहांपासीं पाठविले आहेत कीं, आपण कूच करून आगरियास यावें. त्यास येथें नाजर मंजुरअलीखान व शितलदास व रामरतन मोदी व राजे हिंमतबहादर अनुपगीर गोसावी ऐसे पातशाहापासीं आहेत. हे सर्व गुलामकादरखान व इस्माइलबेग यांसीं मिळाले आहेत. राजश्री पाटिलबावांसीं प्राणापावेतों आकस ठेवितात. त्यास यांचेंही मानस कीं, पातशाहांनीं बाहीर निघावें; आगरियास चालावें; ह्मणून वारंवार पातशाहांस विनंति करितात. त्यास पातशाहांनीं साफ उत्तर दिल्हें कीं, "हे दिवस गरमीचे आहेत. आमचें जाणें आगरियास होत नाहीं." याप्रमाणें जाब देऊन आपले फौजांची व सरदारांची मार्गप्रतीक्षा करून आहेत. पातशाहांचा मिजाज आपलेकडे अद्याप कायम आहे. आह्मीही समय पाहून पातशाहांस विनंति कायम मिजाजीविसीं करितों. हें वर्तमान नाजरास समजलें. व राजश्री पाटिलबावांकडे आह्मीं पत्रें पाठविलीं होतीं, त्यांचे जाब आह्मांकडे येत होते, ते नाजराचे येथें धरले गेले. त्याजवरून नाजरानें राजश्री शंकराजी सखदेव याजवर इतराजी करून घरीं बसविलें. आणि आमचे घरचा गुलाम लल्लू ह्मणून आहे. हा पंत मशारनिल्हेसीं फुटून, नाजरासी मिळून वकालतेचे कारभारास प्रवर्तून आतां दरबारास तोच जात असतो. त्यास, नाजरास व शितलदासास कांहीं पत्रें तीर्थस्वरूप राजश्री देवराव तात्यांचीं व राजश्री दामोदरपंत यांचींही आलीं आहेत कीं, शंकराजी सखदेव आमचे चाकर नाहींत. तुह्मीं त्यांचे हातून काम न घ्यावें. ह्मणून पारसी पत्रें लल्लूनें नाजरास व शितलदासास गुजराणलीं. तो दस्तऐवज यांनीं धरून, पंत मशारनिल्हेस घरीं बसविलें आहे, आणि लल्लू गुलामाचे हातून नाजर काम घेतो. याप्रमाणें येथें बखेडा जाला आहे. आपले आज्ञापत्राची मार्गप्रतीक्षा करितों. ज्याप्रमाणें आज्ञापत्र येईल त्याप्रमाणें करूं. पारसी पत्रें लल्लूनें नाजरास तीर्थस्वरूपाचें नांवचीं गुजराणलीं. मग हें पत्रें खरीं त्यांजकडून आलीं, किंवा यानें खोटीं पत्रें करून आपण पेश पडावें ह्मणून खोटीं पत्रें मोहरा करून गुजराणलीं, हें कांहीं समजलें नाहीं. कच्चें वृत्त आपल्यास कळावें, ह्मणोन विनंति लिहिली आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक २९४.

**श्री.** १४ जून इ. स. १७८८

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ ९ माहे रमजान मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनें· करून यथास्थित असे. विशेष:– आज्ञापत्र छ १० जमादिलाखरचें सादर जालें, तें छ ४ साबानीं शिरसा वंदून सनाथ जालों. पत्रीं आज्ञा कीं, "याप्रमाणें पुढें होत जाईल तें वरचेवर लिहीत जाणें." ह्मणून आज्ञा. त्यास, इकडील सविस्तर छ २२ रजबीं विनंतिपत्रें पाठविलीं आहेत, तें सेवेसीं प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा दिल्लींत आहेत. गुलाम कादरखान व इस्माइलबेग आगरियांत आहेत. आपले सरकारच्या फौजा राजश्री पाटिलबावांकडील आगरियाचे आसपास पांचा साता कोसांवर रसद बंद करून आहेत. गुलाम कादरखान व इस्माइलबेग यांनीं आपलेकडून गुलमहमदखान व सिलेमा बेगखान ऐसे दोन जमातदार पातशाहांकडे पाठविले आहेत कीं, आपण कूच करून आगरियास यावें. त्यास, पातशाहांनीं उत्तर साफ दिल्हें कीं, आमचें येणें या गरमीचे दिवसांत होत नाहीं. नाजर मंजूरअल्लीखान व रामरतन मोदी व राजे अनुपगीर गोसावी यांचेंही मानस आहे कीं, पातशाहांनीं आगरियास जावें. त्यास, पातशाहांचें लक्ष आपल्याकडे व सरदार व फौजाकडे आहे. याजकरितां हे दिल्ली बाहीर निघत नाहींत. पुढें ठरेल तें विनंति लिहूं. कृपा करणार धणी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विज्ञापना."

---

## लेखांक २९५.

**श्री.** १५ जून इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता। छ १० माहे रजमान मुक्काम दिल्ली स्वामींचे कृपावलोकनें-करून यथास्थित असे. विशेष:– पेशजीं विनंतिपत्रें पै दरपै सेवेसीं पाठविलीं होतीं, तें सेवेसीं प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा दिल्लींत आहेत. नबाब नाजर मंजूरअल्लीखान कारभारी आहेत. गुलामकादरखान रोहिला व इस्माइलबेग यांनीं डिगेस मोर्चे लाविले होते; तेथून गडां-

तून जाटाचे लोक बाहीर निघाले. व बाहेरून राणेखानभाई वगैरे फौज राजश्री पाटीलबावांकडील त्यांनीं चांगली जरब दिल्ही. तेथून जरब खाऊन, हळू हळू हिकमतीनें आगरियास येऊन मसलत केली कीं, आधीं आगरियाचा किल्ला हस्तगत करावा व पातशाहांस दिल्लीहून बोलावून किल्ल्यांत ठेवावें; आपण पुढें चमेल नदीवर येऊन झुंजावें. हा निश्चय ठैरावून, तमकीनखान खोजा नाजराकडील उभयतांपासीं जाबसालास होता, त्यास व नसीमखान व सजनखान वगैरे चार जमातदार पायदळ रोहिले ऐसे दिल्लीस पाठविले आहेत कीं, पातशाहांस अर्ज करून अंतरवेदचे परगणे पातशाहांचे खर्चास देऊन, पातशाहांचें कूच आगरियास करवावें. त्यास एकदोन दिवसांत अवघे येऊन दिल्लीस पोंहचतील. पातशाहांचे मनांत सहसा दिल्लीबाहेर निघावयाचें नाहीं. या गुलामाचें तोंड पाहूं नये. अंतस्थ लक्ष एकनिष्ठ राजश्री पाटीलबावांकडे लाविलें आहे. सरकारची फौज राजश्री तुकोजी होळकर सुभेदार व अलीबहादर यांचे यावयाचें वृत्त हजुरांत अर्ज केला. त्यास मर्जी बहुत प्रसन्न जाली. नित्य वर्तमान पुसतात. पातशाहा सरकारचे फौजेची वाट पाहतात. दुसरा अर्थ नाहीं. चमेल अलीकडे फौज आली ह्मणजे हे खोलून शामील होतील. अलीबहादर व होळकर यांस खिलत जवाहीर वगैरे पाठविणें ठैरलें आहे. राजे हिंमतबहादर अनुपगीर गोसावी हजुरांत आहेत. फौजेची मुख्त्यारी यांस होणार. तेही सरकारचाकरीस तत्पर आहेत. गुलाम कादर व इस्माइलबेग, तमकीनखानखोजा वगैरे यांस इकडे रवाना करून, आगरियाचे किल्ल्यास मोर्चे निकडीनें लाऊन बसले आहेत. परंतु किल्ला मजबूत आहे. बाहेरून राणेखान भाई वगैरे राजश्री पाटीलबावांकडील फौज दोनदोन कोस चहूंकडून रसद बंद करून उभे राहतात. श्रीकृपेनें गुलामावर दाब बहुत बसला आहे. देवजी गवळी वगैरे फौज पांच सात हजार श्रीमथुरेवरून यमुना उतरून अंतरवेदींत मारामार (करितात) लुटतात. तमाम मुलकांत हुलड जाला, यास्तव गुलामकादरखानही घाबरला आहे. यमुना उतरून अंतरवेदींत जाणार. वरकड सविस्तर वृत्त नानांचे पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून निदर्शनास येईल. होईल तें वृत्त मागाहून विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञप्ति."

---

## लेखांक २९६.

**श्री.** जून इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:— लखनऊहून वर्तमान आलें कीं, जवाबख्त पातशाहाजादा

श्रीकाशीस छावणीची तयारी तेथें करविली होती. त्यास छ २५ साबानीं पोटांत दरद जाला! हकिमानीं फस्त सोडविली, तत्क्षणीं प्राण निघोन गेला! पातशाहांनीं हें वृत्त श्रवण करून बहुत दुःख पावले! दोन तीन दिवस दरबार वगैरे कामें महकूफ आहेत. असफद्दौला वजीर व फिरंगी यांस शुके ताकिदीनें लिहिले आहेत कीं, शाहाजाद्याचा ताबूद व त्याचीं मुलें माणसें येथें पाठऊन देणें. पातशाहांनीं शोक बहुत केला. वरकड पारसी एकबरा पाठविल्या आहेत, त्यावरून श्रुत होईल. पेशजीं घराऊ वृत्त वरचेवर विनंति लिहिली आहे. कृपा करून आमचा बंदोबस्त करून पाठवावा. येथें आमची आबाळ फार आहे. तीर्थस्वरूप राजश्री देवराव तात्याही हजुरांत आले असतील. त्यांस आज्ञा करून आमचा बंदोबस्त यथास्थित अमलांत ये ऐसें करावें. सर्व प्रकारें भरंवसा स्वामींचे पायांचा आहे. आमचा समाचार घेणें योग्य आहे. दिवसगत लागल्यास उपाय नाहीं. बहुत काय लिहिणें लोभ कीजे हे विनंति."

---

## लेखांक २९७.

**श्री.** १६ जून इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजे, गुलामकादर व इस्माइलबेग फौजसुद्धां डिगेस गेले. तेथें किल्यावर हल्ला पाय उतारा केला. त्यास तिकडून गांवचे लोक व किल्ल्यांतील वगैरे यांणीं तोफा व बंदुखा व दगड व विटा वगैरे मार देऊन, हल्ला बाहेर मोडून घातला! या अवसरीं राणेखान वगैरे फौजा तयार होऊन बुणग्यावर आले. हें वर्तमान हालकाऱ्यानें सांगतांच माघारें आपले मुक्कामास गेले. तेही फिरोन गेले. परंतु दोन तीन हजार माणसें ठार व जखमी जाले! कांहीं उपाय न चालला! तेव्हां मसलत ठरली कीं, अकबराबादेस जाऊन खर्चाची सरबरा करून पाटीलबावांशीं लढाई घ्यावी, म्हणजे किल्ले वगैरे सहजांत सुटतील. म्हणोन दरकूच आगऱ्यानजीक फत्तेपूर आहे तेथें मुक्काम आहे. राणेखान वगैरे फौजा त्याचे पाठीवर सात आठ कोस आहेत. पाटीलबावांनीं इकडून आणखी फौज जांबगांवींहून आली आहे, ती पार उतरून आजऊचे नदीवर मुक्काम करून आहेत. राणेखान यांचे फौजेस सामील व्हावें म्हणोन त्यास लिहिलें आहे. मागाहून आपणही चमेल उतरावें याप्रमाणें मनसबा आहे. अद्याप अलीकडेच मुक्काम करून आहेत. उमरावगीर गोसावी आगऱ्याचे मोर्च्यांतून धरून आणिले होते. ते आजपावेतों लष्करांत होते. छ ११ साबानीं निघोन गेले. त्यांस धरून आणिलें, त्या समयीं बहुत खातरजमा करून ठेविलें. वचनप्रमाण जालें. त्या

विश्वासावर बेफामी जाली. याजमुळें दगाबाजीनें निघोन गेला ! हिंमतबहाद्दर अनुपगीर गोसावी दिल्लीस पातशाहापासीं आहेत. गुलामकादरखान याजकडे यावयाकरितां दोन मजली आले. परंतु चित्तशुद्धता पक्की नाहीं. व पाटीलबावांकडील पत्रें गोसावी यांसीं गेलीं कीं, तुह्मी खुळांत न यावें. आह्मांकडील फत्ते जाल्यानंतर तुह्मांसीं दुसरा अर्थ होणार नाहीं. ह्मणोन वचन प्रमाण करून लिहिलें. याजमुळें मशारनिल्हे माघारा गेले. गुलामकादर व इस्माइलबेग यांचे लष्कराची रसद बंद आहे. याजमुळें पांच शेर धारण रुपयाची आहे. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २९८.

**श्री.** जून इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—गुलामकादरखान व इस्माइलबेग यांस दिल्लीहून नवाब मंजूरअल्लीखान यांनीं पत्रें पाठविलीं कीं, तुह्मीं उभयतां एकविचारें राहावें, पाटीलबावांसीं झुंजावें. जर वेगळे वेगळे राहिल्यास दोघे सिकस्त खाऊन मारले जाल, आणि पुन्हां राजश्री पाटीलबावा सलतनतींत काबीज होईल. ह्मणून वारंवार पत्रें पाठवून हमवार केलें. त्याजवरून गुलामकादरखान यमुना पार होते ते आगऱ्यास यमुना उतरून येऊन, इस्माइलबेगाची भेट घेतली. परस्परें शपथ प्रमाण कुराण होऊन पगडीबदल भाऊपणा जाला आहे. इस्माइलबेगाची फौज ढवळपुराकडे वगैरे गेली होती, ते सर्व एकत्र आगऱ्यावर जाली आहे. व गुलामकादरखान यांचीही फौज यमुना उतरून आगऱ्यास दाखल आहेत. दोन्ही फौजा एकत्र जाल्यावर आगऱ्याहून कूच करून, रूपबस ह्मणोन आगऱ्याहून आठ कोस ढवळपुराचे रोखें जागा आहे, तेथें डेरेदाखल जाले आहेत. राजश्री पाटीलबावांकडील सडी फौज राणेखानभाई व रायाजी पाटिल रूपबसास आले होते, ते माघारा सरकून ढवळपुराकडे गेले. राश्रजी पाटीलबावा चमेळ पार कुवारी नदीवर मुक्काम करून आहेत. पुढें निदर्शनास येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक २९९.

**श्री.** जून इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—नजबकुलीखान यांनीं रेवाडी वगैरे महालांचा बंदोबस्त करून, गोकुळगड रेवाडीचा किल्ला आहे, तेथें मोर्चे लाविले आहेत. तोही दि-

ल्लीस येणार. व अल्लीनगरचा जुलफुकारखान खानजादा याजपासून अल्लीनगर सरकारांत घेतलें होतें, तें त्यास माघारें दिल्हें. त्यास, अल्लीनगरीं खानमजकुरांनीं आपला बंदोबस्त केला. किल्ले डीग येथील अंमल मिर्जा रहिमबेग याजकडे होता. त्यांजकडून दूर करून आंबाजी इंगळे यांजकडे बमय महाल डिगेचा सुभा सांगितला आहे. तेथें राजश्री बापूजी मल्हार, मशारनिल्हेचे दिवाण, शेणवाई आहेत, त्यांनीं आपला बंदोबस्त केला आहे. वरकड चहूंकडे गव्हार. गर्दी बदअमली जाली आहे! वाट चालत नाहीं! लष्करांत रसद पोंचत नाहीं! याप्रमाणें वर्तमान आहे. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३००.

**श्री.** ११ जुलई इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पोष्य दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना तागाइत छ ७ माहे सव्वाल मुक्काम लखनौ येथें स्वामींचे कृपावलोकनेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेष:–बहुत दिवस जाले, आज्ञापत्र येऊन सांभाळ न जाला. तेणेंकरून चित्त सचिंत असे. तरी पत्रद्वारें सनाथ केलें पाहिजे. इकडील वर्तमान, आह्मी येथें आलों. नवाब वजिरांची भेटी जाली. आपल्याकडील खुषीचें वर्तमान पुसिलें. बहुत स्तुति करण्यांत आली. श्रीमंतांचे प्रतापाची तारीफ केली. आह्मीं नजरेचा सरंजाम आणला तो गुजराणला. बहुत संतोष जाले. कांहीं दिवस रहावयास सांगितलें आहे. सेवेसीं श्रुत होय. दुसरें, गुलामकादर व इस्मालबेग उभैता एका विचार होऊन डिगेवर हल्ला केला होता. तेथें कांहीं उपाय चालला नाहीं. तेव्हां आगऱ्याचे किल्ल्यास वेढून चहूंकडून जेर केला. चौ दिवसांत किल्ला सुटावयास आला. तेव्हां राणेखानभाई व रायाजी पाटील व जिवबा बक्षी फौजसुद्धां रंजितसिंग जाट यांस सामील करून भरतपुरनजीक मुक्काम करून होते. त्यांनीं कांहीं फौज तीन चार हजारपावेतों, महाबनाकडे गुलामकादर याचीं ठाणीं होतीं, तिकडे रवाना केलीं. त्यांनीं महाबनाचें ठाणें घेरून दोन पलटणें मारून काढिलें! दोन तोफा आणिल्या! येणेंकरून त्याचे मुलकांत बदमामली जाली. त्या बंदोबस्ताकरितां गुलामकादर आपली फौज घेऊन, यमुना उतरून त्या पारीं मुक्काम केला. हे बातनी राणेखान यांनीं राखोन, जाटाची व आपली फौज तयार करून, प्यादगानाची लढाई समोर लाऊन, आपण सडी स्वारीनशीं कंबरगा मारून फौजेचा मोड केला. तोफखाना सर्व

जेथील तेथेंच राहिला. सडा इस्समाइलबेग दोन हजार स्वारांनशीं नांवेवर बसून गुलामकादराचे लष्करांत गेले. बायको हत्तीवर बसोन जात होती. ते यमुनेंत बुडोन मेली ! आपण मात्र दाखल जाले. तेथेंही राहावयास विश्वास न पडेसा जाला. तेव्हां उठोन शुकाहाबादेस वजीरांचे मुलकांत आले. यांस पत्रें लिहिलीं कीं, आमची मदत या समयीं आपण करावी."........( अपूर्ण )

## लेखांक ३०१.

श्री. ११ जुलई इ. स. १७८८.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विज्ञापना ऐसीजे, त्याजवरून येथील कारभारी यांनीं आह्मास वर्तमान सांगितलें कीं, इस्मायलबेगाचे + + आहे. यास उत्तर तुह्मी सांगाल त्याप्रमाणें देऊं. त्याजवरून आह्मीं सांगितलें कीं, + + स्वामीचा जाला. स्नेह पूर्वापासून चालत आला आहे. त्यापक्षीं याचा विचार आपणच करावा. आणि उत्तर करणें तें करावें. त्याजवरून कमाविसदारांस परिछिन्न ताकीद लिहिली कीं, इस्माइलबेगास सांगावें कीं, आमचे मुलकांत तुह्मीं न रहावें. दुसरे स्थलीं जाऊन तुह्मांस कर्तव्य तें करणें. येथें न रहावें. आमचे मुलकांत राहिल्यास दगा पावाल. त्याजवरून त्यांनीं मागतीं गुलामकादराकडे सूत्र लावून, वचन प्रमाण क्रिया घेऊन, त्याजकडे रामगडास गेले. त्याची भेटी घेऊन एक होऊन, गुलामकादररामगडाहून जकीऱ्याचा सरंजाम करितात. मोठाल्या तोफा जमीनींत पुरून टाकितात. व जकिरा सरंजामाचे तजविजेंत आहेत. आणि इस्माइलबेगास दिल्लीस रवाना केलें. किल्ल्यांत शाहापाशीं राहून मऱ्हाव्यांकडील जाबसाल उडवून द्यावा. ते दिल्लीस आले. पातशाहांस अर्ज जाली. त्यांनीं उत्तर केलें कीं, निमकहरामाचें आह्मीं दर्शन घेत नाहीं. आह्मी बोलाविलें, त्यासमईं न आले. आतां प्रयोजन नाहीं. त्यांनीं शहरांतून निघोन जावें. त्याजवरून स्वार होऊन बहुत खिन्नतेनें पटपरगंजांत राहिले आहेत. एका दो दिवशीं माघारा जातील. गुलामकादराचे फौजेसीं धीर पुरत नाहीं. लोक उठोन जातात. आतां मैदानांत लढाईची सुरत दिसत नाहीं. राजश्री पाटीलबावा चंमेल उतरोन आगऱ्यानजीक आठा कोसांवर मुक्काम आहे. जिउबा बक्षी पांच हजार फौजेनशीं दिल्लीस रवाना जाले. ठाणीं कायम जालीं. पिरोजाबाद वगैरे जागा खाली पडली. याजमुळें जमीदारांची पत्रें पाटिलबावांस गेलीं कीं, ठाणीं आटोपावीं. इकडेही बंदोबस्त करतील. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे ही विनंति."



बादशहाच्या वेळची जुनी दिल्ली.

## लेखांक ३०२.

पै॥ छ २९ जिल्हेज. **श्री.** ११ जुलई इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार. विज्ञापना तागाइत छ० ७ सवाल मुक्काम लखनऊ स्वामींचे कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान राजश्री नानांचें पत्रीं लिहिलें आहे. त्याजवरून निवेदन होईल. व दिनचर्येचे वर्तमानाची अकबार पाठविली आहे. मनन जाल्यावर ध्यानास येईल. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे ही विज्ञप्ति."

---

## लेखांक ३०३.

पैवस्ती छ० १६ जिल्काद तिसा समानीन श्रावणमास **श्री.** ता. २० जुलई १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० १६ माहे सवाल मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः– इकडील वर्तमान पेशजी पैदरपै विनंतिपत्रें छ ९ रमजानीं पाठविलीं आहेत, ते पाऊन सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, छ १४ माहे रमजानीं आगरियाहून पातशाहांचे येथें वर्तमान आलें कीं, आगरियाचे किल्ल्यांत जकीरा सरला. ह्मणून राजश्री लखबा किल्लेदार यांनीं पाटिलबावांस पत्र पाठविलें कीं, किल्ल्यांत भक्षावयास नाहीं. आतां आमच्यानें किल्ला राखवत नाहीं. ह्मणून लिहिलें. त्याजवरून राजश्री पाटिलबावांनीं रंजितसिंग जाटास सांगून पाठविलें कीं, किल्ल्यांत जकीरा जलद पोहोंचेल तें करणें. त्याजवरून रंजितसिंगानीं तीनशें उंट गल्ला व हजार दोन हजार बैल भरून, आपली फौज समागमें देऊन, गल्ला आगरियास रवाना केला. आणि राणेखान व रायाजी पाटील शिंदे वगैरे फौज इस्माइलबेगाचे आसपास होती, त्यांस राजश्री पाटिलबावांनीं ताकीद लिहून पाठविली कीं, रंजितसिंगानीं गल्ला रवाना केला आहे, हा किल्ल्यांत दाखल करून देणें. जर किल्ला इस्माइलबेगाचे हातास गेला, तरी ठीक नाहीं. ह्मणून निक्षून लिहिलें. त्याजवरून राणेखान व रायाजी पाटील व जाटाकडील फौज मिळून तीन चार गोल केले. एक गोल श्रीयमुनापार उतरून, बैल गल्ला भरून आणविले होते ते, नावा भरून यमुनेंतून किल्ल्यांत दाखल केले. हें वर्तमान इस्माइलबेग यांनीं ऐकून गुलामकादरखान यासीं विचार केला कीं, तुह्मीं

आपली फौजसुद्धां यमुना उतरून पार जाऊन, तिकडून किल्ल्याची रसद बंद करावी. आह्मी इकडून रसद बंद करितों. ह्मणजे किल्ला जेर होऊन आपल्या आपण खाली करून देतील. ह्मणून विचार करून गुलाम कादरखानास फौजसुद्धां पार उतरले. त्यांनीं जाऊन पारल्या काठीहून किल्ल्यांत रसद न पोहोंचे हा बंदोबस्त केला. दुसरे दिवशीं राणेखान व रायाजी पाटील यांनीं तीनशें उंट पुढें घालून, जाटाकडील फौज समागमें घेऊन, एक गोल फौजेचा उंटासमागमें देऊन, आगरियाचे किल्ल्यांत उंट गल्ल्याचे दाखल जाले. आणि दोन गोल फौजेचे इस्माइलबेगाचे फौजेसीं झुंजास उभे राहिले. त्यांसीं यांसीं गोळागोळी होतांच, मराठियांनीं व जाटांनीं मोठी छाती करून त्यांचे फौजेंत घोडे घातले. दोन घटका तरवार चालली. निदान इस्माइल-बेगास तीन जखमा जाल्या होत्या. बेताब होऊन साता रावतांनसीं पळून यमु-नेंत घोडे घातले. त्यांजपैकीं तीन स्वार यमुनेंत बुडाले. चौ स्वारांनसीं पळून गुलाम कादरखान याचे फौजेंत दाखल जाले. गुलाम कादरखान सामोरा येऊन, घेऊन, एक डेरा व पालखी व हत्ती व पांच घोडे व दहा उंटें वगैरे वस्त्रें पात्रें देऊन, जखमा सेकून, सन्मान करून आपलेपासीं ठेविले. व इस्माइलबेग याज-कडील शे शवाशें तोफ व पलटणें पेशजीं जैपूरचे मुकामीं राजश्री पाटिलबावां-कडील फुटोन जैपूरकराकडे गेलीं होतीं, ते तमाम + + खिजमतगार राजश्री पाटिलबावांनीं पेशजीं आठ दहा रोज फोडाफोड करावयास पाठविला होता. त्यास, झुंजाचे समयीं पलटणें व तोफखाना उठोन राणेखान व रायाजी पाटील यांजपाशीं येऊन दाखल जाले. वरकड मोंगली फौज वगैरे डेरे दांडे दरोबस्त लष्कर इस्माइलबेगाचें तमाम लुटून ताराज केलें ! आपले फौजेंत हत्ती घोडे तोफखाना वगैरे सरंजाम लुटीचा बहुत आला. आगरियाचे किल्ल्याचा बंदोबस्त करून, आपली फौज राणेखानभाई व रायाजी पाटील तेथून कूच करून श्रीमथुरेस आले. हें वर्तमान राजश्री पाटिलबावांनीं ऐकून, आपणही कुवारी नदींतून कूच करून, श्रीमथुरेस येऊन छावणी केली. हें वर्तमान पातशाहांनीं श्रवण करून दिल्लीहून राजश्री पाटिलबावांस मुख्यारीचीं वस्त्रें साता पारचांचा खिलत बमय सरबस्ता पागोटें कलगी परगिरीसुद्धां व जेगा शिरपेंच, मोत्यांची कंठी, ढाल, तरवार, हत्ती घोडा येणेप्रमाणें सरंजाम हमेशा देत आले आहेत त्याप्रमाणें, मौवलवी अताउल्ला व बजुदीखान, हिसामुदीखान यांचा बंधू, यां-समागमें देऊन पाठविले आहेत. तेही श्रीमथुरेस जाऊन पावले आहेत. आग-रियाचे किल्ल्यांत नवाब आबदुल अहदखान कैदेंत होते, त्यांसही बोलाऊन मथुरेस आणिलें आहे. राजश्री पाटिलबावांची मर्जी आहे कीं, पातशाहांकडून

मुखत्यार आबदुल अहद्खान व आपलेकडून राजश्री लाडोजी देशमुख शितोळे नरसिंगराव या उभयतांस दिल्लीस पातशाहाकडे रवाना करावें, ह्मणून तजवीज आहे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पै॥ छ २९ जिल्काद

## लेखांक ३०४.

तिस्सा समानीन–भाद्रपद मास. **श्री.** २४ जुलई इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल ता॥ छ २० माहे सव्वाल मुक्काम दिल्ली जाणून स्वानंदलेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. विशेषः– पूर्वी विनंतिपत्रें पाठविलीं तीं प्रविष्ट जालीं असतीलच. हल्लीं वर्तमान तर, पातशाहा दिल्लींत आहेत. आगरियावरून गुलामकादरखान व इस्मायलबेग राजेश्री पाटीलबावांकडील फौजेशीं शिकस्त खाऊन, दिल्लीस येऊन, शाहादऱ्याजवळ मुक्काम केला. पातशाहांनीं साफ तोडून लाविलें. व हुकूम केले कीं, उठून जावें. राजश्री पाटीलबावांकडून रवळोजी शिंदे, व भगीरथजी शिंदे दोन हजार राऊतांनशीं पातशाहाचे हुजूर आले होते. राजे हिंमतबहादर गोसावी यांचे विद्यमानें हुजुरांत मुलाजमत केली. पातशाहांची मर्जी बहुत प्रसन्न जाली. पातशाहा गुलामाशीं खुलून छ ११ मीनहूनीं उभयतां गुलाम यमुना पायाब पाहून बोराडीजवळ उतरले. येथून हिंमतबहादर व रवळोजी शिंदे वगैरे व मोंगल पातशाही झुंजावयास गेले. शेवटीं मोंगल दगा करून गुलामाशीं जाऊन भेटले. हें पाहून, हिंमतबहादर व रवळोजी माघारा येऊन, पातशाहांशीं न भेटतां कूच करून, रातोरात फरीदाबादेस गेले. पातशाहा फार घाबरले. गुलाम शहरांत आले. पातशाहांनीं किल्ल्याचा बंदोबस्त केला. मग नवाब मंजूरअलीखान नाजर यांचे विद्यमानें गुलामाच्या भेटी जाल्या. गुलाम हरामखोर, शहर लुटावयास व पातशाहांसीं बेअदबी करावयास तयार ! पातशाहापासीं कोणी नाहीं. लाचार होऊन सिलेमा शिको शाहाजादा पातशाहांनीं बरोबर देणें निश्चय केलें. त्यास आज उद्यां गुलाम शाहाजाद्यास घेऊन फरीदाबादेस कूच करणार. राजश्री पाटीलबावा मथुरेस आहेत. हें वृत्त श्रवण करून, राणेखान भाई यांची फौजसुद्धां फरीदाबादेस रवानगी करणार. व राजश्री रायाजी पाटीलाची अंतरवेद प्रांतीं रवानगी केली. आपण पाठीमागून कूच करणार. फरीदाबादेजवळ युद्धप्रसंग होणार. मागाहून अमलांत येईल तें विनंति लिहूं. पारसी एकबारही पाठविल्या आहेत. त्याजवरून श्रुत

होईल. खर्चाचे आबाळीचा मजकूर वारंवार विनंति लिहिली, त्यास तीर्थस्वरूप राजश्री देवरावही हुजुरांत आहे. आमचे बंदोबस्त करून पाठविणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहावें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३०५.

श्री. जून इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे:–ग्वाल्हेर प्रांतीं दतियेकर राजा वगैरे गुजर आदिकरून गवारगर्दी केली आहे. याजकरितां राजश्री खंडेराव हरी यांजकडील फौज पथकें खाशासुद्धां तिकडे बंदोबस्तास अटकले आहेत. तिकडून फौज खंडेराव हरीकडील व खाशांची सुटका होऊन आगरियाचे किल्याची कुमक करावी ऐसा योग घडत नाहीं. जर आगरियाचा किल्ला सरकारांत असला, तर पुन्हा जटवाडा आदिकरून मुलुखाचा बंदोबस्त करावयास दिसगत लागणार नाहीं. आणि आगरियाचा किल्ला इस्माइलबेगाचे हातीं लागला, तरी पुन्हां बंदोबस्त या प्रांतीं करावयास दिसगत लागेल, व बळ फार पडेल. याप्रमाणें आहे. घडेल ते विनंति मागाहून लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे. हे विनंति."

## लेखांक ३०६.

श्री. जुलई १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—गुलामकादरखान, स्वार प्यादे सा हजार घेऊन, दिल्लीस तुरकमान दरवाजा बाहीर उतरला आहे. आणीक फौज जमा करावी या विचारांत आहे. परंतु एका दिवसाचें भक्षावयास नाहीं, हे अवस्था याची आहे! पातशाहांची व नवाब नाजरजींची खातरजमा गुलामकादराकडून रतिभार नाहीं कीं, सलतनतीचा बंदोबस्त करून कांहीं दिवस चालवील. याजकरितां यांची मर्जी आहे कीं, पंचवीस हजार फौज चांगली, व एक सरदार राजश्री हरीपंततात्यासारखा इकडे येईल, तर सलतनतीचा बंदोबस्त होऊन कांहीं दिवस आह्मी सुखाची भाकर खाऊं. ऐसें यांचें लक्ष आहे. हिंदुस्थान सर्व राजश्री पाटीलबावांनीं मेळविलें होतें, तैसें थोडक्याच दिवसांत गमाविलें. त्यास अजूनही दोन तीन महिन्यांत हजूरची फौज येऊन, किल्ले कोट आहेत, तों पावेतों येऊन पोंहचली, तरी पुन्हां आपले सरकारचा कबजा होऊं शकतो. परंतु

दुसरा सरदार आल्याखेरीज पातशाहांची तसल्ली होत नाहीं. राजश्री पाटीलबावांची मर्जी खुद्पसंदी व खुशामततलबी बहुत. कोणी डोईजड माणूस जवळ कारकर्त्ता नाहीं. जें करणें तें स्वतः जातीनशींच करावें. कोणाचीही इतबार नाहीं. हलकें माणूस तोंडी लावून लोभास प्रवर्तून कामाची घाण केली. पातशाहा दिक् जाले. याप्रमाणें येथील वृत्त आहे. तें सेवेसीं विनंति लिहिली आहे. यांतून एक रतिभर गोष्ट राजश्री पाटीलबावांकडील वकिलास, अथवा त्यांचें ममतेचे माणसास समजल्यास, आमचें पारपत्य प्राणांत करितील! याचें कारण हेंच कीं, हिंदुस्थानांत मजवांचून कोणी कोणाशीं बोललें, किंवा लिहिलें, तर त्याचा प्राण घ्यावा, बेअब्रू करावें, हें यांचें लक्ष आहे. आपण पातशाहांस हत्ती, वस्त्रें, जवाहीर, नजर घोडीं पाठविलीं होतीं, ते गुजराणून त्याचा बदला पातशाहांनीं करावा ह्मणोन त्यांची मर्जी. त्याजवरून कारभारी यांनीं आह्मांस पुसिलें कीं, "श्रीमंतास काय द्यावें?" आह्मीं विनंति केली कीं, "पालखी नालखी, माहीमरातब, तोग तुमन वगैरे जें मर्जीस येईल तें श्रीमंतांस द्यावें. या योग्यतेच पात्र आहेत. दुसरें स्थळ नाहीं." इतकी गोष्ट मात्र बोलिलों. त्याजवरून इतराजी बहुत केली. रामरामास देखील योग्यता राहिली नाहीं. हे अवस्था जाली! तेव्हां परस्परें निखालसता जाली कीं, यांनीं कांहीं कपट करून विनंति केली नाहीं. सहजांत त्यांनीं पुसिलें. यांनीं त्याजवरून विनंति केली. तेव्हां रामरामास उजागिरी जाली. ऐसी यांची मर्जी आहे. ह्मणोन सूचनार्थ विनंति लिहिली आहे. आमची अब्रू, जीव वांचविणार स्वामी समर्थ आहे. कच्चें वृत्त स्वामींस कळावें ह्मणून विनंति लिहिली आहे. पत्रांचीं उत्तरें ल्याहावयास आज्ञा होईल, त्यास मालोमामत जमेस न धरतां उत्तरें सत्वर पाठवावीं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३०७.

**श्री.** जुलै इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे:–राजे रंजितसिंग जाट यासीं व राजश्री पाटिलबावासीं करारमदार जाला आहे कीं, ज्याप्रमाणें पूर्वीं जाटाकडे मुलुख होता, त्याप्रमाणें त्याचा त्याजकडे मुलूख करार करून, पूर्वींपासून खंडणी घेत आले आहेत त्याप्रमाणें जाटांपासून खंडणी घ्यावी. ह्मणून करारमदार होऊन, जाटानें व राजश्री पाटिलबावांनीं एकविचारें असावें ह्मणून श्रवणांत आलें. त्याजवरून विनंति

लिहिली आहे. व नाजर मंजुरअलीखान यांनीं व रामरतन मोदी यांनीं व शितलदास नाजराचा गुमास्ता यानें, गुलामकादरखान यांसीं संकेत करून, दिल्लींतून लाडोजी देशमुख शितोळे यांस काढून दिल्हें; व गुलामकादरखान यांनीं पातशाहाचे किल्यावर गोळे मारले; आणि मीरबक्षीगिरीचीं वस्त्रें घेऊन तमाम अंतरवेदींत आपला बंदोबस्त केला. आणि राजे जैपूरकर यांसही पत्रें पाठऊन त्यांस तिकडून बोलाविलें. इकडून रेवाडीचे मुक्कामीं पातशाहांस घेऊन गेले. याप्रमाणें या त्रिवर्गांनीं बखेडे केले. ह्मणून यांचे मनांत आतां राजश्री पाटिलबावांची फत्ते जाली. पूर्ववत्प्रमाणें दिल्लींत पातशाहांचे येथील मुख्त्यारी जाली. हे आमचें पारपत्य करतील. याप्रमाणें वसवास खाऊन साशंकित आहेत. त्याजवरून नाजरानें आपलेकडून कुराण, व रामरतन व शितळदास यांनीं आपलेकडून श्रीगंगाजळी, येणेंप्रमाणें देऊन, व जुदीखान अली नकीखान यांचे पुत्रासमागमें पाठविली आहे कीं, राजश्री पाटिलबावांनीं आह्मांविसीं निखालस स्वच्छ असावें. आह्मी अतःपर कांहीं राजश्री पाटिलबावांसीं दुसरा अर्थ करूं, तरी आह्मांस कुराणाची व गंगाजीची शपथ आहे. ह्मणून सांगून पाठविलें आहे. व मागाहून रामरतनास धीर न पुरे, ह्मणून आणखीही दिल्लीहून कूच करून, श्रीमथुरेस राजश्री पाटिलबावापासीं गेला आहे. तेथें जाऊन राणेखानभाई वगैरे सरकारचे मुत्सद्दी आहेत, त्यांचें साधन करून राजश्री पाटिलबावांकडील स्वच्छता करून घ्यावी, या विचारावर गेला आहे. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

## लेखांक ३०८.

श्री. जुलै इ. स. १७८८.

''पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः-आपली फौज श्रीयमुनापार गुलामकादरखान व इस्मायलबेग यांचे फौजेचे आसपास कोसीं दोन कोसीं रसद बंद करून होते. निदान गुलाम कादरखान व इस्मायलबेग यांस धीर न पुरे, ह्मणून तेथून कूच करून रामगडास आले. तेथील चांगल्या चांगल्या तोफा किल्यांतून काहाडून, स्वारी समागमें घेऊन, दरकूच दिल्लीसमीप यमुना पार शाहादरीयापाशीं मुकाम करून आहेत. शाहादरीयाचे व पडपडगंजाचे व गाजुदीनगरचे तमाम वाणी धरून आणून, चार पांच लक्ष रुपये दंड बांधून, पैका उत्पन्न करून, पातशाहासीं स्वाल केला आहे कीं, हजरतांनीं दीनचा पक्ष सोडून मऱ्हाठीयांचा पक्ष धरला

आहे, हे गोष्ट मुसलमानीस ठीक नाहीं. ह्मणून दोन चार काजी व मुलाणे यांजबरावर सांगून पाठविलें. त्यास पातशाहांनीं उत्तर दिल्हें कीं, "मुसलमानास सोबत द्यावी, दीनचा डंका ठेवावा, हें ठीकच आहे. परंतु आज दहा महिने जाले, तुह्मीं दरोबस्त मुलूक व किल्ले आटोपिले, पैका उत्पन्न केला, त्यांपैकीं मजला काय दिल्हें? व मसीं सलुख काय केला? उलटें आमचे किल्ल्यास व रंगमहालास गोळे मारिले. जितकी शोकी करावयाची तितकी केली! आतां तुमची आमची संगत नाहीं." ह्मणून साफ जाब दिल्हा. त्याजवरून गुलामकादरखान व इस्मायलबेग एक विचारें होऊन झुंजास मुस्तेद आहेत. एक लढाई मराठियांसीं घेऊं, मग जें होणें तें होईल. ह्मणून यमुनेचे कांठीं शाहादरीयाकडे मोरचेबंदी करून, पातशाहांची फौज व तोफखाना व राजश्री पाटीलबावांकडून भगीरथसिंग शिंदे व रवळोजी शिंदे दोन हजार स्वारांनशीं आले आहेत. हे सामील होऊन मोरचेबंदी करून आहेत. राजश्री पाटीलबावांस वरचेवर पातशाहा पत्रें पाठवितात कीं, "मातबर फौज व सरदार पाठऊन द्याल, तरी दिल्लीची स्थीत राहेल. नाहीं तरी रोहिला दिल्लींत दाखल जालीयावर, आग्र्याचे शहरची खराबी केली, त्याप्रमाणें दिल्लीचीही अवस्था होईल." ह्मणून वारंवार लिहून पाठवून फौजेची मार्गप्रतीक्षा करून आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३०९.

पैवस्ती छ० २७ जिल्हेज सन तिसा. **श्री.** १ आगष्ट इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २८ माहे सवाल मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः—पेशजीं पै दरपै विनंतिपत्रें पाठविलीं, ते प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं वर्तमान तर, गुलामकादरखान, इस्माइलबेग दिल्लींत येऊन, पातशाहासीं शपथ कुराण इमान करून, सिलेमासिको पातशाहाजादा बरोबर घेऊन, पातशाहाची आज्ञा घेतली. शहरा बाहेर रेतींत शाहाजाद्याचा डेरा करविला. परंतु कूच न केलें. शहरांत मातबर असामी पाहून धराधर करूं लागले. पातशाहांनीं आज्ञा केली कीं, "शहरचे लोकांस उपद्रव देणें ठीक नाहीं. तुह्मीं आज्ञा घेतली, शाहाजादा घेतला, आतां जाऊन हरिफासीं मुकाबला करावे." त्याजवरून उभयतांनीं अर्ज केले कीं, "शहर लुटावयास

मना करितां, तर पैका जवळून देवावा." ऐसीं भाषणें होतीं. छ० २५ मीनहूनीं उभयतां गुलाम स्वार होऊन किल्ल्यांत आले. दोन हजार माणूस आंत घेतले. व पातशाहासीं अर्ज केले कीं, "फौजेस पैका देवावे. व आपण पत्रें राजश्री महादजी शिंदे यांस लिहितां, ते बजिन्नस धरलीं आहेत. यास्तव किल्ल्याचा बंदोबस्त आमचे हवाला करावे." लाचार होऊन पातशाहांनीं आज्ञा केली कीं, "किल्ल्याचा बंदोबस्त तुह्मीं करावा." उभयतांनीं किल्ल्याचा बंदोबस्त करून दिवाणखान्यापावेतों बंदोबस्त करून पातशाहांस घेरलें. रात्रौ घेऊन ठेविलें. छ० २७ मीनहूनीं चार घटका दिवस आल्यावर पातशाहास धरलें, व कैद केले व दिष्टर(?)शाहा नामें महमदशाहाचा नातू, यास काढून तख्तावर बसविलें. मग गुलामकादर यांनीं सांगितलें कीं, "पातशाही बेगमातचा झाडा घ्यावे." इस्माईलबेगांनीं ह्मटलें कीं, "हे गोष्ट कधींही जाली नाहीं. आह्मी करूं देणार नाहीं." ऐसीं भाषणें होऊन दोघांत बिघाड जालें. इसमाईलबेग स्वार होऊन किल्ल्याबाहेर गेला. डेऱ्यांत जाऊन, तोफा फौज तयार करून, कूच करून तालकाटोऱ्यावर जाऊन राहिला. गुलामकादर किल्ल्यांतच राहिला. मलकाजमानी व साहेबमेहेल बेगम हे किल्ल्यांत आली. गुलामकादरानीं अर्ज केले कीं, रुपये देवावे. उभयतां बेगमानीं ह्मटलें कीं, "बारा लक्ष रुपये देणें करार आहेत. पांच लक्ष इस्माईलबेगास व सात लक्ष तुजला देऊं; परंतु किल्ल्यांत व महालांत जप्ती एक रतिमात्र न करावी. व इस्माइलबेगास बोलाऊन घ्यावे. त्याचे रुपये त्याजला देऊं. तुमचे तुमच्या स्वाधीन करूं." राजे हिंमतबहादूर व पलटणें व भगीरथ शिंदे वगैरे राजश्री महादजी शिंद्या-कडील फरिदाबादेस होते. त्यांसीं इस्माइलबेगासीं एकोप्याचा जाबसाल आहे. आज निश्चय ठरून रातोरात फरिदाबादची फौज दिल्लीस येणार. इस्माइलबेग व ते एक होऊन गुलामकादरसीं झुंजणार. मागून होईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३१०.

**श्री.** ४ आगष्ट १७८८.

"सेवेसीं आज्ञाधारक गंगाजी अव्हाड व विठ्ठल हरी अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कर विज्ञापना. येथील कुशल तागाईत श्रावण शुद्ध तृतीया भोमवार मु॥ लष्कर श्रीमथुरा यथास्थित जाणून लेखन आज्ञा करावी. विशेषः—दिल्लीचें वर्तमान तरी राजश्री पाटिलबावांस पत्र श्रावण शुद्ध प्रतिपदा मंदवारीं आलें. त्याचा मजकूर आह्मांस सांगितला इस्मायलबेग गुलामकादर दिल्लीवर पातशाहा

जादा घेऊन बाहीर उतरले होतेः— त्यास, दररोज दोन हजार लोक बरोबर घेऊन, पातशाही दरबारास जात असत. तेव्हां किल्ल्याचे दरवाज्याजवळ जाऊन लोक बाहीर ठेवावे. आपण उभयतां शागीर्दपेशाचे लोक थोडके बरोबर घेऊन दरबारास जात असेत. ऐसी चाल घातली. नंतर त्या उभयतांस नाजर मिळून मसलत सिद्ध केली. दुसरे दिवशीं आषाढ वद्य १४ गुरुवारीं प्रातःकालीं दोन तीन हजार लोक समागमें घेऊन दरबारास आले. तसेच स्वारीसुद्धां किल्ल्याचे दरवाज्याआंत गेले. तेथें तरवार चालली! तों वीस पंचवीस माणूस कापून दरवाज्याचा बंदोबस्त करून, पुढें महालांत जाऊन पातशाहा धरला! त्याचे पुत्र अठरा साहेबजादे धरले! पातशाहांचें कुटुंबसुद्धां धरून एका महजदेंत कैद केलें. किल्ल्याचा दिल्लीसुद्धां बंदोबस्त करून, शुक्रवारीं नवा पातशाहा बेदरशाहा तख्तीं बसविला. हा पातशाहा अहमदशाहाचा नातू ऐसें ह्मणतात. याजवर सोमवारीं दोन प्रहरीं अकबार आलें. त्यांत लिहिलें कीं, गुलामकादर किल्ल्यांत आहे, तो महालांत द्रव्य काढतो. इस्मालबेग बाहीर शहरांत धराधर करतो. गुलामकादर यास इस्मालबेग यांणीं सांगोन पाठविलें कीं, आह्मी येऊं तोंवर तेथील माल न काढणें. यावरून उभयतांचा वाद वाढला आहे. आपले फौजेंत पैक्यामुळें खर्चाचा गवगवा आहे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञप्ति!"

---

## लेखांक ३११.

**श्री.** १३ आगष्ट इ. स. १७८८.

"सेवेसीं आज्ञाधारक गंगाजी आव्हाड व विठ्ठल हरी अनुक्रमें साष्टांग नमस्कार व दंडवत विज्ञापना. येथील कुशल त॥ छ १० जिल्काद श्रावण शुद्ध द्वादशी मुक्काम लष्कर श्रीमथुरा यथास्थित जाणून लेखनआज्ञा करावी. विशेषः— दिल्लीकडील वर्तमान तरी, गुलामकादर याणें आषाढ वद्य अमावस्येचे दिवशीं स्वारी तयार होऊन, लाहोरी दरवाज्यास किल्ल्याचे आला. तो तिकडे बंदोबस्त पातशाई पलटणें होतीं, हें ऐकून उभा राहिला. तेव्हां आंतून खोज्यानें सांगून पाठविलें कीं, दिल्लीदरवाज्यानें आंत येणें. मग तिकडून चार हजार रोहिल्यासुद्धां आंत जाऊन दिवाणखासेंत बसून, हजरतास बाहेर बोलाविलें. आणि निमाज जुमेची पढावयास संगी महजदींत तेथेंच केलें. आणि पातशाहाजादे आवघे पांच सहा आणून बसविले. सिलेमासीको बाहेर इस्मायलबेगाजवळ होता. त्यासही आणून कैद केलें. तोषखाना वगैरे पागा हत्ती मुदबख वगैरे जप्त केलें!

पातशाही माणसें उठवून आपलीं बसविलीं. दुसरे दिवशीं पातशाहांच्या बेगमांचा वगैरे असबाब बाहेर दिवाणखासेंत बसोन आणूं लागले. बादशाहाजाद्यांस व बेगमांस तसदी केली. बारा प्रहर पाणी पिऊं दिलें नाहीं! बायकांचे झाडे जर-जवाहीर तमाम घेतले. उन्हांत गच्चीवर उभ्या करोन मारविलें. रूबरू तमाम नगदी व जवाहीर कापड पशमीना वगैरे जप्त करोन, गोसगडास रवाना नगदी चौदा उंट भरोन, हजार रोहिले देऊन पाठविले. आणखी निघतच गेलें. हें ऐकोन इस्मायलबेग यांस राग आला. त्याचा आपसमध्यें बिघाड जाहला. दोन दिवस कजिया होता. शेवटीं कांहीं हिस्सा द्यावयाचा ठरविला. समजूत केली. शंभर मोहरा खर्चास दिल्या. पुढें कांहीं निघेल त्यापैकीं द्यावें घ्यावें, ऐसें केलें. किल्ल्यांत रोहिल्याचा बंदोबस्त आहे. शहरांत निम्मे दरवाजे यावर इस्मालबे-गाचे लोक आहेत. निम्मे दरवाज्यावर रोहिल्याकडील लोक आहेत. ऐसा बंदोबस्त शहरचा करोन, सवासें आसामी शहरांतील धरून किल्ल्यांत नेऊन बसविलीं आहे. खंड मागतात. याप्रमाणें वर्तमान आहे. सेवेसीं श्रुत होय. तदनंतर राजश्री सुभेदार व अल्लीबहादर मेवाड प्रांतीं जावदेवर आलेत. पुढें कृष्णगडाकडे जाणार आहेत. जालें वर्तमान सेवेसीं विनविलें. होईल तें मागाहून लिहून पाठवूं. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञप्ति!”

---

## लेखांक ३१२.

**श्री.** आगष्ट इ. स. १७८८.

“विज्ञापना ऐसीजे, द्वादसी रविवारचे वर्तमान आलें. किल्ला खाली करून गुलामकादर आपले लोक घेऊन पार फौजेंत गेला. रात्रौ दिवस निघाल्यावर कळतांच आपले लोक चढोन किल्ला घेतला. पातशाहाजादे व मलकाजमानी वगैरे कुटुंब पार नेलें. अलमशाहाचे डोळे काढिले होते. त्यास टाकून वरकड झाडून नेलें. कांहीं पहिले पातशाहांचें नातें पोतें किल्ल्यांतही ठेऊन गेला. पुढें आपल्या फौजा पार उतरल्या, व कांहीं नावेंतोन उतरतात. शत्रूचा जमाव घोडे व पायेचे लोक मिळोन पंधरा सोळा हजार आहेत. शिवाय तोफा व जरब मिळोन नव्वदपावेतों आहेत. कूच करून एक कोस गोसगडाचे सुमारें चालला. तेथें मुक्काम करून आहे. याजवर जें घडेल तें मागाहून विनंति लिहून पाठवितों. तदनंतर मेवाड प्रांताकडे राजश्री सुभेदारास व अल्लीबहादर यास इकडे येण्याविशीं पत्रें निकडीचीं जातात. तरी त्यांजकडीलही वर्तमान आलें आहे कीं, एकदोन कूच त्याचे इकडच्या सुमार जालेत. इस्मालबेग फुटोन

इकडे मिळाला आहे. परंतु त्याचा बंदोबस्त केला नाहीं. त्याजजवळ जमाव पांच सात हजारपावेतों आहे. दोन वेळ राणेखानभाईचे भेटीस आला. वरकड दुरूनच आहे. जालें वर्तमान सेवेसीं विज्ञापिलें. श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ३१३.

**श्री.** २६ सप्टेंबर इ. स. १७८८.

"छ० २५ जिल्हेज रोज शुक्रवार राजश्री पाटीलबावा यांचे लष्करांतून बातमीचें पत्र आलें. गुलामकादर यानें रोहिल्यास इशारत करून ठेवली. आपण इस्मालबेगाचे डेऱ्यास जातों. तो व आह्मी माघारें शहरांत येऊं. मार्गांत तलबाचा गवगवा करून मारून टाकावा, अशी सूचना करून आपण इस्मालबेगाचे येथें जाऊन, उभयतां बागामध्यें जाऊन खलबत करून, उभयतां एक हत्तीवर बसोन शहरांत येत होते. तों रोहिल्याची बद नजर पाहून, इस्मालबेग हत्तीखालीं उडी टाकून, आपले लोकांत आला. गुलामकादर शहरांत जाऊन मोरचेबंदी केली. इस्मालबेग याणें गोटांत येऊन मोरचेबंदी केली. सेवेसीं श्रुत होय ही विज्ञापना."

---

पैवस्ती छ० १ सफर सन तिसा समानीन कार्तिक मास.

## लेखांक ३१४.

**श्री.** २९ सप्टेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २८ माहे जिल्हेज मुक्काम लष्कर नजिक श्रीमथुरा जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः—बहुता दिवशीं स्वामींनीं कृपा करून पत्र छ १ साबानचें पाठविलें, तें छ० १३ माहे मजकुरीं पावलें. पत्रीं आज्ञा कीं, "अलीबहादर याजबरोबर फौज देऊन रवाना जाहाले, व राजश्री तुकोजी होळकर यांसही फौजसुद्धां रवाना केले आहेत. लौकरच त्या प्रांतीं पोहोंचतील. रंजितसिंग जाट याचा जाबसाल कैसा ठरला, तें साकल्य लिहून पाठवणें. आणि तुमचे व्रतबंध करावयाचे आहे. त्यास तेथील कामकाजाचा बंदोबस्त करून देशीं यावें. वरकड राजश्री देवराव यांनीं लिहिलें आहे, त्याप्रमाणें तेथील उलगडा पाहून देशास यावें." ह्मणून पत्रीं आज्ञा. त्यास इकडील सविस्तर वृत्त पेशजी विनंति लिहिली आहे, त्यावरून श्रुत जाहालेंच असेल. दिल्लींत गुलाम

कादरानीं पातशाहांसीं दगाबाजी करून कैदेंत केलें, व डोळे सुरीनें काढून अनेक प्रकारचीं विपत्य केलीं, त्याचा तपसील पूर्वीं सेवेसीं विनंति लिहिलीच आहे. शहरांत मोठा उपद्रव केला, व साहुकार धरून पैका घेतला. आणि पातशाहांच्या वगैरे माहालच्या बेगमा धरून नग्न करून झाडे घेतले. कित्येक लोक मारतां मारतांच मेले. पातशाहांची जप्ती केली. त्यांत नऊ लक्ष रुपये नख्त व एक कोटीचें जवाहीर व जामदारखान्यांत तीन चार लक्षांचा जिन्नस व याशिवाय आणीक सरंजाम निघाला. तो सर्व जप्त करून हल्लीं किल्ल्यांत जागा खणून पाहात आहे. एक जागा किल्ल्यांत खणली. त्यांत रुप्याचीं भांडीं व कांहीं मोहोरा व वस्त्रें वगैरे सरंजाम निघाला. त्याजवरून आतां सर्व जागा खणून पाहावी, ऐसें मानस गुलामकादरखान रोहिल्याचें आहे. सर्व शहर पळोन गेलें! मोठा उपद्रव शहरांत केला आहे! राजश्री पाटिलबावांनीं फौज अंतरवेद वगैरे रवाना केल्या आहेत. ईश्वरकृपेनें श्रीमंत स्वामी प्रतापवान् आहेत. शत्रूचे पराजय होऊन सर्व बंदोबस्त मनोदयानुरूप घडून येईल. वरकड सविस्तर वृत्त पुरवणी-पत्रावरून ध्यानारूढ होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३१५.

पैवस्ती छ० १ सफर. **श्री.** २९ सप्टेंबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, राणेखानभाई यांस राजश्री पाटिलबावांनीं, पंधरा दिवस जाहाले, दिल्लीकडे रवाना केले आहेत. त्यास फौजेचे खर्चाचा बंदोबस्त नव्हता, ह्मणून होडलचे मुक्कामीं मुक्काम करून आहेत. हल्लीं राजश्री खंडेराव हरी यांजकडून कछवाघार, भदावर वगैरे प्रांत + + + (फाटलें आहे) जिवबा दादा बक्षी यांनीं शिबंदीची बेगमी केली व पै दर पै फौजेची रवानगी भाई मजकुराकडे होते. हल्लीं राजश्री जिवबा बक्षी यांस राजश्री पाटिलबावांनीं फौजसुद्धां भाईकडे रवाना केले आहेत. सांप्रत सलाह ठरली आहे कीं, सर्व फौजा दिल्लीचे गीर्द जाऊन रसद बंद करावी, आणि ऐवजाचा पिच्छा करून पारपत्य यथास्थित करावें. शाहा निजामुद्दी व राजश्री पाटिलबावा यांसीं खलबत होऊन याप्रमाणें सलाह ठरली आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. राजश्री सुभेदार यांचीं पत्रें राजश्री पाटिलबावांस आलीं आहेत कीं, आह्मी सत्वरच येतों. व येथूनही पत्रोत्तर गेलें आहे कीं लवकर आलें पाहिजे. या जाबसलांत राजश्री आंबोजी इंगळे तेथें आहेत. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति करूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३१६.

पैवस्ती छ० १ सफर **श्री.** २९ सपटेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:–गुलामकादरखान रोहिला यांनीं पांच हजार रोहिले यमुनापार उतरून दिल्हे. आणि नावा पाठऊन तोफखाना वगैरे सर्व सरंजाम उतरोन द्यावा व मागाहून आपणही दिल्लीहून निघोन गोसगडास जावें, ऐसें मानस गुलामकादरखानाचें आहे, कीं तेथें जाऊन निगादास्त करून लढाईस यावें. इसमायलबेगासीं व रोहिल्यासीं चित्तशुद्धता नाहीं. यास्तव हे विचार करून दिल्लीहून निघणार, ऐसी वदंता आहे. व इसमायलबेगाचें बोलणें हिंमतगीर गोसावी याचे विद्यमानें राजश्री पाटिलबावांसीं आहे कीं, मी सेवेसीं चाकरीस हजर आहें. आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करीन. त्याजवरून राजश्री पाटिलबावांनीं विचार केला आहे कीं, गुलामकादराची मसलत सांगोन त्याचे मुलकांत पाठवावें. ऐसें श्रवणांत आलें आहे. प्रत्यास येईल तें विनंति करूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे ही विनंति."

---

## लेखांक ३१७.

पैवस्ती छ० १ सफर **श्री.** २९ सपटेंबर इ. स. १७८८.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. बघेलसिंग व नानुमल वगैरे शिखाकडील पत्रें राजश्री पाटिलबावांस आलीं आहेत कीं, आह्मांस खर्चास पाठवावें, ह्मणजे आह्मी फौजसुद्धां चाकरींत हाजर होतों. याप्रमाणें गुलामकादरखानासीं शिखांचें बोलणें आहे. जिकडून पैका पावेल तिकडे सामील होतील. गुलामकादरखान यासीं सूत्र शिखांचें लागलें आहे. सांप्रत रसद पावती केली असे. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति करूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३१८.

पैवस्ती छ० १ सफर. **श्री.** २९ सपटेंबर इ. स. १७८८.

पु॥ "श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे. पूर्वीं राजश्री सदाशिव मल्हार यांस राजश्री पाटिलबावांनीं श्रीस पाठविलें होतें कीं, राजश्री आबा चिटणीस यांस घेऊन यावें. त्याजवरून मशा-

रनिल्हे श्रीस जाऊन, राजश्री आबा चिटणिसांस घेऊन ब्रह्मावर्तपावेतों आले आहेत. आठा चौ रोजां लष्करांत येणार आहेत. येथें आल्यावर काय ठरेल तें विनंति लिहूं.

राघोगडवाला राजा पूर्वीं कैदेंत होता, त्यास राजश्री पाटिलबावांनीं लष्करांत बोलाविलें आहे. आज उद्यां येथें येणार आहे. मशारनिल्हे येथें पावल्यावर काय जाबसाल ठरेल ते विनंति करूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३१९.

पैवस्ती छ० १ सफर **श्री.** २९ सपटेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—जैपूरकर राजे संस्थानींच आहेत. दौलतराम फौज घेऊन राव राजे प्रतापसिंग यांचे मुलूक काबीज करून आपला बंदोबस्त केला, व किल्ले वगैरे जागा राहेल्या आहेत, त्यांचेही घ्यावयाचा उद्योग आहे. हल्लीं राजे मजकूर व दौलतराम यांनीं पत्रें राजश्री सुभेदार यांस पाठविलीं आहेत. व घोडे वगैरे कांहीं सरंजाम अलीबहादर यांस नजर पाठविला आहे. परंतु अद्यापि तिकडून कांहीं उत्तर आलें नाहीं. जैपूरकराकडील वकील राजश्री पाटिलबावांकडे जाबसालास येणार, ऐसी वदंता आहे. प्रत्ययास येईल तें विनंति करूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३२०.

पैवस्ती छ० १ सफर. **श्री.** २९ सपटेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. दिल्लीकडे राजश्री भागीरथराव शिंदे व रवळोजी शिंदे व हिंमतबहाद्दर गोसावी व समरूचीं पलटणें व तोटा फिरंगी ऐसी बारा पंधरा हजार फौज राजश्री पाटिलबावांनीं पूर्वीं रवाना केली होती. ते फरिदाबादेवर दिल्लीहून बारा कोस आलीकडे मुक्काम करून आहेत. नित्य रोहिल्याचे फौजेसीं गोळागोळी मात्र होते. सडी फौज दिल्लीचे गीर्द जाऊन, रसद बंद केली आहे. व कजाकी करून आणितात. दिल्लीचे वाटेंत होडल बलवल वगैरे तीन परगणे आहेत, ते अजितसिंग जाट, बलमगढवाल्याकडे राजश्री पाटिलबावांनीं जप्ती सांगोन, मशारनिल्हेचा बंदोबस्त अद्यापि ठेविला आहे. सेवेसीं श्रुत होय. पुढें अमलांत येईल तें विनंति करूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३२१.

पैवस्ती छ० १ सफर. **श्री.** २९ सप्टेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. इसमायलबेग, हमदानीचा पुतण्या, दिल्लीबाहेर दाहा बारा हजार स्वार प्यादगान जमा करून आहे. परंतु शिबंदीचा गवगवा सख्त! लोकांस भक्षावयाची मोठी विपत्य आहे. गुलामकादरखान यांनीं कांहीं जवाहीर हमदानी मजकुराचे खर्चास पाठविलें होतें. यावरून इसमायलबेग बेदिल होऊन बोलले कीं, आह्मी तुह्मांस सामील असतां, आमची विपत्य या प्रकारची; व आपण सर्व पातशाहीची दौलत आपले हस्तगत करून गोसगडास जाणार. असो. आह्मांस जो पैका देईल त्याची ताबेदारी करूं. तात्पर्य, रोहिल्यासीं व मशारनिल्हेसीं विरुद्धता अंतःकरणापासोन आहे. यास्तव गुलामकादरखान यमुना उतरून गोसगडास जाणार ऐसी वदंता आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३२२.

पै॥ छ०१ सफर. **श्री.** ३० सप्टेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः—जवान्बख्त शहाजादा पूर्वीं श्रीकाशींत मृत्यु पावला. त्याचे तिघे साहेबजादे श्रींत होते. त्यास हाल्लीं वजिरांनीं पातशाहांचें वर्तमान ऐकून, बहुत क्रोधायमान होऊन, दरबार-आम बोलले कीं, "राजश्री पाटीलबावांनीं रोहिल्यांचें पारपत्य यथास्थित केलें तरी उत्तम आहे. नाहींतरी आह्मीं ........ स्वारी करून रोहेल्यांसीं तंबी देऊं." व दुसऱ्या दिवशीं आपले फौजेची हाजरी घेऊन श्रीकाशीहून साहेबजाद्यास बोलावून घेतलें, व सामोरे जाऊन बहुत सन्मान केला, व आपले घरीं आणून मेजवानी केली. व हत्ती घोडे जवाहिर वस्त्रांच्या किस्त्या नजर केल्या. उपरांतीक साहेबजाद्याचे डेऱ्यापावेतों नवाब खवासींत बसोन आलेत. त्यास दसऱ्यापर्यंत इकडील प्रकार काय होतो त्याप्रमाणें मानस आहे कीं, दिल्लींत पातशाहा बरतख्त बसवावा. परंतु अगोदर राजश्री पाटीलबावा बंदोबस्त कैसा करतात हें पाहोन, मग चाल करणार ऐसी वदंता आहे. प्रत्यास येईल तें मागाहून विनंति करूं बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे. हे विनंति."

---

## लेखांक ३२३.

पैा छ० १ सफर सन तिस्सा समानीन कार्तिक मास. **श्री.** ३० सपटेंबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागायत छ २९ माहे जिल्हेज मुक्काम लष्कर नजीक श्रीमथुरा जाणून स्वानंद-लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः—बहुत दिवस जाहाले, स्वामीकडून कृपापत्र येऊन सेवकाचा सांभाळ होत नाहीं ह्मणोन चित्त उद्विग्न असे. तरी सदोदित कृपापत्रीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. हल्लीं वर्तमान तरी, गुलामकादरखान दिल्लीचे किल्ल्यांत बंदोबस्त करून आहे. व इस्मायलबेग हमदानी शहराबाहेर मुक्काम करून आहेत. येथून राजश्री पाटिलबावांनीं फौजा त्या प्रांतीं रवाना केल्या आहेत. सेवेसीं श्रुत होय. वरकड सविस्तर राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे त्याजवरून ध्यानारूढ होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञापना."

---

## लेखांक ३२४.

पै॥ चंद्र २ सफर सनतिस्सा समानीन कार्तिक मास. **श्री.** ७ आक्टोबर इ. स. १७८८.

"सेवेसीं विज्ञापना ऐसीजे. छ० ६ मोहरम मंगळवार प्रहर दिवसाचें वर्तमान आकबाराचें आलें. याचा तपशीलः—

सोमवारीं मागील चार घटिका दिवस राहतां गुलामकादर त्याचे फौजेंतून किल्ल्यांत आला. रुस्तमखां वगैरे रिसालदार याची बहुता प्रकारें खातरी केली. अकबरशाहा वगैरे पातशाहाजादे यांस आपले रूबरू पार लष्करांत पाठविलें. मग त्याचे कारखान्यांतील वस्तभाव काढून पसंद केल्या. मनियारसिंग कुमेदानास सांगितलें कीं, जिन्नस पार करून द्यावें. मग नवा महेला ठिकाण पातशाही तेथें जाऊन, चीजवस्त पसंद करून, पार आपले लष्करांत घेऊन गेला.

१

हिंमतबहादर गोसावी याचें वर्तमान दोन तोफा व आपले लोक घेऊन, नाले उतरून यमुनेच्या रेतींत मुक्काम करून आहे. नंतर भाईनें आपले लोक रवळोजी शिंदे व इस्मालबेग वगैरे यांस ताकीद करविली कीं, यमुनेच्या रेतीमध्यें जाऊन उतरावें. डेरे तेथें करावे.

१

इस्मालबेगाचें वर्तमान, याचा बाप येऊन त्यांणीं सांगितलें कीं, तुह्मी गाफील बसले आहां; तुमचे कंपूचे लोक फुटोन पाटीलबावांकडे मिळाले. तुह्मांपासीं कोणती जमीयत राहिली आहे ? तुह्मीं आपलें बरें काय विचारिलें ? इस्मालबेगांनीं त्यास उत्तर केलें कीं, जे आमचें नशीबांत होणार तें जालें. परंतु आह्मी पाटीलबावांचे रफीक आहों. नंतर त्यास खर्चास रु॥ ५० देऊन बिदा केलें.

१

राणेखानभाईस पारचें वर्तमान हरकाऱ्यांनीं सांगितलें कीं, पटपरगंजावर रायाजी पाटीलांचे लोकांसीं व गुलामकादराचे लोकांसीं करोलीस लढाई जाली. वीस घोडे रोहिल्याचे नेले व आपणाकडीलही पांच चार घोडीं रोहिल्यानें नेलीं. आणि पाटिलांचे लोकांनीं तोफखान्याचे बैल घेरून नेले. बापू जनार्दन यांचेही लोक होते.

१

मंगळवारीं रामरतन मोदी यांणीं भाईस अर्ज केला कीं, एक रथवान पातशाही होता. तो आह्मांपासीं आला. त्यानें सांगितलें कीं, गुलामकादर याणें किल्यांतून शहाजादे घेऊन पार गेला. तेव्हां शामदीखान बोलला कीं, अकबरशास किल्यांतून उगेच आणिलें. माल असबाब तर तुह्मीं जप्त केला. यास आणून हे येथें काय करतील ? बहुत रदबदली करून अकबरशाहा वगैरे माघारा किल्यांत आणिले, आणि त्यास सतरा सरदीं अंडीं खावयास घातलीं.

१

सदरहूप्रमाणें अकबार आली. त्याजवरून सेवेसीं विनंति लिहिली असे. श्रुत होय. बहुत काय लिहिणें हे विज्ञप्ति."

---

पैवस्ती छ० २ सफर सन तिसा समानीन कार्तिकमास.

## लेखांक ३२५.

**श्री.**

८ आक्टोबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ० ७ माहे मोहोरम मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः—आज्ञापत्र छ २५ रजबचें सादर जालें, तें छ० २ मोहरमीं पाऊन सनाथ जालों. "पातशाहांनीं शुका सरकारांत दिल्हा तो व अनुपगीर गोसावी यांनीं स्नेहवृद्धीविषयीं खलिता पाठविला तो पावला. त्यांचीं पारसीं उत्तरें लिहून

पाठविलीं आहे. त्यांतील मजकूर सविस्तर तुम्हांस कळावयाकरितां त्यांच्या हिंदवी नकला करून पाठविल्या आहेत. त्यांवरून सविस्तर कळेल. सारांश, सरका लक्षाविसीं पातशाहांची कायमी मजबूत असावी. त्यांत वांकडें असूं नये. वरचेवर वर्तमान लिहून पाठवीत जावें. व अलीबहादर यांजकडेही लिहीत जावें." म्हणून पत्रीं आज्ञा. त्यास पातशाहांचें व रोहिल्याचें निमकहरामीचें वृत्त पूर्वी सविस्तर विनंति लिहिलीच आहे. हल्लीं वर्तमान, गुलामकादरखान यांनीं पातशाहांस कैद केल्यावर डोळे सुरीनें काढले! आज दोन महिने जाहाले, किल्याचा व बेगमात व पातशाहाजादे व सलातीन व नाजर यांची जप्ती केली! एकेक पांघरूण आंगावर मात्र सोडिलें. वरकड दरोबस्त जिन्नस जवाहीर नगदी वस्त्रें दरोबस्त घेतलीं! दोन शत अडीच शत वर्षांची पातशाहत होती. ऐसी फजिती व दुर्दशा सलतनतीची कधींही जाली नवती! दाहा बारा करोडचें वित्त रोहिल्यांचे हातीं लागलें. इस्माइलबेगास तिसरा वांटा देऊं केलें होतें. तें बदमामली करून कांहीं न दिल्हें! यास्तव इस्मायलबेग राजश्री माहादजी शिंदे यांसीं मिळाला. राणेखानभाई वगैरे फौज शिंदेकडील फरिदाबादेस आली. इस्मायल-बेगासीं पुर्तेपणें एकोपा जाला. तेव्हां छ० ३० जिल्हेजीं फरिदाबादेहून राणेखान वगैरे कूच करून दिल्लीस आले. गुलामकादर यांनीं बाहेरील लोक सर्व किल्यांत घेतले, व सालेमगढांत दरवाजा यमुनेकडे आहे, त्यामार्गें यमुनाचा उतरा प्रारंभ केला. राणेखान व इस्मायलबेग यांनीं शहरचा बंदोबस्त करून किल्यास मोर्चे लाविले! त्याजवरून गुलामकादर फार घाबरला. छ० १ मोहरमीं दोन प्रहर रात्र जाल्यावर, मनियारासिंग व हातुअल्लीखान यांस किल्यांत देऊन, आपण यमुना उतरून शाहदरयाजवळ मुक्काम केला. व किल्यांतील जिन्नस जप्तीचीं होती, त्यास उतरवायास रात्रीं नावा तयार करून प्रारंभ केले. बेदरशाहा आतां पातशाहा केला होता, त्यासही घेऊन गेला. किल्यांत अन्नाची मोठी विपत्य आहे! छ २ मोहरमीं मोर्चे कुरसीया बागेकडे व अबदुल आहदखानाची हवेलीस लावले. आतां यमुना उतरावयाचे घाटही बंद जाले. किल्यांतील लोक बहुत घाबरले आहेत. आज उद्यां किल्ला रिकामा होईल. अंतरवेदप्रांतीं राजश्री रायाजी पाटील दहा बारा हजारांचे जमावानसीं आहेत. तिकडे त्यांनीं येऊन युद्धप्रारंभ केलें आहे. पुढें अमलांत येईल तें मागाहून विनंति लिहूं. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

# लेखांक ३२६.

श्री. ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"सेवेसीं विज्ञापना ऐसीजेः– छ ८ मोहरम विजयादशमीचें वर्तमान आकबारचें आलें. गुलामकादरपासून नावा घेऊन किल्ल्याखालीं येऊन नावेंत जिन्नस घालून पार फौजेंत पाठविला. नाजराचे हवेलींत दोन कोटे अन्नाचे निघाले. त्यांपैकीं एक कोटा किल्ल्यांतील लोकांस वांटून दिल्हा. व एक कोट्यांतील अन्न नावेंत भरून पार पाठविलें. व आपण पार जाऊन, पांच हजार फौज तयार करून, तोफा बरोबर घेऊन, पटपरगंजावर जाऊन, बाजार जाळून माघारा फौजेंत आला. तेच दिवशीं लखनऊचें वर्तमान त्याचे लष्करांत आलें कीं, मंदराजाहून चार पलटणें व सत्तर गोरे हस टुवर (?) घेऊन पटणेस आला. बडे साहेबाची चस्ती कलकत्त्याहून कानपुरच्या कंपूस व फरकाबादेच्या कंपूस आली कीं, तुह्मीं, मिर्जाअमानी कूच करतील,त्याचा साथ करणें. त्यास मोहरम दहा तारखेनंतर जे सल्ला होईल ते कळेल. शहाजादा लखनऊस आहे. तो येवज साहेब लखनऊचा सरदार त्याचे घरास गेला होता. त्यांणीं नजरनपाज केली. घोडे हत्ती दिल्हे व वस्त्रें दिल्हीं. खातरजमा केली. याप्रमाणें वर्तमान आलें. तें सेवेसीं लिहिलें. श्रुत होय. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञप्ति."

---

# लेखांक ३२७.

पै॥ छ० ५ सफर. श्री. ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, शाहाअलम पातशाहाचे शाहाजादे अकबरशा व सिलेमासिको व हसनबक्ष वगैरे शाहाजादे आजमासें १९ गुलामानें धरून आपले बरोबर नेले; व पातशाहांसही नेत होता. परंतु मनीहरसिंग ह्मणोन पलटणवाला यवनाकडे चाकर होता, त्यानें मोठे रदबदलीनें सोडोन देविलें. त्यास हल्लीं किल्ल्यांत अंध होऊन आहेत. एक बेगम मात्र सोडून गेला आहे. परंतु त्याची दुर्दशा फार केली. ते कोठवर लिहावी? माणूस मात्राची गैरहुकमत करून पैका दर एकाजवळोन घेतला. दो कोटींचें जवाहीर व नख्त सलातीनापासोन निघालें. पैकेपूर होऊन पार उतरोन गेला. पुढें गोसगडास जावेंसें आहे. परंतु चहूंकडून घेऱ्यांत पडला आहे. पहावें, पुढें प्रत्यास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें. कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३२८.

पैवस्ती छ० ५ सफर. श्री. ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—दयाराम जाट हातरसवाला यांची मामलत शाहानिजामुद्दी यांचे विद्यमानें ठरली कीं, दीड लक्ष रुपये नख्त द्यावे. पैकीं साठ हजार रुपये तूर्त दिल्हे. बाकीचे चैत्रमासीं पावेतों द्यावे, ऐसा ठराव जाला आहे. पुढें श्रवणांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३२९.

पैा छ० ५ सफर. श्री. ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—नजब कुलीखान रेवाडी व गोकुळगड वगैरे जागा दरोबस्त दाबून आहे. दिल्ली प्रांतीं सरकारचा बंदोबस्त जाला ह्मणोन जमीदारांनीं मशारनिल्हेसीं बदमामली करून रेवाडी प्रांतीं बखेडा जाला आहे. राव राजे प्रतापसिंग माचेडीवाले यांचे विद्यमानें नजबकुलीखानाचें राजश्री पाटिलबावांसीं सलूकाचें बोलणें आहे. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३३०.

पै॥ छ० ५ सफर श्री. ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे–राघोगडवाला राजा लष्करांत आला. राजश्री पाटीलबावा एक कोस सामोरे जाऊन डेऱ्यास आणून, हत्ती, घोडा, जवाहीर वगैरे बहुमान करून, राजश्री शिवाजी विठ्ठल बापूंचे स्वाधीन केलें. त्याजवरून जाबसाल होऊन राघोगड बदस्तूर पहिल्याप्रमाणें मशारनिल्हेस द्यावें. त्यास याप्रमाणें ठराव होऊन एक लक्ष रुपये नख्त ठरले. त्याची निशा राजश्री शिवबा जामदार, पाटीलबावांचे जामदार खान्यावर असतात, त्यांची निशा ठरली आहे. पुन्हां मशारनिल्हे राघोगडाकडे जाणार. राजेमजकुराची जाटानीं बुंदीवाल्यानीं केली आहे. पुढें अंमलांत येईल तें विनंति करूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३३१.

पै॥ छ ५ सफर. **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे जयपूरकर राजे बदस्तुर शहरांत आहेत. दौलतराम कारभारी मात्र, राव राजाचे मुलुकांत धामधूम करून, गड किल्ले काबीज करून बंदोबस्त केला. राव राजा अलवारचे किल्ल्यांत आहे. नजबकुलीखान व मशारनिल्हे एक विचारें जाले, व फौज जमा करून पुन्हां जयपूरकरांचे मुलकांत जाऊन उपद्रव करणार. व मशारनिल्हेकडील वकील जीवनखां राजश्री पाटीलबावांपाशीं जाबसालाकरितां आला आहे. पुढें काय ठरेल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३३२.

पै॥ छ० ५ सफर. **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे, जवांबख्त शाहाजादा याचा पुत्र मिर्जा हाजी यांस पूर्वी काशीहून वजिरांनीं लखनौस आणिलें होतें. त्यास हल्लीं मिर्जा मजकुराचे सरंजामाची तयारी होते. एक कंपू दारानगराहून भागीरथी उतरून अलीकडे अनुपशहरांत दाखल जाला, व तेथील राजाकडून खंडणी घेऊन पुन्हां कंपू दारानगरास कूच करून गेला. दोन पलटणें मात्र अनुपशहरांत आहेत, व लखनौंत फौजेची निगादास्त होते, ह्मणून श्रवणांत आलें आहे. अंमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३३३.

पै॥ छ० ५ सफर. **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे—नवाब मंजूरअल्लीखान नाजर व राय सीतलदास व रामरतन मोदी यांनीं पूर्वी गुलामकादरखानासीं सूत्र लावून दिल्लींत बोलाविलें, व सर्व पातशाही गारत केली. त्यास, गुलामानें मंजूरअल्लीखानांशीं बदमामली करून शासन केलें, व त्याचे घरची जफ्ती केली. त्यांत वीस पंचवीस लक्षांचा सरंजाम नगदी निघाला. सीतलदास व रामरतन यांनीं युक्तीनें आपलीं कुटुंबें दिल्लींतून काहाडून पटण्यास रवाना केलीं. सीतलदास पटण्यास गेला, व रामरतन पळोन इकडे राजश्री पाटिलबावांचे लष्करांत आला. येथें ममतेंत शिरून राणेखानभाई-

कडे जाऊन, दिल्लीचे करोडगिरीचे हसलापैकीं पंचवीस हजार रुपये सरकारांत देऊन, करोडगिरीची खिजमत कबूल केली. श्रुत होय. पुढें प्रत्यास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३३४.

पैा छ० ५ सफर **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पुा श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

विनंति ऐसीजे– पटालेवाले शीख व लाहोर अटक वगैरेकडे गुलामाचीं पत्रे गेलीं आहेत कीं, तुह्मीं वीस हजार स्वारांनशीं येऊन आह्मांस सामील व्हावें, ह्मणजे खर्चाची बेगमी करून देऊं. याप्रमाणें शिखाकडे पत्रें व वकील गेला आहे. गुलामानेंही नजीबखानाप्रमाणें डौल रचला आहे. पहावें, पुढें काय प्रत्यास येईल तें विनंति लिहूं. कलम १.

कृष्णगडवाला राजा बिसनसिंग राजश्री पाटीलबावांबरोबर दोन वर्षें होता. त्यास, कृष्णगडास राठोडांनीं मोर्चे लावून सर्व जागा हस्तगत केली. एक किल्ला मात्र राहिला आहे. राजेमजकुरांनीं राजश्री पाटीलबावांचे अनुमतें कांहीं पैका देऊन राठोडांशीं मामलत केली. आणि राजे मजकूर राजश्री पाटीलबावांशीं निरोप घेऊन वृंदावनास आले. दुसऱ्या दिवशीं मृत्यु पावले! राजा मान, नातू राजे मजकुराचा, ग्वालेरप्रांतीं राजश्री पाटीलबावांनीं ठेविला आहे. श्रुत होय. कलम १.

राजश्री पाटीलबावांनीं लखनौस वजिरास व इंग्रेजांस पत्रें लिहिलीं आहेत कीं, हल्लीं दिल्लीचा बंदोबस्त किल्ल्यासहित आह्मीं केला. गुलाम शाहादऱ्यास गेला. फौजा सरकारच्या गिर्द आहेत. रसद बंद करून लौकरच पारपत्य होईल. त्यास आतां दिल्लींत पातशाहा बसविला पाहिजे. त्यास, आपला आमचा विचार ठरेल त्याप्रमाणें अमलांत आणूं. लौकर पत्रोत्तर पाठवावें. त्या अन्वयें केलें जाईल. याप्रमाणें वजिरास व इंग्रेजांस पत्रें गेलीं आहेत. पुढें प्रत्यास येईल तें विनंति लिहूं. कलम १.

बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३३५.

पै॥ छ० ५ सफर. **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः—गुलामकादराची मातुश्री शिखांकडे जाऊन सूत्र लाविलें

आहे कीं, आमची मदत करावी. त्याजवरून कांहीं खर्चासही मशारनिल्हेनीं पाठविलें आहे. परंतु अद्याप कांहीं ठराव जाला नाहीं. पुढें अंमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३३६.

पै॥ छ० ५ सफर. श्री. ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—शिखांनीं अटक नदीपासोन सर्व मुलकांत आपला बंदोबस्त पानिपतपावेतों करून, अंतरवेदींत चौथाई रखीचा अंमल ठरावून जबरदस्तीनें घेतात. हल्लीं राजश्री पाटीलबावांनीं बघेलसिंग शीख कुरुक्षेत्रकर यास पत्रें बोलावण्याचीं गेलीं आहेत कीं, तुह्मीं फौज घेऊन तिकडून गुलामाचे रोखावर राणेखानभाईजवळ येऊन सामील होणें. तुमचा बंदोबस्त सर्व गोष्टींचा केला जाईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३३७.

पै॥ छ० ५ सफर. श्री. ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—मिर्जा शाहारुख, नादरशाहाचा नातू, यांनीं तैमूरशाहा अबदाली यांसीं लढाई करून सर्व प्रांतांत आपला बंदोबस्त केला. व अबदाली मजकुरास खारीज केलें आहे. त्या प्रांतींही आपसांत लढाई चालली आहे, ह्मणून श्रवणांत आलें. तें विनंति लिहिली असे. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३३८.

पै॥ छ० ५ सफर श्री ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—राजश्री रायाजी पाटील हिंडण नदी उतरून गुलामकादराचे गिर्द होऊन चहूंकडील रसद बंद केली आहे. व नित्य गोळागोळीचा प्रसंग होतो. यवनांचे लष्करांत चारशेर अन्न विकतें व दिल्लीहून राजश्री जिवबा बक्षी यांची व तोटा फिरंगी वगैरे फौजांची यमुनापार उतारा लागला आहे. हे सर्व फौजा, पार उतरोन, लढाई करून यवनांचें पारपत्य करावें

या उद्योगांत आहेत. व राजश्री पाटीलबावांचीही वरचेवर ताकीद आहे कीं, रोहिल्यास जिवंत धरून आणावें. पुढें निदर्शनास येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३३९.

पैवस्ती छ० ५ सफर **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे:- इस्माईलबेग यांस राजश्री पाटिलबावांनीं पन्नास हजार रुपये खर्चास पाठविले. व आणीक लक्ष रुपयांची तजवीज आहे. पुढें गोसगडाकडील मुलुख गुलामकादरखानाचा मशारनिल्हेस सरंजामांत द्यावा ऐसें बोलणें ठरलें आहे. व मशारनिल्हेचे फौजेचा उतारा यमुनापार लागला आहे. प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं. बहुत लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३४०.

पैवस्ती छ० ५ सफर. **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—गुलामकादरानीं बेदारबक्ष महमदशाहाचा नातू पातशाहा केला होता. त्यास व त्याचे चौघे बंधू होते त्यांस आपल्याबराबर घेऊन गेला. आणि नाजरासही समागमें धरून नेलें आहेत. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३४१.

पैवस्ती छ० ५ सफर. **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना साहेब स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—विलायतेहून वर्तमान आलें कीं, मुरादशाह पैई बगदादचा पातशाह तैमुरशाहावर चढून आला. युद्धप्रसंग जाले. तैमुरशाहानीं शिकस्त खाऊन पिशावरास आला. मुरादशाहानीं माहालपावेतों बंदोबस्त केले. पुढें पिशावरांस येणार. तैमुरशाहा, लाहोर प्रांतीं मातबर शीख आहेत त्यांस कुमकेस बोलावितो. त्यास शीख पैका मागतात. पुढें अंमलांत येईल तें विनंति लिहूं. अनुपगीर गोसावी यास सरकारचा खलिता दिल्हा. तो बहुत प्रसन्न जाला. हरयेकविशीं सरकारचाकरीस तत्पर आहेत. कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३४२.

पै॥ छ० ५ सफर. **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे:—इस्माइलबेग हमदानी याचा जाबसाल हिंमतबहादर गोसावी यांचे विद्यमानें राजश्री पाटीलबावांसीं बोलणें होऊन ठराव जाला कीं, दीड लक्ष रुपये नख्त द्यावे, व सरंजाम फौजेचे खर्चास लावून द्यावा. याप्रमाणें ठराव होऊन, करारमदार शपथपूर्वक ठरोन यांजकडे मिळाला, व दिल्लीचे शहरांत हमदानी मजकुरानें रवळोजी शिंदे यांचा बंदोबस्त करून दिल्हा. त्यास दहा पंधरा दिवस किल्ल्यासीं लढाई राहिली. शेवटीं छ० १० मोहरमीं गुलामकादरानें आपले लोकांस सांगून पाठविलें कीं, किल्ल्यांत जे वस्तभाव आहे, त्यास अग्न देऊन निघोन येणें. त्याजवरून रोहिल्यांनीं किल्ल्याची खराबी करून निघाले. ते समयीं हिंमतबहादर गोसावी वगैरे मोर्चे होते, त्यांसीं लढाई जाहाली. अखेर शेंपन्नास माणसें उभयपक्षीं लढाईंत ठार जाले, व रोहिले निघोन गेले. किल्ल्यांत राजश्री जिवबा बक्षी दाखल होऊन आपला बंदोबस्त जाला. सेवेसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३४३.

पैवस्ती छ० १ सफर तिसा समानीन कार्तिक मास. **श्री.** ९ आक्टोबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ० १४ माहे मोहरम मुक्काम लष्कर नजिक श्रीमथुरा जाणोन स्वानंद लेखन करीत असिलें पाहिजे. विशेष:—पेशजीं विनंतिपत्रें सरकारांत सेवेसीं पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जाहालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, राजश्री पाटिलबावांनीं आगरियाच्या वगैरा नावा दरोबस्त पैदरपै फौजा यमुनापार करावयास दिल्लीस पाठविल्या आहेत. त्या नावा दिल्लीस पावल्या. राणेखानभाई व जिवबा बक्षी व समरूचीं पलटणें वगैरे फौजेचा उतारा अंतरवेदींत लागला आहे. व इस्माइलबेगास गुलामाचें पत्र आलें होतें कीं, दोन लक्ष रुपये सध्यां नख्त घ्यावे, व आह्मांस येऊन सामील व्हावें. त्याजवरून इस्माइलबेगानीं तें पत्र बजिन्नस राणेखानभाईकडे पाठऊन दिल्हें, आणि गुलामास साफ उत्तर सांगोन पाठविलें कीं, आह्मांस तुमचा इतबार नाहीं. निमकहराम आहां! ऐसें उत्तर पाठविलें. पूर्वीं महमदबेग हमदानीचें कुटुंब आग-

रियाचे किल्ल्यांत ठेविलें होतें. सांप्रत इस्मायलबेग इकडे सामील जाला ह्मणोन त्याचें कुटुंब मशारनिल्हेकडे पाठऊन दिल्हें. यानंतर जैपूरकर राजे यांनीं इस्मायलबेगास पत्रें पाठविलीं आहेत कीं, तुह्मीं दाहा हजार फौज घेऊन आह्मांकडे यावें. येथें तुमचे खर्चाची व जायेदादीची बंदोबस्त करून देऊं. याप्रमाणें पत्रें आलीं आहेत. त्यास येथूनही वरचेवर इस्मायलबेगास राजश्री पाटीलबावांचीं पत्रें खातरजमेचीं जातात. व खर्चाची तरतूद आहे. दुसरे अलीबहादर व राजश्री तुकोजी होळकर यांनीं मारवाडांतून पांच कोस अलिकडे करोलीचे रोखें कूच केलें आहे. जैपुरकर राजे यांनीं आपल्याकडून वकील बहिरजी नामें राजश्री पाटीलबावांकडे रवाना केले आहेत. परंतु अद्याप येथें लष्करांत आले नाहींत. मशारनिल्हे आलियावर अमलांत येईल तें विनंति लिहूं. आमचें वर्तमान तर, गुलामकादराच्या भयामुळें जीव मात्र वांचऊन मुक्काम मजकुरीं आलों. सदोदित कृपापत्रीं सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत. वरकड वृत्त पुरवणीपत्रावरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ० २३ सफर
तिसा समानीन.

## लेखांक ३४४.

श्री. २६ आक्टोबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नानासाहेब स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ० २५ माहे मोहरम मुक्काम दिल्ली जाणून स्वानंद लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः— पूर्वीं विनंतिपत्रें पाठविलीं, तें प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं वर्तमान तर, राणेखान वगैरे यांनीं किल्ल्यास मोरचे लावल्यावर रोहिला यमुना उतरून गेला होता. पुन्हां किल्ल्यांत येऊन अकबरशाहा वगैरे आठ असामी, व बेदरशाह नवा पातशाहा केला होता तो, व सात असामी त्याचे भाऊ वगैरे, व नवाब नाजर ऐसे घेऊन गेला. छ० १० मिनहूनीं किल्ल्यांत अग्न लागून दारूगोळ्याचा कोठा उडाला. रोहिले बहुत उठून गेले. मग घाबरून किल्ल्यांतून रोहिले पळून यमुनापार गेले. दोन प्रहरानंतर हिंमतबहादूर गोसावी व रवळोजी शिंदे किल्ल्यांत दाखल जाले. दोन पलटणें तेथें ठेऊन बंदोबस्त केले. शाहाअलम पातशाहा आंधळा आहे. त्यांसी भेटून अर्ज केले कीं, "तुह्मींच पातशाहीवर असावें. तुमचे लेंक, गुलामाचें पारपत्य करून आणूं, तेव्हां अकबरशहास तख्तावर बसवूं". हें वर्तमान गुलामांनीं ऐकून, बेदारशाहा पातशाहा केला होता त्यास कैद करून, अकबरशाहास पातशाहा करून, येथें आंधळ्यास सांगून पाठविलें कीं, "तुमचे लेंकास

पातशाहा केलें आहे. घोडीं हत्ती वगैरे सरंजाम दरोबस्त देतों. माझी तकसीर माफ करावी. आंधळ्यानीं राणेखानांस सांगून पाठविलें कीं, "गुलाम माझे लेंक देतो. तुह्मी ह्मणाल तर त्याजला बोलावून तकसीर माफ करून लेंकास आणवूं." त्याजवरून राणेखान वगैरे यांनीं बहुत विषम मानून बोलिले कीं, "आंधळे जाले परंतु बट्टेबाजी अद्यापि गेली नाहीं. त्यांनीं अकबरशाहास गुलामांनीं पातशाहा केलें, तें प्रमाण नाहीं. आह्मी पारपत्य करून शाहाजाद्यास आणून पातशाहा करूं, तेव्हां प्रमाण आहे." त्याजवरून आंधळा उगाच राहिला. व गुलामाचा माणूस आला, त्यास तंबी करविली. हें वर्तमान राजेश्री माहादजी शिंदे यांनीं ऐकून राणेखानांस ताकीद दिली कीं, जलदीनें यमुना उतरून गुलामाचें पारपत्य करावें. व आंधळ्याची खातरदारी करावी. त्यास येथें हिंदुस्थानी फौज पलटणें वगैरे यांनीं राणेखानासीं तलबेचा हंगामा केला. यास्तव पार उतरावयाचें कठीण जालें. मग राणेखान यांनीं कर्ज घेऊन जैसे तैसे फौजेची समजाविश केली, व नावाही जमा करून उतरावयाची सिद्धता केली आहे. रायाजी पाटील वगैरे आठ दहा हजार फौज अंतरवेदींत आहेच. आणीख बावीस तोफा व आठ दाहा हजार स्वार पायदळ रणजितसिंग जाटाकडून शेरगढाजवळ यमुना उतरून आले आहेत. आज उद्यां रायाजी पाटीलचे शामील होईल. वीस हजार स्वार पायदळ राणेखानांपासीं आहे. श्रीकृपेनें गुलामाचें पारपत्यच होईल. नवाब असफदौले यांनींही एक कंपू रवाना केला. परंतु त्यास पोहोंचावयास दिवसगत पाहिजे. छ० २१ माहे मजकुरीं राणेखान वगैरे सर्व किल्ल्यांत आंधळे पातशाहांपासीं येऊन नजर वगैरे शिष्टाचार केले, व अर्ज केले कीं, "आपण दिवाणखासांत गादीवर बसावें. व जिवाबख्त तुमचा नातू आहे, त्यास पुढें घेऊन बसावें. दरबार शिरस्त्याप्रमाणें करीत जावें." ऐसें ठराऊन जोशास मुहूर्त पाहावयास ताकीद केली. आंधळ्यानें सांगितलें कीं, "तुह्मीं येथें बंदोबस्त ऐसे करितां. हें वर्तमान गुलामानीं ऐकून, शाहाजादे त्याच्या कैदेंत आहेत त्यांसीं बदसलूखी केल्यास उपाय काय ?" त्याजवरून हे निश्चय ठरले कीं, आधीं त्याचें पारिपत्य करावें, मग जें करणें तें करावें. त्यास येथून साता कोसांवर यमुना पायाबश पडली आहे, तेथें फौज उतरून गुलामाचें पारपत्य सत्वरच करितात. पुढें अंमलांत येईल तें विनंति लिहूं. सविस्तर तीर्थस्वरूप राजेश्री देवराव विनंति करतील. बहुत काय लिहावें. कृपा केली पाहिजे हे विनंति.

गोसावी हिंमतबहादूर यांनीं खलिता पाठविला आहे. त्याचें उत्तर यथास्थित पाठविणार स्वामी समर्थ आहेत हे विनंति."

---

## लेखांक ३४५.

श्री. आक्टोबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. येथील मंडळी राजश्री पाटिलबावांस इच्छित नाहींत. राजे जैपूरकर व जोतपूरकर व नवाब नाजर व रामरतनमोदी इतक्यांचा भरंवसा त्यांस इच्छित नाहींत. व पाटिलबावा असावे ऐसें पातशाहा व रंजितसिंग जाट व रावराजा व हिसामुदीखानाचा भाऊ वगैरे सर्व मंडळी पाटिलबावांस इच्छितात कीं असावें. सर्व मंडळी लहान थोर राजश्री सुभेदार तुकोजी होळकर वगैरे आपले सरकारचा सरदार अलिबहादर आदिकरून श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामीकडील जो कोणी येईल, त्यासीं सर्व हिंदुस्थान हजर आहे. याप्रमाणें मोंगलिये आदिकरून सर्वांचें मानस आहे. नवाब नाजर, राजे जैपूरकर यांची मुलाजमत करून द्यावी ह्मणून दिल्लीहून आले होते. राजाची मुलाजमत करून आठ दहा रोज येथें राहून, राजाकडील जाबसालाचा व नजबकुलीखान याजकडील जाबसालाचा गुंता उरकून मग दिल्लीस जावें. याप्रमाणें पातशाहांचें व नाजरजींचें मानस होतें. त्यास राजाकडील जाबसालाचा व नजबकुलीखान याजकडील जाबसालाचा गुंता उरकोन मग दिल्लीस जावें, ह्याप्रमाणें पातशाहांचें व नाजरजीचें मानस होतें. पातशाहांचे मर्जीप्रमाणें वर्तत नाहींत, ह्मणून लाचार होऊन पातशाहांनीं दिल्लीस रवाना केलें. याचें कारण हेंच कीं, दिल्लीचा किल्ला खाली, शहरांत कोणी नाहीं, हें जाणून खबरदारीस पाठविलें. याजकरितां त्याचे खलित्याचा जाब पाठविला नाहीं. दिल्लीहून उत्तर आणविलें आहे. आलियावर मागाहून पाठऊन देऊं. पातशाहांनीं ताकीद केली आहे कीं, "शुक्याचा जाब सत्वर आणवणें." याजवरून विनंति लिहिली आहे. तरी शुक्याचा जाब सत्वर रवाना करावा. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३४६.

श्री. १ नोव्हेंबर इ. स. १७८८.

"आज्ञाधारक गंगाजी आव्हाड व विठ्ठल हरी अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता॥ कार्तिक शुद्ध तृतीया ता॥ छ १ माहे सफर मुक्काम लष्कर श्रीमथुरा यथास्थित जाणून लेखन आज्ञा करावी. विशेषः— येथील वर्तमान, इस्मायलबेग यास जायजाद रेवाडी प्रांत देऊन, नजबकुलीखान याजवर पाठविलें होतें. हे जाऊन यांणीं नूरगडास मोरचे लाविले होते. त्याजवरून

नजबकुलीखान याजवर जमाव, फौज स्वार दोन तीन हजार व तोफा अठरा, याशिवाय पायदळचे लोक दहा पंधरा हजार गवार मेळवून चालून आला. इस्मालबेगाजवळ जमाव स्वार दीडहजार व पायाचे लोक तीन हजार, तोफा सव्वीस, व आपले मऱ्हाटे लोक शंभर स्वार तैनातीस दिल्हे होते. इतक्या लोकांनिशीं नजीक रेवाडीचे युद्धप्रसंग आश्विन वद्य चतुर्दशीचे दिवशीं प्रातःकाल-पासोन सायंकालपावेतों तोफेची मारगिरी व गोळागोळी होऊन, अस्तमानीं इस्मालबेग त्याजवर चालून गेला. लोक परस्परें पडले. व जखमीही बहुत काय जाले. नजबकुलीचा मोड होऊन, तो पळोन गांवाचे आसऱ्यास गेला. प्रहर रात्र जाली. त्याजकडील तोफा आठ आणिल्या. याप्रमाणें वर्तमान आलें. त्यावरून राजश्री पाटिलबावांनीं आह्मांस लिहावयास सांगितलें. सेवेसीं श्रुत होय बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ३४७.

**श्री.** ८ नोव्हेंबर इ. स. १७८८.

" श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ ९ माहे सफर मुक्काम लष्कर नजिक मथुरा जाणोन स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः--इकडील वृत्त पेशजीं छ० १५ मोहरमीं विनंतिपत्रें सेवेसीं पाठविलीं होतीं, ते प्रविष्ट होऊन वृत्त श्रुत जालें असेल. हल्लीं वर्तमान तर, छ० ६ रोजीं आंबोजी इंगळे लष्करांत येऊन नवाब अलीबहादर समीप आल्याचें वर्तमान साकल्य राजश्री पाटिलबावांपासीं बोलले. दुसऱ्या रोजीं छ० ७ माहे मजकुरीं गुरुवारीं राजश्री पाटिलबावा तीन चार कोस पेशवा जाऊन परस्परें भेटी जाल्या. तेथून स्वार होऊन नवाब अलीबहादर गंजामागें डेर-दाखल जाले. व राजश्री पाटिलबावा छावणीस आले. राजश्री आंबोजी इंगळे इकडून हरयेक जाबसालांत आहेत. सांप्रत नवाब अलीबहादरांचें बोलणें हेंच कीं, अगोदर यमुनापार उतरून गुलामाचें पारपत्य लौकरच केलें पाहिजे. सरकारफौजेची आमदानी व शोहरत ऐकून राणेखानभाई वगैरे फौजा त्वरेनें यमुनापायाब उतरून गुलामाचे मुकाबलयावर गेले. तिकडून गुलामही लढाईस सिद्धच आहे. गोळागोळीची लढाईस प्रारंभ जाला आहे. सरकारची फौज व सरदार आले आहेत. या दबावानेंच गुलामाचें पारपत्य मनोदयानरुप प्रतापेंकरून श्रीमंत स्वामींचे घडून येईल. सरकारचे फौजेचा दबाव ऐकून गुलामानें दहशत खाऊन पळावयाच्या

संधानांत आहे. कूच करून गाजियाबादेकडे गेला. मार्गीं जातांना देवजी गौळी राजश्री पाटिलबावांकडील यांनीं बुणगें लुटिलें, ह्मणोन वदंता आहे. निदर्शनास येईल तें लिहूं. राणेखानभाई व रायाजी पाटील वगैरे फौजा राजश्री पाटिल-बावांकडील गुलामाचे गीर्द आहेत. रसद बंद आहे. आठा चहूं दिवसांत गुलामास धरतील, ऐसें दिसतें. दिल्लीची सुभेदारी, राजश्री खंडोजी शिंदे, राजश्री धारराव शिंदे यांचे कनिष्ठ बंधू, यांची नेमणूक जाली आहे. व कांहीं पलटणा व फौज मराठी, शहरांत बंदोबस्तास आहे. लखनऊहून वजिराचीं पत्रें शिष्टाचाराचीं राजश्री पाटिलबावांस आलीं कीं, "तुह्मी उत्तम जाणाल तें कराल. इकडून दुसरा प्रकार नाहीं." याप्रमाणें पत्रें आलीं आहेत. यांनीं पूर्वीं पत्रें पाठविलीं त्यांचें प्रत्योत्तर आलें नाहीं. लखनऊस जवाबख्त शाहाजादा यांचा पुत्र आहे. त्याचे सरंजामाची तयारी होते ह्मणोन वदंता आहे. रंजितसिंग जाट भरतपुरास आहेत. त्यांनींही मेजमानी नवाब अलीबहादरांची केली. एक दिवस समशेरबहादराचे दरगाहाचे उरसाकरतां मात्र भरतपुरीं मुक्काम केला होता. वरकड दरमजल मथुरेस दाखल जाले. वरकड वृत्त, पुरवणीपत्रें व येकबारा पारसी सेवेसीं पाठविल्या आहेत, त्यांवरून श्रुत होईल. पुढें विचार ठरेल तें विनंति लिहूं. छ० मजकुरीं राजश्री पाटिलबावांनीं नवाब अलीबहादर यांचे मेजमानीची तयारी केली आहे. सेवेसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३४८.

**श्री.** नोव्हेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—दिल्लीचें वर्तमान तर, शाहाअलम पातशाहांस राणेखानभाईंनीं किल्ल्यांत ठेविलें आहे, व सलातीन लोक होते त्यांसही वस्त्रें प्रावर्णें सर्वांस दिल्हीं. व पातशाहांस विचारिलें कीं, "कोणता शाहजादा तख्तावर बसवावा?" त्यावरून पातशाहांनीं उत्तर केलें कीं, "विचार करून सांगूं." इतकियांत हें वर्तमान गुलामास समजल्यावर बेदारबक्षास दूर करून, अकबरशाहा पातशाहांचा पुत्र समागमें नेला होता, त्यास तख्तावर बसवून, आपण खवासींत बसोन शिक्का अकबरशाहाचा जारी केला; आणि पत्रें शाहाअलम यांस लिहिलीं कीं, "अकबरशाहास पातशाहा केलें. आपण शिक्कागज पाठवून द्यावा, व शहरांत वगैरे सर्वत्र शिक्का यांचा जारी करावा." याप्रमाणें पत्र यांस लिहिलें. त्यावरून पातशाहांनीं हें पत्र पाहोन बहुत संतोषास प्राप्त जाले. तें पत्र राणेखानभाईकडे पाठऊन दिल्हें. भाई मजकुरानीं पातशाहांचे

खुशीचें वृत्त श्रवण करून बहुत बेदिल होऊन बोलले कीं, "अद्याप हिंदुस्थानीं माणसांस सुचत नाहीं. गुलामानें सर्व पातशाहत गारत केली असतां, आतांही आश्रा तुटत नाहीं. त्यास हल्लीं दिल्लीचे किल्ल्यांत व शहरपन्नाचे बंदोबस्ताकरितां नवी शिबंदी दोन तीन हजार प्यादे ठेऊन, किल्ल्याचा व शहराचा बंदोबस्त अजितसिंग बलमगडवाला यांस सांगितला. त्यास मशारनिल्हेनीं किल्ल्यांत जाऊन आपले लोक कायम केले. व शहरच्याही दरवाजावर बंदोबस्त करून आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३४९.

**श्री.** नोव्हेंबर १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—गुलामानें राजे हिंमतबहादर गोसावी यांस पत्र लिहिलें आहे कीं, राजश्री पाटिलबावांची व आमची सफाई करून द्यावी. त्यावरून दुसरे रोजीं गोसावीमजकूर राणेखानभाई जवळ येऊन, तें पत्र बजिन्नस दाखविलें. आणि गुलामाकडील निरोप सांगितला कीं, "पातशाही गारत केली, ते सर्व नाजर व आणिक कितेक लोकांचीं पत्रें येविशीं आह्मांस आलीं होतीं, तें पाहावीं. त्यावरून मीं तेथें जाऊन त्याप्रमाणें बंदोबस्त केला. व नाजराचेंही पारपत्य केलें तात्पर्य, पातशाहांचें जन्मांतरीं ऐसेंच होतें. त्यास जो सरंजाम व नगदी वगैरे बमोजीब यादीप्रमाणें आह्मांकडे आला असेल, तो तुह्मीं माघारा घ्यावा. आणि माझा मुलूख मजकडे बदस्तुर बाहाल ठेऊन, वरकड आज्ञा होईल त्याप्रमाणें वर्तणूक करूं. परंतु शोध करून पाहावा. मजकडे अन्याय नाहीं. सर्वांचें अनुमतें होणें तें जालें. बदनामीचा मात्र टिका आमचे दैवीं आला. त्यास आज्ञा कराल तर बिलासराव वकील पाठऊन देतों." याप्रमाणें गुलामानें हिंमतबहादर यांचे विद्यमानें बोलणें लाविलें आहे. परंतु राजश्री पाटिलबावांचें मानस व इरादा हाच कीं, जिवंत धरून आणावें. व वरचेवर ताकीद आहे कीं, "लौकर पार उतरून गुलामाचें पारपत्य करावें." गुलामानें त्या पारीं दहा बारा कोस तमाम घाटावर आपला बंदोबस्त केला आहे. त्यास दिल्लीहून अलीकडे आठा कोसांवर एक घाटाचा शोध लाऊन, राणेखानभाई व जिवबा बक्षी वगैरे उतरले. व कांहीं फौज व तोफखाना कुरसियाबागाजवळ पायाब उतरले. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३५०.

**श्री.** नोव्हेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीः—

विनंति ऐसीजेः–जयपूरवाल्याचे व जोतपूरकराचे वकील सुभेदारांकडे गेले आहेत कीं, आपली मामलत परभारें आह्मांसीं करून द्यावी. राजश्री पाटीलबावांसीं संबंध न ठेवावा. पूर्वापर आह्मी आपले स्थापित आहोंत. त्यावरून कांहीं बोलणें लागलें आहे, परंतु अद्याप निश्चय ठरल्यांत आला नाहीं. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. कलम १.

बंघेलसिंग वगैरे शीखांकडील वकील, राणेखानभाईजवळ येथें राजश्री पाटीलबावांपाशीं आले आहेत. इकडे बोलणें लागलें आहे. परंतु पैका मिळेल तिकडे शामील होतील. कलम १.

राजश्री खंडेराव हरी यांची मामलत दूर करून, दुसरे कमाविसदाराकडे कछवाघार वगैरे सर्व सांगितलें. त्यास गोहद वगैरे प्रांतीं जमीनदारांनीं दुंडी केली आहे. त्यावरून हल्लीं राजश्री पाटीलबावांनीं राजश्री लक्ष्मणराव हरी पारोळकर यांजबराबर दोन पलटणें व एक हजार स्वार देऊन, ग्वाल्हेर गोहद वगैरे प्रांतीं जमीनदारांचे पारपत्यास रवाना केले आहेत. सेवेसीं श्रुत होय. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. कलम १.

रोहिल्यांनीं नवी निगादास्त करून, सर्व रोहिले जमा करून, पंधरा वीस हजारपावेतों स्वार प्यादगान जमा केली आहे. व तोफखान्याची लढाई करितो. व शीखांकडे सूत्र लाविलें आहे. प्रत्यास येईल ते विनंति लिहूं. कलम १.

राजश्री भाऊ फडणीस व भवानीशंकर पोतनीस कांहीं कापड घेऊन उज्जनीहून आले आहेत. परंतु नख्त ऐवज नाहीं. राजश्री पाटीलबावांनीं सर्व मुलूख लोकांस जायदादेंत दिल्हा. सांप्रत समय गांठला आहे. पहावें, पुढें काय विचार ठरेल तें लिहूं. कलम १.

गुलामकादरानें काबूल कंदारेस शहास पत्रें लिहिलीं आहेत कीं, "आपण या प्रांतीं यावें. दिल्ली वगैरे संस्थानचा बंदोबस्त करावा. मी सेवेंत हजर आहें. खर्चास लागेल तें आह्मी देऊं; परंतु आपला दीन कायम ठेवावा हें उत्तम आहे. मराठ्यांचा बंदोबस्त जाल्यावर पुन्हां आपले धर्म व दीन रहाणें कठीणच आहे. त्यास सत्वर स्वारी आली पाहिजे." याप्रमाणें पत्रें तिकडे गेलीं आहेत. पुढें निदर्शनास येईल ते विनंति लिहूं. कलम १.

बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."



**कुतुबमिनार.**

( जुन्या चित्रावरून. )

## लेखांक ३५१.

श्री. डिसेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

दिल्लींत बदस्तूर राजश्री खंडोजी शिंदे सुभे आहेत. शहाअलम पातशाहा यांणीं, बेदारबक्ष यास पूर्वीं गुलामकादर यांणीं मलकाजमानी व नवाबनाजर यांचे अनुमतें पातशाहा केला होता व वरकड शहाजादे सर्व कैदेंत होते ह्मणून, त्या उद्देशानें बेदारबक्षाचे पायांत बेड्या घालोन कैदेंत ठेविले आहेत. अर्धशेर अन्न मात्र भक्षावयासी देतात. पातशाहांचें मानस हें कीं, अकबरशाहास पातशाहा करावा. याप्रमाणें राजश्री पाटिलबावांस पत्रेंही आलीं. परंतु यांची मर्जी हे कीं, गुलामानें त्यासही चार दिवस पातशाहा केला होता, त्यास आणिक दुसऱ्या शहाजाद्यास पातशाहा करावें ऐसा विचार मात्र आहे. पातशाहा अंध जाले, परंतु दुराशा सुटत नाहीं. आतां सर्व किल्ल्यांचा झाडा बेगमात व सलातिनासुद्धां घेतात. सेवेसीं श्रुत होय.

राजश्री पाटिलबावांनीं दिल्लीस एक कारकून व मुत्सद्दी पाठविला आहे कीं, पातशाहांचे हुजूरचा व सलातीन व बेगमात वगैरे शहाजादे यांजकडील सरंजाम काय, व जवाहिर वगैरे नगदी जे गुलामाकडे वगैरे लुटींत गेली असेल तें, शोध करून सर्वांची यादी करून आणावी. त्यास, कारकून तेथील किल्ल्याचा वगैरे महालांतील चौकशी करितात. त्याप्रमाणें यादी तयार होऊन येथें येणार. त्या यादीबमोजीब गुलामासीं जाबसाल होईल ऐसा प्रकार आहे. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं.

तैमूरशाहा यांणीं भावलपुराहून कूच करून दहा कोस मुलतान अलीकडे मुक्काम करून, तेथील सुभ्याचा बंदोबस्त केला. सुभेदार तेथील येऊन रुजू जाला. व मेजमानी शाहाची केली. शाहांनीं सर्फराजी करून तेथील सुभेदारास वस्त्रें खिलत दिल्हा. हल्लीं पुन्हां विलायतेस कूच करून जावें ऐसा विचार आहे. परंतु राजे बिजेसिंग यांजकडील वकील आहेत, त्यांणीं अर्ज केली कीं, अगोदर हिंदुस्थानाकडे कूच करावें. सर्व सरंजामाची तयारी केली आहे. त्यावरून शाहांनीं कारभारी यांसीं विचार करून, बिजेसिंगाकडील वगैरे वकिलास उत्तर दिल्हें कीं, "हिंदुस्थानची अवस्था आह्मांस सर्व कळली आहे. तेथें जाऊन व्यर्थ जेरवार व्हावें; वरकड अर्थ नाहीं." ऐसें साफ उत्तर दिल्हें. व वकिलास निरोपही होणार आहे. परंतु राजे बिजेसिंग व जैपूरकर यांणीं पुन्हा पत्रें पाठविलीं आहेत. पुढें प्रत्यास येईल तें विनंति लिहूं.

राजश्री जिवबा बक्षी व हिंमतबहादर गोसावी हे उभयतां हरिद्वारपावेतों जाऊन, तेथील बंदोबस्त करून, राणेखानभाईस सामील जाले. राणेखानभाई यांणीं हरिद्वार वगैरे दो लक्षांची जागा हिंमतबहादर यांचे सरंजामांत लावून द्यावी. त्यास सनदापत्रें येथें करून दिल्हीं. येथें राजश्री पाटीलबावांनीं मोतीगीर वगैरे महंत चार पांच हजार प्याद्यांनशीं आहेत, त्यांसीं करारमदार केला कीं, तीर्थीचें संरक्षण करावें, व गोसगढास जो सुभा राहील, त्याचे चाकरींत हजीर असावें. तिकडे शिखांचा वगैरे उपद्रव होऊं न पावे. याप्रमाणें महंतांनीं राजश्री पाटिलबावांसीं कबूल करून, तिकडील हरिद्वार वगैरे पावणे दोन लक्षांची जागा सरंजामांत लावून घेतली. सनदा दिधल्यात. व राणेखानभाईस लिहिलें आहे कीं, न पुसतां काम करतां हें ठीक नाहीं. तर जें करणें तें लिहून पाठवीत जाणें. येथून उत्तर जाईल त्याप्रमाणें करीत जावें. सेवेसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञापना."

---

## लेखांक ३५२.

श्री. दिसेंबर इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः—इस्माइलबेग यांस राजश्री पाटीलबावांनीं नजबकुलीखानाचा मुलूख रेवाडी वगैरे जागा दरोबस्त जायदाद करून दिल्ही. त्यावरून मशारनिल्हे दिल्लीहून रेवाडीचे रुखावर कूच करून, उडगांव तारूततताराज केला; व दोन गांवांत दोन लक्षांचा सरंजाम नक्त मिळाला, तो फौजेस देऊन, तेथून कूच करून रेवाडीचे प्रांतांत जाऊन बंदोबस्त केला. हें वर्तमान नजबकुलीखानानें ऐकून, आपली फौज जमा करून व रावराजे माचेडीवाला याची फौज कुमकेस समागमें घेऊन, इस्माइलबेगाचे मुकाबल्यास आला. दोन दिवस गोळागोळीची लढाई जाहली. इस्माइलबेगाचा घोडा गोळी लागून पडला. व गुलमहमद व मोतीसिंग पलटणवाला ऐसे दोन तीन सरदार इस्माइलबेगाकडील गोळी लागून जखमी जाले. व नजबकुलीखानाकडील दहा पांच असाम्या चांगल्या ठार जाल्या. अखेर इस्माइलबेगानीं तोफखाना पुढें करून नजबकुलीवर हल्ला केला. उभयपक्षीं दोन चारशें लोक ठार जाहले. शेवटीं नजबकुलीखानानीं ताब लढाईची न आणितां, माघारें हटोन गढीचा आश्रा धरून आहे. इस्माइलबेगानीं चहूंकडून रसद बंद केली. साता शेरांची धारण नजबकुलीचे लष्करांत आहे. इस्माइलबेगानें फौजेचा जमाव केला आहे. परंतु

भक्षावयास नाहीं ह्मणून लाचार होऊन, राणेखानभाईस पत्रें पाठविलीं कीं, "दारू-गोळा व खर्चास नाहीं. त्यास लौकर खबर घ्यावी. तर नजबकुलीखानाचें पारपत्य करून, इकडील बंदोबस्त कायम करून, गुलामाचें पारपत्यास हाजीर होईन." याप्रमाणें राजश्री पाटिलबावांस व राणेखानभाईस पत्रें आलीं आहेत. त्यावरून भाईमजकुरानीं दोन हजार स्वार कुमकेस व पांच छकडे दारूगोळे व कांहीं खर्चास इस्माइलबेगाकडे रवाना केलें. व येथूनही राजश्री पाटिलबावांनीं खातरजमेचें पत्र लिहिलें आहे. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३५३.

**श्री.** दिसेंबर इ.स.१७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः— शाहा निजामुद्दी यांस पातशाहांजवळ कारभारास ठेवावें, ऐसा विचार राजश्री पाटीलबावांनीं केला आहे. परंतु मशारनिल्हेचें बोलणें हें कीं, तेथील संस्थानचे खर्चाचा बंदोबस्त करून दिधल्यास आमचें जाणें होईल. त्यास तीन लक्षांची जहागीर, मेरट वगैरे महाल संस्थानचे खर्चास लावून द्यावे व शाहाजीस पाठवावें, ऐसी सलाह राजश्री पाटीलबावांनीं ठैरावली आहे. राजश्री रवळोजी शिंदे व अहंमदअलीखां दिल्लीहून लष्करांत आले आहेत. त्यांसींही नित्य जाबसाल होतो. पुढें अंमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३५४.

**श्री.** इ. स. १७८८.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजेः—गुलामानें आपले बुणगे व सरंजाम गोसगडाकडे दोन हजार रोहिले समागमें देऊन रवाना केले होते. त्यास, हें वर्तमान राजश्री रायाजी पाटील यांनीं ऐकोन, कांहीं फौज आपली व कांहीं गुजर जमा करून, गुलामाचे बुणगे लुटले. यावरून गुलामानें आपले फौजेंत तयारी करून, हिंडणनदीपावेतों लढाईचा मुकाबिला केला. दहा पांच माणसें उभयपक्षीं ठार जाहलीं, व दिल्ली-कडील सर्व घाट बंद करून आपले मोर्चे दिल्लीकडे कायम केले आहेत. इक-

ढून कांहीं लोक पूर्वी उतरले होते, ते तिकडील दबाव पाहून फिरून माघारे आले. श्रुत होय. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पै॥ छ० २१ जमादिलावल. **लेखांक ३५५.**

तिस्सा समानीन हस्तें अजूरदार. **श्री.** दिसेंबर इ. स. १७८८.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ. २३ माहे रविलाखर मुक्काम लष्कर नजीक मथुरा जाणून स्वानंद-लेखन आज्ञा केली पाहिजे. विशेषः—पेशजीं विनंतिपत्रें छ. २२ रविलावलचीं सेवेसीं पाठविलीं आहेत, तें पावून सविस्तर वृत्त ध्यानारूढ जाहालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, गोसगढ, साहारणपूर वगैरे रोहिल्यांचा मुलूक वसुली वीस पंचवीस लक्षांचा नवा सुटला आहे. राणेखानभाई यांनीं राजश्री रायाजी पाटील यांसी तिकडील जप्ती सांगून बंदोबस्त केला. व नवाब अलीबहादूर व राणेखानभाई फौजसुद्धां यमुना पायाब उतरून कुंजपुऱ्यास दाखल जाले. तेथील पठाण वगैरे सिखांकडील वकील हजीर जाले आहेत. कुंजपुऱ्यावाल्यानें येऊन उभयतांची भेट घेतली. त्यावरून रोहिल्यांकडील पांचसा असामी कुंजपुऱ्यांत होत्या, ते व तेथील पठाण-सुद्धां राणेखानभाई यांणीं कैद केले आहेत. व पट्याळाकडे शिखांवर शह दाख-वून तिकडील मामला, भंगेलसिंग सीख राणेखानभाई बरोबर आहे त्याचे विद्य-मानें, पन्नास हजार रुपये ठरण्यांत आले आहेत. त्या प्रांतीं सिखांचे मुलखांतले दोन चार गांव खराबींत आले. यास्तव लाहोराहून बुढामल ह्मणून सिख आहेत, त्यांणीं सतलज नदी उतरून याचे रुखावर येणार ऐसी वदंता आहे. रामरतन मोदी यांस राजश्री खळोजी शिंदे यांणीं येथील इशाऱ्याप्रमाणें मशारनिल्हेस धरून कैद केलें, व पांच असाम्या आणीकही कैद केली आहेत. त्यास एकदों रोजां सर्व येथें येतील. राजश्री पाटीलबावांनीं नवाब अलीबहादर व राणेखान-भाई यांस पै दरपै पत्रें पाठविलीं आहेत कीं, तिकडील गुंता लौकर उरकोन येथें यावें. त्यावरून तिकडूनही नवाब अलीबहादर यांचीं पत्रें येतात कीं, येथील मामला करून व बंदोबस्त राखोन सत्वरच येतों. राजश्री पाटीलबावांचा इरादा हे कीं, नवाब अलीबहादर व राणेखानभाई येथें आल्यावर जैपुराकडील मुलकांत अथवा इस्माइलबेगावर पाठवावेंसें आहे. राणेखानभाई यांणीं बादलबेग व सलेमाबेग यांसी धरून कैद केलें. राजश्री पाटीलबावांनीं रामगढ व आगऱ्याचे किल्ल्यासहित सट चिठ्या नवाब अलीबहादर यांचे नांवें करून पाठविल्या आहेत.

परंतु अद्यापि अंमल दखल जाला नाहीं. राजश्री आंबोजी इंगळे फौजसुद्धां हातरस वगैरे जाट अंतरवेदींत आहेत, त्यांसी खंडणी घेतात. राजश्री पाटीलबावांनीं रंजितसिंग जाट यासीं कांहीं पैक्याचा पैगाम केला, त्यावरून परस्परें चित्तशुद्धता नाहीं. जाट मजकूर यांणीं डिगेस जाऊन किल्ल्यांत जकिरा वगैरे पोख्त सरंजामाची तयारी केली आहे, व इस्माइलबेगाकडेही सूत्र लाविलें आहे. सेवेसीं श्रुत होय. वरकड सविस्तर वृत्त पुरवणीपत्रावरून व येकबारा पाठविल्या आहेत त्यावरून ध्यानारूढ होईल. रविसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त सेवेसीं पाठविले आहेत, ते स्वीकारून पत्रोत्तरीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

पैवस्ती छ० २१ जमादिलावल

## लेखांक ३५६.

तिस्सा समानीन. हस्ते अजूरदार. **श्री.** दिसेंबर इ. स. १७८८.

''श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ. २३ माहे रविलाखर मुक्काम लष्कर नजीक मथुरा जाणून स्वानंद लेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः–पेशजीं विनंतिपत्रें छ. २२ रविलावलचीं सेवेसीं पाठविलीं आहेत, तें प्रविष्ट होऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जालें असेलच. हल्लीं वर्तमान तर, गुलामकादर व नवाब नाजर वगैरे यांस राजश्री पाटीलबावांनीं पायांत बेड्या घालून कैदेंत ठेविले आहेत. नवाब अल्लीबहादर, व राणेखान भाई फौजासुद्धा यमुनापायाब उतरून कुंजपुऱ्यापावेतों सिखांचे प्रांतांत पावले. गुलाम कादर याचे कुटुंब लाहोरप्रांतीं निघोन गेले. शाहाअलम पातशाहा व अकबरशाहा वगैरे शाहजादे सुद्धां दिल्लीचे किल्ल्यांत आहेत. तैमूरशाहा यांणीं मुलतानचे सुभ्याचा बंदोबस्त करून भावलपुरास कूच केला. पुढें विलायतेस जावयाचा उद्योग आहे. राजश्री पाटीलबावा सांप्रत मुक्काम मजकुरींच आहेत. सेवेसीं श्रुत होय. वरकड सविस्तर वर्तमान राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे, त्यावरून श्रुत होईल. रविसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त सेवेसीं पाठविले आहेत. ते स्वीकारून उत्तरीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञापना.''

---

पै॥ छ ९ रविलाखर सन तिस्सा पोष्य मास.

## लेखांक ३५७.

श्री. १६ दिसेंबर इ. स. १७८८.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ता॥ छ २० रविलावल मु॥ श्रीक्षेत्र मथुरा स्वामीचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असे. विशेषः—इकडील वर्तमान तर छ १७ रविलावलीं गुलामकादर याणें रात्रौ पळून जावें ऐसें केलें होतें. हें वर्तमान आपले कडील फौजेंत समजण्यांत आलें. त्याजवरून राजश्री अलीबहादुर बाबा व पाटिलबावांकडील फौजा तयार होऊन हल्ला करून शहर घेतलें. व तोफखाना वगैरे सरंजाम पाडाव केला. व कांहीं त्याजकडील मातबर माणूस धरिलें. शहरांतील गढी हवेलीदाखल लढत आहे. आंत चारपांचशें माणूस आहे. गुलामकादर याचें ठिकाण नाहीं. रोहिले बहुत मारिले गेले. त्यांत मारिला किंवा गढींत आहे, कीं पळाला, हें पुर्तें ठिकाण अद्याप लागलें नाहीं. याप्रमाणें बातनी आली. त्याप्रमाणें सेवेसीं विनंति लिहिली आहे. पुर्ती बातनी आल्यावर मागाहून सविस्तर लिहून पाठवूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ३५८.

श्री. १९ दिसेंबर इ. स. १७८८.

"साहेबांचे सेवेसीं राणेखानभाई विनंति विज्ञापना ता॥ छ २० रविलावल रोज शुक्रवार प्रातःकाल चार घटका दिवस जाणून साहेबांचे कृपेंकरून सर्व वर्तमान यथास्थित असे विशेष. गुलामकादर येथून सात कोसांवरी एके गांवांत बसला होता. पळाल्याची बातनी आली. उपरांतीक फौज पाठीमागें पाठविली होती. राजश्री अलीबहादर याचीं पथकें गेलीं होतीं. त्यास एक जमीदारांनीं बातनी सांगितली कीं, गुलाम गांवांत आहे. ह्मणून अलीबहादर याचे लोकांस सांगितलें. तेव्हां जाऊन त्यांनीं धरून आणिला. साहेबांस कळावें ह्मणून लिहिलें असे. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

---

## लेखांक ३५९.

पै॥ छ १७ रविलाखर. श्री. १९ दिसेंबर इ. स. १७८८.

"सेवेसीं राघो अनंत गोखले व बचाजी नारायण फडके कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ २० रविलावल मु॥ कसबे मेरट वर्तमान यथास्थित असे. विशेषः—गुलामकादर मेरटेंत होता. त्याचे पारिपत्यास महादजी शिंदे

याजकडील फौज येऊन मोर्चेबंदी केली होती. त्यास आपली फौज आल्यावर मोर्चे पुढें चालवून मारगिरी जबरी जाहाली. त्यामुळें हवलदिक होऊन छ १८ रविलावलीं सायंकाळीं पळोन गोसगडाकडे जावयास निघाला. तों विहिरींत घोडा पडोन, पायउतारा होऊन, मौजे जादीगांव पार मेरट येथें राहिला होता. त्याची बातमी गांवकरी यांणीं सांगतांच, काल सायंकाळीं दोन प्रहर रात्रीस पुरंधरे व पवार धारकर यांस पाठवून धरून आणिला. शाहाजादे मण्यारसिंग गुलामकादराकडील जमातदार याजजवळ होते. ते काल तिसरे प्रहरीं लढाई करून सोडवून आणिले. राजश्री भिकाजीपंत बाबा पाळंदे मथुरेस पाटीलबावांपासीं आहेत. फौजा गोसगडाकडे रवाना होणार आहेत. वरकड वर्तमान मागाहून सेवेसीं लिहूं. श्रुत होय हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३६०.

पै॥ छ १० रविलाखर सन तिस्सा पौष ह्य॥ डाक.

**श्री.**

२० दिसेंबर इ. स. १७८८.

''आज्ञाधारक विठ्ठल हरि व गंगाजी अव्हाड अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल त॥ छ २१ माहे रविलावल मंदवार दोन प्रहर रात्रपावेतों मुक्काम लष्कर श्रीमथुरा यथास्थित जाणून लेखन आज्ञा करावी. विशेषः—गुलामकादर मेरटेंत घेरला. राजश्री अलीबहादुरबाबा पोंहचल्यावर त्यास भेववीत आणिलें. छ १८ मिनहूस बुधवारीं हल्ला केल्याचें वर्तमान पेशजी लिहिलें, तें पत्र पावलें असल. आजचें वर्तमान आलें त्याची नक्कल करून घेऊन सेवेसीं पाठविली. मागाहून वर्तमान येईल तें लिहून पाठवीन. शामलीस धरला. पालखींत टाकून आणितात हें वर्तमान पारसी पत्र आलें. आपले फौजेंतून मागाहून लिहून येईल. आपणास वर्तमान कळावें ह्मणून हें पत्र सत्वर रवाना केलें. राजश्री पाटीलबावांचींही पत्रें येतील तें रवाना करून देतों. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना.''

---

## लेखांक ३६१.

पै॥ छ १० रविलाखर

**श्री.**

२० दिसेंबर इ. स. १७८८.

''विनंति ऐसीजे.— सेवक विठ्ठल हरि व गंगाजी अव्हाड अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल त॥ छ २१ माहे रविलावल रोज मंदवार दोनप्रहर रात्रपावेतों मु॥ लष्कर श्रीमथुरा यथास्थित जाणून लेखन

आज्ञा करावी. विशेषः– आपण रवानगीपत्रें बऱ्हाणपुरचे मुक्कामींहून छ २५ सफरचीं पाठविलीं, तीं छ मजकुरीं मिनहूस प्रहर दिवसा पावलीं. लिहिला मजकूर सविस्तर विदित जाहाला. कमाविसदाराचें नांवें शामराव विनायक वगैरे यांचे नांवें ताकीदपत्रें घेऊन मागाहून पाठवीन. याउपरी येथील गुलामकादर याजवर हल्ला छ १८ रोज बुधवारीं केल्याचें वर्तमानाचीं पत्रें पेशजीं पाठविलीं असेत. तें पावलीं असतील. हल्लीं तपशीलवार वर्तमानचीं पत्रें नांवनिसीचीं धरून आणिले याची यादी गुलामाची आली, त्याची नक्कल करून पाठविली. त्याजवरून ध्यानास येईल. आजच दोन घटका दिवस राहतां राजश्री आबाजी रघुनाथ चिटणीस दाखल होऊन राजश्री पाटिलबावांचे भेटीस आले. व रामचंद्र भाऊ बक्षी हेही आले. आजही बावांनीं खुशीच्या तोफा सोडोन लोकांनीं नजरा केल्या. नंतर आंतील दिवाणखान्यांत जाऊन बसले. आह्मांसही नेलें. आपाजीरावही होते. इतक्यामध्यें राजश्री सदाशिवपंत आस्वलकर व भिकाजीपंत पाळंदे हेही आले. धरून आणिलेल्यांच्या यादीची नक्कल त्यांसही लिहून दिल्ही. व आपाजीराव यांसही लिहून दिल्ही. बाबा ह्मणालेत, "आतां इकडे निरवेध जाहला. आतां याचा बंदोबस्त राखणें तो सरकारांत लिहून, राजश्री अलिबहादूर बाबा याचा बंदोबस्त करून द्यावा. आमचें राहणें होणार नाहीं. लोकही आतां गवगवा करतील. आमचे भाऊ सुभेदार त्यांसही पत्रें पाठवितों आणि सरकारांत लिहितों. व तुह्मींही याअन्वयें पत्रें निक्षून लिहावीं." त्याजवरून विनंतिपत्र लिहिलें असे. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञापना."

---

पै॥ छ १० रविलाखर सन तिस्सा पौष व॥ डाक.

## लेखांक ३६२.

श्री.

२० दिसेंबर १७८८.

"सेवेसीं भिकाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ता॥ छ २१ रविलावल मु॥ श्रीक्षेत्र मथुरा स्वामींचे कृपेंकरून वर्तमान यथास्थित असो. इकडील वर्तमान तरी छ १९ रविलावल गुरुवारीं मेरटहून पत्र आलें जे, गुलामकादर छ १७ रविलावलीं मुक्काम मजकुरीहून अडीचशें स्वारांनिसीं पळून जात होता. त्यास सरकारची फौज व राजश्री पाटीलबावा यांजकडील फौज पाठिलागास जाऊन गांठ घातली. तों तो सामलची गढी मेरटेहून तीस कोस होती तेथें जाऊन त्यास जिवंत धरिला. व वरकड फौज लुटून दरोबस्त पस्त केली. त्याजकडील बहुत माणूस मारिलें गेलें. पातशाहाजादे त्याणें धरून नेले होते

ते आणिले. व त्यांजकडील मातबर माणूस धरून आणिलें. त्यांची नांवनिसी वगैरे:— बितपशील.

१ गुलाम कादर खुद्द.
१ अहमदखान रोहिला.
१ नसीबखान रोहिला.
१ बिलासराय दिवाण.
१ नाजर खोज्या पातशाही त्यास सामील जाला होता तो.
१ कुसलावाला.
१ सजनखान रोहिला.
१ अबदुलखान रोहिला.
———
८

१७ पातशाहाजादे.
१ हकीम बदुअल्लीखान दरोगा तोफाचा.
१ सहामुदी बनबक्षी.
४ कानगा मेरटचे असामी.
१ मण्यारसिंग पलटणवाला.
१ खाजे याकुत.
३३ हत्ती.
८० तोफा.
———
१३८
० घोडीलूट आली त्याची याद आली नाहीं.
———
१३८

येणेंप्रमाणें पातशाहाजादे यांस सोडवून आणिलें. व तोफा हत्ती पाडाव दोनी फौजा मिळोन आणिल्या. व गुलामकादर वगैरे रोहिले यांस कैद करून आणिलें. वरकड झाडून रोहिले मारिले, लुटले गेले. सर्व श्रीमंतांचे प्रतापें शत्रूचें पारिपत्य होऊन महत्‌यश प्राप्त जालें. आपले कडील लोकांनीं बहुत करून काम काज स्वामींचे मर्जीनुरूप नक्षानेंच केलें. राजश्री सदाशिवपंत दिवाणजी येथें आले. पाटिलबावांचा भेट जाली. बोलणें चालणें जाहालें. उदईक कूच करून पुढें फौजेंत जाणार. मागाहून वर्तमान होईल तें सेवेसीं विनंति लिहून पाठवीन. सेवेसीं श्रुत होय हे विनंति."

---

पै॥ छ १० रविलाखर सन तिस्सा पौष **लेखांक ३६३.**

ह॥ सदाशिव दिनकर यांनीं आणून दिल्हें. **श्री.** २१ दिसेंबर इ. स. १७८८.

"आज्ञाधारक विठ्ठल हरि व गंगाजी आव्हाड अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता॥ छ २२ रबिलावल रविवार दोन प्रहर दिवस यथास्थित जाणून लेखन आज्ञा करावी. विशेष:—काल गुलामकादराचें मजकुराचें पत्र यकबारावरून वर्तमान लिहिलें. भाईचें पत्र आलें नव्हतें. सांप्रत

राणेखानभाईचें पत्र आलें. त्याची नक्कल करून पाठविली आहे. राजश्री अलीबहादरबाबाकडील लोक, यशवंतराव नाईक निंबाळकर वगैरे, पाठिलाग करून गेले. यांणींच धरून आणिलें, ऐसें बोलतात. इस्मालबेगाकडील वर्तमान तरी, नजबकुली मागील प्रहर रात्र राहतां, कूच करून कनोडाकडे गेला. हें वर्तमान इस्मालबेगास कळतांच यांणींही तयारी करून, त्याचे मागें गेला. हें वर्तमान आलें. त्याजवरून सेवेसीं लिहिलें. मागाहून पक्कें वर्तमान येईल तें लिहून पाठवूं. रामगडचेंही ठाणें खाली होईल. राजश्री सदाशिवपंत आस्वलकर यांस उदईक निरोप देऊन पुढें पाठविणार आहेत. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञप्ति."

## लेखांक ३६४.

पै॥ छ १३ रविलाखर. **श्री.** ता. २३ दिसेंबर इ. स. १७८८.

"आज्ञाधारक विठ्ठल हरी व गंगाजी आव्हाड अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ता॥ छ २४ रविलावल मार्गशीर्ष वद्य एकादशी भौमवार तृतीय प्रहरपावेतों यथास्थित, मुक्काम श्रीमथुरा जाणोन लेखनआज्ञा करावी. विशेषः– गुलामकादर यांणीं पातशाहांसीं बहुत बेअदबी केली. सर्व नाश केला. त्याचे दिवस भरावयाचे होते, ते भरल्यानंतर त्या हरामखोरास फळ तैसेंच जाहालें. जितके हरामखोर, त्याजबरोबर साथ दिल्हा होता, त्यांत एकही न मेला. जीवंतच श्रीमंतांचे प्रतापेंकरून सर्व हातास आले. राजश्री अलीबहादरबाबा येथें आल्यानंतर त्यांची रवानगी सत्वरच शत्रूवर केली. आणि तेथें जें पथकें होतीं व कारभारी होते, त्यांस लिहून पाठविलें कीं, तुह्मीं रसद बंद करून त्यांस तंग करून ठेवावें. बाबा तेथें आलीयावर त्यांचे विचारें जें करणें तें करावें. राजश्री अलीबहादर बावांचे हातून शत्रूचें पारिपत्य व्हावें, हेंच बाबांचें अंतःकरणीं बहुत होतें. तेंच घडलें. यांचेच लोकांनीं धरून आणिला. त्याजवरून बावांनीं बहुत संतोष मानिला, व अलीबहादर बाबांस संतोषाचीं पत्रें पाठविलीं. हरामखोरास व त्याचे बरोबर जे धरले त्या सर्वांस येथें फळें भोगावयासी (पुढें फाटलें आहे)."

## लेखांक ३६५.

पै॥ छ १५ रविलाखर सुम्मा तिस्सा समानीन मया व अलफ. सदाशिव दिनकर यांनीं आणून दिल्हा. **श्री.** २७ दिसेंबर इ. स. १७८८.

"आज्ञाधारक विठ्ठल हरि व गंगाजी आव्हाड अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ २८ रविलावल मंदवार मु॥ लष्कर

श्रीमथुरा यथास्थित जाणून लेखनआज्ञा करावी. विशेषः— गुलामकादर व त्याची मंडळी धरून आणिली. त्यास येथें आणावयासी पत्रें पाठविलीं आहेत. येथें आल्यावरी शत्रूस पूसगवस करून पारिपत्य करतील. गोसगडाकडे फौजा धांवल्या. हें वर्तमान गुलामाचे आईस समजल्यावर, रांडापोर व गुलामाचा भाऊ आहे, त्यांस घेऊन कुंजपुऱ्याकडे जाऊं लागले. पुढें त्यास पत्र पाठविलें. त्यांणीं उत्तर लिहिलें कीं, "तुह्मी पातशाही हरामखोर आहां, इकडे न येणें." त्याजवरून बेटांत यमुनेच्या राहिले आहेत. हें वर्तमान यकबारेचें आलें. त्यावर भाईचें पत्र आलें कीं, गुलामाच्या चिठ्ठया त्याचे आईचे भावाचे नांवें घेऊन पाठविल्या कीं, तुह्मीं लष्करांत येणें. सर्व बंदोबस्त करून देतील. त्या चिठ्ठयांच्या नकला करून बावांकडे पाठविल्या. त्याचें उत्तर येथून गेलें कीं, तुह्मीं मेरटेंत राहाणें. फौजा अलीबहादरसुद्धां त्याचे शोधास जाऊन धरून आणावें. गोसगडास ठाणें आपलें बसलें. पुढें सहारनपुरासही फौजा जावयास लिहिलें आहे. राजश्री सदाशिवपंत आस्वलकर व गोविंदराव बारवकर व जाधव, येथून कूच करून यमुनापार उतरून गेले. मजल दरमजल राजश्री अलीबहादरबाबांकडे जातील. राजश्री पाटिलबावांसीं व सदाशिवपंतांसीं बोलणीं होऊन, त्यांस सरकारांत पत्र लिहावयासी सांगितलें. त्यांणीं पत्रें सेवेसीं लिहिलीं आहेत, त्यांजवरून श्रुत होईल. नजबकुली कानोडास गेला. त्याचे मागें इस्मालबेग लागला आहे. रामगडासही आपलें ठाणें बसलें. जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें आहे. बहुत काय लिहिणें कृपा लोभ करावा हे विज्ञापना."

---

## लेखांक ३६६.

श्री. १ जानेवारी इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य दामोदर देवराव व गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ. ४ रविलाखर मुक्काम नजीक कालपी येथें स्वामींचे कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः— आज्ञापत्र पाठविलें तें पावोन शिरसा वंदिलें. पत्रीं मजकूर बातनी पाठविली ती पावली. पुढें लिहीत जाणें ह्मणोन आज्ञा. त्यास इकडील वर्तमान तर, दिल्लीहून राणेखानभाई वगैरे फौजा पुढें जाऊन गुलामकादर याचे मागें पाठलाग केला. तो पुढें, हे मागें, झांबडाझांबड करून मेरटपावेतों गेले. गुलाम मेरटचे कोटाचा आश्रा करून आजपावेतों राहिला. मागाहून राजश्री अलीबहादर फौजसुद्धां दाखल जाले.

ते सामील जाल्यावर गुलाम पांचशें स्वारांनशीं रात्रीं पळोन, गोसगडचे मार्गें अली-बहादर व राणेखानभाईकडील पागा धांवोन, गोसगडनजीक सात आठ कोसांवर धरून आणिला. व मनीयारसिंग–त्याचा कारभारी व तेरा असामी रोहिले याप्रमाणें मेरटेंत राणेखानभाईनीं कैदेंत केलें. शाहजादे सत्रा असामी आणिले. वरकड लूट जिकडील तिकडे गेली. राजश्री पाटीलबावा मथुरेसच आहेत. पुढें बंदोबस्त होईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा कीजे हे विनंति.”

---

## लेखांक ३६७.

**श्री.** ६ जानेवारी इ. स. १७८९.

“आज्ञाधारक विठ्ठल हरि व गंगाजी आव्हाड अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ ९ माहे रबिलाखर ऊर्फ पौष शुद्ध एकादशी मुक्काम लष्कर श्रीमथुरा क्षेत्र यथास्थित जाणून लेखनआज्ञा करावी. विशेषः— गुलामकादर मेरटेंतून पळोन गेला. मार्गें फौजा लागल्या होत्या. त्यांनीं धरून आणिल्यावर, तेथें राजश्री अलीबहादरबाबा यांचें लष्करांत ठेवून, यांणीं द्रव्यार्थ गुलामास पुसला. तेव्हां त्यांणीं सर्व खर्चच सांगितला. आणि त्याजवळ ह्मणाला कीं, “मला सोडल्यास कोठें कांहीं द्रव्य वांचलें असेल तें देतों.” हें सर्व वर्तमान राजश्री पाटिलबावांस लिहिलें होतें. त्याजवरून येथून पत्रें गेलीं कीं, गुलामास धरून आणिलें, त्यास जे बंदवे आले असतील त्यांसुद्धां बंदोबस्तीनें इकडे पोंहचवून देणें; आणि तुह्मीं पैलीकडे गुलामाची आई गेली आहे, तिचा शोध करून हस्तगत होईल तें करावें. व गोसगड साहरनपुर सुद्धां ठाण्याचा बंदोबस्त करावा. ऐसीं पत्रें जात गेलीं. त्यांचीं उत्तरें राजश्री अलीबहादरबाबा यांचीं येत गेलीं कीं, गुलामास बंदोबस्त करून पाठविला आहे. हा पांच रुपये बोलतही आहे. तरी सांप्रत याची बेआब न करितां, रुपये साधून मग जें कर्तव्य तें करावें. गुलामाची आई पुढें गेली. तिला शीख आडवे येऊन, कुंजपुऱ्याअलीकडे बेहडांत होती, तिला घेऊन गेले. दोन छकडे मालाचे बरोबर होते, ते यमुनेंत बुडाले. गोसगड सहारनपुर येथें ठाणीं बसविलीं. पुढें शिखांचा जमाव भारी, तीस चाळीस हजारपावेतों आहे. पुढें एखादा शहास गुंतल्यावर मसलत लांबेल. त्यास नजबकुली, रांगडे राजे आहेत. पुढें काय करावयाचें याचा विचार करून, लिहून पाठवावें. तदनुरूप वर्तणूक होईल. याअन्वयें पत्रें आलीं. येथील मजकूर तरी, गुलाम येथें आला. त्याजबरोबर बंदवे पाठविले. त्यांची यादी व सविस्तर पेशजीं पत्रीं विनविलें होतें. यापैकीं गुलाम मजकूर व बिलासराय दिवाण व हकीम बुअली व

नाजर खोज्या या चार आसाम्या आहेत. वरकड ताबेदार आहेत. यांस वाड्यांत आणून भय प्रीत दाखविली, आणि पूसतपास केली. परंतु कांहीं विशेष दिसत नाहीं. नंतर येथें राजश्री भिकाजी नारायण पाळंदे राहिले आहेत, त्यांस बोलावून आणून, वाड्यांत मग राजश्री आप्पाजीराव दाभोळकर यांस बोलाविलें. आह्मी उभयतां त्यांची मंडळी बसोन, राजश्री भिकाजीपंतास किल्ले संस्थानाचे खर्चाचे नेमणुकीच्या यादी समजाऊन देऊन, राजश्री अलीबहादरबाबाकडे रवाना करावें. त्याजवरून कल्पना निघाली कीं, यास दिवसगत लागतील. त्याजवरून राजश्री बावांसच पत्रें येण्याविषयीं गेलीं. चार पांचसें स्वारांनसीं सडे यावें. तिकडील बंदोबस्त राखून यावें. येथें आलियावर जो विचार ठेरल्यांत येईल, तो मागाहून लिहून पाठवीन. दुसरे तपोनिधि मोतीगीर गोसावी याची जमात पूर्वीं इंग्रजांचे लढाईबाबद ठेवून घेतले होते. तो गोसावी जमातसुद्धां फिरोन बावांकडे आला. त्यास यांणीं ठेऊन घेऊन, गुलामाचे मुलकाचे सिऱ्यावर हरिद्वारचा नाका आहे, तेथें जायजाद नेमून देऊन हरिद्वारचा बंदोबस्त सांगितला. ऐलीकडे कमाविसदार राहातील त्यांचा उपराळा करावा. याप्रमाणें ठरून गोसावी याची रवानगी केली. इस्माइलबेगाकडील वर्तमान तरी, नजबकुली पळोन कानोडा अलीकडे गडदापरी सात कोस आहे तेथें राहिला. त्याजकडील पलटणचे लोकांनीं तलबेकरितां दंगा बहुत केला. आणि लोकांनीं कंपूचे सरदारांची बेआब केली. किल्ल्यासभोंवते घेरून बसले आहेत. इस्माइलबेग कोसलीगांव तेथें मुक्काम आहे. दहा कोसांचा मुकाबला आहे. पुढें होईल तें सेवेसीं लिहिलें जाईल. जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें. श्रुत होय बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञप्ति.''

---

## लेखांक ३६८.

पै॥ छ १४ जमादिलावल. तिस्सा समानीन सदाशिव दिनकर यांणीं आणून दिल्हा.

श्री.

२४ जानेवारी इ. स. १७८९.

''आज्ञाधारक विठ्ठल हरि व गंगाजी आव्हाड अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ २७ माहे रविलाखर श्रीमथुराक्षेत्र यथास्थित जाणून लेखनआज्ञा करावी. विशेषः— येथील वर्तमान तरी, आपल्या फौजा, गुलामाची आई व रांडापोर पळोन शिखाचे मुलकांत गेले होते. तो कांहीं मुद्दा कुंजपुऱ्यावाला याच्या अंगीं लावून त्यास कैद केलें. हें वर्तमान पेशजीं पत्रीं विज्ञापिलें होतें. सांप्रत फौजा तेथेंच आहेत. गुलामाची आई आंबाल्यास शिखांचे पाठीशीं बसली आहे. तिकडे शिखांनींही जमाव फौजांचा केला. हें वर्तमान राजश्री

अलीबहादरबाबा व राणेखानभाई यांणीं लिहिलें आहे. त्याजवरून येथून पत्रें त्यांजकडे रवाना जाली कीं, सांप्रत पुढें जावयाचें प्रयोजन नाहीं. दिल्लीचें वर्तमान, तेथें यांणीं येथून कारकून पाठविला होता. कोणा कोणाचें काय गेलें तें लिहून द्यावें. गुलाम येथें आणिला आहे. याची तहकीकात करून हातीं लागल्यास ज्याचें त्यास देवऊं. त्याजवरून तेथें पातशाहांनीं यादी करून दिल्ह्या. त्या यादी कारकून येथें घेऊन आला. यादीवर बहुतच लिहिलें आहे. याची रुजवात करतील तें मागाहून लिहून पाठवूं. याजवर पातशाहांनीं यांस लिहून पाठविलें होतें कीं, "रामरतन मोदी हाही खुळांत होता. याजकडे तिसा वर्षांचा कारभार आहे." त्यावरून येथून राजश्री रवळोजी शिंदे यांस लिहिलें कीं, रामरतन मोदी यास हस्तगत करून इकडे मजबुतीनें पाठवून द्यावा. त्यांणीं हस्तगत करून येथें पाठविला. तो दोन रोज जाले कीं येथें आला. कैदेंत ठेविला आहे. याचा पांच रुपयांचा भ्रमही आहे. पुढें त्यास पुरसीस करणार. याची रांडापोर वगैरे माल-मालियत यांणीं अगोदरच लखनऊस पाठविली. व सीतलदासही कारभारांत होता. तोही लखनऊस जाऊन राहिला आहे. पांच रुपयांची वसीयत त्याजपासीं आहे. याजवरून येथून राजश्री पाटीलबावांनीं पत्रें इंग्रजांस वजीराकडे पाठविलीं आहेत कीं, या उभयतांचीं मूलमाणसें चीजवस्त कोठें जाऊं न पावे; व सीतलदासास हस्तगत करून इकडे बंदोबस्तानें पाठवून द्यावें. त्याचें काय उत्तर येईल तें मागाहून लिहून पाठवीन. राजश्री अलीबहादर बाबाकडे किल्ले रामगड व आगरें यांच्या सोडचिठ्या दिल्ह्या, त्या त्याजकडे येथून रवाना केल्या. व खर्चाविसीं त्यांनीं लिहिलें होतें, त्याजवरून येथें तजवीज नेमली होती कीं, गुलामांचा मुलूख सुटला; गोसगड सहारनपूर तेथें रबीचा ऐवज येईल, तो तालुका त्याजकडे द्यावयाचें ठराविलें होतें. परंतु सरकारचीं पत्रें यांस आलीं. त्यांचा मजकूर समजल्यावर दोन दिवस स्तिमित राहिले. गोसगड सहारनपुरच्या चिठ्या दिल्ह्या नाहींत. बाबांकडे पत्र पाठविलें आहे कीं, तुह्मीं सडे दोनचारसें स्वारांनशीं लवकर यावें. तेही पत्रावरून लवकरच येतील. येथें आल्यानंतर जें यांचे विचारें ठरेल, तें लिहून पाठवीन. इस्माइलबेगाकडील वर्तमान तरी, नजबकुलीचे मुकाबिल्यावर आहे. त्याचे मुलकाचीं ठाणीं घेत आहे. याप्रमाणें वर्तमान आहे. राजश्री होळकरांचे लष्करांतून बातमीचें पत्र आलें. त्यांत मजकूर लिहिला कीं, उदेपुरचे राजाकडील पैका कबूल केला, तो न आला. सबब फिरून जालमसिंग कोटेकर याची जमीयत काढली होती, ती फिरोन उदेपुरास ठेवावी. व सरकारचे हुजरे-ही आलेत. पत्रें लिहिलींत कीं, तुह्मीं लवकर राजश्री पाटीलबावांकडे जाणें व

सुभेदाराचे वकिलाचींही पत्रें पुण्याहून याच अन्वयें येतात. ह्मणोन बातमी आली. जालें वर्तमान सेवेसीं लिहिलें. श्रुत होय. बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञप्ति."

---

पैवस्ती छ १० जमादिलाखर सन तिसा.

## लेखांक ३६९.

श्री.

१७ फेब्रुवारी इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री पंतप्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना येथील कुशल तागाईत छ. २१ माहे जमादिलावल मुक्काम लष्कर नजीक श्रीमथुरा जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः— स्वामींनीं कृपापत्र छ० १७ रविलावलचें पाठविलें, तें छ० २७ रविलाखरीं पावून सनाथ जालों पेशजीं विनंतिपत्रें छ २४ रविलाखरचीं सेवेसीं पाठविलीं आहेत. तें प्रविष्ट होऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जाहालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, नवाब अलीबहादर छ० १७ माहे मजकुरीं येथें दाखल जाले. राजश्री पाटिलबावांच्या भेटी जाल्या. इस्मायलबेग व नजबकुलीखान यांचा मुकाबिला लागला आहे. जयपुरकर राजे प्रतापसिंग यांणीं कांहीं फौज जमा करून, रावराजे प्रतापसिंग माचेडीवाला यांचे मुलकांत पाठविलें आहे. जोतपूरकर राजे यांचे वकील, शाहापासीं जाऊन जाबसाल करितात कीं, आमची कुमक करावी. परंतु अद्यापि कांहीं ठरलें नाहीं. बिरसकूट साहेब फिरंगी, फरुकाबादेहून दिल्ली आग्र्याची सैर करावयास या प्रांतीं आले आहेत. राजश्री पाटिलबावाची भेट जाली. पातशाहा अंध दिल्लीचे किल्ल्यांत राहातात. राजश्री पाटिलबावा सांप्रत मुकाम मजकुरींच आहेत. सेवेसीं श्रुत होय. वरकड सविस्तर वृत्त राजश्री नानांचे पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून ध्यानारूढ होईल. सदोदित कृपापत्रीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

पैवस्ती छ १० जमादिलाखर सन तिसा समानीन फाल्गुन मास.

## लेखांक ३७०.

श्री.

१७ फेब्रुवारी इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पो॥ गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति. येथील कुशल तागाईत छ० २१ माहे जमादिलावल मुक्काम लष्कर नजिक श्रीमथुरा जाणून

स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः– बहुतां दिवशीं स्वामींनीं कृपापत्र छ० १७ रविलावलचें पाठविलें, तें छ० २७ रविलाखरीं पावून सनाथ जालों. पेशजीं छ० २४ रविलावलचीं विनंतिपत्रें सरकारांत सेवेसीं पाठविलीं आहेत, तें पावून सविस्तर वृत्त श्रुत जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, नवाब अलीबहादर मुक्काममजकुरीं दाखल जाले. राजश्री पाटिलबावांच्या परस्परें भेटी जाल्या. राजश्री पाटीलबावांनीं येथें बोलाविलें, त्याचें कारण हें कीं, जर नवाब मजकुरांनीं सर्व मुलूख व सलतनत किल्ले वगैरे जागा यांचा बंदोबस्त राखिला, तरी त्यांचे स्वाधीन करून, आपण उज्जनीस जावें. कदाचित् हे गोष्ट न घडल्यास, त्यांचे खर्चापुरता मुलूख मेरट वगैरे अंतरवेदचा लावून द्यावा; व आपण फौजेचा फडशा करून, कार्याकारण फौज दाहा पंधरा हजार ठेवून, राहावयाचे मसलत पडल्यास, मसलतसंबंधीं खर्च पडेल त्याचा जाबसाल नवाबांनीं हमी भरल्यास पक्का करून घ्यावा व त्याचा जिमा ठेऊन पूर्ववत्प्रमाणें आपला बंदोबस्त कायम ठेवावा. व राजश्री आबा चिटणीस यांस दिवाणीचा कारभार सांगोन प्रांताचा बंदोबस्त करावा. आणि राजश्री सदाशिव मल्हार यांस बक्षीगिरीचें काम सांगून फौजेची तोड त्यांचे हातें व्हावी. ह्मणून एक महिन्यापासोन नित्य खलबत आहे. धारराव शिंदे व हैबतराव फाळके यांणीं दोन दिवस धरणें बसून, चौतिसा महिन्यांची तलब होती त्याचा फडशा निमेवर ठरला; आणि आदा पडला असेल तो यांत घ्यावा, शाईशिरस्ता वजा होऊन फडशा करून द्यावा, याप्रमाणें तोड ठरण्यांत आली. त्याचा वायदा पंधरा रोजांचा जाहला आहे. व राजश्री खंडेराव हरि यांचें बोलणें बापूजी नाईक यांचे विद्यमानें राजश्री पाटिलबावांसीं आहे कीं, कछवाघार, भदावर, ग्वालेर वगैरे सर्व मुलूख इजारीयानें दिघल्यास कबूल करूं. परंतु मागील हिशेबाबद्दल वीस लक्ष रुपये फाजील आहेत, त्यांची वाट करून द्यावी. कछवाघार वगैरे पंचविसां लक्षांचा मुलूख आहे. राजश्री पाटिलबावांचें बोलणें हें कीं, निमे ऐवज नख्त तूर्त द्यावा, व बाकी शिबंदी वगैरेच्या वराता करूं, त्याची खातरी करावी. याप्रमाणें बोलणें आहे. व राजश्री लालाजी बल्लाळ यांजकडून कोट्याचे मामलतीसंबंधीं पांच लक्षपावेतों निमे नख्त, निमे वराता येणेंप्रमाणें बंदोबस्त करून, शिबंदीचा फडशा करावा ऐसा विचार आहे. इंग्रेजांचा पाय या प्रांतीं फार शिरला आहे. तमाशा, सैर करण्याचे बहाण्यानें येऊन येथील नक्षे लिहून घेतले. पहिले नजबखानाचे वेळेस इंग्रजांनीं या प्रांतीं यावयाचा बहुत प्रयत्न केला होता. परंतु नवाब मशारनिल्हेनीं

इकडे प्रवेश होऊं न दिल्हा. नवाब अलीबहादर यांसीं व राजश्री पाटिलबावांसीं दोन दिवस खलबत आहे. परस्परें बोलणें लागलें आहे. अद्यापि कांहीं ठरण्यांत आलें नाहीं. नानुमल पटयालेवाला पांच लक्ष रुपये मामला देतो, ह्मणून वदंता आहे. सेवेसीं श्रुत होय.

वरकड सविस्तर वृत्त पुरवणीपत्रांवरून व यकबारांवरून श्रुत होईल. सदोदित कृपापत्रीं सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति.

सेवेसीं विनंति सेवक गंगाधर शिवराम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना ऐसाजे. सदोदित कृपापत्रीं सनाथ करणार धनी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विज्ञापना."

---

## लेखांक ३७१.

**श्री.**

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे— इस्मायलबेग यांनीं गोकुळगडाचा बंदोबस्त करून नारनोळ वगैरे जागा हस्तगत केली व दोनचार गांव घेरून खंडणी घेतली. पुढें कोटपुतळीकडे जाऊन तेथील बंदोबस्त करावा. तेथील बंदोबस्त केल्यावर कांनोडचे किल्यासी मोरचे कायम करावे, ऐसा विचार आहे. राजश्री पाटिलबावांपासीं वकील पाठविला कीं, मी आपल्या शिवाय दुसऱ्याची गरज ठेवीत नाहीं. आपण कांहीं कल्प चित्तांत न आणावें. याप्रमाणें अर्जी पाठविली आहे. त्यास खर्चाची आबाळ बहुत. फौज बेदिल. यास्तव ऐशांत कांहीं मदत खर्च व्हावा. व कृष्णगड घ्यावयाचा करार मदार आहे, त्याप्रमाणें देविला पाहिजे कीं, कुटुंबास तेथें ठेवून नजबकुलीचे पारिपत्य करावयास मुस्तेद होईन. याप्रमाणें मशारनिल्हेचे अर्जींत मजकूर. त्यावरून राजश्री पाटिलबावांनीं खातरजमेचीं पत्रें लिहून पाठविलीं आहेत कीं, कांहीं चिंता न करणें. खर्चाची बेगमी जालियावर तुह्मांसही पाठविलें जाईल. परंतु आणीक कोणाकडे सूत्र न लावणें. त्यास इस्मायलबेगाचें सूत्र बिजेसिंग व जैपूरकर यांसीं अंतस्थ आहे. व उभयतां सरदारांचे वकील आहेत त्यांसीं बोलणें लागलेंच आहे. परंतु इकडून कृष्णगड हस्तगत व्हावा तोंपावेतों एकनिष्ठता दाखवून, काम जाल्यावर मग बुद्धीचें शाश्वत राहाणें कळलेंच आहे. महंमदबेग हमदानीची कन्या होती, तिसीं इस्मायलबेगांनीं लग्न केलें. सेवेसीं श्रुत होय. पुढें प्रत्यास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३७२.

श्री. फेब्रुवारी इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. गुलामकादर यास नवाब अलीबहादर यांचे लोकांनीं जाऊन धरून आणिला. व राणेखानभाईनीं पिच्छा न केला. सबब यांची मर्जी आठ दहा दिवस बेजार होती. त्याजवरून नवाब अलीबहादर यांणीं गुलामास व नाजर वगैरे सर्व मंडळी, हैबतराव फाळके यांस दोन हजार स्वारांनशीं बरोबर देऊन, राजश्री पाटीलबावांपासीं मथुरेस पावते केलें. दुसऱ्या रोजीं राजश्री पाटिलबावांनीं गुलामास व नाजरास वगैरे सर्वांस डेऱ्यास बोलावून अनेका प्रकारें दहशत दाखविली. तेव्हां गुलाम भयभीत होऊन राजश्री आंबोजी इंगळे वगैरे यांसीं बोलणें लाविलें कीं, जे वस्तवाणी व जवाहीर वगैरे सरंजाम होता, तो सर्व गोसगढास आईकडे पाठवून दिल्हा. त्यास माझी इज्जत ठेवाल, तर जें राहिलें असेल तें हजीर करून देतों. त्यावरून राजश्री पाटिलबावांनीं गुलामाकडून यादी करून घेतल्या आहेत. नाजरास व बिलासराय व मनीहारसिंग यास जेरबंदाचा मार दिल्हा. त्यास नाजरानें राजश्री बाळाजीपंत मिर्जा यांसीं बोलणें लाविलें आहे. यास्तव तैसेंच बेड्या सर्वांचे पायांत घालोन कैदेंत ठेविले आहेत. परंतु अद्यापि कांहीं ठरण्यांत आलें नाहीं. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३७३.

श्री. फेब्रुवारी इ. स. १७८९.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, रामरतन मोदी वगैरे धरले आले आहेत. त्यांचा जाबसाल अद्यापि कांहीं ठैरण्यांत आला नाहीं. राजश्री पाटिलबावा दोन लक्ष रुपये मागतात; परंतु सांप्रत जाबसाल करारांत आला नाहीं. मोदी मजकुराची कांहीं वस्तवाणी मथुरेंत चिमनलाल साहुकार याचे घरीं रोहिल्याचे दुंडींत ठेविली होती. त्याचा शोध राजश्री पाटिलबावांनीं लावून जप्त केली. कापड वगैरे सरंजाम निघाला, व दिल्लींतही चहूंकडे तलाशांत आहेत. एका दो ठिकाणीं मशारनिल्हेचा सरंजाम ठेविला होता, तोही राजश्री रवळोजी शिंदे यांनीं शोध करून जप्त केला. काय जिन्नस सांपडला, हें कांहीं प्रत्यास आलें नाहीं. निदर्श-

नास येईल ते विनंति लिहूं. रामरतन मोदीबद्दल आसामी धरल्या आल्यांत त्यांचा तपशीलः—

| | |
|---|---|
| १ चिमनलाल दिल्लीकर | १ जिवालाल |
| १ जुगलराम | १ लछमनसिंग |
| १ धोकलसिंग | १ गुलबेग |
| १ इंदामल | ३ |
| ४ | |

एकूण सात आसाम्या कैद आहेत. सेवेसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे ही विनंति."

## लेखांक ३७४.

श्री. फेब्रुवारी इ. स. १७८९.

"पुरवणी श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसींः—

विनंति ऐसीजेः—राजे बिजेसिंग यांणीं मलक महंमदबेग यांसी जैपुरकर राजे यांजकडे पाठविलें कीं, गुलामकादर जिवंत धरून घेतला. आतां तुह्मीं सावध राहावें. व आपली फौज जमा करून बंदोबस्त मुलकांत ठेवावा. राजश्री पाटीलबावा स्वस्त जाले आहेत. कदाचित् तुह्मांकडे स्वारी होईल, यास्तव खबरदारीनें असावें. त्यास जैपुरकर राजे प्रतापसिंग यांणीं मलक महंमद-बेगास वस्त्रें वगैरे बहुमान केला, व दहा बारा हजार फौज जमा केली. व पुढें सर्वांस पत्रें गेलीं कीं, लौकर शामील व्हावें हें उत्तम आहे. इस्माइलबेगाकडे वकिलास पाठविला आहे कीं, राजश्री पाटीलबावांनीं गुलामकादराची काय गत्य केली, हें प्रत्यक्ष पाहतां. पुनः तेथील उमेदीवर आहांत. तरी आतांही आह्मांकडे उठोन यावें. ह्मणजे मुलूख सरंजामांत लाऊन देतों व खर्चास नगदी एक लक्ष रुपये देऊं. याप्रमाणें बंदोबस्त केला जाईल. परंतु जैपुरकराकडे पैकाची ओढ बहुत आहे. सर्व शहरचे लोकांसीं डाळ घेऊन निर्वाह होतो. इस्माइलबेगांनीं वकिलास लावून ठेविला आहे. पुढें अमलांत येईल ते विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

# लेखांक ३७५.

श्री. फेब्रुवारी. इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे, गोसगड वगैरे नवा प्रांत सुटला आहे. त्याची जप्ती सांप्रत राणेखानभाईकडे आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं.

गुलामाचा माल आसबाब कांहीं मेरटचे शहरांत पुरला आहे, ह्मणून राजश्री पाटिलबावांनीं एक कारकून तिकडेही मेरटेस पाठविला आहे. त्यास तेथील शहरची जागा खणून पाहातात. कांहींक वस्तवाणीही निघाली ह्मणून वदंता आहे. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं.

नवाब असफद्दौले मकराझीलचे शिकारीस गेले होते. हल्लीं गुलामाचें धरल्याचें वृत्त श्रवण करून आतां लखनऊस आले आहेत. व जवांबख्त शाहाजाद्याचे पुत्र आहेत, त्यांचे खर्चास बावीस हजार रुपये नख्त पाठविले. आणि कलकत्त्यास इंग्रेजांस पत्रें पाठविलीं आहेत. तेथून उत्तर आल्यावर प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं.

राजश्री पाटिलबावांनीं राजश्री सुभेदार यांस पत्रें लिहिलीं आहेत कीं, गुलामास जिवंत धरून आणिला. आतां मातोश्री त्याची पळून गेली आहे. त्यास तिचेंही पारपत्य करणेंच आहे. आतांही इकडे आलें पाहिजे. याप्रमाणें पत्रें पाठविलीं आहेत. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं.

नवाब अलीबहादर यांचा इरादा आहे कीं, जर नानुमल अगोदर येऊन सामील जाला, तरी त्यास बरोबर घेऊन, आणिक शिखांचें पारपत्य करून, सतलज नदीपावेतों आपला बंदोबस्त कायम करावा. कदाचित् नानुमल सामील न जाला, तरी आणीक शिखांसीं सूत्र लाऊन, पटयाला वगैरे जागा हस्तगत करावी ऐसा विचार आहे. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं.

गुलामास जिवंत धरून आणिल्याचें वर्तमान रामगडचे किल्लेदारानें ऐकोन दुसऱ्या दिवशीं किल्ला खाली करून दिल्हा. राजश्री रायाजी पाटील यांचा बंदोबस्त किल्ल्यांत आहे. सेवेसीं श्रुत होय. राजश्री पाटिलबावांचा विचार आहे कीं, रामगड व आगऱ्याचा किल्ला नवाब अलीबहादर यांचे स्वाधीन करावा. व जुजबी प्रांतही वहिवाट्यांपैकीं लावून द्यावा. ऐसा विचार आहे. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं.

राजश्री सुभेदार अद्यापि मेवाडप्रांतींच तिकडील बंदोबस्तांत आहेत. इकडे यावयाची जलदी कांहीं दिसत नाहीं. जैपूरवाल्याकडील व जोधपूरवाल्याकडील

वकील येथें हजीर आहेत. परंतु आज तागाईत कांहीं जाबसाल नाहीं. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं.

बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३७६.

**श्री.** फेब्रुआरी इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

"विनंति ऐसीजे. बिकानेरकर राजे सुरतसिंग यांसीं व राजे बिजेसिंगांसीं आपसांत विरुद्धता आहे. ह्मणून बिकानेरवाल्यांनीं वकील राजश्री पाटीलबावांपासीं पाठविलें कीं, आमची मदत करावी. त्यावरून यांणींही आपल्याकडून कारकून त्यांजकडे पाठविले आहे. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं.

गुलामाची आई व कुटुंब पटयाल्याकडे शिखांचे मुलखांत होते. त्यांस इकडील फौजेची आमदनी ऐकोन, शिखांस कांहीं पैका अंतस्थ देऊन, लाहोराकडे निघोन गेले. ह्मणोन राणेरखानभाई यांणीं तिकडे शिखांसीं दावा केला आहे. परंतु तिकडे शिखांचा जमाव भारी. लढाईस मजबूत आहेत. यास्तव तूर्त तिकडील खंडणी घेऊन माघारे येथें येणार आहेत. सेवेसीं श्रुत होय.

येथून राजश्री पाटिलबावांनीं गुलामाचे हातून पत्रें लिहोन, लाहोरास त्याच्या आईकडे कासदजोडी पाठविली आहे. तेथून उत्तर आल्यावर निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३७७.

**श्री.** फेब्रुआरी इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. गुलामाचा जाबसाल कांहींका दिवसापासोन सुस्त पडला आहे. राजश्री पाटिलबावांनीं दोन चार पत्रें याचे हातून. मशारनिल्हेचे आईस व भावास लिहोन पाठविलीं. त्याचें उत्तर गुलामाचे आईनें लिहिलें कीं, "पातशाही सरंजाम कांहीं राहिला आहे, तो आपले स्वाधीन करितें. परंतु गुलाम तुमचा; पूर्वींपासून आपण संरक्षण करून प्रतिपाळ केलेले. हल्लीं त्याजकडून अपराध घडला, त्यास माफ करून आपल्या सेवेंत ठेऊन चाकरी घ्यावी मजपासीं सरंजाम असेल तो हजीर करीन." परंतु तात्पर्य हें कीं, अगोदर राजश्री पाटिलबावांपासोन गुलामाची बंदखलासी करून करारमदार ठरल्यावर

मग उमेदवारी ठेवावें. येथील मानस हें कीं, कांहीं पैका त्यांजकडून हस्तगत जाल्यावर मग जे तंबी करणें ते करावी. ऐसा विचार पडला आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं.

राजश्री पाटिलबावांनीं नवाब नाजरास बहुता प्रकारची दहशत दाखविली, परंतु अद्यापि प्रथम दिवस आहे. सेवेसीं श्रुत होय.

मनिहारसिंग व बिलासराय यांचें बोलणें बावीस हजार रुपये यावर मामलतीचा जाबसाल राजश्री बापूजी नाईक यांचे विद्यमानें लागलें आहे. परंतु ठरण्यांत आला नाहीं. पुढें प्रत्ययास येईल तें विनंति लिहूं.

दिल्लीची करोड व कोटापारचा व टांकसाळ व अंतरवेदांतील मेरट वगैरे गोसगडपावेतों सायर याचा इजारा, धीरजराम नामें यावर, राजश्री पाटीलबावांपासोन मक्ता करून घेतला. त्यापैकीं दोनशें रुपये रोजीना खर्चास पातशाहाकडे नेमून दिल्हा. व साठ हजार रुपये यांची वरात राजश्री रवळोजी शिंदे यांचे मागील खर्चाबद्दल देविले. बाकीच्या चिट्या किरकोळी जाल्यात. त्यावरून पातशाहांनीं राजश्री पाटिलबावांस लिहिलें कीं, "पूर्वीं तुह्मीं नेमणूक करून दिल्ही होती, त्याप्रमाणें चाले तें करावें. अथवा कुटुंबसुद्धां आह्मांस तेथें बोलवाल तरी येऊं. नाहीं तरी सर्वांस मक्कापावेतों पावतें करून द्यावें." याप्रमाणें एक दोन पत्रें आलीं होतीं. येथून खातरजमेचीं पत्रें जातात. पुढें आतां काय विचार ठरेल ते विनंति लिहूं.

रामरतन मोदी यावर पांच सात महिने अगोदर सितलदासासमागमें आपले कुटुंबास व जप्ती व सरंजाम सर्व लखनऊहून पाठवून दिल्हाच होता. आपण सडा मात्र राणेखानभाईचे ममतेंत शिरून राहिला होता. वीस पंचवीस वर्षें करोड मोदीगिरीचा वगैरे कारभार केला आहे. असामी मातबर, दो चौ लक्ष घ्यावयायोग्य आहे. सेवेसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३७८.

पैवस्ती छ० २४ जमादिलाखर. **श्री.** ५ मार्च इ. स. १७८९.

"आज्ञाधारक विठ्ठल हरि व गंगाजी आव्हाड अनुक्रमें दंडवत व साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ० ७ माहे जमादिलाखर मुक्काम लष्कर श्रीमथुराक्षेत्र यथास्थित जाणून लेखनआज्ञा करावी. विशेषः— इकडील मजकूर तरी, गुलामकादर याजला इतके दिवस ठेवून द्रव्यांश पाहिला. तो

कांहीं साधला नाहीं. नंतर फाल्गुन शुद्ध चतुर्थीस त्याचे पांच पाट काढून, उंटावर बसवून लष्करांत फिरविला. दुसरे दिवशीं नासिकहीन केलें. मागतीं फिरविला. तिसरे दिवशीं सर्व अंगहीन करून, डोळे काढून पातशाहाकडे पाठविलें. व त्यास बाहीर काढून मारून टाकिला. त्याजबरोबर नाजरखान खोजा व बिलासराय दिवाण वगैरे मंडळीस भय घातलें कीं, तुह्मांस जीवाची आशा असली तर खंड दंड करा. परंतु त्याचे होश जात राहिलेत. पुढें पाहावें. गुलामाचे दशेप्रमाणेंच करतील, ऐसें दिसतें. याजवर मोठामल,-गोहदच्या राजाचा कारभारी, पूर्वीं यांत मिळून त्याचे हातून राज्याचें पारिपत्य जालें,-तो आजपावेतों राजश्री पाटीलबावांचे कृपेंत होता. दरबारी दहा पांच माणसें बरोबर घेऊन येत होता. बावांचे जवळ बसावें, इकडील माहितगारी त्यास पुसावी, ऐसी योग्यता होती. त्यांणीं फितुराचीं पत्रें मारवाड्यांस पाठवीत होता. व मारेकरीही तयार केले होते. याचा शोध लागला. नंतर हे दोष त्याचे आंगीं लावून, दारूनें त्याचे हाताचीं बोटें जाळलीं. त्याचीं कुटुंबें ग्वालेरीस आहेत. पंचवीस पन्नास हजार लाख रुपयांपावेतों श्रम आहे. तो घेऊन सुळीं चढवितील ऐसें बोलतात. आपल्या फौजा राणेखानभाई वगैरे कुरूक्षेत्रापुढें दहा वीस कोसावर आहेत. राजश्री अलीबहादर बाबा सडे पांचशें लोकांनसीं येथें आलेत. यांणीं पेशजीं विनंतिपत्रें सरकारांत इकडील मजकुराचीं वायद्याची जोडी पाठविली, त्याजवरून सविस्तर ध्यानास येईल. पैकाची वोढ बहुत आहे. लोक धरणीं पारणीं करीत असतात. पातशाहाचे पुत्र गुलामाजवळून आणिले, ते दिल्लींत दाखल जाले. नंतर एक पुत्र सिलेमान सिको तेथून निघोन गेला. तो कोणीकडे गेला याचे बातमीस पाठविलें. ठिकाणीं लागल्यावर लिहून पाठवीन. इस्मायलबेग नजबकुलीच्या मुलकांत आहे तैसाच आहे. होळकर जेथील तेथेंच आहेत. जालें आढळलें वर्तमान सेवेसीं लिहिलें. श्रुत होय बहुत काय लिहिणें लोभ करावा हे विज्ञप्ति."

---

## लेखांक ३७९.

**श्री.** मार्च इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:--

विनंति ऐसीजे. राणेखानभाई व राजश्री सदाशिवपंत आस्वलकर फौजसुद्धां करनालच्या जिल्ह्यांत थानेश्वरच्या मुक्कामीं आहेत. शिखांकडील जाबसाल मामलतीचा रुबकर आहे. परंतु राणेखानभाईचें बोलणें हें कीं, गुलामाकडील माल

आसबाब तुह्मांपाशीं असल्यास हुजूर दाखल करावा. नाहीं तरी मुचलका लिहून द्यावा कीं, पुन्हां कोठें शोध लागल्यास, तुमचे जिमे शाबीत जाल्यास सरकारांत गुन्हेगारी द्यावी. त्यावरून शीख नित्य कजाकी करून, कही मारून नेतात. व बुढामल वगैरे शीख सर्व एक होऊन जमाव केला आहे. नानुमल याजकडून वकील राणेखानभाई यांजपाशीं येऊन मामल्याचा जाबसाल करितो. परंतु अद्यापि रुजू होत नाहीं. अमीनगड किल्ला कुंजपुऱ्याचे गीर्द होता. त्यास भाईनीं मोर्चे लावून किल्ला फत्ते केला. हल्लीं सरकारचा बंदोबस्त आहे. सेवेसीं श्रुत होय. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३८०.

**श्री.** ७ मार्च इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:–

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ५ जमादिलाखर जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेष:– पेशजीं विनंतिपत्रें सरकारांत व सेवेसीं चंद्र २१ जमादिलावलचीं पाठविलीं आहेत, तें पाऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, गुलाम कादर याचे डोळे नाक कान काहाडून, दिल्लीस पातशाहाकडे राजश्री पाटीलबावांनीं पाठवून दिलें व मशारनिल्हेचे बंद बंद वेगळे करून जीवें मारिला! नवाब नाजर याचेंही येणेंप्रमाणेंच पारिपत्य व्हावें, ऐसा विचार आहे. रामरतन मोदी कैदेंतच आहे. अद्यापि कांहीं जाबसाल ठैरला नाहीं. गुलामाची आई व बंधू सतलज नदी उतरून लाहोराकडे गेले. राणेखानभाई पटयाल्याहूनदहाबारा कोस अलीकडे शहाबादेस मुक्काम करून आहेत. नानूमल येऊन भेटला. तिकडील शिखांचा मामला कांहीं ठैरण्यांत आला नाहीं. नानूमलाचें बोलणें हिंमतबहादर गोसावी यांचें विद्यमानें लागलें आहे कीं, आमची कुमक करावी; ह्मणजे मामला फडशा करून देऊं. येथून राजश्री पाटीलबावांची ताकीद आहे कीं, पुढें जाऊन मसलत लांबेनम (?) याप्रमाणें आहे. मोटामल खत्री गोहदवाल्याकडील राजश्री पाटीलबावांपासीं होता. त्याणें जोतपुराकडे पत्रें पाठवून, सूत्र लाविलें होतें कीं मीं येथें दगा करितों. हें वृत्त पाटीलबावांनीं श्रवण करून मशारनिल्हेस कैद केलें व सख्ती फार आहे. त्याचेंही पारिपत्य गुलामाप्रमाणेंच करावें ऐसा विचार आहे. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे ही विनंति."

---

## लेखांक ३८१.

**श्री.** ९ मार्च इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० ११ माहे जमादिलावल मुक्काम श्रीमथुरा जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः—स्वामींनीं कृपापत्र छ० १० व २४ रविलाखरचें पाठविलें, तें छ ० ८ माहे मजकुरीं पावून सनाथ जालों. पेशजीं विनंतिपत्रें छ० २१ जमादिलावलचीं सरकारांत व सेवेसीं पाठविलीं आहेत. तें पावून सविस्तर वर्तमान ध्यानारूढ जाहालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, रामरतन मोदी याचे मामल्याचा जाबसाल लागला आहे. राजश्री पाटिलबावा पांच लक्ष रुपये तलब करितात. मशारनिल्हेचें बोलणें मोघम आहे कीं, लखनऊस कुटुंब वगैरे सरंजाम असेल, तो सर्व आपणापाशीं हाजीर करितों. पुढें मर्जीस येईल तैसें करावें. यावर अद्यापि कांहीं ठरण्यांत आला नाहीं. ........( फाटलें आहे ) ........व राजश्री खंडेराव हरीकडे मामलतीसंबंधीं फाजील मशारनिल्हेचे दोन तीन लक्ष रुपये निघाले होते. ते सर्व राजश्री पाटिलबावांनीं जप्त केले. पुढें त्यांस जिवें मारावा ऐसा विचार आहे. राणेखानभाई यांसी नानुमल शीख (यानें) नवाब अलीबहादूर यांचे पत्रावरून येऊन भेट घेतली. खाजगत मामला चार लक्ष रुपये कबूल करितो. परंतु भाई मजकूर यांचें मानस साहा लक्ष पावेतों. वरकड शीख कजाकी करून लष्करचे गिर्द लुटून नेतात. सहारनपूर वगैरे गोसगड प्रांतीं एक कारकून नवाब मशारनिल्हेकडीलही तेथें राहिले आहेत. राजश्री सदाशिवपंत आसवलकर राणेखानभाईजवळ आहेत. रंजितसिंग जाट याजकडे मथुरा वृंदावन वगैरे पांच सात महाल आमानी होते. त्यास, मशारनिल्हेकडून पैका सरंजाम न होय, व नित्य लबाडी कारभार, यास्तव रंजितसिंग जाटाकडील सर्व महाल जप्त केले; व आपले कमाविसदारांसीं रसदा घेऊन बंदोबस्त केला. ह्मणून जाट मजकूरही बेदिल आहेत. राजश्री सुभेदार शहाबादेचे गिर्द गढ्यास मोर्चे लावून मामला घेतात. सांप्रत इकडे यावयाचा विचार नाहीं. राजश्री पाटिलबावा छावणीच्या तयारींत आहेत. सध्या खांसा स्वारी करावी, ऐसें मानस दिसत नाहीं. रावराजे प्रतापसिंग भागीरथीस्नानास गेले होते. तेही माघारे दो चौ दिवसांत येणार आहेत. मशारनिल्हे आल्यावर काय विचार ठरून अमलांत येईल तें विनंति लिहूं. वरकड सविस्तर वर्तमान

पुरवणी पत्रावरून व अकबारा पाठविल्या आहेत त्यावरून श्रुत होईल. सदोदित कृपापत्रीं सांभाळ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हें विनंति."

## लेखांक ३८२.

श्री. ९ मार्च इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:-

विनंति ऐसीजे. रंजितसिंग जाटाकडे मथुरावृंदावन वगैरे जागा होती, ते सर्व राजश्री पाटिलबावांनीं सोडून घेऊन, आपले कमावीसदारांसीं रसदा घेऊन प्रांत लावून दिल्हा. जाटांसीं पैक्याची सरबराह न होय. यास्तव मुलूख यांणीं स्वाधीन करून दिल्हा. राजश्री गोपाळराव त्रिंबक आहिरवाड्याहून दरकूच लष्करांत दाखल जाले. राजश्री पाटिलबावा सामोरे गेले होते. इस्माईलबेग वगैरे यांचें वर्तमान बदस्तुर आहे. नवाब अलीबहादर उदयीक आग्र्याची जागा व किल्ला वगैरे फत्तेपूर पाहावयास जाणार आहेत. सेवेसीं श्रुत होय. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३८३.

श्री. ९ मार्च इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री पंत प्रधान स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक गोविंदराव पुरुषोत्तम कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल तागाईत छ० ११ माहे जमादिलाखर मुक्काम लष्कर नजीक श्रीमथुरा जाणोन स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः—पेशजीं विनंतिपत्रें छ० २१ जमादिलावलीचीं सेवेसीं पाठविलीं आहेत. तें प्रविष्ट होऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जाहालेंच असेल. हल्लीं वर्तमान तरी, गुलामकादर यांस राजश्री पाटिलबावांनीं बंद अंध (?) वगैरे करून जीवें मारिलें. सिलेमासिको शाहाजादा दिल्लीचे किल्ल्यांतून निघोन, रेवाडीचे मार्गें जोतपूरकराकडील लोकांनीं बिजेसिंगाकडे घेऊन गेलेत. राणेखानभाई शहापुरचे मुक्कामींच आहेत. नवाब अलीबहादर आग्र्याचा किल्ला पाहावयाकरितां तेथें गेले आहेत. सेवेसीं श्रुत होय.

वरकड सविस्तर वर्तमान राजश्री नानांचे पत्रीं विनंति लिहिली आहे त्यावरून ध्यानारूढ होईल. सदोदित कृपापत्रीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

पैवस्ती छ० साबान सन
तिसा समानीन वैशाख.

## लेखांक ३८४.

श्री.

२७ मार्च इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ० २९ माहे जमादिलाखर मुक्काम लष्कर नजीक श्रीमथुरा जाणून स्वानंदलेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः– पेशजीं विनंतिपत्रें सरकारांत सेवेसीं छ० ११ तारखेचीं पाठविलीं आहेत. तें प्रविष्ट होऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जाहालेंच असेल. हल्लीं वर्तमान तर, सिलेमासिको शाहाजादा दिल्लीचे किल्ल्यांतून निघून गंगापार फैजुलाखान रोहिल्याचे प्रांतांत पळून गेला. रोहिले मजकुरांनीं हें वर्तमान श्रवण करून, सामोरे येऊन आपले घरास घेऊन आला व बहुत सन्मान करून ठेविलें आहे. परंतु शाहाजाद्याचें मानस आहे कीं, वजिराकडे लखनऊस जावें. तेथें कांहीं सोय जालियास कालक्षेप तेथें करावा. नाहीं तरी कलकत्त्यास इंग्रेजांकडे जाऊन राहावें, ऐसा विचार आहे. राणेखानभाई व राजश्री सदाशिवपंत आसवलकर फौजसुद्धां कोट कछवा ह्मणून पटयाल्याचें गीर्द तेथें मुक्काम करून आहेत. नवाब अलीबहादर यांणीं आपली फौज येथें बोलाविली आहे. कारण हें कीं, तेथें खर्चाची वोढ; गवगवा होईल. यास्तव पत्रें पाठविलीं आहेत. राजश्री पाटिलबावांचीं पत्रें राणेखानभाईसही याप्रमाणेंच गेलीं आहेत. पालमर साहेब व बिरसकूट साहेब वगैरे फिरंगी यांणीं पातशाहांचा निरोप घेऊन येथें आले आहेत. दहा हजार रुपये नख्त व कांहीं सरंजाम पातशाहांस नजर केला, व बहुत खातरजमा केली आहे. राजश्री रवळोजी शिंदे यांणीं दरोबस्त महालांत व किल्ल्यांत देखील बायका महालांत ठेऊन तेथील बंदोबस्त आपला केला. पातशाहांनीं राजश्री पाटिलबावांस लिहिलें आहे कीं, तीनशें रुपये रोजांत गुजर होत नाहीं. परंतु येथून अद्यापि कांहीं नेमणूक अधिक नेमली नाहीं. यास्तव पातशाहा बहुत हैराण आहेत. नवाब वजीर बदस्तुर लखनऊस आहेत. राजश्री पाटिलबावांचें कुटुंब संवत्सर प्रतिपदेचे मुहूर्तें येथें दाखल होणार आहेत. राजश्री बाळाजी गोविंद बुंदेले महायात्रा करून कालपीस आलेत. येथें सांप्रत छावणीची तयारी सर्वत्र होते. सेवेसीं श्रुत होय. वरकड वृत्त, पुरवणीपत्रांवरून व यखबरा पाठविल्या आहेत त्यांवरून श्रुत होईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

## लेखांक ३८५.

**श्री.** मार्च इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—बिलासराय व मनिहारसिंग यांस ग्वालेरचे किल्ल्यावर पाठविले. व नाजरास सांप्रत येथें ठेविलें आहे. अद्यापि कांहीं फडशा जाला नाहीं. परंतु नाजराचें बोलणें आहे कीं, माझी ठेवी दोन तीन लाख रुपये सितलदासाकडे आहे. त्यास मशारनिल्हे रोहिल्याचे दंग्यांत पळोन लखनऊस गेला होता. त्यास हल्लीं नाजरावर जप्ती गुजरली. तेव्हां सांगितलें कीं, तो ऐवज सितलदासाजवळोन आणून घ्यावा. त्यावरून राजश्री पाटिलबावांनीं नवाब वजिरास व इंग्रेजांस येविसीं पत्रें पाठविलीं कीं, सितलदासाकडे नाजराची ठेवी अमानत आहे, ते घेऊन पाठवून द्यावी. त्यावरून नवाब वजीर व इंग्रेज बहुत बेदिल आहेत. सेवेसीं होय श्रुत होय. पुढें प्रत्यायास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३८६.

**श्री.** इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—धारराव शिंदे पूर्वीं पानिपताकडे गेले होते. त्यांचे शरीरीं समाधान नव्हतें. ह्मणोन व भंगेलसिंग शीख दोन हजारा स्वारांचा सरदार आहे, त्यास राजश्री अंबाजी इंगळे यांचे विद्यमानें, चौ लक्षा रुपयांचे परगणे पानिपताकडे सरंजाम लाऊन दिल्हा आहे. जो सरदार यांजकडून पाणिपताकडे जाईल, त्यानें भंगेलसिंगाचे विचारें चालावें ह्मणोन येथील आज्ञा. त्यास धारराव शिंदे यांसीं व भंगेलसिंगासीं तिकडील खंडण्याचें कामाकाजामुळें कटाक्ष कारभार-संबधीं लागले. याजकरितां धारराव यांनीं विनंति केली कीं, मजला मुख्त्यार करून पाठवाल, तर मी जाईन; नाहींतर आपलेपासीं आहे. त्याजवरून विठोजी इंगळे, अंबाजी इंगळ्याचे कनिष्ठ बंधु, यांजसमागमें फौज देऊन पानिपताकडे बंदोबस्तास पाठविलें आहे. पुढें श्रवणांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३८७.

**श्री.** मार्च इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—जाटाकडील मुलूख दरोबस्त आपले स्वारीखर्चाकडे ठेऊन, पात-

शाही खालसा कौल व सिकंदरा व मेरट वगैरे बत्तीस महाल यांचा मक्ता करार करून, सिबंदी व महाल मजकूर व नानकार वगैरे जहागीरदार, रोजीनदार वजा करून, व नजराणा बाद घालून, निखालस सोळा लक्ष चौऱ्याण्णव हजारावर कमाविसदारांस मामलत इजारीयानें बिन्‌मक्ता सांगितलें. पातशाहास एक लाख तीस हजार रुपये दरमहा देणें लागतो. त्याचा हवाला राजश्री बापूजी नाईक भावे यांचा दिल्हा आहे. याजकरितां पातशाही महालांची मामलत विल्हेस लावून, परस्परें कमाविसदारांकडून राजश्री बापूजी नाईक भावे करवितात. याप्रमाणें वर्तमान आहे. वजिरांनीं पहिली मोहोर वकील-मुतलखीची केली होती, ते जामदारखान्यांत ठेवून दुसरी मोहोर केली आहे. तिची नक्कल फर्द हिंदवी, पारसी, पाठविली आहे. त्याजवरून कळून येईल. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

# लेखांक ३८८.

श्री. १५ एप्रिल इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ १८ रज्जब मुक्काम लष्कर नजीक श्रीमथुरा जाणून स्वानंदलेखनआज्ञा केली पाहिजे. विशेषः—पेशजीं विनंतिपत्रें छ १६ माहे मजकूरचीं सेवेसीं पाठविलीं आहेत, तें प्रविष्ट होऊन सविस्तर वृत्त ध्यानारूढ जहालेंच असेल. हल्लीं इकडील वर्तमान तर, राजश्री काशीबा होळकर व बाळोजी इंगळे यांसीं व गैबसिंग, तारासिंग वगैरे शीखांसीं आपसांत लढाई जहाली. दोन अडीचशें लोक ठार राहिले. इंगळे मजकूर सैदाबादेनजीक पटयाला येथें मुक्काम करून आहेत. शीख साहेबसिंग वगैरे सर्व एकत्र होऊन लढाईस रुबकार आहेत. ह्मणून राजश्री पाटीलबावांकडे पत्रें आलीं. त्यावरून यांनीं, राणी इंद्राणीचे वकिलास निक्षून ताकीद केली. शीखांनीं मिर्जाकडील वृत्त ऐकोन पुन्हां जमाव केला आहे. व रोहिले पांच चार हजार जमा होऊन, शीखांस शामील जाले आहेत. राजश्री पाटीलबावांनीं पेशोराकडे मुजरद जोडी पाठविली आहे. शाहाकडील वर्तमान आल्यावर सेवेसीं विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३८९.

श्री. २९ एप्रील इ. स. १७८९.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

पोष्य गोविंदराव पुरुषोत्तम व दामोदर देवराव कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति येथील कुशल तागाईत छ ३ माहे साबान मुक्काम लष्कर नजीक श्रीमथुरा जाणून स्वानंदलेखनाज्ञा केली पाहिजे. विशेषः–बहुतां दिवसीं स्वामींनीं कृपा करून पत्रें रविलावल व रविलाखरचीं पाठविलीं, तीं छ २६ रज्जबीं पावून सनाथ जालों. पेशजीं विनंतिपत्रें छ १६ रज्जबचीं सेवेसीं पाठविलीं आहेत, तें प्रविष्ट होऊन सविस्तर वृत्त ध्यानरूढ जाहालेंच असेल. हल्लीं इकडील वर्तमान तरी, राजश्री पाटीलबावांचा विचार आहे कीं, नवाब अलीबहादर यांस आग्रा वगैरे दहा लक्षांची जागा तोडून द्यावी. परंतु मागील बाकीचा जाबसाल अद्यापि ठैरला नाहीं. यास्तव बोलणें लागलें आहे. ठैरल्यावर फौजेची रवानगी होईल. हिंमतबहादर गोसावी याचे जायदाद द्यावयाचा जाबसाल होत आहे. परंतु येथील जाबसाल ठैरण्यांत आला नाहीं. पालमर साहेब निरोप घेऊन आग्र्यास गेले. टिपूची मसलत इंग्रजास भारी पडली आहे. ह्मणून त्यांजकडील कंपूचें येणें तुरूत होत नाहीं. याप्रमाणें साहेबमजकुरानें राजश्री पाटीलबावांस सांगितलें. नवाब वजीर लखनौस स्वस्थ शेर शिकार करून आहेत. तैमुरशाहांनीं त्रिवर्ग सरदारांस खिलत वस्त्रें देऊन पेशोराहून वकिलास इकडे रवाना केलें, ह्मणून श्रवणांत आलें. त्यास, वकील मजकूर येथें दाखल जाल्यावर, काय बोलणें होऊन प्रत्यास येईल, तें विनंति लिहूं. हात्रसवाला दयाराम जाट याचा मामला एक लक्ष पस्तीस हजारावर जाला. सेवेसीं श्रुत होय. वरकड सविस्तर वृत्त, पुरवणीपत्रावरून व अखबारा पाठविल्या आहेत त्यांवरून श्रुत होईल. सदोदित कृपापत्रीं सनाथ करणार स्वामी समर्थ आहेत. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३९०.

श्री. एप्रिल इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:–विलायतेहून वर्तमान आलें कीं, मुरादशाहा (पैर्व ?) बगदादचा पातशाहा तैमूरशाहावर चालून आला. तैमूरशाहांनीं शिकस्त खाऊन पिशोरास आला. मुरादशाहा यांनीं काबलपावेतों बंदोबस्त केले. पुढें पिशोराकडे कूच

करावयाचा मानस आहे. तैमूरशाहा शीखांस बोलावितो. परंतु शीख ह्मणतात कीं, यवनांस आह्मीं शामील होत नाहीं. दुसरे, अमरसिंग जाट पटालेकर यांसीं व शीखांसीं बिघाड जाला आहे. नानूमल, अमरसिंगाचा दिवाण, यांनीं तीस चाळीस हजार स्वार व पायदळ व तोफा जमा करून, शीखांवर गेला आहे. नित्य युद्धप्रसंग आहे. पहावें काय ठरतें? इस्मायलबेग यास रेवाडी वगैरे नजबकुलीचा मुलूख जायदाद देऊन, येथून वाटे लाविलें. त्यास इस्मायलबेग, नुरगस ह्मणून मातबर जागा होती तेथें जाऊन, मोर्चे लावून आठां दिवसांत गढ घेतले. तेथें ठाणा ठेवून रेवाडीस गेला. तिकडून नजबकुलीखान यांनीं कानोडहून कूच केलें आहे. यासीं व इस्मायलबेगासीं जुंज होईल, ऐसें आहे. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. राजश्री अलीबहादर यांस वरचेवर येथील वर्तमान लिहीत असतों. रांगड्यांची मामलत करितां त्यांचे तिकडे ठैराव जाले. या समयांत येथें यावयाचें जालें असतें तर उत्तम होतें. येथील पातशाही बंदोबस्त सर्व त्यांचे विद्यमानें घडतें. आतांहि सत्वर येणें होय तर उत्तम आहे. राजे हिंमतबहादर गोसावी सरकारचाकरीस बहुत तत्पर आहेत. राजश्री महादजी शिंदे यांनीं पुन्हां बदस्तुर जायदाद देऊन राजे मजकुरांचे बंदोबस्त केले आहे. परंतु गोसावी यांचें मानस आहे कीं, हजुरांतून नेमणूक व बंदोबस्त होऊन, सरकारचे चाकर ऐसें जाल्यास आमची अब्रू वाढेल. हें गोसावी यांनीं आह्मांस बोलावून विनंति लिहिण्यास सांगितलें. त्याजवरून विनंति लिहिली असे. पातशाहास मुबारकबादची अर्जी अगत्य लिहवावी. बहुत काय लिहावें, कृपा केली पाहिजे हे विनंति.''

---

## लेखांक ३९१.

### श्री.

''पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे:—राजश्री सुभेदार यांचें बोलणें आहे कीं, सहारनपूर, गोसगड वगैरे रोहिल्याची जागा घेतली आहे. त्याची वांटणी आह्मांस करून द्यावी. नवीन जागा जयपूर प्रांतांत हस्तगत होईल त्यांतून वांटणी घेऊं. याप्रमाणें राजश्री पाटीलबावांकडे जाबसाल करितात. त्यावरून यांनीं उत्तर केलें कीं, आह्मांस मसलतीमुळें खर्च बहुत जाला आहे. त्यास, साहुकाराचे देण्यापासोन सुटल्यावर वांटणी करून घ्यावी. याप्रमाणें परस्परें बोलणें जालें. त्यावरून राजश्री सुभेदारांची मर्जी उदास आहे. व सडे फौजेंत राजश्री

काशीराव होळकर व बापूजी होळकर यांसीं व राजश्री पाटीलबावांकडील सरदारांशीं आपसांत चित्तशुद्धता नाहीं. जाहीरदारी मात्र परस्परें आहे. सेवेसीं श्रुत होय. पुढें अमलांत येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३९२.

श्री. एप्रिल इ. स. १७८९.

"पु॥ श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. पालमर साहेब वगैरे चार फिरंगी फरुकाबादेहून दरकूच दिल्लीस छ० १३ मिनहूस दाखल जाले. छ० १५ माहे मजकुरीं पातशाह्यांची मुलाजमत केली. सात किस्ती मुशजर बनात वगैरे विलायती जिन्नस व एक संदुख पिस्तोल येणेंप्रमाणें साहेबांनीं हजुरांत गुजराणून एकवीस मोहरा साहेब मजकुरांनीं व पांच पांच मोहरा डाकतर वगैरे फिरंग्यांनीं व दोन बिबियांनीं पांच पांच मोहरा नजर केल्या. हजुरांतून साहेबमजकुरास पिस्तार सरबस्ता गोशवारा आलखालक वगैरे सा पारचे खिलत व वरकड फिरंगी यांस पांच पांच पारचे व मुनशीस तीन तीन पारचे खिलत इनायत जाले. शाहाजींनीं पामर साहेबांची मेजमानी केली. अकरा किस्ती पोशाकी व एक एक किस्ती वरकड इंग्रेजांस व दोन किस्ती मुनसीस व एक शालजोडी येणेंप्रमाणें बहुमान केला. नंतर छ० १९ माहे मजकुरीं साहेबांनीं शाहाजीची मेजमानी केली. त्यास त्यांनींही बहुमान त्याप्रमाणेंच केला. दुसरे रोजीं छ० २० तारखेस साहेबमजकुरांनीं पातशाहाचा निरोप घेतला. व अनुपशहरास कूच करून गेले. तेथून पामरसाहेब कलकत्त्यास जाणार ह्मणून वदंता आहे. परंतु आठ चार दिवस राजश्री पाटिलबावांची मार्गप्रतीक्षा करून मग जातील, ऐसा विचार आहे. सेवेसीं श्रुत होय. पुढें निदर्शनास येईल तें विनंति लिहूं. बहुत काय लिहिणें, कृपा केली पाहिजे हे विनंति."

---

## लेखांक ३९३.

श्री. १७ आगष्ट इ. स. १७८९.

"आज्ञाधारक विठ्ठल हरि साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील कुशल ताा छ० २५ माहे जिलकाद मुक्काम लष्कर श्रीमथुरा क्षेत्र यथास्थित जाणून लेखनआज्ञा

करावी. दिल्लीकडील पातशाहाचें वर्तमान, गुलामकादर यांणीं महमदशाहाचा नातू बिदारबख्त यास तक्तावर बसविलें होतें. त्यास व त्याचा बंधु उभयतांस मारून टाकिलें तरवारीनें. शहाजीस येथून बोलावणें गेलें. त्यास पातशाहांनीं पाठविलें. मथुरावृंदावन येथील सनदा करून पाठविल्या. इस्माइलबेग मोडला ह्मणून खिलत पाठविला. सात पारचे चारकुबेसुद्धां, सिरपेंच, जेगा बमय कलगी, तुरा मुकेसी, माळा मोत्यांची, वस्त्रें हे देऊन शहाजी दाखल जाले. खिलत आणिला हें वर्तमान सांगितलें. दुसरे दिवशीं राजश्री सुभेदार यांस सांगोन पाठविलें. त्याजकडोन राजश्री नारो गणेश आले. "खिलत पातशाहाचा आला आहे. याचा कसा विचार?" त्यांणीं उत्तर केलें, जैसी आपली मर्जी असेल तैसें करावें. नंतर आपले घरचे मुत्सद्यांस पुसलें. त्यांणीं विनंति केली, ऐसा खिलत पातशाहांनीं दोघांस द्यावा. वजीर अथवा बक्षी याअन्वयें आहे. त्याजवरून खिलत पाहून जामदारखान्यांत ठेविला आहे. शहाजीस वस्त्रें दिल्हीं. पांच किस्ती सिरपेंच, माळ मोत्यांची, याचे पुत्रास चार किस्ती व सिरपेंच दिल्हा. पातशाहाकडील लोक आले. मोलवी आताउल्ला व अहंमद सुजा वगैरे यांस वस्त्रें दिल्हीं. पन्नास असामी समरूचे बेगमेचीं पलटणेंही यांजबरोबरच येथें दाखल जालीं. त्यांसही वस्त्रें दिल्हीं. इकडील फौजेचें वर्तमान, सेकावटींत राजश्री लखबा आगरेवाले फौज पांच सात हजार घेऊन गेले होते. त्यांनीं कांहीं ठाणीं वसविलीं. जे भेटले त्यांजजवळ खंडणी घेतली. राजश्री गोपाळराव रघुनाथ व जिवाजी बल्लाळ व डभई साहेबांचा कंपू तोफासुद्धां मारवाडी यांणीं जमाव केला. सामर मारोट यांचे मध्यें मुक्काम करून होते. त्याजवर जातांच त्यांची फौज कूच करून अजमेरकडे गेली. आपले फौजेनें सामरास ठाणें बसविलें. पुढें मारोटावर कूच केला. तेथील जमीदार येऊन ठाणें घेऊन गेलें. जैपुरचें वर्तमान, आपली फौज, किरकोळी लोक व पेंढारी हे नित्य जाऊन, दो कोसांवर लुटतात. जैपुरकर उगेच बसले आहेत. खजाना वडिलाचे हातचा आहे. ज्या कोठड्यावर तलाख लिहिली आहे, त्या कोठड्या देखील उघडल्या. परंतु पैका कोठेंही निघाला नाहीं. ऐसे अकबारचें वर्तमान येत आहे. राजश्री अंबोजी इंगळे ग्वालेरीहून आले आहेत. जैपुरकराकडे आणखी फौज पाठविण्याचा विचार केला. त्यांत सरदार पाहिजे. यास्तव राजश्री लाडोजी देशमुख शितोळे यांस सांगितलें. छ०१९ मिनहूस डेरे बाहीर करविले आहेत. यांनीं दिल्लीचे बंदोबस्तास राजश्री रवळोजी शिंदे यांस सांगितलें व सहारनपुर दोन्ही तालुक्याचा मख्ता करून देतात. याप्रमाणें बोलण्यांत आलें आहे. यांणींही डेरे बाहीर केले आहेत. राव राजे यांचा

वकील आला. त्याणें पत्रें दिल्हीं. मथुरेस हवेली राहावयास जागा मागितली. यांणीं कबूल केलें. जागा देतात. राजाही येणार आहे. राजश्री रघुनाथराव बळवंत सडे येथें आलेत. फौज राजश्री भगीरथराव शिंदे शेरसिंगाचे पारिपत्यास राघोगडाकडे पाठविले, त्यांचे मदतीस ठेविली. रामरतन मोदी याचा फैसल्ला चार लक्ष रुपये ठरले. शिवाय खर्च. यास राजश्री राणेखानभाई व बाळोबा पागनीस घेऊन गेले. हजामत करविली. वस्त्रें दिल्हीं. नाजर खोजा आगरियांत कैदेंत ठेविला होता, त्यास आणिलें. राजश्री बाळोबा पागनीस याचे जिम्मेस आहे. त्याजजवळ कांहीं ऐवज मिळेल ऐसें दिसत नाहीं. उभयतां राजे यांजकडील राजश्री पाटील-बावाकडे येणार, ऐसीं पत्रें आलीं होतीं. येथून त्यास मना करविलें आहे. पामर साहेब फिरंगी आला आहे. त्याचेंही खिलबत जालें. तो ह्मणतो, इकडचा बंदोबस्त करून दक्षणच्या मोहिमेस आपण चालावें. राजश्री दौलतराव वाबळे यांची रवानगी अंतरवेदीकडे केली आहे. यमुना उतरून पार गेले. तिकडील मवास जमीदार यांणीं पैका कमाविसदारास दिल्हा नाहीं. याजकरितां चार तोफा कांहीं किर-कोळी लोक तैनातीस देऊन पाठवितात. तहमूरशहा दुराणी पातशा व बल्कबुखार येथील पातशाहाची लढाई सुरू जाली आहे. हेंही वर्तमान येथें आकबारेचें आलें आहे. आफरासाहेब मेला, त्याची धाकटी बेगम येथें होती. तिजकडे कांहीं आरोप आला ह्मणून चौकी बसविली होती. तिनें पांच रकमा जवाहिराच्या दिल्ह्या व पंचवीस शालजोड्या. नंतर चौकी उठविली. राजश्री अलीबहादर बाबाकडील वर्तमान तूर्त दोन लक्ष रुपये खर्चास द्यावे ऐसें ठरलें आहे. श्रावण शुद्ध दशमीस निम्मे, वद्य दशमीस निम्मे द्यावे. खुशालचंद्र अंबाईदास यांजवर रुपये देविले. फौज चाकरीवर पाठवावी. राजश्री सदाशिवपंत आसवलकर फौजेसमागमें द्यावे. फौज चाकरीवर गेल्यानंतर साडेबारा लक्षांचा मुलूख इस्मायलबेगापैकीं द्यावा ऐसें ठरलें आहे. जालें वर्तमान लिहिलें. श्रुत होय बहुत काय लिहिणें करावा हे विज्ञप्ति."

[ इतिहाससंग्रहांत प्रसिद्ध झालेलीं ]

# दिल्ली येथील मराठ्यांचीं राजकारणें

अथवा

## दिल्ली येथील पेशव्यांचे वकील हिंगणे ह्यांचा पत्रव्यवहार.

( इ. स. १७८० – इ. स. १७८९ ).



## भाग १ ला.



हें प्रकरण

**दत्तात्रय बळवंत पारसनीस**

संपादक 'इतिहाससंग्रह'—सातारा,

ह्यांनीं संशोधून तयार केलें.



तें

**मुंबई येथें,**

तुकाराम जावजी ह्यांनीं

'निर्णयसागर' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

इ. स. १९१३.

# मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें.



## मुरुमखोरें—सिलिमकर देशमुख.

### लेखांक १.

**श्री.**

( नकलेची नकल. )

महजरनामा अज करार ब तारीख छ १३ रोज ते दिवसी कान्होजी वलद शाहाजीराव निंबाळकर माहाले स॥ प॥ कराड यासि जानकाई कोम रत्नोजी व॥ शाहाजी इबिन गोविंदराव काळे कासार देशमुख ता॥ वेळवंडखोरे सु॥ सन ७३७ सुभे खुजस्तेबुनियाद कारणे महजर लेहून दिल्हा ऐसा जे, देहाय ता॥ म॥ ची लावणी उगवणी पडली आपण ता॥ म॥ चा कारभार करीत असता. लावणी उगवणीची सरफरास न होए आणि प्रांत मजकुरी कितेक कसाल बार लि॥ चें पडलें. काही हाल राहिला नाही. त्यावर वतनाचे सिरी कर्ज बहुत जाले. मामला आफ्तर जाला. एके रोजीचे खावयास नाहीसे जाले. आजि सबब आपला भर्तार रत्नोजीराव फौत जाहला. आपले पोटीं पुत्रसंतान नाही आपणामधी काही ताकत राहिली नाही. जागीरदार याणी आपणास गावची लावणीबदल बैतल मालाचे टके वगैरे महलग टका सिरी जाला त्यास द्यावयास जागा नाहीसी जाली. त्याजबदल आपण मिनतमाना करून ता॥ म॥ ची देशमुखी आपली आपण खुश रजावंदीने कबालतीने फरोख्त करून दिल्ही. बकिमत महलग टके होन सुमार ५०१ पांचसे एक रास भरणा घेतला असे. तमाम माल घेऊन फरोख्त केली असे. गावगना तपसीलवार देहाय

| | | | |
|---|---|---|---|
| १ | एल्हवंड | १ | नऱ्हे |
| १ | पसूरे | १ | माजगाव |
| १ | म्हलवडी | १ | आसगवडी |
| १ | बारे | १ | करंदी |
| १ | जैतपाड | १ | कामरें |
| ५ | | ५ | |

एकूण गाव दाहा याची रकमीना जमीन टके सुमार २२५ सवा दोन से मोकरार करून दिल्ही असे. नांव नागर सिरपाव मानपान पुढे घेत जावा. निमे इनाम बाजे वतन फरोख्त करून आपले स्वसंतोषे दिधले आहे. मी ( अपूर्ण )

बे॥ रुमाजी व॥ हैबतराव मारणे देशमुख त॥ मुठे खोरे

बे॥ आपाजी बलाळ देशपांडे

बे॥ हरजी व॥ कृष्णाजीराव सिंदे देशमुख त॥ पोन मावळ

बे॥ भवानी बाजी देशपांडे

बे॥ गोविंदराव शिर्के राजे

बे॥ भिकाजी व॥ देवजीराव निगडे देशमुख त॥ सिरवळ

बे॥ फुलाजी दिवाकर देशपांडे गु॥

बे॥ चापजी व॥ हवाजी खोपडे देशमुख त ॥ रोहिडखोरे

बे॥ दाजी नरसी देशपांडे

बे॥ नारायण व ॥ कानजी कानडे

देशमुख त ॥ कानदखोरे

बे॥ भवानी भास्कर देशपांडे

बे॥ खंडेराव व॥ यशवंतराव पवार देशमुख त॥ नाणेमावळ

बे॥ आपाजी हरि देशपांडे

बे॥ फुलाजी व॥ देवजी कालभर देशमुख त॥ पुणें

बे॥ अंताजी हरि देशपांडे

बे॥ महिपतराव व॥ चंदरराव मोरे जावळखोरे

बे॥ कोंडो तिमाजी देशपांडे

बे॥ शाहाजी व॥ जाखोजी राजे देशमुख सुभे खुजस्तेबुनियाद*

---

## लेखांक २.

श्रीं. १७१८ भाद्रपद शुद्ध २

**नकल असल बमोजीब**

करीणा सुभानराव बिन खंडेराव सिंदे सिलिमकर देशमुख त॥ गुंजणमावळ सु॥ सबा तिसैन मया व अलफ करीणा लेहून दिल्हा ऐसा जे, आमचा मूळपुरुष शाहाजी शिंदे रविराव मुकाम बेसवडा हे निघोन पायेनडास येऊन नजिक बलवंड व तोरणाल आहे; त्यास बलवंडे येथील रजपूत दलसिंग मोहिते व तोरणाल येथील यशवंतराव चोरघे ऐसे उभयतास बरावर घेऊन त॥ मुरुमखोरे

---

* हा महजर नकलेची नकल आहे. अपूर्ण आहे. भाषा तत्कालीन नाहीं. ह्यावर माझा विश्वास बसावयाला असल कागद सांपडला पाहिजे किंवा इतर प्रत्यंतर पुरावा पाहिजे. बनावट असल्यास, बनावट करणाऱ्याची पुरातन कल्पना काय होती तें कळतें. तत्कालीन देशमुख देशपांडे कोण असावेत त्यासंबंधीं बनावटकाराचें मत काय होतें तें कळण्यास हा कागद साधन आहे. बनावटकाराचेहि डोक्यांत कांहीं खरी माहिती असावी.

येथे मौजे हतवे बु॥ येथे येऊन उतरले. तो त॥ मजकूरची देशमुखीण कचाई कोम रतनोजी बिन शाहाजी उपनाम काले कासार सरदेशमुख याचे नकल जाले होते, तिणे शाहाजी सिंदे यास मौजे हतवे बु॥ येथील पाटिलकी देऊन याचे पुत्र उभयता सितोजी व खापरोजी पैकी खापरोजीस कचावा इणे आपल्या हाताखाली ठेऊन देशमुखीचा कारभार त्यापासून करवीत होती आणि यशवंतराव चोरघे हे देशमुखीचा दिवाणकारभार करीत होते. त्यास काही एक वर्षें जाली. तो यशवंतराव चोरघे वारले. त्याचे पुत्र रामराव दिवाणकारभारास सरकारात गेले. मागे कचाई आवाचा काल होऊ लागला. तेव्हा तिणे आपली देशमुखी त॥ मारची सितोजी व खापरोजी यास देऊन आपण मृत्य पावली. त्यावरी रामराव चोरघे दिवाणात गेले होते ते घरास आले. तो कचाईचा काल जाला. आणि सितोजी व खापरोजी देशमुखीचा कारभार करितात. त्याणी मौजे बोराळे येथील पाटिलकी दलसिंग मोहिते याचे पुत्र अजपालसिंग यास देऊन त्याची समजूत काढून आणि चोरघे यास काही दिल्हे नाही. त्यावरून चोरघे याणी रुसवा केला. तेव्हा सितोजी व खापरोजी चोरघे यास पाच गाव पाटिलकीचे देत होते, परंतु चोरघे समजले नाहीत. तेव्हांपासून चोरघीयाचा व देशमुखीयाचा वाद लागला. त्यावरी सितोजीचे नकल जाले. बाकी खापरोजीस पुत्र सिवाजी व प्रतापजी. पैकी सिवाजीच्या पुत्राचे नकल जाले. प्रतापजी व बाबाजी व जावजीस पुत्र दशरोजी पावेतो चोरघियाचा व शिंदे देशमुख याची जुझे दरडोईस होऊन वाद सांगतच होते. तो दशरोजीनें कुरंगवाडी इसापत दिवाणातून करून घेऊन आपण कुरंगवाडीस नांदत होता. त्यावरी चोरघे याचे वंसीचे उदाजी व त्याचे पुत्र येसाजी यानीं दसरोजीवर चढाई करून कुरंगवडीच्या मागें माळावरी जुंझ करून दसरोजीस मारिला. मग दसरोजीचा पुत्र कान्होजी याणीं मौजे कुरंगवडीस महकलासा मागें वाडा बांधोन देशमुखी करीत होता. त्याचा पुत्र येसाजी यानीं मार्गआसनीस वाडा बांधोन मार्ग चालता केला. त्याचा पुत्र चाहूजी याणे गुंजवणियांत मुकाईच्या माळावरी वाडा बांधोन देशमुखी करीत होता. त्यास पुत्र दोन पुनाजी व भिवजी. हे देशमुखी करीत होते. चाहुजी ह्मातारा जाला त्याची बहीण सामावा. कानोजी कोंडे देशमुख त ॥ खेडेबारे यांचे पुत्र दोन बापोजी व जाखोजी. त्यास बापोजी कोंडे यास सामावा दिल्ही होती. तेव्हां त्याचे पुत्र हरजी वडील जीवन लहान ह्मणून सामावा याणी चाहूजी सिंदे आणून त्याजपासून सिक्याचा कारभार करवीत होती. त्यावरी तिचा दीर जाखोजी यास व चाहूजीस पटेना. सबब जाखोजी म॥र याणे सामाई सवतीचा भाऊ चाहुजी ऐसे जिवे मारिले. तेव्हा सामाईचे पुत्र पुनाजी व भिवजी

ऐसे बेदरास जाऊन वाद सांगू लागले. तेव्हां पातशाहानीं जाखोजी कोंडे याचे वतन-वाड्यापैकी गाव च्यार घेऊन या दोघास बितपशील उंबरे व निगडे हे दोन गांव सामावाच्या खुनाबदल तिचे पुत्र हरजी व तुलजी यांस दिल्हे व निधान सांगवी हे दोन गाव चाहूजीचे पुत्र पुनाजी व भिवजी सिंदे देशमुख ता। गुंजणमावळ यास चाहूजीच्या खुनाबदल दिल्हे. त्यावरी भिवजी सिंदे बेदरास कामाकाजामुळे गेला त्यास तेथे दोन च्यार वर्षे लागली. तो चोरघियाचा वाद पहिलाच होतां त्यास त्याणी पुनाजी एकटा आहे ऐसी संदी पाहून, उदाजी व एसाजी याचे वौसीचे बाजी व भिवजी याणी जुंजावरी जुंजे करून पुनाजीस पळव केला. तेव्हां पुनाजीने विचार करून हवजी व रुद्राजी व भिवजी सिलिमकर पाटील मौजे सिलिंबे ता। पवनमावळ यास पाच गांव पाटिलकीचे देऊ करून, पुनाजीने आपले मदतीस आणिले आणि मौजे बोराळे येथील आपल्या वाड्यांत आणून चोरघे याच्या तोंडावरी ठेविले. त्यावरी चोरघे काहीच बदले नाहींत. त्यावरी पुनाजीसी व या त्रिवर्गासी सिलिंबकराची समक्ष भेटी जाली. तेव्हां सिलिंबकर याणी पुनाजीस विचारले जे आह्मास तुह्मी का आणिले? मग पुनाजी बोलिला की, आमचा व चोरघा याचा वाद बहुत दिवस आहे, त्यास आमचा भाऊ भिवजी बेदरास जाऊन तीन चार वर्षे जाली, मागे मी एकटा. चोरघे तरी आपल्यास चैन पडू देईनात. याजकरितां तुह्मास आह्मी मदतीस आणिले. तुह्मी व आह्मी मिळोन चोरघीयास नतिजा पोहचऊ. याबदल तुह्मांस पाच गाव पाटिलकीचे देऊ. ऐसे पुनाजी बोलिला. तेव्हा हे त्रिवर्ग बोलिले जे, आम्हास निमे देशमुखी देसील तरी आह्मी राहून काज काम करितो. नाही तरी माघारे जातो. ऐसे ते पष्ट बोलिले. तेव्हा पुनाजीने साल जाब केला जे, तुह्मास पाच गाव पाटिलकीचे घेऊन काजकाम करावयाचे पुर्वत असिले तरी राहाणे; नाही तरी सुखरूप माघारें आपले सिलींबास जाणे. ऐसे पष्ट बोलोन पुनाजी आपले घरास गुंजवणीयास गेला. त्यावरी महिनापंधरा दिवस जाहलेयावरी सिलीमकर याणी येऊन गुंजवणियास जाऊन पुनाजीस व उभयताच्या बाइकास व मुलास मारामार करून कापून घर लुटून कागद वतनाचे होते ते नेले, आणि घर खाणून जाळिले. तो सवेच मलिकअंबर विजापुराहून पुणियास आले. त्याजकडे हे त्रिवर्ग सिलीमकर जाऊन त्यास आपले तऱ्हेने समजाऊन निमे देशमुखी करून घेतली. त्याजवरी काहीएक दिवसी भिवजी आमचा वडिल बेदराहून थोरले सुपेयास आला. तो इकडील वर्तमान पुनाजीचे आवघेच कळले. मग भिवजीने द्वितीयसमंध केला. त्यास पुत्र दोघे फुलाजी व बाजी ऐसे जाले. आपले मुलाकतीस

आले. तो भिवजी मा तेथेच वारला. मग दादाजी कोंडदेव याचे कारकिर्दीस फुलाजी व बाजी मौजे भिडमावणे निमे ता। म॥ येथें उतरले. तो सिलीमकर आवघे पळोन गेले. त्यावरी फुलाजी नाईक याणे दादाजीपंताकडे जाऊन आपले आवघे वर्तमान विदित केले जे, सिलीमकर याणी माझे वडिलाचा मारा करून माझे वतन घेतले आहे, ते त्यापासून देविले पाहिजे. तेव्हां दादाजीपंतानी सिलीमकर यास बोलाऊन आणून चौकसी केली. माहालो माहालच्या साक्षी पाहिल्या. तो सगळेच वतन हे खरे. तेव्हा दादाजीपंतानी फुलाजीस विचारिले जे, सिलिमकर व तुह्मी ऐसे निमे निमे वतन खाणे. तुमच्या वाटणी करून देतो. तेव्हा फुलाजी ह्मणाला कीं, त्यास सुईच्या आग्रावरील मृतिका देत नाही. तेव्हां दादाजीपंतानी मध्यस्त घालून फुलाजीस कितेक प्रकारचे सांगितले; परंतु फुलाजी ऐकेना. तेव्हां फुलाजीने दादाजीपंताचे न ऐकतां माघारा का केतकवणियास आला. उपरांतिक सिलिमकर याणी दादाजीपंतास गैरवाका समजाऊन लांच दिल्हा. त्यावरून दादाजीपंती सिलिमकर याचे आगत्य धरून फुलाजीस नेऊन बासाचा मार देऊन जीवे मारिले. त्याचे प्रेत माघारे घरास हेमाजी दिघा व कालोजी फदाम घेऊन आले. तो त्याचा भाऊ बाजी याने फुलाजीचे प्रेत पाहून आपणहि आपली जीभ आसडून तोहि मेला. मग दोघाचे सार्थक सेजारी च करून बाजीचा पुत्र आबाजी चौ महिन्याचा होता, तेव्हा फुलाजीचा खानाजाद तुलाजी व मडाजी ऐसे होते त्याणी आबाजीस पळऊन ता। मोसेखोरे येथे मौजे वरसगावास नेले. मागे दादाजीपंती सिलीमकराचा पक्ष धरून आह्मी हाजीर नसता सिलीमकर याणी सांगितले त्याप्रमाणे पत्रं करून दिल्ही आणि वतन जबरदस्तीने खाऊ लागले. त्यास आबाजी वीस पंचवीस वर्षाचा होय तोपर्यंत मौजे वरस गावी तुलाजी व मडाजी खानेजाद याणे तेथे राहून पालग्रहण आबाजीचे केले. त्याजवरी आबाजी आपले उमेदीत आलियावरी ता। म॥ देश-मुखी करावयास आले. तो तेव्हा सिलीमकर याचा बेटवळा फार जमला होता, वाद सांगावा तो आबाजी वाद सांगावयास एकटा व नातवानी होती, तेव्हा काही उपाय नाही. त्याजवरी 'सिलीमकर यास पुसिले की, आह्मास काही वतनाची वृत्ती द्यावयाची आहे किंवा नाही? त्याजवरी सिलीमकर याणी सांगितले की तुह्मी प्रस्तुत पाच गावचा हक व मौजे विरवडी इसापत ऐसी खाऊन राहाणे. त्यास आपण सगळ्या वतनाचा जाबसाल पुसोन वाद सांगावा तो प्रस्तुत वाद सांगा-वयास समर्थ नाही. याजकरिता कामावरी नजर देऊन वतनाचा उपभोग जितका हातास आला तितका अनभऊन घेत आलो. तो इतकियांत पुढे राजक्रांत जाली.

तेसमई आबाजी नाईक मौजे मोहडे खुर्द त॥ हिरडसमावळ येथे भाणोसदरियांत राहिले. त्याजवरी संताजी नाइक बांदल देशमुख त॥ हिरडसमावळ याणी आबाजी नाईक यास वतनाची हकिकत पुसिली. तेव्हा आबाजी नाइकानी वतनाचा मजकूर सांगितला. त्यास संताजी नाईक याणी जाबसाल केला की, तुह्मास नेऊन श्रीमंत कैलासवासी शंकराजी नारायण याजपासी नेऊन भेटविले आणि आबाजी नाईक याचे वतनाची हकीकत जाहीर केली की, त॥ म॥ येथील देशमुखीचे वतन आमचे सगळे असता सिलीमकर याणी मारे करून वतन घेऊन खात आहेत. त्यास साहेबी कृपाळु होऊन माझे वतन देविले पाहिजे. त्यास श्रीमंत साहेब याणी आज्ञा केली जे, तुह्मी आपल्या वतनावरी जाणे आणि जो वतनाचा उपभोग घेत असाल तो घेणे आणि पुढे तुमचा वतनाची चौकसी पाहून चौघा गोतमते निवाडा करून तुमचे वतन तुह्मास देविले जाईल. त्याजवरी राजक्रांत निवारल्यानंतर आबाजी नाईक वीरवाडीस येऊन वतन अनभवू लागले. पुढे आबाजी नाईक याणी सगळ्या वतनाचा वाद सांगावा ऐसे ध्यानात आणिले, तो त्याचा काल जाहाला. तो भिकाजी नाईक याची उमर लहान होती, तेव्हा वाद दाहावीस वरीस जाला नाही, मग वाद अमृतराव याणीं उभा केला श्रीमंत कैलासवासी आनंदराव साहेब याजकडे भांडण भाडत सिलीमकरासी पुणियास गेले. तेव्हा सिलिमकर श्रीमंतापासी बोलिले की, आमचा भाऊ आह्मी आपला घरी समजावितो. त्यास आह्मास घरास घेऊन आले आणि महालचे पाटील जमा करून माहालो माहालचे देशमुख यास बोलाऊ गेले. आणि पंचाईत करून समजाविसी करावी तो माहालचे देशमुख याणी सांगितले त्यास अमृतराव ऐकेनात. सरकारात रागे रागे उठोन जाऊ लागले. त्यास सिलीमकर याणी गुंजणमावळचे पाटील यास मध्यस्ती घातले कीं, तुह्मी सरकारात न जाणे आता आगोटीचे दिवस आले, पाऊस लागला, पंचाइतीस महिनापंधरा दिवस लागतील. त्यास माहालो माहालचे देशमुख यास व पाटिल यास जाणियाची निकड, आगोट नजिक आली. त्याजवरी अमृतराव याणी पाटिलासी उत्तर केले की, चौ महीनीयाचा अवकाश देतो, परंतु कागद लेहून द्यावा की तुमची वतनाची समजाविसी चौ महिन्यानी पंचाईत मेळऊन करितो. त्यास सिलिमकर याणी मान्य करून कागद लेहून दिल्हा कीं, विजयादशमीस तुमचा वाद तोडून तुमचा वतनाचा औंश असेल तो देतो, म्हणून सिक्याचा कागद लेहून दिल्हा. त्याजवरी आमचा वतनाचा उलगडा करून दिल्हा नाही. सबब आम्ही वतनाच्या जसी साहेबापासून करवित आलो. त्याजवरी हाली साहेबी कृपाळ होऊन जेजूरीच्या मुकामी सिलिमकराचा

व आमचा इनसाफ गोतमतें करावयास आज्ञा केली. त्यास सिलिमकराचा व आमचा वतनाचा लढा तोडणार धणी समर्थ आहेत, हा करीणा लेहून दिल्हा सही शके १७१८ नलनाम संवत्सरे भाद्रपद शु॥ २ मु॥ जेजुरी.

छ १ रा॥वल.

---

## लेखांक ३.

### (फारसी मजकूर)

छ इजतमाआब बापूजी हैबतराऊ देसमुख तपे गुंजनमावल अजी रणदुलाखान सलाम बादज सलाम मकसुद अर्दास पाठविली की आपण उमेदवार आहो. जमेती स्वार २० चाकरी करून ऐसे उमेद धरितो. बापूजी पंडित हजीब पाठविले आहेती. कौल मऱ्हामती केले पाहिजे म्हणौउनु. तरी घर तुमचे आहे. अलबता येणे. काही मुलाहिजा न करणे. येथे आलियावरी ल्याख हाल सरंजामी होईल. कौल असे. हुकेरीस मेजवानी बदल जातो तरी छ १ रबिलौवल आम्हा नजिक एणे.

फारसी
तेरीख २७
सफर

---

## लेखांक ४.

तकरीर केली ऐसीजे, आपला मूल पुरुस रुद्राजी नाईक हे पे॥ मुरुमदेऊ ता॥ गुंजनमावळ येथील देशमुखी करीत होते. यावर हजरती अलमपन्हा साहेबी हा मुलक एदिलशाही हैबतखान यासि दिधला. यासि मुलुक जालियाउपर पे॥ किलियावर हवालदार होता तो आपला आजा बाजी हैबतराऊ यासि बोलिला की, पादशाही किला आहे तुह्मी प॥ दिवाण नफर आह्मा किला जधुनु आहे तर तुह्मी मिरासी नफर आहा तर तुह्मी किला राखणे. आह्मी हुजूर जातो. यावर आपला आजा बाजी हैबतराऊ किलेयावर गेला. किलियावर जाताच बाजी हैबतराऊ याचा बाप रुद्राजी नाईक हे ता॥ मजकुरीची देशमुखी करीत होते. यासि बोलले की, आह्मी किलियावर दटौनु आलो आहो याकरिता दिवाण नामजादे होतील याकरिता तुह्मी किलियावर येणे. यासी एक दोनु वेला बोलिले, परत किलेयावर जात नाही. मग बाजी हैबतराऊ खाली येऊनु आपला बाप रुद्राजी नाईकास किलियावर घेउनु गेलियावर किलियासी वेढा हैबतखान याचा नामजादी मीर येउनु बारा मावळीचे देशमुख घेउनु येउनु किलियासी वेढा घातला.

यावर बाजी हैबतराऊ आपला आजा याही हजरतो मलिकअंबर साहेबास लिहिले की, येदीलशाही येउनु कीलियासी वेडा घातला आहे, तर साहेब रजा देतील तर किला त्यास देउनु यावर साहेबी रजा फर्माविली की मुलुक त्यास दिधला आहे तर किला त्याचे हवाले करणे ह्मणौनु रजा फर्माविली. यावर बा॥ रजा मलिक साहेब किला त्याचे हवाले करुनु आपण खाली उतरले. यावर आपले पणजे रुद्राजी नाईक देसमुखी करीत होते. यावर आपला आजा बाजी हैबतराऊ यासी बोलले कीं, आपले ह्मातारपण आहे, तुह्मी देशमुखी चालवीत जाणे. यावर रुद्राजी नाईक पुणियासि येउनु हजरती मीरसाहेबास बोलले की, आपले ह्मातारपण आहे, तरी आपला बेटा वडील बाजी आहे त्याचे हाते देसमुखीचा कारभार घेत जाणे. यावर हजरती मीरसाहेबाचे हुजूर त्यास बोलाउनु देसमुखीचे सिके त्याचे गला घालुनु पाने व लुगडी देउनु कारभार करू लागले. त्यावर हजरती मीरसाहेबी आपला कौल दिधला की, तुवा सुखे देशमुखी करुनु दिवाण नफराई करीत जाणे. यावर हजरती मलिकसाहेबाचा मुलुक मलिक साहेबास जाला. यावर राउतराऊ यासी मुकासा पो गुंजणखोरे दिधले यावर बाबाजी व त्याची आजी तेजाई आवा हे हर दोजणे हुजूर गेलियावर हजरती मलिकसाहेबानजिक उभे राहिलियावर अर्ज केला की, आपला मरद हा बाजी हैबतरायाने मारिला. देसमुखी वरसे १० दाहा खात आहे ह्मणौनु मालूम केले. यावर हजरती म॥ साहेबी त्यासि तलब केलियावर त्यास मालूम जाले की, हुजुरुनु तलब येते. यावर तलब माहाली आली नसता आपला आजा बाजी हैबतराऊ हुजूर गेले. याउपर बाबाजी मजकूर राजश्री राऊतराऊ मुकासी यासी लुसकती दिधली. घोडी १ व फिरंग १ देउनु माहाली येयाची रजा घेउनु माहाली आला. याउपर आपलिया माया २ दोघीजणी व आऊबाई मावळन व चुलते सुऱ्याजीबावा व दमाई आईजी हे माहाली ठेउनु आमचे आजे बाजी नाईक हे हुजूर मलिकापासी गेले होते. यावर बावाजी एउनु माणुसे घरामधोनु बाहेर काडिली व उदंड जाजती करिता तकसीर केली नाही. यावर आपली मावळन आऊबाई होती तिणे आमचा कूली समाचार जो जाला तो त्यास लिहिला की, तुमचे मागे बावाजीने ऐसी ज्याजती केली म्हणौनु तपसिले लिहिले. याउपर आपला आजा बाजी हैबतराऊ याही मलिकापासी जाऊन अर्ज केला कीं, साहेबी नफर मजकुरास तलब केली. हे आइकौनु सेरीकर साहेबाचे बांदगीस आला आणि मागे बावाजी यावरी बाजी मलिका हुजूर उभा राहिला की, माघे मुलालेकरासमान साहेबाची तलब जाहाली ह्मणउनी आइकिताच तलब

माहालासी आली नसता साहेबा हुजूर आलो. यावरी बावाजीने मुलाबाळास हाडा-हाड केलियावरी, मलिकानी राउतराऊ मोकासी त्याचा हेजिब रुद्राजीपंत बोलाविला की, तुह्मी ये कायबदल करिता? यावरी त्या हेजिबाने राउतरायासी आपला हाते रोखा लिहिला की तुह्मी हे कायबदल करिता? बाजीच्या एरिदियास हुजूर तूर्त पाठविजे; नाहीतरी तुज ताकीद होईल. यावरी राउतराऊ माहालासी येऊनी बावा-जीस हुजूर रवाना केलेयावरी मलिकाचे दादनीस बैसोन दोघाचे वादे उभे केले. यावरी हरदो जनाची मनुसिभी पाहून आमचा आजा बाजी नाईक याही खुर्दखत देउनी देसमुखी देऊन रवाना केले. बावाजी मजकुरास दूर केले. बाजी सालासी येऊन देऊन देसमुखी चालऊ लागला. बावाजी बेटा केला होता. तो माघे एक वरीस राहून मालुमातीचे खुर्दखत काढिले. नागोजी भास्कर याने काढून दिल्हे. ते खुर्दखत घेऊन दरबारा बाहीर आले. यावरी आपला बाप कान्होजी हैबतराऊ तेथे होते. त्यानी बावाजीस पदरी धरिले की, तू मालुमातीचे खुर्दखत कैसे नेतो? तुवा आह्मी माग-त्यान वाद सांगावा. यावरी नागोजीने मलिकाचा माहालदार थोताडे आनून याचा पदर सोडविला. मग तो माहालासी आला. यावरी आमचा आजा बाजी हैबतराऊ मागत्यान हुजूर गेले. हुजूर जाताच मुल्ला नबीब यास दिवान बारा मावळे दिल्ही. त्याचा सुभेदार रायाराऊ मुलकाला आले. आपल्या बराबरी बाजी हैबतराऊ घेउनी आले की, तुह्मा पेसजी जो काय निवाडा जाहला असेल तेणेप्रमाणे तुह्मा निवाडा करून. ह्मणउनी घेउनि आले. यावरी बावाजी हि यास भेटला. मग रायाराऊ ह्मणो लागला जे, तुह्मा हरदोजणाची मुनसिभी करितो. याउपरी बालाजीस रजा दिल्ही. यावरी बालाजी नाईक कारबारास ठेवुनि बावाजी पुने घरावरी गेला. यावरी नीलकंठ राऊ यासी व रायाराऊ यासी कलहो लागला. यावरी गडासी वेढा घातला. यावरी मलिक साहेबाच्या खुर्दखतावरून आमच्या वडिलाचे हावाला देसमुखी केली. देसमुखी करिता आपला आजा मेला. यावरी रायाराऊ साहेबी काढिला यावरी मलिक साहेबाचे हवालदार काजी सेक साला येउनी मलिक साहेबासी लेहून या हर-दो जणासी तलब करून बावाजी वा कान्होजी हैबतराऊ आपला बाप हुजूर घेऊन गेले. गेलियावरी आपला बाप वा बावाजी मुनसीभीस उभे केले. दोघानी आपला खुर्त खत पुढे ठेविला. मलिकसाहेबी पुसी केला की, दोही कागद कोन्हाचे? आपले बाप बोलिला जे साहेबाचे कागद आहे. याउपरी बावाजीला पुसिले हा कागद कोणाचा आहे? यानी जबाब दिल्हा की, साहेबाचा कागद आहे. मलिक बोलिला की मलिक दोग की एक? याउपरी कारकुनासी पुसी केली. यावेरी कारकून मजालसी खंडो कृष्ण व नागोजी भास्कर व मजालसी कारकून यास पुसिले. ते बोलिले की मलिक एक

व सिका एक. यावेरी मलिक बोलिले की, अवलका निवाडा आपण केला आहे. हाली आपली अमल चोरोनु मालुमातीचे खुर्दखत करून कोण्ही दिल्हे आहे ? यावेरी कारकून कोण्ही बोलेतीनात. मग मलिकसाहेबास कळों आले की, कारकूनी हा अमल केला. मग खंडो कृष्ण यास ताकीद फर्माविली. मार केला. होनु हजार एक लाविले. व नागोजी भास्करास ताकीद करून दरबार मुतलबा केला. मार केला. टांगेस धरून वोढून टाकिला व बावाजीसहि ताकीद करून मार केला. वोढून टाकून अदबखाना दिल्हे. यावेरी आपल्या आपणासी खुर्दखत देसमुखीचे देउनु माहालास पाठविले. यावेरी देसमुखी करीत होते. यावेरी मलिकसाहेबी सोलापुरास वेढा घातला होता ! तेथें मेले. यावेरी पातशाहीमधे खलेल जाला. यावेरी बावाजी कृष्णाजी बादल याचेथें जाउनुं पुंडावे करून विलायतीत खलेल केले. याउपरी आपले बाप कान्होजी हैबतराऊ हे हुजूर अलमपन्हा पातशाहापासी गेले. तेथें अर्ज केला की, बावाजी बिन हबाजी येणे कारकिर्दी म॥ म॥ मलिकअंबर देसमुखी ब॥ आपणास करकर करून हुजूर आलो यावरी हुजुरून आपणासी मुनसफी करून बाबाजी दूरी करून आपल्यास करार करून हक लाजिमा व इसापती गहदम सालाबाद प्रमाणे दुमाल करून निवाडीयाची खुर्दखते ३ कि॥ खुर्दखत सन इशरैन अलफ बनाम आपला व खु॥ बाजी व किते २ सन अर्बा इशरैन अलफ बनाम आपले कि॥ दिधले आहेती, तेणेप्रमाणे आपण देसमुखी करितो. यावेरी माहाली कारकून फर्मानाचा उजूर करितात. दरींबाब फर्मान सादर होये. मालूम जाले. ब॥ इशारती दिवाणताला कान्होजी हैबतराऊ करीत आहे. देसमुख त॥ गुंजणखोरे यासी वा बाबाजी बिन हबाजी येणे क॥ म॥ म॥ मलिक अंबर देसमुखी ब॥ करकर करीत होता. यावेरी मलिक अजमे हरदो जणाची मुनसुफी करून कान्होजी देसमुख करार करून हकलाजिमा व इसापती गहदम स॥ प्रमाणे देउनु निवाडियाची खु॥ सदरहू दिल्ही तेणेप्रमाणे कदीम अजा जैसे चालिले तेणेप्रमाणे चालवीत जाणे. फर्मान घेउनु माहालास आले. देसमुखी करू लागले. यावेरी बालाजी बांदलांचेथें होते. त्यास कृष्णाजी नाईक बोलिले की ते पातशाहाचे फर्मान यापासी आहेती. दिवाण आपणास ताकिद करितील. तुह्मी येउनु जा ह्मणौनु बावाजीस दवडिले. यावेरी निजामशा मोगलानी नेलेयावेरी बावाजी कोकणांत गेले. जाउनु दावे करू लागले. धाकोजी सरपला मोकदम मौजे सोंडे व कर्जवणाच्या मोकदमाची बाईल ही जिवेच मारिली व डेराचे माहार तोडिले. ऐसे दावे पुंडावियाने केले. ( अपूर्ण )"

---

## लेखांक ५.

१४९८ पौष शुद्ध १०.

"अज रख्तखाने राजश्री अंकुसराऊ राजे गोसावी बजानेब्र् कारकुनानी तपे खेडबारे बिदानद सु॥ सीत सबैन व तिसा मया देसमुखानी तपे मजकूर व इनामती व हकलाजिमा व बाजे इनामती व सेते संभुजी व बाबरोजी व देसकु तपे मजकूर बा॥ भोगवटे तसरफाती वजिरानी कारकिर्दी दर कारकिर्दी पेसजी ता॥ मलिक सर्क मलिक कामन मुलूक चालिले आहे तैसे चालवणे. ऐसी खुर्दखताची रजा होए. मालूम जाहाले देसमुखाची इसाबती व इनामती व हकलाजिमा व बाजे इनामती व सेत संभुजी व बाबरोजी व देसकु तपे मजकूर बा॥ कौल भोगवटे तसरफती ता॥ कारकिर्दी पेसजी वजिरानी चालिले आहे तेणेप्रमाणे चालविजे. असेली खुर्दखत देसमुखापासी असो दीजे. तालिक लिहून घेईजे. मोर्तब.
तेरीख ८ माहे सौवाल सलास."

---

## लेखांक ६.

श्री

"हजरत साहेबाचे

खाने अजम अकरम नवाब

साहेब दाईम दौलतहू

अर्जदास्त अर्ज दर बांदगी सेरीकर महीपाजी हैबतराऊ देशमुख ता॥ गुंजणमावळ बांदगीस अर्ज ता॥ छ ११ जमादिलाव्वल साहेबाचे नेक नजरेकरून सेरीकराची बखैर सलाबत असे.

दर्या साहेबाचे * * * * ता॥ साहेबाचे * * * लक्षीत राहिलो आहो. रावसाहेब ह्मणतील की * * * * * नाहीस तरी पायाची आपले वडिलानी एखतारी धरून खिजमती बहुतच केली; त्यामुळे या राज्यांत आपले वडीलास तलबखाने व कितेक प्रकारे खराबी जाली. आपले दादे हैबतराव तोरणे गडावर बंदखानी कितेक दिवस कुदलो. अखेर खंडदंड देऊन जीवमात्र सुटलो. काही उबर राहिला नाहीं. हाली साहेबाचे बांदगीस कागदपत्र पाठविला नाहीं. तुर्त आपले शरीरीं आजार आहे ह्मणून बांदगीस यावयास अनुकूल पडिले नाहीं. आपले भाऊ बांदगीस आले आहेती. आमचे तख्त ते जागा साहेब आहेती ते आह्मांस जागा आहेती. आपली सर्फराजी करावयासी धणी मायबाप आहेती. बांदगीस रोशन होए हे अर्जदास्त."

---

## लेखांक ७.

१५५९ माघ वद्य ७.

"मसुरल हजरती राजश्री दादाजी कोंडदेऊ सुभेदार
नामजाद व कारकून किले कोंढाणा व माहाला निहाय
देसमुख व देसक

तपे खेडेबारे
देसमुख
तुलजी कानजी

ता॥ मोसेखोर
बालाजी यसवंतराऊ
देसमुख ता॥ म॥
देसक व कुळकर्णी.

बापूजी मुदगल. देसकुलकर्णी.
भानजी नाईक. पासलकर.
बापूजी जीवगण. ता॥ आंबी.
नागोजी नावडिकर. अजहती देसमुख
गोजो सोमनाथ. देसकुलकर्णी ता॥ म॥ बिकलमऊ

ता॥ कानदखोरे
बाबाजी जुझारराऊ देसमुख ता॥ म॥
गोजप्रभु देसकुलकर्णी ता॥ म॥

देसक ता॥ गुंजण मावळ
येसजी व बावजी मोकदम मौजे वागिणी
होमाजी मोकदम मौजे–

सोनजी मोकदम. कोलवडी.
तुलाजी मोकदम. मौजे जांबुली.
गवाजी व रामाजी अ॥ देसकुलकर्णी ता॥ म॥
बालाजी जनार्दन. खासनिस

सु॥ समान सलासीन अलफ कारणे हजीर मजालसी महजर केला ऐसा जे, बाहूजी बिन कान्होजी हैबतराऊ व हबाजी बिन बाबाजी हैबतराऊ, व बाळाजी बिन रुद्राजी हे ता॥ गुंजण मावलाचे देशमुखीबदल भांडत होते. यावरी साहेब व गोत मिलोनु येणेप्रमाणे निवाड केला. बालोजी मूळपुरुष. त्यासी दोग पुत्र. वडिलाचे नांव हउजी हैबतराऊ आण धाकटा रुद्राजी. यावरी बालोजी वडिल देसमुखी करीत होता. तो मेलियावरी हऊजी हैबतराऊ वडिल पुत्र तो देसमुखी करू निघाला. तो हऊजी हैबतराऊ पुणा हवालदारी मारिला! हउजी हैबतराऊ मारिले यावरी बाळाजी बिन हऊजी हैबतराऊ तो देसमुखी करू

लागला. त्यावरी कोंडे देशमुख ता॥ खेडेबारे त्यासि झगडावयासी आला. तो झगडा पडिला. त्यावरी त्याची माय सीताई दुखे दादलाहि पडिला व लेकहि पडिला या दुगे आगी निघो लागली. मग तिचा दीर रुद्राजी तो ह्मणौ लागला जे, बाई तू आगी निघो नको. आपले दोघे लेक आहेती. वडिल बाजी धाकटा हउजी हैबतराऊ लेक हा तुज तूते दिधला आहे. सुखे तू देसमुखी चालउनु असंण. यावरी हउजी हैब्रतराऊ देशमुख ह्मणौनु त्याचे नाव ठेउनु सकल कारबार रुद्राजी करीत आहेती. यावरी रुद्राजीची बाईल मेलियावरी दुसरी धाकटी बाईल रुद्राजीस होती तीस बालाजी पुत्र जाला. सीताईस पुत्र दिधला तो देखील रुद्राजीचे तिघे पुत्र सीताईस हऊजी हैबतराऊ देसमुखीचे नाव ठेऊनु दिधला होता. तो गोत्रजी मारिला. त्यासी बाबाजी हैबतराऊ लेक होता. तो बाबाजीमधे व रुद्राजीचा वडिल लेक बाजी त्या त्या मधें देसमुखीची करकर लागली. बाजी ह्मणो लागला जे, आपण रुद्राजीचा वडिल पुत्र असतां, तुज देसमुखीची निसबती नसतां, तू देसमुखी चालवावयासी कोण? असे ह्मणौनु रुद्राजी जिता असता बाजीने रुद्राजीपासूनु सिका घेउनु देसमुखी आपण चालऊ लागला. बाजीने देसमुखी केली. बाजी मेलियावरी बाजीचा लेक कान्होजीने देसमुखी केली. पर याचा निवाडा जाला नाहीं. करकर याची दिवाणामध्यें व गोतांत होतच असे. बाबाजी मालुमातीची खुर्दखते आणि दर देसमुखीचा निवाडा जाला नाहीं. कान्होजी देसमुखी करीतच असे. यावरी बाबाजी मुरुंबदेवी झगडा पडिला व कान्होजी कोंढाणा सिर्दीने मारिला. यावरी कारकिर्दी घोरपडे तिही ता॥ मा॥ चे गावाचे तकसिमा च्यारी केलिया. पैकी बाहुजी बिन कान्होजी हैबतराऊ यासी वडिलपणाची तकसिम एक व वाटियाची एक तकसिम एकून तकसिमा २ गाव निमे दिधले. तकसिमा दोन उरलिया, त्यांत एक तकसिमा बाबाजी हैबतराऊ एक तकसिम १ व बालाजी नाइकास एक तकसिम ऐसा दोनी तकसिमा गाव निमे दोघास दिल्हे. गाऊ समीन निमीन पाहोनु वाटिले नव्हते व कागदहि केला नव्हता व नांगराचा निवाडा जाला नव्हता. याकरिता करकरींतच आहेती. याकरिता तपाहि लागला नव्हता. मग हाली हे आणौनु याचा याचा येणेप्रमाणें निवाडा केला. अज देह देखील मजरे व इनामती देह ८१ एकीयासी व मजरे २ गावाचे गावाखाले लिहिले आहेती. याकरिता देह येकीयासीच ता॥ बालाजी मूलपुरुष त्याचा धाकटा भाऊ चाहूजी त्याचे बुडीच फुलाजी व बाजी त्यासी समाईक देह पैकी देह देखील इनाम ५ तपसिलः—

| | |
|---|---|
| १ मौजे कतकवणे देह १ ता॥ | १ हतवे बु॥ |
| ·॥· निमे इनाम | १ हतवे खुर्द |
| ·॥· निमे देसमुखीचा हक | १ निधान |
| १ निमे गाव | १ सांगवी खुर्द |
| १ | ४ |

येथील निमे गाव इनाम व साडेच्यारी गाव देशमुखीच्ये. येथील इनाम व देसमुखीचा कुल हकलाजिमा हेहि खावा. बालाजी हैबतराऊ व हबाजी हैबतराऊ व बालाजी यासि काही या गावाच्या हकलाजिमे यास व इनामतीस काही समंध नाही. रुद्राजीचा भाऊ भिऊजी त्याचे वंसीचा तुलाजी व साऊजी त्यासि एक गाव मौजे कोदलवडी हेही तेथील देसमुखीचा हक कुल दिधला असे. त्याणे तो गाव खाउनु सुखी असणे. बाकी देह १५ राहिले तपसिल;–

| हकलाजिमाचे देह | इनाम देह |
|---|---|
| ११ | ४ |

याची वाटणी ब॥ कारकिर्दी घोरपडे गावाच्या तकसिमा च्यारी केल्या होत्या. पैकी बाळुजी बिन कान्होजी हैबतराऊ वडिलपणाची एक तकसिम व वाटियाची एक तकसिम एकून तकसिमा २ गाव निमे दिधले. ता॥ २ उरलिया त्यांत एक हबाजी हैबतराऊ एक १ बालाजी नाईक ऐसे ता॥ २ गाव दोघास दिल्हे. येणेप्रमाणे तकसिमा केलिया होति. यापरी गाव नेमून वाटिले नव्हते. हाली येणेप्रमाणे वाटिले. तपसिलः–

तरफ बाऊजी बिन कान्होजी हैबतराऊ

इनाम देह

१ पाली बु॥

·॥· चिंचले खुर्द निमे

·॥· कुरगोडी निमे उण सेते टके ५० आहे.

२

या खेरीज सेते इनाम ३ आहेती ती दोठाई व विस्वाघाट निमे

तरफ हबाजी बिन बाबाजी हैबतराऊ व बालाजी बिन रुद्राजी हे दोघे तकसिमदार याचे दोघाचे दोनी तकसिमा याचे गाव.

इनामती देह

१ बोपे

·॥· कुरगोंडी निमे फाजिल सेते टके ५०

·॥· चिंचले खुर्द

२

या खेरीज सेते ३ इनाम आहेती ती दो ठाई व विस्वा निमे.

हकलाजिमेयाचे देह

| | |
|---|---|
| १ कासुर्डी | १ दिडधर |
| १ मोहरी बु॥ | १ सांगवी बु॥ |
| .॥. वागिणी निमे | .॥. जांबली निमे |
| १ ताभाड | १ चिंचले बु॥ |
| १ सोंडे सरफला | १ सोनवडी |
| १ सोंडे हिरो | १ सोंडे माथणा |
| १ सुरवाड | १ आडउली |
| १ असकवडी | १ मेरवणे |
| १ चिरमोडी | १ घावर |
| १ लव्ही खु॥ | १ लव्ही बु॥ |
| १ पाली बु॥ | १ वाजेघर खु॥ |
| १ गुगुलसी | १ एकलगौ |
| १ पिसवी | १ वरोती बु॥ |
| .॥. कर्णवडी निमे | १ माजगौ |
| १ केळद | १ चांदवणे |
| १ डेरे | १ भुतोंडे |
| १ भांडरवली | १ कामेरे बु॥ |
| १ मळ | .॥. बोराळे निमे |
| .॥. अंबवणे निम | १ गुंजवणे |
| १७॥ | १८ |
| | १७॥ |
| | ३५॥ |

हकलाजिमाचे देह

| | |
|---|---|
| १ वेलवडी | .॥. जांबली नीम |
| १ कोलवडी | १ पारवडी दे॥ म- |
| .॥. वागिणी निमे | जरा आंबेदरी |
| १ केतकवणे दे॥ | १ कर्जवणे |
| मजरा इसानदेऊ | १ कामर खुर्द |
| १ मांगदरी | १ निगुडे खु॥ |
| १ देउगौ | १ सोंडे कारला |
| १ इसान देऊ | १ आसनी मणजा |
| १ भागिनघर | १ आसनी दामगुडा |
| १ साखर | १ पिपरी |
| १ फणसी | १ |
| १ वाजेघर बु॥ | १ हरपुर |
| १ पांगारी | १ भोर्डी |
| १ सिंगापूर | १ वरोती खु॥ |
| .॥. कर्णवडी निम | १ निगुडे बु॥ |
| १ खुलसी | १ गुहिनी |
| १ बालवडी | १ कुरंजी |
| १ कुंबळ | १ बोराळे नीम |
| १ मोहरी खु॥ | १ आसनी मार्ग |
| .॥. आंबोण निम | १ पाली |
| १७॥ | |

एणेप्रमाणे बाउजी बिन कान्होजी हैबतराऊ येणे आपली देसमुखीची तरफ खावी. दुसरी तरफ हबाजी हैबतराऊ बिन बाबाजी हैबतराऊ व बालाजी बिन रुद्राजी या दोघीजण देसमुखीची एकीतरफ खावी. नागर बाउजीने आपले तरफेस करावा दुसरा नागर हबाजी बिन बाबाजी हैबतराऊ याणी आपली ता। व बालाजीची तकसीम दोन्ही तकसिमा मिळोनु एक तरफ केली आहे, ते तरफेस बाबाजीने करावा. पाने लुगडी दिवाणातुनु अनावा. हरएक जागाहुनु देतील ती आधी बाऊजी बिन कान्होजी हैबतराऊ याणे घ्यावी. याउपरी हबाजी बिन

बाबाजी हैबतराऊ याणे घ्यावी. त्याउपरी बालाजी बिन रुद्राजी त्याणे घ्यावी. या तिघाजणासी पाने लुगडी उलीने देतील ते उलीस फुलाजीस व बाजीस यासि पाने लुगडी द्यावयासी समंधु नाही. देसकास जेधवा पाने लुगडी देतील तें उलीस आधी फुलाजीस व बाजीस द्यावी. त्यामागून खोतासी व मोकदमासी द्यावी. तरफा आपलालेया लावाविया. येरयेराचे तरफेस कांहीं निसबती नाही व पटीहि दुमाल करणे पडले तरी दोनी तरफा लिहिणे आणि दफाती ह्मणौनु फुलाजी व बाजीचे गाव ल्याहावे. सदरी लिहिले आहेती ते व तुलजी व साऊजीचा गाव ऐसे ल्याहावे. एणेप्रमाणे आपले तरफाचे गाव लाउनु सुखे निवडिलेप्रमाणे वर्तणूक करणे. एणेप्रमाणे लेकराचे लेकुरी खाउनु सुखी असणे. निवडिलिया कामास जो कोण्ही हिलाहरकती करील त्याणे दिवाणांत पाच सिसे व पाच हजार होनु देणे. व मिरासी वेगला हक हजर सही मोर्तब सुद. पेसजीचे जे कागद ज्यापासी असेतील ते रद असेती. मोर्तब सुद. पेसजीचे कागद बाप-भावकीचे भाउपणाचे असतील ते रद असेती मोर्तब सुद. फारसी
तेरीख २० माहे रमजान"
रमजानु

---

## लेखांक ८.

"फर्मान बमय मुनशरफ सदुरयाफत के विठोजी हैबतराऊ देसाई किले सुरंबगड आंके अज शहूर सन सी व अलिफ दरींविला सैद अबदुला बिन सैद महमद देसाई किले रोहिडे बदरगाह ज्याहापनाह इलतमास केली कीं मुलक निजामशाह व बाजे विलायत सिवा मलाऊननामे आपल्या दरकबजेंत आणून दस्त दराजी करितो, तर आपण मिरासदार कदीमी नजर येनायत फर्माउनि इनामात व दस्तुर देसाई मा॥रास सरफराज करून कौल येनायत फर्माविला पाहिजे कीं जमियत शायस्ता पैदा करून सिवा मलउंनाने मुलक काबीज केला आहे तो दर कबज पातशाहजीच्या आणिल त्यावरून खातीर सुबारकेस आणौन इनाम वगैरा दस्तुर बित॥ जे

| | | |
|---|---|---|
| मौजे तांभोरे १ | मौजे जांबली १ | मौजे हाटवे १ |
| मौजे मोहरी १ | वगैरे | |

व बाजे किले मजकूर बमोजीव कबिला अवलाद व अफलाद भोकरर मरहमत फर्माउनु कौल दिधला आहे, तरी हरभांतेनें खातीरजमा जाणौन कितेक जमियत पैदा करून विलायत जे कांही मलाऊन कबज केली आहे ते दर कबज बुलंद

१०. शाबुदीखान हवालदार

११ अगा रजा

१२ बालेखान दिवाण मजालसी

शिवाजी महाराजांस राज्यभिषेक होण्यापूर्वी ३० तीस वर्षें मराठ्यांचा अंमल दाभोळास झाला. तेव्हांपासून राज्याभिषेक झाल्यावर शके १६०३ रौद्र संवत्सर पावेतों आठ अंमलदार झाले तेः—

१ राघो बल्लाळ अत्रे

२ राघो वासुदेव

३ अंताजी रंगनाथ

४ रामाजी अनंत सरसुभेदार

५ महादाजी अनंत

६ बहिरोजीबावा सरसुभेदार

७ महादाजी बल्लाळ खरित

८ आबाजी महादेव

पुढें संभाजी व राजाराम महाराज आणि धाकटे शिवाजी महाराज व आईसाहेब (ताराबाई) ह्यांच्या कार्किर्दीत ९ अंमलदार झाले तेः—

१ विठ्ठल गोपाळ

२ गंगाजी दादाजी सरसुभेदार

३ रुद्राजी अनंत. (राजाराम* व आईसाहेब यांचे कार्किर्दीत.)

४ महादाजी बल्लाळ

५ कासी रंगनाथ

६ शिवाजी त्रिंबक

७ कृष्णाजी परशराम

८ महादाजी राम

९ बापुजी आबाजी

याप्रमाणें मराठी अंमलांत १७ अंमलदार झाले. पुढें दाभोळ उजाड जाहाली त्यामुळें तालुक्याचा तालुक्याकडे कारभार वहिवाट चालत आली.

* "राजाराम व आईसाहेब यांचे कार्किर्दीत" ह्या शब्दांत कांहीं विशेष अर्थाचा भास होतो. राजाराम जिंजीकडे असतां, इकडे महाराष्ट्रांत रामचंद्रपंत आमात्य मुखत्यारीनें सर्व व्यवस्था करीत असे. तथापि त्या वेळीं ताराबाई ही आपल्या मर्जीप्रमाणें त्यास वागावयास लावी व अनेक वेळीं तिची मसलत त्यास घ्यावी लागे. तात्पर्य, महाराष्ट्रांत राजारामाच्या ऐवजीं ती कारभार पाही. ह्मणून "राजाराम व आईसाहेब यांचे कार्किर्दीत" असें सदर यादींत लिहिलेलें दिसतें.

## २२. करवीरच्या मोर्च्यांस सामान.

परशराम रामचंद्र ऊर्फ परशुरामभाऊ पटवर्धन ह्यांनीं इ. स. १७९४ मध्यें करवीरास वेढा घातला होता. त्या प्रसंगीं तेथें मोर्चे लावण्यासाठीं काय सामान लागलें, त्याची एक यादी उपलब्ध झाली आहे. तिचा कांहीं भाग फाटला आहे, तथापि ती बरीच मनोरंजक आहे ह्मणून येथें दिली आहेः-

### श्रीगणपती.

[कृ. वि. आचार्य.]

"आज स्वारी राजश्री परशराम रामचंद्र ता मोकदम मौजे इंगळी प्रा रायबाग सु॥ अर्बा तिसैन मया व अलफ. करवीरच्या मोर्चास सामान बितपशील वजनी वजन पक्के व सुमारी सुमार.

| लोखंडी दागिने | लाकडी दागिने |
|---|---|
| १०० खोरीं | १००० कणगी थोर |
| (फाटलें) कुदळ्या | ५००० पाट्या बाबळीच्या फोकाच्या |
| (फाटलें) कुराडी | १०० तख्ते |
| (फाटलें)— | २५ शिड्या वेळूच्या लोखंडी पट्या व खिळे मारून |
| (फाटलें)—सुरगा | |
| (फाटलें)— | |
| (फाटलें)—तासण्या | |
| २९५ | ६१२५ |

| वजनी वजन | गाडे सेर वहावयास बैलसुद्धा |
|---|---|
| ·॥२ सूत | २० सुमार |
| ·।· अंबाडी | बेगारी पोटाची बेगमी करून सुमार |
| ०४ अंबाडीचे रसे | १० सुतार |
| ०४ रुई | १५० माणसें |
| ०३ चिथडे | |
| १।३ | १६० |

एकूण वजनी सवाखंडी तीनमण व लोखंडी दोनशें पंचाण्णव व लाकडी साहा हजार एकशें पंचवीस व गाडे वीस व बेगारी एकशे साठ येणेंप्रमाणें पाठविलें आहे. तर हाली लोक दि॥ हाय पा आहेत, याजबराबर जलदीनें घेऊन हुजूर येणें. जाणिजे छ २४ रज्जब."

✠ ✠ ✠

# २३. दुसऱ्या बाजीराव पेशव्यांचा त्रिंबकजी डेंगळ्यास धरण्याबद्दल जाहीरनामा.

श्रीमंत दुसरे बाजीराव पेशवे ह्यांचा मुख्य प्रधान व मंत्री त्रिंबकजी डेंगळे ह्यानें कंपनी इंग्रेज बहादराच्या विरुद्ध राजकारस्थानें रचिलीं व गायकवाडांचे वकील गंगाधरशास्त्री पटवर्धन ह्यांचा खून केला वगैरे कारणांस्तव, इंग्रजांचे पुणें येथील रेसिडेंट सर मौंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन ह्यांनीं त्यास कैद केलें व ठाणें येथील किल्ल्यांत ठेविलें. तेथून त्रिंबकजी पळून गेला. त्या वेळीं इंग्रेजांनीं बाजीराव साहेबांस त्रिंबकजीस पकडून देण्याबद्दल तगादा लाविला. ह्या वेळीं त्यांनीं पुढें लिहिलेला जाहिरनामा सर्व किल्लेदारांकडे पाठविला. त्याची एक प्रत उपलब्ध झाली आहे. ती अपूर्ण आहे, तरी महत्त्वाची आहे ह्मणून येथें दिली आहेः—

श्री.

६५

[कृ. वि. आचार्य]

"राजश्री यमाजी मानकर गोसावी यांस

छ अखंडितलक्ष्मी अलंकृत राजमान्य स्ने॥ बाजीराव रघुनाथ प्रधान आशीर्वाद सु॥ सबा अशरमयातैन व अलफ. तुह्मांकडे फोबारागांव नांदूर एथील मामलत आहे, त्यास त्रिंबकजी डेंगळा कंपनी इंग्रेजबहादूर यांचे कैदेंतून पळोन बंड करीत फिरतो. त्याची चौकशी गावगन्ना करून, डेंगळा मजकूर याचें ठिकाण लावून, जिवंत अगर मेला सरकारांत हवाला करून देईल, त्याजला बक्षीस दोन लक्ष रुपये व हजार रुपयांचा गांव इनाम, इंग्रज बहादर यांच्या विद्यमानें दिल्हा जाईल. याप्रमाणें खातरजमा राखोन सरकारचाकरी करून दाखवावी. त्याची पुरती चौकशी करून, जो त्रिंबकजी धरून आणून देईल, त्याजवर सरकारची सर्फराजी होईल. येविशीं कोणी अनमान करील त्याजवर सरकारची इतराजी होईल.

समस्त गरीब रयत ब्राह्मण व मराठे व परदेशी व मुसलमान व वाणी उदमी व बेरड भिल्ल व मांग रामोशी व रहदार वगैरे जे कोणी त्रिंबकजी डेंगळ्याचा पत्ता अमुक जाग्यावर आहे असा प्रत्यक्ष सरकारांत दाखवून देतील, त्यास पांच हजार रुपये बक्षीस व एक चाहूर जमीन इनाम इंग्रज बाहादूर यांचे विद्यमानें पावेल. डेंगळामजकूर याचा पत्ता ठाऊक असोन, जर कोणी समजविण्यास आळस केला असें विदित जाहलें, तर त्याचें पारिपत्य होईल. त्रिंबकजी डेंगळा बंडवाला याच्या मिलाफी असामी बि॥

| | |
|---|---|
| १ बापू गायकवाड | १ अप्पाजी कुरबावीकर |
| १ भागोजी | १ निंबाजी यादव फलटणकर |
| १ रविराव शिंदे लोणीकर | १ महिपतराव डेंगळा |
| १ तिमाप्पा वडारी | १ बापू बरडकर |
| १ महादाजीपंत नातेपोतेकर | १ दाजी डफळे |
| १ गोधाजी डेंगळा | |
| १ सयाजी मुळे | |
| ७ | ५ |

१२

टीपः—ह्यापुढील कागद फाटला आहे.

❀ ❀ ❀

## २४. गायकवाडींतील शिलेदार पथकाचा तैनात-जाबता.

गायकवाडीमध्यें शिलेदार पथकाची तैनात जाबता कसा असे त्याचा एक मासला आमचे मित्र रावबहादूर बाळकृष्ण आत्माराम गुप्ते मु० कलकत्ता ह्यांनीं पाठविला आहे. तो संग्राह्य असल्यावरून येथें दिला आहे.

श्रीम्हाळसाकांत.

(नक्कल)

"तैनात जाबता जदीद शिलेदार पथक व्यंकटराव भैरव सुना खमस तिसेन मया व अलफ. बोली बारमाही नक्की शिरस्ता.

रुपये.

५५०० खासा मशारनिल्हे आसामी १
- ४००० ऐन तैनात.
- १००० पालखी.
- ५०० शागीर्दपेशा.
- ५५००

७५०० खासे आसामदार अ॥ १० दर.
- २००० प्रत खासे अ॥ २ दर १००० प्रमाणें.
  - १७०० ऐन तैनात.
  - ३०० शागीर्दपेशा.
  - २०००
- ३४०० प्रत खासे अ॥ ४ दर ८५० प्रमाणें.
- २१०० प्रत खासे अ॥ ४ दर ५२५ प्रमाणें.
- ७५०० अ॥ १०

| | | |
|---|---|---|
| ६००० | करवल अ॥ २० दर ३०० प्रमाणें. | रु॥ |
| ३८५० | भालेकरी अ॥ १४ दर २१५ प्रमाणें. | रु॥ |
| १२५०० | स्वार अ॥ ५० दर २५० प्रमाणें. | रु॥ |
| २६५० | कारकून अ॥ व दिवाण अ॥ ५ | |

१२५० दिवाण.

१००० ऐन तैनात.

२५० शागीर्दपेशा.

१२५०

१४०० कारकून अ॥ ४ दर ३५० प्रमाणें.

२६५०

९६ ढाले अ॥ २ दरमहा रु॥ ८ प्रमाणें. आकार रु ॥ ९ अ॥ १०२

३८०९६

एकूण असामी ढालेसुद्धां ऐकसे दोन, यासी तैनात बारमाही नकी शिरस्ता रुपये अडतीस हजार शाहाणव, पैकीं वजा जाणें बटा व दरबारखर्च वगैरे वजा होऊन, बाकी राहील त्याचे जाहले दिवसांचे कबूल होईल. रोजमुरा शाईप्रमाणें पावेल. असामदार व स्वार हजरीस कमी आल्यासी शेरा सरासरी कमी पडेल. चाकरी सरकारआज्ञा होईल तिकडे करावी. मल्हत मिळोन हंगामा करूं नये. दरबारी ज्याचे त्याचे कारकुनांनीं येऊन जाबसाल करावा. लढाईत निशाणापुढें घोडा पडेल, त्याचा दाखला पाहून पंचाचे सईनें किंमत ठरेल ती घ्यावी. लढाई नगारा निशाणा नोबत हत्ती पालखी खजीना तोफा व शिलकी दागिने सांपडतील ते सरकारदाखल करावे. हजिरीस आमचे घोडे तिनशावर व स्वारांचे शंभरावरी लागेल. चाकरी इमानेंइतबारें करावी. मागील तलबेविषयीं बोलों नये. हजिरीची तारीख चालू होईल. करार मोर्तब सुद. तेरीख छ २३ ज॥ वल पौष मास. मु॥ क॥ पुणें.

पोषाख सनगें.

३ खाशास.

१ कारकुनास.

४

पो चार करार.*

❧ ❧ ❧

* नकलेवरून नक्कल केली. मिति श्रावण व॥ १ बुधवार शके १८३४ संवत १९६८ इसवी सन १९१२ तारीख २८ माहे आगष्ट बडोदें ( गुजरात ).

रामराव नारायण प्रधान विळेकर.

# २५. मुंबईचीं बातमीपत्रें.

## लेखांक १.

### श्री.

"सेवेसी भिकाजी जिवाजी व कृष्णाजी नारायण कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. ताा छ ६ रजबपावेतों मु॥ मुंबई येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः—सरकारचें आज्ञापत्र व इंग्रेजांचे पत्रांची थैली पाठविली ती छ ३ रज्जबीं पावली. थैली इंग्रेजांस पावती केली. आज्ञापत्रीं आज्ञा जे, "तुह्मीं विनंतिपत्र पाठविलें तें पावलें व वर्तमान सर्व कळलें. त्याचे उत्तराची आज्ञा राजश्री आनंदराव जिवाजी यांस केली. त्यांणीं तुह्मांस लिहिलें आहे त्याजवरून कळेल. त्याजप्रमाणें तुह्मीं जाबसाल करणें" ह्मणोन आज्ञा. त्यास, राजश्री आनंदराव जिवाजी यांणीं लिहिलें कीं, बंगाल्याहून पत्रें आलीं. त्याच्या नकला तुह्मांकडे पाठविल्या. त्यांतील मजकूर तुह्मीं लिहिला तसा नव्हे. त्या पारसी पत्राचा अन्वय येणेंप्रमाणें आहे जेः-मुंबईवाल्यांनीं पादशाहांचा व बंगालेवाल्यांचा हुकूम नसतां, रघुनाथरावांची मदत करून, राव पंतप्रधान यांसीं खलेल केली ह्मणोन मुंबईहून पत्रें आलीं. त्यावरून कळलें. मुंबईस पुणें पेशव्यांचें संस्थान नजीक. याजकरितां हरकत नसावी. सबब मुंबईवाल्यांस लिहिलें आहे कीं, तुह्मीं आपली फौज रघुनाथराव याजवळून घेऊन येणें, व आपण मराठे सरदारास ताकीद करावी जे, लढाई महकूब होय. पहिला तह आहे त्याचाच पक्केपणा व्हावा. यास्तव आपणाकडे कोणी गृहस्थ या कामाचे मजबुतीस पाठविणार होतों; परंतु आपल्या पत्राचा जाब यावा, याजकरितां महकूब केला असे. उभयपक्षीं स्नेह असल्यानें उत्तम. याप्रमाणें बंगाल्याचे पत्राचा भाव आहे. त्या पत्राप्रमाणें त्यांणीं आपल्या फौजा श्रीमंतांजवळ आहेत त्या आणाव्या; सुदामतस्नेह चालत आला आहे, त्याप्रमाणें चालवावा; त्या अर्थी सरकारचा अंमल सुदामतपैकीं त्यांणीं दाबिला आहे तो सोडावा; असें असतां तुह्मीं लिहिलें कीं, आजपावेतों ठाणें व मुलूख घेतला आहे, तो आमचा अंमल आह्मी करूं, असें ते ह्मणतात. ह्मणून लिहिलें. तेव्हां बंगालेवाल्याचे पत्राचा मसुदा पारसी करून पाठविला. त्याचा अर्थ तुह्मांस त्यांणीं कळविला नाहीं. तर सरकारचा अंमल सुदामतप्रमाणें सोडून यावा व श्रीमंताजवळील फौजा माघाऱ्या बोलावून घ्याव्या, हें उत्तम. मग सरकारच्या फौजा खलेल करणार नाहीं ह्मणोन लिहिलें. त्यास, पेशजीं सरकारचें पत्र इंग्रेजांस हिंदवी होतें तें आह्मीं वाचिलें. त्यांतही हल्लीं लिहिल्याप्रमाणें अन्वय होता. त्यावरून आह्मी त्यांसीं बोलिलों. परंतु त्यांणीं सांगितलें जे, आजपावेतों आह्मांकडे ठाणीं व मुलूख आहे, तो तह होई तोंपावेतों तसाच असेल. तह जाल्यानंतर तहाप्रमाणें घ्यावें यावें. याप्रमाणें बोलिले. त्याप्रमाणें पेशजीं उत्तर लिहिलें होतें; व हल्लींचें लिहिल्यावरून आह्मी त्यांस बोलिलों जे, बंगालियाचे पारसी पत्रांत आमचा अंमल सोडावा असें असतां तुह्मी सोडीत नाहीं, व फौजाही आपल्या माघाऱ्या आणीत नाहीं, हें ठीक नव्हे. आमचा अंमल सोडीत नाहीं व फौजाही आणवीत नाहीं, असें आह्मांस साफ जाबसाल सांगणें. त्याप्रमाणें बंगाल्यास आह्मीं लिहून पाठवूं. त्यास त्यांणीं जाबसाल केला कीं, तुह्मीं आह्मांवर दोष ठेऊं

नका. बंगाल्याचे पत्राच्या नकला तुह्मींच लिहून पाठविल्या. त्यांत काय आहे कीं, लढाई मना व फौजा माघाऱ्या आणावें असें आहे. अंमल सोडणें असें नाहीं. त्यास फौजांस ताकीद केली कीं, लढाई महकूब! फौजा ठिकाणीं आहेत. तेथेंच कां ह्मणाल, तरी पाऊस भारी, तोफा चालत नाहीं, सबब तेथें आहेत. पाऊस उघडल्यावर तेथें राहणार नाहींत. येविशीं दिक्कत चित्तांत धरूं नये. खामखाय येतील. व मुलूख सोडणें असें लिहिलें असतें, तर आह्मीं मुलूख व ठाणीं तेच समयीं तुमचे स्वाधीन केलीं असतीं. अद्यापि हुकूम आल्यास उत्तम आहे. पत्र येतांच सोडून देऊं. दिकत पडणार नाहीं. ऐसें बोलिलें. व आह्मी बोलिलों जे, तुमच्या फौजा येतील ते समयीं श्रीमंतही येतील. त्यास त्यांणीं सांगितले जे, ते कांहीं आमचे बंदीवान नाहींत. त्यांचे खुशीस आले तर येतील. नाहींतर त्यांचे मर्जीस येईल तिकडे जातील. अगर तेथेंच राहतील. तथापि आमचें पत्र आठां चौ रोजीं भडोजेहून येतील. त्यांत कांहीं मजकूर पाहावयाचा (?) असला तरी तुह्मांस सांगूं. आणि येथें गुणगुण आहे कीं, शिंद्यांचीं पत्रें भडोचेहून येथें आलीं आहेत. व नबाब निजामअली यांजकडीलही पत्रें सुरतेस गेलीं आहेत. असें वर्तमान ऐकलियांत आलीं आहेत. व बंदीविषयीं फार करून बोलतात जे, बंदी सोडावी. परंतु आह्मीं साफ सांगितलें जे, आमचीं ठाणीं आल्याबिना बंदी सुटणार नाहीं. त्यास, ते बोलिले जे, कासीद जासूद आमचे येतील जातील, त्यांस मनाई नसावी. ह्मणोन सांगितलें. त्यास आह्मीं ह्मटलें कीं, तुमची चिठ्ठी घेऊन जावी. खाडीकिनारीं जो लागदार असेल, त्यास रुजू होऊन जावें. तिकडून येतेवेळेस रुजू होऊन यावें. चोरून गेला आला आणि सांपडला तरी मारितील. ह्याप्रमाणें सांगितलें. तरी याअन्वयें कोंकणपट्टीचे लागदार यासही ताकीद असावी जे, इंग्रेजाची चिठ्ठी घेऊन माणूस येईल जाईल, त्यास मना न करणें. ह्मणोन पत्रें अंमलदारांकडे पाठवावयासी आज्ञा करावी. राघोजी आंगरे यांजकडील बंदरची बंदी विनासरकारचा कारकून अगर खिजमतगार बसल्याविना होत नाहीं. आमदरफ्ती फार आहे. भात तीस रुपये मुडा होतें ते वीस रुपयांनीं जालें. कां कीं, रेवासचे वाटेनें भात व तांदुळ दररोज गलबतें येतात. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

## लेखांक २.

### श्री.

"सेवेसीं विज्ञापना. ता। छ २६ माहे रज्जबपावेतों मु।। मुंबई येथें सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः–छ १२ रज्जबचें आज्ञापत्र आलें तें २० रज्जबीं सादर जाहालें. तेथें आज्ञा कीं, "तुह्मीं पत्रें पाठविलीं तीं पावलीं. त्याचीं उत्तरें राजश्री आनंदराव जिवाजी यांणीं लिहिलें जे, तेथील अधिकारी बंगाल्याचे वकील आल्यापूर्वी तह करितात कीं करीत नाहींत, त्याचा शोध करून लिहिणें. व बंगाल्याचें पत्र आलें, त्यांत असें लिहिलें आहे कीं, तुमच्या जागा आहेत. त्यावर मराठे चालून आले तर लढाई करावी. नाहींतर करूं नये. यांत आमचीं ठाणीं व मुलूख दाबला असेल तो तसाच असावा, असें कोठें आहे? व पातशाहाचा व बंगालेवाल्याचा हुकूम नसतांही गोष्ट केली. याजकरितां फौजा माघारा आणाव्या, अशी ताकीद केली. तेव्हां यांत ठाणीं व मुलूख दाबला आहे तो तसाच असावा, असा अर्थ होतो कीं काय? व त्याच

पत्रांत दाइम सलूख आहे. त्यास मजबुती करतांकरितां येथून कोण्ही पाठविणार याचाही अर्थ ठाणीं व मुलूख आहेत अशीं असावीं, असा अर्थ होतो कीं काय? असें असतां तें काय लिहिलें आहे." ह्मणून ह्मणतात. त्यास, तुह्मीं त्याच पत्रांतील अर्थ धरून बोलावें. व इंग्रेजांनीं आपली फौज माघारी आणविली, तेव्हां श्रीमंत तेथें सरकार अंमलांस उपद्रव करितील, याजकरितां तिकडील मुलुखाचे बंदोबस्तास आह्मांस फौज पाठविणें जरूर ह्मणून बोलावें. त्यांचीं उत्तरें करतील तीं लिहून पाठविणें. सारांश, बंगालेवाल्याचे पत्रावरून आमचा मुलूख दाबिला आहे तो सोडावा असें आहे. मुंबईवाल्यांस सरकारचें पत्र सरकारअंमलाविषयीं लिहिलें कीं, आमचे सरदार गुजराथ वगैरे सरकार अंमलीं अंमल बसवितील, त्याचा अर्थ त्यांणीं आहे तसाच असेल. तुह्मीं लिहिल्याप्रमाणें उत्तम आहे असें लिहिलें. त्यास आमचे लिहिलें आहे तसें असावें. असें नसतां ते असें कां लिहितात? हें ठीक नाहीं. असें त्यासीं बोलावें कीं, आह्मीं लिहितों एक, तुह्मी उत्तर त्याचा अर्थ फिरवून तेच जमा धरून लिहितां हें काय? याचा अर्थ काय? समजून जाबसाल करीत नाहीं. यास्तव आमचीं ठाणीं दाबिलीं आहेत तीं सोडून द्यावीं, असें लिहिलें, त्यास बंगाल्याचा वकील येईल तो जें करणें तें करील. याचें वस्तु कांहीं होत नाहीं. बंगाल्यांचें पत्रांतील मजकूर आह्मीं सर्व त्यासीं बोलिलों व आपण त्यांतील अर्थ काढून कितेक प्रकारें लिहिलें. त्यापेक्षांही अधिक बोलिलों. परंतु त्यांणीं एकच जाबसाल केला कीं, तुह्मीं पत्र लिहिलें त्यांत मात्र आमचा अंमल आह्मी करूं ह्मणून लिहिलें. परंतु बंगाल्याहून आह्मांस पत्र आलें आहे, त्यांत कांहीं ठाणीं दाबिलीं आहेत तीं सोडावी असें नाहीं. लढाई मात्र महकूब. ठाणीं सोडणें व कदीम सलूख आहे त्याप्रमाणें वर्तणें असें असतें, तरी आह्मीही अंमल सोडितों. मग बंगाल्याहून वकील यावयाचें प्रयोजन काय? ज्या अर्थीं वकील येतो त्या अर्थीं अंमल सोडणें असा अर्थ होत नाहीं. वकील आल्यावर जो ठराव होईल त्याप्रमाणें वर्तों. वकीलही थोडकेच दिवसांत दाखल होईल. त्याचें नांव हपटन करणेल. आह्मी जें लिहितों तें समजोनच लिहितों. याप्रमाणें त्यांणीं जाबसाल केला. फौज गुजराथेंत पाठवावयाचा मजकूर त्यांणीं सांगितलें जे, आमचे विचारें श्रीमंत त्या प्रांतांत धामधूम करणार नाहींत. बहुधा आमचे फौजेस सोडून राहणार नाहींत. सेवट वकील येतो तो सारे बंदोबस्त करील. काडीमात्र लढाई ठेवणार नाहीं. असें बोलले. त्यास आह्मी बोललों कीं, फौज न पाठवावी असें तुमचे विचारें असल्यास बरेंच आहे. तुह्मांकडे जाबसाल लागल्यास फौज कशास पाठवावी? त्यास त्यांणीं उत्तर केलें कीं, आमचे अकलेनें आलें तें आह्मीं सांगितलें. तुह्मीं आह्मांस पुसोन फौज पाठवावी न पाठवावी असें ह्मणतां. कां कीं उद्या वकीलाजवळ सांगावयासीं कीं त्यांणीं सांगितलें ह्मणून आह्मीं फौज पाठविली; अगर त्यांणीं नको ह्मटलें ह्मणून न पाठविली. याजकरितां आह्मी फौज पाठवा अगर नका पाठवूं, हें कांहीं सांगत नाहीं. परंतु श्रीमंत कांहीं तुमचे मुलुकास उपद्रव करणार नाहींसें वाटतें. सुरतेहून आजच लक्षुमणपंत नातू व एक कपतान मुंबईस आले. एका दोहो दिवशीं त्याचाहि शोध करून लिहून पाठवूं. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञापना."

❧ ❧ ❧

## २६. टिपूकडील बातमीपत्र.

श्री.

"विज्ञापना:—जबानी सुभया बिन गोविंदा व कृष्णापा बिन देवय्या हरकारे कर्नाटकी म॥ मलकाप्पा विभूतराव यांस टिपूकडील बातनीचे कामगिरीस रवाना केलें, ते हरपनहल्लीवरून बाणावर चंद्ररायपट्टणाहून श्रीरंगपट्टणास गेले. तेथील वतमान:– टिपू सुलतान दर्यादौलत बागांत राहिले आहेत. फौज कावेरीतीरानें उतरली असे. बागाहून स्वारी दो ती दिवसां शहरांत जाऊन, खासे वाड्याचें काम होत आहे तें पाहून, शहर गंजम व शुक्रवारपेठेच्या दरवाज्याजवळ हणमंताचे देवळ होतें तें मोडून, मशिदीचें काम चालत आहे तें पाहतात. उप्रांत सायंकालीं बागांतच डेऱ्यास येतात. फौजेचा रोंख सुरापुरचा बोलवा आहे. दसरियाचे मुहूर्तें फौजा निघाल्या, ते गुत्ती बलहारीचे मध्यें आहेत. कित्तुरावर बजरजमाखान पांच सात हजार फौजेनिशीं आहे. शहरांत जाण्याचा पूल पहिला उत्तरेकडे दगडी आहे. खेरीज दुसरा पूल इटेबंदी काम पूर्वेकडे ईशान्येचे रोखें केरघाटाजवळ कावेरीस नवें काम चालीस लाविलें आहे. किरीटी रामराजे याजकडून नायकार सरकारांत पुण्यास पत्रें घेऊन येत होते. ते चंद्ररायपट्टणचे बारींत धरून पट्टणास अटकेंत ठेविलें. कागदपत्रही राहून घेतलें. छ १६ रविलावल श्रुत होय ही विज्ञप्ति."

❀ ❀ ❀

## २७. नागपूरकर भोंसल्यांचे दसऱ्याचे पोशाख.

श्री. इ. स. १७८७.

"यादी पोषाख दसरियाचे रवाना नागपूर सु॥ समान समानीन मया व अलफ.

| | ह॥ मुदस्त. | सालमजकुरी. | कमी | जाजती. |
|---|---|---|---|---|
| रघोजी भोंसले | १६७१ | १३८९। | २८१॥। | ० |
| मुधोजी भोंसले | १७०७। | १३९२ | ३१५। | ० |
| खंडोजी भोंसले | १७५६ | १५९८ | १५८ | ० |
| व्यंकोजी भोंसले | ८४० | ८४८ | ० | ८ |
| परसोजी भोंसले | ११२० | १६४० | | ५२० |
| | ७०९४। | ६८६७। | ७५५ | ५२८ |

मैनुदौले रवाना भागानगर.

| सालमु॥ | सालमजकुरी | कमी | जाजती |
|---|---|---|---|
| १४९१ | १३१३। | १७७॥। | ० |

❀ ❀ ❀

## २८. दिल्लीकडील एक महत्वाचें पत्र.

दिल्ली येथें मराठ्यांचे हितचिंतक व साहाय्यकर्ते पुष्कळ लोक असत. ते नाना फडनविसांस दिल्लीकडील राजकारणांचीं हरहमेशा बातमीपत्रें पाठवीत असत. अशांपैकीं राव राधाकिशन या नांवाच्या एका इसमाचें पत्र आह्मांस उपलब्ध झालें आहे. हा इसम नाना फडणवीस पानिपतच्या लढाईतून पराभव होऊन डिगेस आले, त्या वेळीं तेथें हजर होता, असें दिसतें. याच्याबरोबर कोणी अयोध्याप्रसाद नांवाचा इसम होता. त्याचाही उल्लेख या पत्रांत केलेला आहे. हे दोघे इसम दिल्ली येथें पेशव्यांचे वकील पुरुषोत्तमपंत हिंगणे यांच्याजवळ राहून सेवाचाकरी असत. ह्यांचा नानांनीं परामर्श घेतला नाहीं ह्मणून राधाकिशन यानें या पत्रांत तक्रार केली आहे. पुरुषोत्तमपंत हिंगणे हे दिल्ली येथें इ. स. १७८३ मध्यें मृत्यु पावले. त्यांच्या वकिलीचे जागीं बापू विठ्ठल—ह्मणजे विठ्ठल शिवदेव विंचूरकर यांचे चिरंजीव शिवाजी विठ्ठल यांची नेमणूक करावी, अशीही राधाकिशन यानें नानांस शिफारस केली आहे. हें पत्र येणेंप्रमाणें:—

पैं॥ छ १३ जमादिलाखर अर्बा. श्री. इ. स. १७८४.

"श्रीमंत महाराज राजाधिराज श्री नानासाहेब महाराजांचे सेवेसीं:—

सेवक आज्ञाधारक राव राधाकिशन दंडवत अर्जे करून विनंती करितों:— श्रीमहाराजांनीं येथील कुशल जाणून स्वानंदलेखन करावयास आज्ञा केली पाहिजे. यानंतर ज्या समयीं श्रीभाऊसाहेबांचा हंगामा जालियावर डिगेंत श्रीमहाराज आले होते, त्या समयीं सेवक व राजश्री अयोध्याप्रसाद, महाराव पुरुषोत्तमपंत हिंगणे ह्यांबरोबर सेवेंत हजर राहून, महाराजांस प्रसन्न पाहून सेवा करीत होतों. महाराजांनीं कृपादृष्टीनें आज्ञा केली होती कीं, सरकारचें ऊर्जित जालियां हिंदुस्थानांत तुमचाच इखत्यार देऊं. दुसरा कोणी न राहील. ईश्वरानें आह्मां सेवकांचे भाग्यानें श्रीमहाराज पृथ्वीचे धणी व बादशाहा जालेत. परंतु आह्मी आपले मनोर्थास न पावलों. व आमची खबरही न घेतली. व किती विनंतिपत्रें पाठविलीं, (तरी) उत्तरही सादर न जालें! अहर्निश महाराजांचें शुभचिंतन करितों. ईश्वर सलामत राखो. सेवक आतां शिंद्याचे लष्करांत आहे. आज्ञा होईल तर हुजुरास येईन. जर इकडेच सेवकांस परामर्ष होण्याची आज्ञा असेल तर कांहीं फार कठीण नाहीं. थोडे बहुत येथील मुलुखावर नेमणूक जाली तर पोषण सेवकाचें होईल. पुढें प्रारब्ध—आधीन गोष्ट आहे. हिंदुस्थानाकडील प्रसंग श्रीमहाराजांस वरचेवर विदित होत असेल. अफराशियाबखान वगैरे नजीबखानाचे गुलाम दिल्लींत आहेत. बादशाहांस आगरियास आणावयास उपाय करितात. बादशाहा, यांचे झटल्यावर दिल्लीहून निघत नाहीं. बादशाहानें इस्टीन फिरंगीस कलकत्त्याहून बुलाविलें. तो लखनऊपर्यंत आला. दिल्लीस येणार. अफराशियाबखान

व आणीक सरदार इच्छितात कीं, फिरंगी यानें दिल्लीस न यावें. यांचें येणें दिल्लीस सर्वांस वाईट आहे. याकरितां विनंति केली जाते कीं, दिल्लींत श्रीमहाराज कोणी पाठवीत. पुरुषोत्तमपंतास देवाज्ञा जाली. आतां कोणी मातबर वकील ऐसा पाठविला पाहिजे कीं, सर्व इखत्यारी त्याची असे. विलंब होणें सलाह नाहीं. जर बापू विठ्ठल यांसही लिहिलें ये कीं, तुह्मी हिंदुस्थानची खबर घेणें, तर बहुत उत्तम आहे. सर्व गोष्टीनें वाकिफ आहेत. व समस्त सरदार हिंदुस्थानाचे यांसीं राजी आहेत. श्रीमहाराजांस विदित होय ह्मणून विनंति केली. उत्तर यावें. लवकर सादर होय हे विनंति."

❋ ❋ ❋

## २९. शाहाअलम बादशाहाचा नवरोजा.

नवरोजा ह्मणजे राज्यारोहणाचा प्रतिसांवत्सरिक उत्सव. हा दिल्ली येथें प्रत्येक बादशाहाचे कारकीर्दींमध्यें होत असे. शाहाअलम बादशाहाचा २८ वा राजशक ता. १९ जमादिलावल हिजरी सन १२०१ ह्मणजे ता. ३ मार्च इ. स. १७८७ रोजीं जाहला. त्याची हकीकत हिंगण्यांच्या एका पत्रांत पुढें लिहिल्याप्रमाणें दिली आहे. ती वाचनीय आहे.

श्री.

"पु॥ श्रीमंत रामश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति ऐसीजे. छ० १९ जमादिलावलीं पातशाहा नवरोजा कुरसीवर बसले. त्यासमयीं राजश्री पाटिलबावांनीं एकशें एक मोहर नजर केली. व जयपूरकराकडील व रावराजाकडील आठ घोडे नजर आले होते, त्यांपैकीं एक घोडा बमय कलाबतू जीन सरंजामसुद्धां नजर केला. नवरोजा ह्मणजे आपली संवत्सरप्रतिपदा. नवें साल लागतें. याप्रमाणें यवन लोकांचा नवरोजा. व छ० २० मिनहूस पातशाहा जे सन बसले-जे सन ह्मणजे ज्या दिवशीं पातशाहास शाहाजादकी सुटून पातशाही जाली-ज्या तारखेस पातशाहा जाले, त्या तारखेस हरसाल वर्षगांठीप्रमाणें उत्साह पांच दिवस करावा ऐसी रीत आहे. त्यास छ० २० रोजीं राजश्री पाटिलबावांनीं पातशाहास एकशेंएक मोहोर नजर केली, व पातशाहाजाद्यांस चौदा मोहरा नजर केल्या. पातशाहांनीं साता पारच्यांचा खिलत व मोत्यांची कंठी व जेगा सिरपेंच व ढालतरवार येणेंप्रमाणें इनायत केली. व येणेंप्रमाणेंच नवरोजाचे दिवशींही इनायत जाली. छ० २१ तारखेसही एकशेंएक मोहोर व पातशाहाजाद्यास चौदा मोहरा येणेंप्रमाणें नजर केली. पातशाहांनीं रोज गु॥ प्रमाणें खिलत व जवाहीर इनायत केलें. छ० २२ तारखेस एकशेएक मोहोर व चौदा मोहरा पातशाहाजाद्यास येणेंप्रमाणें नजर केली. पातशाहांनीं सदरहू प्रमाणें खिलत व जवाहीर इनायत केलें. छ० २३ तारखेस सदरहूप्रमाणेंच मोहरा नजर केल्या. व खिलत वस्त्रें जवाहीर येणेंप्रमाणें इनायत जालें. छ० २४ तारखेस सदरहूप्रमाणें मोहरा पातशाहांस

व पातशाहाजाद्यास एकशें पंधरा नजर केल्या. पातशाहांनीं सात पारच्यांचा खिलत खास पोशाक व जवाहीर मोत्यांची कंठी व जेगा सिरपेंच ढाल तरवार येणें-प्रमाणें पांच दिवस समारंभ जाला. हमराई लोक व सरकारचे मुत्सद्दी व सरदार यांस पांचा दिवस फुलांच्या माळा व विडे येणेंप्रमाणें दिधले. पांचवे रोजीं कृष्णाजी पवार वगैरे पवार व गोपाळराव त्रिंबक व रघुनाथराव बळवंत वगैरे नामी सरदार व मुत्सद्दी यांस पांच पारचे, चार पारचे, तीन पारचे......जाडी गोशपेच येणें प्रमाणें, ज्याचा जसा मरातब होता त्याप्रमाणें, पातशाहांनीं इनायत वस्त्रें दिधलीं. त्यांनींही आपल्या मरातबाप्रमाणें आकरा, पांच, दोन, एक येणेंप्रमाणें मोहरा नजर केल्या. याप्रमाणें पांच सा दिवस पातशाहांचे येथें उच्छाहशाहादी जाली. आपणांस कळावें ह्मणून विनंति लिहिली आहे. पातशाहांस सन २८ अठ्ठाविसावा लागला. नवा शिक्का पडला. जसनचे रोजीं पातशाहांनीं सर्वांस नव्या शिक्याच्या मोहरा व रुपये पांच मोहरा व दोन एक मोहोर व येणेंप्रमाणेंच रुपये ज्याप्रमाणें ज्याची उमदगी आहे त्याप्रमाणें त्यास वाटल्या. बहुत काय लिहिणें कृपा केली पाहिजे हे विनंति."

❦ ❦ ❦

## ३०. पेशव्यांची इ.स. १७७३ सालची श्रावणमासची दक्षिणा.

इ. स. १७७३ सालच्या दक्षिणेचें टिपण आह्मांस उपलब्ध झालें आहे तें येणेंप्रमाणेंः—

श्री. इ. स. १७७३.

"तालेबंद धर्मादाव श्रावण मासची दक्षणा सुरूसन अर्बा सबैन मया व आलफ.

रुो

४९४७६५ ब्राह्मणास दक्षणा रुो.

२८७१०५ पर्वतीस रमण्यांत.

ब्राह्मण आसामी ४२१२५

शेरा दर ६॥।‑ प्रमाणें.

रुो

२०२१३४ वाड्यांत दक्षणा वांटली व जागा जागा पाठविली ते आसामी २२८५

५०००० कित्ता

१५२१३४ आसामी २२८५

शेरा दर

६६॥‑।

प्रमाणें रुो

२०२१३४

शरादरे ८८।≡। प्रमाणें
रुो
५५२६ दुखणेकरी ब्राह्मण शहरांतील
आसामी ६८४
शेरा दर ८८෴। प्रमाणें
रुो

४९४७६५ ४५०९४
५०००० कित्ता एकसाला रुो
४४४७६५ ब्राह्मण आसामी ४५०९४
शेरा दर ९॥෴॥

४९४७६५
शेरास सरासरी दर १०॥≡॥
१०१४२॥। खुर्दा. टके
३३३०८१० कुप्या ह॥ पाचरोजा आसामी
१३३२३३
दर आसामी ·।· प्रत्येक
२९७२४ ब्राह्मण आसामी
११८८९६

३३३०८।

१३३२३३

५०५७॥९ दक्षणेसमयीं इ॥
छ ४ जमादिलावल
छ ५ ब्राह्मण
खुर्दा टके
५०५७॥९ खुर्द्यांचें आसामी
४०६०९
दर आसामी रु॥
८६
प्रमाणें
रुो
आसामी
१५११६९



५०५७॥९ ४२१२५

३८३६५॥।९ १७५३५८

पैकीं वजा कसर देतां घेतां जाजती जाहला तो वजा
टके १३। बाकी खुर्दा टके ३८३५२॥ एकंदर ३॥।१॥
प्रमाणें १०१४२॥।- रुो

५३७। पानें विड्याचीं सुमार
१०७४७००
दर २००० प्रमाणें ५३७।- रुो
पैकीं वजा सूट ८- बाकी.

५०५४४५

५०००० कित्ता एकसाला
४५५४४५ कित्ता दक्षणा व खुर्दा मिळोन

५०५४४५

## ३१. महादजी शिंद्यांचे सरदार बळवंतराव धोंडदेव.

महादजी शिंदे यांनीं उत्तर हिंदुस्थानांत जे पराक्रम केले त्या कामीं त्यांस त्यांच्या रणशूर सरदारांचें व चतुर मुत्सद्यांचें पुष्कळ साहाय्य झालें असलें पाहिजे, यांत शंका नाहीं. परंतु ह्या सरदारांचीं नांवें व संपूर्ण माहिती बिलकूल उपलब्ध नाहीं, ही खेदाची गोष्ट होय. महादजी शिंद्यांच्या सरदारांपैकीं बळवंतराव धोंडदेव हे एक प्रसिद्ध सरदार होते. ह्यावर पाटिलबावांची फार मेहरबानी असे. ह्यांचें नांव शिंद्यांकडील पत्रव्यवहारांत अनेक वेळां आढळून येतें. हे मथुरा मुक्कामीं ११ जुलै १७८५ रोजीं मृत्यु पावले. ह्यांस पुत्र नव्हता. सबब महादजी शिंदे यांनीं त्यांस दत्तक पुत्र दिला. त्याचें नांव रघुनाथराव असें ठेविलें. ह्या रघुनाथरावानें ह्या प्रसंगाच्या हकीकतीचें नाना फडणविसांस लिहिलेलें पत्र उपलब्ध झालें आहे तें येणेंप्रमाणें:—

पै॥ छ १५ जिल्हेज सन सीत. श्री.
समानीन आश्विनमास.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामीचे सेवेसीं:—

विनंति सेवक रघुनाथराव बलवंत कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. येथील क्षेम आषाढ शुद्ध पंचमी मुक्काम श्रीक्षेत्र मथुरा कृपावलोकनेंकरून सेवकाचें वर्तमान यथास्थित असे. विशेषः- तीर्थरूप बळवंतरावजी यांचे शरीरीं दीडमास समाधान नव्हतें. दिवसेंदिवस क्षीणता होऊं लागली. तेव्हां राजश्री पाटिलबावा यांस सांगोन पाठविलें कीं, आमची अवस्था याप्रमाणें आहे. सरदारीचे डौल पूर्ववत्प्रमाणें चालून कर्जाचा

परिहार जाला पाहिजे. यास्तव दत्तकपुत्र घेऊन अधिकारी करावा. हे गोष्ट बावांनीं ध्यानांत आणून समंत दिधलें. कारभारी त्यांनीं आपले, आमच्या घरास पाठवून, चवघे शिष्ट ब्राह्मण वैदिक व पंडित मेळवून, यथाविधी दत्तविधान सेवकाचें करून, पुत्रत्वांत घेऊन अधिकारी केलें. नंतर पाटिलबावा आमचे घरास आले. त्यांजवळ उभयतां सौभाग्यवती मातोश्री यांनीं कर्जाचा पेंच उलगडावा व सरदारीचे डौल यथास्थित चालावे येविषयीं भार घातला. ऐकून बावांनीं खातरजमा केली. उपरांत तीर्थरूप बलवंतरावजीचा काळ जाहला. उभयतां सौभाग्यवती मातोश्री यांनीं सहगमन केलें. हें वर्तमान राजश्री कमलाकर राम व विठ्ठल सदाशिव यांनीं विनंति केलीच असेल. आमचें पथक पाटिलबावांनीं मेरटप्रांतीं चाकरीस पाठविलें होतें, तेथें गवगवा बहुत पडला, व येथें सावकार मामलेदार अधीर जाले. क्रम न चाले. बंदोबस्त होईना. ऐसें पाहून, पाटिलबावांनीं वस्त्रें बहुमान सेवकास देऊन सर्वांची खातरजमा केली. येणेंकरून प्रस्तुत येथें विलग पडलें होतें, तें मोडून क्रम चालला. परंतु आह्मी श्रीमंतांचे व स्वामींचे पदरचे. वडिलांनीं श्रीमंतांचे पायांसीं लक्ष ठेऊन आजपावेतों सेवा केली. त्या अन्वयें सेवकाच्याही सरदारीचा बंदोबस्त स्वामींनींच कृपा करून लाऊन दिला पाहिजे. यांतच आमचें कल्याण आहे. आह्मी काया वाचा मनसा स्वामींचे चरणासीं शरण राहून, आज्ञा होईल ते पदरीं घेऊन, यथाशक्ति सेवा करावी. येविशीं कमलाकर राम व विठ्ठल सदाशिव यांस लिहिलें आहे. त्यांनीं विनंति केलीच असेल. अगर करतील. तें मान्य होऊन, सरदारीचीं वस्त्रें बहुमान सनद व सरंजामाच्या सनदा कृपा करून यावयास आज्ञा जाहली पाहिजे. आह्मी आपलें हृद्गत पेंचपांच सर्व राजश्री सदाशिव दिनकर यांस सांगितले आहेत. ते विनंति लिहितील. सर्व आधार स्वामींच्या पायांचा आहे. कृपा करून डौल चालवून सेवा घेणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय ही विज्ञप्ति.

सेवेसीं विनंति सेवक यशवंत मैराळ कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. राजश्री रघुनाथराव यांनीं सविस्तर विनंति लिहिली आहे. त्यावरून ध्यानास येऊन कृपा करणार स्वामी समर्थ आहेत. सेवेसीं श्रुत होय हे विज्ञप्ति."

❧ ❧ ❧

## ३२. सवाई जयपुरचें बातमीपत्र.

सवाई जयपूर येथें पेशव्यांचे वकील लक्ष्मण संभाजी नांवाचे होते. त्यांनीं ता. १९ आगष्ट इ. स. १७८९ रोजीं लिहिलेलें बातमीपत्र उपलब्ध झालें आहे. तें फार मनोरंजक आहे. तें येणेंप्रमाणें:—

पै॥ छ १५ सफर तिस्सैन. श्री.

"श्रीमंत राजश्री नाना स्वामींचे सेवेसीं:—

विनंति सेवक लक्ष्मण संभाजी कृतानेक साष्टांग नमस्कार विज्ञापना. सेवकाचें वर्तमान ता॥ श्रावण शुद्ध १३ मुक्काम सवाई जैपुर खावंदाचें कृपावलोकनेंकरून यथास्थित असे. स्वामीकडील कुशलवृत्त लिहावयासी लेखकांसी आज्ञा असावी. विशेषः कृपापत्र सादर जालें, तें मस्तकीं वंदून दर्शनातुल्य आनंद जाहला. पत्रांत आज्ञा कीं, "सविस्तर वर्तमान खंडोपंतांच्या पत्रीं लिहिलें आहे. तेणेंप्रमाणें राजांसीं बोलून उत्तर पाठविणें." त्यास, आज्ञेप्रमाणें सविस्तर अर्थ महाराजांसीं निवेदन केलें. त्याचें उत्तर पंत मशारनिल्हेचे पत्रीं लिहिलें आहे. ते सविस्तर विनंति करतील. प्रस्तुत जूट बांधलें आहे. ममतापूर्वक लावून घेतल्यास दूर नाहींत. सांप्रत एकत्रता विशेष. परंतु खातरजमा जालिया सर्व अर्थ घडतील. हिंदुस्थानांत मुख्यता यांजकडेस आहे. यांच्या लगामीं लहान मोठे राजे रजवाडे आहेत हें ध्यानांत आहेच. यांजवर कृपा करून ममतेंत राखिल्यास उपयोग आहे. खावंद सर्व जाणत आहेत. तेथून विनंति लिहावी ऐसें नाहीं. राणा प्रवीण, सर्व जाणतो. परंतु लाचारपणावर वरकड सर्व अर्थ होत आहेत. दुसरें, "कैलासवासी श्रीमंत नारायणरावसाहेब गेलियावर मागें घरचा व बाहेरचा बखेडा ऐसा पडला कीं, सर्वत्रांस दिसोन आलें जे राज्य राहात नाहीं. परंतु ऐसे समर्थ प्रतापी प्रसंगीं होते कीं, बिघडलें राज्य ठिकाणास आणिलें. श्रीमंत राजश्री रावसाहेब बाल्यावस्थेंत आणि श्रीमंत राजश्री रघुनाथरावजी स्वतः धनी केलेले पुरुष. त्यांसीं विरुद्ध करून, प्रथम त्यांचें उत्थापन करून, निदानीं आपले काबूंत आणून ठेवणें व इंग्रेज इत्यादि यांचें पारिपत्य करणें व राज्यांतील सरदारांच्या चित्तांतील शुद्धता करून सर्वांसीं ऐक्यता करून लाऊन घेणें व प्रजेचें पाळण उत्तमप्रकारें करणें, हें काम त्यांचेंच आहे. दक्षिण हिंदुस्थानांत दुसरें कोणी नाहीं. ऐशा समर्थास कोण्हीही गोष्ट अगाध नाहीं. समयानुसार दर्शनाचा लाभ घडल्यास दुःखाचा परिहार होईल." वगैरे भाषणें हरएक समयीं होत आहेत. याचा विस्तार म्यांच विनंति लिहावी ऐसें नाहीं. परस्परेंही श्रुत होईल. वरकड अर्थ पत्रावरून निवेदन होतील. कृपा करून पाळण करणार धणी समर्थ आहेत. श्रीमंतांचा खलिता व आपलें पत्र राजांचें नांवें आलें तें पावलें. त्याचें उत्तर येथून पुनः लिहिलें आहे. हें प्रविष्ट जालियावर कृपा करून पत्रोत्तर पाठविणार खाविंद आहेत. बहुत काय लिहिणें कृपा असावी हे विज्ञप्ति."



✠ ✠ ✠

माध्यन्दिनवाजसनेयिशाखीया

# शुक्लयजुर्वेदसंहिता.

## उवट–महीधरभाष्ययुता

### यजुःशाखीयविविधपरिशिष्टयुता च.

हा वेद प्रायः यज्ञकांडप्रकाशक असून याचा शेवटचा ४० वा अध्याय मात्र अद्वैतपर आहे. यज्ञियमंत्रच फार असल्यामुळें प्रत्येक मंत्राचा अर्थ समजणें आवश्यकतेचें आहे. आणि अर्थ करणें व्याख्यात्यांच्या इच्छेप्रमाणें भिन्नरीतीनें असतें तो सर्व भाग प्रत्येकाच्या लक्षांत यावा ह्मणून आह्मी कण्डिका किंवा मंत्र या प्रत्येकाच्या खालीं उवटभाष्य व त्याखालीं महीधरभाष्य अशी योजना करून प्राचीन हस्तलिखित पुस्तकांवरून शुद्ध करून हा ग्रंथ छापला आहे. आरंभीं प्रत्येक अध्यायाचा विषयक्रम व शेवटीं या शाखेचीं उपयुक्त पारायणविधि, याज्ञवल्क्यशिक्षा इत्यादि परिशिष्टें आणि मंत्रांचा अकारादिकोशही जोडला आहे. किं. ५ रु. ट. ·।॥·

# त्रैलोक्यमोहनकवच.

हें कवच फार सर्वोत्कृष्ट आहे. याचें महत्व नांवावरूनच अवगत होतें. हें मुळापासून तें शेवटपर्यंत मंत्रमय आहे. यांतील मूळ जाड टैपांत व प्रत्येक मंत्राचा खुलासेवार अर्थ जरा बारीक टैपांत छापला आहे. ह्या कवचाचें वाचन लोकांस लाभकारक आहे. किं. ८॥ ट. ८॥·

तुकाराम जावजी,
निर्णयसागर छापखान्याचे मालक,
काळकादेवी रोड, नं. २३ मुंबई.

Published by Tukaram Javaji, Proprietor N. S. Press,
23, Kolbhat Lane, Bombay.

Printed by R. Y. Shedge at the Nirnaya-Sagar Press,
23, Kolbhat Lane, Bombay.

